Selections from the Peshwa Daftar

1 - 8 (except 3)



1 उद्गीर प्रकरण १७६० ol

2 पानिपत प्रकरण. १७५० - १७६१

4 आनंदीबाईची दिनचर्या [illegible]बर १७८६ - ऑक्टोबर १७८८

5 बारभाईंचें प्रकरण.

6 छत्रपति रामराजाचें प्रकरण.

7 शाहू व बाळाजी विश्वनाथ - आरंभीचा काळ साली १७०७-१७२

8 शाहू - खासगी.

पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद

# १

# उद्गीर प्रकरण

१७६०



[किंमत—१२ आणे किंवा १ शिलिंग ४ पेन्स]

संपादक—गो. स. सरदेसाई, बी. ए.

गव्हर्न्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई
१९३०

श्री.

पौ छ ९ रबिलाखर

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामिचे सेवेसी.

विनंती सेवक बापूजी माहादेव व दामोदर माहादेव सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ २४ माहे सफर मु॥ इंद्रप्रस्थ स्वामीचे कृपावलोकने येथास्थित असे विशेष. स्वामीकडील कृपापत्रे छ ९ जिल्हेजची सरकारच्या जोडी-बराबर छ २० मोहरमी पावलीं. तेथें आज्ञा कीं, नादरशाहाकडील व दिलीच्या अमिराचें व हिंदुस्थानच्या राज्याचें वगैरे जें नवलविशेष वर्तमान येत जाईल तें लिहीत जाणें म्हणोन आज्ञा केली. यैसीयास पूर्वी नवाब उमदतुलमुलुक शांत जाले, तेव्हा मुजरद कासदांची जोडी सेवेसी रा केली; व येक जोडी दुसरीहि पाठविली. त्या दोही जोड्याबराबर या प्रांताचें साकल्य वृत्त लिहीले आहे. सेवेसी श्रुत जाले असेल. सांप्रत नादरशाहाकडील वर्तमान यैसे आहे कीं, याचा रुमवाल्याचा सल्रूक जालियां हा स्वदेशास परतून आला. . आपल्या मुलकाचा बंदोबस्त करून प्रस्तुत येकाच ठिकाणी काहीक दिवस छावणी करून राहिला आहे. मिर्जा नसरुला पातशाहजादा व तहमासकुलीखां या दोघास काबुलेकडे मार्गस्त केले. महमदशाहास व नवाब वजीर व नवाब मनसूर अलीखान यांस पत्रे पाठविली आहेत, जे मजला हिंदुस्थानातून येऊन आठ नव वर्षे जालीं. अद्याप तुम्ही स्वदेशाचा कांहीं बंदोबस्त केला नाहीं. परस्परें यैकतों जे, चाकर कोण्ही चाकरीच्या मार्गें वर्तत नाहींत, आपलाले ठिकाणीं खावंद होऊन राहिले आहेत. याकारितां मुलकांत गनिमाचा गलबला विशेष आहे. म्या इतकी तुम्हांस ताकीद केली असतां तुम्हीं मुलकाच्या बंदोबस्ताचा काहींहि प्रेत्न न केला. मजसारखा पक्षपाती असतां, सर्व प्रकारें मी तुम्हास अनकूल असतां, आज तुम्ही आपले पातशाहीचा बंदोबस्त न कराल तर कधीं करणार? अद्यापहि कांहीं गेले नाहीं. दोन दिवस सुखावर मन न ठेवितां मिरजा नसरला व तहमासकुलीखांनास पंचविसा हजारा स्वारानसी काबुलेहून बोलाऊन घेणें व स्वता तुम्ही बाहेर निघून हे व तुम्हीं दोन वर्षेपर्यंत श्रम करून दक्षण हिंदुस्थानचा बंदोबस्त करणें. माझी गरज असालियां मीहि तयारच

आहे आणीख फौज लागेल तर पाठवीन. यैसी बहूत दीलगरेमीनें[1] पत्रें आलीं. पा(तशा)ह वजीर सफदरजंग, राजे अफजूखां, येह्याखां, मिरमुनसी यानी लाल बागांत येकांत केला. च्यार घटकापर्यंत परस्परे जाबसाल बहूत समाधान पावले. अर्धीच तर नादरशाह येकवचनी. जो यांसी करार केला त्यांत अंतराये तिलतुल्य केला नाहीं. आतांहि बंदोबस्त करूं इछितील तर साहित्य करावयास सिध आहेत. येवंच या प्रकारची पत्रें आलीं याकरितां समाधान पावले. अद्याप उतरें लिहीलीं नाहींत. पाहावें काये लिहीतात. दुसरें उमदुलमुलकाच्या जागिरा व तालुके कूल पातशाहजादियास जाले. अमीरखानाचे कदीम अमील होते. तूर्त त्याजवरच बहाल ठेविले आहे. सरदारानी माधोसिंगास च्यार परगणे, टोंक, तोडा, मालपुरा, नेवाई अठरा लाखाची जागा, माधोसिंगासी मुकरर करून राजश्री खंडेराव होलकर यासी राणाजीकडे पाठविले; आणि रा. गोविंदराव तमाजी यांसी सरदारानी लिहीलें कीं, रा. निबाजी खाटके व रामराव मुनसी ईश्वर-सिंगासमीप मार्गस्थ केले आहे. ते सांगतील त्याप्रमाणें ईश्वरसिंगास समजाऊन माधोसिंगास जागा देवणें. खावंदाची मरजी या प्रा ठैराव जाला. हें वर्तमान ईश्वरसिंगास कलले. ते समई सेखावंताचा याचा कलह होता. हे वर्तमान पावतांच सिवसिंगासी सलूक केला. व त्यास आपले रफीकें[2] केलें. कूल रा(ज्या)तील रजपूत जमा केले, व नवी फौज निगादास्त मांडली. राणाजीनी येक फौज भारतसिंगा-सांगाते देऊन जाजपुराकडे पाठविलें, व कोटेवाला व शाहापुरेवाला वगैरे यानीं आपलाले जागां तयारी केली आहे. राणाजीहि मागून सिधता करून निघणार. हे वर्तमान यैकून ईश्वरसिंगानी राये नरायेणदासजीस भारी फौज समागमें देऊन पुढें पाठविलें; व त्या मागून कोठेवाला वगैरे याच्या मुकाबल्यावर राजामलजीस पाठवणार होते; व राणाजी निघाले तर त्याच्या मुकाबल्यावर स्वता ईश्वरसिंगानी निघावें, हे नजवीज ठैरली. इतक्यांत छ ९ सफरीं सोमवारी राजामलजीस देवअज्ञा जाली. ईश्वरसिंगास व सवाई जैपुरात लाहाणमोठ्यास परम खेद जाला. बल्की तमाम हिंदुस्थानास मलजीचा मातम[3] जाला. मोठा कर्ता माणूस होता. ईश्वरइछेस उपाये नाहीं. जे होणे ते तो जालें. तथापि ईश्वरसिंगाची वासना मुकलीस[4] सरदाराच्या नेमणुकी प्रा माधोसिंगास जागा द्यावीसी नाहीं. येक लडाई मारावी. प्रस्तुत भारतसिंग दाहा बारा हजारानसीं पुढें आला आहे. यास जोवर खंडेराव होलकर सामील जाले नाहींत तोवर जरब द्यावी. मग होता होईल तें पाहावें. यैसा याचा मनोगत आहे. यास्तव राये नरायेणदास भावाची

१ प्रेमानें. २ दोस्त.
३ शोक. ४ समजुतीनें.

मातम न करतां दर मजल चाललेच गेले. राणाजीच्या फौजेचा * * * ( भातरसिंग ) जीचा दो कोसाचा तफावत राहिला आहे. परस्परें दृष्टादृष्ट होते. पाहावें कैसा प्रसंग होतो. आभयेसिंगानी बख्तसिंगास लिहीलें होतें कीं राणाजी ईश्वरसिंगावर जातात. तुम्हासहि साहित्यविषईं त्यांनीं पत्रें लिहीलीं आहेत. कुमक करणें उचीत आहे. त्यास अभयेसिंगाची वासना कीं, बख्तसिंगाने राणाजी-कडे जावें, व आपण बिकानेरचे राज्य घ्यावें; व बख्तसिंगाची हेत कीं, बिकानेरचे राज्य निमे आपण घ्यावे, व निमे अभयेसिंगानी घ्यावे. यैसा त्यांचा यांचा परस्परे मनोविकल्पसा आहे. मातुश्री गयाश्राध करून श्रीप्रयागास आली. प्रयागी मकरस्नान संपादिले. सिमगी पौर्णिमा करून देशास चालणार. बहुधा चालली असावीं. दोन जोड्या आमच्या प्रयागास गेल्या आहेत. आज उद्या येतील. सफदरजंगाचे दरबारी वर्तमान आले कीं, पुत्रासी अजुर्दा आहेत; म्हणून वाराणसीसच राहूं म्हणतात. हे गोष्ट नवाबानी आम्हास पुसली. आम्हीं विनंति केली कीं, हे गोष्ट फटकाल आहे. हें स्थलें येसी आहेत कीं, हिंदू होत असतां या स्थलास गेलियावरी क्षेत्रास सोडावे यैसा हेत होत नाहीं. यास्तव राहूं म्हटले असेल. या गोष्टीवर लोकानी जी लबाडी केली असेल या प्रा विनंती केली. यावरी निशा जाली. परंतु जागजागां * * * वर्तमान आहेत. तथ्य वर्तमान आलियां लिहून पाठऊ *सेवेसी श्रुत होय बहूत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे, हे विनंती.

¶ *This is an important letter giving news of the Imperial Court to the Peshwa at Poona. It is sent by the Maratha agents Hingne brothers from Delhi. The letter of Nadirshah quoted in the report will convince the student how closely Ahmadshah Abdali followed the policy of Nadirshah.*

---

*No. 2*] [पौ. *5-4-1747*

**श्री.**

पो छ ९ रबिलाखर

**पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी.**

विनंती उपरि उमदतुलमुलुक[1] शांत जालियावर नवाब सफदरजंग याची मुसाहेबत[2] बहुत जाली. त्यास बेनुखालीफ यासी जोड केल्याखेरीज बंगालीयाचें काम कोणेप्रकारे होते? याकरितां पातशहास अर्जे केला कीं, नवाब सफदरजंग आम्हांसीं येकसुं असलियानें हजरतची उत्तमप्रकारें कामे होतील. नाहींतर

---

१ अमीरखान २५-१२-१७४६ ला खून जाहला. २ स्नेह.

यानीं येथें एक गोष्ट सांगितली. न कले, हजरतच्या ध्यानांत काय येईल ? म्हणजें पातशाही कामाचा डव्हेला[1] होईल. त्यावरून पातशहा बोलले की, सफदरजगाच्या व बाळाजीरायाच्या दरमीयान मी आहे. याप्रमाणें बोलून सफदरजंगास पाईदेव्हर्डीजवळ येकांती घेऊन सांगितले कीं, बाळाजीरायापासून मजला फारशी उमेद आहे. आणि ते सत्यवादी आहेत. याकरितां त्यासी तुम्ही साफ राहून पातशाही काम कर्णे. सफदरजंगानी विनंती केली कीं, 'पहिल्यापासून माझी त्यांशी दुशमनी होती. हजूर आलियावर राव महादेव यांनीं बाळाजीरायाच्या माझ्या दरम्यान ईश्वर दिल्हा; त्याप्रमाणें म्याही दिल्हा. कधीही कोणास शपथ दिल्ही नव्हती, ते त्यांस दिल्ही. खज्याना लुटुन आणिला होता, तो राव महादेव यांच्या पुत्राजवळ दिल्हा. वकील सरदारांजवळ पाठविला. त्यासी वाराणसीची गोष्ट सांगितली. त्याजवरून मजला विशम वाटलें. अत:पर जे हजरतची मर्जी तेच मजला करणें.' या प्रमाणें बोलणे जालियावर दुसरे दिवशी पातशहानीं खालशाचे दिवाण नवाब यह्याखां यांसी सफदरजंगाकडे पाठविले. आणि आम्हासही आज्ञा केली. त्यावरून सफदरजंगाचे घरीं आम्ही गेलों. बहुतसें शिष्टाचारें बोलून सारांश हाच कीं ज्याप्रमाणें तुम्ही मसीं वर्ताल त्याप्रमाणें मी तुम्हांसी वर्तेन आणि तामकदूर[2] तुमचे कार्यास अंतर करणार नाहीं. याप्रमाणें जालियावर तनखा वगैरे ठरली. इतकियांत वाराणसीचे लिहीलें बलवंतसिंगाचे आलें कीं मातुश्रीनी[3] दसाराम जमीदार यासी कबिल्यासुद्धा घेऊन चालली; आणि आम्हास मांगुन पाठविले कीं, यासीं अर्धे राज्य देणें, नाहींतर फौज उतरेल. यासी आम्ही दसारामास आणून यासी शिक्षा द्यावी तर हजरत वारंवार लिहीतात कीं, ते माझीच मातुश्री जाणून त्याचें साहित्य करणें. तुमची चार माणसे मारली तर्‍ही त्यास हर्गीज[4] न बोलणें. कां कीं, माझ्या म्हटलियावर माझे घरांत आली. त्यासी कव्हावन जालिया आम्हास शब्द लागेल येसी हजरतची ताकीद, आणि हे लोक ऐसी करितात की, हलक्याहून हलका असेल तेही ऐसे कर्म न करी. या प्रमाणें अर्जी बलवंडसिंगाची आली. ते बजिनस[5] आम्हास दाखविली. आणि हसून बोलिले कीं, हे तुमची सत्यवादी भलेपण. तेव्हा आम्हीं विनंति केली कीं, मातुश्री या प्रमाणें करितील ऐसें नाहीं. बरोबरचे लोकानी कर्म करून नाव याचे बदनाम केलें. तरी नवाबानीं बहुतच थोरपण केलें. जमीदार आम्ही आणून देतो; परंतु या गोष्टीवर नवाबाची शुक्रगुजारीच[6] श्रीमंत करतील. याप्रमाणे जाले वर्तमान सेवेसी

---

१ बिघाड. २ शक्ति आहे तों.
३ पेशव्याची आई काशीबाई. ४ बिलकूल.
५ खुद, हुबेहुब. ६ तारीफ.

लिहिलें असें. मातुश्रीस जमीदाराचा मजकुर लिहिला. त्याचे वर्तमान नवाब सफदरजंगास आले कीं, रा कृष्णराऊ[१] याणी कागद गंगाप्रवाह केले; आणि मन मानेसे बोलले. आम्ही तो मातुश्रीच्या तर्फेनें सागितलें कीं, दसाराम पटणे-कराच्या कैदेत होता. त्यानी बहुत मीनत केली. याकरितां आम्ही सोडविला. अत:पर आम्हासी त्यासी गरज नाहीं. नवाबानी आमचा बहुत अहेल[२] सोसून यात्रा उत्तम प्रकारे आमची केली. या गोष्टीची कोठपर्यंत शुक्रगुजारी करावी. याप्रमाणे जालें वर्तमान सेवेसी लिहिलें असें. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे, हे विनंती.

¶*Letter of Peshwa's agent at the Emperor's Court communicating to him the favourable impression the Emperor had obtained of the Peshwa's doings. His mother Kashibai's pilgrimage gave some offence to Safdarjang.*

---

*No. 3*] [*8-3-1747*

श्री

पौ छ ६ रबीलाखर

श्रीमंत राजश्रीपंतप्रधान स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक बापुजी महादेव व दामोदर महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ताा. छ ७ माहे रबिलावल मुाा इंद्रप्रस्थ स्वामीच्या कृपावलोकने यथास्थित असे विशेष. पुर्वी सरकारच्या जोडी बरोबर सविस्तर वर्तमान लिहून पाठविले आहे. पाऊन श्रुत होईल. सांप्रत सरदारांनीं स्वामीच्या आज्ञेप्रमाणे माधोसिंगास टोंक, तोडा, मालपुरा व नेवाई, हे चार्‍ही परगणे नेमून बुंदी हाड्यास द्यावी व हाड्यानीं ईश्वरसिंगाची रफाकत[३] करावी; व सरकारचे पैसे द्यावे; व नेणवे, व समिधी, व करवार हे तिन्ही परगणे रावराजा व प्रतापसिंग यानी खावे. ऐसा तह करून राजश्री खंडेराव होळकर यांस हजारा स्वारानसी राणाजीकडे पाठविलें कीं; राणाजीची फौज सरदेवर आली आहे. ईश्वरसिंगानीहि आपली फौज त्याच्या मुकाबल्यावर पाठविली आहे. या दोही फौजेचे झुंज होऊन, यावे. ज्याप्रमाणें नेमणुक केली आहे त्याप्रमाणें वर्तवणें; व इकडे राजश्री रामराव मुनसी व निबाजी खाटके, बक्षिराम ऐसे त्रिवर्ग महाराजा ईश्वरसिंगापासी पाठविले कीं, यास समजाऊन चार गोष्टी उत्तमप्रकारें सांगून तहाप्रमाणें फैसल करून परस्परे सौरस्य करून देणे. त्यास रामराव वगैरे जयनगरास आले; व खंडेराव

---

१ चासकर काशीबाईचा भाऊ. २ आबाळ ? त्रास. ३ साहाय्य.

जाऊन राणाजींचे फौजेत शामील जाले. राणाजीची फौज सरदेवर आली. इकडून राये नारायेणदासजीहि भारी फौजे सुधां जाऊन पावले. परस्परें कोसा कोसाचे अंतर राहिलें. राणाजीचे कारभारी यांनीं आपल्याआपल्यांत स्नेहाचा ठैराव करून नारायणदास सडेच फौजेंतून जयपुरास आले; व त्याचे कारभारी त्यांजकडे गेले. नारायणदासाच्या ईश्वरसिंगाच्या मसलती उदंड जाल्या. रायजीनें उदंड समजाऊन सांगितलें कीं, मल्हारबाचा लेक येऊन मधें पडला आहे, झुंज करू नका म्हणतो, व सरदाराची मर्जी खामखा स्नेह करवावयावरच आहे. झुंज केलियानें राणाजीची तो काय कथा परंतु मराठ्यासीं विरुध वाढते. यासी विरुध करणे सलाह नाहीं. याकरितां सांप्रत सलाच करावा. त्याहीवर रजपुत कोण्ही तन[1] देत नाहींत. कोणाच्या भरवसीयावर हा प्रसंग कर्तव्य? ऐसे नानाप्रकारें रायजीनें समजाऊन सांगितलें. ईश्वरसिंग सहसा न मानी. म्हणो लागले कीं, राज्य प्राक्तनी असल्याचें भोगावें. नाहीतर अशानें काय होतें. जे होणार तें हो. येकदां झुंझ तो केले पाहिजे. राजामलजी मेले. विद्याधरजी खाटेवर पडला. रजपूत तन देत नाहीं. तुम्हीं सलाच्या गोष्टी सांगतां. तेव्हां राज्याचा भार माझ्या प्राक्तनास आला. अस्तु आतां मीच बाहेर निघतों. जें होणार असेल तें हो. यैसें बोलोन डेरे बाहेर केले. राजा बहुत दुराग्रहांत पडला. व कोणेही प्रकारें संधी करीनासा जाणून राइजींनी लाइलाज झुंजतो हेच गोष्ट कबूल केली. तेव्हां राज्यानी रायेजीपासून मुचलका घेतला व सहज रायास लष्करां * * * * * * *

¶ *This fragmentary letter of Hingne to the Peshwa from the Court of Delhi, gives news of the movements of Ishwarsingh, King of Jaipur, and the Marathas.*

---

*No. 4*] [*20-3-1747*

**श्री.**

पौ छ २१ रबिलाखर

श्रीमंत राजश्री पंत प्रधान.

स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक बापुजी महादेव व दामोदर महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ १९ माहे रबिलावल मु॥ इंद्रप्रस्थ स्वामीचे कृपा अवलोकनेकरून स्वस्तक्षेम असे विशेष. इकडील साकल्य वर्तमान अजुरदार

---

१ तन देणें=पुढाकार घेणें.

जोडियांबरोबर लिहून पाठविले आहे, त्याजवरून विदित जाले असेल. सांप्रत राजश्री माहाराव दुरजनसाल कोट्याहून स्वार होऊन उदेपुरास गेले. तेथुन राणाजी व एकत्र होऊन आपल्या फौजेच्या पुस्तगेरमीवर[1] निघाले म्हणून वर्तमान आलें. त्याजवरून महाराज राजश्री ईश्वरसिंग यानीहि सवाई जैपुरीहून कूच केला. लोकांनीं बहुत मना केले. इतकी त्वरा करणें सला नाहीं. केवळ राणाजी येऊन निगृहावर पडले, ऐसे जाणावे, तेव्हांच कूच करावा, ऐसे उदंडानी म्हटलें. परंतु कोणाचेंहि नायकतां कूच करून दरकूच जाऊन आपलें फोजेत शामील जाले. चितांत आहे कीं, राणाजीचे फोजेस जक[2] दिधलीच आहे. हली जोपर्यंत राणाजी आपले फोजेत सामील जाले नाहींत तोंवर उरली फौज मारून घ्यावी, ऐसें चितांत आहे. कोटेवाला परतून येऊन कोट्यांत पावला. राणाजी मागती उदेपुरांत दाखल जाले म्हणतात. ईश्वरसिंगाच्या चितांत कीं राणा युध्यास नच ये तर त्याच्या मुलकांत स्वाऱ्या करून ते अजीज करावे. जेरीदाही[3] होत जातो. पहावे ईश्वर ईच्छा काय आहे, व कैसा प्रसंग पडतो. यद्यपि राजश्री खंडेराव होळकर याजपासीं समुदाय थोडा आहे, तथापि तितक्यानसीच त्यांनीं यांस आडत्रासास आणिलें. खाण्यापिण्याची परम मर्यादा जाली आहे. त्रृण धान्य बहुत महर्ग आहे. जैपुरकर तो केवल स्वपराक्रमेंच या कर्मास प्रवर्तले आहेत. व राणाजी तो केवळ स्वामीचे आश्रयावर या कर्मास प्रवर्तले, ऐसा आबालवृद्धीपर्यंत लौकीक जाला आहे. प्रांती जे आपण करतील तेच ईश्वर इच्छेनें होईल. पुर्वी पातशाहानी माहाबतजंगास[4] लिहिले होते कीं, बंगाल्याचा दारमदार बाळाजीरायाचे विद्यमानें राज्यासी जाला. तुम्ही खातरजमा राखून खजाना पाठऊन देणें. येथून कराराप्रमाणें बाळाजी-रायाचे रुो देवऊन ऐसा फर्मान गेला होता. त्याचें उत्तर आले कीं, हजरत या प्रमाणें लिहितात ; व बाळाजीराव याची पत्रें येतात कीं, जर रघोजी भोसले बंगाल्याकडे आलेच तरी सरदार फौजेसुधा तयार आहेत. तुमच्या कुमकेस येऊन पावतील व आम्हासहि रघोजीची पत्रें वरचेवर येतात कीं, मी येतो. तर हा बंदोबस्त कोणे प्रकारचा ? जर राज्यासीं चुकोता जाला तर रघोजी काय म्हणून येणार ? व बाळाजीराव ऐसे काय म्हणून लिहितात ? व हा संदेह अद्याप किमर्थ दूर होत नाहीं ? जोवर हा संदेह दूर जाला नाहीं तोवर माझ्यानेहि फौज दूर करवत नाहीं. व मुलुकही आबाद होत नाहीं. गंगेच्या कांठचा मुलुक तो वैराण. येथे एक कवडी उत्पन्न नाहीं. पल्याडील पाच रुो येतात

---

१ साहाय्य, उपराला.

२ जक = पराभव.

३ खडा.

४ अलिवर्दीखान.

ते फौजेस खर्चतात. खजाना कोठून येईल व कोठून पाठवावा? बरें यैसेहि असतां रघोजी अगर त्याची फौज या साली नच आली तर अखर सालपावेतों सिबंदी वजा जाऊन जो कांहीं ऐवज बाकी राहील तो हजूर रवाना करीन, ऐसे पत्र आले. यांत सारांश इतकाच कीं, जोपर्यंत रघोजीचा यावयाचा पुर्ता संदेह दूर जाला नाहीं, व मुलुक आबाद जाला नाहीं, तोंवर पुर्ता खजाना देवणार नाहीं. इतकें तात्पर्य दिसून आलें. त्यास येथून मागती तांकीद गेली आहे कीं, क्षेपनिक्षेप रघोजी येतच नाहीं. तुम्ही फौज काशास ठिवतां? दूर करा व मुलकासही उत्तम प्रकारे कौलबेल देऊन पुरती वसाहत करा. दुश्चित किमर्थ राहतां? व खजाना झाडियानसी पाठवा. जर उणा अधीक येईल तर तितकाच उणा रुो बाळाजीरायास पावेल. त्याची तनखा तुम्हावर केली जाईल व सरकारचा जितका ऐवज राहील, त्याची सजांवली[1] त्यासच सांगु. एवंच पुर्ता रुो जलद पाठऊन देणे, ऐसें धमकाऊन लिहीलें आहे. परंतु जोपर्यंत आपल्याकडून लिहिले गेले नाहीं, तोवर त्याची खातरजमा कसी होते? जेटवड जवळ आली. जर या साली रघोजीचे अगर त्याचे फौजेचे निघणे होत नाहीं, हा निश्चय स्वामीस पुर्ता कळला असिला तर काय चिंता आहे? सलाह असलिया ज्याप्रमाणें हजरून लिहिलें आहे त्याप्रमाणें आपणहि लिहावे. नादरशहाकडील वर्तमान आलें कीं बगदादचा पातशा अहमदशा आहे, त्याच्या विद्यमानें रुमवाल्यासीं व नादरशाहासी सलुखा जाला. रुमेकडून खातरजमा जाली. इरानचा तो बंदोबस्त आहेच. दुरानेमधें कोण्ही कोण्ही थोडी बहुत लबाडी केली होती. त्यांच्या पारपत्यास्तव हिरात म्हणून दुराणचे शहर काबुलेपासून सतरा मजली आहे, तेथें नवरोजाकारणें म्हणजे छ ९ रबिलावलीं दाखल होणार होता. तेथुन सिकारपुराकडे म्हणजे अटकेपार दाऊद पोतऱ्याचा मुलुक आहे, त्याच्या व आणीख कोण्ही काबुलच्या जिल्ह्यांत पठाण आहेत, त्याच्या शासनास फौज पाठविणार. व गरज पडल्या हिरातेहून स्वताहि येऊन पावणार, ऐसे वर्तमान वरचेवर येऊन पावले. त्यास ऐसा जबरदस्त दोलक्षा

* * * * * * * *

तरतूद करून ऐसा वजिरानी अर्ज केला. त्यानंतर पातशहानीं फेरोजंगाकडे[2] पाहिलें. हे बोलले कीं, आसफजहापासी चालिस हजार फौज तो मुकरर बारमाही असते. काम पडल्यावर आणीखहि विजापुरी वगैरे दक्षणी तीस चालिस हजार स्वार जमा होऊ सकतात. एवंच सतर एसी हजाराची तो भरती तयारच

---

१ तगादा.　　२ गाजी उद्दीन निजामुल्मुल्कचा वडील मुलगा.

जाणावी. याजवेगळे मऱ्हाठे तो कमेबेश[1] लाख फौज आहे. हेहि असफजाहासी सलुख राखतात व त्यांच्या म्हटल्यात आहेत. समयास रफीक[2] होतील. आज्ञा जालिया त्यासहि लिहून पाठऊं. पातशहा बोलले कीं बरें ; वर्तमान तो लिहा ; व त्याची काय मसलहत ते लिहून आणवा. बहुधा फेरोजंगानें बापास लिहिले असेल. मग पातशहांनीं सफदरजंगाकडे पाहिलें. हे बोलले कीं, मजपासी जो खजाना व माल आहे तो हजरतच्या निसार[3] आहे. येथें व सुब्यांत व ठाण्यांत मिळोन चाळीस हजार स्वार मजपासीं मोजूद आहेत. समयास जो पैका आहे तोहि वेचून ज्यासमई हजरत * * उभे राहतील ते समई आपल्या जानमालासी तसदुक[4] होईन. फते देणे ईश्वराचे स्वाधीन आहे. त्याजमधें जर मऱ्हाठे माझे पुरते रफीक आणभाषपूर्वक होत असिले तर हजरतनी तसदी न करावी. मग मजला आणीख कोण्हाची गरज नाहीं. रजपूत वगैरे कोण्हीहि पाहिजेत नाही. एक फौज त्यांची व एक फौज माझी इतक्यानसीच जो प्रसंग पडेल तो समजून घेऊं. ऐसिया जी ही गोष्ट सांगितली, पातशहानी सर्वांची अनुमतें मात्र घेतलीं, कोण्हास कांही उतर दिधले नाही. परंतु नित्यानी च्यार च्यार सा सा घटका एकांत हाच मजकूर असतो. पातशहास कोण्हाचाहि भरवसा वाटत नाहीं. कांहीं अंधपुत्राचा मानितात ; परंतु समयास सलुक करायास लागतो त्याजपेक्षा काहीक अधिक आपल्याकडीलहि धावादावाची लढाई नादरशहाच्या तुल्य मानितात. अद्याप या गोष्टीचा सरवा (सराव ?) आम्हासी कोण्ही कांहीं सरवा (सराव ?) केला नाही. परंतु वजीर सफदरजंग, गाजुदीखां, राजे अफजुखां वगैरे जेव्हा याचे घरास जावें तेव्हां हे बोलतात कीं, जर नादरशहा दक्षणेस परभारें गेला तर तुमचे लोक काय करतील. जर इकडे आला तर तुम्ही काय तरतूद करून दाखवाल. आम्ही पृथक पृथक त्यासी हेच बोलतो की, जर तो परस्पेरे दक्षणेस येतो तर या गोष्टीची चिंता ईश्वर इच्छेने येथें कांहींच नाहीं. येका(ल)कीं काय प्रसंग होतो. यावत्शक्ति त्यास कोण्ही जिवें सोडावें असे तर नाहीं. मग नकळे. आयुष्य असलियां निघोन गेला तर नकले. जर हिंदुस्थानांत आला तर इकडील तरतूद तुमच्या विचाराचे स्वाधीन आहे. ज्या प्राा तुम्ही सांगाल त्या प्राा करतीलच करतील. सफदरजंग व वजीर बोलले कीं, तुम्ही आपल्या तरफेनें बाळाजीरायांस लिहून त्यांची काय सला व ते याप्रसंगी कसकसी तरतूद करतील तेहि आणवा, ऐसें या उभयतांनीं सांगितलें. ऐसियास नादरशाह लक्ष वाटे तो न ये. कदाचित आला तर स्वामीचा काय विचार ? कांहीं तरतूद आपल्याकडून

१ मुकरर.
२ मदतनीस.
३ स्वाधीन.
४ हजीर.

बनून येईल किंवा नाहीं. जर आली तर कोण्या प्रकारें, कोणत्या स्थळीं, किती फौजेनसीं, कोण्या करारावर, कसकसें चितांत असेल ते लिहून पाठविलें पाहिजे. कीं रोकडे पातशहास अर्ज करावयास जागा होईल ; कीं तेहि याप्रमाणें बंदगीस[1] हजर आहेत व याप्रमाणें तरतूद करूं इछितात. पातशहाचे मनांत विश्वासहि आहे कीं, जे मऱ्हाठे बोलतील ते करतील. तर आपला मनोदय काय तो लिहिला पाहिजे. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणे. कृपा केली पाहिजे, हे विनंती.

¶ *This letter giving details of the discussions in the Emperor's Court, shews how the Peshwa and his agents quietly worked themselves into the Emperor's favour and how he came to depend upon the Marathas in case of emergency. There is also a mention of a threatened invasion by Raghuji Bhosle into Bengal.*

---

*No. 5]* *[3-5-1747*

श्री

पौ ३० जमादिलौवल.

श्रीमंत राजश्री......बापु स्वामीचे सेवेसी

पोष्य चिंतो कृष्ण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी, येथील कूशल तागाईत छ ३ जमादिलौवल पर्यंत यथास्थित जाणोन स्वकीये कूशल लेखन आज्ञा करित असिलें पाहिजे. विशेष. माधोसिंग याची फौज राजसिंग घोडचढा व कर्नाराम व नंदलाल दिवाण व सुरतसिंग शिवब्रम्हपोता ऐसें तोफखाना ऱ्हेकले व सुतरनाळ व जिजाला व बाणाचे उंट येसें जुंजाचें सामानासी हाडोती प्रांतांचीं ठाणीं उठविलीं. धुम फारच केली. ऐसें जाणोन राजश्री मल्हारजी होळकर आम्हास घेऊन निघाले. कूच दरकूच कोटे प्रांतास बारियासी आलों. आखेराम कोटेकर तोहि शामील जाला. दरकुच मांगरोळ प्रांत हाडोती येथें गांठ घातली. छ १ जमादिलौवलीं च्यार घटका मार्गाल दिवसापासून च्यार घटका रात्र पावेतों गोळागोळीचें युध्य जालें. उपरांत रात्र जाली तैसेंच घेरा घालून कंबरा बांधून घोड्यावर च्यार प्रहर रात्र उभेच राहिलों. छ २ जमादिलौवलीं जुंज प्रात:काळापासून अस्तमान पावेतों जालें. कछव्याची तमाम फौज बुडविली. लुटुन फस्त केलें. मोठे मोठे पटाईत कछव्याकडील कामास आले. मोठें येश स्वामीस आलें. तमाम हिंदुस्थानांत नक्ष बसला. सरकार पागेस शेंसवाशें घोडे व उंटें आलीं. राजश्री सुभेदाराकडील व आम्हांकडील कांहींक लोक ठार पडले

---

[1] सेवेस.

व जखमी जाले. घोडीं ठार पडलियाची याद मागून सेवेसी लिहून पाठउं. राजश्री मल्हारजी बावास डाव्या हाताच्या मनगटास गोळीची जखम लागली. चाटून गेली. हालकी जखम असें. ईश्वरें खेर केली. त्याची चिंता न करावी. राजसिंग घोडचढा व साळग्रामसा हे दोघे सरदार मातबर व मोठे पटाईत कछव्याचे मारले गेले. सेवेसी श्रुत होये. विशेष काय लिहिणें. कृपा लोभ असों दीजे, हें विनंती.

*¶ Letters 5 and 6 contain a description of a pitched battle on 2nd May 1747 near Mangrol (in the territory of Bundi) between the brothers Ishwarsingh and Madhaosingh, two sons of Sawai Jaisingh, who were fighting for the throne of Jaipur. With the help of Malharrao Holkar and Jayappa Sinde, Ishwarsingh inflicted a crushing defeat on his brother. The affair is reported by one Chinto Krishna to Bapu.*

---

*No. 6]* *[7-5-1747*

**श्री.**

छ ३ जमादिलाखर

**श्रीमंत राजश्री......बापु स्वामीचे सेवेसी.**

पोष्य चिंतो कृष्ण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ ७ माहे जमादिलौवल पर्यंत येथास्थित जाणोन स्वामींनीं आपलें स्वकुशल लेखन आज्ञा करित असलें पाहिजे विशेष. आमचें वर्तमान तर अंतरवेद प्रांताहून उजेनीस आलों; पुढें देशास यावें तों हाडोतीं प्रांतें माधोसिंगाचे फौजेनें तमाम ठाणीं उठविलीं. धूम फार केली. त्याकरितां राजेश्री......सुभेदार यानी आम्हां समागमें * * * * कूच दरकूच मौजे मांगरोल प्रांत * * * * कछव्याचे फौजेस बारा कोस धा * * * * * * घातली. छ १ जमादिलौवलीं दिवस च्यार घटका * * * * * राहिला. त्यासमयीं गांठ पडली. युद्ध ( च्यार ) घटका रात्र पावेतों गोळागोळीचें जालें. उपरांत च्यार प्रहर रात्र पावेतों घोड्यावर बसलेच राहिलों. त्यास कछव्याची फौज राजसिंग घोडचढा * * * * व कनीराम व नंदलाल दिवान व सुरतसिंग शिवब्रह्मपोता येसें फौज दहा बारा हजार व तोफा, न्हेकले, जेजालाचे उट वगैरें प्यादे जुंजाचा सरंजाम सुद्धां होते. त्यास छ २ जमादिलौवली रविवारीं रुजू इंदुवारीं जुंज प्रात:काळपासून अस्तमान पावेतों जालें. कछव्याची फौज दरोबस्त लुटून पस्त केली. तोफा, न्हेकले, घोडे, उंटें, हत्ती सर्व लुटून घेतली. माधोसिंगाचे (लोक) मोठे मोठे पटाईत कामास आले. कितीक ज * * * * * सांपडलें, शें दोनशें पळुन गेले. वरकड * * * * * * * विलीं. हिंदु-

स्थान प्रांतीं मोठा नक्ष जाला. मोठें येश स्वामीस आलें. सरकार पागेस घोंडीं शें सवाशें आलीं व उटें आलीं व हत्ती येक आला. ईश्वरें मोठें येश दिल्हें. हत्ती कोटेकरास दिल्हा. कोटेकराचे लोक राजश्री अखेराम पचोली व जालमसिंग झाले, व धायेभाई वगैरें रजपुत दोन तीन हजार फौज होती; त्यांनीं स्वामी सेवेसी अंतर न केलें. आम्ही व राजश्री खानाजी जाधव, डाव्या बाजूस राजश्री मुभेदाराच्या होतों. शिंद्याच्या निशाणास शब्द लागों दिल्हा नाहीं. आपले बाजूस अवघ्याच्या आवीं उठावणी केली, स्वामी सेवेसी अंतर न केलें. श्रुत होये. सदैव पत्र पाठऊन परामृष करीत जावा. विशेष काय लिहिणें. कृपा लोभ असो दीजे, हे विनंती......................

---

*No. 7*] [*1747*

## श्रीशंकर.

साहेबाचे शेवेसी विनंती विज्ञापना यैसीजे. इकडील वर्तमान तरी फौजेचा मुक्काम मनोहरपुरा[१] संनिध आला. मुलुकास उपसर्ग बहुत होत आहे व दिवान कनिरामजींचीहि पत्रे आलीं कीं मर्जी हाती नाहीं. त्याजवरोन बहुत चिंतातूर जाली आहे. राजे कारभारी बहुत विचारात पडिले आहेत. याजवरी इभरत बहुत गाल्प[२] पडिली आहे. भट राजे सदासिवजी याजकडे आजी रात्री साहा घटका गेलो होतो; तो बहुत विचारात बैसले होते. इतकियांत राजे माधोसिंगजी याचे हुजूरचे बोलावणे, चोपदार जल्द आला कीं, बहुत जलद बोलाविले आहे. तैसेच तातडीनें हुजूर भटजी गेले. आम्हासी बोलिले कीं दिढा प्रहरा दरबारास जातो, तुम्ही येणे, इतके बोलोन हुजूर गेले. दबाव बहुत पडिला आहे. साहेबाचे प्रतापे करून सर्व कामाचा निर्गम करून सेवेसी येत असो. आज्ञापत्र येईल त्याप्रोंच वर्तनूक होईल. राजे माधोसिंगजी यांनीं सावधता बहुत करविली आहे. अंमेरीची बंदोवस्ती उत्तम करविली. जमाव किल्यावर पाठवितात. गुरमावक्षी याजला अंमेरीस उतरावयासी पाठविले आहे. जागा जागा नाकेबंदी किल्याची व शहराची करितात. बरकंदाज ठेवितात. काली दो प्रहरा कबिला सर्व थोरले गणी टेरवाल सर्व अंमेरीस पाठविला. आपण सडे शहरात आहेत. आजि आशिर्वादास हुजूर भोजनप्रहात गेलो होतो. दोन घटका हुजूर होतो. बहुत विचारांत राजे पडिले आहेत. हरसाहेजीस बोलावणे गेले आहे. त्याजपासी पाच सात हजार फौज आहे. दो चौ दिवसात तेहि दाखल होतील. आनखी

---

१ जयपुरच्या उ. ४० मैल.  २ भारी.

हि तरतूद होते. परंतु त्याचा विचार सर्व साहेबास श्रुत आहे. दबाव सर्व प्रकारें उत्तम पडिला आहे. मर्जीप्रमाणें सर्व गोष्टी होईल. उदईक जो विचार होईल, येथील प्रसंग जो ध्यानास येईल, ते सविस्तर लिहून साहेबाचे सेवेसी पाठवीत असो. विशेष काय लिहिणे. कृपा वृधीमान केली पाहिजे हे विज्ञापना. राजश्री सटवाजी राजाले (?) याचे कारकून वसुलाचे ताकिदीस दिवान कनिरामजी बराबर आले. ते येथेच आहे भटजीकडे जात असतात. श्रुत जाले पाहिजे हे विज्ञाप्ती.

¶ *This news-letter seems to be addressed to the Peshwa from the Maratha camp near Jaipur. It describes the great terror and anxiety the presence of the Maratha forces had created in the mind of Madhosing.*

---

*No. 8*] [*1-8-1747*

**श्री**

**श्रीमंत राजश्री......भाऊ स्वामीचे सेवेसी.**

विनंती सेवक कृष्णराव बापुजी साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ ९ रजब पावेतो यथास्थित असे विशेष. स्मरणपूर्वक कृपापत्र प्रविष्ट होऊन सनाथ जाहालो. ऐसेच सदैव कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. नवल विशेष वर्तमान लिहिजेसें नाहीं. यात्रेदाखल येदाची मुलुख (गीरी) जाहाली. (दी) लीचे पातशा: नाचरागरंगामध्ये निमग्न आहेत. दुसरा नादरशाहाचा भाचा आदलशा म्हणून फौजेसह वर्तमान दिलीवर यावयाचे विचारें कंधारेस आला. पुढे काय होईल ते पाहावे. मजल दरमजल सेवेसी येतो. भेटी-अंती सविस्तर निवेदन होईल. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. बहूत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶ *Krishnarao Bapuji (Parasnis ?) writes to Bhausaheb news from the Court of Delhi and news about the threatened invasion of Nadirshah.*

---

*No. 9*] [पौ. *21-4-1748*

**श्री.**

छ ३ जालोवल.

**पु॥ तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी.**

विनंती उपरी राजश्री बगाजीपंत यांचे पत्र छ १३ राखरचे छे[१] २३ मिनहूस आपणास आले. त्या पत्रांतील मजकूर पातशाही वजीर व शाहाजादा व अमीर यांची व पठाणांची लढाई झाली. वजीर कामास आला. उभयपक्षी बहुत लोक

---

१ ११-४-१७४८.

मारले गेले. पातशाहाची फौज काईम राहिली. पठाणानीं सिकस्त खादली. हें सायंत वर्तमान आपण लिहिलें ते कळो आले. राजश्रीस तुमचे विचारें आलें तर निवेदन करणे. नाहीतर पुसतील तेव्हां सांगणे, म्हणून स्वामीनी लिहिले. तर बऱ्हानपुराहून कासीद आले. त्यानी जबानी वर्तमान राजश्री स्वामीजवळ सांगितलें कीं, दिलीची पत्रें नवाबास आली. त्याचा मजकूर कीं, पातशाहाजादियाची व पठाणाची लढाई वरजोर जाली. वजीर कामास आला. दुतर्फा लोक फार मारले गेले. पठाणाचा मोड जाला. हे वर्तमान सांगितलें. दुसरें वर्तमान सांगितलें कीं श्रीमंत राजश्री पंत प्रधान दिलीस गेले. पातशाहाची मुलाजमत जाहली. पातशाहानी श्रीमंतास पुसिलें, तुमचे काय मुदे आहेत ते लेहून द्यावे. त्याजवरी श्रीमंतानीं उतर केले कीं, हजरतीची फते जालियावर अर्ज करूं. आधी ज्या कार्यास आलों, ते फते जाले म्हणजे आमचे कार्य होईल यैसा अर्ज केला. त्याजवरून पातशाहा बहुत खुषवख्त जाले. हे वर्तमान राजश्रीनी श्रवण केल्यावर आम्हास पुसिलें. तुम्हाकडे कांहीं वर्तमान आले की काय? त्याजवर आम्ही विनंती केली कीं कागदपत्र अद्यापि आला नाहीं. परंतु जबानी खबर याप्रमाणेंच आईकतो. त्याजवरी राजश्री बोलिले. प्रधान पंतानी पातशाहासी बहुत उतम समर्पक उतर केले. आम्ही सांगितल्याप्रमाणें दिलीस गेले. पातशाहा संतोषी जाले. उतम गोष्टी केली. तीर्थरूपांचा स्तव फारच केला. समाधान पावले. आम्ही उतर केले कीं साहेबाचे पुण्ये प्रतापे सर्व गोष्टी होतात. साहेबांची पूर्ण कृपा राजश्री प्रधान-पंतावर. तदनरूप त्याचीही पातशाहासी जाबसाल केला. या मजकुरावरून राजश्री बहुतच संतोष पावले. दोन तीन वेळ तीर्थरूपांचा स्तव केला. सांप्रत आपण वर्तमान लिहिलें हेहि राजश्री स्वामीस निवेदन करून: सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶ *New-letter sent from Delhi to Bhausaheb stating an account of the fight of the Emperor with Abdali, in which Vazir Kamruddin Khan was killed; and of the subsequent visit of the Peshwa to the Emperor who was highly pleased with the former's demeanour.*

---

*No. 10]* *[May 1748*

**श्री.**

**पुरवणी श्रीमंत राजश्री......पंतप्रधान**
**स्वामीचे सेवसी.**

विनंति. नवाब अमीरखान जिवंत असतां आम्ही राजा रघुनाथदास हैदर-कुलीखानी याचा पुत्र लाला नरसिंगदास नवाब मशारनिलेच्या विचारानरूप

बंगाल्यास पाठविला, तेव्हां महाबतजंगास[1] लिहिलें होतें जे पातशहाच्या आज्ञेप्रमाणें श्रीमंत स्वामीनी बंगाल्याच्या तहाची बोलीचाली राजश्री स्वामीसी ठीक करून राजश्री रघोजीबावांस बंगाल्यास जायाची मनाई पाठविली आहे. कदांचित आज्ञा उल्लंघन करून जाईल म्हणून वराडांत संत्रा लिगाडें त्याजभोंवतीं उभीं केलींत, व सरदारांस दोन तीन वार पत्रें पाठविलीं कीं, इतका प्रयत्न केला असतां कदांचित निघून बंगाल्याकडे चाललाच तर तुम्ही पटणे व गयाप्रांतीं आडवे होऊन तंबी करणें. त्यास श्रीमंतस्वामीच्या आज्ञेप्रमाणें सरदारानी तयारी केली. बुंधेलखंडाच्या सरदेवर आहेत. पटणे गयाप्रांती येतात. रकारनामक आला तर पारपत्य करतील. तुम्ही आपल्या नायबांस लिहून पाठवणे कीं, या फौजेचा कोण्हेहि गोष्टीचा संदेह न धरतां सुखरूप आपल्याले स्थलीं स्वस्थचित्तें राहात व पातशाही खजाना झाडियानसी पाठऊन देणेकीं कराराप्रमाणें पैका श्रीमंत-स्वामींचे विद्यमानें राजश्री स्वामीस पावे; व पुढें त्या मुलकाचा उपद्रव तुटे, यैसे आम्ही व अमिरखानानी महाबतजंगास लिहिलें होतें; व लाला नरसिंगदासा-हातींहि हेंच सांगून पाठविलें होतें. त्यास नवाब महाबतजंगानें थैल्या तीन पाठविल्या आहेत. त्यास सरदारांच्या थैल्या दोन पाठऊन सेवेसी बजिनस थैली पाठविली आहे. अवलोकनेनंतर जें लिहिलें असेल तें कळों येईल. आम्हांस तों इतकेंच लिहिलें आहे, व नरसिंगदासाहातीं लिहविलें आहे कीं, जेव्हां राज्या-सींच बोली चाली ठीक जाली; तेंव्हां रघोजीबावाचा यावयाचा संशये किमर्थ? राज्यांचा चाकर आहे. मुलकाचा तह जाला. आतां बोलाऊन घ्यावा. यैसेंही असतां श्रीमंत स्वामीसारख्यांस जेव्हां तो जाईल यैसा संशये आहे. तेव्हां माझ्यानें फौज कसी दूर करवते व मुलुक कोण्याप्रकारें वस्ता होऊं पाहतो व झाडून पैका मी कोठून पाठऊं? असो मी युध्यप्रसंगास सिधच आहें. आला तर मारितच आहे. न आला तर अखरसालपर्यंत जो खजाना जमा होईल तो पाठऊन देतच आहे. तुम्ही सरदारांस लिहा कीं, जर रघोजी येणारच असला तर रामगड अथवा पचेट अगर उडेशोच्या[2] मार्गें बंगाल्यांत येईल, तुम्ही पटणे गया प्रांतीं बसून काये कराल? जर तुम्हांस आगाउ समाचार तहकीक पावला कीं रघोजी तत्वता वराडांतून निघाला व क्षेपनिक्षेप बंगाल्यास येतो यैसें तुम्हांस ठीक कल-ल्यावर तुम्ही न बोलावतां व न लिहितां नीट बंगाल्यास येणें. तुम्ही व आम्ही मिळून त्यांस मारूं. जर आम्हांस आगाऊ समाचार पावतो तर आम्हीच सरदारांस वर्तमान पावतें करितों. माझें पत्र पावेल तेव्हां त्यानी नीट बंगाल्यास यावें, यैसें माहाबतजंगानें आम्हांस लिहिलें. व नरसिंगदासाकडूनहि लिहविलें त्याचें

१ अलीवर्दीखान.

२ ओर्छा.

उत्तर आम्ही त्यांस तावडतोब लिहून पाठविलें कीं, लक्षवाटे रघोजीबावास श्रीमंत स्वामींनी दक्षणेंत गोवले आहे. यकूण वीस विश्वे त्यास येऊं देतच नाहींत. कदाचित येखादा व्राटा चालला तर सरदार बुंदेलखंडाच्या सरदेवर जाऊन बसले आहेत. यांच्या दबावानें कदापि तों येणारच नाहीं. तथापि आलाच तर दरकूच जाऊन पारपत्य करितच आहेत. तुम्ही आपल्या जागां मात्र सावध राहणें व पानशाही खजाना झाडियानसी पाठऊन देणें. या प्रकारें आम्ही माहाबतजंगास उत्तर लिहिलें; व हजुरच्या उमद्याकडून याच प्रतीची द्रव्याविशई ताकीद लिहविली आहे. स्वामींनीं थैलीचा जाब जो लिहावयाचा असेल तो सीघ्र आम्हां-पासीं पाठविला पाहिजे. ईश्वरइच्छेने व स्वामीच्या प्रतापें रघोजीबावांचें येणें होनच नाहीं. यैसा भरंवसा असिला तर येतद्विषई जे खातरजमा करून ल्याहावयाची ते लिहावी व रुपयाविषई बहुतसी ताकीद करून ल्याहावी की तनख्वा हेप्रमाणें पांच लाख रुपये पत्रदर्शणी बापूजी माहादेवापासीं पावते करावे. व पानशाहीखजाना येकदाम बाकी न ठेवितां झाडियानसीं दिलीस रवाना करा, म्हणजे करारप्रमाणें राजश्री स्वामींचे रुपये श्रीमंत स्वामींचे हातून सत्वर पावते होत आणि पुढें उपसर्ग त्या मुलकाचा तुटे. रुपये सत्वर न पावल्या, पातशाह आमचीहि तनख्वा तुम्हांवरच करिल व आपल्याहि खजिन्याची सजावली आम्हांसच सांगेल. तेव्हां अम्हांसतो ज्यारीतीनें काम होय त्यारीतीनें सजावली करावी लागेल. यास्तव पैका सत्वर पाठवावा. याप्रकारें द्रव्याविशई ताकीद लिहिलिपाा. जर यंदा रघोजीकडील खातरजमा असली तर माहाबतजंगास खोलून लिहावें कीं रघोजीस सहसा येऊं देत नाहीं. जिमा आमचा जाला. तुम्ही सिबंदी दूर करणें व पैका झाडियानसीं दिलीस पावणें. यैसें लिहिलेप्रमाणें लाला नरसिंगदासासाठींहि च्यार गोष्टी लिहाव्या कीं तो उमदा माणुस आहे. आमच्या जावमालास तुम्हांपासीं ठिवला आहे. त्याचा गौर सर्व प्रकारें करित जावा. येमंहि अगत्यरूप लिहिलें पाहिजे. सेवेसीं श्रुत होये. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति.

¶ *Hingne from Delhi to Peshwa at Poona. Reports the fear which the Emperor entertains about Raghoji Bhosle invading Bengal and stopping the Bengal revenues coming into Delhi.*

**श्री.**

**पु॥. राजश्री बलवंतराऊ स्वामी**

**गोसावी यासी,**

विनंती उपरी मोगलोच्या[1] सलाहि वडला होता. हे कचे वर्तमान आज पाच महिने होत आले, तुम्हास आम्हीहि लिहीले होते, व श्रीमंतानी लिहीले होते त्याजवरून कलेल. त्यास आम्हास फौजसुधा श्रीमंतानी वोडनदीवरून रवाना कार्तिक शुध येकादसीस केलें ते कार्तिक वद्य चतुर्थीस शहरोस[2] दाखल जाहालो. तेच दिवसी मोगलाने शहर सोडून फौजसुधा कूच केले. बाबूराव फडणीस कारभारी होते त्याचे शरिरास ठीक नाही व बकसीगिरी (गोवि)दपंत तात्यांस[3] सांगितली. आपला धंदा राहिला नाहीं हा येक मनात राग येऊन उठोन श्रीमंताकडे गेले. आम्ही बहुताप्रकारें आग्रह केला; परंतु मानले नाहीं. उठोन गेलेच तेव्हा श्रीमत् विश्वासरायाजवळ[4] चाकरी सारी करणे लागली. त्याच दिवसापासून मोगलाचे आमच्या फौजाचे जुंज सुरु जाहाले. संप्रदाये जुजाचा. भोवताले उभे राहावे. कही[5] मारावी, बंद करावी, पातल सापडल्यावर उठावे त्याप्रमाणे प्रत्यह होत असे. तोफा पाच सातदा लागू केल्या. मोगलाच्या फौजेवर मार बसविला. बाणहि टाकीत आसो. दोन तीन जुंजे उजवे बाजूस गोपालराव[6], मल्हाँरराव, महिपतराव कवडे आनी आगाडीस बाजूस बरीच केली. मोगल सिंदखेडास जाऊन तेथे जाधवराव[8] होते. आमच्या फौजा दतबाकडील[9] भोइटे, वाबले, व हुजरातचे आटोले, बोरगे हे सिदखेडा भोवते महिनाभर होतेच. जाधवरायास उखल्ह दिल्हे नवतेच. यासाठीं वलीआहद फौजसुधा जाधवरायाचे कुमक करून आणावयासी निघोन सेवटी सिदखेडास येऊन जाधवराव मिलऊन घेतले. दुसरे दिवसी माघारा मोगल फिरला त दिवसीं मार्गसीर्ष शुध प्रतिपदेस आम्ही जागा पाहून तोफा सुरू मोगलाच्या गचींवर[10] फौजेच्या केल्या. तमाम फौजा पाठीमागे तोफाच्या उभ्या केल्या. येक बाजू दत (बा) राहिले ** थोडासा डोंगर होता त्याच बाजूस तोफा लागू केल्या. गोले तोफाचे मोगलाच्या फौजेत फार बेष

---

१ निजामाचा.
२ औरंगाबादेस.
३ लिमये खासगीवाले.
४ पेशव्याचा वडील पुत्र.
५ धान्यादि लुटणारी टोळी.
६ पटवर्धन.
७ रास्ते.
८ रामचंद्र जाधव, चंद्रसेनाचा मुलगा.
९ दत्ताजी सिंदे.
१० गच = आवळून राहिलेला जमाव.

लागू जाहाले. तेव्हा सोसेनासे जाहाले आणि नबाबानी फौजेस हुकूम केला व इभ्रामखान गाडदी यास सांगितले की बेजरब चालून जाऊन तोफा सोडवणे. तेव्हा इभ्रामखान गाडदी पाच हजार गाड्यानसी तोफखाना आपला सोडून बाहेर येऊन आमच्या तोफावर चालून घेतले. डोंगर लाहान, आमच्या बागडोंगरो[1] येवढा होता, तो बेजरब घेतला. नीट चालून आले तेव्हा आम्ही तोफा मोठ्या नेटाने काढून फौजसुधा उभे राहिलो. दतबाचे टोलीवर पुढे गाडदी मागे वेकटरोऊ[2] निंबालकर हे चालून आले. मोठी मार जाहाली. आमचे गाडदी व जेजाला हा मार आम्ही दिल्हा. मोठ्या तमाश्याने चालून आले. बुरूज करून उभे छातीचा कोट करून उभे राहिले. लोकानी घोडे बाजे बाजे[3] घातले, परंतु हत्यार लागले नाही. मोठा तट दोहीकडे जाहाला. लोकानी सोसली फार. हान-धोड्यावरे[4] ते व आम्ही उभे, याप्रमाणे च्यार पाच घटका मार जाहाली. दतबाची फौज दोन तीनदा उठली, परंतु गाडदी उखळले नाहीत. काही लोकाचे हात लागले. त्याही फौजेने फार सोसली. मोठेच जुज जाहाले. सेवटी जसे सोमवारचे जुंज गायेकवाडाचे जसे तट राहिला, याप्रमाणे तट होऊन बेमुमार * * * * हाली दोन तीनशे घोडे माणूस जखमी व ठार जाहाले मग ते तिकडे दम धरून मागे सरले. आमच्याहि फौजा याप्रमाणे दम धरून फिरल्या. मोगलाकडील दोनसे घोडे माणूस जखमी व ठार जाहले. मातबर दोन चार जाधवरायाकडील व हणवंतरायाकडील[5] ठार जाले. याप्रमाणे जुज जाहाले. नदोतर पाच सात रोजी सलुखाचा पेगाम[6] नबाबाकडून आला. मग याही घाल्मेलीस तोडजोडीस पंधरा दिवस लागले. मग पंचवीस लाखाची जागीर करार मोगलाने केली. परगणे लेहून दिल्हे. नळदुर्ग किला दिल्हा. हा करार होऊन भेटीचा योग छ १७ रबिलाखर मार्गसिर्प वद्य चतुर्थीस जाहाला. भाल्कीवर भेटी जाहाल्या होत्या, त्याप्रमाणे श्रीमत विश्वासराऊ याच्या व नबाबाच्या जाहाल्या. समारंभ ठीक जितका आम्हास सुचला तितका करून बंदोबस्ताने केला. ठीक जाहाले. या कारभारांत जानबा, शाहानवाजखान नाहीत. विठल सुंदर निजामआलीचे दिवाण व बाजदआलीखान होते. याचे मार्फतीने सलुख जाहला. प्रथम स्वारी रायाची. येश बरेच आले. तुम्हास कळावे म्हणून सविस्तर लिहिले आहे. मेहनत चाकरी थोडी बहुत होणे ती जाहाली. रायाची मर्जीहि बरी आहे राजश्री गोविंदपंत * * * * *

---

१ मामवडजवळची टेकडी.
२ निजामाकडील.
३ पृथक् पृथक्.
४ दगडफेकीच्या अंतरावर.
५ निंबाळकर.
६ बोली.
७ निंबाळकर.
८ विश्वासरावाची.

आम्ही ऐके जागा आहो. तात्यानी जुंज देखले नव्हते, परंतु यासमई फार दम धरून चागले ठहरले; बहूत बेष केली. गोपाळराव, केशवराव पानसी, आम्ही, तात्या, दतबा सारे प्रस्तुत येक विचारे रहश्यें आहों. काही वाकडे नाही. श्रीमत् राजश्री नाना, भाऊ पैठणावर होते. पुढे आले. याउपरी नवाबाच्या यजमानाच्या भेटी येका दो दिवसा होतील. कळावे. सविस्तर दर्शन होईल तेव्हा कळेल *

सेवेसी गोविंद सिवराम नमस्कार विज्ञापना. रावजी कृपा करीत जावी. संशय कोणे गोष्टीचा नसावा. बळवंतराव, तुम्ही, आम्ही, नाना येक अहा हे फार उत्तम आहे (हे) विज्ञापना.

*¶The letter, addressed by Nana Purandare, all in his own hand, to Balawantrao Mehendale, vividly describes the action of Sindkhed on 12th December 1757. This Sindkhed appears to be the seat of Jijabai's father, Lakhuji Jadhao, about 50 miles east of Aurangabad.*

---

*No. 2]* *[4-7-1759*

**श्री.**

छ २४ जिलकाद
सितैन आशाढ

सेवेसी विज्ञापना यैसीजे छ८ जिलकाद बुधवारी च्यार घटका दिवस राहतां नबाब सलाबतजंग याचे येथे दरबार जाला. नबाब निजामआलीखान वगैरे कुल दरबारास आले. सियादतखान यास नांदेडच्या सुबेदारीचा खिलत च्यार * * * * करूलाखान भवानगिरीचा आमील यास बदस्तूर सावीक[1] बाहालीचा सिरपाव दिल्हा. पौ * * * अमिळास सिरपाव दिल्हा. शामजीपंत शहानवाजखानी हैदराबाद सुभ्याचा पेषकार होता, त्यास इस्तकेलालीचा[2] शिरपाव तीन पारचे दिल्हे. कितेक सरदार वगैरे यास आपलाले स्थळास रुकसत[3] केले. बी॥

| | | | |
|---|---|---|---|
| १ | शेख आलीखान जुनेदी | १ | * * * |
| १ | खाजे अलमवस * * * | १ | * * * |
| १ | मुकरबखान * * | | |
| ३ | | २ | |

येणे प्रो रुकसत देऊन दरबार बरखास्त जाला. त्याउपरी उभयेता नबाब च्यार घटका खिलबतेत बसले होते. रेणकादासपंत, राजे विठलदास याचे

---

१ पूर्वीच्या. २ इस्तकलाल=जोर, पराक्रम. ३ रवाना.

रफिके[1] यास सा हजारी मनसब व साहेब नौबत तजवीज केली आहे. छ मजकूरच्या दरबारांत तसलीमात होणार होती ते न जाली. एका दो दिवसी होईल. बंदगीनअलीच्या[2] दरबारात हरकारियाचा दारोगा गुलामनक्षबंदखान होता त्यास तगीर[3] करून निजाम अलीखानकडील मीरमुसाखान यास दारोगे हरकारगिरीचा सिरपाव दिल्हे. सियादतखान याजपासून नजर तीस हजार नांदेडचे सुबदारीवर जातेगाव जागिर दिल्हे. याची नजर पाच हजार. येकूण पस्तिस हजार करार केले आहेत. सेवेसी विदित होय हे ( विज्ञापना )

¶ *News-letter from the Nizam's camp to Poona. It gives an account of the Durbar which Salabat-Jung held to distribute gifts and presents to his Sardars, in order to secure their goodwill and help against a possible break of relations with the Peshwa.*

---

*No. 3*] [*4-7-1759*

**श्री.**

छ २४ जिल्काद
सितैन आशाढ.

**श्रीमंत महाराज राजश्री पंत प्रधान**
**स्वामीचे चरणसेवेसी.**

सेवानुसेवक मित्रराम आनंदराव चरणावरी मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ता छ८ माहे जिल्काद मुकाम हैदराबाद स्वस्त क्षेम जाणून माहाराजीं निजानंद लिहिती आज्ञा केली पाहिजे. सांप्रती येथील वर्तमान तर राजश्री जाधवरायांचे[4] पंच महाल वगैरे सनदपत्र होणार आहे. कोण कोणते परगणे होतात, सनदपत्र रा चे हातास आलिया उपरी वर्तमान सेवेसी निवेदन करू. रा आपले मायेत पूर्वीपासोन जे आहेत ते सेवेसी विदित्य आहे. नवाब भावाभावाचे वर्तमान तरी सर्व कारबार धंदा दरबार निजामअली खानाकडे. नवाब सलाबतजंग बैसली बाछाई करावी. भावाभावाचे चित एक आहे, आणि निजामअलीखां हरदम यादी आपली करितात आणि रा राजे विठलपंत[5] तेही आपले मायेत पूर्ण आहेत. बशालतजंग तो कृष्णानदी पार होऊन पुढे गेले. नवाबाची छावणी येथे जाहली. मराठे अमीर लोक रजा घेऊन छावणीस

---

१ स्नेही. २ निजामली. ३ बडतर्फ,
४ रामचंद्र जाधव, चंद्रसेनाचा पुत्र, ५ विठ्ठल सुंदर.

4

जाणार आहेत. रा जाधव रायाचा पालकलेक हैबतराव जाधव यासी रा जानबा निंबाळकर याचे रार्खाची लेकी सोयरीक जाली. कळले पाहिजे. जासुद जोडीया येतात. त्यास उत्तर देऊन सत्वर पाठवीत जाणे. हे विनंती.

¶*The writer gives the state of things at Hyderabad and mentions how Ramchandra Jadhao was being promoted.*

---

*No. 4*] [*5-11-1759*

**श्री.**

सेवेसी विनंती सेवक केशवराव लक्ष्मण सा। नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ १४ रबिलावल रविवार मुकाम नाहलगांव नजीक जाणून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. अहमदखान जमादार इभ्रामखान याकडे गेले होते. त्यासी तूर्त लढाईच्या मजकुरामुळे ज्या कार्यास गेले होते ते कार्य घडोन आले नाही. म्हणून मारनिलेनी आपले ठिकाणी बहुत अर्जुदा जाले आहेत. याचा हेत की काही एक कार्य साहेबापासी करून दाखवावे. उपरातीक स्वामीची आज्ञा घेऊन जावे. त्यावरून साहेबाकडे आले आहेत. सर्व मजकूर साहेबास निवेदन करितल, तो ध्यानात आलीया नंतर कृपा करणार साहेब समर्थ आहेत. दुसरे, ईभ्रामखान याच्या चितात की, काही मोगलाची आपला सलोखाची मजकूर आपणास आज्ञा जालीया करू म्हणून अहमदखाने सागतात. त्यासी स्वामी ज्या प्रो आज्ञा करितील त्याप्रमाणे मारानिले वर्तणूक करतील. याजवर सर्व प्रकारे कृपा करणार स्वामी समर्थ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापी. अहमदखान याचे लोक आम्हापासी साठ माणूस छ १ रबिलावलापासून छ मजकूर पावेतो होते. साप्रत लोकासुधा स्वामीकडे आलेत. याची खर्चवेचाची परामृश करणार स्वामी समर्थ. आम्हापासून मारनिलेस आदा रुपये ५०० पाचसे पावले आसेत हे विज्ञाप्ती.

¶*The letter mentions how the Peshwa tried to win over Ibrahimkhan Gardi from the Nizam's service. The task was entrusted to Keshav Laxman Panse, Officer of Artillery.*

---

*No. 5*] [*7-11-1759*

**श्री.**

सेवेसी विनंती सेवक केशवराव लक्षमण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ १६ रबिलोवल प्रहररात्र मुकाम नजीक बुणगे. स्वामीची आज्ञा घेऊन स्वार जालो ते मोगलाचे बाजूने जवळ उजवीकडे चालत होतो.

लोक व जेजालेदाज वगैरे करोल गाडदी पुढे घालून उजवेबाजूस थोडकेसे करोलानी तोड लाविले. तेथे गोळीचा जखमी चांगला माणूस जाला. त्यावर तोफाची मारगीर केली. सा सात बार केले. गोटात मोगलाचे गोळे पोहचले व बाणही पंचवीस तीस सोडले. त्यापैकी दोन तीन बाहेर पडिले. बाकीचे लस्करात पडिले. तोफेचे गोळ्याने आम्हाकडील सेख दाऊद गाडदी याचे दोघे गाडदी ठार जाले. हा मजकूर संध्याकाळ पावेतो जाला. मग सेवक लोक सुधां व तोफा घेऊन मोगलाचे जवळ बाणाचे अंतरावरोन होता. तेथून सर्व सांभाळून निघालों तों रात्र दोन घटका जाली. तेव्हां तोफांचे मार्गे करून चालिलो. स्वामींचे कोणीकडे लस्कर गेले हे ठिकाण लागेना. यास्तव सर्व लोकांचेही साहत्य कांही जवळ नव्हती. यास्तव बुणग्याजवळ येऊन राहिलो. प्रात:काळी सेवेसी येऊन भेटतो. आणीक ही तोफा वगैरे सर्व सामान घेऊन स्वामी जवळ पोहचतो. रात्रीची वाट चुकलो, तो फौजेबरोबर जवळ वोहळा नाल्याची वाट, यास्तव स्वामीजवळ यावयासी अंतर पडिले. तोफा जवळहि असले पाहिजे, म्हणून एव्हाच यावयासी अंतर जालें. बुणग्याजवळ फौज कोणाची नाहीं. तीन कोस मोगल साऱ्या फौजा एक्या तोडे मोगलाच्या आहेत. बुणग्याचे आगे कोणी नाहीं. ये विसीचा बंदोबस्त जाला पाहिजे. आमचे पलीकडे गोपाळराव व रास्ते व कवडे तीन फौजा होत्या. सेवेसी कळावें म्हणून लिहिले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The letter describes the position of the armies before the actual action began.*

---

*No. 6]* *[14-11-1759*

## श्रीशंकर.

पौ छ २३ रोवल

आसीर्वाद उपरी येथील कुशल ता छ २३ माहे रावल जाणून स्वकीये कुशल लिहिणे. विशेष वानमीची पत्रें अले तें पाठविले आहेत. हे श्रीमंतास दाखवणे. आम्ही बुधवारी निश्रा प्रहरा पुढे जाणार. तेथील भीडभांडा[1] येईल तर उतम आहे. सांइकाल च्यार घटिका रात्र पावेतो तथौंटे ( तेथेंच ? ) पावली पाहिजे. त्याजला वानमी जाली. हा खबरदारी होईल. कार्यास आंतर पडेल. शब्द सर्वत्र लावतील.

---

१ जमाव व तोफा.

त्याची भीड दजावीयास (?) आहे ते येईल. किसनसिंगासहि त्याचे लिहिले गेले. तोहि येणार. खर्च पडला. कार्य न जाले तर सरकार शब्द लावील.

येथे जमाव.

| | |
|---|---|
| २५ | स्वार |
| ३७५ | माणसे |
| ४०० | |

| | |
|---|---|
| १५० | खाा सिबंदी |
| ४० | कासी पाटील |
| २५ | साहापूरचे सेंगर |
| १५ | राम चौधरी |
| ५ | माडण |
| १५ | मोजेसा |
| ७५ | मलारपत |
| ३२५ | |
| ५० | केसरीसिंग |
| ३७५ | |

काही स्वार प्यादे पाचसातसे आले तर उत्तम प्रेत्न करता येश दाता श्रीजी आहे. बहुत काये लिहिणे, हे आसीरवाद.

¶*News-letter from a reconnoitering party.*

---

*No. 7*] [*22-11-1759*

**श्री.**

पौ छ १ रबिलाखर.

सेवेसी विसाजी कृष्ण [बिनिवाले] व महिपतराव लक्ष्मण [पानसे] कृतानेक साा नमस्कार विज्ञापना ताा छ १ राखर पावेतो मुा किले अहमदानगर स्वामीच्या कृपेकरून सेवकांचे व कीले मजकूर वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामींनी आज्ञापत्र छ २६ रावलचे जासुद जोडीबाा रवाना केले ते छ २७ रावली पावले. मस्तकी वंदून सनाथ जाहलो. तेथे आज्ञा की च्यार पाचसे खंडी कैली जिनस व चाळीस पन्नास खंडी वजनी जिनस येणे प्राो जसा मिळेल तसा सवगाईची वाट न पाहातां आधी खाो करून * लफत जमा करणे म्हणोन आज्ञा. येशास जिनस खाो करावा * यासि प्रारंभ केला. काही जिनस थोडा थोडा खाो केला. परतु नवा कारभार. जिनसाची अमदानी नाही. याजकरिता ज्याप्राो मिळतो त्याप्राो

खर्च करितो आणि तमाम वाण्यासहि कौले¹ दिल्हा आहे. जसा जसा मिळेल त्याप्रो खर्च करून हर जिनस किल्यात जमा करितो. परतु राजश्री नारो बाबाजी [नगरकर] व राजश्री बाळाजी माहादेव माडोगणे याजकडून च्यार पाचसे खंडी केली जिनस किल्यास................आज्ञा जाहली. त्यास वरचेवर ताकीद होऊन आठ दाहा रोजात गला किल्यास येऊन पाहोचेसी आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. से दोनसे मजूरदार माणसे ठेऊन खंदक व सफेलीचे² काम चालीस लावणे म्हणोन आज्ञा. येशास तूर्त सुर्गाचे दिवस, मजूरदार माणूस फारसे मिलत नाही. परंतु सेपनास माणसे मुनार गवडे बेलदार मिळोन ठेऊन खदकाचे व सफेलीचे काम चालीस लाविले आहे. येथे नेहमी कारखाना लागला म्हणजे पुढे महिन्या पधरा रोजा मजूरदार माणसे मिलतील. तूर्त सेपनास माणूस ठेऊन खदकाचे उकरावयाचे व गडगे घालावयाचे काम व सफेलीचे येणे प्रो सुरू केले आहे. तूर्त सफेलीचे काम चिखल धोड्याचेच करितो व खदकास गडगे घालितो, व फारच खंदक रेवला³ आहे तेथे उकरावयासि काम लावितो. याप्रो तूर्त कारखाना सुरू केला आहे. सेवेसी श्रुत जाहले पाहिजे. पधरा † हजार रुपये पाठविले आहेत म्हणोन आज्ञा लिहीली होती; त्यास येथे आद्यापवर आले नाहीत. पैकावीण खोलंबा जाला आहे. सत्वर येऊन पावे ते जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶The writers Visaji Krishna and Mahipatrao Laxman write about the purchase of ammunition and repairs of the ramparts and trenches of the Ahmednagar Fort.*

---

*No. 8]* *[23-11-1759*

**श्री.**

पौ छ २ जावर (?)
मिर्गेन गुरुवार

† विनती सेवक आंताजी माणकेश्वर सा। नमस्कार विज्ञापना. श्रीमत राजश्री दादासाहेब लस्करात फौजसुधा भोजनास गेले. आम्हास व रायाजी पवार, सटवोजी गावडे यासी ठेऊन येथे चौकीस ठेऊन गेले आहेत. आज्ञेप्रो काल जेथे नाका लाविल्या होत्या त्या चौकीस खबरदार असो. श्रीमतहि सध्याकाली येतील. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Antaji Mankeshwar writes that he, Rayaji Powar and Satvoji Gavade are appointed by Raghunathrao Dadasaheb for picketing.*

---

१ कौल=करारमदार. २ सफेली=तटाची भिंत; ३ भरला.

† यापुढील मजकूर निराळ्या वळणाचा.

No. 9] [25-11-1759

श्री.

पै. ६ छ रबिलाखर

सेवेसी विसाजी. कृष्ण व महिपतराव लक्ष्मण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ ४ रबिलाखर दोन प्रहर रात्र पावेतो मुाा किले अमदानगर स्वामीच्या कृपे करून सेवकाचे व किले मजकुराचे वर्तमान येथास्थित असे विशेष. छ मजकुराचे आज्ञापत्र सांडणी स्वाराबाा रवाना जाहले ते दोन प्रहर रात्रीस पावले. तेथे आज्ञा कीं सोमवारचा मुहुर्त आहे, परंतु लांब पडते. किला सावकाश पाहवयासी बनणार नाही. याजमुळे गुरुवारी दशमीस मुहुर्त आहे. तेथील जोसी यांसी पुसोन ठेवणे म्हणोन आज्ञा. येशास गुरुवारी दशमीसही मुहुर्त चांगला आहे. येथील जोसी यानी सांगीतले. येशास गुरुवारी दशमीस येऊन सावकासीने किला पाहवा. दशमीसहि मुहुर्त चांगलाच आहे. वरकड उदइक सोमवारी मुकाम नारायेणडोहोवर आहे. मंगळवारी शाहापुरावर आहे, म्हणोन आज्ञा. येशास नारायेणडोहो किल्या खालील गाव. तेथे मुकाम केल्याने जिरायंत फार आहे, परंतु जिरायेत गेल्यास काही गुता नाहीं. परंतु गुनवडीहून नारायणडोहो पाच कोस आहे. तेथुन कोलेवाडी कोसभर आहे. रुई पासुन कोलेवाडी पाच सां कोस आहे. तेथे जागा चांगली. पाणी वैरण चांगली आहे. शाहपुरावर जागा चांगली नाही. दगडी रान. पाणीहि ओढ्यास कमीच आहे. कोलेवाडी जागा चांगली, दगड नाहीं. किलाहि अडीच तीन कोस राहतो. जागाहि फारच चांगली. आम्ही काल जातीनें जाउन पाहिली आहे. उद्यां कोलेवाडीसच मुकाम करावा. यात मर्जीस येईल त्याप्रमाणें आज्ञा करावी. आज्ञा येईल तरी दोघा मधुन एक जण ज्यास आज्ञा होईल ते येऊन पोहोचों. आज्ञापत्र पाठविणार स्वामी समर्थ आहेत * उतर साडणी स्वारा बराबर आलेयाने लौकर येउन पोहचेल तेणेप्रमाणे वर्तणुक करून. सेवसी श्रुत जाले पाहिजे, हे विज्ञापना.

¶*The fort of Ahmednagar, an old Mohammadan capital, was recently acquired by the Peshwa and formed an object of pride for him.*

*The writers invite the Peshwa to come and visit the fort personally.*

---

*No. 10]* *[16-12-1759*

विनंति उपरी

जानोजी भोसले थोडे. त्यावर मुधोजी उलटून गेला. जूज होणार हे खबर आली आहे. येविसी पेशजी लिहिले. आज्ञा होईल तसे लेहून पाठऊ.

तोफखाना कडील नेमणुकेची दारू वगैरे किरकोल जिनस स्वारीचा राहिला, त्याविसी गोविंदपतास आज्ञा व्हावी कीं, सत्वर येऊन पावे; व नगरचेही नेमणुके प्रा। लौकर यावे.

ऐवज येथें तीन लाख आणविला तो यावा. खासास्वारीबाा हि दोन लाख यावे. दीड लाख बाा आणिले. त्यांतला विजगनगरची† खरीदी, गाडदी, काही नालबंदी किरकोळ असेच जाले. रोजमराहि चालीस पंनास हजार जाला. सिल्क उडाली. तेव्हा पैठणाहून यैवज आणावा लागला.

नगरास येणें जालीयावर तेथील काम सर्व पाहून आज्ञा त्यास करावी. येथून सांगितले ते विनंति करतील. हवालदार राणोजीराव खानवीलकर अगर तसाच कोणी ठेवावा. इमारत चाली लागली पाहिजे. फरावाग बहुत उत्तम आहे. तेथें जवळ राहणे यासहि स्थळ चागले आहे.

स्वामींनीं शरीरप्रकृति लिहिली त्यांत क्षीण आहे. त्यास बहुत प्रकारें पथ्य चांगलें करावें. जवळ मजल करावी येथे फौज खडीगणती गगेवर येते-दिसी घेतली. ते सा हजार जाली. बिनीची पथके हजारेक होते. अजून जमा होत. येथें आलियावर नलवडे खतल घाटगे वगैरे पांचसे पर्यंत आले. फिरून पत्रे पठविली आहेत.

खासास्वारीबाा हजार दोन हजार फौज नेमणे ते नेमून त्यास आज्ञा व्हावी. आगदी लोक नाही हे उत्तम नाही. चौकीचा बंदोबस्त उत्तम प्रकारे आसावा. पुण्यासहि दोन तीनशे राऊत नेमून ठेवावे.

आवरंगाबाजेत पाचसासे फौज हजार दोन हजार प्यादा आहे. तेथे काही घ्यावे तर फार करून आपलेच लोक आहेत. फौज जमा वीस हजार असती तर सहजांत कांही तरी काम होते. प्रस्तुत घास दाणे घेतो. शहरास काही प्रकार करावा की काय किंवा दौलताबाजचे होईल तेव्हांच जे करणे ते. येक नि * * य नाही ते * * माझी प्रस्तुत बरीच आहे. दोहो तिही दिसांआड येकदां जेवतो. संभाळून जेवावे लागते. पथ्य अगदीं नाहीं. जड मात्र फार खात नाहीं. औषध पहिले चालते तेच आहे. जखमेचे कातडे आजून बळकट जाले नाहीं. शिरेवर म्हणून आंग दुखत थोडेसें असतें. वरकड पहिलेहून सर्व प्रकारें

† गच्या जागीं य असावा. विजयनगरहून कांहीं खरेदी केलेली असेल.

याप्रमाणें महिनाभर करावे. पुण्याहून कूच जाले. भिवरेथडीचे व नगरचे पाणी मानेलसें वाटतें. प्रकृतीस पडेल तेव्हां खरें.

आणाजी साटम याचा कांहींतरी निकाल काढून त्यास आम्हाकडे पाठऊ (न) द्यावें. घरींच राहिले आहेत. वतनाचे गाणे सेवटास न जाई; तरी उमेदवार करून ठेवावे. त्यास घरीं राहू न द्यावें.

बरें आहे. शक्त अजून चांगली येत नाहीं. पाठीमुळें दंड नमस्कार नाहीं. ते चाली लागल्या याहून बरे वाटेल. थोडथोडा प्रारंभ आहे.

दादाची व रायाची शरीरप्रकृति बरीच आहे.

बाबूजी नाइक विठलपंत बाबाचे वगैरे थोर पथके आजून दोनही फौजांतील कोणी जमा होत नाहींत. बहुधा एकदांच सारे येतील तर नकळे. गंगातीरीं वैरण मिळत नाहीं. एके जागा दोनचार दिस जालीया कुच करावे लागते. येथून जावे तिकडे रोख पडतो, हे तिवंधा (त्रेधा?) आहे.

रा छ २९ रा कर हे विनंति.

¶*The whole letter is in the hand of Sadashivrao Bhau and is addressed to the Peshwa, asking orders about various points in connection with the ensuing campaign against the Nizam. The Peshwa was in bad health already and the Bhau himself suffered from the after-effects of the wound he had recently received in his attempted assassination.*

---

*No. 11*] [*27-12-1759*

**श्री.**

छ २२ जमादिलाखर
माघमास सुा सितैन.

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक दताजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा छ ७ जमादिलावल मो कुंजपुरा. स्वामीचे कृपावलोकने करून यथास्थित असे विशेष. सरकारचे आज्ञापत्र छ १० रबिलोवलचे पाठविलें ते छ २ जमादिलावली सादर जालें. तेथे आज्ञा छ ६ रबिलोवली दरबार करून बसलो होतो. त्यास मारेकरी मुसलमान यानी संध्याकाळचे समई पाठीमागून येऊन कटारेची हूल चालविली. ते पाठीवर थोडीसी चुबकणी लागली. खुनी धरले. सोध मनास आणितां मुजफरखान व हैदरखान याजकडे मुदा शाबूत जाला. तेव्हां त्यास व या मनसबियात अणखी

होते त्यास धरून अठाजणाचा सिरछेद केला, म्हणून आज्ञा. ऐसीयास श्रीकृपेनें व वडिलांचे आशिर्वादें खैर जाली. हे वर्तमान यैकोन परम समाधान जाले. स्वामी अवतारी. श्रींचे सुदर्शण फिरत असतां हरामखोरानी शस्त्र चालविले. त्या प्रमाणे केल्या कर्माचें फळ पावले. स्वामी आमचे छत्र. कल्याण जालें. मोठा संतोश जाला. याजउपर जाबता उत्तम प्रकारें राखावा. कोण्हाचा इतबार न धरावा. खास चौकीस दक्षणी मातबर वतनदार पाहून ठेवावे. म्हणजे त्याजपासून अंतर होणार नाहीं. जाबता राहेल. *सेवेसी श्रुत होय हे विज्ञापी.

¶*Dattaji Sindia from Kunjpura congratulates Bhausaheb on his narrow escape from the murderous assault by Mujfarkhan on 28th October 1759. He further advises him to employ as personal guards reliable Maratha land-holders.*

---

*No. 12*] [*5-11-1759*

**श्री.**

पौ. छ. २४ रबिलौवल

श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांप्रति वासुदेव दीक्षित अनेक आसीर्वाद उपरी. येथील क्षेम कार्तिक वद्य १ सोमवार जाणऊन स्वकीयें कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले पावोन वर्तमान कळों आलें. श्रीमंत भाऊ यांस खिस्मी[१] मुसलमान याने दरबारांत हुल कटारीची चालविली. चुबकणी[२] लागली. दों चौ दिवसां बरी होईल म्हणून लिहिले. देवां ब्राह्मणांचे आसीर्वादें क्षेम जालें. आम्ही परस्परें वर्तमान पुर्वी आयेकिले होतें त्यावरून चितांत बहुत विक्षेप आला. आपले पत्रावरून समाधान जालें व बा हरी दीक्षिताचे पत्रीं खुनीं जितके होते त्याचे पारपत्य जालें. बहुत उत्तम जालें. पुढें हि येवनसंसर्ग थोडाच असलियाने उत्तम आहे. हे परम दुष्ट. यांचा भरवसा नाहीं. † बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद.

¶*Vasudeo Dixit sends his congratulations to Bhausaheb on the latter's lucky escape. There is a warning against employing Mohammadans as guards, which shows how feeling ran high at the time against Mohammadan religion.*

---

१ खिस्मी=आक्रम म्ह. द्वेष धरणारा. २ चुबकणी=हलकी जखम, ओरखडा.

† यापुढील शब्द बालबोधीन खाशाच्या हातचे.

No. 13] [27-12-1760

**श्री.**

पौ

छ ६ जमादिलावल

शुक्रवार दोन प्रहर

सेवेसी आज्ञाधारक रामजी नाईक सां. दंडवत विज्ञापना. नवाबाचे आजी सुक्रवारी कूच जाले. निंबेदेहऱ्याचा घाट आजीच चढून वरते जावे यैसी तजवीज आहे. गोपाळराव याचे राऊतानी काल दाहावीस तेथे कहीची[१] उजवे बाजूकडून नेली. सुरतासिंग याचा व्याही पंनास राऊतानिसी परमानंदाचे खेडल्याहून काल दोन प्रहरास नवाबास येऊन भेटला. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*News-letter from the Nizam's Camp.*

---

No. 14] [6-1-1760

**श्री.**

विज्ञापना छ १६ जावल सोमवार मुकाम जाल्याचें वर्तमान यापूर्वीच सेवेसी लिहून पाठविले आहे. त्याजवरून श्रुत जाले असेल. मुकामाचे झंडे उभे करून बहीरबुनगे[२] उतरऊन फौजा चहुकडे मिसलीवरच उभे आहेत. स्वामीच्या फौजा डावे बाजूस नमूद जाल्या म्हणोन इकडूनही राजे विनायकदास व मुरादखां व सदासिव नारायेण व शंकरी वरायेणा डावे बाजूस जाऊन उभे राहिलेत. वरकड मिसलेवरच[३] आपलाले उभे आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*News-letter from Peshwa's agent with the Nizam giving the disposals of the enemy's forces.*

---

No. 15] [8-1-1760

**श्री.**

पौ छ २६ जावल

सितैन पौश्य मास बुधवार.

राजश्री नाना[४] व बळवंतराव[५] यासीं

विनंती† उपरी. आमचे व श्रीमंताचे बोलणे जालें. सारांष तूर्त पौष वद्य शष्टीस याची आज्ञा घेऊन भातवडीचे मुकामास आलों. दर मजलीने येतो. सविस्तर

---

१ तट्टे. २ बाजारबुणगें. ३ नेमलेली जागा.
४ पुरंदरे. ५ मेहेंदळे. † पत्र सखारामबापूचें.

कलेल. व आणीक कितेक मजकूर श्रीमंतानी श्रीमंतास लिहिला आहे. त्यावरून सर्व भाव कलेल. बौंवा चौ कोसावरी आलें आहेत. येथेंच राहणार. लोभ आसो दीजे हे विनंती.

¶*Sakharam Bapu writes from the Peshwa's Camp to Purandare and Balavantrao in Bhausaheb's Camp.*

---

*No. 16]* *[8-1-1760*

**श्री.**

पौ छ २६ जमादिलोवल

सितैन पौष्य बुधवार.

† सेवेसी विज्ञापना. पौष वद्य शष्टीस श्रीमंतापासुन निरोप घेऊन भातवडीस मुकाम केला. येथून दरकूच स्वामीजवल यावें. काही मजकूर आहे तो दर्शनांती श्रुत होईल. सांप्रत मोगल कोठें, आपली फौज कोठें हे ल्याहावे. आम्हाबा राजश्री सदाशिव रामचंद्र वगैरे मिळोन हजार राऊत आहेत. तेथें फौज किती जमा जाली ते ल्याहावे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Sakharam Bapu writes to Sadashivrao Bhau.*

---

*No. 17]* *[9-1-1760*

**श्री.**

पौ. छ १८ (!) जावल

मवाप्रहर दिवस

विज्ञापना छ १९ जावल गुरुवार चार घटका दिवस. वर्तमान, प्रातःकालचे तीन घटका रात्री नगारा कुचाचा होऊन तयारी लष्करची जाली होती. आतां कमा विचार जाला, त्याजवरून मुकामाचे झंडे उभे करऊन मुकाम केला. कोणते कारणार्थ मुकाम जाला, हे मागून सेवेसी लिहून पाठवीन. हे विज्ञापना.

¶*News sent to the Peshwa from the camp of action. It should be remembered that Bhausaheb was in charge of operations near Udgir, and that the Peshwa Nanasaheb was behind near Ahmednagar.*

---

१ महादोबा पुरंदरे. † पत्र सखारामबापूचें.

No. 18] [11-1-1760

**श्री.**

पौ छ २६ जावल

सितैन पौस्य बुधवार

सेवेसी विज्ञापना श्रीमंताचा निरोप घेऊन घाटावर भातोडीचे मुकामावर येऊन स्वामीस विनती पत्र सेवेसी पाठविलें होते. पौष्य वद्ये नवमीस मंदवारी क्षेत्र राक्षेस-भुवनास अलो. कूच दर कूच येतोत. स्वामी कोणे ठिकानी आहेत व मोगल कोणे ठिकानी आहे हे वर्तमान करार[1] कलत नाही; तर अज्ञा लेहून पाठवावी त्यो[2] रोखे येऊ. सेवेसी श्रृत होये हे[3] विज्ञापना.

¶*Sakharam Bapu asks Bhausaheb which way he shbuld come to join the main army.*

---

No. 19] [11-1-1760

**श्री.**

पौ छ २३ जमादिलौवल रविवार तिसरा प्रहर

श्रीमत राजश्री दादासाहेब स्वामीचे शेवेसी.

विनती सेवक विठल सिवदेव कृतानेक सा। नमस्कार विनंति विज्ञापना. येथील कुशल ता छ २१ जमादिलौवल मंदवार मु॥ हेर (बेर?) कुमठे स्वामीचे कृपेकरून येथास्तीत असे विशेष. स्वामीनी कृपा करून पत्र पाठविले. तेथे आज्ञा की, रविवारी आम्ही मोगलाजवळ दों कोसावर येतो. तुम्ही फौजेत येऊन सामील होणे. त्यास आम्ही मार्गावरच आहो. स्वामीही येथेच ये (तात). डावे उजवे फौज आली तरी बातमी राखून येऊ. आज मोगला उदगिरीपलिकडे दोन कोसावर होता. तो शेहरा किलयासेजारी आला. काल जाधवराव आले होते. त्याची उटे तटे आणिली. आज मोगलाची रँव[4] पडल्यावर बैले ढोरे काही तटे आली. केवल रवेचे आलिकडे दरा पुढे देऊळ होते. गोल्यागोली जाली. त्यासही मार्ग नाहीं. आम्हास नाही. ढुंगारे[5] आडवे तिडवे जाऊन बैले बदुखा येक बाण घेऊन आले. मोगल दहा पंधरा हजार सुमारे दिसतो. सिद्ये[6] गारदी आठदहा हजार

---

१ नक्की, खात्रीशीर. २ या पुढील मजकूर सखारामबापूच्या हातचा.

३ येथून सदाशीव रामचंद्र लिहितो काय? ४ रांग.

५ लुटारू. ६ सिद्दी.

तोफा येणे प्रो आहे उदैक कूच होईल. मुकाम होईल ते सेवेसी लिहुन पाठऊन. अलादा पत्र तपर्सीलवार लिहिले आहे ते पाहून श्रीमंत रा। भाऊसाहेबाकडे पाठवावे. सेवेसी श्रुत *

¶*Vithal Shivdeo gives the movements of the enemy's forces to Dadasaheb and also an account of a skirmish.*

---

*No. 20*] [*11-1-1760*

**श्री.**

छ २३ जमादिलै—

वद्य रविवार तिसरा प्रहर

विनंती सेवक विठल सिवदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. येथील कुशल ता। छ २१ जमादिलौवल मंदवार मु। हेर (बेर?) जाणून स्वामीचे कृपे-करून येथास्तित असे विशेष. काल छ २० रोजी वर्तमान सेवेसी लिहीले होते की मोगल उदगिरी पलीकडे दों कोसावर घाटाखाले होता. जाधवरायाचा मुकाम मात्र फौजेचा उदगिरीवर होता. आम्हाकडील लोक जाऊन कहीची उटे सत्रा आठरा काही तटे यैसी घेऊन आले. काल मोगलाचे कूच होणार होते ते मुकामच जाला. खासे जाधवराव काही फौजेत नवत. माग मौजे मृगावर होते. ते आज प्रहरा दिवसा आम्ही तयार होऊन त्याच्या गोटा सेजारी माळावर जाऊन उभे राहिलो. तो तेहि पलीकडून येऊन दाखल जाले होते. तो आम्ही गेलो. मग त्याचे कूच होऊन ढाला[1] पाहून गावात शेहरात राहिले. किल्यावरी तोफा जाल्या. मग आम्ही मोगलाच्या रोखे गेलो. उजवे हाते जाधवराव, उदगीर डावे हाते लस्कर ऐसी जागा पाहून डोंगर होता तेथे उभे राहिलो. लुगारे डोंगर आडदरा होता. आम्हास चालून जाता न येता. त्यास येता नये. यैसे बांकी जागा होती. लुगारे राऊन डावे उजवे होऊन नवाबाच्या लस्करासेजारी जाऊ (न) तीस चाळीस वईल दोन च्यार बंदुखा येक बाण लगीचा यैसा घेऊन आले. तो पावणे दोन प्रहर जाले असता नवाबाचे येकाकीच डेरे पडू लागले. फौजा तयार होऊन पुढे आल्या. मागून कूच होऊन फौजा हरोल आला. मागून बुनगे नवाब थेंम जो दरा वाटेचा त्या माथावर आम्ही करोल उतरून आवाज केले. मग त्या पलीकडे दुसरी वाट आडवाटेने हरोल चढून त्या पलीकडील रस्ता त्याने तोफखाना यैसे चढोन आले. नवाब * * आले. तेव्हा हारोल किल्या सेजारी आला. मागून चडोल[2] चालिला. यैसी सर्व फौजसुधा मुकाम उदगीर पाठीसी

---

१ निशाणें. २ पिछाडी.

देऊन मुकाम जाला. ढाला जाल्या नवत्या. हारोल मात्र आला. दिवस सा सात घडी राहिला. मग आम्ही सरोन. माघारे आलो. छेबिन्यास[१] व रात्री कहीवर घालवे. याकरिता आम्हाकडील लोक व दारकोजी निबालकर यैसे ठविले. आम्ही आलो. मोगल दाहा हजारपर्यंत आहे. सिवाये प्यादा गारदी बुनगे येकचे (?) होते. दाहा हजार पर्येत तेहि असतील. सिवाये तोफा येण-प्रा आहे.. उदईक कूच होईल की मुकाम होईल ते पाहावे. त्याप्रो सेवेसी लिहून कळऊ. श्रृत होये हे विज्ञापना.

¶*Vithal Shivdeo narrates the first encounters with the enemy.*

---

*No. 21*] [*12-1-1760*

**श्री.**

छ २२ जमादिलोवल

शनवार

श्रीमंताची फौज सावरगावावरून चिकोरेयाचे घाटे येणार. त्या सुमारे राऊत पाठवावे.

---

*No. 22*] [*12-1-1760*

**श्री.**

छ २२ जमादिलोवल

सितैन पौष्य दोन

प्रहर शनवार

सेवेसी विज्ञापना. बोरीचे मुकामास येऊन बातमीचे वर्तमान लिहून पत्रे स्वारांजवळ दिल्ही. इतक्यांत दुसरी बातमी आली की जाधवराव पुढें हरोलीसे[२] आले व मागाहून मोगलाचेहि कूच जालें. उदगिरीस आज शुक्रवारी येणार. बहूत काये लिहीणे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*News about the movements of the Mogul and Jadhavrao's army.*

---

१ सैन्याभोवती रखवाली करणारी टोळी. २ हरोली=बिनी, अघाडी.

No. 23] [12-1-1760

श्री.

छ २२ जमादिलावल शनवार
सितैन पौष दोन प्रहर दिवा

सेवेसी विज्ञापना काल गुरुवारी आमचा मुकाम राजुरी तळेगावच्या दरम्यान होता. तेथून उडते वर्तमान लिहून जासूद जोडी सेवेसी रवाना केली. आज शुक्रवारी प्रहर रात्रीस कूच करून मौजे बोरी प्रो वरवळ येथें दो प्रहरा येऊन मुकाम केला. मोगलाचे तथ्य बातमीस पथकें आम्हाकडील हणमंतराव कदम व मुलतानजी कदम व सटवोजी गावडे व कृष्णाजी पंत यांजकडील लोक पुढें पाठविले होते. त्यास तहकीक बातमी आजची. कालचा मुकाम मोगलाचा आवल-कोंडा उदगीरी पलीकडे चों कोसाचा व आजही तेथेंच आहे. मौजे दाबका-हटकराचा गाव होता तो मारिला. गर्दी पाडिली. चंद्रसेन जाधव यांचा दीड दोन हजार मुकाम आज शुक्रवारचा उदगीरीवर आम्हा जवळून तीन साडेतीन कोसावर आहे. लोक आम्हाकडील पुढें गेले होते. त्यांचा व जाधवराव यांचा मुकाबला जाला. त्याजकडील कही पुढें आली होती. त्यापैकीं आम्हाकडील लोकांनीं व सटवोजी गावडे याजकडील लोकानीं तटें उंटें व बैल वगैरे कांही पाडून आणिलीं. कलहास आरंभ आज जाला. याउपरी त्याजकडील कही काबाड परिछीन पाडून आणीत जावें कीं काय येविशीं जैशी आज्ञा होईल तैशी वर्तणूक केली जाईल. स्वामींनी आज्ञापत्रीं लिहिलें होते कीं खासा स्वारी सावरगावावरून चिकोऱ्याचे घाटे येईल. एैसीयास लिहिले प्रमाणें त्यामार्गे स्वारी यावयाचें करावें. मोगलाचा मुकाम तेथेंच जाला. आवलकोंडावरच† जाला आहे. उदगीरी खालना पाचा कोसावर आहे. बहुधा उदगिरीस येणे होईल न होईल ते उदईक कळेल. बहुतेक बांदेरा[1] सोडून येत नाहीं. बांदरेणेच चालेल. आज-रात्री बातमी होईल ते उदैक सेवेसी लिहून पाठऊं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer Vithal Shivdeo Vinchurker gives information about the encampment of the Nizam's army and of a skirmish that took place between his own men and those of Jadhao.*

---

† पत्र विंचुरकराचें.

१ मांजरा नांवाची नदी उदगीरजवळील.

*No. 24*] [*13-1-1760*

## श्रीशंकर.

छ २३ जमादिलोवल
सितैन रविवार

*सेवेसी विज्ञापना—राजश्री विठलपंतानी सविस्तर स्वामीकडील निरोप सांगितला. त्यासी रात्री बाहेर राहावें हे आपले स्वरूपास योग्य दिसत नाही. हे निर्बलाने करावें. स्वामीचे बल त्याचे तिपट आहे; आणि ही मसलत आमचे विचारे बरी दिसत नाही. त्याचा छपा येईल ऐसे दिसत नाहीं. आला तरी छबिना मातबर असिल्यास जसे बनेल तसे करावयास कामास येईल. दुसरे स्वामी बाहेर राहतील तेव्हा फौज जवळ फार राहणार नाहीं एक दोन दिवस राहील, मग फार थोडी फौज राहील. हलकेपण दिसेल. विचार इभ्रामखानासहि पुसावे. सारांश मातबर एकदां लडाई मारावी हा विचार मुख्य. किरकोळ दुरून तोफा मारल्यानें काय होणार? जर मोगलाचे कूच जाहले तरी एक दोन दिवसांत सुमार पाहून लडाई मातबर साऱ्या फौजाची करावी हे विनंती. जर जागा धरून बसला तरी याचे विचार दुसरे आहेत. तेंहि सांगू हे विनंती. जर मध्यें ओढा नसता तरी रात्री जागल्यानें छपा घालावयास अथवा पहाटे आवाई करावयास ठीक पडते. आतां ओढा मध्यें बाका आहे. तेथे त्याच्यानें बाहेर येवत नाहीं; व आपल्यानें जावत नाहीं. तेथे बाहेर जागून मेहनत वृथा होईल, ऐसे सुचतें. त्यात जशी स्वामीची मर्जी असेल तसें ल्याहावें हे विनंती.

¶*Raghunathrao advises Bhausaheb an immediate bold attack in consultation with Ibrahim Khan and deprecates light and dilatory skirmishing.*

---

*No. 25*] [*16-1-1760*

## श्री.

पौ छ २६ जमादिलोवल
सितैन पौष्य बुधवार

विनंती सेवक आंताजी माणकेस्वर सा। नमस्कार विज्ञापना. नारोपताने लोक निसबतीस द्यावयाची विनंती केली. स्वामीनी त्याजवळ सांगितले. तुम्हाजवळ सामान आहे ते कैसे आहे? आसो. इभरामखान गाडदी याजवरी लढाई पडली. त्याच्या उपरालियास फौज आमची उठली. मधे आडवे जाधवरायाची फौज आली. त्याची आमची लढा [ई] येक घटिकाभर जाली. नेहमी तरवारच चालली. ते दीढ हजार, आम्ही दोनसे, सटवोजी गावडे दोनसे, रायाजी

पवार पंचवीस स्वार, याप्रा जाली. तरवार फार चालली. येक प्यादा नवता त्यास उतम प्रकारे सारले. रामाजीपंत आमचे भाचे, लक्ष्मणपंत पागे यानी आधी तरवारने हटले. त्याजवरी शंभर माणसाने तरवारेने हटले. आमच्या आसामिया पाच ठार, गावडेकडील च्यार ठार, वरकड घोडी पडली. घोडे माणूस तरवारेचे जखमी, गावडे आम्ही मिळून चालीस आहे. थोडक्याने फाराची मोडसी उतरली. ते खावदानी द्रिष्टीने पाहिले नाही. रामापा घोरपडा आमचा जडजखमी आहे. रामाजीपंत भाचा वाचता दिसत नाही. आद्याप श्रीमत दादासाहेब अथवा विठलराव पाच राऊत आले नाहीत. येथे आम्ही आहो. जाधवरायाची फौज आद्याप वोढ्यापार आहे. आम्ही वर आहो. गावडे गोटास गेले. गहावया (आग्रह) बहूत केला. न राहिले. आमचे जखमी व मुडदे सर्वे लाविले. आम्ही सडे शंभर निवडक येथेच आहो. श्रीमत आलियाखरीज जात नाही. पाच हजार फौजेच्या खावदाची न व्हावी यैसी जाली. रा। बाबुजी नाईक उजवे बाजूस उभे होते. तेथेच आपल्या ठिकाणीच होते.. उठले नाहीत. सेवकाच्या निसबतीस हजार स्वार जरूर लढाईपरियेत द्यावे. च्यार हजार फौजेच्या खावदाचा चाकरी घ्यावी. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar describes a skirmish which his men encountered with those of Jadhavrao who was thrown back. He also gives his own casualties.*

---

*No. 26*] [*16-1-1760*

**श्रीशंकर.**

पौ छ २६ जावल

सितैन पोम्य बुधवार

चिरंजीव राजश्री नाना[1] यासी आसिर्वाद उपरी. हिरागज हती पाठविला तो पावला. तो ठेऊन घेतला. ते दोघेहि माहात जवळ ठेविले. त्याजकडील दुसराहि हती पाठऊन देणे. आम्हाकडे दुसरा हती अधिक पाहिजे. नेगी[2] समसेर तुम्हाकडे पाठऊ; व लक्ष्मी तोफ मात्र मातब्रर आम्हाजवळ आहे. दुसऱ्या लाहान आहेत. दुरून मार द्यावयास येकच कामाची आहे. तिचा कणा आथवा काही गाडा जाया [जाला] म्हणजे मार द्यावयास ठीक पडत नाही. यास्तव तेथे मातब्रर आठ

---

१ पुरंदर. २ हत्तीचें नांव.

तोफा आहेत. त्यापैकी येक आथवा दोन तोफा पाठवणे. हे आसिर्वाद. हेच पत्र तीर्थरूपास दाखवणे जसी मर्जी असेल तसे लिहिणे, हे आसिर्वाद.

¶*Raghunathrao asks for big guns.*

---

*No. 27*] [*16-1-1760*

**श्री.**

छ २६ जमादिलावल सितैन.

सेवेसी विज्ञापना. आज्ञेप्रमाणे आज येथे आम्ही राहून तोफाची मारगिरी पाहाटे करावी म्हणतो. त्यास आज्ञा. पाहाटे तोफाचा मार दाट देतो व तूर्तहि तोफ लागू केली आहे. आम्हाकडे मातबर तोफ येक आहे. वरकड लाहान आहेत. त्या दूरचे मारगिरीस उपयोगी नाहींत. यास्तव लागूं केल्या नाहींत. पाहाटे जवल जाऊन लाहान तोफा देखील मारगिरी करावी किंवा दुरूनच थोरल्या तोफाचे गोले मारावे ते ल्याहावे. आज आज्ञेप्रो येथेच राहू * हे विनंती.

¶*Raghunathrao asks for orders as to how he should put to use the guns—both small and big.*

---

*No. 28*] [*16-1-1760*

**श्री.**

पौ छ २६ जमादिलोवल

सितैन पौषमास बुधवार.

सेवेसी विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २६ जमादिलोवल सौम्यवासर मुाा परली येथे स्वामीचे कृपेकरून येथास्थित आसे विशेष. उदईक घाट चढोन वरता मुाा होईल. आपला मुाा कोठे आहे ? पुढें आम्ही कोणत्या रोखे यावे हा प्रकार काहीच कळत नाही, व एक दोन पत्रेही पाठविली; परंतु त्याचेही प्रत्योत्तर आली नाहीत. तरी आम्ही कोणत्या रोखे यावें, हे लेहून पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*A Maratha officer asks for orders from which side he should act.*

*No. 29*] [*16-1-1760*

**श्री.**

पौ छ २६ जमादिलोवल.

सितैन पौस्य बुधवार.

सेवेसी विज्ञापना. चिठी पाठविली ती पावली. ऐशास आम्ही स्वामीचे बुनगे-याचे सुमारे मध्ये राहिलो. पुढे छेबिने[१] आपले पहिले तळाचे सुमारें ठेविले. राा बाबुराव सदाशिव आमचे तोफाचे मारगिरी होते त्या गावापासी सडे फौजेने राहिले आहेत. काही मोगलाची पिछाडी व डावीबाजू याप्रमाणें वर्तमान आहे. राऊतावरावर दोन राऊत देऊन बाबुजी नाईक याजकडे पत्र रवाना केले. आमचे बुनगेयाचे तोडावर आणखी फौज ठेविली. स्वामीचे बुनगेयाचे सुमारे आम्ही राहिलो. आज्ञेप्रमाणे बंदोबस्त उत्तम केला असे हे विनंती.

¶*The letter appears to be addressed by Raghunathrao to Bhausaheb.*

---

*No. 30*]

**श्री.**

विनंती. लक्ष्मण तोफ करकवास गेली. तिचा गोला दाहा सेरी आहे. तिचे गोले मिळकेस दोनसे आहेत हे विनंती. गोले पाठवावयाची तरतूद जाहाली म्हणजे गोले सिध्ध आहेत हे विनंती.

¶*News of the Gun Laxman and its balls.*

---

*No. 31*] [*16-1-1760*

**श्री.**

पौ छ २६ जमादिलोवल

सितैन पौष्य मास बुधवार

सेवेसी विज्ञापना. मोगलाचे कूच जाले. जवळच मुकाम केला. कोणीकडे जातो हे कळत नाही. त्यास बुनगे आपले व आमचे ज्या ठिकाणी आहे तेथे असो द्यावे. उद्या कोणत्या रोखे जातो हे कळलियावर त्याप्रमाणे आम्ही डावे बाजूस जाऊं * हे विनंती.

¶*News of the enemy's movements.*

---

१ गतपहारा, चौकी सैन्यापुढील.

No. 32] [19-1-1760

**श्री.**

पौ। छ २९ जमादिलोवल
सितैन माव सणवार

शेवेसी विज्ञापना. चिठी पाठविली. तेथे आज्ञा की, दिवसास मोगलाचे पिछाडीस चालावे; रात्री दादासाहबाचे लगते राहावे. आज्ञे प्रमाणे राहू. आजी आम्ही पिछाडीस नाही. दादासाहेबांची चिठी आली कीं, आजी मोगल चालून येणार; तुम्ही आम्हाजवळ येणे. त्यावरू (न) पिछाडी सोडून फौजेसंनिध आलो. मोगलाने मुकाम करून, चालून गोटा बाहेर थोडासा आला. परंतु जुज जाले नाहीं. कळावें हे विज्ञापना. छ २९ जमादिलावल.

¶*News of the day's operations.*

---

No. 33] [17-1-1760

**श्री.**

पौ. छ [1]२६ जमादिलोवल
सितैन पोष्य मास बुधवार.

सेवेसी नागोराम चरणावरी मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ २७ जमादिलावल संध्याकाळ पावेतो मुकाम वडवाल पा। वडवाल फौजसुधां सेवकाचे वर्तमान यथास्थित विशेष. स्वामींचे आज्ञापत्र साडणी स्वारा समागमे आले कीं स्वारी खंदारचे सुमारे गेली. मोगलाची गाठ लवकरच पडणार. तरी सत्वर येऊन पोहचणें व आणीकही समागमे लोक असतील त्यांस ताकीद करून समागमे घेऊन येणे म्हणून आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणे सत्वर येऊन पोहचतो. लस्करापासून अलीकडे साहा कोसावर आहो. उदैक शुक्रवारी प्रहर दाहा घटका दिवसात सेवेसी पोहचतो. समागमे कडू व वागमारे सरलस्कराकडील आहेत. त्यास समागमे आणिले आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. मागाहून समशेरबहादर व गाईकवाड व हरी गोपाळ व राजश्री सखारामपंतबापु वगैरे हेहि एका दो दिवसात येऊन पोहचतात. मागाहून फौजाची [2]आमदरफ्त फार आहे हे विज्ञापना.

¶*Nago Ram communicates to Bhausaheb the strong concentration of fresh forces that were speedily coming to join the main army. Nago Ram Bhagwat was a Konknasth Brahman, whose son Balavantrao Nagnath became notorious in Bajirao II's days.*

---

१ पैवस्ती चुकीची आहे. २ जाणेयेणें, येरजारा.

*No. 34*] [*16-1-1760*

**श्रीलक्ष्मीकांत.**

छ २६ जमादिलोवल.
पौष्य सितैन मंगलवार.

**राजश्री बालाजी पंडित प्रधान गोसावी**
**यांसि.**

ॐ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित जानोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. गोसावी यानीं पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ श्रवण जाला. पत्रीं आज्ञा जे निजामआलीच्या मनांत कराराप्रमाणें वर्तावयाचे नाहीं. परिछिन्न बिघाड करितात त्यास आपण वराडची कुल जमी पत्र पावतांच करून आपली फौज त्वरेनें जमा करून * * * सामील व्हावे म्हणोन लिहिलें. येशी यास (जे सम) ई जेसी आज्ञा येते त्याप्रमाणें वर्तणूक करीतच आहो. आज्ञेप्रमाणें जतीहि होईल. परंतु इकडील प्रसंग जो जाला तो परस्परें विदित जालाच आहे. रघोजी करांडे याणी इमानांत अंतर करून चिरंजीव मुधोजी भोंसले यांसी मिळून मनमाने तैसी अमर्यादा करून वर्तणूक केली, ते अर्थ कोठपर्यंत ल्याहावा. जनामध्यें आपशब्द उठविला कीं नागपुरास नेऊन आम्हास दगा करावयाचें केले होते. येतद्विशाई आपणासहि त्याणी लेहून पाठविलेंच असेल. त्यास आजीतागाईत आमचे वंशांत वडिलवडिलां-पासोन युध्यप्रसंग होत आले आहेत; परंतु कोण्ही कोण्हाचा विस्वासघात केला येसे जाले नाहीं. ते गोष्टी आम्हापासून केसी होऊ (शकेल). * * * त्याणी लटिका दोष ठेविला. तरी * * * च फलास आला. आमचे चितांत त्याचा ...(घात ?) करावा ऐसे असतें तरी कदापि जये न * * याचा परिहार ल्याहावासा नाहीं. गोसावी यांचेही निदर्शनास येईल. नागपुरास आणिल्यावरी आज्ञेप्रमाणें कारभार करावयाचा तह असतां फौजेंत फिसात करून लोक फोडून फौज जमा करू लागले. हेही गोष्टी चितांत न आणितां त्यास मध्यस्ताकडून सौरस्याच्याच गोष्टी सांगोन पाठविल्या जे तुमचा आमचा बनाव बनत नाहीं. तुम्ही आपले तालुकियात जाणें. करांडे यांसही सांगोन पाठविले कीं तुम्ही त्यांस पोहचाऊन आणिले तसे देणें. त्यावरी करांडे याणी आमचे ठाई दुर्बुध्दि धरून चिरंजिवाचा प्रतिपक्ष केला. तमाम वराडची फौज माहाल मुकामे आमच्या नांवें सनदा देऊन सीमावलंवनचें सोने वादून दाहावा * * * * केली. मनमानें तेंसा पैसा घेतला * * * * पण व्हावे हे इच्छा चितांत धरली. वरचेवर्ग वगडांतून मामलेदारांचे व मोकासदाराचे बोभाट नागपुरी येऊ लागले.

कराडे यांस जेथवरी सामोपचारें लेहून पाठवावयाचे ते पाठविले. परंतु गर्वोन्मत्त होऊन चितांत न आणिले. निदान जाणून सन्निध दोन अडीच हजार फौज होती तेच फौजेनसी कूच करून, मजल दरमजल वर्धापार होऊन, पेठ नांदगांव येथे मुकाम करून, आणखीहि करांडे यास गौरवयुक्त पत्र पाठविले. त्याचे प्रत्योत्तर आनेक प्रकारें वल्गना करून लिहिले आणि दुसरे दिवसीं फौजेनसी चालून आले. आम्हाजवळ फौज होती तेव्हड्यानसी युद्धास उभे राहावे लागले. युध्यसमई गोसावियाचे (सम) स्त लोकानी घोडे चालविले. त्या * * * (शिपा) येगिरीची शर्त केली. परंतु आम्हासी * * * बाधली आहे आणि पूर्ण कृपा आम्हावरी आहे. याजमुळेंच पराभवास पावले. दाहा बारा हजार फौज दोन आडीच हजार फौजेनें मोडावी येसे नव्हतें. परंतु पुण्यप्रताप गोसावी याचा आगाध तेणे करून फते जाली. तदोतर * * * जीवाम्य श्रम करून पाहिले. छापा * * * वयास आले. सर्व करून सेवटी क * * * * कराडियानें भेटीचे सुत्र लाविले. आम्हीहि मनसबियावरी नजर देऊन मान्य केले. भेटीस आले. दुसरे दिवसी चिरंजिवास आणून भेटविले. सांप्रत मागती कारभार करावयाचा मुद्दा घातला आहे. आमचे आज्ञेप्रमाणें वर्तल्यास कारभारहि केला तरी चिंता काये! त्यास त्याची रीती जे आहे ते गोसावी यांसी विदित आहे. या उपरी जो तह होईल तो मागाहून लेहून पाठवितो. साहेब कामावरी नजर देऊन प्रस्तुत सर्व गोष्टींची क्षमा करून कराडे आदी करून लहानथोराची दिलभरी करून फौजेचा गाहा करित असो. आज्ञेप्रमाणें जत्तीहि करितो. आपले फौजेनसी सिधच आहो. जे समई आज्ञा येईल ते स (मई मजल) दरमजल येऊन पोंहचत आसो. सवि (स्तर वृतां) त विदित व्हावा म्हणोन लिहिले असे. रा * * * माहे जमादिलवल. सूज्ञां[1]प्रती विशेष काय लिहिणे. कृपालोभ आसू दिला पाहिजे हे विनंति.

(श्री
शाहूराजपदांभोज-
भ्रमरायितचेतसः । बिंबा-
त्मजस्य मुद्रैषा राघवस्य
विराजते.)

(मोर्तब सुद.)

¶*Janoji Bhonsla was ordered by the Peshwa to mobilise his forces and to wrest the province of Berars from the Nizam as the latter violated the terms. Janoji first gives an account of his family dissensions and the rising of Mudhoji Bhonsle aided by Raghoji Karande. The rising is however put down by him. He then carries out the orders of the Peshwa.*

---

१ येथून अक्षर लेखकाचें.

No. 35] [Jan. 1760

श्री

*राजश्री बाबुराव सदासिव स्वामी गोसावी यासी

विनंती उपरी. आम्ही आज ज्या जागां तोफा लाविल्या होत्या तेथेंच पाठीमागें रात्रीचें सडेच उभे राहिलों आहों. आमचे उजवे बाजूस चिरंजीव दादा आहेत. तोफा लाविल्या त्या जागां येसवंतराव पवार वगैरे लोक ठेविले आहेत. त्याचे पाठीमागे आम्ही आहों. दादाचे उजवे बाजूस तुम्हीच आहा. तुम्हाजवळ फौज थोडकी आहे. तिकडील बाजूचा सर्व बंदोबस्त आपणाकडेच आहे. आम्ही सारेच येके बाजूस आहों. याकरितां तुम्हीं तिकडील बंदोबस्त चांगला करावा. तुम्हा पलीकडे कोणी लोक नाहींत. याकरितां आपण दोनसे स्वार तलावियासी[1] ते बाजूने पाठवावे म्हणजे तिकडे दबाव पडेल. आज पहिला दिवस बुनग्याच्या पेंचा-करितां आज हिकडेच राहणे जाले. तिकडील बंदोबस्त उत्तम करावा हे विनंती.

¶*Sadashivrao suggests to Babuji Naik certain arrangements which he is to carry out.*

---

No. 36] [19-1-1760

श्री.

पौ छ २९ जावल
सिंनन माव सणवार

वडिलाचे शेवेसी विज्ञापना. स्वामींनी चिठी पाठविली ती पावली. मोगला-कडील बातमीची चिठी पाठविली तीहि पावली. आम्हाकडील बातमी आली. तोफा काल फार लागू जाल्या. यामुळे मोगलाने विच्यार केला आहे की, अज तोफा जवळ आल्यास तुटून पडावे. लढाई करावी. यैसी तहकीक बातमी आली आहे. त्यास ते तुटल्यास आम्हास लढाई करणे, घोडे घालणे, जरूर प्राप्त जाले. त्यास आम्हाकडे फौज थोडी आद्याप चांगल्या माणसाचा जथ नाही. इकडे ते तुटल्यास स्वामींनी बातमी राखून तिकडे दाटी करावी; म्हणजे दुरुख लढाई पडेल राजश्री बापूजी नाईक दुमदारीस आहेत. त्यास आम्ही लिहिलें आहे की, आम्हाजवळ आज येणे. स्वामींनी त्यास ल्याहावे. ते आम्ही येकत्र जालियास जे होणे ते होईल. दारकोजी निंबाळकर सटवोजी गावडे स्वामीकडे पाठविले ते पावले असतील. बापूजी नाईक यांनी दुमदारीस आसावे. परंतु लढाईचे समई तोफा लागतील तेव्हा त्यांनी आम्हावर नजर राखून आसावे. ते इकडे चालून आलियास त्यांनी सत्वर सामील होत जावे. यैसें त्यास निक्षूण ल्याहावे. मुख्य मोगल

---

[1] टेहळणीसाठीं.

तोफामुळे फार घाबरला आहे. त्याने कोठेतरी येकदा तुटावे, तोफावर पडावे, हा निश्चये केला आहे. यास्तव स्वामीनी चागला बदोबस्त करून तोफा मारीत जावे. केवळ तोफाचेच भरवसीयावर आसू नये. स्वामीचे मोगल तोफावर तुटला, तरी आम्ही हिकडे पायबंद देऊन लडाई पाडली पाहिजे. आम्हावर तुटला तरी स्वामीनी पायबंद द्यावा म्हणजे काही चालणार नाही. ईश्वरी दयेने सत्वरच मोगल जेर व्हावासा आहे. मोठी लडाई करावयाचा निश्चये करणे तो मी जवळ येऊन ठहराव करीन. स्वामीचे विचारास आले तरी करावे. इभराईमखान वगैरे सारे बलाऊन निश्चये दोहो चोहो दिवसी तरी केला पाहिजे. हे विनंती. दमाजी· समसेरबाहादर व आमची खासी हुजरात, माने, निबालकर वगैरे सारे जमा जाहालीयावरी करावे हेहि उतम आहे. हे विनंती.

¶*Raghoba writes to Sadashivrao, "The attack of our artillery was very effective. The enemy has taken fright. As I have a small force, you should check the enemy from behind if he attacks me. We hope to give him a crushing defeat. All sardars should be speedily summoned for the occasion."*

---

*No. 37*] *[19-1-1760*

**श्री.**

पो छ २९ जमादिलोवल

सितैन माघ सणवार.

सेवेसी विज्ञापना. आम्हाकडील तोफा चालत नाहीं, म्हणोन लिहिलें. त्यास तोफा चालविल्यावर त्याने दाटी करून पांच हजार पर्यंत चालोन घेतले. तेव्हां तोफा पाठीमागे आणून आम्ही पुढें तोंडावर उभे आहों. केवळ गळी पडत नाही. आपणाकडील मार फार जाला. याजकरितां तिकडेहि दाटी केली. आपण खबरदार आहेत. आम्ही होऊन गळी पडत नाहीं. तो चालोन आला तरी आपणांसहि उभे राहिले पाहिजे. मोगल काहावला आहे. आम्हाकडील पंधरा बार पावेतो जाले. आपणाकडीलहि तोफा फार जाल्या. पांच कोस पाणी नाहीं. तोफाच्या मारानें निभाव न होय याजकरितां मुकाम केला. तोफेवर दाटी केल्यामुळें तोफा काढिल्या. आतां स्वस्थ उभे आहों. हे विनंती. स्वामीकडील वर्तमान वरचेवरी ल्याहावें.

¶*Description of an action of the artillery.*

No. 38] [पौ. 29-12-1759

**श्री.**

पौ छ ८ जोवल रविवार

प्रहर रात्र.

विज्ञापना. रविवार संध्याकाळचा अर्धघटका दिवस वर्तमान. स्वामीच्या फौजा पछाडीकडे होत्या; याजकरितां राजे विठलदास वगैरे सरदार मागे उभे होते; याजकरितां यापुर्वी चिठी पाठविली होती की, लस्करांतून फौजा तयार होऊन बाहीर आहेत. त्यास प्रस्तूत राजे विठलदास व सरदार आपलाले डेऱ्यास आले. किरकोळ स्वार उभे आहेत हे विज्ञापना.

¶*News of Vithal Sundar's movements.*

---

No. 39] [पे. 20-1-1760

**श्री.**

पौा छ १ जमादिलाखर

शनवार.

**राजश्री बळवंतराव गणपतस्वामी गो**

विनंती उपरी. काली आम्हाकडील तोफांची मारगिरी जाली. गोळे काही कारीगर जाले असतीलसे वाटते. तुम्हाकडे बातमी आली असेल. दुसऱ्या तोफा तुम्हाकडून येणार. त्या अद्याप येत नाहीं; तरी लौकरच रवानगी करणे. राजश्री दमाजी बावास इकडे पाठवावें म्हणोन तीर्थरूपासी बोलिलों; व तुम्हासी बोलिलों आहों. त्यास येथून धर्माजी गोपाळ कारकून पाठविले आहेत. तरी दमाजी बावाची त्वकर रवानगी करावी व तोफा आज येत असे करणे. *तुम्हापासी ही तोफाचा तोटाच असेल यास्तव येकच तोफ मातबर पाठवणे. येथेही एक मातबर मल्लाबन या नावाची आहे. दोन तोफा असिल्यास मारगिरी उत्तम होईल. कालही मारगिरी उत्तम केली, हे विनंती.

¶*"The action of our artillery proved very effective yesterday. Send some more guns, at least one if not more. Send also Damaji"— writes Raghunathrao to Balvantrao Mehendale.*

*No. 40]* *[22-1-1760*

**श्री.**

पो छ ३ जमादिलाखर सोमवार

सेवेसी विज्ञापना, आज्ञापत्र पाठविले ते पावले. बुनग्याचा मुकाम फार जवल केला. हे कामाचे नव्हे. पाहटेचे प्रहररात्रीच कूच करून साकुराकडे येक घटका रात्र असता निघोन जाणे म्हणोन आज्ञा. आज्ञेप्रमाणे वर्तणुक करितो. परंतु आज मोगलाने तिन्ही कडे रवेचा मोहरे पाडिला. बातमीचे राऊत वानरेचे पाण्याकडे जातो. याप्रो रोख आहे, म्हणोन सागत आले व येथुनही रोख त्याप्रो च दिसला. त्यावरून पाहता आपले सडे फौजेस बुणगे . पाच कोस राहते. इतके दूर .राहिल्याने बुणग्यात राउताचा भरणा थोडा. बुणग्याचे सलतान[1] भारी. आटोपून राहावयाची वरचेवर ताकीद करीतो. परंतु जागा पुरत नाही. तीन कोसाचा तल पडावयासि येतो. दूर राहिल्याने रात्रीचा विषय. गलबल जाहल्याने बदोबस्त होणार नाही. बुणगे फुटोन येकेक माणुस येकेक वाटेस होऊन आपले लस्करचेच लुटून नेतील. यामुले सडेफौजेचे दोन कोसाचे अंतरे राहिले पाहिजे. त्याचे हरोलीचा मोहरे दुरचा दिसत होता. च्यार घटका दिवस राहिला. तो पावेतो मुकाम करावयाची चिठीची वाट पाहून मग मुकाम केला. उंटें नटे नित्य उठोन उपासी मरतात. सकालापासून ओझी लादली होती. त्यावरून उतरून कहींस पाठविली तो चिठी आली. उद्यापासून केवल सडे फौजेचे पाठीमागेच चालोन मागे पाचा कोसाचे अंतरे राहत जाऊ. म्हणजे सोईवार पडेल जिवाजीपंत दिा निंबालकर याजबराबर आज्ञा आली की रात्रीचे राऊंत बुणग्यात फार जातात व सडे स्वारीत बटकी उंटे फार येतात. त्यास ताकीद करावी व लोकांची गुरेढोरे गाव लुटितात. त्याची ताकीद करावी म्हणोन आज्ञा. आज्ञेप्रो ताकीद वरचेवर करितो. परंतु बंदोबस्त होत नाही. फारच लुटीचा बोभाट आणितात. कोठे मुदा लागो देत नाही. याचे बदोबस्तास बाहेर राऊत ठेवावा तर अवघा येवज थोडका. यात छबिना व बातमी व डेऱ्याची चौकी व अगखी कामगिऱ्या फार पडतात. पाचसे रावतानी आटोप कसा होतो? दुसरे पाचशे राऊत तेथून पाठवावयाची आज्ञा जाहली तर काही बदोबस्त होईल. नाहींतर होत नाही. मोठे पथके मल्हारराव व सटवोजी जाधवराव व यशवंतराव पवार वगैरे यासी रुबरूच बरेवजेने ताकीद जाहली पाहिजे. पुणेंयाहून दोनसे गोणी दारू व च्यार तोफा त्रिंबक खडेराव याजकडील दोनसे गाडदी घेऊन रेणापुरावर आले आहेत. हे वर्तमान कलताच रातोरात पचवीस राऊत व येक कारकून मोगलाची गाठ पडो न देतां संभाळून आणावया-

---

१ पसारा, सामानसुमान.

विसी रवाना केले आहेत. इभ्रामखानाकडील जखमी चाकुरास अद्याप जात नाहीं. व पालल्या लोकांच्या व कामाठी बिगारे दिल्हे आहेत ते सोडीत नाहीं. त्यास ताकीद करावी हे विज्ञापना.

¶*The letter mentions the situation of the Maratha forces at Udgir. The writer complains about the lack of discipline among them and asks for severe action.*

---

*No. 41*] [*22-1-1761*

**श्रीगजानन.**

पौ छ १० जमादिलाखर

मंगळवार.

सेवेसी विनंती सेवक मल्हार चिंतामण वाघ कृतानेक सां नमस्कार विनंती विज्ञापना येथील क्षेम ता। माघ सुध पंचमी मु॥ लस्कर नजीक वासीम येक कोस मागे जाणोन निजानंद वैभव लेखन करावयास आज्ञा करीत असीले पा। यानंतर येथील वर्तमान तपसिले सांडणी स्वाराबरोबर व जासुदा समागमे सेवेसी लेहून पाठविले. त्याजवरून सविस्तर अवगत जाहलेच असेल. सांप्रत वर्तमान तर रा। मुधोजी भोसले याजकडील लोकांचा राडा फार. त्यास कांहीं खर्चावेचास यांनीं द्यावे. ऐसा विचार त्याचा याचे चितात. त्याजकडे लोक जे आहेत त्यास रुपया देऊ नये. जितके फजीत जाले तितके बरे. ऐसा प्रकार. याजमुळे राडा तुटून मजल दर मजल यावें, त्यास विक्षेप पडतो. एतद्विशई कारभारी मातबर अंगावर घेऊन, समयावर दृष्ट देऊन, लस्कर चालवी ऐसा नाहीं. आम्ही जितका वाल्बोध करावयाचा तितका करून कूच करवितों. याचे खासे राहुट्या डेरे मात्र पडतात. वरकड डेरे ढाला तमाम उभ्या राहतात. त्यास लोकांचे डेरियास जातां एक एकासी बोलता तळावरच दिवस जातो. रात्रौ प्रहर दीड प्रहर रात्री गोटास यावे. येणेप्रोच आज पावतो जाले. जे लोकासी बोलावे तितके लटके. आज कूच करून मजलीस चला, तुमचा फडशा करून देऊं ऐसे बोलून त्यात आगत्यगैरआगत्य पाहून रा। जानोजीबावा आपले लोकांचा फडशा करितात. परंतु रा। मुधोजी भोसले याजकडील लोकांस आईबाप नाहीं. प्रस्तूत रा। रघोजी कराडे याचे हाती लागलियासिवाय बंदोबस्त होत नाहीं. ऐसे जाणोन आम्ही रा। रघोजी कराडे यास एकांती जाऊन बहुत प्रकारें सांगितले कीं श्रीमंतानी तुम्हांस रा। मल्हारबा होळकर आमचे घरी मातबर तैसे तुम्ही या दरबारी मातबर. आमचे लक्ष तुम्हावर आहे. पैवस्ता कारभार

तुमचे मातबरीवर केला. त्याचा परिणाम सिधीस न गेला. प्रस्तूत तुम्ही उभेयतांस वडील. घरचे बारीक बारीक पेच एकीकडे ठेऊन आम्हावर लक्ष ठेऊन चाकरी करून दाखवावी. ऐसे श्रीमंताचा मनोदय असतां तुम्ही मलईत मिळोन आपला स्वरूपनाश[१] करून घ्यावा हे उत्तम नाहीं. आम्ही श्रीमंतास परिछीन लेहून पाठवितो कीं रघोजी कराडे याचे कूच होत नाहीं. याजमुळे रा जानोजी भोसले यास पायबंद बसतो, ऐसे बहुता प्रकारे सांगोन वाटेवर आणून जानोजी भोसले याचे कूचाबरोबर त्यानी कूच करावे ऐसा करार करून घेतला. आम्हापासी दरबारचे कामकाजाचा बंदोबस्त करून द्यावा म्हणोन वचन घेतले. या उपर रघोजी कराडे स्वामीवर लक्ष ठेऊन येतात. रा मुधोजी भोसले याचे येणे जानोजी भोसले याजबरोबर होता दिसत नाहीं. रघोजी कराडे इकडे आले. वराडी पतकेही याजकडेच दोनचार आलीं. राहिली तीही येतील. मुधोजी भोसले हजार दोन हजार काय जे राहतील ते एका दो दिवसाचे आंतरीयानें येतील, ऐसा सुमार दिसतो. एकत्रता लबाडीची ती सेवटास कैसी जाईल? याउपर मजल दर मजल येत असो हे वि (ज्ञापना).

¶*The writer Malhar Chintaman Vagh explains the difficulty which he had in persuading the Bhonsles—Mudhoji and Janoji—to march towards Udgir. Both were suspicious of each other. Raghoji Karande was however after much persuasion prevailed upon to proceed to Udgir with his forces.*

---

*No. 42*] [*23-1-1760*

**श्री.**

छ ५ जमादिलाखर बुधवार

* सेवसी विज्ञापना आज आम्हाकडून तोफाचा मार उतम जाहाला. तीस चालीस बार जाहाले. लक्ष्मीमीचे बार फार कारीगर जाहाले. चंडोलीस हती जखमी होऊन आंबारी उतरून घेऊन हती तेथेच राहिला. स्वामीकडेहि आंतील बातमी आलीच आसेल. मोगलाने आज मुकाम जवल लौकर केला, याचे काये प्रयोजन हे कले नाही. आज तीस चालीस बार पछाडी व डावी बाजूचे रोखे जाहाले. परंतु आजचे बार फार नेटाने जाहाले. परंतु आतील

---

१ दुर्लौकिक. * पत्र दादासाहेबांचें भाऊसाहेबांस.

खबर येईल तेव्हा कलेल. विठल सिवदेव याजकडील जुझहि बरेच जाहाले. तेथे काय खबर आली ते ल्याहावी हे विनंती.

*Raghunathrao gives to Sadashivrao an account of the fight on his side and asks for information on the others.*

---

*No. 43]* *[23-1-1760*

**श्रीगजानन.**

पो छ १० जमादिलखर

मंगळवार.

पुा सेवेसी विनंती सेवक मल्हार चितामण कृतानेक विज्ञापना. येथील क्षेम ताा माघ सूत्र शष्टी मुा पेणगंगासरद नडसी व वासीम. स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे यानंतर काली रा मुधोजी भोसले रुसवा करून तळावर राहिले. त्याची समजावीस करावयास रा जानोजी भोसले राहिले होते. रात्री संध्याकाळ पावेतो राहून पंनास हजार रुो त्यास द्यावे. त्यापैकी सात हजार रुो तूर्त पिराजी नाइकाची निशा गाडदीयाची करून दिली. बाकी राहिला येवज वराडप्रांते लाऊन द्यावा ऐसा करार जाला. दोन प्रहर रात्रीस जानोजी बावा लस्करास आले. आज त्याजमुळे मुकाम जवळ पेणगंगेचा तीकोसाचा केला. परंतु याजवराबर येतील न येतील ऐसे आहे. त्याजवळ भाडवल हजार दोन हजार राहिले. बाकी सर्व लोक यांजकडे. देखील राघोजी कराडे आले. त्यास विचार पडला जे याउपर याजबरोबर जातांच बरे. प्रथक गेलो तर फौज कांहींच नाहीं, याजकरितां येतील ऐसे आहे. याउपर गुंता राडा[1] फार करून राहिला नाहीं. मजल दरमजल यावें. सांडणी स्वार स्वामीकडून आले. ताम्राची गाठ पडून युध्य जालें. हे वर्तमान कळलियाउपर यास आम्ही चैन पडू देत नाहीं. स्वामी तर गगास येतील. परंतु येथील कारभार वेस्तविस्ता[2]. भये प्रीत दाखऊन जे करणे ते करावे लागते. कागदपत्र येतात त्याजबरोबर आम्हास आज्ञापत्र असावे. याचे पत्रात दाखला मलार चितामण मुजरद पो असतां अद्याप येणे होत नाहीं, हे अपूर्व आहे. ऐसे सरकारचे पत्रीं आगत्यरूप लिहिले असावे. म्हणजे आम्ही तातड करूं ते उपयोगी पडते. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ भानगड. २ अव्यवस्थित, व्यस्तावस्थ.

*No. 44]* *[24-1-1760*

**श्रीगजानन.**

पो। छ १० जमादिलाखर
मंगळवार.

सेवेसी विनंती सेवक मल्हार चितामण वाघ कृतानेक सां नमस्कार विनंती विज्ञापना. येथील क्षेम ता। माघ सुध ७ गुरुवार मु॥ लस्कर पेणगंगा पा। नडसी स्वामीचे कृपावलोकने करून आज्ञाधारकाचे वर्तमान यथास्थित असे. यानंतर येथलि वर्तमान तपसीले सांडणी स्वारा बरोबर सेवेसी लिहिले. त्या अलीकडे दोन पत्रे जासुदा बरोबर लेहून सेवेसी रवाना केलीं. त्याजवरून येथील गर्भे[1] सर्व अवगत जाहलाच असेल. सारांश स्वामीचे पायासीं राजश्री जानोजी बावा याचे लक्ष फार. ताम्राची गाठ पडली. रात्रीचा दिवस करून जावें. समयास गेली याने सर्व गोष्टी उत्तम ऐसे जाणोन आपणाकडील लोक राजश्री रघोजी कराडे वगैरे वराड प्रांतीचे राजश्री मुधोजी बावा याजकडे गेले होते. •त्यांचे मनोधारण करून सर्व एकत्र केले. राजश्री मुधोजी बावा खासे आपले हजार दोन हजारानसी मात्र निवडले. त्याचीही समजावीस करून समागमे ध्यावे म्हणोन एक दिवस आपले कूच करऊन मागे राहून त्याचे गोटांत जाऊन फारफार रीतीने समजाऊन पनास हजार रुपये त्यास वराडप्रांते देवावे. त्यात तूर्त साता हजारांची निशा[2] गार्दी याची पिराजी नाइकांची करून दिल्ही. त्यांनीही कूच करून यावें ऐसा करार करून घेऊन आपण दो प्रहरा रात्रीस आपले गोटास वासीम नजीक मुकामास आले. त्याचे दुसरे दिवसी पेणगंगेचे मुकामास आले. अद्याप ते मागोन आले नाहीत. त्यांचा मार्ग पहावा तर क्षेपनिक्षेप समागमे येतील, ऐसा भरवसा दिसत नाहीं. आम्हासी तर रा। मुधोजी भोसलें यानी करार शफथपूर्वक केला आहे कीं श्रीमंता पासीं याचे अगोधर एक दिवस अगर मागोन एक दिवस अगर समागमे येऊन पोहचतो. पुढे परिणाम श्रीमंत जसा लावतील तसा सुखरूप लाऊत. सारांश त्यांचा मनोदय ऐसा होता जे आपल्या कडील लोक जे आहेत त्याची समजाविसी आपण सांगो तैसी करावी, म्हणिजे लोक आपले लगामी राहतील. यासही भारी लोक ही रजावंद. श्रीमंतापासीही लौकीक की फौज मुधोजी भोसले याची फार. ऐसा प्रकार करून दाखवावा ऐशास राजश्री जानोजी बावा याची मर्जी. आम्ही हे एकत्र जालों; द्वैत उडालें. तेव्हां यानी आमचे डेरियाजवळ डेरा द्यावा. लोकांनी आपलाले मिसलीस उतरावें, म्हणजे एकत्रता खरी. लोकांची समजावीस करावी; हे मुधोजी बावाचे मर्जीस न ये. संशय परस्पर पूर्ववत प्रमाणेच धरून वचकोन दूरूनच लोकांची समजावीसी करून घ्यावी; ऐसा प्रकार

---

१ भावगर्भ. २ जामिनकी पटविणें.

दिसोन आलियानंतर रा रघोजी कराडे याजकडे आम्हास पाठऊन त्यास बहुता प्रकारे वाटेवर आणिले. सर्व निमित्य श्रीमंताकडे जावयाचे तुम्हामुळे पडते. ऐसे आम्ही बहुता प्रकारें उमजऊन श्रीमंताचे लक्ष तुम्हावर. तुम्ही मलेईत[१] याउपर मिळोन ममयास अंतरावें. येणेकरून परिणाम सुधानाहीं. स्वरूपनाश मात्र आहे. श्रीमंतानी आपले दरबारी मल्हारजी होळकर तैसे तुम्ही या दरबारी मातबर, ऐसें म्हटले असतां तुम्ही लक्ष न राखावें. तेव्हां पुढें काय विचार? तेव्हां त्याणीहि स्वामीचे चरणावर लक्ष ठेऊन मलई सोडून रा जानोजी बावा याजकडे तमाम तिकडील लोकसुधां येऊन सामील जाले. याउपर येथील फितूर राहिला नाहीं. दहा हजार फौज चांगली जमा जाली आहे. बारीक बारीक प्रकार सर्व सेवेसी आलियानंतर निवेदन होतील. सरकारची दोन आज्ञापत्रे पावली. सांडणी-स्वाराबरोबर आज्ञापत्र नवतें. सेवकानें सेवा करावी. विसाजीपंत जोग याचे मामलतीचा कारभार विल्हे लागला नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Nos. 43 and 44 are two more letters of Malhar Chintaman Wagh describing the differences between Janoji and Mudhoji Bhonsle.*

---

*No. 45*] [*24-1-1760*

**श्री.**

छ ६ जमादिलाखर.

सुक्रवार.

सेवेसी विज्ञापना रो दमाजी गायकवाड यासी रो लक्ष्मणराव खंडागले याणी गंगेच्या काठीं लुटून घेतलें. सर्व घोडेपिढे नेले. जखमा खाशास लागल्या आहेत. तेथून परेलीच्या घाटे चढोन दीड कोसावर राहिले आहेत. खंडागले जोगाईचे आव्यावरून येत आहेत. बुणग्यात फौज नाहीं तर लवकर दोन हजार फौज बुणगीयाचे ग्खवाली [स] पाठविली पाहिजे. येक दोन दिवस राहून त्याचा शह टलल्यावर फिरोन माघारी जाईल. गायकवाडाची बातमी रो कृष्णाजीपंताचे राऊत घेऊन आले. त्यावरून सेवेसी सुचना लिहिली असे. आजचा मुकाम जोगाईचे आव्यावर आहे, म्हणोन बातमी आली. आमचा मुकाम आजचा मौजे वाम्हणीचे अलीकडे कोसावर येऊन आज्ञेप्रो केला आहे. राऊत † सत्वर आलीयास बरें आहे. रा छ ५ जाखर तीन घटका रात्र आवसींची हे विज्ञापना.

¶*Nana Fadnis' letter about Damaji Gaikwad having been plundered.*

---

[१] बंडखोरी † पत्र नाना फडणविसांचें, असें यापुढील अक्षराच्या वळणावरून म्हणावें लागतें.

No. 46] [25-1-1760

श्री.

छ ७ जंमादिलाखर

शनवार

सेवेसी विज्ञापना जे. खडागल्याचे बातमीकरिता स्वार पाा होते. त्यासी अजी शुक्रवारपरियेत जोगाइचे अब्यास तो आला नाही. तेथे बातमी लागली की सुक्रवारचा मुकाम धारूरचा आहे. याउपरी पुढे कोणत्या रोखे लस्करास सामील होईल ते पाहावे. याप्रमाणे बातमी आणविली आसे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

¶*News in continuation of the previous letter.*

---

No. 47] [25-1-1760

श्री.

छ ६ जमादिलाखर

शुक्रवार

*शेवेसी विज्ञापना. चिठी पाठविली ती पावली. खंडागल्याची बातमी आणवणे म्हणून आज्ञा. त्यास कालच राऊत कृष्णाजीपंताकडील पाठविले आहेत. बातमी आली म्हणजे लिहितो. बुनगे फार लांब राहू नये. आम्हापासून दीड कोसपर्यंत लांब असावे म्हणजे ठीक पडेल. ऐसियास बुनगियाचा कारभार अनिवार. रव पडणे ते तीन कोस पावेतो मनास येईल तिकडें जातें. ताकीदही करितों; परंतु अनिवार. उपाय नाही. याजकरिता यवनापासून चौहू पाचा कोसावर राहिल्यास ठीक पडेल. याहून जवल राहिल्यावर गाठ पडेल ती काय कामाची. व आपली चिठी येते त्याच सुमारे राहातो. परवाचे दिवसीमात्र गुता पडला होता. याजकरिता लांब पडलो. जसी आज्ञा त्याप्रों करू. आज भातागलीवर नदीकाठी यावें. मग मोगलाचा रोख कलेल. त्याप्रो मुकाम करावा. त्यास भातागली येथून कोसभर आहे. तेथे येतो. पुढे चिठी येईल त्याप्रो राहू. येसाजी भगवंत यास चिठी लिहीली होती. ते त्यास बोलाऊन आणून दिल्ही. त्यास सागितलें कीं सत्वर जावें. त्यानी प्रतिउतर दिल्हे की शरीरी समाधान नाही. याकरिता आज जावयाचे न बनेल असे आहे. उदईक जाऊ. त्यास सागितलें की, काही ल्याहावयाचा मजकूर असला तर श्रीमंतास ल्याहावा. त्यास ते म्हणाले की काही नाही. मुकामाची चिठी सत्वर आली पाहिजे. रा छ ६

---

*. सबंध पत्र नाना फडणविसाच्या हातचें आहे.

जाखर बारा घटका दिवस प्रातःकालचा हे विज्ञापना. रात्रीस चौकीस राघो केशव राऊत मुधा जोगाईचे आंब्याचे वाटेवर पाठविले होते. हे विज्ञापना. हणमंतराव कोठे आले हे मशारनिलेस पुसलें. त्यानी सांगितले की आमची बातमी काही आली नाही. परंतु धारूरास आले आसे लोक म्हणतात. याप्रों सांगितले हे विज्ञापना.

¶*News-letter from Nana Fadnis.*

---

*No. 48*] [*25-1-1760*

**श्री.**

छ ७ जमादिलाखर
सितैन शनवार

सेवेसी विज्ञापना. प्रातःकाली आज्ञापत्र पाठविले, तेथे आज्ञा की, सडेस्वारीचे पाठीमागे येऊन कोस दीड कोसाचे अंतरे राहणे. त्यावरून कूच करून अर्ध कोस आलो. तो दुसरी चिठी आली की, भातागलीजवळ मुकाम करणे. आज्ञेप्रों तेथे मुकाम करावा; त्यास पाण्याची सोई नाहीं. त्यामुळे अलीकडे अर्ध कोस येऊन वानरेचे काठी भातखेडलेयावर येऊन मुकाम केला. रा छ ६ जाखर तीन घटका दिवस संध्याकालचा. हे विज्ञापना.

¶*The writer says that he could not encamp near Bhatagali owing to scarcity of water. He has therefore encamped at Bhatkhedle on the Manjra.*

---

*No. 49*] [*24-1-1760*

**श्रीशंकर.**

छ ६ जाखर सितैन

सेवेसी विज्ञापना. शुक्रवारी प्रहर रात्रीस दरवेशमाखां बाहादूर येऊन राजश्री महिपतरावजीस घेऊन गेले. सेवकहि समागमे गेलो. निजाम आलीखानाची भेट जाली. घटिका दोन बसून राजाजीस अज्ञप्राने बोलून त्याचे हाती दिल्हे. वरकड मजकूर आज शनवारी मुकाम जाला. राजाजीही कबूल केले आहे कीं येका प्रहरांत उरकून आजच त्रितीये प्रहरी आज्ञा देवविती. हेहि पुढे बेदरचे

रोहके कूच दरकूच जाणार. नकल कागदाची जाली आहे. काही थोडीसी राहिली, ते दो चौ घटकात सिध करून रवाना करितो. सविस्तर राजश्री महिपतरावजीहि विनती लिहीली आहे. त्याजवरून श्रुत होईल. बहुत काय लिहीणे * * *

¶*News of negotiations started by the Nizam.*

---

*No. 50*] [*25-1-1760*

## श्रीगणराज.

पौ छ १० जमादिलाखर
मंगलवार

* सेवेसी गोपाल गोविंद कृतानेक. साष्टांग नमस्कार विज्ञापना ताा छ ६ जााखर माा नगर स्वामीचे कृपें करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. छ २९ जाावलचीं पत्रे आलीं. त्यांत तोफांचे गोल्यानी रेणुकादास व दोन हती ठार जालें, म्हणून श्रीमंताचे पत्री लिहिले होते. मोंगल बहुत घाबरा जाला असेल. याप्रो गोले लागू जाल्यास मग कलतच आहे. लडाईचे प्रसंगी सेवकाने संनिध असावे, सेवा चाकरी करून दाखवावी, बहूत मानस होते. परंतु योग बनोन न आला. सेवकानें बहूत आग्रह करून निरोप मागितला. परंतु निरोप न होय. प्रस्तुत श्रीमंताची शरी [र] प्रकृत बरीसी दिसते. याच प्रकारे प्रकृत ठरल्यास भगवंत कृपा करील. स्वामीकडील पत्रे वरचेवर येत नाहीत. यास्तव चिंता करीत असतात. दररोज पत्र दिनचर्यचे लिहावया आज्ञा करावी. * * ची फौज प्रस्तुत दीड हजार पावेतो आहे. आणखी हजार पावेतो येतील. सेवेसी विदित होय हे विज्ञापना.

¶*Letter by Gopalrao Patwardhan to Bhausaheb, regretting that he has not been allowed by the Peshwa to join in the struggle and saying that the Peshwa was improving in health. This is an important information, which shews that Peshwa Nanasaheb was already losing health and that fears were being entertained on that account.*

---

*No. 51*] [पौ. *31-1-1760*

## श्री.

पौ छ १२ जमादिलाखर

* सेवेसी विज्ञापना मोंगलांसी झुझावयाचा विचार कोणते दिवसीं, कोणते समई आपण केला असेल तो लिहून पाठविला पाहिजे त्याप्रमाणे सिध्र आहों.

दोन तोफा आम्हाबरोबर ठेवावयाची आज्ञा जाली आहे. याजकरितां गंगाधर परशराम याचें लोक व गाडदी त्याचे व त्याजकडीलच दोन तोफा ठेऊन घेतों. वरकड तोफा गाडदी महिपंतरायाकडील त्र्यंबक खंडेरायाकडील सर्व सेवेसी पाठवितो. ऐसे करितां गंगोबाच्या देखील दोन्ही तोफा व त्याचेहि गाडदी सारेच पाठवावयाची आज्ञा जाली, तरी तेही पाठऊन देऊन. जैसी मर्जी असेल तैसी आज्ञा करावी. जेवेळेस निश्चये लढाईचा ठरेल त्याची चिठी आम्हांस आगोधर पावली पाहिजे. आम्ही तयार आहो. आम्हास एक दिवस आगोधर सूचना ठीक कलली पाहिजे की यावेलेस उठावे. मग च्यार घटका अलीकडे किंवा पलीकडे लागोत. परंतु अमक्या दिवसीं, अमक्या वेळेस हा आजमास ल्याहावा; म्हणजे जपोन राहून जे होईल ते करूं. आज रात्रौ मोगलावर बाण टाकावे; करोलानी सडकावे; वगैरे तरतूद करितो. ईश्वरी दयेने थोडे बहुत साधेलसे वाटते. कळावे हे विनंती:

¶*Raghunathrao asks for the exact time at which he is expected to attack.*

---

*No. 52*] [*26-1-1760*

**श्री.**

छ ७ जमादिलाखर

शनवार

सेवेसीं विज्ञापना बसालतजंग कोठें आलें हे बातमी वरचेवर राखत जावी. जवलपास आल्यास सडी फौज त्याजवर पाठऊन तिकडेंच पारपत्य करावें. मोंगलाची गुंजे[१] बलावली म्हणजे भारी पडेल. निंबालकर दोघे व खंडागलें कोठें आहेत. फौजा कोणें ठिकाणीं आल्या हे बातमी आपण राखत आहेतच. *परंतु सूचना लिहिली आहे. स्वामींची तर्तुद उत्तमच आहे; तथापि लिहिले असे हे विनंति

¶*Letter of Raghunathrao to Bhausaheb suggesting him to dispose of Basalat Jung before he joined the main army of the Nizam. It is significant in what awe the writer holds the addressee.*

---

१ जमाव.

No. 53] [27-1-1760

**श्री.**

छ (८) जाखर

रविवार

**राजश्री सखाराम भगवंत स्वामी गो यासी**
**सखाराम नसले तरी बलवंतरायासी गो यासी**

विनंति उपरी. खर्चास यैवज तीर्थरूप राजश्री भाऊसाहेबानी पाउण लक्ष देविले; त्यापैकी दाहा हजार बाबूजी नां याजकडून देविले. बाकी पांसष्ट हजार; त्यांत चालीस हजाराचें होंन पंचवीस नख्त त्यांत दाहा बागडकोटी, पंधरा आरकाटी, येणे प्रो यैवज आला. त्यास आठवडां व गाडर्दी वगैरे खर्चास होन उडोन गेलें. अद्याप आठवडा पुर्ता जाला नाहीं. पंचवीस हजार रोख आहेंत. तेवढे लागतील. यास्तव तुम्हास चिठी लिहिली असे. तरी तीर्थरूपांजवल या प्रमाणें सांगोन आणीख काही यैवज मागोंन घ्यावा. पोंटास फौजेस व गाडद्यास जरूर दिल्हे पाहिजे. यास्तव यैवज पाठवावा आठवडी व दरमहा वगैरे खर्च नेहमी आहेच. या खेरीज ऐवज किरकोलही जखम्यास व पडल्या घोड्यास जरूर जरूर लागतो. यास्तव ऐवज आणीक पाउण पावेतो मागणे; म्हणजे पंधरा दिवसाची बेगमी आम्हाकडे सरासरी महिन्यास दीढ लक्ष रुा पाहिजेत. सरासरी आजमास लिहिला आहे. तीर्थरुप नाना स्वामीसही ऐवजाविसी येक दोन पत्रे पाठविली आहेत. तिकडून ऐवज येईल त्याचाहि जाब काल आला आहे कीं जितकी तर्तूद होईल तितकी करितो. त्यास ऐवजाचा तोटा फारसा पडणार नाही आम्हाकडे महिना दीढ लक्ष पाठविल्याने पुरेलसे वाटते. परंतु होनाचे नाणे फार; याजमुले पंचवीस अधिकच लागतील आजमास लिहिला आहे. पावणे दोन पावेतो पाहिजेत. कागद तीर्थ-रुपास दाखवणे. दमाजी गायकवाड व रायाजी पवार व तोफ मातबर येक ऐसी घेऊन येणे हे विनंति. दमाजी रायाजी आले म्हणजे भाऊसाहेबी आगाडीचे आगे आणीक येक टोली करावयास लिहिले आहे. तेथे धोंडो दत्तात्रय व बाजीराव गोविंद नेमिले; तेथेच ही दोन्ही पथके राहातील तीन च्यार पथकाची निराली टोली आमचे डांवे हाते राहील. या प्रो बंदो बस्त करू हे विनंति.

¶*The writer asks funds from the headquarters of Bhausaheb. The addressee Sakharam Bapu appears to be with the Peshwa at Nagar. He also communicates the Maratha disposals. The letter appears written long before the date of receipt fixed at the top.*

No. 54] [28-1-1760

श्री.

पौ छ ९ जा वल

इंदुवार दोनप्रहर

विज्ञापना. छ ९ जमादिलावल सोमवार प्रातकाल दोन घटका रात्र असतां कुच्याचा नगारा जाला. लस्करची तयारी होत आहे. या दिवसांत आमके जागा मुकामास जानात हे कलत नाहीं. येकीकडे रूख दाखवितात; येकीकडे चालतात. श्रीगोंद्यास जावें हा येक मार आहे. तेथील मोठा भ्रम आहे. आज पाहावे कोणत्या मार्गे जातात; कोणता रुख धरितात. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶ *This appears to be a news from the enemy's camp.*

---

No. 55] [29-1-1760

श्री.

पौ छ १० जमादिलाखर

मंगलवार

सेवेसी विज्ञापना. चिठी पाठविली ती पावली. आज्ञे प्रमाणेच आमचे चितांस आलें. परंतु आमची फौज थोडी. आमचे लोक कितीक आले नाहीतच, याजकरितां आम्हाकडील पथकें शंकराजी घोरपडे, दमाजी गायकवाड, रायाजी पवार तिकडे आहेत. त्यास क्षेपनिक्षेपें[1] आज्ञा करून इकडे रवाना करावे. दुसरें दुमदारीस[2] बाबुजी नाईक दमाजी गायकवाड यास उठवावे. त्यास हे आमच्या विचारें येत नाही. येक आंग पाठीमागील मोकळे त्यास असावे; म्हणजे जो निघेल त्यास खाली जागा असावी. आम्ही मोगलाचे डावे बाजूस तोफखानीयास लगतेच उठूं. आमच्या उजविया हातेंच डावेच बाजूस नाईक व दमाजी गायकवाड उठवावें. केवळ पाठीमागें पछाडी खालीच असावी. श्रीकृपेने आगाडी बंद होईल. उजवे बाजूस आपल्या फौजाचे नेट बसले. डावे बाजूस आम्ही नाईक, दमाजी मुधां नेट पडेल. तेव्हां येक आंग पछाडी खालीं असावी. येसे आमच्या विचारें आहे. कितीक गरीब किरकोळ पलतील त्यास एक वाट असावी. सांच बंद जालिया माणसास निदान पडते. तेव्हां गरीबामुधां नेट करणे प्राप्त त्यास होते. याजकरितां पछाडी खालीं असावी. घोरपडे, पवार,

---

१ निक्षून, टाकोटाक. २ दुमदारी=पिछाडी.

दमाजीबावास सत्वर पाठवावे. दोन तोफा देखील आम्ही येथें ठेवित नाही. सारीच तोफा गाडदी तिकडे पाठऊन देतो. आपले विचारे पछाडीसहि थोडीसी फौज असवीच; तरी दमाजी गायकवाड, मल्हार नाईक उभयेतांस पछाडीस उठवावे. परंतु बाबूजी नाईक तर आम्हाजवळ आमचे उजवे बाजूस असावे. निशाणाजवळ नाईकीचा माणूस मातबर नाहीं तर सकराजी घोरपडे यासी जरूर जरूर पाठवावे. एक जुज जाहलियानें सर्वहि आभास कलेल. उत्तर आले म्हणजे तोफखाना गाडदी पाठऊन देऊ; हे विज्ञापना. बाबुजी नाईक याचे विचारें एकदा जुजल्याखेरीज निजामअलीचीहि हिमत तुटणार नाहीं. हे विज्ञापना. जुझहि करणे तरी त्रयोदशीस करूं नये. तो दिवस स्वामीस व मला वाईट. कळावे हे विनंती.

¶*The arrangement of the various divisions of the army and also the moves and the countermoves are given in this letter.*

---

*No. 56*] [*29-1-1760*

**श्रीशंकर.**

पौ छ १० जमादिलाखर
मंगळवार

सेवेसी विज्ञापना. जुझाचे मजकुराचे पत्र पाठविले, ते पावले. आज्ञे प्रो सिध आहो. उद्या बुधवारी करूं नये. गुरुवारी अथवा शुक्रवारी बरे आहे. जसे मर्जीस येईल तसे ल्याहावे. अमक्या दिवसी असे ल्याहावे, म्हणजे तयार आहो. हे विज्ञापना.

¶*The handwriting appears to be of Raghunathrao who advises Sadashivrao on astrological grounds not to begin the action " to-morrow Wednesday ".*

---

*No. 57*] [*29-1-1760*

**श्रीगजानन.**

पौ छ १० जमादिलाखर
मंगळवार

पु॥ सेवेसी मल्हार चितामण सां नमस्कार. रा मुधोजी भोसले याजकडील लोक इकडे आले हजार दोन हजार ते राहिले. तेव्हा मागे राहून एकले जावे, ते केवळ फिके दिसोन येते. पंनास हजार रुो देऊ केले. हे राहतील ऐसा कितेक विचार करून येथून दो कोसावर येऊन राहिले. उदईक येथें येणार. दोन

मजली मागे राहिली होते, ते दो कोसावर आले. त्याजकरितां मुकाम करावा ऐसा याचा विचार. परंतु याउपर हे मुकाम करून राहतील तर यासी बेमुरवत होऊं. यास विना वाईट बो[ल]ल्याशिवाये उमज पडत नाहीं. यैसा प्रकार येथील. याजकरितां जसा प्रसंग पाहावा तैसी वर्तणुक करावी. याउपर थोडे बहुत कांही मिळवावयाची ही आशा प्राप्त जाली आहे. यविशईचेहि आम्ही जे बोलणे ते बोलिलो आहो. त्यास चालते मजलीस जे येईल ते घेऊं. यैसे शफतपूर्वक बोलतात. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. येथील शफतेचे प्रमाण वचनाचे प्रमाण येकंदर नाहीं. कुवेभाग ( = वाईट चाल ! ) पडली आहे. अवघा गवगवा. रोज लोकांनी ढाला डेरे जागा जागा उभे करून राडा करावा. याउपर याणी रोखे-पत्रास प्रारंभ केला आहे. आज सिरपुरचा रोखा माघारा फिरला; म्हणून तोफा रवाना करितात. आम्ही जाऊन आडथळा केला कीं, तुम्ही तोफा रवाना करितां, तेव्हा तुमचे मनांत कृत्रिम आहे. लौकर जावयाचें नाहीं. ताम्रासी तुम्हांसी अंतरयामी सख्य आहे हें खरे. श्रीमंताचेही चितांत तुमची यैसी जलदी पाहून सर्व गोष्टी विपर्यास येतील. परिणाम सूध होणार नाहीं. यैसें बहुता प्रकारें सांगितले. त्यांस त्यानीं उतर केले कीं लटका दबाव पडावा, म्हणून तोफा रवाना करितों. दोन कोस तोफा गेल्या नाहीत, तो जमीदार भेटीस येतील. आम्हास आपले बरे समजत आहे. तुम्ही जलदी करितां, ते आमच्याच बऱ्याची. रातचा दिवस करून जाईन तर मी जानोजी भोसला; ऐसी बोलणे मात्र बोलतात. परंतु दिसोन कांहीच येत नाहीं. रा मुधोजी भोसले आजच लस्कराजवळ येऊन उतरले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶ *The wavering state of mind of the Bhonsles of Nagpur is well described here.*

---

*No. 58*] [पौ. *30-1-1760*

**श्री.**

पौ छ ११ जमादिलाखर

बुधवार.

* विज्ञापना सखारामपंत आले. सर्व कळलें. यैशास[१] आज मोगलाचें कूच जालें होतें. परंतु मुकाम जाला. यैशास गाडदी व तोफा येथून रवाना कराव्या. त्यास अज जरी केल्या; तरी संशय अविश्वास होईल. याजकरितां सकालचे कूच होताच

* स्वंय पत्र रावबाच्या हातचें. १ यैशा=औशा—( गांवाचें नांव ).

तोफा दुमदारीनेच काढून आपणाकडे गाडदीसुधा येतील. वरकड तोफखान्याचे डावे बाजूस आपण उठावे. उजवेकडे आम्ही आहो, मल्हारराऊ[1] गायकवाड दुमदारीस आसतील. निश्चये आपण केलाच आहे. या प्रमाणे करावें. गुरु, शुक्र, शन, तीन दिवस बरेच आहित. त्यात जे वेळेस आपण उठतील तेच वेळेस आम्हीही उठू. आम्ही अज जुना तळ सोडून आगाडीचे रोखे येऊन राहिलो. उदईकहि याचप्रो आपणहि रहावें. म्हणजे जुझास सोये पडेल. पुढें जुझ करणे. मागें आगर बाजूस राहणे लांब पडतें. याजकरितां आगाडीच्या सुमारेच रा (?) दोन रोज राहावे. विठलपंतास बलावणे आले. त्यासी त्याजकडे छबिना आहे. संकालीच येतील. हे विनंती. जुझाचे निश्चयास्तव बलावले असेल. तरी सविस्तर ल्याहावे. त्या प्रोच अमलांत येईल. जरूर बलावावयाचे असेल, तरी सकाळी येतील. हे विनंती. तोफा पिछाडीने पाठऊं अथवा आगाडीने पाठऊ. बनेल तिकडून इभ्रामखान, केशवराव [पानसे] येतील. तिकडे पाठवितो, हे विनंती.

¶[*Raghoba suggests the right moment to attack the enemy.*

---

*No. 59]* *[30-1-1760*

## श्रीशंकर.

पौ छ ११ जमादिलाखर

बुधवार.

*सेवेसी विज्ञापना. स्वामीनी लडाईचे वर्तमान लिहिले, ते कळले ; व तीर्थरूप नानासाहेबाची पत्रें पाहावयास पाठविली ती पावली वाचून पाहिली. ऐसीयासी जर जुझ न केले तरी सिपायगिरीस उचित दिसत नाहीं. तिहि पक्षानी मोगल बुडिवासाच आहे. परंतु सिपाईगिरीचे तेज फार आहे. .ऐसीयासी केवल सफेजंगी जेव्हा करणे तेव्हां करावी. परंतु तूर्त योजिला प्रकार गुरुवारी अथवा शुक्रवारी केल्यास बरेच अहि. तोफखान्याच्या डावे बाजूस मोगलांचे उजवे बाजूस स्वामीची फौज. आमची तोफाचे उजवे बाजूस, मोगलाचे डावे बाजूस याप्रमाणें उठावे. मागे दमाजी व मल्हार नाईके[2] उठवावे. त्या आलिकडे बाबुजी नाईक आमचे उजवे हाते; याप्रमाणें बंदोबस्ती करितों. दमाजी गाईकवाड

---

१ दमाजी गायकवाडाचा पुतण्या. २ रास्ते.

व[१] शंकराजी घोरपडे व रायाजी पवार पाठवावयाविसी दोनतीनदा लिहिले; परंतु त्याची रवानगी न जाली. तरी ऐसे न करावे. अगत्य अगत्य शंकराजीस लवकर पाठवणे. त्या खेरीज मातबर माणूस आम्हाजवळ कोणी सिपायात नाही. स्वामीजवळ पाटणकर आहेत. घाटगे वगैरे आहेत. आम्हाकडील पथके मातबर कोणी आले नाहींत. महादाजी नाईक वगैरे अद्याप आले नाहींत. यास्तव जरूर पाठवावे. त्याचे मनात नसिले तरी स्वामिनी त्यास समजाऊन पाठवावे. तेहि यावयास अंतर करणार नाहीत. जसे स्वामीचें मर्जीस येईल, तसे करावे. आमचा आग्रह नाही. कोणीकडून तरी काम जाले म्हणजे उत्तम. आम्ही जितकी सिपायगिरी होईल तितकी करीतच आहो. फळदाता ईश्वर आहे. स्वामीचे पुण्य मातबर आहे. तरी ईश्वर कृपा करीलसे वाटते. निश्चय कोणता तो पत्री ल्याहावा. अमक्यावेळेस हेहि ल्याहावे. आज मुकाम जाहला. बहुधा सलाबतजंगाचे ओर्दामुळें जाहला असेल. हे राजकारण जाहले तरी फारच उत्तम. मग सहजानच होईल. स्वामीच प्राक्तनवान आहेत. सर्वहि सुगमच पडेल हे विनंती

¶*Raghunathrao suggests to Bhausaheb to bring into execution the scheme already planned and to defer for some time a strong attack. The respectful attitude of Raghunathrao towards Sadashivrao is also apparent.*

---

*No. 60*] [ पौ *1-2-1760*

**श्री.**

पौ छ १३ जाखर सितैन

शुक्रवार

सेवेसी विज्ञापना. आम्ही तो काल मोगलापासून फार दूर राहिलो. पाणी मधे नाही. याजमुले लाब राहावे लागले. आता प्रहरा दिवसा येऊन पोहचतो. मुहूर्ताचा मजकूर

पाच घटिका सकालच्यापासून दहा घटिका मधम मुहूर्त आहे.

दाहा घटिकापासून पंधरा घटिका पावेतो फारच उत्तम आहे.

पधरा घटिकापासून दोन घटिका मधम.

येणे प्रमाणे आसे. तोफाखाना आघाडीस नेमणुके प्रमाणे सुरू करावा. उपरात ते चालून येतील. तेव्हा दुतर्फा लडाईची उठावणी करावी. याप्रमाणे असे. त्रिंबके[२] खंडेराव व महिपतराव येऊन पावतील. आम्ही प्रहरा दाहा घटीकाने तोफाचे

---

१ धारकर, यशवंतराव पवाराचा धाकटा भाऊ. २ ओंढेकर.

उजवे बाजूस येतो. येकसमयावछेने काम करावें. वरचेवरी साडणी पाठवीत जावी. आज जुझ ईस्वरी कृपेने मातबरच करितो. दमाजी गाईकवाड व बाबूजी नाईक आमचे उजवे हाते पछाडीसचे बाजूस उठवितो. फळदाता ईस्वर आहे. आमचे जागे थोढा असला तरी तोफा मारू. आणि पछाडी करून सारीच उठावणी करू. कळावे स्वामीनीहि असेच करावे. वरचेवरी बातमी पाठवावी. नजरानजर जाहाली तरी फारच चागले. फारकरून तोफाचे दोही बाजूने दोन्ही फौजा उठाव्या, हा विचार बरा. ईश्वर घडून आणवील ते खरे. हे विनती. १

¶*Raghunathrao writes to Sadashivrao astrological aspects of the right time for attack and then gives his boastful determination to give the enemy a fierce fight. He also gives the arrangement of his army.*

---

*No. 61]* *[Feb. 1760*

**श्री.**

विनंती उपरी. पहिला आमचा तळ होता, तोच बुनगे सुधा उतरावयास अनकूळ होता. अतां तीन कोस येथून घाट पडला. या करिता कूच करून घाटाजवळ बेटातच यावे लागले. याकरिता कूच केले. बेटात जाऊन बुनगे उतरावयास लावितो. आज दोन प्रहरपर्यंत फौजच उतरेल. लोक फार राहिले होते. नावा विशी कोण्ही कजिया न करीत ते करावे. राजश्री तात्यास सागून पाठवावें; आम्ही झाडून उतरू, तेव्हा त्यानी उतरावे. त्यास अवरोध आहे, आणि आमचे त्याचे धड एकाचे उतरणे होणार नाही. एक हाती काम फार; दरमहाचा व आठवड्याचा रोजमरा न द्यावा ऐसे आपले चिती; परंतु गोपाळपंती सांगितल्यावरून आपल्यास पैका आकार कसासा वाटला असेल. तूर्त दाहा पांच आले असले तर त्याजकडे खर्च व चौथाई तिकडे लोक गेले त्यास नेमली आहे. आणि दाहापाच जाले तर यावयास पाच सात रोज पाहिजेत. आला आधिक आगळा ऐवज तर सांगू; तुम्हासही लागला तर देऊं; त्यासही पंधरा रोज तरी लागतील. याकरितां हा दरमहा चा रोजमरा व एक-आठवडा द्यावा. निदान कर्जाऊ तरी द्यावे. आनमान न करावा. बहुत काय लिहिणे हे विनंति.

¶*The whole letter is in Vithal Shivdeo's handwriting. He makes certain suggestions of strategical importance.*

No. 62] [पौ 1-2-1760

श्री.

छ १३ जाखर सितैन.

*सेवेसी विज्ञापना, मोगलाचे आघाडीस डेसण[1] पाहून तोफाची मारगिरी करावी. दुतर्फा फौजा तयार लगत्याच अतील सोय पडल्यास घोडे घालावयास जपून असावे. इकडील फौज तयार होऊन आघाडीचे बाजूस लौकरच येतो. सारांश मोगलाची वाट धरावी. ओढा नाला पुढे देऊन, आगाडीस तोफखाना पसरावा. त्यामागे फौज बंदोबस्ताने आसावे. याप्रो दोन च्यार दिवसात ज्यास * * * * ते करावें. हे विज्ञापना

¶*This is a letter of Raghunathrao to Sadashivrao.*

---

No. 63] [1-2-1760

श्री.

छ १३ जाखर सितैन.

सेवेसी विज्ञापना. आज्ञापत्र पाठविले. तेथे आज्ञा की, प्रात:काली कूच करून लादून राहाणे. गऊत पाठऊन बातमी राखीत जाणे. येथून चिठी जाईल त्या प्रो मुकाम करणे; म्हणोन आज्ञा. आज्ञेप्रो कूच करून लादून राहातो. मोगल कोणीकडे जातो; त्याची बातमी येईल, व आज्ञा मुकाम करावयाची येईल त्याप्रो मुकाम करू. रा छ १३ जाखर हे *विज्ञापना.

---

No. 64] [1-2-1760

श्रीशंकर.

छ १३जाखर सितैन.

सेवेसी विज्ञापना. फार वेळ जाहाला. याजमुळे फौज विसकटत चालली. सकाळी आपले तोफाची बातमी राखुन मोगलाने आगाडी फिरविलीसी वाटते. आत आपली तोफ लागू जाहाली असेल. पुढे जसी आज्ञा तसे त्याहावे. हे विनंति.

---

१ मान्याची जागा. * पत्र नाना फडणीसाचें.

No. 65] [1-2-1760

श्री.

पै वस्ती छ १४ जाखर

सिनैन शनवार.

सेवेसी विज्ञापना. आज्ञापत्र पाठविले. तेथे आज्ञा की, लादून तलावरच राहाणे. मोगलाचे चालीचा रोख कोणीकडे होतो तो रव पडलियावर तुम्हास लेहून पाठऊ. त्याप्रा॥ कूच करून जेथे लेहून जाईल तेथे मुकाम करणे म्हणोन त्यावरून संध्याकालचा पाच घटका दिवस पावेतो चिठीची वाट पाहिली. परंतु चिठी आली नाही. मोगलाचे कूच होऊन पश्चमेचे रोखे गेला. यैसी बातमी आली. त्यावरून तलावरच मुकाम केला. याउपर चिठीची वाट पाहावी तर येथून कूच करून गेल्यास तीन कोस अलीकडे कोठे पाणी नाही, दिवस थोडका राहिला. कूच केल्याने गलाटा होईल. याजकरिता चिठीचा उजूर न धरिता मुकाम केला. उदईक कूच करून कोणत्या रोखास यावे त्याची आज्ञा जाहाली पाहिजे. *रा॥ छ १३ जाखर हे विज्ञापना

¶*The writer Nana Fadnis gives information about the movements of the army of the enemy and asks for orders for further action.*

---

No. 66] [पौ॥ 2-2-1760

श्री.

छ १४ जाखर

माघ सिनैन.

*सेवेसी विज्ञापना. मोगलाचे आघाडीस दोन्ही फौज आपली व आमची राहावी. तोफखाना आघाडीस लागू करावा. तेव्हा तो चालून घेईल. उपरात घोडे घालावयास उतम आहे. आथवा तोड चुकाविल तरी उतम आहे. दोन्ही फौजा येकत्र लगत्या असल्यास, काम मातबर होईल. मोगलापासून कोस दीड कोस रात्रीचे राहात जावे. प्रात:काली जलद तयार होऊन जात जावे. याप्रमाणे दोनच्यार दिवस मेहनत केलियास कार्य सिध होईल. दोन्ही फौजानी वाट धरित जावी; आगाडी बंद करावी; म्हणजे केव्हा तरी चालून घेईल. तेव्हा लडाई करावी. आज हतीस गोला लागला; आणि कही माणसे मेली. मोगल घाबरा जाहाला असेल. पुढे तजवीज आपण कोणती योजिली. इभ्रामखानाचे विचारे कोणती ते सविस्तर ल्याहावे. मोगल हलका दिसतो. सफेजंगीच्याच लडाईत बुडेलसे वाटते.

तीर्थरूप नानासाहेबाचे व स्वामीचे पुण्य मातबर आहे. ईश्वर यश देईल. वरचेवरी वर्तमान लिहित जावे. बहुत काये लिहीणे. दमाजी गाईकवाड व घोरपडे पावले. दमाजीची व बाबूजी नाईकाची टोली निराळी करून पछाडीस ठेवितो; म्हणजे दोन्ही फौजा जवळ राहावयास कामास येईल. हे विनंती.

¶*Raghoba's letter to Bhausaheb.*

---

*No. 67*] [*2-2-1760*

**श्रीशंकर.**

छ १४ जाखर

शनवार माघ सितैन.

* सेवेसी विज्ञापना पहिल्याने जुझावयाची आज्ञा आली होती. मग न उठाव-याची आली. ऐसियासि स्वामीस जुंझच करणे तरी आगाडीस तोफा व सारे गाडदी वगैरे येखादा लहानसा ओढा पुढे देऊन सामान उभे करावे; आणि मार द्यावा. दोन्हींकडून दोनी फौजा उठवाव्या. मग जे ईश्वरे नेमिले आसेल ते होईल. वरकड लागभाग कोठे मिलता दिसत नाही. लाग असला तरी फौज असत नाहीं. यकूण विना स (फे[१]जंगी) * * * * * ची तर्तूद केलिया कसे काम होईल? फार स * * * न करणे; तरी जुंझ लागलियावरी तोफा काढून घ्याव्या. गाडदी सडे मात्र उभे राहून मार आगाडीस द्यावा. दोहीकडून फौजा उठतील असे केलिया मातबर जुंझ होईल. यात स्वामीचे मर्जीस येईल त्याप्रो॰ आम्ही शिध्र आहों. आम्हाकडे निलतुल्य गुतां दोहीं गोष्टीचा नाहीं. स्वामीनी पुर्ता विचार करून करणे ते करावे. जर सफेजंगी करू नये असे असिल्यास च्यार महिने तरी जुझावे लागेल. हे विज्ञापना.

¶*Raghunathrao has been all along advising to give the enemy a crushing fight, otherwise the operations, he says, shall have to be continued for four months more.*

---

*No. 68*] [*Feb. 1760*

**श्री.**

† सेवेसी विज्ञापना. कालचा विचार कीं प्रात:काली तोफा घेऊन याव्या. फिरोन रात्री चिठ्या आल्या कीं, तुम्ही कर्हावर जाणे. त्यास रात्री बुनगे न आले. यामुले लोक उपासी. घोड्यास दाणे मिलाले नाहीत. रात्री छेबीने पाठविले.

---

* स्वंय पत्र राघोबादादाच्या हातचें. १ निकराची लढाई. † पत्र विंचुरकरांचें.

आम्हाकडील लोक याना या रात्री बाण देऊन, त्यांच्या गोटावर पाठविले. पाच बाण सोडले. आवई मात्र जाली. परंतु बाण काही कारगार जाले नाहीत. लोकास उजगारा पडला. बुनगे प्रात:काली आले. लोक जेवायास गुतले. दिवस चार घडी आला. कहीचा समये गेला. स्वामीची स्वारी आली तर बरे. नाही तर उदैक चौ घटका रात्री तयार होऊन गेलियास कही सापडेल. दिवस चढल्यास लाग नाही. आपली स्वारी येती की नाही लेखन करावयास आज्ञा करावी. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना. पथकापथकाचे लोक कहीवर निवडून हजार दोन हजार गेले असेत, हे विज्ञापना.

¶*Vithal Shivdeo's letter.*

---

*No. 69*]

( आरंभीचा बराच मजकूर कागद झडल्यामुळें गेला आहे. )

नाही. झाडून गाडदी व तोफा नाइकाबराबरी रवाना जाले. येक जातीनसी त्रिबक खंडेराव आहेत. याजकरितां येथेच ठेविले. दुसरी गाड्यार्ची पथके दोन आहेत. ते दूर करावयाचेच आहेत. याजकरिता त्यास दूर करितो व त्यांची समजावीसहि पडत नाही. यास्तव दूरच करावे लागतात. तोफेचा मजकूर तरी गाढ्याविना पाठवितां येत नाही. याजकरिता समागमे घेतली. कादर आगापासी येक तोफ आहे, ते पाठवावी. तरी गाड्याविना पाठवितां न ये. याज-करितां समागमेच घेतली. कलावे. * येक तोफ दीड दोन सेर गोल्याची कादर आगाचे तसलमातीस होती. तिला माघारी आपणाकडे पाठवावी, तरी नवा कोसाचे अंतर सोमवारी होते, ते आपले कूच आठ कोस जाहाले असे. आठ कोस ( अपूर्ण )

¶*The writer Raghunathrao writes about the difficulty of transporting the guns.*

---

*No. 70*] *[6-2-1760*

श्री.

पौ.

पौ छ १८ जमादिलाखर

सेवेसी विज्ञापना. चिठी पाठविली. प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहला. मोगलाची कही जाऊ न द्यावी म्हणौन आज्ञा. त्यास तेणेप्रमाणे फौजसुधा

---

* यापुढील मजकूर राघोबाच्या हातचा आहे, त्यावरून पत्र राघोबाचें होतें हें निश्चित आहे.

येऊन बसलों आहों. कहीचे लोकास बाहेर निघों देत नाहीं. येतात त्यास तार्कीद करून माघारे लावीत आहों. कारकुनासमागमे आज्ञा आली कीं, तुम्ही व बाबूजी नाईक जेथे आहां तेथे राहाणे. त्यास आमचा मुकाम जेथे आहो तेथे करविला. सेवेसी विदीत होये हे विज्ञाप्ती.

*The writer suggests the forage parties of the enemy to be stopped.*

---

*No. 71*] [*Feb. 1760*

## श्रीगणराज.

सेवेसी विज्ञापना. आज्ञेप्रमाणे आम्ही प्रात:कालापासून तयार होऊन उभे आहो. यवनाचेहि कूच जाले. आजी मंगलवारी लागभाग पाहून सोय दिसेल तसे उठू. राजश्री आनंदरावदाजीकडील मजकूर कलला. आज्ञेसिवाये नाहीं. विदित होय. हे * विज्ञापना.

*The writer appears to be Gopalrao Patwardhan.*

---

*No. 72*] [*Feb. 1760*

## श्री.

आशिर्वाद[१] उपरी. आमचा मुकाम कालेगांव येथें जाला. येथून मोगल तीन कोस आहे. आपला मुकाम कोणे जागां किती लांब जाला? तेथून मोगल किती लांब आहे, ते लिहावे. उदईक आपण लौकरच तयार होऊन सर्व निकडील मिसलींचे लोकास ताकीद करून लौकर येत ते करावे. रा। दमाजी गायकवाड यांस ही चिठी पा।. आज ते पुरते उभे नवतेसें वाटतें. याकरितां ताकीद करावी. याउपरी बच्याजी विश्वनाथ या समागमें कांहीं ऐवज तीर्थरूपांनीं रवाना केला आहे. त्यास ते तरेचे मुमारे आले आहेत. याकरितां आपण पाचसातसें राऊत पाठऊन ऐवज आपणाजवळ आण * * * आलियावर मग इकडे रवाना करावा. राजश्री तुकोजी सिंदे आले. तेही आपले लस्करांत आहेत. त्यास पुसिलें म्हणजे बच्याजीपंताचे वर्तमान ठीक सांगतील. पुसोन गतीरात पाचसातशे राऊत रवाना करावे. *सखारामपंताचा घात जाला. समाधान करावें. आम्ही लाव आहों. आटोपून सकाळच येऊं, आशिर्वाद.

*Bhausaheb asks the whereabouts of the army of the enemy and requests more contingents to be sent to him. He also consoles Sakharampant Panse (?) for the loss he sustained in the death of Keshavrao Panse on the field of Udgir.*

---

१ पत्र भाऊसाहेबाचें. कोणास? * हा सखारामपंत केशवराव पानसे याचा पुतण्या कीं काय?

No. 73] [Feb. 1760

श्री.

सेवेसी सटवोजी जाधवराऊ विज्ञापना ऐसीजे. आजी रात्रींची चौकी हुजूरचे पुढे उजवे बाजूने बुनगीयाचे दरमियान ठेऊन खबरदारी करणे म्हणून आज्ञा. त्यास काल आपण जेथे बसलो होते त्याच्या उजव्या हतेच चौकी बसवितों; आणि नित्य दोन छबिने पाठवीत असतो. खबरदारीस आतर करीत नाही. हे विनंति.

---

No. 74] [Feb. 1760

श्री.

* विनंती उपरी. आम्ही दोन कोस आलो आहों. येथून मोगलाचे लस्कर कोस दीड आहे. चौक्याहि जागा जागा बसविल्या आहेत. जवळ बाण टाकावयासीहि पाठविले आहेत. प्रातःकाळी भोजनोत्तर सत्वरच यावयाचे करावें. बुनगे तेथेच तयार असूं द्यावे; तो आम्ही मोगलाचे कूच मुकाम प्रातःकाळीं लेहून पाठवितो. आपण राहिले आहेत तेथून मोगलाचे लस्कर तीन साडेतीन कोस लांब आहे. त्यामध्यें वेढे खोडे फारच आहेत, हे विनंती.

¶*The whole letter is in Nana Purandare's handwriting.*

---

No. 75] [Feb. 1760

श्रीशंकर.

* सेवेसी विज्ञापना. तोफेचे लाग फार दिसतात, आणि तोफा नाहींत तरी लौकर पाठवाव्या. कांही चिंता नाहीं. न पाठविल्या तर तितकेच काम उणे पडते. जसे स्वामीचे चितास येईल तसे करावे. हे विज्ञापना.

¶*(Raghunathrao's letter.)*

No. 76] [Feb. 1760

## श्रीमार्तंड भैरव जीतु (जयतु) प्रा.

*विनंती उपरी प्राथकालीच पत्र आपणाकडे पा त्यावरून ध्यानास येईल. बहुतेक आपण कूच करून आज वाडीवर जातील. आपण गेले म्हणजे आम्ही जानेगावीहून कूच करून कनलीकर मुधा डोंगरात जातो. कळावे. मुकाम नेहमीच होईल. कालचे वर्तमान आपणाकडील काय ठार कोणी जाया जाले म्हणून वर्तमान आहे. काल आमचे लोकानी दाटी करून खिडकीपर्यंत गेले. मागे फिरते समई व आणिक लोक जातां दोन तीन जाया जाले. कळावे. कृष्णाजीपंताचे पत्र पा आहे. पावेल. आपले कडील व वरचे सविस्तर ल्याहावे. श्रीमंत दादासाहेब कूच करून कोठें आले हे ल्याहावें.

---

No. 77] [Feb. 1760

सेवेसी विज्ञापना. स्वामींनी चिठी पाठविली ते पावली. उद्यापासुन दोन हजार फौज मोगलाच्या नमुदास[1] प्रातःकालीच पाठवीत जावी, म्हणोन आज्ञा. ऐसीयास आज्ञेप्रमाणे प्रातःकालींच दोन हजार फौज मोगलाचे नमुदास रवाना करितों. प्रस्तुत छबिन्यास दोन हजार फौज चिरंजिवास पाठविलें आहे. सेवेसी श्रुत होये, हे विज्ञापना.

---

No. 78]

### श्री.

सेवेसी विज्ञापना. गणतीबद्दल कारकून आले. निमे गणत्या जाल्या. तो हूल पडली. त्यामुळे कारकून पळोन गेले. आम्ही त्यास सांगितलें कीं आवाई लटकी आहे. प्रहरभर राहून गणती घेणें. परंतु ते आपली घोडीपीढी सांभाळावयास गेले. फौज मागून पुढून जमा जाले म्हणजे फौज घेऊन येतो. अजमासहि पाहावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶(*Vithal Shivdeo's handwriting.*)

---

[1] मुकाबल्यास.

*No. 79]* *[3-2-1760*

**श्री.**

पौ छ २० जमादिलाखर

माघ सितैन.

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबाचे**
**सेवेसी**

विनंती सेवक मोराजी शिंदे मुकाम राजपुरी. चरणावर मस्तक ठेऊन शिर साष्टांग दडवत विनंती विज्ञापना. ताा छ १९ जमादिलाखर पावेतों साहेबाचे कृपादृष्टी करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष. साहेबाचें अज्ञापत्र छ ७ जमादिलाखरचें सादर जालें. तेथें आज्ञा जे मोगल उदगिरीवरी आहे. त्याचें लष्करावरी सरकारच्या तोफा लागूं होऊन पौष्य वद्य द्वादशीस मंगळवारी तोफाचा मार दिला. गोले सलाबतजंगाचे डेऱ्यापुढें जाऊन माणसे, घोडी, बैल जाया जाहाले. तेव्हां त्यानी डेरे उपटुन पलीकडे नेले. मार तोफांचा न राहीच, तेव्हां त्याजकडील गाडदी पुढें आले. मग सरकारचे इब्रामखान वगैरे गाडदी त्याजवरी चालून गेले. गाडद्या गाडद्यांची लढाई जाली. इब्रामखान यांणीं फारच दम धरून टहरून[1] लढले. जुंज बरेंच जाहले. त्याजकडील शे सत्राशे गाडदी जखमी व ठार जाहाले. पांच सात जमातदारही त्याजकडील चांगले पडले. सरकारचेही दोनशे पावेतो गाडदी जखमी व ठार जाहाले. च्याळीस पनास जाहले. प्रस्तुत मोगल किल्ल्यावर आश्रा करून विचारात पडला आहे. दाणा वैरणीचे संकट त्यास आहे. याप्रकारचें वर्तमान आहे, म्हणोन आज्ञापत्र सादर जाहले. त्यास साहेबाचे पुण्ये प्रतापेकरून शत्रु पराभवाते पावतील. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञप्ति.

¶*The letter describes the havoc played by the artillery under Ibrahimkhan into the enemy's camp, and also the precarious condition of the enemy.*

---

*No. 80]* *[7-2-1760*

**श्रीगजानन.**

सेवेसी विनंती. सेवक मल्हार चितामण वाव सां नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा छ १९ जमादिलाखर च्यार घटका रात्र मुा आबे सरकारची पत्रे सलुख्याची रदबदली लागली म्हणौन व येथून कूच जालियाउपर हला करावी

१ गाडून उभे राहून.

लागते. तर जलदीने आज यऊन पोहचणे म्हणौन आज्ञा. यैशास आज्ञापत्र सादर होताच कूच करीत होते. परतु च्यार घटका दिवस राहिला. याजकरिता मुकाम केला. उदईक प्रहर रात्री कूच करून दर्शनास येणार. ब्रिघाड आसावा. आपले चाकरीचा मजुरा घडावा. यैसे इच्छा फार आहे. आज तमाम लोकास ताकीद केली आहे. सामाने बाधोन आपलाले मि..............सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना..................जी बावा चौ कोसावर परलीचा घाट चढोन आले; म्हणौन वर्तमान येथे आहे. हे विज्ञापना.

¶ *Wagh writes news of Janoji Bhonsle's movements to Sadashivrao.*

---

*No. 81]* *[7-2-1760*

## श्रीगजानन.

पौ छ २२ जमादिलाखर

सेवेसी विनंती. सेवक मल्हार चिंतामण वाघ कृतानेक सां नमस्कार विनंती विज्ञापना. येथील क्षेम ता माव वद्य ६ गुरुवार संध्याकाल मुा जोगाईचे आंबे स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्थित आसे. यानंतर आज्ञापत्र सादर जाले. तेथे आज्ञा जे विसा कोसाची मजल करून लौकर येऊन पोहचणे. यैशास आज्ञेप्रमाणे लाब लाब मंजली करून मुा मजकुरास आले. उदईक प्रहर सा घटका दिवसांत सेवेसी येऊन पोहचतात. फौजेत धमक फार आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. हे जुझ मातबर जाले. सल्यावर गोस्ट पडली. आपण समयास आंतरलो म्हणौन बहुत सर्द जाले. ईस्वर बिघाड करून आमची उजागरी करील तर उतम आहे, म्हणौन हे इच्छा करितात. यास यैसा प्रकार घडोन येईल, यैसा भरवसा नवतो. गुदस्ता याचे त्याचे. जुज जाले होते. त्याचे मर्दुमीचीच तारीफ करीत होते. परतु स्वामीचे पुण्य समर्थ. येणे करून सर्व कल्याणरूप होऊन येते. हे विज्ञापना.

¶ *The writer describes the attitude of the Bhonsle brothers.*

No. 82] [7-4-1760

**श्रीगणराज.**

छ २० साबान चैत्र सितैन.

राजेश्री गोविंदराव तात्या स्वामीचे सेवेसी.

पो गोपाळ गोविंद नमस्कार विनंती उपरी. आजी सोमवारीं च्यार घटी रात्री किले दौलताबादेत सरकारचे लोक मांकोट दरवाजीयांत गेले. रात्र जाली. आंतील लोक निघून पावले. यास्तव दरवाजीयांत ठेविले. प्रातःकाळीं आंत जातील. मुख्य किला स्वाधीन जाला. याउपर कांहीं गुंता नाहीं. मुख्य माहाकोट दरवाजा आमचे स्वाधीन जाला. बहुत काय लिहिणे? हे विनंति.

¶*Capture of the fort Daulatabad, communicated by Gopalrao Patwardhan to Govindrao Limaye Khasgiwale.*

---

No. 83] [11-2-1760

**श्री.**

चिरंजिवाचे पत्राची

नकल छ २९ जाखर

सेवेशी विनंति. दौलताबाद किला नवाबाजवळून करार करून घेऊन किलेदारास पत्र नवाबाचे मोहरेनसी घेतले. तेच पत्र सेवेसी पाठविलें आहे. घ्यावे आणि राजश्री गोपाळरायासारखा शाहाणा माणूस लोक देऊन पाठवावे. किलेदारास परवाना द्यावा आणि लोक किल्यांवर चढवावे. येथे नवाबापासी तिळमात्र गुंता राहिला नाहीं. जाजतीं जागिरीचा कुन्हा[१] मध्यस्तासीं असा नवाच काढून बोललों कीं पंचेतालीस लाखाची जागीर कबूल केलीत. परंतु आमची चौथाई वजा करून पंचेतालीस भरून द्यावे. याप्रमाणे नेटीं लाऊन जाबसाल केला. तेव्हा हाहि प्रकार कबूल जाले. पंधरा लाख जाजती जाहालें. येकूण साठ लक्ष करार जाहाले. यीं साठ लक्ष करार जाहाले. हे जाजती व्हावयास कारण हेच कीं विठल सुंदर नवाबाजवळून बरतरफ करवीत होतों. तेव्हा विठल सुंदराचा पेगोम[२] बजीद होऊन आला कीं सर्व प्रकारें पदरचा आहे. कृपा करावी. चांकरी करून दाखवीन. पुढें सर्व प्रकार निष्टेने वर्तणूक करीन. यैसे बोलू लागले. तेव्हा ही नवीं जागीर जाजती, हा चौथाईचा कुन्हा ठेऊन पंधराची कबूल करविली. व दौलताबाद

---

१ कुन्हा = खोंच, कपट. २ बोली.

किला घेतला. येणेप्रों करून विठलपंतानी निजामअलिखानापासीं राहून आमचे मर्जीप्रो वर्तणूक करावी. चालावे. तिलमात्र अंतर पडू देऊ नये. याप्रो शफतपूर्वक केलें. तदोतर विठलपंतास निजामअलिखानापासी राहाविले. येविसी निजामअलिखानाची रदबदल दाट होती, यैकाविसी जाहाली, व आपले कांहीं जाजतीं चांगलें जाहाले, यास्तव केलें सविस्तर स्वामीस कलावें. किलेदारीची सनद मागाहून पाठवितों. तूर्त इनायेतनामा[१] पाठविला आहे. हा पुढे पाठवावा व लोक पाठवावे. गा छ २२ जालाखर. हे विनंति. किल्याच्या आसाम्या येथे नेमल्या आहेत. यास्तव तेथे कोणास देऊ नयें. आसेर, बरानपुर, माले येथील (स) नदा देऊन, बच्याजीपंतास हजार फौज करोन गा केलें. विज्यापुरची सनद नागोरामांस बसलतजंगाकडें हजार फौजे देऊन पहिले गा केलें. त्याकडे गा परवाना पाठविला कीं जागा खाली करून देतों. पंचेतालीस सिवाय चोथायात पंधरा होतात. दाहाचे बोलोनच आहे. पंधराचेही होईल. परंतु सेवटी जालियावर सेवेसी लिहून. हे विनंति.

¶*Sadashivrao writes to the Peshwa the terms of the treaty that he had offered to Nizam.*

---

*No. 84*] *[13-2-1760*

**श्री.**

पौ छ २५ जमादिलाखर
मितेन.

**रावसाहेब मेहरबान मुखलीशान सलामत.**

ॐ बादज शौक मुलाकात बाहजत आयातमशहूद खातरबाद येथील खैरसला जाणून आपली खैर आफियत हमेशा लिहून दिल ताजा करीत असावे. दिगर छ १७ जमादिलाखर रोजी वर्तमान एकिलें जे श्रीमंत भाऊ साहेबीं आपणाच मोगलाचे लशकरात युध्याचा प्रसंग गेला. त्यास कितीक हातीनसीन सरदार निकडील दस्तगीर जाले. बहुत उत्तम प्रकारें श्रीमंताचे लोकांनी फते केली. यासी श्रीमंताचा प्रताप महिमा एसा आहे कीं जिकडे सरकारची फौज जात आहे तिकडे फतेच होऊन येती. ज्या कामावर आपण खुद बदवलत कमरबंदी केली असेल तेथ फते[२] हात जोडून तिष्ठत उभी राहील. हे वर्तमान एकोन चितास बहुत खुशी हासील जाली. ईश्वर हे फत्तेची खबर सर्व खैरखैवा[३] लोकास मुबारक

---

१ आज्ञापत्र, शिफारसपत्र. २ विजय.
३ खैरखवा=खुशाली. खैर आफियत=खुशाली.

करो. आपणाकडील वर्तमान लवकर कळत नाहीं यास्तव चित चिंताग्रस्त असते. तर सविस्तर आपले खैर आफियतचे वर्तमान पाठवीत असावे, की चिताचे समाधान होत जाईल. ज्यादा काय लिहिणे. प्यार मोहबत असो दीजे. हे किताबत.

¶*The writer, a Muhammadan, congratulates the Peshwa on the success at Udgir and praises the bravery displayed by Bhausaheb.*

---

*No. 85]* *[15-2-1760*

**श्री.**

छ ९ रजब सीतैन

श्रीमत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी. विनति सेवक राघो बापूजी कृतानेक साष्टाग नमस्कार विनति विज्ञापना. येथील वर्तमान छ २७ जाखर मुा नजीक आबड स्वामीचे कृपेकडुन येथास्थित असे. यानतर श्रीमत राजश्री नानासाहेब याणी प्रो मारचे जप्तीस फौजसुधा पां आहे. त्यासी येथे येऊन येथील जप्तीचा फडशा रा पाडुरग सिवदेव याचे मारफतीने वाइयाने उरकिला आहे. त्यास मौजे पाटोदे प्रो आबाड येथील (पाटील) रा मुधोजी भोसले सेनाधुरंधर याणी गावमारास घासदाण्याचा रोखा करून धरून नेला आहे. त्याजकडे घासदाणा रु. ४०० चारसे करार करून गावास जासुद वसुलास पा आहे. आणि पाटील मार यास वोलेस लस्करात ठेवले आहे. त्यास येथे गावकरी सदरहु रुा मजुरा मागतात. येतद्विशी पाटील मारास सोडून द्यावयाची व रुा न मागणे म्हणून आज्ञा करणार स्वामी धणी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञप्ति.

¶*The writer Ragho Bapuji is deputed to take possession of the province of Ambad by the Peshwa. He complains against Mudhoji Bhonsle arresting the Patil of the place, and asks for his release.*

---

*No. 86]* *[16-2-1760*

**श्री.**

पौ २८ जमादिलाकर

सितैन माघ शुक्रवार.

श्रीमंत माहाराज राजश्री भाऊसाहेब स्वामीचे चरण सेवेसी. सेवक आज्ञाधारक सिवराम आनंदराव सां नमस्कार विनंती उपरी. काली नवाबाकडील जासूद-

माहालात सहज वर्तमानास्तव गेलो होतो. ते स्थली आमचा श्नेहस्त खंडोजी ना याची भेटी जाहली. त्यासी आपण विचारिल कीं श्रीमंताची व नवाबाची सांप्रती बोली चालीचा प्रसंग सित्धांत जो करार जाहला आहे ते गोस्टी करार वाके चालेल की न चालेल. तुमचे द्रीस्टीस कैस दिसतें; म्हणोन विचारिल असतां त्यानी उतर दिल्ह कीं मोगलाची जात काबूची. समयें पाहोन लेकी (खी ?) देऊन घात करणार. त्यानी वेलावर द्रीस्टी देऊन तुम्ही जे मागतील ते गोस्टी त्यानी कबूल जाहाले आहेत. सेवटप्रांत होणार नाहीं. तीघ भाऊ येक जागा होऊन, मराठी फौज रा जानबा व वेंकटराव व खंडागले वगैर अमीर लोक बिछेडले[1] आहेत, त्या आवघ्यास मिलवोन घेऊन मागती येकदां हरशामृश करतील; हे गोस्टी निजामअलीखा याचे चिती आहे. बोलोन दाखवीत नाहींत. होणार जे असल ते चुकत नाहीं. परंतु रंग यैसा दिसोन येतो. ईस्वराचे चित्तीं जे असेल ते होईल. याप्रमाणें बोली आइकली; आणि बशालतजंगाचे वर्तमान तरी आलंद व गुंजोटी विध्वंश करीत अवशाकडे * * * * आहेत; त्यासमागमे पठाण व मुरापुरचा बेडर आहे, आणि माघोन रा मुरारजी घोरपडेहि आले म्हणोन बोलवा आइकली. दाहा बारा हजार फौज चागली, व गारदी प्यादे दाहा हजार, व तोफ लहान थोर ४०, व जेजाला तीन च्यारसे, सामान चागल आहे, म्हणोन बोलवा आइकली. सेवेसी कलावें म्हणोन लिहीले अस. स्वामीचिथे[2] वर्तमान वरचेवर येत असल. सेवकान आइकाल ते वर्तमान सेवेसी निवेदन करावें लागतें. रा जाधवराव यानी परवा घोडी व हती गुलामअली कर्जदाराचे भरीस दिल्हा म्हणोन लिहील होते, त्या गोष्टीचा शोध घेता वर्तमान आइकिल की माहाराज त्याचे भेटीस येणार. भेटीस आल्यानंतर तो हती करितां भीड पडलिया देण लागल. यास्तव लटका कर्जदार उभा करून, पागाचे सात आठ घोडी चांगली व हती गुलामआली पठाणाकडे ठेविले; आणि निजामअलीखा यानी येक हती थार जाधवराव यासी पाठविला आहे. कही कबाड बैल घोडी आजी मागती राजश्री बाबूजी नाईक याचे गोटाकडे लस्करचे लोक गेले. रस्त तो रोज बरोज येत जाते. सेवेसी कलावे. महाराज पुण्यश्लोकी. आपण सेवक पदरचे असो. आपल वर्तमान सेवेसी विदित आहे. हे विनंती.

¶*News-letter from a spy sent by the Peshwa into the Nizam's camp. The ultimate result of the campaign turned out to be as hollow as this spy forecasted.*

---

१ विखडले. २ स्वामींचे येथें.

*No. 87*] [*20-2-1760*

**श्री.**

पौ छ ९ रजबू सितैन

फाल्गून.

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब**
**स्वामीचे सेवेसी.**

विनंती सेवक रामचंद्र कृष्ण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ २ माहे रजब मा। लस्कर नवाब बसालतजंग नजीक कल्यान जाणौन माहाराजानी निजानदवैभवलेखनआज्ञा करीत असिले पाहिजे. यानंतर माहाराजानी श्रीमंत राजश्री नानासाहेब यास पत्र दिल्हे. त्याजवरोन वस्त्रे व पालखी वगैरे देऊन पत्रे लिहून दिल्ही की, यास तुम्हाकडे वकिलीस पाठविले आहेत. जो जाबसाल करीत जाल तो यासी करणे. ऐसीयास सेवक कूच दर कूच येऊन राजश्री नागो राम याच्या लस्करात कल्यानाहून साता कोसावर आहे. तेथे उतरलो. तो छ १ माहे मजकुरी च्यार घटी दिवस राहिला ते समई माहाराजाची पत्रे व खलिता नवाबास आला. ते पत्रे राजश्री नागो राम यानी दाखविली, व म्हणाले की, आताच जा व मुलाजमतहि करा; आनि सनदा द्यावयाविशई काय जाबसाल करितात? माहाराजानी लिहिले की जलद सनद करोन पाठवने. त्याजवरोन पाच राऊत समागमे घेऊन च्यार घटका रात्रीं नवाबाची भेट घेतली. पुढे नवाबा-जवळ सेवक आला नव्हता. तेव्हा राजश्री भवानजी ताकपीर व धोंडो आगदेव हे पाठविले होते. त्याचीहि मुलाजमत जाली होती. माहाराजानी लिहिले त्याप्रा। सविस्तर मजकूर केला. आणि सनद विजापूरची तयार करोन घेतली. आनी राजश्री नागो राम याजकडे राजश्री धोंडो आगदेव याचे हवाला करोन पाठविली. माहाराजास कलावे. कोनी मातबर मानूस सेवेसी पाठवितो म्हणोन बोलले. कोण मुकरर करून पाठवितात त्याप्रा। लिहीन. सविस्तर वर्तमान मागून लिहितो. येथे फौज तो सात हजार गाडदी व पाच हजार फौज गुलाम मोहेदिनखान व राजे ब्रिजनाथ व दोन हजार खाजगत येकून सात हजार श्वार आहेत. व तोफ बासष्ट आहेत. कलावे. येथे वर्तमान आहे कीं, सलाबतजंगाचे व याचे मानस येक आहे. याची त्याची भेट होणार. हे येका दो रोजानी कूच करोन सिरसीस तेहि येणार व हेहि जाणार. ऐसे वर्तमान आहे. पुढे जे होईल ते सेवेसी लिहीन. बहूत काये लिहीणे. हे विज्ञापना.

¶*Letter of Ramchandra Krishna to Bhausaheb acquainting him how the Nizam gave a pledge in writing to hand over Bijapur to the Marathas.*

No. 88] [20-2-1760]

# श्रीविठलराज.

छ ५ *जाखर सितैन

श्रीमंत महाराज राजश्री भाऊसाहेब
कृपासागर स्वामीचे सेवेसी.

आज्ञाधारक त्रिंबक जगंनाथ सां नमस्कार विज्ञापना ऐसीजे. येथील वर्तमान ता छ ४ माहे रजब मुकाम किले धारूर माहाराजांचे प्रतापे येथास्थित असे विशेष. छ ३ माहे मजकूरी राजश्री हणमंतराव निंबाळकर यांस येवनाकडे वकील आहेत त्यांची पत्रे आलीं. त्या * * * * * लिहिला आहे कीं चिंचोलीवर नवाबाचा मुकाम आहे * * * * * सल केली. येथूनच कूच करून अवसी याचे रोखे भागानगरास जानार आहेत. भालकीपर्यंत गेलियावर जाधवरायास निरोप देऊन आपण स्वस्थानास जावें. जाधवराव वकिलासी बोलले कीं राव येथें आले असते तरी त्यासी व नवाबासी आपन गोडी करून देतों. वकिलानी त्याचा जौब दिधला कीं आमचे येजमानाचे वाकडे काय आले कीं आपन गोडी करून द्यावी. पूर्वी नवाबास भीमातीरीं वेढा पडला होता त्या वर्षी आपन आले नव्होतेत. तैसेच राव धारूर पावतर आले. पुढे येयाचा प्रसंग दुर्घट देखिला. तेथेच मुकामात केले. हे वर्तमान ऐकून राव निंबाळकर वकिलाचे जौबसालावर बहुत समाधान पावले. व त्यांस उतर लिहून पाठविले कीं तुम्ही जाधवरायासी जौबसाल यथास्थित केला. छ मजकूरी राजश्री हणमंतराव निंबाळकर यांची मातोश्री व पांच कुटुंबे येथें येऊन पोहोचली. राजश्री लक्ष्मणराव खंडागळे हे येथे आहेत. माहाराजांचे सेवेसी विनंतीपत्र पाठविलें असे. त्याचीं उतरे यावयाची मार्गप्रतिक्षा करितात. राजश्री गणपतराव सबनीस व महिपतराव शंकर येथें आले. रायांची व त्यांची भेट करऊन त्यांचे समागमे राऊत देऊन वाटे लाविले. विशेष काय लिहिणे. हे विज्ञाप्ती.

¶*The writer gives some idea about the attitude of Nimbalker and Jadhao after the negotiations.*

---

* पैवस्तीचा महिना चुकीचा दिसतो.

पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद

# २

# पानिपत प्रकरण

१७४७-१७६१



[किंमत—२ रुपये ३ आणे किंवा ४ शिलिंग]

संपादक—गो. स. सरदेसाई, बी. ए.

गव्हर्न्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई
१९३०

## *"Maratha Operations in Northern India"* *with reference to* THE PANIPAT CAMPAIGN, 1747-1761

### 1. *Introduction*

The disaster of Panipat occurred on Wednesday 14th January 1761, but rightly observed from a true historical perspective, it appears as the result not of a day or a month, but as the legitimate consequence of the aggressive policy deliberately launched by the first Peshwa and strenuously pursued by his two eminent successors Bajirao I and Balajirao. This ambition of the Peshwas in aiming at what in common parlance is termed "Hindu-Pad-Padshahi", naturally brought them into conflict with the various potentates, who were holding sway between the river Nerbudda on the south and the Himalayan range in the north. The power of the Great Moghal received its final fatal blow at the hands of Nadirshah in the early months of 1739, after which the Emperor's existence became so precarious that he was entirely at the mercy of any invader of superior strength. The Peshwa for a time gave promise of being able to keep peace and order between the various warring elements; but the distractions of the Poona Government due to the intrigues of Tarabai and the Nizam after the death of Shahu, and its defective organization in point of unity of purpose and of command, came in the way of his ambitious policy being carried to success in the north, where he had practically to give a free hand to his trusted lieutenants Malharrao Holker and the Scindia brothers, Jayappa and Dattaji. Among other troubles within the Delhi empire were (1) the wars of succession started by the claimants to the thrones of Jaipur and Jodhpur and (2) the attempt of the Nawab Vazir of Oudh to put down the rising and rebellious Rohilla chiefs, who were a constant menace to his possession of Oudh. To complicate the situation still further, Ahmadshah, the Abdali King of Kabul, began frequently to repeat the *rôle* of his late master Nadirshah. In this way, the Rajput Princes, the Rohilla chiefs, the Vazirs of the Emperor's court and the conquering Marathas represented by various commanders often at variance with one another, all contributed to the development of events that culminated in Panipat, not to mention at the same time the Jat, the Bundela and other petty chieftains, who often threatened to cut the Maratha lines of communication with the south.

Students of history will thus realize, what a huge affair both in length of time and the range and complexity of its parts this Panipat episode was, and what amount and variety of detailed information is necessary before one can study it in all its bearings.

The unpublished papers here presented, numbering about 150, are neither exhaustive nor do they supply all the links of the various problems; but they certainly make a weighty contribution towards elucidating many of the events and transactions and render necessary a revision of our former judgments on many points.

### 2. *Factions in the Imperial Court*

The first four letters contain news of the emperor's Court sent to the Peshwa by his agents, the Hingne brothers. The Emperor, like all weak men, seems to have been wavering between two opposite forces, the

Muhammadan factions urging Nadirshah to come and save the Mughal Empire, and the rising power of the Marathas, who had been dictating terms at the gates of Delhi for over ten years. Raghoji Bhonsla had by his repeated invasions stopped the annual flow of revenue from Bengal into the Imperial treasury. Scindia and Holker had planted themselves firmly in Malwa and Rajputana. At the beginning of 1747 Nadirshah thus writes to the Mughal Emperor (No. 1): " It is now eight or nine years since I returned from India. You have not utilised this interval in improving your administration. Your officers do not obey you. They behave like independent lords. This has given the Marathas a free hand. With a loyal supporter like myself to stand by you, you can easily put your house in order. If you do not do it now, when will you do it? Put aside your pleasures for a while and start at once at the head of your forces. I will send you 25,000 troops under two able commanders; with their help you can in two years' time easily conquer the whole of the Deccan If you need my presence too, I am quite ready to come. Do not delay." This letter was couched in most ardent and affectionate terms. In the struggle for the gadi of Jaipur, Malharrao Holker fighting on the side of Ishwarsing, inflicted a crushing defeat on Madhosing. An important letter giving news of the suicide of Ishwarsing by poison and the subsequent atrocities inflicted on the Maratha forces by the Rajputs, supplies the missing link and explains how the Marathas and the Rajputs came to be so entirely estranged (No. 31).

*3. The Marathas enter the lists on behalf of Safdar-Jang*

The serious illness of Shahu and his eventual death at the end of 1749 called away Scindia and Holker to the south for a year. They returned with renewed vigour at the end of 1750 after receiving an urgent call from Vazir Safdar-Jang who had been paralysed by the activities of the insatiable Rohillas,—which are illustrated by numerous letters (Nos. 14, 19, 20-24).

Jayappa and Malharrao joined their forces in the beginning of 1751 and marched against the Rohillas. In their first encounter with them they inflicted a defeat on Sadulla Khan in March (No. 32). No paper detailing the further progress of this campaign has been so far discovered and there is a distinct gap for the next few years in our knowledge of the subject, although we know already that the Rohillas were completely routed near Farrukhabad.

*4. Raghunathrao and the Afgan menace*

The next important project undertaken by Scindia and Holker was to persuade Ghaziuddin, the eldest son of the Nizam, to proceed to the Deccan to claim his father's dominion. Ghaziuddin was, however, murdered at Aurangabad and the project failed. The Peshwa soon after despatched his brother the young Raghunathrao to settle the affairs of the north, which were gradually taking a bad turn for the Marathas owing to serious differences between Jayappa Scindia and Malharrao Holker (No. 35). The various alternatives suggested for solution and the consequent orders are contained in No. 39. The next few papers (Nos. 46, 47) refer to the

failure of Raghunathrao's expedition of 1755 and his sudden return to the south. Jayappa Scindia's entry into Marwar and his murder in June 1755 are subjects already well known and authenticated in history. The circumstances of his murder and the manner in which it was avenged are described in several letters (Nos. 48-56). Then followed a fierce struggle resulting from the invasion of India by Ahmadshah Abdali in the winter of 1756-57 (Nos. 68, 69, 71). His southern progress was, however, suddenly arrested by the stubborn Jats near Agra (No. 72) and he returned to his country in the summer, committing frightful atrocities on the way (No. 71). Thereupon the Rohilla Chief Najibkhan, who is described as a secret agent of the Abdali, is seen making overtures to Raghunathrao (No. 77). Affairs began to take a serious turn after Raghunathrao had left for the south, in the autumn of 1758, without having finally settled the affairs of Northern India. No. 88 contains a warning. The coming danger to the Maratha policy was foreseen and measures suggested for averting it (No. 89). Mismanagement of Maratha affairs becomes evident when responsible officers like Hingne and Antaji Mankeshwar came to be severely handled by the Peshwa (Nos. 91, 97, 98, 105). Najibkhan in the meantime was not idle ; he was for a long time creating mischief. But what we learn for the first time in these papers is (No. 103) that Abdali did not rashly enter into a conflict with the Marathas. He tried his utmost to come to some amicable and workable understanding with them. The Peshwa at Poona did not realise the gravity of the situation in the north, being engrossed in schemes for gathering money anyhow to pay his debts in the south. He should have realised that in the distracted condition of affairs he could hardly expect to get his coffers filled.

### 5. *The final struggle*

Raghunathrao's penetration into the extreme west of the Punjab as far as Attock in the summer of 1758, changed the whole situation. The Punjab had long been coveted by the Abdali, and if his officials had not been driven away by the Marathas, the Sutlaj would possibly have been fixed as dividing the spheres of influence of the Afgan and the Maratha powers and the dispute would possibly have been amicably settled. Dattaji Scindia again entered the Punjab and established his outposts in the west, so that it became a point of honour with both powers, the one to keep what was once conquered, the other to reclaim what was lost. The Abdali however was fully conscious of the Maratha strength and almost up to the last moment tried his utmost to come to an understanding with them. No. 106 contains an account of the first move of Abdali who sent his agent Yakub-Ali-Khan to Delhi during the monsoon of 1759 to settle matters in the Emperor's presence between all the contending parties, the Rohillas, the Rajputs, the Jats and others. Although this agent Yakub-Ali-Khan stayed in India for some two years on this mission, he was not able to achieve any tangible results (No. 108). It was unfortunate that the Peshwa himself, his brother and his cousin, who were mainly responsible for the general policy in the north, did not promptly proceed to Delhi to settle the affairs of the empire, into which a further disturbing factor was introduced by the growing estrangement between Scindia and Holker.

### 6. *The Peshwa's neglect*

With the fresh light thrown by these papers, one can fix the responsibility for the Panipat disaster primarily on the Peshwa himself, who was either fast losing his health or over-confident of his power or too much addicted to the pursuit of pleasure to spare his attention for graver concerns at a distance. Few men in the south realised the situation that was developing in Bhau's forces in the north, and no one heeded the warnings on this point uttered by smaller men like Hingne, Antaji Mankeshwar or Bundele. Gangoba Chandrachud and his master Malharrao Holker were the only ones who gave the alarm of the coming danger (No. 116), but the haughty Bhau, relying too much on the efficacy of the artillery of Ibrahim-Khan, sneered at them as cowards. Overtures for peace were, however, continued by both the parties throughout the period of hostility. Matters began to assume a serious aspect for Bhau even during his victorious entry into Delhi (No. 130); and Nana Fadnis himself sounds an ominous note of alarm in his letter of September 15, 1760 (No. 131). Naro Gangadhar Mujumdar's letter (No. 133) confirms the culpable negligence of the Peshwa even after he was fully informed of the awkward predicament of Bhau's forces in the Delhi region. The absurdities of rumour are illustrated by a letter which announces a victory for Bhau on the field of Panipat (No: 138). Nothing has been discovered in the records so far which could materially add to our present knowledge of the final stage of the struggle. Possibly all such communications were intercepted by the enemy. Abdali, even after the crushing Maratha rout on January 14, 1761, tried to effect an understanding with the Peshwa in the following June (No. 146). The death of the Peshwa (No. 147) in the same month brings the whole episode to its dismal close.

### 7. *Minor points extracted from the Peshwas' Diaries*

In addition to the letters so far produced a few striking extracts from the Peshwas' Diaries are collected together in the last number (No. 149), which clear several small doubtful points. Laxmibai, wife of Vishwasrao, who is commonly supposed to have gone with her husband to Panipat, is now proved to have lived at Trimbakeshwar with her relatives at the time of the battle. Several entries refer to the marriage of the Peshwa with Radhabai of the Vakhre family. The affair was being long considered at Sidhtek where the Peshwa spent some months. Many eligible girls were assembled for the Peshwa's inspection, of whom at least three were married on the occasion at Hiradpuri near Paithan, one by the Peshwa himself, another by Nilkanth Mahadeo Purandare, and the third by Vireshwar Dixit Manohar. The travelling expenses of the ladies, their dresses, their marriage festivities and the alms given away on the occasion, are all found entered in the Diaries. The entertainment of Abdali's agent Gulrai, the obsequies of Vishwasrao, the robes of honour sent to Abdali as a present, the visits paid by Malharrao Holker's wife Gautamabai and his young grandson to the Peshwa, returning to the south, Narayanrao's attack of small-pox, and the rewarding of Janoji Bhintada for having safely conducted Parvatibai back from Panipat, are some of the items of fresh information given here which students of history would value.

पाठविला. कोटेकरासहि ताकीद पत्रे लिहून दिधली जें, तुम्ही आपली मातबर फौज देऊन एकवाक्ये पुढे जावोन दरा बंद करावा. ताकिदीनें दिवाण पाटणास पाठविले. तोहि येऊन पावला. कोठ्याहून पाटण पावेतो पलीकडे चंबलेचे डेरे करून राहिले आहेत व खासा माधोजी जरीदा[१] पंधरासे रावतानशी रणथंबोरास पाह्यास जातो. म्हणून उणयारीचे मुकामाहून गढास गेले. करोलीचा राजा व शिवापूरकर गौड हे व रावराजा उमेदसिंग याचा पुत्र समागमे होते. त्यास करोलीकर तर रुखसत होऊन करोलीस गेला. इंद्रसिंग गौड सिवपूरकर यास पाटणचे मार्गातून परभारे सिवपूरची वाट धरली. उमेदसिंग रावराजाचे पुत्रास निरोप न देता समागमे घेऊन गेले. उमेदसिंगानेहि निश्चय हाच केला कीं कदाचित माधोसिंग विचारतील कीं पुत्र ठेऊन घेतल्यानें उमेदसिंग स्वाधीन राहील व सुभेदारास न भेटले तर मजला चार आहेत त्यांतून एक मेला तर चिंता नाहीं. सुभेदार चंबलातीरास पावले म्हणजे आपले जमियतेंत जाऊं.

¶*This important paper, of which the first paper is unfortunately lost, gives details of the complicated situation of Jaipur and Marwad with reference to Maratha movements.*

---

*No. 19*] [*26-9-1750*

**श्री.**

पौ २० जिल्काद

**राजश्री......पंतप्रधान साहेबाचे सेवेसी**

श्रीमंत सकल गुणालंकर्ण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य...स्नो मलारजी होळकर कृतानेक दंडवत विज्ञापना. येथील कुशल आस्वीन शुध सप्तमी मुकाम नजिक बेटावद पावेतों साहेबाच्या प्रतापें करून येथास्थित असे विशेष. कृपा करून पत्र पाठविलें तें छ ३ सवालीं पावोन बहुत संतोश जाहला. माळवे प्रांतें जाऊन जमीदार गिरासे यांजला नतिजा पाऊन तो पावेतों राजश्री जयाजी सिंदे याचीं रवानगी करितों. हेही येतील. आवघ्या फौजा येके जागां होऊन पुढें रजपूत राजे वजिराकडील व गुजरात प्रांतें जावयाचे येसीं राजकारणें उपयोगी पाहून करावीं. येसे कितेक प्रकारें पत्रीं आज्ञा केली. त्यास आम्हीं वाफगांवींहून निघालियासी दोन मास होत आले. राजश्री जयाजी शिंदे याचीं पथकें रवाना करणार. त्याची मार्गप्रतीक्षा केली. हिंदुस्थानचा कारभार भारी. तो भारीपणेंच करावा. अवघे येके जागां आसावें. त्यास राजश्री येमाजीपंताच्या

---

[१] एकटा.

कार्याकरितां. राजश्री जयाजी सिंदे यास तिकडे जावयाची आज्ञा केली. त्याचें पारपत्ये करणें कांहीं साहेबास विशेष नाहीं. येक्या पथकास आज्ञा केली तर जाऊन त्याचे पारपत्ये स्वामीच्या प्रतापेंकरून करिल. येक्या कामाकरितां कितेक कामें तटवावीं येसें नाहीं. राजश्री भाऊसाहेब प्रस्तुत तिकडे गेले तेव्हां तेथें कोन्हीं धम धरून डोई काढू सकतो येसें नाहीं. साहेबाच्या प्रतापें करून सर्व मनसबे कामें नीट होतात. तेथें येमाजीपंताचा लेखा काय आहे ? तथापि उपेक्षा कार्याची नाहीं. चाळणा करितच असावी. परंतु येकाच कार्यावर द्रिष्टी द्यावीसें नाहीं. हिंदुस्थानचा कारभार भारी याचाही विचार केला पाहिजे. येक वर्रास फौजा त्या प्रांतें न गेल्या. त्यामुळें कितेक रजपूत राजे मोगल व जमिदार फडी धरितात. त्यांजला नीट करून नक्ष राखून लाभालाभहि विचारला पाहिजे. विजयादशमीहि होत आली. याउपरी येखादीकडे जाऊन कामकाज जाले पाहिजे. राजे ईश्वरसिंग व रामसिंग उभयेतानीं कापट्यभाव चित्तांत आणून केशोरायासि मारिलें. त्याचें पारपत्ये करणें जरूर. दिलीकडील वजिराचें राजकारण, तसेंच गुजराथचा बंदोबस्त करणें येविसीं पत्रीं आज्ञा केली. त्यास साहेबाच्या प्रतापेंकरून जे जे उपयोगी राजकारणें ते विचारें करून करावयाची ते होतील. दसरा जाला. याउपरी फौज जमा होऊन कार्यभाग जाला पाहिजे. राजश्री जयाजी सिंदे याची मार्गप्रतीक्षा आजी पावेतों केली. प्रस्तुत साहेबीं आज्ञा केली कीं, त्यांजला दसरीयासी रवाना करितों. सत्वर आलिया उत्तम आहे. त्याचा गुता न होतां निरोप देऊन व आणखी पथकें पाठवावयाची येसी रवानगी सत्वर केली पाहिजे. *स्वामीनें पत्रीं मनसबियाचा विच्यार सविस्तर लिहिला, त्यास तो येथार्थच आहे. किरकोळ कामें तों स्वामीच्या पुण्यें करून सहजांतच आहेत. परंतु मातबर हा मनसबा आपल्यास उपयोगी भारीपणेंच केला पाहिजे. त्यास फौजा दोन्ही वगैरे पथकें आववीं येके जागां होऊन, युक्त उपयुक्त सारासार विचार करून, कार्यभाग केला पाहिजे, येविशीं आपण सर्वज्ञ आहेत. जो जो विच्यार मनसबा योजेळ तो शेवसीं लिहित जाऊन. साहेबीं वरचेवरि आज्ञापत्रीं बुधीवाद लिहित असिलें पाहिजे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

मोर्तब
सुद.

¶*Malharrao Holkar, who is sent by the Peshwa to settle the disputes of the Rajputs, writes to the Peshwa from Khandesh asking him to send Jayappa Sinde at once and not detain him for fear of Yamaji Shivdeo in the South. The foresight of Holkar and a real grasp of the situation are evident in this letter.*

No. 20] [September 1750

श्री

पुर्वणी श्रीमंत राजश्री......पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी

विनंती. दिलीकडील वर्तमान तर वजिरुलमुमालक यानी अंतरवेदींत जाऊन पठाणासी झुंज टाकिले. जाट वगैरे सर्व जमिदार हरावलीस पाठविले; व आपण मागून तयारींत राहिले. जाटावरी म्हणजे हरावली फौजेवर जवं जव गाठ पडत गेली तशी तशी वरचेवर यानी हरयेक सरदारासी त्यांचे कुमकेनिमित्य बिदा करीत गेले. येथवर की, कुल सरदार व फौजेनिशी पुढे दोनी कोसाचे तफावतीनें पावले. खुद पाच हजार स्वार टोपीपोश व इसहाकखान व वजीरजीचा पुत्र वगैरे खांसे खांसे डेऱ्यात राहिलें. जमिदार दगा करितील, पळ काहाडितील म्हणून यानी सर्वांसी पुढें दिधले; व आपण पुंस्तगर्मीस[1] राहिले. त्यासी त्यानी प्रथम मुन्हेमात्र[2] कांहींसी घेतली. जमीनदार सर्व एकमत होतेच. तन न दिधले. बनगडवाला रोहिलाहि ऐन समयात येऊन पावला. याजमुले हरावली फौजेवर येक मु॥ पठाणाही नमुदैकरून तमाम फौजेनिशी वजीरजी स * दा जाणून अरडून पडले. तोपखानियाकडील पिऊन हातघाई बरीशीच संभाळली. येथवर कीं, नवाब वजीरजीचा भाचा मिर्जा नसिरुदी महमद व नवाब इसहाकखान च्याहरुजा बकशी हे उभयेता मारिले, पडले. व नवाब वजीरजीचा माहावत ठार जाहला. सेवटीं वजीरजीहि स्वथा हाथीहुला (?) वजीरजीस गोली व तिराची जखम लागली. हाथी अवरेनासा जाहला. वजीरजीस मुर्छा आली. तेव्हा वरकड सरदारांच्यानें तग न धरवता चाल निघाली. तमाम फौज लुटीस पडली. हरोली फौजेस कललें की, पठाणाही पिछाडीवर जाऊन वजीरजीस मारून घेतलें. या रितीनें हंगामा होऊन तमाम फौजे गारत जाहली. खजाना व तोपखाना कूल विल्हे लागून चुकला. तेव्हा समागमचे मातबर होते त्याहीं पाहिलें कीं, वजीरजी तर मृत्यूप्राये जाहले. अतां पठाण गालेब[3]. मुडदाहि जाऊं देणार नाहीत. हर प्रकारे मुडद्यास तरी सलामत घेऊन निघावें, म्हणून कोलजलेसरचा किला समीप होता. तेथवर येऊन पावले. येक रात्री त्या ठिकाणी कमिली. तों प्रात:काली वजीरजी शुधीवर आले. बहुत काही प्राणत्यागीं हट धरिला. परंतु समागमच्यानी सावधता करून रक्षुन

---

१ मदत, राखीव फौज. २ सामना. ३ भारी.

जे कोणी फुटकर येत गेले, त्या सर्वांस येकवट केलें. हजार पांच सहा फौजेनिसी तेथून वजीरजीस मेघांडबरेंत घालून नीट दिलीस घेऊन आले. मग कललें की वजीरपुत्र[1] समागमे होते. यानी दगा करून लडाई बिघाडिली. सारांश, भावितव्यानरूप होऊन पठाणाची बाजी सरसी राहिली. तलावर तल येऊन केला. यांजकडील तमाम सरदार व फौज पलाली. पठाणाकडील सरदार बहूत मारिले पडले. येथाकिंचित दिलीस येऊन पावले. जखम अद्यापि बरी जाहली नाहीं. हवेली दाखल बादशाहजीनी बजिदीने[2] करविले. जखम बरी जाहल्यानंतर बादशाहजी येऊन घेऊन जाणार. अथवा हेच खुद मुलाजमती निमित्य जाणार. येवंच वजीरजीस तर हाच हट कीं मागती पठाणावर कमरबंदी करावी. याजकरितां खुद बादशाहजीसहि बाजीद आहेत. बादशाहजीही अंतस्ती अश्वासन दिधलें, व बाहियार्थी तुरानी यांचेहि मानस रक्षायास चुकत नाहीत. तुरानी तर परम प्रफुलित जाहले आहेत. परंतु वजीरसाहेब खजाना आहे. अद्यापिहि जाट वगैरे जे कोणी समागमचे शिकस्त खाऊन फिरून येऊन पावतात, त्यांसी खर्चास देऊन दिलासा दिलबारी करून नित्यानी फौजबंदी करितात; व स्थलोस्थली ताकीदपत्रेंहि पाठवितात; व बादशाहजीही फर्मान बोलावयाचे नवाब नासरजंग व मीर मनू लाहोरचा सुभेदार वगैरे या सर्वांसी पाठविले आहेत; व अंतस्ती पठाणाकडील अर्जदास्त तकसीर माफीचा येऊन पावला. त्याचीहि खातरजमा करितात. मिरबकशीजी इकडून जाऊन पावले. मुलाजमत जाहली. हाथी, घोडे व मोत्याची माल वगैरे भूशण वस्त्रे जे इनायेत करायाची ते करून बहूत कृपासी जाणविली. यांनीहि हलकाई पाहून तुरानीयांकडेच डौल दिधला आहे. तरी वजिराची इतकी बाजी खचली असतांहि सर्वांस वचक आहे. पेशखाना[3] तर बारापुल्यावर उभा राहिला असे. खजानियाची ममता न करावी म्हणून वरचेवर बादशाहजीस पूट देतात. पहावें इतकियावर काये घडोन येते. जाठहि हजूर जाणार आहे व पठाणाही तर कूल अंतरवेदींत काय (ल ?) इटावा वगैरे खालसा माहाल बादशाही या जिल्ह्यांत अमल दखल केला, व करितात; व जमिदाराही काबू जाणून सर्वांठाई दस्तदराजी[4] मांडली आहे. समये हंगामचा वृथा किमर्थ जाऊं द्यावा, म्हणून हर येकाही येथाशक्त प्रयेत्न मांडिला आहे. वजीरजी अपल्याकडील फौजेची व सरदारांची परम प्रतिक्षा अहिर्निश करितात. याचा विस्तार तर राजश्री बापूजी महादेव यांचे विनंती पत्रावरून सर्व सो श्रुत जाहलें असेल. येथेंहि जे कांहीं ऐकणेंत आले

---

१ कमरुद्दीन खानाचा मुलगा, इंतिजामुद्दोला (?) पहा म. वि. २ पृ. ३२८.

२ आग्रहानें. ३ युद्धोपयोगी डेरे वगैरे सामान. ४ जुलूम.

ते सां श्रुत व्हाया निमित्य विनंती केली असे. मागती जे कांही घडोन येईल तेहि विनंती करणेंत येईल. बहूत काये लिहिणे हे *विज्ञप्ती.

¶*Malharrao Holkar on his way to Delhi communicates to the Peshwa from Khandesh the news he had received of the defeat of the Vazier by the Rohillas and urges him to send Jayapa with reinforcements with all possible haste. The Peshwa in concert with Holkar and Scindia undertook this new venture in the North in the autumn of 1750.*

---

*No. 21*] [*26-9-1750*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री सुभेदार साहबांचे सेवेसी.**

पोष्य पंडे मुरारजी व नरेश्वर कृतानेक आशीर्वाद विनंती उपरी. येथील क्षेम तागाईत अश्विन शुद्ध ७ सोमेवासर[1] जाणौनु स्वामी यानी आपुलें स्वानंद लेखण आज्ञा करीत गेले पाहिजे विषेष. बहुत दिवस स्वामींकडील साकल्यवृत्त लेखण करून सेवकाचा परामृष न केला यास्तव चित्त चिंतनीं आहे. जेव्हां दर्शणाचा लाभ घडेल तो सुदिन असें. यानंतर, हस्तनापुर प्रांतींचें वर्तमान तर पठाणांनीं बहुत धूम उठविली. त्याजवर मनसुरअल्लीखानानें आपला बकसी नवलराये वीस हजार फौजेनसी पाठविला. लढाई जाली. बक्षीची फौज गारत जाली. मागाहून येक चेला दाहा हजार फौजेनें पाठविला, तोही शिकस्तीत आला. तेव्हां मनसुर-अल्लीखान खुद व जमियेत घेऊन पठानावर गेलेत. हरोली, सुरजमल जाट व हेमराज बक्षी निसबत इसरीसिंग यैसें उभयतां हरोल होते. परस्परें युध्यप्रसंग मातबर जालेंच. परंतु जय पठाणास आला; आणि मनसुरआलीखान गारत जाला. याप्रकारचें वर्तमान जालें. दुसरें सलाबतखान जयनगर प्रांतीं आला होता. त्यासी इसरीसिंगासी सुला जाला. सलाबतखान दिलीस गेला व ईसरी-सिंग जेपुरास आला व बख्तसिंग नागोरास गेला; व रामशिंग मिरचेस गेला. ऐसें वर्तमान जालें. आपणास कळावें म्हणऊन लिहिलें असें. सेवेसी विदित होय. आपण सेवक पदरींचे असों. आगमनाची प्रतिक्षा चातकन्यायें करितों. दर्शनाचा लाभ घडेल तो सुदिन असें. विशेष काये लिहिणें कृपा वृध करीत जाणें. विषेष काय लिहिणे हे विनंती.

¶*This letter describes the crushing defeat inflicted by the Rohillas upon Safdarjung, who being wounded was removed from the battle-field in an unconscious state and who was consequently believed at the time to have been killed.*

---

१ सौम्यवासर: बुधवार.

No. 22] [2-10-1750

श्री.

राजश्री......पंत प्रधान साहेबाचे सेवेसी.

ॐ श्रीमंत सकल गुणालंकर्ण आखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्नो मलारजी होळकर कृतानेक दंडवत विज्ञापना. येथील कुशल आस्वीन शुध त्रयोदसी मुकाम कसबे थालनेर पावेतो साहेबाच्या कृपावलोकनेकरून येथास्थित असे विशेष. कृपा करून आज्ञापत्र पाठविले ते पावोंन बहुत संतोश जाला. प्रस्तुत कोठे आहां, फौज कितेक जमा जाली, पुढे इंदुरी कितेक दिवस लागतील, मनसबा करावयाचा कोणता योजिला, ते सविस्तरें वरचेवर लिहीत जाणे, म्हणून आज्ञा केली. त्यास वाफगावीहून जलदी करून निघालों कीं फौज जमा करून च्यारी राजकारणे राखून उपयेगी ते करावे. यांस्तव त्वरेकरून खानदेश प्रांती आलो. राजश्री जयापा याची मार्गप्रतिक्षा करून मुकाम जाले. तो वर्तमान आले कीं रा॥ येमाजी सिवदेव याच्या पारपत्यास राजश्री जयापास तिकडे जावयास आज्ञा केली. तेव्हा ते आलिया पुढे जावे. याजकरितां मुकाम करून शेवेसी विनंती पत्रे पाठविली. त्याची आज्ञा केली की, दसरीयास त्याजला निरोप देऊन रवानगी करितो. दसराहि जाला. त्याची रवानगी इकडे सत्वर केली पाहिजे; व सरकारची पथके इकडे पाठवणार तेही पाठवावी. आमचीहि फौज जमा होत आली. वरचेवर लोक येतात. आलीकडील माळवे प्रांतीची कामे करावी. जमीदार गिरासे याजला नीट करावे. तो मागून हेहि येतील. येकत्र होऊन पुढे मनसबा करणें तो करावा, यैसे कितेक प्रकारे लिहिले होते. त्यास आलिकडील कामे सहजात होतील. हिंदुस्थानातील विचार मनास आणिला पाहिजे. तरी राजश्री जयापा यांची व पथकें पाठवण्याची त्याची रवानगी सत्वर जाली म्हणजे येके जागा होऊन च्यारी राजकारणे मनास आणून लाभालाभ विचारून करणे ते सर्व साहेबाच्या प्रतापे करून होतील. दिलीकडील वजीर खासा फौजसुधा तयार होऊन फरोखाबादे-समीप गेले. तिकडून रोहिले पठाण येकत्र होऊन चालून आले. याचा त्याचा विसा कोसाचा तफावत आहे. मुकाबला होणार, यैसे वर्तमान आहे. आपणाकडील फौज न्यावी, यैसा त्याचा मनोगत विशेष आहे. तैसेच राजे रजपुत व बकसी येकत्र जाले, त्यांचाहि गुंज बलावणार. ये गोस्टीस आपला जमाव फौज येकत्र होऊन उपयेगी मनसबा तिकडे डोल देऊन करणे ते करावे. गुजराथ प्रांते जावयाचा मनसबा तोहि आधी करणे, कार्याची गोस्टी आहे. आवघें येकत्र जालिया उतम दिसेल ते करून. परंतु सर्व फौज येकत्र जमा असली आणि सर्वांच्या शहावर जवळ असिलें म्हणीजे जेथे लाभकाळ दिसेल तिकडेच राजकारण

करून. येसा विचार आहे. यास्तव्य साहेबीं वारंवार आज्ञापत्रें व फौजाची रवानगी करावी. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Malharrao Holkar urges the Peshwa to despatch Jayappa Sinde to the North. The latter was engaged in the fight against the Pratinidhi at Sangola. The letter breathes a spirit of renewed vigour and ambition infused by the Peshwa, now freed from the shackles of a wavering master.*

---

ले. *23*] [*8-10-1750*

**श्री.**

**राजश्री......पंतप्रधान साहेबाचे सेवेसी**

श्रीमंत सकळ गुणाळंकर्ण अखंडितलक्ष्मी आळंकृत राजमान्य...स्नो॥ मलारजी होळकर कृतानेक दंडवत विज्ञापना. येथील कुशळ आस्विन वद्य पंचमी मुकाम कसबे सेंधवे साहेबाच्या कृपावलोकनेंकरून येथास्थित आसे विशेष. थालनेरच्या मुकामीहून शेवेसी विनंती पत्रें पाठविलीं आहेत. प्रविष्ट होऊन आर्थ श्रुत जाला आसेल हिंदुस्थानाकडील वर्तमान पठाणाही नवलराय याजला मारिलें, त्यावरून बळावलेच होते. त्यास नवाब मनसूरआलीखान यानी तमाम पातशाही तोफखाना रिसाला व आमीर तैनातीस घेऊन पठाणांवर चाळोन गेले. कमरूदीखान याचा लेक मिरबाका व सेरजंग आणखी उमराव दिलीचे समागमें घेऊन गेले. कुंवर सुरजमल जाट हारोळीस[1] होते. राजे ईश्वरसिंग याजकडील हेमराज बक्षीहि पांचा हजारानसी सामील होते. त्यास पठाणहि गंगेच्या दक्षण तीरींच होते. याचा त्याचा मुकाबला महूसमसाबादेवरते बारा कोस सोरामच्या घाटानजीक सिताकुंडापासीं जाला. छ २१ सवालीं याचा त्याचा युद्ध प्रसंग प्राथाकाळापासून तिसरा प्रहर पावेतों तोफखाना बाण जेजाळाचे जालें. नवाबाच्या हरोलीस जाट होते. पहिले दिवसीं जाटाचें कामकाज जालें. त्यामुळें नवाजीस[2] होऊन पुढें जाले. तिकडे पठाणाही बेहडांचे[3] मोर्चे धरून मार देत होते. यैसें तोफखानियाचें युद्ध जालें. तेव्हां पठाणांही निवड करून पायेउतारा होऊन सा सात हजारानसी चालोन घेऊन जाटासी गांठ घातली. बाण बहुत, तेणेंकरून आधी मार केला; मग तरवारेचें जुंज जालें. तीन च्यारसें जाटाकडील तेथें कामास आले. तैसेच पठाणाकडीलहि तीनसें कामास आले. ते समई जाटानी सिकस्त खाऊन निघाले. पुढें टोपीवाले होते. त्यांची गांठ पडली. टोपीवालियानी कांहीं दम धरिला नाहीं. घर सोडून

---

१ आघाडी. २ तारीफ. ३ अडचणीची जागा.

वाव दिला. नवाबाचें लश्कर पाठीमागें होतें. त्याचा पळ सुटला. टोपीवालेहि पळों लागले. खासी फौज नवाबाची त्यास पठाणांसी युद्ध जालें. ते समईं नवाबाकडील हिसाबखान मातबर होता, तो कामास आला. तैसाच इस्मालखान चेलाहि कामास आला. आणखी महमद आदाखां व महमद जमाखां व घासडेकर बहादुरसिंग पिता पुत्र व खान दैजराचा लेक व चूडामण जाटाचा पुत्र महकुमसिंग व बलोच दोन सरदार व बळुजाट व त्याचा पुतन्या यैसे कामास आले. आणखी लोक बहुत मारले गेले व घायाळ जाले. पठाणाही निकट बहुत केली. नवाबाची¹ फौज अस्ताव्यस्त जाली. तेव्हां नवाब हतीवरून उतरून घोडीयावर बसले. पठाणाही दाटी करून खासा नवाबास तीर व गोली लागोन तिसरे तरवारेच्या जखमेकरून तेथेंच कामास आले. मिरबाका व सेरजंग दोन्ही बाजूस दोवे होते. ते फितव्यांत होते. त्याजकडे गोली बाण चालली नाहीं. नवाब कामास येतांच तेथून पळोन दिलीस आले. सुरजमल जाट व हेमराज बकर्सी हेहि निघोन जरारे येमुना · उतरोन आले म्हणतात. आद्यापि ठीक नाहीं. पठाणाची फत्ते जाली. तमाम लष्कर तोफखाना त्यानी लुटून घेतला. उमदे उमदे लोक कामास आले. नवाबाकडे फौज भारी होती; परंतु येकदील नवते. फितुरामुळें यैसी गोष्टी जाली. प्रस्तुत अवघी इमारत वजिरावरच होती. आमीर थोर होता. पुढें पाहावें, पठाण दिलीस येऊन रुजू होतात कीं त्याच्या मुलुकांत सिरून बंदोबस्त करितात. याउपरी वजिरी कोणास होते. सलाबतखान आजमेरीस होते, तेही दरकूच गेले. राजे ईश्वरसिंग जैपुरास दाखल जाले. रामसिंग मेडत्यास आहेत. दिलीकडील कारभार अवघा नवा होणार. कोणे प्रकारें बंदोबस्त होतो, पठाण पुढें काये करणार, जैसें वर्तमान येईल ते सेवेसीं लिहून पाठवूं. याप्रसंगीं आपली फौज पुढें शहास असावी. राजश्री जयापाचीं व पथकें आणखी रवाना करावयाचीं त्याची रवानगी सत्वर केली पाहिजे. आवघे येके जागा होऊन पुढें गेलिया जैसा जैसा विचार मनसवा उपयोगीं देखूं तो करून. *सेवेसी लिहून पाठऊ सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

मोर्तब
सुद.

¶*Malharrao Holkar sends information to the Peshwa about the reverse that the Vazir had sustained at the hands of the Rohillas.*

---

* याठिकाणीं मल्हाररावाचा शिक्का आहे.    १ सफदरजंग.

No. 24] [October (?) 1750

**श्री.**

शेवेसी विज्ञापना. श्रीमत राजश्री भाऊ सातारियाकडे गेले. तेथील बंदोबस्त कोणे प्रकारे जाला ? करवीरवासी राजश्री याजकडील काये वर्तमान ? राजश्री येमाजीपंत याचा बंदोबस्त कोणे प्रकारे जाला ? ते सविस्तरे आज्ञापत्रीं लिहिले पाहिजे. हिंदुस्थानातहि बखेडा जागा जागा जाला. मनसूरआलीखान कामास आले. याजकरितां प्रस्तुत नवाच कारभार होणार. आपली फौज शहावर पुढें कोणी नाहीं. याजकरिता सारी फौज येके जागा होऊन पुढे जावें. मग जैसा मनसबा पडल, आपला उपयोगी, तो करावा. दसराहि जाला आणि दिपवाली आली. या दिवसात शहावर काहीम राहून जैसा मनसबा योजून येईल, तो विचारे करून करणें, तो करावा. सर्व खावंदाचा प्रताप आहे. राजश्री जयापाची रवानगी सत्वर केली पाहिजे. *शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

मोर्तब सुद.

¶*Malharrao Holkar writes to the Peshwa to despatch Jayapa Scindia urgently to the North. He was at Sangola with Sadashivrao Bhau.*

---

No. 25] [1750 (?)

**श्री.**

**राजश्री महादाजीपंत गोंसावी यासी**

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री मल्हारजी होळकर दंडवत विनंति उपरी. येथील कुशल जाणऊन स्वकीये कुशल लिहित असिलें पाहिजे विशेष. राजश्री त्रिंबक विनायेक याजला पूर्वी पत्र लिहिलें होतें. पत्रार्थ आपणापासी त्यानी निवेदन केलाच असेल. त्याचे प्रतिउत्तर अद्याप देत नाही. राजश्री राणाजीकडून * * * * * व गोविंद कृष्ण आपली पत्रें माधोसिंगाच्या राजकारणाची आणली, त्यावरून वचन प्रमाण देऊन खामखा कार्ये करोन द्यावे, पैका घ्यावा यैसा निश्चये. त्यासी राजश्री बावा * * * * जी पावेतो सोसिलें; परंतु येक खावंदाचे काम बुडवावें आणि आपला लौकिक करून दाखवावा, यैसा अभिमान तेथे येके विचारें होऊन

---

* पत्र मल्हारराव होळकराचें.

Ca 51—6 

खावंदाचें कार्य कैसे होऊन येईल ? हे काम तो मातबर. येथील प्रसंग या प्रकारचा. यैसे जाणून श्रीमंत स्वामीच्या पत्रीं सविस्तरे लिहिलें आहे ते अक्षरशाह ध्यानास आणून स्वहिताची गोष्ट जाणून खामखा हे राजकारण करून पैका घेणे. यैसे उत्तर आलिया कार्ये करितों. बुधेलखंडचे काम विल्हे लागोन पुढे माधोसिंगाच्याच राजकारणास लागतो. तो पावेतो आपलेहि उतर येईल. खावंदाचे श्वहित जाणूनच हे कार्ये खामखां करणे आहे. केवळ दुराग्रह करून नाश * * यैसे नाही. आपले कार्ये होऊन * * * यस्थास्थित वर्ततील यैसे करितों. आमचेविसी आपल्यापासी दर्शऊन सदरें घातली आहेत कीं उग्याच हाचवांगेपणाच्या गोस्टी, लटकिया, येकहि राजकारण खरें नाहीं यैसे बोलतात. रा बा * * * दुराग्रहपणाची ते कोट * * * धवी. आम्ही राजकारण आणावे ते लटके करून दाखवावे यैसा अभिमान. त्यासी हे राजकारण खरे करून पैका घ्यावा हे सिध आहे. आण प्रर्चातीस आणून देतो. केवळ आम्ही श्वहित म्हणून आग्रह करीत नाहीं. खावंदाचें काम श्वहिताचे देखोन करितों. यैसे असतां रा बावाचाच आग्रह सेवटास न्यावा, आण आमचा अपमान करावा यैसे उतमात गोस्टी नाहीं. येक खावदाचे स्वहित जाणुन विस्तारें लिहिलें आहे. यामधें उचित ते करावें. * राजश्री गंगाधरपंत व रामाजीपंत यानी आपणास पत्र लिहिले आहे, त्यावरून सर्व आर्थ ध्यानास आणून उतर पाठविलें पाहिजे. लोभाची वृधी करावी हे विनंति.

*¶Malharrao Holkar writes to Mahadoba Purandare details of his dealings with Madhosingh and other Rajput kings. Gangadharpant is Chandrachud and Ramajipant is the Scindia's Diwan appointed in 1750. The inner intrigues mentioned in the letter deserve to be cleared.*

---

*No. 26]* *[7-11-1750*

**श्री.**

**श्रीमंत महाराज राजश्री......भाऊसाहेब स्वामींचे शेवेसी.**

विनंति सेवक अंताजी माणकेश्वर, कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचें वर्तमान तागायत कार्तीक वद्य ५ पंचमी, मुक्काम खिचीवाडा, येथास्थित असें विशेष. राजश्री लक्ष्मण शंकर अद्यापि सुरंजेसच आहेत. आम्हाकडील फौज पांच सातशें जागां जागां त्यांनीं मार्गेच रवाना केली आणि आम्हांस सांगितलें कीं, खिचींसी आम्हांस कजिया करावयाविसीं श्रीमंतांची आज्ञा आहे. तरी आम्ही सुरंजेस आहों. तुम्ही आपले फौजेनिशीं खिचीवाडियात जाऊन त्यांसीं कजिया करण. झुंज भांडण करणें. म्हणजे तो वकील आम्हांकडे पाठवून

देऊन आमचे मतलब करून देईल. त्यांचें आज्ञेप्रमाणें खिचीवाड्यांत येऊन खिचीचा आमचा कजियाहि बहुत जाला. शेवटीं खिचीचे वकील येऊन, राजश्री लक्ष्मणपंताची रजावंदी जाली. मग लक्ष्मणपंताचीं पत्रें आलीं. त्याजवरून आजी खिचीवाड्यांतून कूच करून कचनारचे सराईस आलों. एकादों दिवसां लक्ष्मणपंत सुरंजेहून येणार. मग दरकूच राजश्री नारो शंकर यांजकडे जाऊन, मोठचें[१] ठाणें आधी फत्ते करून, मग पुढें बुंधेलखंडांत जाऊन. राजश्री बापूजी बाजीराव अद्यापी कालपीसच आहेत. स्वामींचीं आज्ञापत्रें त्यांस आलीं कीं, तुम्हीहि सहा महिने तिकडेच राहणें. हे गोष्टी फार उत्तम आहे. हिंदुस्थानांत फौज असावी हें फार उत्तम आहे. स्वामींचीं आज्ञापत्रें बानवर पारभोंरी येथिल जागीरदार पातशाई चोपदार यांचे विषयीं आली. ज्याप्रमाणें सातारा करार केला आहे, त्याप्रमाणें सात हजार रुपये मात्र घेणें. जाजती उपसर्ग न लावणें; व गोपाळपंत कमाविसदार दूर करून, दुसरा कमाविसदार ठेवणें; व मौजे अंबरोलची गढी तुम्ही दलेलसिंग गुजर यांजला देऊन, त्यांजपासून रुपये ६००० सहा हजार नजराणा घेतला. यैसें वर्तमान विठ्ठल सिवदेव यांनीं सांगितलें. तरी तुम्हांस सहा हजार रुपये घेऊन, गढी गुजरास घ्यावयासी प्रयोजन काये? या उपरी सहा हजार रुपये दलेलसिंगाचे माघारे देऊन, मौजे अंबरोलची गढी खालीं करून चोपदारांचे हवालीं करणें. दरबारीं बोलतां एक, त्याप्रमाणें वर्तत नाहीं हें गोष्टीं उत्तम नाहीं, म्हणोन विशादें लिहिलें. याप्रमाणें श्रीमंतांनीं व राजश्री बाबांनीं व राजश्री रामचंद्र बाबांनीं फजीत करून लिहिलें. यैसीयासी विठ्ठल पंतांनीं जें सांगितलें असेल तें प्रमाण. ते सरदार आहेत. स्वामींपाशीं सांगितलें असेल तें प्रमाणच सांगितलें असेल. आम्ही सहा हजार रुपये घेऊन, गढी दिल्ही असिली, अगर एक रुपया घेऊन दिल्ही असिली, अथवा फुका तऱ्ही दिल्ही असिली तरी हे गोष्टी तिलतुल्य जाली; तरी या सरंजामांतून स्वामींनीं दूर करावें, आणि सरकारचे गुन्हेगार व परस्परें चोपदार पातशाई लिहितील सेवेसी व सरकारचे जासूद जोडी हुजरून आली आहे ती सांगेल. आम्ही देशास गेलियाउपरी विठ्ठलपंतांनीं दलेलसिंग गुजरास आम्हांकडून फोडून, त्यांस पालखी देऊन, आमचे गांव बळाऊन, त्यांत नवी गढी बांधोन, त्यांस पाठीशीं घातला. त्यास आम्हांकडील बाबूराऊ कांहीं बोलावयासी लागले तरी यांची पाठ त्यांस जबरदस्त. विलाज नाहीं. आम्ही दूर देशीं. विठ्ठलराऊ संनिध. त्याहीमध्यें दरबारीं त्यांची मातबरी. ते जें जें सांगतील तें प्रमाणच आहे. आमची मातबरी सर्व स्वामींचे पाये आहेत. विठ्ठलपंत देशीं येऊन अदावत आम्हाविशीं नाना

---

१ मोठ=झांशीच्या ई० मैल ३०.

प्रकारची करीतील, हे विनंति मी पूर्वी सेवेशी केलीच होती. स्वामींनी अश्वासन दिल्हेंच होतें कीं, तुमचा त्यांचा हमेशा कजिया आहे, आम्ही कांहीं त्यांचें सांगवीवरी जाणार (नाहीं,) येसें अश्वासन दिल्हें आहे. त्याजवरून आम्ही बेफिकीर आहों. आज्ञेप्रमाणें सात हजार रुपयेच घेऊन, गोपाळपंत कमाविसदार पहिला दूर करून, दुसरा ब्राह्मण तेथें ठेवून. चोपदारांचा राजीनामा मागाहून सरकारच्या जासुदासमागमें पाठवून देतों. अंबरोलची गढी मातबर बांधली आहे. खंदक भारी केला आहे. तो कांहीं सुप्रवर्ती गढी देत नाहीं. परंतु स्वामींचे आज्ञेप्रमाणें गढीस मोर्चे सुरूंग लावून गढी घेऊन चोपदारांचे हवालीं करून. परंतु हीं कामें करावयासी दोन महिने पाहिजे. येका दिवसानें होत नाहीं. परंतु अंतर सर्वथा पडों देणार नाहीं. आम्ही सेवेशी बोलावें एक, मागें करावें एक ऐसें सेवकाचें सामर्थ्य काये आहे? विठ्ठलपंतांचें सांगीवरून स्वामींनीं इतराजी केली. फार अथवा थोडा पैका तो स्वामींचा. स्वामींची आज्ञा उलंघावयासी प्रयोजन काये आहे? राजश्री मल्हारजी होलकर यांस मनसूरअलीखान वजीर यांचीं पत्रें आलीं आहेत कीं, मातबर फौजेनिशीं सत्वर सामील होणें. जो मुद्दा असेल तो करून देतों. त्याजवरून त्यांचीं पत्रें आम्हांस आलीं आहेत. वरकडांसहि आलीं आहेत कीं, येऊन सामील होणें. याजकरतां मल्हारराऊ यांचीं पत्रें आलीं आहेत. सेवेशी विदित होय. राजश्री बापूजी बाजीराव यांस सहा महिने राहावयाची आज्ञा केली. फार उत्तम गोष्ट जाली. पूर्वी स्वामीची आज्ञाच होती कीं, जरी करितां बापूजी बाजीराव त्याप्रांतें राहिलेच, तरी आम्हांस लिहिणें. आम्ही बापूस लेहून पाठवून तुम्हीं व बापू मिळोन लक्ष्मणपंतांचीं कामें वरचेवरी करून, तुमचा सरंजाम सोडवणें. येसियासी प्रस्तुत बापू इकडे राहिलेंच आहेत. स्वामींनीं एक पत्र राजश्री बापूंस पाठवून द्यावें कीं, तुम्ही व राजश्री अंताजीपंत मिळोन, अंताजीपंतांचा सरंजाम सुरळीत करणें. याप्रमाणें राजश्री लक्ष्मणपंत यांस एक पत्र द्यावें जे, तुमचीं कामेंकाजें सत्वर उरकून घेऊन, बापूंस व अंताजीपंतास निरोप चार महिने अंताजीपंतांच्या सरंजामांत जावयासी देणें म्हणून, पत्र एक लक्ष्मणपंतास व एक बापूंस जरूर पाठवून द्यावें. हेंहि काम सरकारचें स्वामींचेंच आहे. कदाचित् स्वामी म्हणतील कीं, राजश्री मल्हारजी होळकरच त्याप्रांतें आले तरी त्यांस सामील होणें, म्हणजे ते सरंजामाचें काम करून देतील. तरी ते कांहीं काम राजश्री सुभेदार करून देत नाहींत व त्यांस फावत नाहीं. उलटें आम्हांस व बापूंस जमा करून नेतील. येसीयासी आम्हांस व बापूंस राजश्री सुभेदारांनीं मोठें कामासहि नेलें तरी तिकडील चाकरी करून येऊन. व राजश्री लक्ष्मणपंतांचाहि बोभाट कामाचा उरकून राहूं

देणार नाहीं. परंतु उरल्याच दिवसांत तऱ्ही बापू व आम्ही मिळोन आमच्या सरंजामांत जाऊन. याजकरितां सेवकाची विनंति उदास न करावी. येणेंप्रमाणें तीन कागद अगत्यरूप पाठवावे. एक बापूजी बाजीराव यांस जें :—अंताजीपंताच्या सरंजामांत जाऊन तुम्हीं व ते मिळोन अंमल बसवणें व राजश्री मल्हारजीबावांस एक पत्र जें :—तुमचें थोरले काम जालियाउपरी राजश्री अंताजी माणकेश्वर यांच्या सरंजामाचा अंमल बसऊन देणें, यैसीं दोन पत्रें जरूर पाठवून द्यावी. मग जैसा जैसा कामाचा रंग पडेल, तैसेंच आम्ही वर्तों. परंतु हीं दोनीं पत्रें पाठवावीं व लक्ष्मण शंकर यांस दोन पत्रें पाठवावीं जें :—तुमचें कामकाज आटोपून घेऊन, राजश्री बापू व अंताजीपंतांस ग्वालियेर प्रांतास जावयासी चार महिने निरोप देणें, म्हणून पत्रें जरूर द्यावीं. आमच्या रोजमरीयाची नेमणूक राजश्री लक्ष्मणपंतावरी अखेर कार्तिकमासपरियेंत आहे. पुढें नेमणूक नाहीं. तरी पुढील रोजमरीयाची सनद पाठवावयासी स्वामी समर्थ आहेत. विनंति उदास न कीजे. विनंतिपत्र सविस्तर वांचून आज्ञा केली पाहिजे. सेवकांचें कुरण मौजे भिंवरीस आहे, तें सरकारांत घेणार म्हणऊन यैकिलें. त्याजवरून मागें दोन वेळा विनंति पत्रें सेवेशीं लिहिलीं होतीं. तरी कृपाळु होऊन, सेवकाचें कुरणाची मोकळचिठी देविली पाहिजे व सालाबाद-प्रमाणें वराता व शेतसनदा आमच्या देविल्या पाहिजेत. व कोठीचें दस्तक व लांकडे आणावयाचें दस्तक देविलें पाहिजे. हरएकविशीं विनंति तीर्थस्वरूप हरीपंत करतील ते उदास न करावी. विठ्ठलपंत कसबा ग्वाल्हेर येथिल फौजदारीचा अम्मल आजी दोन वरशें दरोबस्त खातात. स्वामींनीं ताकीदपत्रें तीन चार दिल्हीं, परंतु न मानलीं. व जमीदारांच्या नांवें ताकीदपत्रें दिल्हीं तें आम्हांपाशीं आहेत. शहर त्यांचें आमचें समाईक, मुकासा निमेनिम असतां फौजदारी त्यांनींच खावी हें उत्तम नाहीं. त्यांची फौज या प्रांतीं होती. आतां आम्हांस अंमल बसावयासी फौजदारीचा शहरांत अगादी काये आहे? परंतु स्वामींची आज्ञापत्राचीं वाट पाहतों. ऐसा कलह आपल्यांत आपण वाढवावा यैसें नाहीं. तेथें विठ्ठलपंत आहेत. स्वामींनीं कृपाळु होऊन त्यांस ताकीद करून त्यांचे मामलेदारांस ताकीद खामखा पाठवावी. जें मागें जालें तें उत्तम जालें. आतां तऱ्ही मुकाशाप्रमाणें फौजदारीचा अंमल निमेनीम चालवावा. येविशीं आपण हैगै केली तरी सरकतीचें दुःख एक प्रकारचें आहे. स्वामी मायेबाप आहेत. मायेबापास थोरलहान लेकरें सारखींच असतात. आपणच हैगै केली तरी आम्ही तुडवणीस पडतों. याजकरितां विनंति वारंवार लिहितों. सालगुदस्ता दोन वरसांची छावणी हिंदुस्थानची करून घरास आलों. तसेंच सातारां

फौजेनिशीं दाहा महिने राहिलों. सातारांहून आलियाउपरी सवेच इकडे आलों. याजकरितां आगोटीस सेवकास पायांपाशीं यावयाची आज्ञा केली पाहिजे. माझा संवसार बहुत उणा पडिला आहे. तो अर्थ राजश्री सखारामपंत निवेदन करीतील. माझा अंगिकार केला आहे, त्याप्रमाणें सेवकाची विनंति ऐकोन विनंति प्रमाणें आज्ञा केली पाहिजे. विनंति उदास न कीजे. राजश्री विठ्ठलपंतांची इतराजी आम्हांवरी आहे हें स्वामी जाणतच आहेत. नेमणुके खेरीज दोनशें सिलेदार, स्वार आहेत व पागा सरकारची मातबरच जाली आहे. त्याची कांहीं नेमणूक नाहीं. सर्व अर्थ ध्यानांत आणावयासी स्वामी समर्थ आहेत. पत्र सविस्तर लिहिल्यावरी आतांच राजश्री नारोशंकर यांचीं पत्रें आलीं. मोटेचें ठाणें खालीं करून घेतलें. कामरगांवच्या मुकाशियासाठीं वणजारे मागती उत्पात राजद्वारीं करणार आहेत. याजकरितां सेवेशीं लिहिलें आहे. स्वामींनीं राजश्री नानांस व गोविंदरायांसी वरचेवरी लिहावें जे. कामरगांव सरकारांत पहिल्यापासून मुकासा पिलाजी जाधव यांस होतांच. मध्यें वणजारी यांस दिल्हा होता. राजश्री मृत्यु पावलियाउपरी वणजाराहि मेला. त्याजवरून गांव खालशास ठेवून अंताजीपंताकडे दिला आहे. पुन्हां वणजारा सातारां चिंतामण गुरव व लखमोजी खोजे यांचे हातें उत्पात करितात. तरी खोजे यास गुरवास ताकीद करून, वणजारे फजीत पावत यैसें करणे म्हणून सातारां राजश्री नानांस व गोविंदरायांस पत्र लिहावयासी स्वामी समर्थ आहेत. स्वामींनीं गांवांस रोखा करून खंडणी हुजुरून करून घ्यावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*The writer Antaji Mankeshwar, one of the Peshwa's Sardars acting in the North, seems more free with his pen than with his sword. The details he gives will, however, help the reader much in clearing the general situation of the Marathas in the North.*

---

*No. 27]* *[28-11-1750*

## श्रीगजानन

श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे शेवेसी. विनंती सेवक नारो शंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम वर्तमान स्वामीचे प्रतापेंकरून ता छ ९ मोहरमपावेतों कुशल असे. बहुत दिवस जाले. कृपापत्र पाठऊन सेवकाचा परामर्श न केला. याकरितां चित्त सापेक्षित असे. कृपा करून सांभाल केला पाहिजे. या प्रांतचे वर्तमान तरी वोडसे प्रांतचे हरामखोर सर्व येकत्र होऊन कुंवर भुपालसिंग राजे याचा कनिष्ट नातू यास सिरउर्पेस्छाई[1] पुढें करून

---

१ अग्रेसर.

खरगापुरवाले व उंझ्यानवाले व पलेरा व कठोर व धमना वगैरे पवार धंदेरे तीन च्यार सहस्र पांवलोक व पांचसातसे स्वार जमा होऊन दुंडी केली. वोडशाचे राज्याचा मुलुक ताराज केला. व सरकार खालशाचें गांव मउ-राणीपुरा कुरेछा वगैरे प्रांतचे चालिस पनास गांव मारून मुलकांत बखेडा बहुतच केला. देसीं नाना प्रकारची वर्तमान व पठाणाचे युध्याच्या लबाडीच्या अवाई उठऊन धूम केली. यामुळें सरकारचें नुकसान जालें. राजियास तों यवज येणें ठिकाणच नाहीसें केलें. मागील टोकपैकीं राजियाने निकाल करून मुलकांत यवज नेमून दिल्हा तो गर्दीस मेलविला. तेव्हां आम्ही फरोकाबाद प्रांतें होतों हें वर्तमान येकून या प्रांतें आलों. तों दिवस बरसांतीचे, यामुळें जागाजागा फौजा पाठविल्या. बंदोबस्त केला. तरी च्यार महिने दंगाच राहिला. उपरांतिक दसरा जाल्यावर राजियास समागमें घेऊन मुलकांत गेलों. हरामखोरांस परागंदा करून राजियाचे मुलकाचा व सरकारच्या मुलकाचा बंदोबस्त करूनं कुंवर भुपालसिंगास शाशन करून ठिकाणी ठेविलें. तो मागती राजश्री सरदारांची पत्रें आली कीं, पठाणानी बल केलें आहे, फौजे सहवर्तमान सत्वर येणें. त्याजवरून तिकडें दरमजल जावयाचा विचार केला. तों राजे पृथ्विसिंग यास वेथा जाली. सवेंच देवलोक जाले. राणी सुधां आकरा स्त्रियानी सहगमन केलें. मागती नवा मनसबा निर्माण जाला. तेव्हां कुंवर सांवतसिंग यांस राजतिलक मार्गशीर्ष शुध १० दशमीस सर्व राज्यांचे मतें जाला. सरकारचा नजराणा येणें प्रमाणें करार ठराविला. यैन पंचाहत्तर हजार, कारकुनीचे पंधरा हजार व मशारनलेस हती सिरपाव सरकारातून द्यावा त्याचे दाहा हजार येकूण येक लक्ष रुा ठराविले. यवजाचा विचार त्याचे घरचा कललाच आहे. दोन तीन सालांत राज्यांतून तजवीज करून घ्यावा, तेव्हां वसुलांत येईल. याप्रमाणें इकडील बंदोबस्त करून दरमजल राजश्री सरदारांकडे जात असों. राजे सांवतसिंग यास सिरपाव वस्त्रें पाठवावी. हती सरकारांतूनच दिल्हा, तरी दाहा हजार रुा नुकसान होणार नाहीं. नाहीं तरी रुा द्यावे लागतील. ये विषई आज्ञा कर्तव्य ते करावी. वस्त्रें व खातरजमेचें पत्र राजे मजकुरास पाठवावयास आज्ञा करावी. बहुत काय लिहिणे. कृपा सेवकावरी करीत असावे हे विज्ञापना.

*¶Naro Shankar writes to Bhausaheb at Poona how he has been exacting Maratha dues in Bundelkhand. He has been called away by the Holkar and the Scindia to join them at Delhi for helping the Vazir against the Rohillas.*

No. 28]  [10-2-1751

श्री

सेवेसी रामाजी अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम ताा छ २४ रविलावल येथास्थित असे विशेष. स्वामीची आज्ञा घेऊन आलो त्या दिवसापासून आज्ञेप्रमाणे राजश्री जयाजी सिंदे आपा यांचे आज्ञेप्रमाणे वर्तोन सुखरूप आहों. येथील सविस्तर अर्थ राजश्री आपासाहेबी लिहिला आहे, त्याजवरून विदित होईल. वजिराकडील वकील राजे जिगलकिसोर व दिवाण रामनारायेण आले आहेत. बोली होत आहे. राजश्री मल्हारजी बावाची मर्जी वजिराकडेच जाण्याची दिसते. बोली ठीक जाहाल्यावरी जातील. राजश्री आपा व राजश्री सुभेदार येकाचित आहेत. सेवेसी कलावें याजकारितां विनंती लिहिली आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

¶*Ramaji Anant Dabholkar, who replaced Ramchandra Baba in the Diwanship of the Scindias, accompanied Jayappa to Delhi, whence he writes this letter.*

---

No. 29]  [15-2-1751

श्री

श्रीमंत राजश्री...........पंतप्रधान.

स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक गोविंद बलाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. तागाईत फाल्गुन शुद्ध प्रतिपदा पावेतों स्वामीचें कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. स्वामीचें आज्ञापत्र सादर जालें. सावकाराच्या तीन लक्ष वीस हजारांच्या वराता केल्या आहेत. तो यैवज वराते प्रमाणें ज्यांचा त्यास पावता करणें म्हणून आज्ञा. त्यास सरकारी यैवज देणें हें खरें. परंतु ईकडील विचार मोठा कठीण जाला आहे. येक तों चहुंकडे कजिया आणि स्वस्ताई वहुत; गल्यास कोणी घेत नाहीं; त्याजमुळें रयतेकडील पैसा येईना. कर्ज काढावें तर कजियामुळें सावकारांनीं तमाम दुकानें बंद केलीं. हुंडी तिलमात्र होत नाहीं, आणि कोणी कर्जेहि देईना. मोठें कठीण यंदाचें वरीस आहे. निभाऊन घेणार स्वामी धणी आहेत. पठाणाकडील वर्तमान तर पठाणांनीं श्रीप्रयागास जाऊन शहर लुटलें, जाळिलें. बंदमेवशी करून श्रीगंगेस पूल बांधोन

काशी क्षेत्रास उपद्रव द्यावयासी जाणार. या प्रांतीं चहुंकडे कजियाच आहे. तमाम जमीदार रजवाडे यांच्या नजरा फिरल्या आहेत. राजश्री मल्हारराउ होळकर यांचें लस्करी आम्हाकडील बाबूराव विष्णु सरकारी यैवजाच्या वसुलास (गेले आहेत). त्याणी जैनगरचें सविस्तर वर्तमान आम्हास (लिहिलें.) त्या पत्राची नकल करून स्वामीकडे पाठविली आहे. त्याजवरून सेवेसी निवेदन होईल. जयेनगरीं कजिया जाला. त्याजवरून तमाम रजवाडे भूमिये लबाडीस आले म्हणतात जे, रजपुतांनीं मराठे बहुत मारिलें आणि पलविलें. असा प्रसंग आहे. श्रीकाशीहून पत्रें आजीं आलीं जे, शहरावर पठाण जातात; पुढें ईश्वर काये करील पाहावें. राजे माधोसिंग जाले. हे बहुतच दुर्बुध्दि निघाले, विश्वासघातकी निघाले. पुढें तेहि जमाव करीत आहेत. पैसा सुरक्षित द्यावा. राजीं बसविलें. सर्वस्वी अंगिकार केला. हें तिलमात्र चित्तांत न आलें. बेइमानीवरच नजर दिली. बंगालियाकडील वर्तमान तर राजश्री रघोजी भोंसले यांजकडील फौज त्या प्रांतीं होती. कांहीं नवीहि फौज ईकडून गेली व पठाणहि तेथें सामील होते. ते हे सर्व मिलोन मकसुदाबादप्रांतें येऊन कजिया केला आहे. आलावर्दीखान आजारी आहे. वर्षभर आजारी आहे. बहुतच क्षीण आहे. वरकड वर्तमान लिहावेसें नाहीं. रजवाडे भूमिया आपले आपले जांगा हरामजादगिरी करीत आहेत. मनसुबे नाना प्रकारें करितात. त्यास स्वामीचे पुण्यप्रताप समर्थ आहे. वर्तमान सेवेसी लिहिलें आहे. वरचेवर होत जाईल तें सेवेसी लिहित जाऊन. सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

---

*No. 30*] [*19-2-1751*

**श्री**

श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक गोविंद बल्लाल कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. तागायत फालगून शुा ९ पावेतों स्वामीचे कृपावलोकनेंकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. अंतरवेदीकडील वर्तमान तर पठाण आपले फौजेनसी श्रीप्रयागास जाऊन शहर लुटले, जालिले, मदमेवसी केली. तेथून पुढें श्री कासीक्षेत्रास उपद्रव द्यावयासी जाणार. या प्रांती तमाम जमीदार रजवाडियाच्या नजरा फिरल्या आहेत, देहावर नाहींत. तिकडे जयनगराकडे माधोसिंगानेंहि कांहीं बेइमानीसी केली आहे. चहूंकडे कजियाच दिसतो आणि स्वस्ताई बहुत.

गल्यास कोणी पुसत नाहीं. सावकारानीं तो जेथील तेथें दुकानें बंद केली. कोणी हुंडी एक पैशाची करीत नाहींत. गला स्वस्त, त्याजमुळें रयतेकडील पैसा येईना. गुदस्ताची बाकी व साल मजकूरचा पैसा यावा. त्यामध्यें अद्यापि चौथाई पैसा वसूल जाला नाहीं. कोणी पैसा देइनात. गांवाचा गांव पलतो. रयतेकडील पैसा येईना. साहूकारी कर्ज काढावे तरी चहूंकडे कजिये. त्याजकरितां सावकारहि कोणी कर्ज देइना. आणि अशामधें स्वामीनी सावकाराच्या वगैरे तीन चार लक्षाच्या वराता केल्या आहेत. इकडील वर्तमान तो या प्रकारचे. सरकारी एवज देणे हे तों खरेच. परंतु यंदाचे वरीस मोठे कठीण आहे. स्वामी निभाऊन घेतील तर स्थित राहील. वरकड सविस्तर वर्तमान चिरंजिव बाबूराव याजला लिहिले आहे. ते सेवेसी विनंति करतील. अम्हाकडील बाबूराव विष्णू राजश्री मल्हारराऊ होलकर यांचे लष्करी सरकारी ऐवजाचे वसुलास आहेत. त्याणी जैयनगरचे सविस्तर वर्तमान आम्हास लिहिलेल्या पत्राची नक्कल करून पाठविली आहे. त्याजवरून सेवेसी निवेदन होईल. यंदा स्वस्ताई बहुत जाली. एक पैशाचा जिन्नस विकत नाहीं. त्याजमुळें इलाज नाहीं. मार्ग कोचमनवर प्रांतीचे मुतलख बंद जाले. जकाती बुडाली. मोठे नुकसान आहे. कोणेही इलाजे पैसा मिलत नाहीं. स्वामी धनी आहेत. ज्यामध्यें स्थित राहे ते स्वामी करतील तरीच आब राहेल. रयतेकडील पैसा चार रोज येत नवता, तर सावकारीयांत हुंडी अगर नगद कर्ज मिलत होते. यास दोनी समये येकदां जाले असा प्रसंग आहे. आम्ही कधी याप्रकारे स्वामीस लिहिले नव्हते. दक्षणेंत कजिया; हिंदुस्थानांत कजीया; याजमुले सावकारीयांत एकंदर काम चालत नाहीं. आहे वर्तमान सेवेसी लिहिले आहे. वरचेवर होत जाईल ते लिहित जाऊन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. श्रीमंत राजश्री नाना स्वामी व आपण खासा उभयेताची रात्रंदिवस चौकी उत्तम प्रकारे असो द्यावी. दहा वीस माणुस जवल इतबारी असो द्यावे. सारांश सावधानी उत्तम प्रकारे असो द्यावी. मोठ मोठे रजपूत ब्राम्हणभक्त त्याचा विश्वास राहिला नाहीं. याजकरितां विनंति लिहिली आहे. स्वामी तो सावध आहेत. परंतु आपले राज्यांत दरबार सहज आहे. याजकरितां बहुत सावधानी करावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govindpant Bundele reports in the two letters to Bhausaheb about the unsettled conditions in the Doab. He says : The Rohillas have plundered Allahabad (Prayag) and are marching on Benares. People are flying into jungles. Collection of revenues has become impossible. Commerce has received a set-back.*

*No. 31*] [*21-2-1751*

**श्री**

पत्र आलें त्याची नकल.

**श्रीमत राजश्री गोविंदपंत**

**स्वामीचे सेवेसीं**

सेवक बाबूराव विष्णू साष्टांग नमस्कार विनंती उपरि. येथील वर्तमान तागायत माघ शुध ७ मुकाम जयनगर लस्करांत सुखरूप आहों. तुम्हांपासून स्वार जाहलों ते मजल दरमजल मार्गसीर्ष शुध १ दाखल लस्कर नजिक मुकुंदबारी येक मजल तेथें राजश्री सुभेदारांच्या[1] व तात्यांच्या भेटी जाहल्या. पत्रें श्रीमंताची व आपलीं दिधलीं. वर्तमान साद्यंत सांगितलें. त्याणी उत्तर दिधलें कीं, येथें वराता अलाहिदा अल्या आहेत. विष्णू माहादेव येक लाख पंधरा हजाराच्या आहेत. व अंताजी शंकर दोन लाख व आणखी साठी हजाराच्या येैशा वरात परस्परें आम्हांवरी आल्या आहेत. मागती तुम्हांकडे यैवज देविला. आम्ही सांगितलें कीं, तीन लाख रुपये आम्ही भरून दिधले. आम्हावरी वराता या यैवजीं पंतावरी केल्या. त्याणी यैवज पंतापासून घेतला. याजकरितां तुम्हापासी आम्हांस पाठविलें. ते म्हणो लागले कीं उत्तम, यैवज तुम्हांस देऊं, नेनवेपावेतो चला, तेथें तुमची वाट करून देऊं. यैसे सुभेदार आपले रुबरू बोलिले. मग मजल दरमजल मार्गसीर्ष शुध ११ येकादशीस नेनवे यास आले. तेथें मोर्चे लाविले. तिसरे दिवशीं येऊन भेटले. ठाणे याच्या हवाला केलें. तेथें बाईको राजियाची होती, ती बाहिर काढून दिधली. तेथें ठाणे याणी आपले बसविले. परगणा मातबर आहे. बुंदीकर कमाविसदार बाळाजी शामराज यांच्या हवाला केलें. दाहा रोज मुकाम होता. तेथेंहि दोन तीन वेळां हटकिलें. परंतु यैवज नाहीं. कमाविसदारापासून रसद घेऊन द्यावी तों कमाविसदाराचेच रुपये दोन दोन लाख निवतात. याजकरितां आम्हांस म्हणाले कीं, तुम्हास येवज........जैनगर प्रांतीं गेल्यावर देऊं........ नेनवे याहून मजल दरमजल जैनगरास चालिले. दोन तीन मजली जैनगर राहिलें, तों राजियास वर्तमान कळलें. त्याणीं वकील व याचा..........गणेश माळीं राजे यानें दोन लाख रुपये देऊन पाठविलें. त्याची भेट जाली. सुभेदार इतराज जाहाले. कांहीं केल्या न यैकत. मजल दरमजल चालिले. वकिलांही लेहून पाठविले कीं हे यैकत नाहीं. केशवदास मारिला त्याचा सूड आपणांस

---

१ मल्हारराव होळकर व गंगाधर तात्या चद्रचूड यांच्या.

घेणें आहे, यैसें लेहून पाठविलें. राजियाचे कारभारी जुने घरीं बैसले होते. हरगोविंद व विद्याधर दोघे राजियापासीं गेले कीं सुभेदार येतात. फौज आपली आणावी, बाहिर जाऊन लडाई करावी, अगर गावातून लडाई करावयाची असेल तरी मोर्चेबंदी करावी. तोफा बुरजेबुरूज ठेवावी, यैसें उभयेतानी सांगितलें. त्याजवरी इतराज राजा जाहला. त्याचे कारभारी नवे माहावत व येक नाहावी त्याजला बोलाविलें कीं, सुभेदाराच्या चित्तांत कीं केशवदास आपण मारिला, त्याचा सूड घेणार. याजकरितां तुम्ही सुभेदारापासीं जाऊन गोष्टमातें[1] करणें; च्यार पांच लाख रुपये मागतील तर देऊन वाटेस लावणें, यैसें दोघां कारभारी यासी सांगितलें. कारभारी म्हणाले कीं आम्ही येकंदर न जाऊं. आम्हास तो मारील. तुम्ही आपले हाते मारणें, परंतु आम्हांस तिकडे न पाठवणें. मग राजा उगाच राहिला. संध्याकाल जाहला. वर्तमान यैकिलें कीं सुभेदार येथून दाहा कोसावर आले. खिजमतदारास सांगितलें कीं काला नाग जित आणवणें व सोमलखार घेऊन येणे. औषध करणे आहे. त्याणी आणून दिल्हें. दोन प्रहर रात्रीस जहर राजे याणे घेतलें. नाग अंगास डसविले. पहाटे ईश्वरसिंग राजा याचा प्राण गेला. तिवी बाईकानी जहर घेतले. व येक कलावतिण इणे जहर घेतलें. यैसे चार बाईका व राजा यैसे जहर घेऊन प्राण दिधले. हें कोणास शहरांत टावकें नाहीं व कारभारी यांसीहि ठाऊक नाहीं. येक खिजमतगारास मात्र ठाऊकें होतें. पौष वद्य १२ सुक्रवार[2] प्रहर दिवसा फौज खंडेराऊ[3] व गंगाधरपंत तात्या (चंद्रचूड) नगरावर गेले. सुभेदार व बुनगें तीन कोसावरी मागें राहिले. दोन प्रहर पावेतों कोण्ही गोले टाकिले नाहींत. फौज बाहिर उभी. कारभारी राजीयासी गेले कीं माहाराज फौज बाहेर येऊन लागली, आपण अजून निजलेसे काय? म्हणून उठवावयास लागले तों खिजमतगार म्हणाला कीं माहाराजानें यैसें कर्म केलें. मग आकांत शहरांत जाहला. जुने कारभारी हरगोविंद व विद्याधर याणी थांबाथांब शाहरांत करून मग बाहिर भेटीस आले. उभयतांस भेटले. सुभेदारासहि सांगोन पाठविलें. तिसरा प्रहरास कूच करून शाहराजवळ फौज सुधां राहिले. पाहावयास माणसें पाठविलीं, तों खरेंच जाहालें. मग याणी चौकीया दरवाज्यावर जागजागी ठेविलें. राजमंदिरीं चौकी ठेविली. राजेयाचा मुरदा च्यारी प्रहर दिवसपर्यंत होता. मग सुभेदारानी कारभारी आपले मातब्बर दोघे पाठऊन व सेला पाठऊन अगिनडाव दिधला. तीन बाईका व येक कलावंतीण यैसें जलालें. दुसरीया

१ गोष्टी करणें.

२ वार चूक असावा असें वाटतें. गुरवारला नवमी आहे असे पत्रांत आलें आहे. द्वादशी रविवारीं येते.

३ होळकर.

दिवशीं राजेयाचे हवेलीतून चौक्या बसविल्या आणि इकडे माधोसिंगास सांडणी-स्वार पाठविला. पत्र पाठविलें कीं जलदीनें येऊन पोहचणें आणि इकडे हरगोविंद व विद्याधर सुभेदारापासीं येऊन बहुत रदबदल करून शाहरचा व राजियाचे आपेश तुम्ही माथां न घेणे, राज्य भारी आहे, याची स्थापना करावी. मग सुभेदाराचे चितास येऊन जागजागा चौकिया बसविल्या होत्या. खंडणीचा करार करून चौक्या उठविल्या. यैसा करार मदार होऊन च्यार रोज जाहले. राज्याची येक राणी व वीस कलावंतीणी तेहि सती पडल्या. रुपयाच्या वसुलास लागले. तो माधोसिंग पंधरावे रोजीं आला. सुभेदार पुढें जाऊन भेटले. येक हतीवर उभयता बसले. तैसेच गावात जाऊन त्याच्या हवेलींत घातलें. सुभेदार माघारे आले. माधोसिंग आल्यावरी आठवे रोजीं राजश्री जायाजी सिंदेहि आले. आपण दोन तीन वेला सुभेदारास * त्यांस विचारिलें कीं आमच्या यैवजाची वाट काय ? तिकडे पंतास निकड लागली आहे, वरातावर वराता होतात, आमची वाट काय ? त्याणी सांगितलें कीं हे रुपये वसूल होतील, यांतून रुपये हुंडिया करून तुम्हांस रवाना करूं. यैसें उत्तर दिल्हें. आणप्रमाण केलें. वसुलास लागले. इताकियांत माधोसिंग याची फौज दाहा पंधरा हजार आली होती. सेखावन वगैर लोक जमाव जाल्यावर त्याची नजर फिरली. मग कुविद्या धरिली कीं सुभेदारास व जायाजी शिंदे यास जेवावयास करावें. अन्न अवघें विखाचें करावें. दाहा पांच हजार खासे होतील यांस जेऊं घालावें आणि मारावें यैसे केलें. यांजला बहुत प्रकारें विनंति केली. सुभेदार कबूल जाहले. जायापानी गोष्ट उडविली कीं, आपण येकंदर जात नाहीं. तुम्ही जाल तरी जा, परंतु आपण येकंदर जाणार नाहीं. मग राहिले. त्याणे पाच सात दिवस पकवाने केली होतीं. त्यांत अवघे वीख घातलें. पाणियांत वीख घातलें आणि ब्राम्हणांस पेढे विखाचे केले. सोमलखार दोन मण घेतला होता. यैसा प्रसंग केला होता. ईश्वरें सरदारांस वांचविलें. जायापानें मोडा घातला. व उमेदासिंग बुंदीवाले याणें मोडा घातला मग त्याणे अन्न मातीत पुरलें. याजला खबर नाहीं. दुसरे रोजीं दुसरा विचार केला कीं, गंगाधरपंत व आणखी कारभारी बोलाऊन आणून येथें मारावें. पहिले जात असत. दोन च्यार दिवस गावांत राहात असत. याजकरितां बोलाऊं पाठविलें. दरवाजेयावरी ताकीद केली कीं, चौघांच्या पालख्या येतील, आम्हांकडे येऊं देणे, मग शाहरचे दरवाजे लावणे. यैसे करार करून याजला बोलाऊं पाठविलें. त्याजला सांगोन पाठविलें कीं आपण प्रहर दिवसांत येतों. तैसेच जायाजी सिंदे याजकडे गेले. तिकडे संध्याकाल पावेतों लागला. शाहरांत लोक दाहा पांच हजारी माणूस शहर पाहावयासी व उंटें व घोडीं........सूत द्यावयासी

जात असत. ते दिवशीं जायाजी शिंदे यांजकडील खासे फार शहरांत गेले. च्यार पालखियाचे सरदार बसोन गेले. यांणी म्हटलें कीं ताल्या आले वर्तमान रा * सांगितलें. दरवाजे लाविले. माघ वद्य ९ रोजीं गुरूवासरीं राजियाचा हुकूम जाला कीं महराठे लोक अले कतल, यैसें सांगोन अगोदर लोकांस विसारत होती. होतांच राजा उठोन माडीवर जाऊन बसला. शहरचे दरवाजे लावले. दोन प्रहरापासून आपलेकडील माणसें मारीत होते. तों प्रहर रात्रपर्यंत माणूस कापिलें. तीन हजार माणूस कापलें व येक हजार माणूस जखमी जाहलें. जायापाकडील मातबर मातबर सरदार नामांकित हजार व सिपाय व चाकर वगैरे सुभेदाराकडील मातबर पंचविस व चाकर वगैरे हजार दीड हजार व ब्राम्हण शंभर व बटकी व पेंढारी व मुलें यैसें कापून काहडलीं. जखमी जे आले ते कितेक मरतात. सें पनास माणूस वगैरे कितेक जे गावांत वाचलें तितकें मात्र आलें. गांवकुसावरून उड्या घाळून आले. त्याचे पाय मोडले व कमर मोडले. कितेक वांचोन आले. यैसा कहर शहरांत केला. येक हजार घोडे भलभले चांगले बसोन गेले होते तितकेहि गेले. सोनीयाची कडीं व मोतीयाच्या जोड्या व पैका वस्तभाव घ्यावयास गेले. इतके मानूस गेले. सुमार नाहीं. मारले फार गेले. त्यास जायाजी शिंदे याजकडील मातबर सरदार वगैरे फार मारले गेले. आमचा उंट दाडगे याणी नेला. मल्हारवाचे उंट ६ व सिलेदाराचे पांच व आमचा येक येकूण बारा चारा आणावयासी गेले होते. ते येके दिवशीं चांगले ओझे पडले याजकरितां बुधवारीं उंट आणावयास गेलों. गांवात उंट विकत घेऊन संध्याकाळीं आलों. गुरूवारीं भोजन करून उंटाच्या सरंजामासाठीं गावात जीन ठेऊन जात होतो. त्यास ईश्वरे काये बुधी दिली ते राहिलों. सरंजामासाठीं आमचा बारगीर व मल्हारजी जासुद सरकारचा गेला होता. तो दोघे मारले गेले. यैसें वर्तमान जाहलें. आमचें मरण; तुमचे पुण्येकरून वांचलों. मार्ग चालत नाहीं. कासीद देखील वाटेने मारले जातात. यैसें चौकडून रान नासलें आहे. याजकरितां तुम्हाकडे मानसें पाठवावयास अनुकूल पडलें नाहीं. गुरूवारीं पौष वद्य ९ रोजीं यैसा विचार जाला. शनवारीं शाहरापासून कूच करून आलिकडे तीन च्यार कोस येऊन राहिले. त्याचा वकील कर्नाराम व गणेशमाली याचा वकील व गोविंद तिमाजी वकील माहादभटाचा, यैसे गावातून आले. त्याणी कितेक प्रकारे समजाविले कीं आम्हांपासून गोष्ट जाली नाहीं. पोरासोरी जाहाली. जे जाहाली ते उत्तम. परंतु आतां कांहीं ते गोष्ट येत नाहीं. मारले गेले ते गेले.

पुढं सला करावा. याणी पाहिलें तों रान भारी...................खिलें इलाज उपाय चालेनासा जाहला. * जागा शहरे व गांव मातबर, जवल येऊं देणें नाहीं. यैसे प्रसंग पाहोन कबूल केलें कीं घोडीं द्यावीं. जे वस्तभाव गेली आहे त्याचा खंड घ्यावा व जे खंडणी पहिली केली * * यैसी सावकारी निशा करून देणें आणि आपण कूच करून जातों. वकिलाणी कबूल करून गावात जाऊन राजियास सांगितलें. आज उद्यां आज उद्यां करितां पंधरा दिवस जाहाले कीं आम्ही येतों, निशा करून देतों. रोज कागद येतात, परंतु त्याचा चित्तांत दगाबाजी आहे. सुधेपणें देत नाहीं. हे तो आशेस गुतले. पाहावें. आठा रोजांत काम काज उरकून कूच करून मजल दरमजल मनसूर[१] आलीकडे जावें. वकील येऊन बैसले आहेत, त्याजकडे जावयास उतावेल जाहाले. परंतु येथें आटकाव जाहला. याजकरितां विलाज नाहीं. पांचा साता दिवसांत तह बसला. सावकारी निशा जाली. तरी लवकरच येमुनातीर प्रांतीं येतील. नाहीं तरी दोन महिने अटकाव होईल. लक्ष वाटे तह बसेल, चिंता नाहीं. पुरवी राजा मेला ते वेलेस पंचवीस तीस हती व पनास पावणसें घोडीं राजियाची आणिली आहेत. लस्करांत माहागाई तांदूल रुपयास च्यार शेर व तेल दोन सेर व तूप दीडसेर व पीठ रुपयास आठ शेर, दाणा च्यार पाईली सातु आहेत. येणेंप्रमाणें धारण आहे. रस्ता येऊं पावत नाहीं. लुटीचे दाणें येका दों दिवसीं येतात. येखादे दिवशीं येत नाहींत. यैसा प्रसंग आहे. मिरखान तुम्हाकडे आले म्हणोन सुभेदार सांगत होते. आपण लिहिलें कीं हा कालपर्यंत आले नाहीं. भगवंतानें मोठे येश सुभेदारांस दिधलें होतें. आतां अपेश आलें याजकरितां परमश्रमी आहे. देशामध्यें गडबड यैकितों. नासरजंगहि वारले. सत्यमिथ्य ठाऊक नाहीं. सुभेदाराचा कारभार वोढगस्त आहे, देऊं म्हणतात, यैवज हातास आलेवर वाट होईल. जैनगरचा यैवज आला तरी वाट सत्वर होईल. नाहीं तरी मग मनसूरआलीकडे काय होईल तें पाहावें. येथील प्रसंग या प्रकारचा आहे. यैवज (तिकडेच) देऊं म्हणतात. हातास येईल तेव्हां खरें. येथील काम काज उरकून आगरेप्रातीं जाणार आहेत. बहुत काय लिहिणें. कृपा लोभ असों दीजे हे विज्ञापना.

¶*An important news-letter addressed to Govindpant Bundele by his accountant Baburao Vishnu from the camp of Malharrao Holkar and Jayapa Scinde in the vicinity of Jaipur. The letter mentions the circumstances of the suicide of Ishwarsing and the horrid murders perpetrated upon the Maratha forces by orders of Madhosing. In this can be traced the enmity which the Marathas and Rajputs bore to each other.*

---

१ सफदरजंग.

No. 32] [23-3-1751

## श्रीशंकर.

श्रीमंत राजश्री......भाऊ
स्वामीचे सो

विनंती सेवक दामोदर माहादेव व पुरुषोत्तम माहादेव कृतानेक सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ ६ माहे जमादिलवल मुकाम लस्कर नवाब वजीर व सरदार जिले अंतरवेद नजीक काळी नदी स्वामीच्या कृपावलोकने यथास्थित असे विशेष. जळेश्वराच्या मुकामीहून विनंती पत्र सो पाठविले आहे त्यावरून सविस्तर श्रुत हो(ईल). शादीलखां पठाण, अहमदखां बंगाशाचा मातबर सरदार, सिकंदऱ्या प्रांती चौ हजारा रावतांसीं व चौं हजार प्याद्यांनसी राहात होता. तो सरदारानी फौजा पाठऊन मोडिला. मुख्य अहमदखां बंगश प्रयागास लागला होता. तो फरुखाबादेकडे परतून येतो. नवाब वजीर व सरदार त्यास मारायास दरकूच जातात. हें सविस्तर वर्तमान श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे पत्री लिहिले आहे. त्यावरून [पुढील सुमारें चार पांच ओळी मजकूर फाटण्यांत गेला आहे.]

¶*Rohilla commander Shadilkhan was defeated by the Marathas.*

---

No. 33] [Aug. 1752

## श्री.

राजश्री समेसर बहादुर गोसावी यांसी.

ᘓ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य...स्नो। सखाराम भगवंत रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावें. विशेष राजश्री विठल सिवदेव याची फौज व राजश्री गंगोबा तात्या कडील त्यांवहाने वगैरे फौज व हुजरातची पथके बाबुराव हरी व सेट्याजी आइतोळे व कुकाजी सिवराम व महादजी खंडेराव वगैरे आजी पार उतरले. आम्ही व गाजदी-खान वजीर यापारीच आहो. आपण तिकडून जलदी यावयाचे करावें. उसीर न लावावा.

---

* का. सं. प. या. ८५ वरून गाजुदीनखान सिंदे होळकरसहित दिल्लीहून नर्मदेवर आला. त्या वेळचें पत्र. बरोबरच्या सरदारांची नांवनिशी आहे. बाबूराव हरी गुप्ते सखाराम हरीचा भाऊ.

No. 34] [5-3-1753

श्री.

श्रीमंत राजश्री......पंत प्रधान

स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक जयाजी सिंदे, कृतानेक विज्ञापना. सेवकाचें वर्तमान तागायत छ २९ रबिलाकरपर्यंत येथास्थित असे विशेष. आज्ञापत्र पाठविलें तें सादर जाहालें. तुम्ही पुण्याहून चांभारगोंद्यास गेला. तेथें किती दिवस राहून माळव्यांत जाणार तें लिहिणें. फौजेची समजाविस करून सत्वर जाणें म्हणोन आज्ञा, तर फौजेची समजाविस होत आहे. बहुतकरून जाली. राहिले लोक त्याची समजाविस करून फाल्गुन वद्य ५ पंचमीस कूच करून हिंदुस्थान प्रांतें जातो. आथ:पर घरीं बहुत दिवस राहत नाहीं. राणाजीकडून प्राप्त फार थोडी आहे. जाताना गरमनरम होऊन पाचालाखाचा पटा घ्यावा, हें चित्तामधेंच राहिला आहे. त्याचा निमे मुलुक झर (जर ?) कोण घ्यावे म्हणोन आज्ञा तर दोही गोष्टीचें पारपत्य करावयाचें अगाध काय आहे? आजतागायत कोणाच्या आश्रियानें राहिलें आहेत हें सर्व आपण जाणतच आहेत. उभयेताचें पारपत्य चित्तापासून करणेंच आहे तर आज्ञा करावी. जें होणें तें स्वामीच्या प्रतापेंकरून होऊन येईल. श्रीमंत राजश्री दादासाहेबास उचित मनसबा दिसेल ते लिहित जाणें म्हणोन आज्ञा केली तर आम्ही हिंदुस्थान प्रांतें गेल्यावर तिकडे जसा मनसबा अढळेल तैसा त्यास लेहून पाठऊं. आपण त्यास लेहून पाठवावें कीं, तुम्हांस विनंतिपत्र लेहून पाठवितील तें कार्य चितावर धरून करणें म्हणजे सर्वहि गोष्टी होऊन येतील. आम्हास जसी श्रीमंत राजश्री दादासाहेब आज्ञा करितील त्या प्रमाणेंच वर्तणूक करूं. येविसीं येक दोन वेळ त्यास लेहून पाठवावें. शाहाबादेचेविसीं लिहिलें तर शह पडल्यास काम करून घेऊं इकडील वर्तमान श्रीमंत राजश्री रावसाहेबीं[१] लिहिलें आहे, त्यावरून श्रृत होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Jayappa Scindia to Peshwa from Shrigonda reports that he would soon proceed to the North and join Raghoba. It seems Vishwasrao was with Jayappa.*

---

१ विश्वासरांव.

*No. 35]* *[3-10-1753*

पौ छ ४ सफर

**श्रीशंकर.**

सेवेसी विज्ञापना. येथील मजकूर तरी राजश्री खंडेराव होलकर व सखारामपंत व गंगोबा यास सडे सात हजार फौजेनसी रवाना केले. येथे फौज नवती. परंतु काम तोडी आले. यास्तव आम्हाजवल व मल्हारबाजवल पाचसे फौज ठेऊन बाकी रवाना केले. तेथे येकादोहो रोजानी सलुख होणार होता. परंतु आमची आल्याची खबर कललियावरी राहिला. दताजी सिंदे याजवल दाहा हजार फौज होती. परंतु ते न आले. जयापाची वाट पाहात राहिले. जयापा तरी मागे राहिले. याणी तरी मूलपण केले. आम्ही फजीत पडावे या आशयाने दतबा राहिले नाहीं. परंतु मूलपण जाहाले. असो. आमची फौज तरी येता दिसतच नाहीं. असा मजकूर आहे. परंतु येथे आम्ही कांहीं रांगडे वगैरे राऊत मिलतील ते ठेऊन चालवीतच आहो. राजश्री मल्हारजी होलकर याजकडून रामसिंगाविसी दताजी सिंदे याजकडील राणोजी भोइटे आणून त्याची खातरजमा केली कीं हे काम खामखा करू. तथापि ते न आले. याजमुले मल्हारबा आमलसे खटे[1] आहेत. सहजामध्ये बोलले कीं कामाचे वेलेस आले नाहींत हे त्यास उचित नाहीं. त्यावर आम्ही बोललो कीं दतबा मूल आहे. जयापा आल्यावरी लौकर येतील. ऐसे आहे. रा छ ७ मोहरम. बहुत काये लिहिणे हे विनंति.

*¶This letter, all in Raghunathrao's hand, addressed to the Peshwa from Northern India, discloses the differences that were arising between the Scindia and the Holkar.*

---

*No. 36]* *[1753 or 1754*

**श्री.**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री सखारामपंत बापु स्वामी शेवेसी.**

पोष्यें अंताजी माणकेश्वर साष्टांग नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल ताा कार्तिक वद्य पंचमी मुक्काम इंद्रप्रस्थ जाणुन स्वकीयें कुशललेखन करीत गेले

---

१ नाखुष.

पाहिजे विशेष. स्वामीची पत्रें येक दोन पावली. साकल्य अर्थ ध्यानास आला. त्यास येथील साद्येत अर्थ श्रीमत राजश्री दादासाहेबांचें पत्री लिहिला. याजकरिता निराला तपसील न लिहिला. तेच पत्रें वाचताच सर्व अर्थ ध्यानास येईल. गुदस्तापासून श्रीमत राजश्री पतप्रधान यानी दाहावेला लिहित गेले की, तुम्ही सर्व गोष्टीची माहीतगिरी करणें. पुढें तेथील बंदोबस्त तुमच्या हाते करणे आहे. * * * * * * * * * * * म्हादी मिलत नाही. लोक तर कां सोडतील; परंतु आम्ही कर्जे कोठवरी घ्यावी. सरदारीच बुडवावी यैसा प्रसंग वकिलानी केला आहे. राजश्री नारोपंत मजुमदार यांस कार्तीक शुध येकदसी देवाज्ञा जाली. तेजदार तरवारेचे होते. मोठी आमची बाजू गेली. वीसदा तरवार त्यानी येंदा मारिली. ईश्वरे मोठे वाईट केले. मजुमदारासारखा माणूस आता कोठून मिलल. या उपरी आपणाखेरीज आमचे कोण आहे ? तरी वरातेच्या मुबदला वरात अंतरवेदीत गोविंदपंतावरी देवावी. व अर्बाची नेमणूक नेमणूक नाल-बंदी रोजमुरियाची कोठे देवावी ते देवणे. विनंति उदास न करावी. साद्येंत वृत काडीने काडी सविस्तर लिहिणे. आपण कोठे आहेत पुढे काये कर्तव्ये हे वरचेवरी लिहित जावे. वकिलास नित्य पत्रे यावी, आम्हास न जावी, यैसी चाकरी केली नव्हती. बहुत काय लिहिणे. कृपा असो दीजे हे.

¶*Antaji Mankeshwar's letter to Sakharam Bapu requesting to arrange about his allowances.*

---

*No. 37]* *[27-12-1753*

## श्री.

पो बालाजी खंडेराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल ता। छ १ रौवल मु॥ कसबे पुट श्रीगंगाउत्तरतीर वर्तमान येथास्थित असे विशेष. आम्हास राजश्री दादांनी पूल बाधावयाची आज्ञा करून छ २६ सफरी रवाना केले ते छ २८ सफरी सोमवारी मु॥ मजकुरी पावलो. येथील पुल बाधावयाचे वृत तरी राजश्री भिवाजीपंत होलकरांकडिल आमच्या अगोदर दोन रोज आले होते. त्याणी गणमुक्तेश्वरच्या व येथील वगैरे जवलील येकूण नावा पंनास पर्यंत जमा केल्या आहेत. त्याज बा। तोफखाना आला होता. तो उतरोन पार गेला. सुतार लोहार वगैरे कारखान्यामुले काम चालीस लाविले आहे. दोनसे मजूरहि

मेलविले आहे. मुंजोची[1] चराटे वलतात व छकडे लावून लाकडे आणविली. याप्रा सरंजाम होळकराकडील होत आहे. आम्हाकडील सरंजाम तरी संरकारची पत्रें कादारास होती. राउत देऊन मेरट व अनुपशहर व जाटाकडे वगैरे गंगातीराने पाठविले आहेत. आणिखी तूर्त पंचवीस तीस नावा आलियावर येक पुल तयार करितों. पावणासे असी नाव लागतीलसा आजमास आहे. आम्हांकडील सरजाम कादाराकडील आलियास सत्वरच तयार होईल. आपल्याकडील वृत सविस्तर लेहून पाठवावे. राजश्री शंकराजी नारायण अनुपशहराकडे पार उतरावयासी गेले होते. त्यास तेथील नावा तमाम बुडविल्या आहेत. त्यास तेथे कोण्ही उतरीना. याजकरितां मारनिले काली येथे आले. सिद्याकडील पागा अनुपशहराकडे गेल्या आहेत. तेथे नावा आजपर्यत दाहाबारापर्यंत जमा जाहल्या आहेत, म्हणून सांगत होते. आपल्यास हे वृत श्रुत व्हावे, या करिता लिहिले आहे. बहुत काय लिहिणे. लोभ करावा हे विनंति.

सेवेसी सदाशिव रघुनाथ साष्टांग नमस्कार. लिखितार्थ परिसोन दया करीत जावी हे विनंति.

*A bridge of boats was being constructed to lead reinforcements to the Vazir across the Ganges.*

---

*No. 38]* *[1754*

**श्री.**

सेवेसी विज्ञापना. चिठी पाठविली ते पावली. डिगेंतून फौज बाहेर निघुन गेली. याचा मार लिहिला. यैसियास फौज कोणीकडे गेली. यांचे तहकीक तों कल्ले नाहीं. परंतु त्यांची बातमी राखिली पाहिजे. यास्तव फौज कांही रवाना करावयाची तजवीज केली पाहिजे. काली रात्रौ फौज पाठवावयाची आज्ञा जाली होती. त्याजवरून येथून च्यार पांच हजार फौजेनसी चिरंजीव राजश्री दताजी सिंदे यास पाठविलें. येथून डिगे पावेतो जाऊन आसपास पाहून आले. त्यांची फौज कोठें आढळली नाहीं. *सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति

*¶This appears to be Jayappa Scindia's letter to Raghoba in the campaign against the Jaths.*

---

१ मुंज गवत.

No. 39] [१७५४ जून.

# श्रीशंकर.

सो कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. आज्ञापत्र पावले. दोन रोज खानखानासीं बोलतो. परंतु याची कोण्हेहि प्रकारें खातरजमा होत नाहीं. याकरितां तीन प्रकार योजिले आहेत. वजीरास बोलून ठराऊन यावें.

एक तर लाहोरची खिलत देऊन त्या बार तीन हजार फौज कुरुक्षेत्रा पावेतो द्यावी. आपुण गंगेकडे जाऊन पंध्रा विस दिवसांत माघारे येऊन जयेनगराकडे जावें. तो फौज ही येईल या प्रो.

हे गोष्ट नवाबास विचारिली. उत्तर दिधले कीं कुरुक्षेत्राकडे फौजहि पाठवणें आम्हास पुरवत नाहीं. व अत:पर आम्हीं फार चुळेचुळे[१] जालों. नाकास जीव आला, महिनाभर गंगेस जाऊन माघारे येऊन मग जयनगरास जाऊ म्हणतात. हेहि या प्रांतीं कालहरण करून मुलुक बुडवावा व आम्हांस बाहेर पोट भरावयासहि निघुं न द्यावें हा विचार दिसतो. हेहि गोष्ट कशी आम्हासी पुरवेल? ऐसेच आम्हास खराब करावयाचे चित्तांत असले तर साफ सांगा. जे आमचे कपाळीं असेल तें होईल.

नवाब बोलले कीं आम्ही अंत:करणापासून निर्मळ होऊन सरदारानीं म्हटले ते देऊन खानखानास समजाऊन आणीत असतां नच येत, तर आमचा तो अपराध नाही. सरदार थोर आहेत.

जसें त्यास उत्तम दिसेल तसे करतीलच. खानखानानी सरदारांबराबर जावें, हे आमच्या चित्तांत सहसा नाहीं. नच राहात व जातीलच व सरदारहि नेतीलच तर आमचा यत्नहि न्यावे.

दुसरा विचार खानसामा, समशामुदौला यानी एकांती खातरजमा करून घेऊन जावें, म्हणजे यानेहि जावें. त्याजमधे कसर असली कामाचे नाहीं. विचार पाहतां हे खरेंच आहे. त्याची आंतस्ते खातरजमा नाहीं. तेव्हां जावें कसें? हे तुहीं बळकट असेल तर करावे, नाही तर यांत वजिराची लबाडी दिसते.

---

१ अधीर, अस्वस्थ.

श्नेह रक्षणे असले तर येथून उठून नीट दरकूच दक्षणेस जयनगराकडे जा. गंगास्नान पुढें करा. आतांच करणे असेल तर बाहीरबुणगा जयनगराकडे लाऊन द्या, व तुम्ही पांचा हजारा फौजेनसी सडे आठ दिवसा गंगाश्नान संपादून दिलीस न येतां जाटाचे तालुक्यांत यमुना उतरून जयनगराकडे जा. मनोहरपुरास पावल्यावर रु. देवउं. विश्वास नसला तर तुमच्या सावकाराची निशा देऊं कीं मनोहरपुरास पावल्यावर रुपये आपले सावकारापासून घ्यावे.

खान सामास तर बरे वाटत नाही. दरबारास येत नाहीं. समसामुद्दौला आले होते. त्यांची निशा पातशाहानी वजीरानी अंत:करणापासून केली. समसामुदौलानीं खातरजमा करून घेऊन खानखानास व स्वामीस व सुभेदारांस पत्रें लेहलीं, तें पहिले स्वामीपासी पाठविलीं आहेत. व विनंतीहि विस्तारें लेहली आहे. येथें तर शुधता व खातरजमा पुरती जाली.

तिसरी गोष्ट. सेवटीं काहींच नव्हे तर आम्हास खानखानास बरोबर घेऊन गेले पा. तेव्हां त्याचा तूर्त निर्वाह होईल.

खानखाना उगेच चितात वसवास उत्पन्न करून संशयच काढीत बसतील तर इच्छा त्यांची. वरकड इकडून तो बळकटी जाली.

येणें प्रमाणें जावसाल जाला. पुढें जे उत्तम ते करावयास स्वामी समर्थ आहेत. वैरणीची तसदी म्हणून झीलेवर जायाची तजवीज चितांत आली तर आतां सड्या व काठीचा भला येथून तेथें तेथून येथें मजा नाहीं. लागलेच विल्हे लावून कूचाची तजवीज केली पो. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The letter is addressed from Delhi to the Peshwa at Poona, may be, by Trimbakrao Pethe, who had accompanied Raghunathrao in that expedition, and contains the several alternatives which were under discussion with the Vazier (Gaji-ud-din).*

---

*No. 40]* *[1753*

**श्री.**

विनंति उपरी. पुढें फौज पाठविली ती लुटावयास पाठविली कीं काय. इतका आगरह करून उठविले. ते लुटीतात; ताकीद मानीत नाहींत. सराई आरबाची तेथवर चिरंजीव बापू गेले होते. आरब दाहा हजार आहेत. त्यातील सरदार येऊन भेटले. भेटावयास आणिले त्यास परस्परे वळून आपल्याकडे नेतात.

जागाजागा सरदारी आहे. लांबहाते तो बोलून सांगतात कीं आम्हास रोजमरा नाहीं. आम्हासी लुटणे. हे गोष्टीचा बंदोबस्त करावा. नवाब गाजदीखान घाटावर निपट डेऱ्यासेजारीच आले, तेव्हा आम्ही हत्तीवर बसून जाऊन रामराम जाला. बोलिले की बापू सडे येका पालखीनसी पुढें नदीपार जाले. आम्हास संशय वाटला; याकरितां घाटावर आलो. घाटहि पाहिला, उतरलो हे बरें केलें. परंतु लुटफाट न करावी. लुटल्याने जे जो (?) लोक भेटणार ते त्यास अनकूल होतील, आपल्यास भारी पडेल. याकरितां लुटीचे मना करावें. शेहरांत लाखो माणूस आहे. त्यास मिलाले तर आपल्यास भारी पडेल. याकरिता ताकीद असावी हे उत्तम. पादशाहाचे बरे करणे; तेव्हा शहर तुमचा जे (जय) इच्छितो त्यास लुटावें म्हणजे ते दुःखी होतील. बेदुवा देतील. याकरितां रयतेचे रक्षण ते करावें. बाबूरायाबरोबर दाहावीस राहतात; नाहींतर दरोबस्ती लुगोरीला[1] धावले आहेत. निमित्य आम्हावर घालतील. ये गोष्टीचा बंदोबस्त करावा. दुसरे, जेतागुजर यास आम्हाकडे घ्यावे. आज प्रहर येऊन मामलतीचा जाबसाल पुसोन पाठऊन देऊं. गेला तर त्याचा जाबसाल करावयाकरितां जरूर राा अंतो[2]जीपंत नानास सांगून पाठवावा. त्यांचा तालुकाच; बनेल तर ठाणीच सोडून घेतली म्हणजे चिंता काय? आपले दरबारी भेटावयास येईल त्यास धरावें यैसे नाहीं. ये गोष्टी लोक वसवस खातील. असो, जे जाले ते जालेच. परंतु त्यास येथवर पाठवावे. आम्ही आपला जाबसाल करून पाठऊन देतो. बहुत काये लिहिणें हे विनंती.

¶*Vithal Shivdeo's stern rebuke against plundering by Maratha forces is contained in this letter.*

---

*No. 41*]

## श्री.

विनंति उपरी. तेथून निघोन सडे स्वारीनशी सालिमार बागावर मुकाम केला. आलीकडील वर्तमान फौजेचे ठीक नाही, त्यास येथे रिकामे बसून काये करावे? राजश्री सुभेदाराकडे आबदुल हयांतखानाचे आनुसंधान आहे ते तरी बळावावे. तुम्ही जाब देविला नाही म्हणून सुभेदार म्हणत होते याचे कारण काये? आथःपर सुभेदारास लिहून त्यास लस्करांत आणवावे. बनले तर उतम, नाहींतर त्यास पावते करवावे. मोगलपुऱ्याचे मोगल कार्य करून देऊ म्हणतात. परंतु गाजदीखानाच्या हाते करवावे हे त्यांचे मानस. दरवाजा त्यानी मोकला

---

१ लुटीला. २ अंताजी माणकेश्वर.

करून देऊं म्हणतात. परंतु तुम्ही मऱ्हाठे, आमचाच पुरा लुटू लागाल, मग बखेडा होऊन मोगल दाहा हजार तरवार धरतील तर काम बिघडेल. त्यास गाजदीखानाचे सामान पुढे करावे; दरवाजा ते घेतील. आपण मागून चालावें. हा परियाये उतमांत आहे. त्यास गाजदीखान (याजकडे?) नागरमल यास पाठवावे. आमचे सुभेदाराचे बुनगे पाठवावे. मोगलपुन्याचे पाठीमागे मुकाम करून अबदुल हयातखान यासहि सुभेदार आणवितील. मोगलाचेहि ठीक करून, पुढे मोगल गाजदीखानसुधा, आम्ही मागून, यैसे हेहि बनले तर करावें. त्यास आतांच गाजदीखानाचा हरकारा सोनपत करनालेहून आला. त्याने वर्तमान सांगितलें की संमदखान सात आठ हजार फौजेनसी सरदेहून कूच करून राज्यार्ची सराई आठ कोस आलीकडे आला होता, परंतु माघारा गेला. तीन हजार त्याची फौज च्यार पांच सिबंदी यैसे सांगितले. फिरोन त्यास सुभेदारानी च्यार रुपये देऊन माघारा पाठविला, येणे प्रा वर्तमान आहे. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*These two letters (40, 41) of happenings at Delhi deserve being more clearly explained. They seem to refer to the entry of the Marathas into Delhi under Raghunathrao in June 1754, before Gazi-ud-din Khan deposed Emperor Ahmadshah. The letter appears to be in the hand-writing of Vithal Shivdev and addressed to Sakharam Bapu. The words* चिरंजीव बापू *seem to refer to the writer's son, Shivaji Pant.*

---

*No. 42*] [*June 1754*

(पहिला बंद गहाळ.)

सिधांत भांडायाचा केला. नजीबखान रोहिला गंगापार १० हजार सेना घेऊन आला तो हरोलें[१] जाला. गाजीनगर सा कोस दिलीपासून तेथे पडला. पांचा कोसाचा मुकाबला[२] राहिला आहे. भूपति बाहेर होते ते दिलीत यमुनेचे किलियांत दाखल जालेत. भोवता बंदोबस्त करितील. गाजदीखानाचे डेरे येमुनावर पटपटगंजावर पडले आहेत. जेनसी[३] पार उतरली, पूल बांधला आहे. पुढे पाहावें. माधोसिंग निगाहदास्त[४] करितो. जयापानी सांगोन पा कीं दार्वीस लाख रुा पा नाही तरी पारपत्ये करू. लांबेवाला रजपुताने वाट मारली. त्यासी कनिरामावाा च्यार हजार स्वार देऊन पा आहे. त्याचा भाऊ जयापापासीं आहे. सुवेदार इंदरेत (?) हवेलींत उतरले (अपूर्ण).

¶*The second sheet of a letter which seems to refer to the entry of the Marathas into Delhi.*

---

१ आघाडी. २ सामना. ३ तोफखाना. ४ फौजेची भरती.

No. 43] [1-9-1754

श्री.

पो छ १८ जिल्काद

श्रीमंत सखारामपंत बापू
गोसावी यांसी.

℘ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री समशेरबहादर सलाम विनंती उपरी. येथील कुशल ताा छ १३ जिल्काद मुकाम रेवडी जाणौन स्वकुशल लिहीत असिले पाहिजे विषेश. आम्ही देशास जावयाविशी श्रीमंत राजश्री दादासाहेबापासी आज्ञा मागितली, परंतु खावंद आज्ञेचा अनुमान चितांत आणून, न जावें या आशयें येक दोन वेल उतर जालें. आपणहि श्रीमंतासनिध नव्हते, स्वारीस आपणहि गेले आहेत. श्रीमंताचा आशय जे, राजश्री रामचंद्रपंत व राजश्री विसाजीपंत व राजश्री मानाजी पायेगुडे व रा महिपतराव (पानसे) तोफखानासहवर्तमान समागमे देऊन रेवाडीस रवाना केले. खासा स्वारी आठा दिवसा मागून येईल. आपणाकडील साकल्य वृत, आपले मुकाम कोणे जागा आहे हे लिहिले पाहिजे. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती. वरकड कितेक वर्तमान राजश्री रामचद्रपंती लिहिले आहे त्याजवरून कलेल हे विनंती.

¶*Samsher Bahadur asks clear orders from Sakharam Bapu as to whether he should go back from the Delhi campaign of 1754.*

---

No. 44] [January 1755

श्री.

दुसरा बंद—

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी विज्ञापना.

कडें गेले. गोहदकराचा मुलूक, श्रीमंत राजश्री मल्हारजी होळकर याणी ठाणी घेतली होती ती व श्रीमंतानी ठाणी सोडविली तीं तसीच सरकारांत राहिली. खातरखा मामलत जाली नाहीं. आंम्हाकडील जिगणीचे ठाणे गोहदकराकडे होते ते श्रीमंत राजश्री साहेब जव्हारसिंगाचे मोहऱ्यावर आले तेव्हां राजश्री विठल सिवदेव यास पाठऊन ठाणे घेतले. आमचे कारकुनाचे स्वाधीन केले. पिपरसेव म्हणून गोहदकराचे ठाणे कुवारी नदीचे कांठी होते. छोल्याचे सराईचे आलीकडे दोन कोस त्याने गोळी वाजविली. ते श्रीमंतानी कापून काढिले. तेहि आमचे

कारकून नारो बचाजी तेथे आहेत त्यांचे स्वाधीन केले. आम्हास राजश्री गोविंद सामराज याची पत्रें आलीं याजकरितां माघ वद्यांत जाऊं. तिकडे जाऊन जसा सुमार पाहूं त्याप्रमाणे राहणें जालें तर राहूं. राजश्री विठल सिवदेव यास ग्वालेर प्रांती श्रीमंत ठेवणार व राजश्री नारो शंकर यास झांसी प्रांती ठेऊन खासा स्वारी जेनगरावरून देशी येणार यैसेहि म्हणतात. गोहदकरानी सिंद्याचे हाते सलुख केला. फौज उठोन गेल्यावर पैसा टका कांहीं ठरला होता तो दिल्हा नाहीं. येकून दंब (बंद ?) राहिले. पुढे काय होईल ? खर्च आमचा भारी. देशी आपला लाभकाल कोठे नाहीं ऐसे जाणोन जातो. चिरंजीव निळोपंत भाद्रपद मासीं भेटीस येतील. त्याचा सांभाल करावा. चैत्र मासचा हप्ता व जेष्ठ मासचा हप्ता यैसे येथें कोन्हाची वरात केली तर त्यास देतील अथवा तेथेंच करारास यैवज प्रविष्ट करतील. येथें देविला तर हुंडणावळीची रयात होईल.

¶*Second sheet of a letter addressed to the Peshwa referring to the capture of Gohad.*

---

*No. 45*] [*1755*

**श्री.**

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी विनंति. कुल पलोन बेहडात गेली. नाहीं तर कुल लुटून घेतली असती. नवी सिबंदी. लाख रुपये खर्च जाला. त्याचे सार्थक स्वामींचे पुण्यप्रतापे उतम जाले. जाटाची शक्ति सुटली असे. त्यास आपली फौज असती तर कितीक कामे होती. यास सुरजमलाचा असरा आहे. आम्ही दिलीस श्रीमंतास दाहा बारा पत्रे पाठविली, परंतु आमची फौज आली नाहीं. रागी करितो यैसेच लिहितात. त्यास राणा भीमसिंग याचा मुल्हक साता अठा लाखाचा आहे. आमचे लाख रुा तो खर्च होऊन गेला. आम्ही मुल्हक घेतो; राजश्री अंताजीपंताचा पैका राणा देतो; त्याप्राा मुलुक अम्ही घेतलियावर त्यास देऊं. या प्रांतात फार बदनक्ष जाला होता, परंतु नवीन सिबंदी ठेऊन नक्ष स्वामींचे पुन्येकरून उतम जाला. त्यास इकडे जाटमय जाले असे. त्याचे येक वेल पारपत्ये केलियावाचून हिंदुस्थानात नक्ष नाहीं. राणा भीमसिंग याचा मुल्हक घेतला म्हणजे गालेरचा किला अनयासेच येईल, किंवा पूर्ववत किलेदारप्राा राहील. अण मुल्हक साता अठा लाखाचा सुरलीत होईल. सुमेरशानें दुंडी उठविली, त्याप्राा दुंडी उठविली. तमाम जमीदार फिरले, ठाणी घेतली. त्यास फतेसिंग मारलियावर* दुंडी वारली. नक्ष स्वामीच्या पुणेकरून जाला.

* येथून अक्षर वेगळें.

आम्ही दिलीस यैसेच हे टाकून जात होतो. परंतु श्रीमंत दादासाहेबांची पत्रावर पत्रे आली कीं तुम्ही तो शेह सोडून न येणे. मागून फौजा पाठऊन जाटाचे पारपत्य करणे आहे, तुम्ही न येणें, त्यावरून राहिलो होतो. राहिल्या हे कामहि जाले. पुढें मुल्खकहि सत्वरच सुटल्यास हे येक सरकार कामच जाले. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति. जाटाचे लढाईत तागाईत कुंभेर से सवासे घोडे पडले आहे. समजावीस नालबंदीचा विचार हा कालपर्यंत कांहीं होत नाहीं. दिलीच्या पैक्यावर मात्र इमारत आहे लोकास रोजमऱ्याविसी वगैरे रवानगी नाहीं, आर्जबाब नाहीं. यामुळे सर्व फौज दिलीची हुजरातसुधा हैराण आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Vithal Shivdeo's letter, second sheet, to the Peshwa about the conquest of Gohad. He refers to the mismanagement of affairs by Raghoba.*

---

*No. 46*] [*29-5-1755*

## श्रीसांब.

### मसुदा गाजुद्दिखान.

* उपरि. तुम्ही पत्र पाठविलें त्यांत खुलासा कीं आपण मावारे जावयाची त्वरा न करावी. आम्ही जलद येऊन पोहोंचतों. शाहाचा पेंच पडला तरी रोहिले पठाण आपणांस सामील आहेत, या आशयानें लिहिलें, तें पावलें. ऐसियासी आम्ही शाहाची दहशत मनांत आणून जातों ऐसें नाहीं. आम्हांस बहुत कामें आहेत. यास्तव दुसरे जागा च्यार रुपये मेळवावे ऐसे विचारें कूच केलें आहे. तुम्ही महिना पंधरा दिवसाचा वाइदा करून गेलां. त्या गोष्टीस कमेंबेश नव दाहा महिने जाहाले. तुमचा भरवसा बहुत होता कीं, जलद रोहिले पठाणास घेऊन याल. आणि येक विचारें तमाम पातशाहीचा बंदोबस्त करूं. परंतु ती गोष्टी ईश्वरसत्तेनें न घटली. बरें, यासी तुमचा उपाय काये? अत:पर यमुना दक्षणतीरास आला असिला तरी बमैफौज जलद जलद[१] येणे. खेचीच्या आसपास मुकाम आहेत. भेटी जाहल्यावरी तुमचे आमचे सल्हेनें ठहरेल तो मनसुबा केला जाईल. जर यमुना उत्तरतीरे असिला तरी नच येणें. उत्तर मात्र जलद पाठवणें. सारांश रोहिले पठाण यांचा श्नेह जाहला तो बराच आहे. कदांचित् आम्ही दक्षणेस आथवा गुजरात हर कोठें लांब गेलो तरी सरकारचे

---

* सर्व पत्र राघोबाच्या हांतचे आहे.

१ जवळजवळ.

सरदार, कमाविसदार राहातील, त्याची कुमक करावी. तेहि तुमची करितील. जर याच प्रांतीं राहावयाचें मुकरर जाहालें तरी जो मनसुबा ठहरेल त्या कामास फौज बोलाऊन घेऊं. अपणास कळावें म्हणोन लिहिले आसे. उत्तर जलद पाठवणें. त्यासारिखी येथील मनसुब्याची योजना होईल. छ १७ साबान.

¶*Autograph draft of Raghoba writing to Gaziuddin asking him to join and help the Maratha forces, although he himself was returning to the Deccan.*

---

*No. 47*] [*18-7-1755*

**श्री.**

पो छ २१ जिलकाद

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.**

विनंती. सेवक गणेश संभाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ ८ सवाल मु॥ कुलपाहाड येथे सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीचे आज्ञापत्र छ १० रमजानच आले ते छ ६ सवाली सेवकास पावले. तेथे आज्ञा कीं फौजसुधां राजश्री मल्हारजी होळकर याजकडे जाणे. त्यावरून आम्ही तयारी केली. तो त्यांचीं पत्रे आली कीं तुम्ही अंतरवेदींत उतरणे आणि तिकडील बंदोबस्त करणे. याजकरितां आम्ही येमुनातीरास जाऊन राजश्री गोपाळराव यास कुन्यास बसविले आणि तमाम ठाणियाचा बंदोबस्त केला. तैसेच राजश्री बाळाजी गोविंद याजकडील बंदोबस्त केला. पुढें जावें तो राजश्री मल्हारजी होळकर फौजसुधां निघोन स्वामीकडे गेले. तैसेच राजश्री बाबुजी नाईक व राजश्री गोपाळराव हे गेले. इकडे कोण्ही मातबर फौज राहिली नाहीं. त्यास स्वामीस फौजा काढून नेणे होते तरी इकडे ब्राम्हणाचे कबिले होते, पुढें घालोन न्यावयाचा बंदोबस्त करून न्यावे होते, न केले. ब्राम्हण कबिलेसुधां होते. त्यास उदक सोडले. ऐसे जाले. त्यास इकडील बंदोबस्त हा कालवर सेवकानी उत्तम प्रकार राखला आहे. तरी इकडील उपराळा करणे असल तरी सत्वर मदत स्वामिनीं केली पाहिजे. नाहीतरी तैसीच सेवकास आज्ञा करावयाची असल ती करावी. वर्तणूक आज्ञापत्र येईल त्या प्रमाणे होईल. फौजा जातांच गव्हाराही[1] गडबड मांडिली आहे. कोटकिले आपले ब्राम्हण टाकून पळो लागतील. गड या प्रांतीचे गेलियानंतर मग आशा कशास ठेवावी? ऐसा समय प्राप्त जाला आहे. यासाठीं सूचनार्थ विनंती लिहिली आहे. आज्ञा येईल त्या प्रमाणें वर्तणूक करीन. झासी प्रांताचा बंदोबस्त करणे म्हणोन हातरोखा-

---

१ गव्हार=वाईट, मवासी लोक.

आला व रा। बाबुराव लागू जाले आहेत. त्यावरून तेथील उपरालियास जातो. श्रुत होय. हव्यास जटाशंकर यास हिंदुपताने मोर्चे लाविले होते. त्यास विसाजीपंत सागरवाले याणी भोसले आणून मोर्चा मारून काढिले. आणि भोसले गेले असून वैर जाले आहे. त्यास या प्रांताची आशा नसली तर तैसेच त्याहावयासी आज्ञा जाली पाहिजे, म्हणजे उठोन येऊं. श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Ganesh Sambhaji (Khandeker) complains from the North to the Peshwa against the departure of Raghunathrao with his forces into the South.*

---

*No. 48]* *[16-8-1755*

श्री.

विनंती उपरी राजकी वर्तमाण तर वजीरासी व जाटासी कळासी[1] बसत नाहीं. जाट ८ लकार देतो. परंतु वजारतचे व सारभोमाचे बळ नाहीं. भुपती किलीयांत दाखल जालेत. अवघे सूत्र वजीरावर १

माधोसिंगाकडे ऐवज सरकारचा निमित्य श्रीमंत दादाणी जोडी पाठविली. परंतु ते सांप्रत्य ऐवज देत नाहीं. रांगडे एकसूत्रमणी १ [रांगडे एका माळेंतले मणी.]

नागोरचे वर्तमाण जयापाव्र रजपुताणी दगा केला. विस्वास दाखऊन घर घेतले. रागडलोक णिरदय, दगाबाज. सरकारची पत्रेहि जयसिंगापासी गेली की ते जयापास देणे. मतलब कीं कराराप्रमाणे ऐवज देतील. तुम्ही अजमेरी-पात्रेतो जाऊन उतरा. जर ऐवज न देतील तर पाहून घेणे. हे पत्र वकील घेऊन जयापापासी जाताना बोलला की ते पत्रे माणीत नाहींत. कासीयासी पाठविली जर म्हनाल तर जाऊन दगा करून मारीन. की मृत्यु पावल्यामागें लक्षाचा पटा कुटुंबास चालवणें. ऐसा करार करून एका घोडीयावर बसून येऊन, चौघे आणिक साधक घेऊन येऊन, जयापासी येऊन उत्तरनिरोतर करून संद गांठून दगा केला. चौघे तेहि मृत्यु पावले. मग लस्करात शंखनाद जाला. अवघे सिध जालेत. विचार द्रुढ केला. द्राही जयापाचे पुत्राची फिरली. मोरचे कायम केले. नागोरची फौज नागोरेस व जालोरची जालोरेस व जोतपूरची जोतपुरास कायेम. अजमेरीस विचार यावयाचा जाहला होता तो राहिला कीं आता फुटून फळी उचलावी तर बाजी[2] जाते. हिदुस्थानास तमाम इस्तकलाली[3] येईल. अवघे फितूर करतील. आतां खेळ मोडावा, शह न

---

१ जोड, सांधा. २ अब्रू. ३ इस्तकलाली=जोर.

सोडावा. आतां दंद लागले. रांगड कापून काढावे ऐसा करार जाला. फौजा कायम जालिया ऐसी चिठी आतां आज छ ७ जिल्कादी आली. कळावे. जयेनगरचे वर्तमान तर बावीस लाख रुपये जयापानीं लिहिले होते की पाठऊन देणे. नाहीतर आम्ही येतो. माधोसिंगाणे उतर सांगून पाठविले कीं तुम्ही काशास येतां, आम्हीच येतो. ऐसियासी जयापाचे वर्तमाण या प्रकारचें जाले, यामुळें तमाम रजपूत व जाट व मोगल वगैरे काये हिंदव, काये दक्षण खिरे[१] जाले आहेत. मारवाडकराणी धर्मयुध न केले. विस्वासघात केला. श्रीमंताचे प्रतापेकरून त्याजला शासन चांगलेच होईल. रजपूताचा विस्वास व दगाबाजी सर्व पूर्वीच विनंती केलीच होती. परंतु कोन्हास विस्वास न आला १

लस्करचे वर्तमाण सरकारचे वकील व कविजंग निघाले. परंतु जवळ आले नाहींत. आलियावर विनंती केली जाईल. हैदरजंगासी[१] भुवणगीरचा किला मकान ज्यायेनिसीन[२] करून दिधले. जाफरखानास त्याचा ऐवज दुसरे स्थळ योजिले. ऐसी खातरदारी त्याची आहे. सरकार मेहेकर वगैरे जागिरा दिधल्या. त्रिवर्ग एके सूत्रे आहेत हे विनंती.

¶*News-letter giving details about the murder of Jayappa Scinde.*

---

*No. 49]* *[November 1755*

**श्री.**

शेवेसी विज्ञापना. बिजेसिंगाचे लोकास जेसलमेरकर भाटी व पोखरणकर सामील होऊन जालोराकडे गेले. जालोरवाले व आपण एकत्र होऊन जोतपूरच्या फौजेवर चालोन आले. हे बातमी येताच जोतपुरी राजश्री जगनाथ पुरोहित यास व राजश्री जानराव वाबळे व सटवोजी बांडे या त्रिवर्गास जमावसुधा ठेऊन राजश्री संताजी वाबळे व मालजी वलद शहाजी सिंदे व आम्हा कडील हुजरातीचे लोक व राजश्री जिवाजी पवार व तुकोजी पवारचे लोक असे त्याजवर पाठविले. त्याची याची गाठ गोदोजेवर पडली. त्याचे याचे युध्ये जाले. बिजेसिंगाचे लोकाचा मोड करून गोदोजेत घातले. त्याची माणसे मारलीं व जखमी जाली. बहुतच सिकिंदा[३] करून गावांत कोंडला असे. आम्हाकडील लोक जुजाचे समइ जखमी वगैरे याचे वर्तमान तपसीलवार आले नाही. आल्यानंतर सेवेसी विनंती लिहून पाठऊं. गोदोजभोवत्या लोकांच्या चौक्या उभ्या राहून त्याची रसद व कही बंद केली असे. ते गोदोजेस गेले म्हणोनच वाचले, नाहीतर

---

१ दुसीचा कारभारी. २ वंशपरंपरा. ३ फजित.

लुटलेच होते. त्याचे लस्करात धारण दोन शेर अडीच सेर जाली आहे. दोचौ रोजांत स्वामीचे तेजप्रतापें करून त्यास लुटून घेतील. वर्तमान आल्या-नंतर सेवेसी तपसीलवार विनंती लिहिली जाईल. जोतपुरी पुरोहित व जानराव वाबळे व बांडे वगैरे राहून तेथील बंदोबस्त पूर्ववत प्रो करून आहेत. आम्ही नागोरचा बंदोबस्त राखून रागडे जागा जागा हुलड करून डोकी उचलली होती; त्याजवर फौजा पाठऊन जेथील तेथे गाठ घालून त्याचे उपमर्दन स्वामीचे तेजप्रतापे करून पारपत्य केले. नागोरात बहुतच तंगचाई जाली होती. परंतु राजे माधोसिंग यानी अनरुधसिंगाबरोबर फौज देऊन बिजेसिंगाचे मदतीस पाठविले म्हणून आजपर्यंत बिजेसिंगानी दम धरला आहे. नाहीतरी येथील कार्य मागेच जाले असते. स्वामीचे पुण्येप्रतापे करून अनरुधसिंगाचे पारपत्य येथयुक्त जाले. प्रस्तुत तों सलुखास येत आहे. येथे आल्यानंतर आमची त्याची भेट होऊन जो करारमदार कछव्याकडील व नागोरचा होऊन येईल तो तपसीलवार सेवेसी लेहून पाठऊं. कछव्याची फौज दिलीआसपास आली, आण आम्ही येथे राहावे ऐसे नव्हते. परंतु येथून गेल्यानंतर नागोरचा बंदोबस्त तुटतो यास्तव येथील येथेच मुकाम केला असे. नाहीतरी त्यासी गाठ घालून स्वामीचे आशिर्वादे करून त्याचे पारपत्य उत्तम रीतीने करून लुटून घेतला असता. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति. *

*¶Dattaji Scinde's letter to the Peshwa describing the defeat his forces inflicted on Bijesing near Nagore.*

---

*No. 50]* *[28-10-1755*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी.**

विनंती सेवक जनकोजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा छ २१ मोहरम मो नागोर स्वामीचे असीर्वादे येथास्थित असें विशष. कछव्याची फौज पंचवीस तीस हजार अनरुधसिंग रामगडाहून कूच करून मारवाडचे सर्देस आले. तेसमई आपलेकडील सरदार राजश्री नरसिंगराव सिंदे व खानाजी जाधव व राणोजी भोईटे याणीं पछाडीवर युध्य करून आठ-नवसे माणूस मारले व हजार बारासे घोडे घेतले, हे वर्तमान पुर्वी सेवेसी विनंती लिहिली आहे. प्रस्तुत अनरुधसिंग दरकूच दिडवाण्याचे रोखे चालों लागला, तेव्हां लोकांनीं निकड बहुतच केली. अडीच तीन कोस तीन प्रहर चाले. छ १४ मोहरमी तीन कोस मजल दिडवाणीयास आला. तेसमई पाणी च्यार प्रहर मिळालें

नाहीं. लोकांनीं युध्य करून दोनतीनसे माणूस मारलें व घोडे च्यारसे घेतले. तेथच हा कालपरयेत राहिला असे. पुढे कूच करून येऊ लागला तरी स्वामीचे तेजप्रतापें उत्तम प्रकारे पारपत्य होईल. राजश्री अंताजी माणकेश्वर अद्याप आले नाहीत * सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Jankoji Scindia writes to Bhausaheb about the defeat at Didwan he inflicted on Anirudhsing sent by Madhosing of Jaipur to help Bijesing against Jankoji.*

---

*No. 51*] [*6-11-1755*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.**

विनती सेवक जनकोजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ता। छ १ सफर मो नागोर स्वामीचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष. येथील वर्तमान व जोतपुराकडील व अलोराकडील व कछव्याचे फौजेचे अनरुधसिंग दीडवाणियांत येऊन दाखल जाल्याचें, तपसीलवार पुरवणीपत्रीं सेवेसी विनंती लिहिली असे. त्यावरून विदित होईल. सारांस गोष्ट स्वामीचे तेजप्रतापें रांगड्यानी अधिक करावें येसें नाहीं. सर्वहि पादाक्रांत होतील सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*The whole letter is in Jankoji's own hand.*

---

*No. 52*] [*28-9-1755*

**श्री.**

भाद्रपद वद्य दशमीस पत्रें आलीं मशारनिलेकडून.

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री मुकाशीबावा व राजश्री बाजीपंत बावा व गणेशपंत दिवाणजी स्वामीचे सेवेसी.**

पोष्य अंताजी माणकेश्वर, साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागाईत श्रावण वद्य १३ त्रयोदशी, मुक्काम नजीक कोंच, येमुनातीर जाणून स्वकीयें कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. बहुत दिवस पत्र येऊन

---

सबंध पत्र जनकोजीच्या हातचें. जयाप्पा नागोरास ता. ३० जून १७५५ रोजीं मारला गेला त्यानंतरचें पत्र असावें.

वर्तमान कळत नाहीं, तरी सविस्तर लिहावें. आम्हांकडील वर्तमान तरी श्रीमंत राजश्री...दादासाहेबांनीं, राजश्री गोपाळराव गणेश यांस, कुराजाहानाबादेचा मामला अंतरवेदींतील, राजश्री गोविंद बल्लाळ यांकडे होता तो दूर करून सनदा देऊन आमचे हातीं दिल्हें जें...यांचा अंमल बसऊन देणें. त्यावरून आम्हीं दरकूच कालपीस गेलों. राजश्री हरीपंत बावांची भेटी जाली. अंतरवेदींतून राजश्री गोविंद बल्लाळ आले. त्यास गोविंदपंत मामला सोडीत नाहींत. दरबारास जाऊन फडच्या करून, यैसें बोलिले. आम्ही पार जावें इतकियांत राजश्री दत्ताजी शिंदे यांचीं पत्रें मारवाडातूंन आलीं जें, राजश्री जयाजी शिंदें यांस दगा जाला. तरी तुम्ही पत्रदर्शनीं स्वार होऊन दाहा हजार फौजेनिशीं येणें. मग पत्र वांचणें. यैशीं लागोलाग च्यार पांच पत्रें आलीं. त्यास वरकड कामें टाकावीं सारखीं जालीं. येक मारवाड सर जालें, तरी तमाम हिंदुस्थानांत बंद होईल. साहेबकाम भारी जाणून अंतरवेदींत न जातां दरकूच मारवाडांत चालिलों. आम्हीं देशींहून आलों तें समयीं पांच हजार फौज होती. ज्याजती विठ्ठल शिवदेव, नारो शंकर वगैरे यांकडील अडीच हजार फौज नवी ठेविली. येकूण साडेसात हजार व जाजती भदावरकर, शेंवढेकर व राजे गोपाळसिंग व जाठ वगैरें अडीच हजार फौज ठेऊन दाहाहजारांनिशीं बाराबारा कोसांच्या मजली करून मारवाडांत चालिलों. श्रीमंतांचे पुण्येंकरून ईश्वर उत्तमच करील. आपणांस कळावें म्हणऊन लिहिलें असें. राजश्री हरीपंत बावा कालपीस सुखरूप आहेत. वरकड दरबारचें वर्तमान सविस्तर लिहावें. राजश्री विठ्ठल शिवदेव येथून कंबर बांधोन आले आहेत. आपण घडीघडीची बातमी राखावी. चिरंजीव आपा व बाबूराव तुम्हांकडे येतील. त्यांस सालाबादप्रमाणें शेतसनदा व कोंकणचीं दस्तकें व वेठेबिगारी गवत कापावयाचे वगैरे जें सालाबादप्रमाणें असेल तें दप्तरीं रुजूं पाहून कागदपत्र, सनदा, वराता, सालमजकुरीं लिहून घेऊन मुलांचे हवाला करणें. राजश्री मल्हारराव बाबा रास्ते यांस पत्र पाठविलें आहे. तें त्यांस द्यावें. आमचें तीन महाल इटावें, फुफुंद, सुकोराबाद, अंतरवेदींत जागिरीचे आहेत, तेथील मक्ता श्रीमंत राजश्री दादासाहेबांनीं करून तेथील मामला गोविंद बल्लाळ यांकडे आमचे तर्फेनें दिल्हा असतां, राजश्री नारो शंकर, श्रीमंतांपाशीं रदबदली करीत आहेत; ज्याजती चड लावितात म्हणून ऐकिलें. त्यास आम्ही जागीर मुफत मेळविली नाहीं; कष्ट मेहनत करून मेळविली आहे, यैसें असतां नारोपंतीं चढ जाजती करावा हें उत्तम नाहीं. नारोपंतास रुपये बहुत जाले तरी दानधर्म करावा अथवा श्रीमंतांस नजर द्यावी. येविशीं श्रीमंतांस विनंति करून नारोपंतास निक्षून ताकीद करवावी. फिरोन आमच्या मामलियांचें नांव—हे सरदारी बाग

तुमची आहे, दिला तरी नुकसान तुमची. कल्याण असिलें तरी तुमचें. दुशमन फार आहेत. सावध राहून थोरले येजमान भाशेस गोवणें हें विनंती.

¶*Antaji Mankeshwar writes to his agent at Poona from the banks of the Jumna about certain changes in the staff that Raghoba had effected in the management of the territory of the Doab. He adds he is proceeding to Marwar to succour Scindia's forces who had suffered from the murder of Jayapa.*

---

*No. 53*] *[6-11-1755*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी.**

विनंती सेवक दताजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा छ १ सफर मो नागोर स्वामीचे असिर्वादे येथास्थित असें. विशेष येथील वर्तमान जोतपुर व जालोर वगैरे कछव्याचे फौजेचे तपसीलवार पुरवणीपत्री सेवेसी विनंती लिहीली आहे त्यावरून विदीत होईल. सारांश रागड्यानी स्वामीचे तेजप्रतापापुढें अधिक करावे ऐसे नाहीं. सर्वहि पादाक्रान्त होतील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Autograph letter of Dattaji Scindia encamped at Nagore States he is confident of victory.*

---

*No. 54*] *[2-12-1755*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामींचे शेवेशी.**

विनंती सेवक अंताजी माणकेश्वर, कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचें वर्तमान तागायत कार्तिक वद्य १४ चतुर्दशी मुक्काम दिडवाण नजीक नागोर, प्रांत मारवाड, स्वामींचे कृपेंकरून येथास्थित असें विशेष. आम्हां-कडील वर्तमान तरी कार्तिक शुद्ध १ प्रतिपदेस आम्ही यांजपाशीं दहा हजार फोजेनिशीं पोंहचलों. राजे माधोसिंग जयेनगरकर यांस बिजेसिंग राठोड याणें कांहीं पैका दिल्हा आणि राजश्री जयाजी आपाचा काळ जाल्या दिवसापासून माधोसिंगानें तमाम फौज जमा करविली. सेखावत राजावतन रुके बिजैसिंगाचा पुत्र व त्यांचे तर्फेचे राजे बिकानेरवाले व रुपनगरवाले ऐसें महिनाभर फौज पंचवीस तीस हजार जमा करून मारवाडचे सरदेस आले जे. राजश्री दत्ताजी पाटील शिंदे

यांस नागोराहून उधळून मारवाडांतून काढावें. तिकडून बिजेसिंगानें बाहेर निघावें. तेव्हां राजश्री दत्ताजी शिंदे याणीं खानाजी जाधव व राणोजी भोईटे चार हजार फौजेनिशीं यांवरी रवाना केले; रामसिंग याची फौज दोन हजार ऐसें सहा हजार यांचे भोंवते भोंवतें फिरत होते. ते भारी तीस हजार, तोफखाना भारी, यांस रेटून जबरदस्तीनें नागोरास चालले. पंचवीस कोस नागोर उरलें तों आम्ही जयेनगर प्रांतें दहा हजार फौजेनिशीं येऊन पोंहचलों. तमाम माधोसिंगाचा मुलुक मारून जाळून थोर थोर मजली करून चालिलों. राजश्री जनकोजी शिंदे, दत्ताजी शिंदे यांचीं पत्रें एका दिवसांत चार ऐसीं रोजचे रोजांत दररोज येऊं लागलीं कीं, नागोराकडे न येणें. बुणगें टाकून जयेनगरचे फौजेवरी येऊन, ते फौज तंबी करणें, म्हणजे सारें मारवाडचे मोहिमेचें येश तुम्हांस येतें. कैलासवासीं राजश्री आपांच्या स्नेहाचें सार्थक होईल. ऐसें नाना प्रकारचे कागद लिहिले. तेव्हां सोळा सोळा कोसांचीं कूचें करून प्रहर रात्रीस सडी फौज मुक्कामास दुमदारी सांभाळून येऊन, ऐसें करून दिंडवणीयावरी येऊन पोंहचलों. दुसरें दिवशीं फौज तयार करून, तमाम कही मारून, चारशें माणूस मारून, मोंगल सारा शहराच्या असऱ्यास नेऊन घातला. भोंवतें रात्रींदिवसा उभेच राहून सिकोंदा[१] केला आहे. दोन शेर गवत रुपयाचें व दोन शेर दाणे रुपयाचे आहेत. कौल मागून आपले आपले घरास जावयास निरोप मागतात. परंतु देतां येत नाहीं. सेवकाची फौज जयेनगरचा मुल्क मारीत आली. चांगलीच फौज पोंहचली या (मुळें) तमाम यांचीं अवसानें गेलीं. आम्ही आलियाउपरी आठवे रोजीं नागोरांतून राजे बिजेसिंग तीनशें प्यादे, शंभर स्वार रात्रीं पळाला आणि या कछव्याच्या फौजेंत येत होता. मार्गीं आमची फौज भारी या फौजे भोंवती होती. तो मागती फिरला तो बिकानेरास गेला. तेथें आतां जमाव करितो. जमाव करून मैदानांत या फौजेंत आला तरी चिंता नाहीं. सारे एक जागा करून सडकून मारून. आमच्या लष्करांत पांच शेर दाणे धारण आहेत. पाणी विहीरीचें खारें शंभर दीडशें हात दोर लागतो. असो. राजश्री जनकोजी शिंदे, दत्ताजी शिंदे नागोरीं आहेत. आम्हांस त्यांस अठरा कोस तफावत आहे. कासीद एका दिवसांत जातो. लष्करची वाट दों दिवसांची आहे. सारांश हे फौज आम्ही सडकून बुडवितों. स्वामीचा प्रताप समर्थ आहे. परंतु शिंद्यांची फौज मारवाडांत फार बुडाली. काळ मोठा. प्रस्तुत आम्हांवरीहि बेतली आहे. प्रथम आम्ही कालपी-पर्यंत कडाकोराच्या अंमलाबद्दल गेलों. तेथें राजश्री जनकोजी शिंदे, दत्ताजी शिंदे यांची पत्रें दररोज जोडी १ एक येऊन पोंहचों लागलीं कीं, राजश्री आपास दगा

---

१ हैराण.

जाला. आमचा उपराळा कोठूनहि होत नाहीं. शत्रूंनीं बळ बांधून कछवे व तमाम राजे येकवट होऊन, तीर्थरुपांप्रमाणें आमची अब्रू घ्यावयास पाहतात. आम्ही तरी जिवाचा संकल्प करून बसलों आहों. तीर्थरुपांचा तुमचा रिणानबंध होता. आमचे म्हणवीत होता. तो समये आजी खरा करून दाखवणें. धातूपोषण करून उगेच समाधान न करणें. आजीचें येहसान आम्हांवरी मोठेसें राहील. येविसीं श्रीमंत स्वामीहि बहुत संतोषी होतील. मागाहून श्रीमंतांचीं आज्ञापत्रें येतील. परंतु हा समयें सांभाळणें. आमची अब्रू आजी येऊन राखिली तरी, जोंवरी आमचें बरें तोंवरी तुमचें बरें. पूर्वस्नेहाचें सार्थक तेव्हांच. व जेथवरी स्वार मिळेल तेथवरी भारी फौज करून येणें. शिबंदी भारी जाली याची चिंता सहसा न करणें. आमच्या वचनावरी श्रीमंत स्वामी सर्व निर्वाह करून देतील. ऐसीं पंचवीस पत्रें नाना प्रकारें ममतेनें आलीं. तो विस्तार कोठवरी लिहावा? पत्रेंच त्यांची बजिन्नस आहेत. तेव्हां कालपीहून गोपाळरायांचा निरोप घेतला. तेव्हां राजश्री गोपाळराऊजी आपल्या मामल्यासाठीं फार श्रमी जाले. तें आम्ही मान्य केलें आणि फौज जमा करून ठेवीत ठेवीत ग्वालियेरप्रांतींपर्यंत आलों. झांसीस व जागां जागां माणसें पाठविलीं. कोणी पांच स्वार न येत. तेव्हां जे जेथें ज्याचे लोक होते तेच फोडून चाकर ठेवून आपली फौज कदीम पांच हजार चांगली होतीच, नवी तीन हजार मऱ्हाठी ठेविली. कांहीं अगोदर सुरजमलाचे कुमकेसाठीं ठेविली होती ते होतीच. कांहीं आणिक ठेवून आठ हजार फौज मऱ्हाठी व हिंदुस्थानी दोन हजार, त्यांत गोहदकर जाठ, गोपाळसिंग जाधव व करोलीवाले एक हजार स्वार व एक हजार फुटकळ पठाण वगैरे यैसीं दोन हजार, एकूण दाहा हजार फौज घेऊन, कुरोलीपासींच मळ नदी उतरावें, तों माधोसिंगानें, सुरजमलांनीं चंमळेचे घांट बांधले. सुरजमलांनीं आपला पुत्र दाहा हजार फौज, आम्हावरी रवाना केला. माधोसिंगानें आपला बक्षी तयार केला. मग आम्ही हे वाट टाकून डांगेंतील वाट काढून दाहा दिवस पाहाडांत चालिलों. सोपरावरून इंद्रगड, खातोलीजवळ चंमळ उतरून लाखेरीच्या दऱ्यानें जयेनगरच्या मुलकांत आलों. नेवाईवरी जाऊन मुक्काम केला. दुसरा मुक्काम फागीवरी, जयेनगरा-संनिध साहा कोसावरी केला; आणि राजांस कागद पाठविला कीं, युद्धास येणें. मग त्यांणीं वकील पाठविला कीं, आतां त्यांचा आमचा सल्लख करणें. त्याजवरून राजे गोपाळसिंग कुरोलीवाले व आमचे त्रिंबक मुकुंद, जयेनगरास पाठविले कीं, आमची व राजश्री दत्ताजी शिंदे यांची भेटी होईल; त्यांचे जे जे मुद्दे असतील ते त्यांस पुसोन लिहून पाठऊन त्याप्रमाणें करून देणें, मग सल्लख होईल. आम्ही

---

१ कालहरण.

दत्ताजी शिंदे यांचे चाकर, निराळे सरदार नाहीं. हत्ती, शिरपाव पाठविला होता, तों फिराऊन पाठविला कीं, दिवाणकाम जालियाखेरीज घेणार नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Antaji Mankeshwar writes in his usual boastful manner what exertions he had made to lead forces to the succour of Dattaji Scindia.*

---

*No. 55*] [*Date of receipt 25-12-1755*

श्री.

छ २० सफर.

[1]शेवेसी विज्ञापना. राजे माधोसिंग जयेनगरकर याजकडें बिजेराम पुरोहित बिजेसिंगाकडोन जयेनगरास गेला आहे. त्यावरून त्यानी आपल्या फौजा जमा करून अनरुधसिंग याजबराबर नरायेणावर व रामगडावर जगंनाथ साहा याजबराबर फौजा व तोफखाना पाठविला. त्याचे मुकाबलियास येथून राजश्री राणोजी भोईटे पाठविलें होतें. परंतु त्याची फौज भारी, आम्हाकडील थोडकें, हें त्यानीं वर्तमान यैकोन अनरुधसिंग याने नरायेणाहून कूंच करून रामगडावर आला. जगंनाथ सा आपण येका ठिकाणी जालें. हे वर्तमान आम्हास कलताच येथून राजश्री नरसिंगराव सिंदे व खानाजी जाधव याजबराबर आपली फौज देऊन, व सवाईराम भंडारी रामसिंगाकडील, त्यासही समागमें देऊन, रवाना केलें. राणोजी भोईटे व हे येकत्र आल्यानंतर त्यानी संदर्भ लाऊन सलूखाच्या गोस्टी बोलू लागलें. त्याच्या याच्या भेटी आस्विन * * * *

¶*Autograph letter of Jankoji Scindia (second sheet missing) with reference to the movements of Madhosing's forces.*

---

*No. 56*] [*January 1756*

श्री

* * रबिलाखर.

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान.

स्वामीचे सेवेसी.

विज्ञापना. या मोहिमेमुळें कर्ज फार जालें. आगरेयांच्या सावकारात पत चांगली होती व रा॥ गोविंद बलाळ याणी उपराळा सरंजाम पैकीं व कर्जाऊ उभारणी केली, म्हणून मोहीम सिधीस नेली. सुरजमल जाटाच्या चितापासून आम्हास दगा करावा, पुत्र दहा हजार निवड करून व माधवसिंगाचा बकसी

---

१ पत्र जनकोजी सिंद्याचें. हस्ताक्षर सर्व स्वत:चें. एकच बंद एवढा उपलब्ध झाला.

मिळोन कोटे तरी दगा करावा, ऐसे होते. परंतु स्वामीचा प्रताप थोर. सेवकानेंच त्यांचा मुलुक मारून त्यांच्या उरावरून आलों. त्याणीच सेवकाची दहशत खादली. स्वामीची कृपा चितापासून मजवरी आहे ते कृपेनें जेथं जाईन तेथें स्वामीचा नक्ष राखीन. स्वामीने खानजादावरी अधिकोतर कृपा करीत असीलिया सेवकापासून मोठी मोठी चाकरी होऊन येईल. खासगत वर्तमान तरी आमच्या फौजेत एकाच्या चितांत नवतें जे मारवाडांत जावें. मारवाडांत पाच सेर दाणे व एका रुपायाचें गवत एका घोड्यास पुरेना. पाणी दीडशे हातावरील व मार्ग कठीण. मध्ये आडवे जाट कछवे वगैरे फौजा. येवढे संकटात न जावें; अंतरवेदीत असावें; परंतु राजश्री जयाजीआपासारिखा सरदार मारिला गेला. रा॥ दताजी सिंदे यांची पत्रें नाना प्रकारचीं आलीं. मुख्य स्वामीचे निरोपाचे समईहि मजला आज्ञा केलीच होती व रा॥ आपाहि माझा हरएकविसीं भरंवसा राखीत होते. या गोष्टीवरी नजर देऊन आपले सर्व स्वार्थ एकीकडे ठेऊन जिवाचा संकल्प करून कर्ज जेथवरी मिळेल तेथवरी मेळऊन येऊन पोहोचलों. येथें आल्यावरी राजश्री जनकोजी बावा व दत्ताजी बहुत संतोषी जाले. स्वामीचा पुण्यप्रताप; तरी पुढें याउपरी उत्तमच मनसबा घडोन येईल. गोहदकर जाट याणी आतां आम्हांसी सलूख चांगला केला. फौज चाकरीस सांगाते दिल्ही आहे; व निमे मुलुक वांटून द्यावा, त्याच्या वाटण्या केल्या आहेत. याउपरी गोहदकराविसी तेथे कोणी पुण्य[1] वेचील तरी स्वामीनी ध्यानास न आणावें. भदावरकर राजे यांस टिका[2] करून हत्ती घोडा वस्त्रे सिरपाव श्रावणमासीच दिल्हा. हती घोडा सिरपावाचे परभारे दहा हजार निराळे करून, निवळ सरकारची नजर पंनास हजार रुपये करून, सहा महिनियांचे मुदतीने सावकारी निशा आम्ही करून घेतली. याखेरीज त्याणी आम्हांस कांही कबूल करून टीप जेष्ठ मासचे मुदतीची करून घेतली आहे ते मुदतीस त्यापासून घेऊन, तेहि कलम सरकारचे सरकारांत जमेस येईल. परंतु रा॥ नारो शंकर त्यासी आदावत करितील, तरी त्यास स्वामीनी ताकीद करून भदावरकरांस गौरसीचे पत्र पाठवावें. नारो शंकर यांचे कारकून आम्ही बोलाविले. त्याणी साफ उत्तर पाठविलें जे राजा भिकारी आहे, दाहा पंधरा हजार रुपये करार कराल तरी आम्ही येऊं, नाहीतरी तुम्ही जाणा ते जाणा. मग आम्ही परभारें केले. सरकारचे जाले तेहि सरकारचें व आम्हास देऊं केले तेहि सरकारचें. याप्रमाणें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This appears to be Antaji Mankeshwar's letter (first two sheets missing) describing his march towards Marwad to the help of the Scindia.*

---

१ पुण्य वेचणें = वाईट सांगणें, कान भरणें. २ टिका करणें. = तिलक लावणें.

*No. 57]* *[13-1-1756*

**श्रीमोरया**

**राजश्री सखारामपंत गोसांवियांसी**

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो॥ मल्हारजी होलकर दंडवत विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत आसिलें पाहिजे विशेष. पूर्वी आपणाकडून पत्रें येत गेली कीं देशास यावें. इकडील मोगलाचे पारपत्य जाल्यानंतर आवघ्या फौजा हिंदुस्थान प्राते जाऊन बंदोबस्त होईल. यास्तव राजश्री गंगाधरपंतास वारंवार पत्रें पाठऊन त्यांस बोलाविले. त्यानीं तिकडील सारश जसे तसे राखून इंदुरास आले. तदनंतर देशास यावयाचा विचार करून कूच करायवयाचा निश्चये ठराविला. हे बातमी माधोसिंगास कलताच फौज रवाना केली, ते चमले तीरास आली. मागाहून आपण खासा येऊन मालव्या प्रांतीचा आमल उठवावा, येसा प्रसंग विलक्षण देखोन इंदुरीहून कूच करून पीडावियापरीयेत आलो. माधोसिंगाची फौज पुढें आली आहे. त्याचे सिष्टकृत्य करून पुढें फौज रवाना करून आम्ही देशास सत्वरीच येत आसों. माधोसिंग वगैरे रजवाडियांचे पारपत्य ईश्वरकृपेने सर्व होऊन येईल. आम्हांस श्रीमंताचे पायावाचून दुसरा विचार नाहीं. परंतु इकडील प्रसंग विलक्षण जाणून महिन्याभराचा गुंता जाला. हें कार्य उरकून अतिसत्वर देशास येत आसों. सविस्तरार्थ श्रीमंताचे पत्री लेखन केले आहे. रा॥ छ १० रबिलाखर बहुत काये लिहिणें हे विनंति.

¶*Malharrao Holkar writes from Indore to Sakharam Bapu at Poona that he had been unavoidably delayed in carrying out his intention of going speedily to the Deccan ; he was first going to prevent the mischievous moves of Madhosing.*

---

*No. 58]* *[11-3-1756*

**श्री**

नक्कल बमोजीब असल.

**राजश्री नारोपंत गोसांवियांसी.**

ℰ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे दंडवत विनंती. येथील कुशल ता॥ छ १७ जमादिलावल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत आसावें. विशेष. प्रांत अंतरवेदीत सरकारच्या आमलास दिलीकडील मोगलानें व गवारानें फिसाद केली. त्यास तंबी करावयासी राजश्री गोविंदपंत व राजश्री हरीपंत हे उभयतां फौजसह जाऊन, मोगलास मोडून लुटून घेतला. परंतु

आमलाचा बंदोबस्त उत्तम प्रकारे जाला पाहिजे, सबब आपण आपल्या फौजेसह-वर्तमान प्रांतमजकुरी जाऊन मानिले व आपण एकत्र होऊन एका विचारें राहून अंतरवेदीप्रांतचा अमल सरकारचा, सुरळीत खुलासा होय तो अर्थ करावा. श्रीमंत स्वामी यांणीं आपणास मारवाडांत रवाना केले म्हणोन अंतरवेदीत जावयासी आनमान केलात म्हणून ऐकिले. तरी इकडे आपण तूर्त न यावें. आम्हीच इकडील गुता लौकरीच उरकोन आपणाकडे येतो. याउपरी दिवसगत इकडे लागत नाहीं. कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे हे विनंति.

¶*In this and the following letter Jankoji writes to Naro Shankar from Marwar that he was soon starting to go to his help with his forces to effect order in the Doab.*

---

*No. 59*] [*15-3-1756*

**श्री.**

असल प्रमाणे नकल

**राजश्री नारोपंत गोसांवी यासी**

अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री जनकोजी सिंदे दंडवत विनंति येथील कुशल ता छ १४ जमादिलावल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जावे विशेष. प्रांत अंतरवेद येथे सरकारचा अमल आहें त्यास हाली दिलीकडून वगैरे फिशाद जाली असें. त्याचा बंदोबस्त उतम प्रकारें जाहाला पाहिजें. सबब राजश्री गोविंदपंत प्रांत मजकुरी गेलेच असेंत. आपणहि आपल्या फौजेसहवर्तमान अंतरवेद प्रांते जाऊन, राजश्री गोविंदपंत व आपण सामील होऊन, येका विचारें राहून, प्रांत मजकूरचा अंमल सरकारचा खुलासा होय तो अर्थ केला पाहिजे. श्रीमंत स्वामी यांची अज्ञा अपणास जें, अम्हाकडें मारवाडांत कुमकेस जावें तरी तुम्ही तूर्त इकडे न येणे. इकडील गुंता थोडक्याच दिवसांत उरकोंन आम्हीहि प्रांत मजकुराकडेच येतों. कळलें पाहिजें. पा जलाली व पा बिलराम कासगंज प्रांत अंतरवेदी हे माहाल पूर्वी रा बापूजी माहादेव व दामोदर माहादेव वकील याजकडे श्रीमंताकडून होते. हाली त्यांजकडून दूर करून राजश्री अंताजीपंत यांजकडे श्रीमंत स्वामीनीच दिल्हे अहेत. तेथे मानिलेनी अंमल राजश्री बाबूराऊ दामोदर यासी ठेविले अहेत. तेथील अमलाविसी जेणेप्रमाणे सांगतील त्याप्रमाणे साहित्य करून, सरकारचा अंमल खुलासा मशारनिलेकडे चाले तें केले पाहिजें. वकिलाची फिशाद दूर होय ते करावें. बहुत काये लिहिणें हे विनंति *

¶*Jankoji's letter to Naro Shankar, saying that he was shortly coming back towards the Doab.*

---

* पत्र नारो शंकरास असावें.

*No. 60]* *[16-3-1756*

**श्री.**

श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी विनंति सेवक नारो शंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायेत फालगुन शुध्ध पौर्णिमा स्वामीचे कृपाद्रिष्टीकडून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. यानंतर सेवकाकडील वर्तमान तरी देसीहून दरमजलीनें झासीस अलो. महिनापंधरा दिवस राहून संस्थान सिवसे येथील मामलतीचा बंदबस्त करारवाके स्वामीचे आंज्ञेप्रमाणें केला. फौजेची समजाविश केलीं आणि मारवाडांत जावयाबदल कूच करून नरवरेंस अलों तों राजश्री समशेंर बहादर याजकडून पत्र आले त्यासमागमे स्वामीचा हातरोखा अला. तेथे अज्ञा जें, राजश्री समशर बहादर यांस सामील होऊन जाणें. त्याजवरून राजश्री समशर बहादर याचा मार्ग यथे कांहीं दिवस पाहिला. इतकियांत राजश्री दताजी सिंदे याजकडून दोन पत्रें आली. त्याणी लिहिले जें. मारवाडचा सला जाहाला. इकडील गुंता उरकून आम्हीच त्या प्रांतास येतो. तुम्ही मारवाडांत न येणें. अंतरवेद प्रांती बखेडा जाहाला आहे. तिकडे जाऊन मुल्खकाचा बंदबस्त करणें. त्याजवरून अम्ही येथून माघारे फिरोन अंतरवेद प्रांतास जात असों. फालगुन शुद्ध सतमीस येथून कूच केले. वर्तमान सेवेसी कळावें याजकरिता लिहिलें. राजश्री दताजी सिंदे याजकडील दोनी पत्राच्या नकला करून सेवेसी पाठविल्या असेंत, त्याजवरून विदित होईल. पुढें स्वामीची अज्ञा होईल तेणेप्रमाणे वर्तणूक होईल. खिचींवाडेयाची मामलत स्वामीनी सेवकाकडे द्यावी यैसा विचार होतां. परंतु ते समई मर्जी न पाहिली. मामलतीचा बंदबस्त मनास अणितां कांहीं नाहीं. पेस्तरसालापासून मर्जीस अलें तरी मामलत सेवकाकडे सांगावी. अज्ञेप्रमाणें बंदबस्त होईल. सेवेसी कळावें. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना. *

---

*No. 61]* *[16-3-1756*

वैशाख शुद्ध १०

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.**

विनंति सेवक नारो शंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञपना. येथील कुशल ताा. फालगुन शुद्ध पौर्णिमा स्वामीचे कृपादष्टीकडून सेवकाचे वर्तमान येथास्तीत असें. यानंतर सेवकाकडील वर्तमान तरी देसीहुन दरमजलीनें झासीस

---

* मारवाडस्वारी उरकल्यानंतरचें पत्र.

आलों. महिना पधंरा दिवस राहून संस्थान सीवायें येथील मामलतीचा बंदबस्त स्वामीच्या आज्ञेप्रमाणें केला व फौजेची समजावीश केलीं, आणि मारवाडांत जाण्याबदल कूच करून नरवेंरेस आलों. तो राजश्री समशेरबहादर यांजकडून पत्र आलें. त्या समागमें स्वामीचा हातरोखा होता. तेथें * * * * * * त्याजसमागमें सामील होउन जाणे. त्यावरून त्याच्या येणियाचा मार्ग काही दिवस पाहिला. इतकियांत राजश्री दताजी सिंदे याजकडुन दोन पत्रें एक ज्ञासुदासमागमें व एक कारकुनासमागमें आली. त्याणी लिहीले जें मारवाडची सला जाहला. इकडील गुंता उरकून आह्मीच त्या प्रांतास येत असो. तुह्मी मारवाडात न येणें. अंतरवेद प्रांती बखेडा जाहला आहे, तिकडे जाऊन मुलुकाचा बंदबस्त करणें. त्याजकडील कामकाज उरकले. न येणे ह्मणुन लिहीले असता उगेच जावें हेहि उतम नाही. याजकरितां राजश्री दत्ताजी सिंदे याच्या पत्रावरून आह्मी येथून माघारें फिरोन अंतरवेद प्रांते राजश्री गोविंदपंताकडे असों. फाल्गुन वद्य सतमीस येथून कूच केले. वर्तमान सेवेसी विदित व्हावें ह्मणुन लिहीले असे. राजश्री दताजी सिंदे याजकडील दोन पत्राच्या * * ( नकला करून ) पाठविल्या असेत. त्याजवरून * (श्रु) त होईल. याजउपरी स्वामीची आज्ञा येईल तेणेप्रमाणें वर्तणुक होईल. अंतरवेद प्रांतीचे वर्तमान राजश्री गोविंदपंताची भेट जाहालियावरि सविस्तर सेवेसी वर्तमान लिहोन पाठउ. कलावे बहुत काय लि॥. हे विज्ञापना.

¶*In this and the foregoing letter Naro Shanker writes from the North to the Peshwa that he was proceeding to the Doab in order to restore order in that province along with Bundele.*

---

*No. 62]* *[16-3-1756*

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंति सेवक दताजी सिंदे कृतानेक दडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ता॥ छ ९ साबान मो रुपनगर स्वामीचे आसीर्वादे यथास्थित असें विशेष. आज्ञापत्र छ १७ जमादिलाखरचे पाठविलें ते छ ३ साबानी सादर जालें. तेथें आज्ञा, बिजेसिंग राठोड याचा तह जालाच असेल. नसल जाला तरी हरप्रकारे कार्यभाग उरकावा. अतःपर स्वारीचे दिवस राहिले नाही. सत्वर कार्ये उरकावे म्हणोन आज्ञा. ऐसियास बिजेसिगानी तह केल्याचे वर्तमान पूर्वी सेवेसी तपशील-वार लिहीलें आहे. त्यावरून विदित जाले असेल. आज्ञेप्रमाणे राठोडाकडील

गुंता उरकोन रूपनगरास दाखल जालो. मोर्चे लाविले आहेत * * * * * ले आहेत. त्यास आम्हास हातधोंडियाचे तफावत आहे. राजश्री समशेर बहादर येथें येऊन दाखल जाले. त्यांच्या आमच्या भेटी जाल्या. त्यानीहि मोर्चे लाविले आहेत. अत:पर येथील कार्यभाग स्वामीचे प्रतापेकरून थोडके दिवसात उरकोन मागाहून तपसीलवार सेवेसी विनंतीपत्र पाठऊन देऊ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

---

*No. 63*] [*9-5-1756*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान**

**स्वामीचे सेवेसी**

विनंति सेवक जनकोजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचें वर्तमान तागायत छ ९ साबान मुकाम रूपनगर स्वामीचे आसीर्वादें येथास्थित असे विशेष. आज्ञापत्र छ १७ जमादिलाखरचें पाठविलें तें छ ३ साबानी सादर जालें. तेथें आज्ञा सावनुरांत राजश्री मुरारराव घोरपडे व मुजफरजंग आहेत. त्यास बाहेरून मोर्चे लाविले आहेत. बहुत तंगचाई धान्याची चारापांणीआदी करून जाली आहे. सलाबतजंगहि श्रीकृपेनें आम्हांकडेच येतील. सत्वरच कार्येसिधी होईल. आपणांकडील वृत्त तपसिलवार लिहिणें म्हणोन आज्ञा. ऐसियास मुरारराव यास तंबी उत्तम प्रकारें पोंहचलीच आहे. इतके दिवसांत नवाब सलाबतजंग आपणां सनिध आले नाहीं. इतकियांत त्याचें सिस्टकृत्य जालें असेल. कदाचित नसलें जालें तरी स्वामीचे पुणेप्रतापापुढें त्यानीं काये करणें? केल्या कर्माचा फलत्कार पावले असतील किंवा पावतील. वरकड येथील वर्तमान अलाहिदा पत्रीं कासिदाबराबर लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. प्रस्तुत रूपनगरास छ २२ रजबीं सुक्रवारीं मोर्चे लाविले आहेत. मोर्चे हातधोंड्या मानी गेले आहेत. राजश्री समसेर बहादूर वैशाख सुध शस्टी बुधवारीं येथें येऊन दाखल जाले. त्याच्या आमच्या भेटी जाल्या. त्याचेहि मोर्चे लागले आहेत. अत:पर स्वामीचे तेजप्रतापेंकरून येथील गुंता थोडके दिवसांत उरकोन मागाहून सेवेसीं तपसीलवार लेहून पाठऊं * सेवेसीं श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Jankoji Sinde to Peshwa from Rajputana, Marwar.*

No. 64] [27-9-1756

श्री.

पौ. छ १६ जिल्हेज.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री तुबाजीपंत बाजी स्वामीचे सेवेसी पो. गोविंद बलाल कृतानेक सां. नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा. आस्वीन शुध त्रितीया जाणून स्वकीये लिहीत असिले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. कुशलवृत कलोन संतोष जाला. येसेच सदैव पत्री संतोषवीत असावे. आम्ही आपले आसो. या प्रांती वजिरानी बखेडा करावयाचा विचार केला होता. त्याजवरून आम्ही आगरियाकडे येऊन वजिरांसी सलुक करून माघारे फिरोन इटावेयाकडे आलो. इकडील बंदोबस्त करून देशास जाऊ. वरचेवर आपणास लिहित जाऊ. बहूत काय लिहीणे. कृपा लोभ असो दिजे हे विनंती.

¶*Govind Ballal writes about his having settled his differences with the Vazir.*

---

No. 65] [1-9-1756

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक जनकोजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा छ ९ जिल्हेज मो आवंतिकापुरी स्वामीचे आशिर्वादे येथास्थित असे. विशेष. आज्ञापत्र छ २० सवालचें पाठविलें ते छ १४ जिलकादी पावलें. तेथें आज्ञा, मिरजेहून दरकूच करून खासास्वारी छ २० सवालीं पुणेंग्रामीं दाखल जाली, व तुम्ही कोठें आलां, काय वर्तमान, कधी येणार, हे सविस्तर वृत लिहिणें, म्हणोन आज्ञा. ऐसीयास खासा स्वारी पुण्यास दाखल जाली हें वर्तमान एकोन परम संतोशावाप्ति जाली. आम्ही मो मजकुरी लोकांचे समजाविसीचें कार्य चाली लाविलें आहे. तीर्थरूप राजश्री काका कोट्याकडे गेले आहेत. तेहि तेथील गुंता सत्वर उरकून येतील. तदनंतर कोट्याकडील सविस्तर वृत्त मागाहून सेवेसी लेहून पाठऊं व तीर्थरूप आल्यानंतर येथील गुंता राहिले लोकांचा उरकोन अति सत्वरच स्वामी दर्शनास येतो. सेवशी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Jankoji Scindia writes to the Peshwa from Ujjain—all in his own hand—that he was soon returning to the South and execute the wishes of the Peshwa to his utmost.*

No. 66] [15-10-1756

श्री.

पौ छ ६ सफर

श्रीमत् मातुश्री सगुणाबाई साहेबाचे शेवेसी

विनंती सेवक आताजी माणकेस्वर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ता। आश्विन वद्य सप्तमी मुकाम येमुनातीर सुखी आसो. साहेबी कृपा करून आसिर्वादपत्र पाठविले, पावोन सतोश जाला. सेवकाकडील वर्तमान, मारवाडची स्वारी करून ग्वालेरीस आलो. सिंदे उजनीस गेलें. तों दिलीहून पातशाहा वजीर आतरवेदीत उतरले. सरकारच्या मुलकाची अमल उठवावा, याप्रा। पत्रे वजिराची आम्हास आली. वकिलानी आम्हास लिहिले. रा। गोविंदबलाल याची दाहा पत्रे आली. जरी तुम्ही देशास गेले तरी आतरवेदीचा अमल उठतो. त्याजवरून बुनगे ग्वालेरीस ठेवून सडे फौजनसी अगरियास जाऊन, तीन महिने राहून, पातशाहा वजिराकडे वकील पाठऊन, त्याची आपला सलूख केला. दाहा बारा हजार फौजनसी आम्ही त्याची चाकरी करावी, त्यानी सरकारच्या मुलुकास तिलमात्र ढका न लावावा याप्रा। शफतपूर्वक लिहीलीपुसिली जाली. मग आम्हास आगरियाचे मुकामी पातशाहानी हती घोडा जवाहीर सीरपाव पाठविला. तो मस्तकी वदोन आम्ही फौजत ग्वालेरीस आलो. दसरा करून आता येमुनातिरास आलो. फौज बारा हजार आमची आहे. आम्ही पातशाहा वजिरापासी दाखल होतो. आतां बिघाडाची काडीमात्र चिता नाही. आम्ही त्याजवल असलियाने कदापि अतर पडत नाही. साहेबास कलावे. रा। गोपालराऊ गणेश, हरी विठल, आजी दोन महिने देशास हा कजिया होताच निघोन गेले. रा। गोविंद बलालहि आता सलूख जालियावरी देशास आम्ही रवाना केले. नारो शंकर झासीस आहेत. समसेर बाहादर मालवियात आहेत. सिंदे उजनीपर्येत गेले. तों मार्गे कोटीयाचा राजा माहाराव मृत्य पावला. त्यास पुत्र नवता. मग येकतांच सडी फौज करून दताजी सिंदे कोटीयास जाऊ वेढले. चालीस लाख रुपये नजर केली. वीस लाख वसूल घेतला. विसाच्या वांके[१] घेऊन उजनीस आले. आता दिपावली करून देशास जाणार. श्रीमंत रा। पंतप्रधान पुर्णीयातच आहेत. श्रीमत रा। दादासाहेब

---

१ करारनामा.

पुणीयातच आहेत. होळकर पुणीयातच आहेत. दिपावली करून हिंदुस्थानास श्रीमत रा दादासाहेब व होळकर येणार. आम्ही आखेरसालपर्यंत पाताशाहा-पासीच आहो. तेथे सर्व हुकूम साहेबाचाच आहे. जे आज्ञा सेवकास करणे ते करीत असा. मी हुकुमी चाकर. घरचे खानोजाद आहो. साहेब खावंद आहेत. आज्ञा करावी. श्रीमंत राजश्री नाना साहेबाची आज्ञा छावणीस राहावयाची जालीच आहे. पुढे होईल वर्तमान ते सेवेसी वरचेवरी सविस्तर लिहीत जाऊन. कृपा करून पत्री सेवकाचा साभाळ करावयासी स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Antaji Mankeshwar's letter to Sagunabai, widow of Peshwa's younger brother Janardan Pant. She was at this time on a pilgrimage to Benares. The letter mentions where and how the Maratha Sardars in the North were occupied. Samsher Bahadar was at this time in Malwa.*

---

*No. 67*] [*19-12-1756*

**श्री.**

छ २९ रविलाखर

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान**
**स्वामीचे सेवेसीं.**

विनंति सेवक बापूजी माहादेव व पुरुषोत्तम माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञाप्ति. येथील कुशल तागायत छ २६ माहे रबिलौवल मुकाम इंद्रप्रस्थ स्वामीच्या कृपावलोकनेंकरून येथास्थित असे विशेष. इकडील वृत्त विस्तारें छ ११ रबिलावलीं विनंतीपत्रें पाठविलीं आहेत त्यावरून श्रुत होईल. हलीं येथील वृत. नजिबखानाचा प्रकार दिसतो कीं सर्वांसीं वचन प्रमाणाची तजविज आहे. याचें कारण हेंच कीं कांहीं शुज्यातदौले व नजीबखानामधें नाखुशी जाली आहे व कांहीं पातशाहाची मर्जी नाहीं कीं, नजिबखां इत्का दिलींत मुखत्यार राहे हे गोष्ट उत्तम नाहीं. यास्तव हे आपले बंदोबस्तास लागले आहेत. तथापि ठरेल ते विनंति करूं. वरकड वृत्त सविस्तर पुर्वणीपत्रावरून श्रुत होईल. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.

¶*News-letter from Hingne to the Peshwa communicating the attitude of Najibkhan.*

---

१ नम्रसेवक.

No. 68] [March 1757

श्रीपांडुरंग

पुा. राजश्री भास्कर मुरार स्वामी गो

विनंती उपरी. मुख्यपत्री व तुमच्या पत्री गुदस्तास कमी आदा खंडणी तपसीलवार लिहून पाठवणे, तरी गुदस्ताचा आकार असता तरी इतकी फिकीर करणेच न लागती. मग नारोपंतबाबास वाईट कोण कशास म्हणते? जमेस ठिकाण नाहीं. वसुलास ठिकाण नाहीं. बाकी काढुन कबजे घेउन गेले ते समई कबजे न घ्यावी तरी ठाणी न येत. मुलुख न ये. अखर आश्वीन. रयेत खरीफ खाऊन गेली. पुढे रबीवर काये करावे, यैसे अडचणीत येऊन कबजे दिली. बाकी भरून देऊ. यैसे मुख्याजवल विनंती करितात. तरी बारा वर्षे मनमानेसी पैदास्त केली. आम्हास त्या मामलतीप्रमाणे बारा वर्षे न लगेत. चौ वर्षात दाहा वीस लाख देउ. काछवाधार भदावर दोन्ही तालुके भारी. अबदली मथुरेवर. हे पलोन येऊन झासीतील काबीले काढावे. कौली मुलुक मारावा हा कोठील इनसाफ? जेथे गाव नाही, वस्ती नाहीं तेथील बाकी कोणास पुसावी? ऐवज जमा वसुल नाहीं, मग बाकी कोण्या हिशोबाची. आता ते म्हणतात जे बाकी भरून देतो. त्यास श्रीमंताकडुन आज्ञा करवावी. जे तिसाला देहविंदेवी जमा खंडणी त्याचा वसूल तेरीखवार किर्दी सिलीकबंद आणणे. हिसेबमोजीब[1] तिसाला बाकी निघेल ते येथे रुबरु लिहून पाठवितो. वसूल करितील. येणेप्रमाणे तिसाला हिशोब आणवणे. हा मजकूर श्रीमंत स्वामीस परिछिन सांगणें. ठाणी गेली. मुलकांत फितूर जाहला. रयत माल खाउन गेली. सिबंदी खर्च ज्याजती पडला. हे नुकसानी पुसणे. ते म्हणतील जे ठाणी गेली तरी आम्ही काये करावे. तरी याच्या स्वाधीन ठाणी असोन मवासीनी[2] कसी घेतली, आमच्या स्वाधीन केली असती? मग जाती तरी आम्ही जाब करीतो पुा. वरून कलेल.

¶*The following letters describe the confusion in the North resulting from Abdali's invasion.*

---

१ बरहुकूम २ लुटारू.

No. 69] [10-4-1757

## श्रीकृष्णो जयेती.

### श्रीमंत माहाराज राजश्री रघुनाथ राऊ दादा स्वामीचे सेवेसी.

शुभचिंतक स्नेहाकित राजा केशवराऊ कृतानेक नमस्कार विनंति उपरी. येथील क्षेम ताा छ २० माहे रजब मुकाम झासी जाणुन स्वकुशललेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. आम्ही श्रीमंतांचे विलेचें (?) श्रीमंताच्या फौजा दिलीस आणविल्या व त्या जाबसालांत आम्ही आहो. याजकरितां आम्ही आबदालीपासी वगैरी लोकापासी बदनाम होऊन चुकलों. जरी आबदालीचे हाती पडतो तरी प्राण व धर्म न राहाता. याजकरिता दिलीची घरें दारें भरली टाकून, प्राणमात्र घेऊन निघालों ते झासीस येऊन राहिलों. आतां जोवरी माहाराजाचा जये होऊन अबदालीचे निरसन होये तोवरी दिलीस आम्हास जाणें होत नाहीं. तेव्हाच जावे जेव्हा माहाराजाचे आधिष्टान दिलीस होईल व आम्हास माहाराज बोलाऊन हवेलीया व जागा व खिद[१]मता यथापूर्वक देवितील. हा विस्तार राजश्री बलवंतराऊजी सागितील त्याप्रमाणें करून मजला लिहावें. तोवरी झांसीस आहे. अबदाली परतून गेला. मेला म्हणताती. स्वामीचे पुण्यप्रतापे हेहि होऊ शके. विश्वाचे भाग्य असेल तरी असेच होईल हे विनती.

*¶One Keshavrao, who had fled from Delhi to save his life from the atrocities committed by Abdali in Delhi, writes to Raghunathrao how eagerly he expects Maratha rule to be established there.*

---

No. 70] [26-4-1757

## श्री.

छ १९ साबान.

### श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक दत्ताजी सिंदे कृतानेक विज्ञापना. सेवकाचे वर्तमान छ ७ साबान पर्यंत यथास्थित असे विशेष. आम्ही लस्करांत असतां स्वामीस विनंती केली कीं एक किला मुलें माणसे ठेवावयास आम्हाकडे द्यावा म्हणोन विनंती केली. स्वामिनींहि मान्य केले, कीं हरएक जागा नेमून देऊं. यैसियांसी आम्हापासून

---

१ सेवा.

जवळ किला सिवनेर आहे. तर कृपा करून ते स्थळ आम्हाकडे नेमून दिल्हे पाहिजे, म्हणजे तेथील बंदोबस्ती आज्ञेप्रमाणे केली जाईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापी.

*¶Dattaji Scindia, at this time in the Deccan, asks the fort of Shivner from the Peshwa as a place of safety for keeping his family. This proposal apparently did not fructify, since later on the Scindias established their posts at Jambgaon.*

---

*No. 71]* *[1757*

**श्रीकृष्णो जयेती.**

सेवेसी राव बदरीनाथ सां नमस्कार विनंती उपरी. तीर्थरूपाचे लिहिल्यावरून सर्व वर्तमान विदीत होईल. महाराजाचे सेवेसी विनंती करणे ते करीत असतों. हिंदुस्थानचे काम पातशाही हलकी जाली, याकरितां बिगडत चालले. अबदाली प्रबल होऊन लूटून गेला म्हणून पठाण मात्र चहुकडे उपद्रव करितात. परिणामी अबदाली यांसहि भक्षील. एका पठाणास तरी जातीवेळेस भक्षिले. निजाबत-नामे रुहेला येती वेळेस लाहोरचे वाटेवर अबदालीस पहिलेच जाऊन भेटून आपला गढ किला व मुलूक त्याचे हातातून वाचविला होता. जाती वेळेस अबदालीने त्या गढास मोरचे लाऊन घेऊन वीसा लक्षाची दौलत घेऊन पुढें गेला. दुसरे महमद-शाहाच्या बायेका मलिकाजमानी व साहेबमहाल वगैरे त्याजबरोबर गेल्या. दोन-शत ऊट मालाचे आपले समागमे दिलीहून नेले ते द्रव्य व जवाहीरहि अबदालीचेच कपाळचे होते. ते गेले. अबदालीचे सरकारांत अठावीस हजार ऊट व हाथी व खेचरे व गाढवे व बईल व छकडे व गाड्या व यरेदी[1] मालाची लादली गेली. या शिवाय ऐशी हजार स्वार प्यादे त्याजसमागमे होते. त्यांही नेले ते वेगळे. च्यार शहरें दिली, आगरा, मथुरा, वृंदावन सारिखी त्यानें धून नेली. तेव्हां इतकी बारबारदार[2] त्यास लागली म्हणोन कोणाचे घरी घोटा ऊट त्यानें सोडला नाहीं. परिटाचे गाढवहि सांपडले तेहि घेऊन गेला. त्याचे स्वार जातीवेळेस पाईं गेलेत. आपले घोड्यावर माल लादून घेऊन गेलेत. तोपखाना जाटाचे गढ घेयास आणिला होता, तोहि बईल मालाखाले लादले गेले म्हणून सोडून गेला. तो जाटाने आपले गढात नेला. दिलीमधें कोणापासीं तरवार सोडली नाहीं. तोपखाना पातशाही किल्याचे बुरुजावर होता तो निवडून घेऊन गेला. बाकी

---

१ यारीद / यारद्या=लहान घोडे. २ ओझीं वाहून नेणारे.

खाले टाकिला व मोडला. हिंदुस्थानचे पठाणाचाहि तो आशनाव[१] नाहीं. दोन दिवस वाट कळायाकारणे व भेद पुसायाकारणे जो कोणी येऊन भेटला त्यास जवळ येऊ दिधले. पठाणाही त्याचे नावाने आपले आपले तालुकीयाकडे उपद्रव करून मुलुक लुटला. अबदाली जवळ त्याचे काहीं चालत नाहीं. ते याचेही भक्षक आहेत. कोण्ही आणीक हातास न आला तरी यांसच खाणार असे ते आहेत. तरवारेचे बल त्याजमध्यें फार. कावादावा त्यांस येत नाहीं. नीट चाळीस कोस धावणार. महिन्याभराच्या सीव्या नाना[२] खाणार आहेत. यावरशी तरी गेलेत. पुढे यावेसे आहेत. याचा उपाये माहाराजच करतील. याच वेळेस महाराजांही नीट कामाचा तरदूद केला असता तरी पुढें सोपे होते हे विनंती.

*¶The writer Badrinath describes the havoc created by Abdali, adding that he did not even spare the Pathans (Rohillas) although they were responsible for calling him in.*

---

*No. 72]* *[Beginning of April 1757*

श्री

• सेवेसी विज्ञापना. आतांच बातनीची जोडी आली. अबदाली दिलीसनिध झिलीवरी[३] गेला. तेथून कूच पुढे जाले. या उपर इकडे बतनीची चिठी आली सुरजमलाचे सांडणीस्वारहि झिलावरील कूच पलीकडे गेलीयावरी आली. या उपरी मग राजे जुगुलकिसोर व अबदालीचा येलची साता लाखा साठी ठेवून घेतले होते त्यास कपर्दिका न देतां वाटे लाविले. कवडी न दिली. त्यानी सुरज-मलाजवळ कौल मागितला कीं आम्हास दिलीपर्यंत दगा न करावा आणि गेले. गाजदीखान अगोदर आलमगीराचे दोघे पुत्र हाताखाले तोरों[४] घालून अंतर-वेदींत गेला. त्यासमागमे गाजदीखानाची फौज खासगत चार हजार होती. दोन हजार फौज अवदालीची चौकीस त्याजवरी होती-ते गाजदीखानापासून निघोन अवदालीस मिळावयास गेली. यानी चार हजार फौजेनसी कूच करून फरकाबादेकडे गेले. बहुधा आलमगीराचा त्याचा बिघाड. दोघे पुत्र तोरे हती धरून गेला. अबदालीचा सरदार जगबादखान दोन हजार फौजेनसी वजिरावरी

---

१ आश्नाव=स्नेह, सख्य. २ नानाप्रकारच्या शिव्या हा अब्दाली महिनाभर खाणार.
* ही अब्दालीची तिसरी स. १७५६-५७ ची स्वारी असावी. अब्दालीनें केलेली लूट.
३ झिल नावाचा तलाव. ४ शह, सूत्र.

चौकीस होता तो निघोन गेला, याप्रमाणे बातनीची चिठी आली. पुत्र खजिना घेऊन जात होता तो आला. जाटाने काही लुटिला. अबदाली खासा मृत्य पावला येसे तहकीक नाही. परंतु कोणास पधरा रोज दर्शन नाही. तोफा मातबर व डेरे भरले टाकून दरकूच गेला याजवरून सर्व बोलतात. सवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The letter mentions news of the reverses Abdali met in his southern course and how he returned discomfited not having received a pie from the Jat.*

---

*No. 73*]

**श्री**

विनंती उपरी. आपण चिठी पाठविली. तेथें पातशाकडील ग्रहस्त आला आहे, तो उद्या रवाना करावा म्हणून लिहिलें. ऐशास रा॥ विठलपंत जेथें आहेत तेथेंच आहेत. त्यास बलाऊ गेले ते येतो म्हणून उत्तर आले. आपण कोस आदकोस कूच करितो म्हणून लिहिले त्यावरून आम्ही सुस्त राहिलों. बरें चिंता काय आहे? आपण आज पालखीत बसोन सत्वर यावें. अंबारीहि आणावी. हे काम आजच करावें. दिवस जातो. उद्या आपल्या आमच्या विचारे जेथे राहावयाचें होईल तेथें राहूं. पाऊस नाहीं. चौघटकाचें काम आहे. आळस न करावा. जरूर यावें. मार्ग पाहतों. जरूर यावें.• हे विनंती.

साहेब रायास निरोप आपण आलियाउपरी देऊ हे विनंती.

¶*An autograph letter of Sakharam Bapu, most likely addressed to Raghunathrao. It refers to some ambassador who had come from the Emperor.*

---

*No. 74*] [*16-5-1757*

**श्री**

**श्रीमंत राजश्री दादा साहेब**
**स्वामीचे शेवेसीं.**

विनंती सेवक पुरुषोत्तम माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञाप्ति. येथील कुशल तागायत छ २७ माहे साबान मुकाम इटावा श्रीयेमुना उत्तरतीर स्वामीचे कृपावलोकनेंकरून येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान पूर्वी सेवेसीं विनंती पत्रें पाठविलीं त्यावरून वृत्त श्रुत जालें असेल. हालीं स्वामीचें आज्ञापत्र

आलें त्यांत मजकूर कीं पठाण रोहिले व वजीर येमुना दक्षणतीर आले असले तर मजल दरमजल सत्वर येणे. जर उत्तरतीरीं असले तर न आणनें. तुम्ही निरोप घेऊन उठोन येणें. त्यास फरूकाबादेहून कूच करून रोहिले पठाण व वजीर फौजासहित इटावियास येमुनातीरीं दाखल जाले. उतरावयास नावा राजश्री बाळाजी गोविंदाकडून आणविल्या आहेत. इत्कियांत स्वामीचें आज्ञापत्र आलें. त्यावरून सेवकानें कूच केलें. त्यास वजिरानी आपला पुत्र पाठऊन आम्हांस फिरून आणून मुकाम करविला, आणि आम्हांसी बोलिले की म्या कोणेप्रकारें दोही सरदारासी हमवार[१] करून श्रीमंताचे चाकरींत रुजू केलें. आणि जवाहिरसिंगानें दाहा लक्षाची हुंडी अहमदखानास व हाफीजास नजिबखान व नागमल व दलेलसिंग यांचे मारफतीनें पाठविली. असेंहि असतां आम्ही त्याकडे लागूं न दिधलें. श्रीमंत स्वामीचे शेवेंतच रुजू केलें. शाहाकडून व फिरंगी पातशाहाकडून या सर्वांसी तोडून स्वामीकडे यासी केलें असतां स्वामीचा हुकूम या प्रकारें आला. त्यास मी तों स्वामीचा दोस्त आहे आणि स्वामीनी हिंदुस्थानचा बंदोबस्त केल्यावाचून दक्षणेस जावें हें योग्य नाहीं. या गोष्टींत आपला दबाव राहत नाहीं. म्यां बहुत राजकारणें दुरुस्त केलीं आहेत. राजे माधोसिंगास लेहून त्याची फौज स्वामीकडे शामसिंग नामें सरदार पाठविला तो स्वामीपासीं पावलाच असेल. माधोसिंगाचें खत वजिरास आलें तेहि सो. त्यानी पाठविलें आहे. त्यावरून श्रुत होईल. फिरंगियाकडे व पातशाहाकडे माझा भला माणूस गेला होता. तो सर्व कामें पोख्तगी करून शंभर स्वार व शंभर प्यादे तेलंगे घेऊन फरुकाबादेस आला. येका दो दिवसानी मजपासीं येईल. दुसरें वजिरानी सांगितलें की श्रीमंत दिलीकडे चालतील तर विसा लक्षाची टीप त्यानीं आपले खलित्यांत घालून पाठविली आहे. हे मान्य करून स्वारी ये प्रांतीं ये ते करावें. तिसरे अहमदखानासीं व हाफिजासी करार मदार करून घेतला कीं श्रीमंत स्वामी जाटाचे मुलकांत आले म्हणिजे जाटाचा मुलुख जप्त करून सरकारांत दाखल करूं आणि पठाण रोहिलेहि त्या मुलकाचे थोडसे उमेद्वार आहेत. स्वामीचें आज्ञापत्र आलें त्याजवरून वजीर बहुत दिलगीर जाले पनासा हजाराची रुपयांची तयारी करून येथवर आला. पुढें निगादास्त ज्यारी आहे. नावा येतील त्या वेलेस येमुना उतरून सेवेसीं हजर होऊं. हें राजकारण बहुत मेहनतीनें केलें आहे. श्रीमंत जर या रोखें येतात तर सर्वहि राजकारणें उत्तम होतील. नाहींतर भगवत इछा या प्रमाणें त्यानी सांगितलें. व विसा लक्षाची टीप लिहून दिधली ते सेवेसीं पाठविली असे. यांचें समाधान

---

१ हमवार = प्रसन्न.

करून आम्हीं निरोप घेऊन सेवेसीं येतों. सलाह असेल तें करणार स्वामी समर्थ आहेत. वजिरानी इतका विस्तार लिहिविला यास्तव सेवेसी विनंति लिहिली असे. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत हे विज्ञप्ति.

¶*Purushottam Mahadeo reports to Raghunathrao the keen disappointment that the Vazier felt on account of the changes that Raghunathrao effected in the management of the Emperor's affairs.*

---

*No. 75]* *[19-6-1757*

**श्री.**

पौ छ १४ सवाल

पु॥ चिरंजीव राजश्री दादा यासी आशिर्वाद उपरी. हिंदुस्थानांतील राजे यास कर्जपटीच्या ऐवजाविसी पत्रे पाठविली आहेत.

| | |
|---|---|
| २००००० | वसूल निा नारोशंकर——— |
| | १००००० बोडसेकर राजा |
| | १००००० दतियेकर राजा |
| | २००००० |
| ५००००० | जगतराज बुधेले वसूल निा हरी विठल |
| ६२५००० | अमानसिंग बुधेले वसुल निा गोविंद बलाळ |
| १००००० | भुपाळकर वसुल निा रामचंद्र बलाळ भुसकुटे |
| ५०००० | खेचीकर राजा वसुल निा विष्णु महादेव |
| १००००० | मंडलकर राजा वसुल निा महिपतराव कवडे |
| १५७५००० | |

येणे प्रमाणे पावणे सोळा लक्षाची पत्रें राज्यांस व सरकारचे कमाविसदारास लेहून पाठविली आहेत. त्यास कमाविसदार व राज्याकडील वकील आपणाजवळ आलेच असतील. त्यास कर्जपटीचा करार मदार करून वसूल घ्यावा. आपणाजवळ कोणी आले नसतील तरी या प्रमाणे पत्रे पाठऊन ऐवज वसूल करवावा. खेचीकरास राजश्री मल्हारबाकडून रगडून सांगितल्यावर रुपये देतील. * यावर ताकीद करावी. काही कार्य होईल. छ १ सवाल हे आशिर्वाद

¶*Sadashivrao writes from Poona to Raghoba in the North asking him to exact the various contributions mentioned in the paper from the various ruling chiefs in Malwa and Bundelkhand. The Peshwa, it seems, had levied special contributions to meet the expenses incurred in driving away Abdali.*

*No. 76]* *[20-6-1757*

**श्री.**

पौ ४ शौवाल

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री सखारामपंत बापू**
**स्वामीचे सेवेसी.**

पो बाळाजी गोविंद कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता २ शौवाल मुक्काम मौजे बरोली पो भुगांव जाणून स्वानंदलेखन कीजे. विशेष आपण छ २८ तारखेच पत्र पो ते छ मारी पावले. तेथें लिहिलें कीं छ २९ रमजानीं कासिगजावरी[1] मुकाम होईल. सुजावतदौले याजकडील वकील आपले यैसे त्याजकडेस पाठविले आहेत. आपण फरकाबादेस येतो. तुम्ही फौजेच्या दवावाने आपले काम करून घेणें. त्यास बहूत उतम आहे. फौजेच्या दबावानें काम करून घेऊन जें होईल त्यांस चुकत नाहीं. त्यांस येक काम जरूर करणें. रुरूचा राजा आहे. त्याचे त्याणे कुल पा फफुद परगणा घेतला. निवल पंधरा गांव राहिले. त्यास तमाम गढया बांधल्या. तैशाच सर्व जागा आह्मापासी सरकारी पथके आहेत. या फौजेने वरीसभर जुजल्याने हे काम होणार नाहीं. आपले येणे फरकाबादेस जाले म्हणजे हे काम सहजात व्हावे यैसे आहे. कदांचीत न जाले तरी येक मजल इकडेस रूख केला म्हणजे सर्व जाले यैसे आहे. आपण इकडेस यावयाचे केले. येणेकरून नेकसहि[2] जाला आणि सरकारी कामहि होईल. सुजातदौला पैकाहि देईल आणि सोबतीहि होईल. तेणे करून आपली मातबर कामें होतील. इकडील रागडेयाचे वकील तमाम लहान थोराचे लस्करी बसले आहेत. फौज कोणेकडेस जाती हें पाहातात. रुरूच्या राज्यानी आपले वकील राजश्री अनाजीपंत नानाकडेस पाठविले आहेत म्हणून कळले. त्यास त्याणे चार परगणे दवाविले आहेत पा फफुद व पा ताळगांव व देवमली व सकतपुर व पा इटे पांच परगणेयाची जागा दवाविली आहे. तमाम गढया बांधल्या आहेत. फरकाबादवाले यांची हिमाइती बहूत. तैसीच लस्करांतहि माणसे वकील पाठविले आहेत. असो इकडेस आलियावरी भेटीस येईन. सर्व वर्तमान सांगोन, त्याजवरून ध्यानास येईल तैसेंच सर्वत्र जाले आहे. नवाब सुजावतदौले यांजकडीलहि वकील आपणाकडेस जावयासी आला. त्यास अजी प्रातःकाळी रवाना केला. समागमे पंचवीस राऊत देऊन त्यास हाली आपणाकडून पत्र आले त्याजवरून त्यास इकडून आपणाकडे पाठवून देऊ. तो सीमहेर याच्या सुमारे गेला त्याजवरून त्यास

---

१ कासगंज. २ दवाब.

बलाविला. वरकड मागाहून लिहून पाठवून देऊन जे काम होईल त्यास चुकत नाहीं. लिहित जाईन कलावें. आणीक जे वर्तमान होईल ते मुजरद जोडी पाठवितो. त्यावरून कळेल. आपण कासद जोडी पाठविली ती पाचवे रोजी पावली. बहूत काय लिहिणे. कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

*¶Govindpant Bundele proposes to Raghunathrao to come in person in the Doab so as to create an impression upon the rebels and befriend the Vazier.*

---

*No. 77]* *[1757*

श्री.

पु।। श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामींचे शेवेसी.

विज्ञाप्ति ऐसिजे. नजीबखानाने अबदुल अहमदखान याजबराबर राजश्री सुभेदारास सांगून पाठविलें त्याचा तपसील कलमे ४.

१ मी तुमचा फर्जद आहे. जैसी आज्ञा कराल तैसी वर्तनुक करीन. तुमचा उपकार मजवर बहुत आहे, आणि तुम्ही मजवर तरवार बांधावी हे गोष्ट उतम नाहीं. मजला सांगाल तर येमुना पार उतरोन जाईन. दिली व मुल्क ज्याचे स्वाधीन करावयाचा असेल त्याचे हवाला करावा. कलम १

१ दुसरे, मजला आज्ञा करावी. मी शहाकडे जाईन. तुमचा व त्यांचा सल्लूक ठराऊन हदहदूद[१] बाधून ठीक करीन. शहाने आपले हादेत असावे. तुम्ही आपले हदेत हिंदुस्थानचा बंदोबस्त करावा. कोणे गोष्टीचा कजिया राहणार नाहीं. कलम १.

१ तिसरे, माझा ल्योंक जाफेतेखान[२] पांचा साता हजाराफौजेनसीं तुमच्या जवळ ठेवीन. तुम्हासी मजसी संशय किमपि नाहीं. कलम १.

१ चोथे, इतक्या गोष्टीवर तुम्ही राज़ी नसाल, लढाईच करावी हाच मनोदय असल्यास पारचे रोहिले वगैरे सर्व मिळून एकदा लढाई उतम प्रकारे करून मग ज्यास श्री यश देईल तो सर्व राज्य करील. कलम १

४

सदरहु कलमे ४ या प्रमाणें सांगून अबदुल अहदखानास पाठविले आहे. तो राजश्री सुभेदारापासीं जावयास निघाला. तो जाटाचे खातरदास्त बहादरगडाहून सुभेदारानी माघारे फिरविला. श्रुत होय. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.

*¶This paper contains four alternative proposals addressed by Najibkhan to Malharrao Holkar on the subject of effecting a reconciliation between Abdali and the Marathas.*

---

१ मर्यादाहद्द. २ जवेताखान.

No. 78] [1757

**श्री.**

सेवेसी विज्ञापना. आज्ञा घेऊन स्वार जालियावर सालेमार बागावर मुकाम केला. समंदखान याची आवाईचे वर्तमान होते. त्यास येथे आलिया सोनपत पानपते पासून बातम्या आल्या कीं सरहंदे पावेतो फौज कोठे नाहीं. करनाळेस हजार स्वार आले यैसे वर्तमान होते. परंतु त्याचे ठिकाण लागत नाहीं. विशेष शहरचा मजकूर मोगलपुऱ्याकडील अनुसंधान आहे. ते गोष्टीस गाजदीखान, नागरमल पाहिजेत. त्यास पाठवावयाची आज्ञा करावी. येथे एक दोन मुकाम करूं. जी तरतूद होईल ते करूं. ये गोष्टीचे उत्तर सत्वर पाठवावयासी आज्ञा करावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. बहादूरखान बलोच यासहि पाठवावयाची आज्ञा करावी हे विज्ञापना.

¶*Vithal Shivdev's letter to Raghunathrao describing measures to oppose Abdus Samad Khan, Abdali's lieutenant, posted at Sirhind, who was threatening from the North.*

---

No. 79] [3-7-1757

**श्री.**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान तथा राजश्री**

**भाऊसाहेब स्वामींचे शेवेसी**

विनंती सेवक आंताजी माणकेंस्वर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ता। अशाढ वद्य २ द्वितीया मुकाम आनुपशहर गंगातीर येथून गड मुक्तेस्वर बारा कोंस येथास्थित असे विषेषे. आबदाली गेला. श्रीमंत जेपुर प्रांती राहून अंतरवेदीतील आमल उठला तो बसवावा, नजीबखानाचा मुलूक जप्त करून नजीबखान दिलीहून काढावा, या उदेश रा। सखारामपंत बापूंस श्रीमंत दादासाहेंबी तेवीस हजार फौजनसी जेपुर प्रांतीहून रवाना केले. समागमे विठल सिवदेव, आम्ही, हुजरात, गंगाधर येशवंत आलो. आगरियांस येऊन जाटाकडील बाकीचा फडशा करून अंतरवेदीत येऊन आपला आमल बसविला. व गाजदीखान शाहाजादे गंगा उतरून पार गेले. सुज्यातदौला व ते लढाईस उभे राहिले. आम्ही सुज्यातदौलाचा उपराला केला. त्यामुळे वजिराने सलुख करून मागती पार आम्हाकडे आला. आम्ही दरकूच गडमुक्तेस्वराकडे जाऊन पातशाहाचा मुलूक नजीबखानाने दाबला तो खालसा करून मग नजीबखानास दिलीतून काढू. नजीबखान आबदाली दोन नाहींत. आबदालीचा पुत्र लाहोरी

आहे. नजीबखान त्याचा होऊन दिलीत आहे. वजीर पातशाहा आम्हाकडे आहे. सुज्यातदौला आपलें जागा आहे. आम्हास सामील व्हावयाचा नाहीं. हे साद्यंत सात बंद तपशीलवार वर्तमान सविस्तर आजी साहा दिवस वर्तमानपत्रें लिहून मुजरद माणसे ३ तीन रवाना केली. ती सेवेसीं पावली असतील. त्याजवरून सर्व स्वामीच्या ध्यानास आलें असेल. याजकरिता हाली मागील तपसीलवार वर्तमान लिहिले नाहीं. अंतरवेदीत काडीचा फितुर न राहिला. सुज्यात-दौलाची लढाई वजिराची होऊन दिल्ही. वजीर भांरीच होता, त्यास लुटून घेता. परंतु सुभेंदाराची मर्जी सुज्यातदौलाकडे म्हणोन त्याचाच उपराला केला. त्याने वजीर दबला. सलुख केला. वजीर शाहाजादे आहमदखान पठाण आम्हाकडे आले. येकादोदिवसी भेटतील. स्वामीस कलावे, यांजकरितां लिहिले असे. [ अपूर्ण ]

¶*Antaji Mankeshwar writes to the Peshwa that order had been restored in the Doab and mentions some pointed details of the Imperial situation after Abdali had left Delhi in the summer of the year.*

---

*No. 80*] [*4-7-1757*

(पो) छ ७ जिलकाद.

**श्री.**

पुा चिरंजीव राजश्री दादा यासी आशिर्वाद उपरी. अबदाली दिलीपलीकडे जलदीने गेला म्हणुन जलद लिहिले दिलीहून मनसारामाचे आले. आपलेहि पत्र रवाना जाहाले असेल. कासीद सरकारचे चाकर चालत नाही. सखत ताकीद असावी. आपली समीपता होत चालली. जाट जबरदस्त पाहून शहाणपण करून गेला. असो. यदा जाटाने बहुत केली. सर्व प्रकारें कृपाच दाखवावी. मारवाडांत कांही साध्य नाहीं. दिलीस तो कांहीच नाहीं. जयनगरची मामलत करून मोकळे होऊन आपले मुलुखची देखरेख कमाविसदाराचे पुर्तें तहकीक बारीक मोठे वर्तमान मनास आणावें. तुम्ही जेथे आहा तेथे आसपास पैका मिळावयाची जागा राहिली नाहीं. याउपर बाजतबरसात पटणे जरूर घेतले पाहिजे. मल्हारबाची जाटाची चित्तसुध अंतरी नाहीं. कदाचित कलह इछितील तर परिणाम होणे नाहीं. यंदाचे वर्ष तो सहसा जाटासी विरूद्ध न करावें. दतबास परिछीन एक दोनदा ल्याहावें कीं, अबदालीसाठीं जलद तुम्हास बोलाविले होते, तो तूत गेला, याउपर अमदाबाद घेऊन आपण यावे, ऐसे जरूर आपण लिहिलें पाहिजे.

¶*Balaji Bajirao's autograph letter to Raghoba asking him to befriend the Jat and lead an expedition towards Patna next year for obtaining funds.*

No. 81] [17-7-1757

**श्री.**

पो २९ जिल्काद

आशीर्वाद उपरी. राजश्री दामोदर महादेव यांजकडे (काल्पी?) पीच्या माहालचीं बाकी आहे, त्याचा तपशील आलाहिदा पुरवणीत लिा आहे. त्यास मारनिलेकडे बाकीचा यैवज येणे त्यास ते म्हणतील कीं रा अंताजी माणकेश्वर याची वरात आम्हावर जाली आहे. त्या यैवजांत हा यैवज मजुरा मागो लागतील. ऐसियास मारनिलेकडे ऐवज आठा लक्षाची कुन्हाज्यानाबादची वरात व पटाणाबाबद आठरा लक्ष व जैनगराबा पाऊण करोडीचा वसूल त्याकडेच आहेत. त्यांतहि जाला आहे. आणखी किरकोळ ऐवज त्याजकडे जमा होतच आहे. या खेरीज पातशाहा दरमहा फौजेस रोजमरेयास ऐवज दीड लक्ष रुपये दरमहा देतात ऐसे वर्तमान आहे. + + + ऐसे कितेक ऐवज त्याजकडे आहेत. त्या ऐवजी अंताजी माणकेश्वर याचे वरातेचा ऐवज पावेल. या ऐवजात मजुरा द्यावयाचा नाहीं. अंतरवदीच्या ऐवजास मारनिले हातपाय लावितील. तरी ते गोष्ट कार्याची नाहीं. तरी जो ऐवज बाकी निघेल तो करार करून लिहून[1] पाठवणे. त्याप्रमाणे येथून कापडकरी सावकार याच्या वराता होतील. मोतबर खंडण्या म(ल्हारबानीं) × × × केल्या आहेत. त्याचे बाकीचे व(सूल) + + + फौज गेलियावर होईल. परंतु आजपर्यंत वसुलावर अमलदार आहेत. त्याचे हिसेब तर तुम्हाजवळ यावे. ते तावार आणवणे. प्रा (?) अंतरवेदचा वसूल बाकीचा करार करून येथे भरणा करावा असे सारे मामलेदाराचा करून लेहून पाठवणे, त्याप्रा घेऊन. रा छ २९ सवाल [2]हे आशिर्वाद. (पत्र नानासाहेबाचें रघुनाथरावास उत्तरस्वारींत).

¶*Nanasaheb's letter to Raghunathrao containing strict instruction for recovering all the dues from the Doab and not to accept excuses from Damodar Mahadeo Hingne.*

---

No. 82] [8-10-1757

**श्री.**

पो २२ सफर

सेवेसी विज्ञापना. राजश्री दत्ताजी शिंदे यांस गुजराथ प्रांतीं पाठवावयाचा विचार स्वामींनीं केला. उत्तमच आहे. परंतु अबदाली तूर्त येतो न येतो हें कांहीं तथ्य

---

१. येथून अक्षर भाऊसाहेबांचें. २. येथून अक्षर नानासाहेबांचें.

नाहीं. कदाचित आलाच तरी पेंच फारच पडेल; त्यास येविशी दत्तबास सांगावें कीं, अबदालीची बातमी राखोन आटक उतरतांच त्याणी जेथें असतील तेथोन येऊन आम्हास सामील व्हावें. अबदालीचें पारपत्यास फौज मातबर असावी, याजकरितां दत्तबा जरूर येत तें करावें. जरी अबदाली ईकडे न आला तरी दत्ताबांनीं स्वस्थतेनें गुजरातेचें कार्य करावें. अमदाबादेनें बदनक्ष केला आहे, याजकरितां मोमीनखानाचें पारपत्य करणें उचित आहे. रवाना छ २३ मोहरम बहुत काय लिहिणें हें विनंति.

¶*Raghunathrao to the Peshwa suggesting that Dattaji should be ready to return to the North as soon as news comes of Abdali's return.*

---

*No. 83*] [*17-11-1757?*

**श्री.**

छ २५ रबिलाकर

पु॥ श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी विज्ञाप्ति येसीजे. दिलाराम दि॥ आदिनाबेग यानी पत्र स्वामीस व आम्हास लिहिली आहेत, तेच बजिनस सो पाठविली आहेत, ते प्रविष्ट होऊन श्रुत होईल. पत्रातील वर्तमान पंजाबाकडील वृत्त लिहिले आहे. शाह अब्दालीने आपले तर्फेने लाहोरात व द्राबीयांत व सरहंद वगैरे जागा जागा नायेब ठेऊन गेला होता. त्यास सिखानीं जमाव करून आमचे सल्लाह बमोजीब अब्दालीच्या अमलांत खलेल केला, आणि जागाजागांची ठाणीं उठऊन दिल्ही. साहादतखां आफरीदी यास द्राबियात खराब केलें. द्राब सारा लुटिला. जमीदारास बहकाऊन कढा (?) घो. नानकपंथी याचे रु. घेतले. शेवटी आफरीदी पाहाडांत उठून गेला. लाहोरांत खोजे उबेदखा सुभेदार याचे सांगाते फौज वीस हजार स्वार प्यादा घेऊन सिखांसी युद्धास आले जुंज जाले. सेवटीं खान मजकुराची सिकस्त जाली. बहुतेक सरदार मारले पडले. बाहीर बुनगे सर्व लुटून घेतले. तोफखाना शाह सोडून गेला होता तो सर्व लुटिला. काबलेस शाह आबदाली आहे. तेथून हरकारे शहाचे लष्करांतून खबर घेऊन आले. छ ११ रौवल पावेतो खबर तहकीक आली कीं शाह काबलेस आहे. कंधार आणि कसले लुटिला. शाहचा यांत इरानाकडून खलेल उठला आहे. त्यास आबदालीनें फौज आपली कधारेकडे पाठविली होती. ते आतां खबर येथें यावयाची बहुत आहे. चपर आपले फौज आणावयास कधारेस पाठविले होते. तोफखाना व फीलखाना[१] आबदालीचा सर्व पिसेरें[२] व जलालाबादमधे आहेत

---

१. हत्तीखाना. २. पेशावर.

तोफखानियास ताकीद जाली आहे. हिंदुस्थानास रवाना करणार. तेच पत्रे बजिन्नस सो़ पाठविली आहेत. वृत्त श्रुत होईल. उत्तरे सत्वर पाठविणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.

¶*Raghunathrao's presence in the North has emboldened the Sikhs to rise against Abdali.*

---

*No. 84*] [*24-11-1757*

**श्री.**

पौ छ ११ रबिलोवल

सेवेसी विज्ञापना. आम्ही अंतरवेद प्रांते आलो. मुलकाची जप्ती केली. याचे वृत्त तपसिले सेवेसी लिहिलेच आहे. विदीत जाले असेल. नजीब काढून दिल्हा. आबदालीचा बंदोबस्त दूर करून श्रीमंताच्या हातचा जाला. पुढील तह निमेचा करार ठरला. त्यात बावीस सुभ्याचा तपसील. सा सुभे दक्षण, माळवा, गुजरात, अगरे, आजमेरे हे सुभे तर आपणाकडे आलेच आहेत. लाहोर प्रांती अटकपावेतो सा सुभे अबदालीकडे आहेत. बाकी पाच सा राहिले. त्यात प्रयागापैकी कडाकुरा वगैरे अंतरवेद आपणाकडे पहिली आहेच. आयोध्या, बंगाला, दिली, पटणे हे राहिले. त्यांत दिली खाले एक करोडीचा मुलुक सरदेपावेतो प्रस्तुत कांहीं कम असीनवद पावेतो तर वसुलीच आहे. यपैकी निमे महाल चाळीस पचेताळीस पावेतो वाटून दो चौ दिवसात घेतील. बंगाल्याचे दरसाल पातशहास चौपन लक्ष येनात. आपले सलाबतीनें नवे जे साधतील ते साधावे. निमेनिम घ्यावे. या प्रमाणेच आयोध्या दोन जागे मात्र जो आकारेल तो निमेनिम घ्यावा. वरकड जाट तरी आगरे सुभ्यात आला याप्रों जाले. मेहनत केली तर लाहोर वगैरे हेहि सुभे मुटावयाजोगे आहेत. स्वामीचे पुण्य थोर आहे. काले करून सर्व होऊन येईल. सदैव कृपा कटाक्षे करून पत्री सांभाळीत असावें. आमचे पदरी लेकूरपण आहे. वारंवार शिक्षायुक्त लेखन केलिया उत्तम आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Sakharam Bapu's handwriting of this letter may indicate that Raghunathrao writes it to the Peshwa from the Doab, summarising the achievements of the Lahore expedition, 1756-58.*

No. 85]

# श्रीमोरया.

विनंती उपरी. भोजनोत्तर राजश्री बापुजी त्रिंबक याजला समागमे घेऊन येतो. पाऊस लागला तरी येतो. स्नानं करून येत होतो तो महमदखान अहमदखान पठाणाचा पुत्र येथें आला आहे त्याची भेटी जालियावर सत्वर येतो. श्रुत होय हे विनंती.

¶*Gangadhar Yeshwant's chit to Raghoba proposing that he was going to visit him with Mahamadkhan Pathan.*

---

No. 86] [1758?

(पहिलें पान मिळालें नाहीं).

विज्ञापना.

× × × संग आहे. त्याचा जाबसाल त्याणी लिहिलें कीं मी सिबंदींचे स्वाधीन आहे. जो येईल त्याणे माझे रुपयाची वाट करावी. याप्रमाणें त्याणी लिहिले. त्यावरून जमातदार भीड सुधा येथें आहे. त्यास याजला एक आज्ञापत्र सादर करावें कीं रा॥ आपाजीपंताजवळ राहून ते सांगतील त्याप्रमाणें चाकरी करीत जाणें. तरी यांसी जरूर चिठी लिहावी. आम्ही यांस आपल्या जवळ ठेऊन घेतले आहे. सरकारचे कोण्ही ग्रहस्त येतील अथवा महूस पाठवावयाचें होईल तेव्हां आम्हांस लिहावें. आम्ही हे व आणखी जे आज्ञा होईल ते पाठवूं. परंतु तूर्त यासीं येथील चाकरीचे लिहावे. जाटाची फौज दरोबस्त इदृखी व माहाद्याचे कछारावर पडली आहे. लाहारेस सडी दौड जाली आहे. गुरे ढोरे वळून नेली. तमाम प्रांत उज्याड आहे. इकडील चिंता स्वामीनी न करावी. खावंदाचा प्रतापहास्त मस्तकी आहे. तरी ईश्वर उत्तम करील. आमची एकनिष्टता असली तरी सर्व गोष्टी उत्तम होतील. सदैव कृपापत्री सेवकास सनाथ करावें. बहूत काय लिहिणें. लोभाची वृधी करावी हे विज्ञापना.

¶*A mutilated letter describing the confusion created by the armies of the Jat.*

---

१ अंताजी माणकेश्वराचा मावसभाऊ आडनांव अत्रे (?)

No. 87] [February 1758

श्री.

यादी निसबत गोविद कृष्ण र।। अजमेर:

२. साहित्यपत्रें राजश्री अंताजी मानकेश्वर व समशेर बहादर यास कीं मारवाड प्रांती बिजेसिंगानें दंगा करून ठाणे उठविली आहेत. आजमेरी × × × म्ही पत्र दर्शनी ते प्रांती जाऊन गोविंद कृष्ण याची मदत करून बिजेसिंगाचे पारपत्य करून ठाणी कायम राखवणे व गोविद कृष्ण याचा उपराळा अजमेर किल्याचा करणे.

१. किल्याचे खर्चाची काही तूर्त वरात ते प्रांती गोविंद कृष्ण यांजकडे बेजमी करवावी.

१. गोविंद कृष्ण याच्या पत्राचें उत्तर आज्ञा करणे ते करावी.

¶*Orders are sent to Antaji Mankeshwar and Samsher Bahadar to proceed towards Ajmer to the succour of Govind Krishna, whom Bijesing was harrassing.*

---

No. 88] [15-4-1758

श्री.

सेवेसी राजाराम गोविद विज्ञाप्ति ऐसीजे. इकडील वर्तमान तरी पूर्वी सविस्तर विनंतीपत्रे सेवेसी पाठविली त्याजवरून वृत श्रुत होईल. हाली वर्तमान सरकारचे खलिते घेऊन येक दोन ग्रहस्त आहमदखानाकडे वगैरे रोहिलेयाकडे आले. त्यानी कितेक प्रकारेचा फिसाद पठाणाच्या चितात घातला की श्रीमंत दक्षिणे जातात म्हणून सांगितले. त्या गोष्टीस वजीरहि माहित आहेत व सेवकासहि कळले आहे. वजिराही व सेवकाही आठ महिने बसून काम नमुदेत आणिले आहे. त्यात जे ग्रहस्त फिसाद घालितात त्याच्या मते की याचे केले न होये ते करावे. ऐशा कितीक प्रकारे वलगना केल्या आहेत त्या सेवेसी आल्यावरी तपसीलवार निवेदन केल्या जातील. सारांश की फौज घेऊन आलो. स्वामीही वजिरास भेटल्याखेरी तेथून कूच करून आणखीकडे न जावे. छ ६ सावानी आहमदखान वजिराचे येथे येऊन वजिरास व सेवकास रुकसत[१] केले व जबानी सागितले कीं श्रीमंताची मर्जी शाहासीहि जुजावयाची आसिली तर आम्ही तयार आहो. मग वरकडाचा काय मजकूर? ऐसे कितीक प्रकारे

---

× या मोहिमेचा उलगडा झाला पाहिजे. बिजेसिंगाची हयात सन १७५२-९३.

१ रजा दिली

भाषण श्नेहाची केली. तो विस्तार हजूर येऊन विनंती करू व हेहि बोलिले की आम्ही सर्वासी तोडून स्वामीचे जाहालो व स्वारी देशास जाणार म्हणून येथे कोणी सागतात तर गोष्ट न करावी. ये प्रांतीचा बंदोबस्त जाल्यावर जैसी मर्जी असेल तैसे करणार स्वामी समर्थ. याप्रमाणे सागितले ते सेवेसी विनंती लि॥ असे श्रुत होये. आम्ही उतर दिधले कीं, तुम्हास येथे लोक सागतात की श्रीमंत दक्षणेस जातात व श्रीमंतास कितीक अर्ज करितात की पठाण रोहिले याच्या फौजा येत नाही, उगेच लाऊन ठेविले आहे. त्यास त्या गोष्टीवर मदार काय आहे. अत:पर सत्वर फौजा पाठऊन स्वामींचे मनास तुमचे सत्यवादीपण दढतर होये ते करावे याप्रमाणे उतर दिल्हे. त्यानीहि मान्य केले. विस्तारे हजूर येऊन श्रुत करू. वजिरानी पत्रे सेवेसी पाठविली आहेत. उतरी सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. इटावियासी नावाची परवानगी गोविंदपंताच्या पुत्रास पाठविली पो. इटावेयाच्या नावा पाच सात आहेत. तेवढीयानें फौज उतरावयासी दिरंग लागेल. फौज उतरून नावा फिरोन आपले घाटास घेऊन जाणे म्हणून आज्ञापत्र सादर केले पाहिजे. दक्षेणेस जावयाचे हरगीज तूर्त न करावे. स्वामी दक्षेणेस गेले तरी मागे अबदाआली आल्यावर जाठ, माधोसिंग हे मालव्या प्राती धामधूम करतीलसे दिसते. स्वामी या प्राती आल्यावर आबदाआलीचाहि सल्लक आहमदखानाच्या मा। होईल. यास्तव याच्या फौजा व वजीर येऊन पावेतो पावेतो हरगीज[1] मागे फिरावयाचे न करावे. आठा दाहा दिवसी येऊन पावतो. मग जो विचार करणे तो करावा. याउपरी मर्जीस येईल ते खरे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The writer of the letter Rajaram Govind requests Raghunathrao not to leave Northern India. His presence was necessary to keep down the newly conquered provinces and rebellious rulers.*

---

*No. 89]* *[16-4-1758*

**श्री.**

पै॥ छ १७ साबान.

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे शेवेसी.**

विनंती सेवक पुरुषोत्तम महादेव कृतानेक सां नमस्कार विज्ञाप्ति. येथील कुशल ता॥ छ ७ माहे साबान स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान सविस्तर पूर्वी विनंती पत्रे सो॥ पाठविली आहेत. त्यावरून वृत्त श्रुत होईल. हली वर्तमान तरी सरकारचे खलिते घेऊन एकदोन ग्रहस्त अहमदखानाकडे वगैरे रोहिल्याकडे आले. त्याणी कितीका प्रकार फिसाद पठाणाच्या

---

१ हरगीज = बिलकूल

चितात घातला कीं श्रीमंत दक्षणेस जातात म्हणून सांगितले. त्या गोष्टीस वजीरहि माहीत आहेत व सेवकासहि कळले आहे. वजीराही व सेवकाही आठ महिने बसून कामास नमुद केले आहे. जे प्रहस्त फिसाद घालितात त्याच्या मते कीं याचे केले न होय ते करावे. ऐशास कितीका प्रकारच्या वलगणा केल्या आहेत. त्या सेवेसी आल्यावर तपसीलवार निवेदन केल्या जातील. साराउश की फौज घेऊन आलों. स्वामीही वजीरास भेटल्याखेरीज तेथून कूच करून आणखीकडे न जावे. छ ६ तारखेस अहमदखान वजीराचे येथे येऊन वजीरास व सेवकास रुखसत केले व जबानी सांगितले कीं श्रीमंताची मर्जी शहासीहि जुजावयाची असेल तर आम्ही तयार आहो. मग वरकडाचा मजकूर काय? ऐशी कितीक भाषणें स्नेहाची केली. तो विस्तार हजूर येऊन विनंती करूं व हेहि बोलिले कीं आम्ही सर्वांसी तोडून स्वामीचे जालों व स्वारी देशास जाणार म्हणून येथे कोणी सांगतात. तर हे गोष्ट न करावी ये प्रांतीचा बंदोबस्त केलियावर जैशी मर्जी असेल तैसे करणार स्वामी समर्थ आहेत. या प्रमाणे सांगितले. ते सो विनंती लिहिली असे. श्रुत होय. त्याउपरी आम्ही उत्तर दिधले कीं तुम्हास येथें लोक सांगतात कीं श्रीमंत दक्षिणेस जातात व श्रीमंतास कितीक अर्ज करितात कीं पठाण रोहिल्याच्या फौजा येत नाहींत. उगेच लाऊन ठेविले आहे. त्यास या गोष्टीवर मदार काय आहे. अतःपर सत्वर फौजा पाठऊन स्वामीचे मनास तुमचे सत्यवादीपण दृढतर होय ते करावे या प्रमाणें उत्तर दिधले. त्यानीहि मान्य केले. विस्तार हजूर येऊन श्रुत करूं. वजिरानी पत्रें सो पाठविली आहेत. उतरी सनाथ केले पो. व इटावियापासीं नावांची परवाणगी रा॥ बाळाजी गोविंद यास पाठविली पाहिजे. इटावियासी यांच्या नावा पांच सात आहेत. तेवढीयानें फौज उतरावयासी दिरंग लागेल. फौज उतरोन नावा फिरोन आपले घाटावर घेऊन जाणे म्हणोन आज्ञापत्र सादर केले पो. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत हे विज्ञप्ति.

¶*Purshottam Mahadeo Hingne writes to Raghunathrao about the negotiations that were being carried on with the Rohilla chiefs for joining Marathas against Abdali.*

---

*No. 90*] [*12-6-1758?*

**श्री.**

**तीर्थस्वरूप राजश्री नानास्वामी वडिलाचे सेवेसी.**

अपत्येसमान गोपाळराव गणेश कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता॥ छ ९ सवाल मु॥ मौहेरा क्षेम असे विशेष.

१ फरूकाबादेच्या उत्तरेस.

आपण पत्र पाठविले ते पावले. लिा। की आपला मजकूर व राजश्री बापूचा फर्काबादेस यावयाचा जाहाला होता. तो त्याचा सल्लक जाहाला म्हणून तिकडील मनसबा राहिला. सिकंदऱ्याकडे जावयाचा निश्चय जाहाला म्हणून लिा व मला सुज्यातदौलाकडे जाणे म्हणून लिा. त्यास मी उदैक जातो. त्रिंबकदासास आथवा भवानीदास यास आज येथे येऊन पावते करावे. भिंडेस ऐवज आला आहे. तो सिकंदऱ्यास पावता करणे म्हणुन लिा होते. त्यास यैवज येऊन सत्वर पावेल. भवानीदासास निरोप देऊन सत्वर पाठवावे. सुज्यातदेवलाकडे सल्लखास पाठवीत होता. तो सल्लख तो जाहला. आतां तेथे जाऊन त्यासी काय बोलावे, कसे करावे, ते आपण घराऊ लिहून पाठवावे. त्याज प्रो वर्तणूक करूं. बहुत काये लिहिणे व मी लिा असे न कल्ल द्यावे. व सहजात श्रीमंत राजश्री बापूसहि पुसावे की याने काये बोलावे असे सहजात पुसोन उल्लेख करून खुलासा काहाडून लिहिला पाहिजे. परंतु असे कदाचित पुसल्यावर न जाणे म्हणुन म्हणतील तर बालाजी गोविंद याचे तैनातीस राहावे लागेल. यास्तव सुज्यातदौलाकडे तर जाणे होये हे ठहरावे. परंतु तेथे काये बोलावे, काये मनसबा ठहरावा, तो लिा पाहिजे. व त्रिंबकदासास अथवा भवानीदासास सत्वर पाठवावे व तीर्थस्वरूप राजश्री गंगाधरपंत तात्यास आह्मी पत्र लिा होते त्याचे उत्तर पाठवावे. असे सर्व लिायाची उतरे जरुर तपसीलवार लिा पाहिजेत. फिरोन साडियां[१]बरोबर उत्तर पाठवावे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

चिरंजीव राजश्री तात्याबा व तथा राजश्री दाजीबा यासी अनेक आसीर्वाद. लिा परिसीजे. हरघडी पत्र पाठवून संतोषाते पावित जाणे. लोभ कीजे हे आसीर्वाद.

¶*Gopalrao Ganesh Barve writes this letter to one Nana who cannot be identified. It mentions that an agreement had been effected with Suja-ud-daula. To what period this agreement refers, it is difficult to ascertain. Further light requires to be thrown on this affair.*

---

*No. 91*] [*1758*

## श्री.

सेवेसी विज्ञापना. राजश्री बापूजी माहादेव याची वस्तभाव हती घोडी सर्व तेथे राहिली असेल. त्याची कूल जफ्ती करून जमा करून ठेवणे म्हणोन आज्ञा. आज्ञेप्रमाणे कारकून माणसें पाठऊन कूल वस्तभाव जप्त केली. चौकी बसिवली आहे. रोख यैवज काहीच सापडला नाहीं. घोड्यांस पांच दिवस दाणा हतीस

१ सांडणीस्वार.

रतीब नाही. जागा आहे. घोड्यांची माणसे प्यादे बारगीर आहेत. ते बेदील होऊन चाकरी सोडून जाणारसे दिसतें. परंतु तूर्त त्याची दिलासी करून बंदोबस्त करून ठेविला आहे. घोड्यास माणसें पाहिजेत. बारगीर आहेत त्यास ठेवावे. तेव्हा खर्चासहि दिल्हे पाहिजे. घोडी उटे हती यास चंदी पाहिजे. त्याची आज्ञा काय ते करावी. माणसे चाकर फरास सारवान प्यादे आहेत. त्याचे समाधान करून ठेवावे की जातील त्यांस जाऊ द्यावे याची आज्ञा केली पाहिजे. पत्राचे उतर येईतोपर्यंत त्यास ठेविले आहेत. जसी आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणुक करूं. तपसीलवार उतर पाठवावयाची आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The letter mentions the punishment the Peshwa inflicted upon Bapuji Mahadeo Hingne, the Maratha Vakil at Delhi.*

---

*No. 92]* *[1758*

श्री.

विनंती उपरी. आपण आम्हा उभयतास दोन चिठ्या पाठविल्या त्या पावल्या. त्यातील मजकूर नजीबखानाचा खजाना मेरटेवरून पार जाणार याकरितां येथून जनार्दनपंत व लांबहाते तात्याकडील रवाना केले. आपण उभयतानी जावे. नाहीं तर राजश्री अंताजीपंताची फौज व तुम्हाकडील विठल आपदेव पाठवावे. त्यास आमचा विचार जाला होता की तुम्हाकडील पथके येत न येत परंतु आपण गुरुवारी बुनगे पाठीमागें टाकून दरकुच गडमुक्तेस्वरास जावे. त्यास हली हे खानमी आली. उत्तम. उदैक बुधवारी प्रात:काली चिरंजीव बापू व विठल आपदेव पुढे लांब मजलीनें जातील. आम्हीहि तडक बुनगे घेऊन पाठीवर जातो. जवळ राहिल्यास आम्ही सडे त्यात मागून सामील होऊं. बुधवारी द्वादसी × आम्हास थोडासा गुता, याकरिता येका दिवसाचे अंतरे सडी फौज पुढे रवाना केली. सनद अनुपशेहरची पाठवितीलच. पावले खर्चास यैवज दरमाहाचा भर रोजमरा जरूर पाठविला पाहिजे. बारगीर चाकरानी आडविले आहे. राणोजी देवकरास मल्वानीं आश्रा दिल्हा आहे हे उत्तम नाहीं. जावे तर त्यानें येकल्यानें जावें. बारगीर सिलेदार × स न्यावयास प्रयोजन × (नाहीं). त्याच्या हरामखोऱ्या

---

१ एरंडे ?

फार आहेत. हरामखोरास रागे भरावे. दुसऱ्यानें आश्रा द्यावा हें उत्तम नाहीं. बहूत काय लिंहिणें हे विनंती.

¶*Vithal Shivdev's handwriting. He seems to address this letter to Raghunathrao on the subject of Najibkhan and complains about Malharrao Holkar.*

---

*No. 93*] [*19-8-1758*

**श्री.**

**राजश्री जनकोजी सिंदे**

**गोसावी यांसि**

ॐ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्नो रघुनाथ बाजीराव आसिर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. अबदाली पठाण याची यावयाची अमेद[1] गरम आहे. त्यास तो आला नाही तो आपण भारी व्हावे म्हणजे उतम आहे. तरी तुम्ही लौकरी यावें. यैसी पेशजी तुम्हास पत्रे लिहिलीच आहेत त्याजवरून तुम्ही तयारी करून येतच असाल. हालींहि लिहीले असे. तरी फौजसुधा लाबलाब मजली करून त्वरेने यावे. रा छ १४ जिल्हेज.

¶*Raghunathrao asks Jankoji Scindia at once to proceed to the north, which was being threatened by the Abdali.*

---

*No. 94*] [*September 1758*

**श्री.**

पो छ ४ सफर ऊर्फ अश्विन
सन तिसा.

**पु॥ श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे शेवेसी.**

विज्ञापना यैसीजे. पत्रे सिध्ध जालियावर वर्तमान आले कीं राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री जनकोजी सिंदे यांची भेटी जाली. येकांती व लोकांत हा (वि) चार ठरलाकीं पूर्वा प्रो जे काम करणे ते ब(श)क करावे. या प्रकारे विचार जालियावर ज्या मुकामी होते तेथून कूच करून जैनगरच्या रस्त्यावर

---

१ दाट अवई.

येऊन पडले. कछ(व्या)च्या राज्याकडील जाबसाल व मुलतानाकडील मामलत आणखी येकदोन राजकारणी आली आहेत. विजेदशमी जालियावर येक गोष्ट ठरेल तेथे तीर्थस्वरूप राजश्री पुरुषोत्तम माहादेव आहेत ते सविस्तर वर्तमान शेवेसी विनंती लिहित असतील. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंती.

¶*Hingne reports to the Peshwa the visit of Malharrao Holkar to Jankoji and their reconciliation.*

---

*No. 95]* *[21-9-1758*

**श्री.**

छ २२ मोहरम सु॥ तिसा.

सेवेसी महिपतराव लक्षुमण सा। नमस्कार विज्ञापना एसिजे. येथील कुशल ता। छ १७ मोहरम जाणून स्वानंद लेखनास आज्ञा केली पाहिजे. विशेष. हिंदुस्तानाकडील वर्तमान जबाणी कासद पातशाह व वजीर नजीक पाणिपत गेले आहेत. पातशाहजादा येमुणेचे पार कमाऊचे पाहाडात नजीबखान रोहिला आहे त्याजपासी जाऊन पंचवीस तीस हजार फौज रोहिल्याणे जमा करून पुडे ठेवितच आहे. जमाव होतो. पातशाहासी व पातशाहजाद्यासी साठी कोसाचे अंतर आहे. याजपासी तीस हजार फौज आहे. पुडे काये होईल वर्तमान येईल ते विनंती लिहून. राजश्री मल्हारराव होलकर व जनकोजी सिंदे उभयेतास वजिराही बोलाविले म्हनून शाहापुरचा फैसला चौ लाखास करून पुडे गेले. मालपुरापावेतो पोहचले. जबाणी सांगत होते. सत्यमिथ्या ईस्वर जाणे. आयेकिले लिहिले. पुडे जैसे वर्तमान येत जाईल ते लिहित जाऊन. हैदराबादेकडील वर्तमान आले आहे कीं नबाब सलाबतजंग व बसालतजंग छ १७ मोहरमी कूच करून कलबुर्गप्रांती येत आहेत. नबाब निजामआलिखानास बोलाविले. तेहि जानार आहेत. प्रस्तुत तो निजामआलिखानाही सिपाह (ई) लोकास तनखा जाफराबादेपावेतो देऊन स्वार तहसिलेबदल आले आहेत. पुडे वासिम परगन्याहून कूच जेव्हां करतील, वर्तमान येईल तेव्हां लिहून. निजामआलिखानाकडील मोगल हुजुर येतो त्याजबार देवाजीपंत सैदलस्करखानी आहेत. येक दोन दिवस येथे होते. शामजीपंत टकले पुडे टोक्यास गेले होते. ते व हे मिळून हुजुर येत आहेत. बहुत काये लिहिणे हे विज्ञापना.

श्रीमंत राजश्री दादासाहेब कासारीचा घाट चहडून देशास गेले म्हनून येथे वर्तमान दरगाहकुलिखानास हरकऱ्याही दिधले. सेवेसी श्रुत होये हे विनंती.

¶*Mahipatrao Panse writes to the Peshwa about the troublesome situation of the Emperor, his son and his Vazier after Raghunathrao had returned to the Deccan.*

---

*No. 96]* *[7-10-1758*

**श्री.**

छ २८ सफर सन तिसा

**श्रीमत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.**

विनंती सेवक अताजी माणकेश्वर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ता। आस्विन शुद्ध ९ मुकाम कोटपुतली सुखी असो विशेष. या प्रांतीचें वर्तमान व नजीबखान व दुदेखान शाहजादा याचे बखेडियाचा तपसील पुर्वी सेवकाने तपसीलवार सेवेसी लिहिलाच आहे व राजश्री जनकोजी बाबानी लिहिला आहे. सारांश येथून सहा मजली त्याची फौज. सेवक जाऊन जें चाकरी घडोन येईल ते करीलच. आदिनाबेगखान छ १२ मोहरमी [ १६-९-१७५८ ] मृत्यु पावला. मारवाडची मामलत जाली. जैनगरचीहि जाली. कोटियाचा नवा राजा मृत्यु पावले. त्याचेहि ठरले. परतु दताजी बावा आल्याखेरीज जनकोजीबावा दिलीकडे येत नाहीत. मुख्ये आजी गाठ घालून पारपत्ये करितो. निर्मूल करणे, झाडून बुडणे तरी सिंदे आलियाउपरि होईल. बंगालियाकडे आस्विनमासी जावे परंतु रोहिलियाच्या हगामियामुळे कार्तिक मासावरी जाणे गेले. बारीक मोठे या प्रांतीचे तपसीलवार वर्तमान तीन बद श्रीमंत राजश्री दादासाहेबचे पत्री विनती लिहिले. ते स्वामीस विनती करितील. साराश गोष्टी, सेवक हरामखोरी करणार नाही. मोठीच चाकरीन, खावदहि कृपा करितील. मी घरचा खानाजाद. मजला लोकादेखता वारंवार जनात वाईट बोलावे. त्यामुळे कवडीचे माल होतो. ते स्वामीचेच नुकसान. अभाव पडिला असील त्यास येक वस्त्रानसी घराबाहेर निघोन. जे असेल ते स्वामीचे, कोठून आणिले नाही. जे आहे ते सर्व स्वामीचे. परतु पचवीस तीस लाख देणे आजी साहुकारी असता उलटा आभाव आणिकच जाला. कच्या धागियाची रयेत. स्वामीची आखेरसाली आली. यावरी जीवप्राण हजीर आहे. वतनी चाकर जाते पलते नाही. आपल्या मुखे इतराजी फर्मावलीयावरी सेवकाचे कल्याण काये? काही सेवकाची विनती श्रीमत राजश्री दादासाहेब करितील. ते करावयासी स्वामी समर्थ आहेत. रा. सुभेदारानी दीनाबेग सदीपबेगास पत्रे

लिहून वजिराच्या हिश्यात दोन चार लाखचे मात्र खलेल करविले. वरकड बटा चालविला तो वजिराच्या द्वेशाकरिता. तरी वजिराकडे जामिनीचा पैका फार फौज ठेवली त्याचा फार. ऐसे भारूड खलेल याची रुपयास नसावे. कौलात अंतर. पुढे पुर्वेचत्या कामात खलेलच्या. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Antaji Mankeshwar communicates to the Peshwa the serious situation of Delhi and requests him to remedy it.*

---

*No. 97]* *[5-11-1758*

**श्री.**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामाजी बावा**

**गोसावी यांसी.**

स्नेहपूर्वक अंताजी माणकेश्वर, कृतानेक आशीर्वाद, विनंती उपरी. येथील कुशल तागाईत कार्तिक वद्य ९ मुक्काम खिचीवाडा जाणून स्वकीये लेखन करीत गेले पाहिजे विशेष. आपणांकडून आलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी यैसें न करावें. सदैव पत्रद्वारें सांभाळ करीत असावें. यानंतर श्रीमंत राजश्री......पंत प्रधान स्वामींस व श्रीमंत राजश्री भाउसाहेबांस पत्रें पाठविलीं आहेन. तरी आपण उत्तम समय पाहोन अक्षरशाहा पत्रें वाचून दाखवावीं. मजकुराचा मजकूर सांगोन त्याचा जाबसाल उत्तम रीतीचा लिहून पाठवावा. आपण दरबारीं आहेत. याजकरितां आम्ही बेफिकिर या प्रांतीं आहों. राजश्री विठ्ठल शिव देव दरबारीं आले आहेत. त्यांची आमची स्पर्धा आहे. तें आपणास ठाऊक आहे. आम्हाविशीं नानाप्रकारच्या आदावती सांगतील. त्यास दरबारीं आमची वगवशिला सर्व आपण आहेत. आपले मांडीवरी उसें ठेऊन दूरदेशीं या प्रांतीं आलों आहों. सर्व भरवसा आपला आहे. आम्ही वारंवार लिहावें यैसा अर्थ नाहीं. आपलें थोडें बहुत तुलसीदल द्यावें, तें तीर्थस्वरूप राजश्री हरीपंत दादा यांजकडून देविलें आहे, तें आपणांस पावतें करितील. सर्व भरवसा दरबारीं हरयेकविशीं आपला आहे. आम्ही लिहावें यैसें नाहीं. बहुत काये लिहिणें. या प्रांतीची कांहीं शें दोनशें रुपयेपर्यंत फरमास आपली असली तरी आम्हास ल्याहावी. प्रविस्ट होईल. आमच्या पथकाची वकिली स्वामींकडे आहे. नुन्यें पूर्ण सांभाळित असावें. विस्मरण पडों न देणें. बहुत काय लिहिणें. कृपा आसों दीजे हें विनंति.

¶*Antaji Mankeshwar writes from the North to Ramaji Bawa (Chitnis) asking him to speak in his favour to the Peshwa about the dispute he had with Vithal Shivdeo.*

*No. 98]* *[7-11-1758*

**श्रीपांडुरंग.**

पौ छ २० रबिलोवल

कार्तिक तिसा.

**श्रीमंत माहाराज राजश्री पंत प्रधान**
**साहेब स्वामीचे सेवेसी.**

विनंती. सेवक रामराऊ निळकंठ कृतानेक सिर सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। कार्तिक शु॥ सप्तमीपर्येंत महाराजांच्या कृपा कटाक्षे करून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. माहाराजानी कृपावंत होऊन आज्ञापत्र पाठविलें तें सादर होऊन सिरसा वंदिलें. पत्री आज्ञापिले कीं अंताजी माणकेश्वर याजपासी फौज किती रांगडी व देसची मिळोन गणती चौकशी बेमुलाहिजा करून करणे. पूर्वी नवा हजाराची गणतीप्रमाणे न करावे. दुसरे अंतरवेदीचे महाल त्याजकडे कोणकोणते आहेत व हवाल्यापैकीं वसूल काय आला तो लिहिणे, व राजकी मनसुबे पटणे सोडवावे, पैका मेळवावा, नाही तर लाहोर प्रांते अमल बसलाच आहे पुढें अटक पावेतो जाऊन पैका मिळे ते करणे. कर्जाची चिंता सर्व राजश्री × × × सच आहे म्हणोन आज्ञा केली. त्यास अंताजी माणकेश्वर प्रस्तुत दिलीस आहेत. त्याच प्रांतास जात असो. आपण आज्ञा केली त्याचप्रमाणे बेमुलाहिजा करूनच चौकशीनें गणती घेऊ. नवे माहाल व हावाल्यापैकीं वसूल कोणते परगणे त्याजकडे आले, वसूल काय पावला, तो लेहून पाठऊं. माहाराजाच्या आज्ञेशिवाय त्याचा मुलाहिजा धरून प्रतरणापूर्वक सेवेसी विनंती लिहिणार नाहीं. पूर्वीचे नव हजाराचे गणतीचे लिहिले. ऐसियास येविसीच्या वर्तमानास सरकारचे फडणीस अंताजीपंताकडे रूपनगरच्या मुकामी आले होते त्यास हे वर्तमान दखल आहे. आणि राजश्री पाटीलबावानी सेवेसी विनंतीपत्र लिहिले होतें रूपनगरीहून तेहि हुजूर असेल; आणि हली विनंतीपत्र राजश्री पाटीलबावांनीं सेवेसी लिहिले आहे त्याजवरून विदित होईल. वरकड राजकी मनसबे पटणे लाहोर वगैरे प्रांतीं जाऊन पैका मेळऊन कर्ज वारे ते करावें म्हणोन आज्ञा. ते चिंता रात्रंदिवस निजध्यास राजश्री पाटीलबावास आहे कीं, दीर्घ प्रयेत्न करून धण्याची कृपा संपादावी तेच करावे. क्लेश बहुळ केले आणि परिणाम द्रव्य प्राप्त नाहीं, तरी वृथा श्रमच मात्र होतो. त्यास सर्व प्रताप तेज माहाराजाचे करणार आहे. सेवक लोकाची एकनिष्ठता आणि मेहनत यांत

अंतर नाहीं. त्या प्रांती गेलिया नंतर घडोन येईल तें खरें. सांप्रत्य विनंती विशेष काय ल्याहावी ? राजश्री पाटील बावाचे चित्त सर्व आपले चरणी एकनिष्ट आणि धण्याची कर्जाची चिंता सदैव मानसीं वागविता (त.) ईश्वर घडवील तो सुदीन की आपले आज्ञेप्रमाणें घडोन येईल हेच इच्छितात. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Letter from Dattaji Scindia's agent to the Peshwa at Poona with reference to the punishment to be inflicted on Antaji Mankeshwar and the Scindia's desire to meet the wishes of the Peshwa.*

---

*No. 99*] [*30-8-1758*

**श्री.**

पौ छ २४ जिलकाद

पुरवणी श्रीमंत राजश्री दादासाहेब
स्वामीचे सेवेसी.

विज्ञापना येसींजे. पत्रीं आज्ञा आली की तुम्ही सरकार कामे करावी. इतबार आपला वाढवावा. तो न वाढविता गमाविला. यादी तुम्हाजवळ दिल्ह्या होत्या. यादी प्रा कामे गया वगैरे करून पाठवावी ते आद्यापि कामे जाली नाहीत. म्हणून आज्ञापत्री आली त्यास ज्या प्रा स्वामींची आज्ञा यादीची आहे त्या प्रा कामे करून मजुरा करून दाऊ. परंतु स्वामी कृपा विशेष जालियावर हिमतीने कामे वहून होतात. त्यास यांजला येथे मातबर दबाव बसलियाखेरीज डोळे उघडत नाहीं. दुसरे खासा स्वारी देशास गेलियावर मागे यानी दंगाच केला. याजमुळे कामे करावयास फुरसत न जाली. वरकड सर्व प्रताप स्वामीचा आहे. स्वामीचा तेजोप्रकासे करून हिमालयपरयेत छत्र फिरते. तेथे येथील कामे आशक काय आहे ? स्वामीचा वरदहस्त आमचे मस्तकी आहे. तरी यादी प्रो कामे सर्व होऊन येतील. दिवसगत दंगियामुळे लागेल. सर्व प्रा कृपा करणार स्वामी समर्थ आहेत [१] सेवेसी श्रुत होये हे विनंती. [२]

---

१ या पुढील मजकूर निराळ्या वळणाचा. अक्षर फार कापरें आहे.

२ इ. स. १७५८ ना नंतरचें पत्र असावें.

No. 100] [3-5-1759

**श्रीवरद.**

पौ छ १९ सवाल ऊर्फ
जेस्ट वद्य २

श्रीमंत राजश्री दादासाहेब
महाराजाचे सेवेसी

आज्ञाधारक बाळ गोविंद दडवत विज्ञापना. येथील कुशल ताा छ ९ माहे रमजान मुकाम इद्रपस्त यथास्थित जाणून स्वानदोछव लिही ती अज्ञा केली पाहिजे विशष. बहूत दिवस जाहाले. माहाराजाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तेणे करून चित सचिंत असे. तर सर्वदा पत्री साभाळ केला पाहिजे. यानतर इकडील वर्तमान तर, राा जनकोजी सिंदे माछीवाडीयावरी आहेत. राा शाबाजी पाटील यासी लाहोर प्राती पाठविले होते; त्यास त्याजला बोलाऊन घेतले. राा नारो शकर यासी लोहोर प्रातीचे कामकाज सागितले. आपण माछीवाडीयाहून माघारे फिरले. यैसी वदता आहे. राा गोविंद बलाल दिलीस आले होतेत त्यास पातशाहा वजिराची मुलाजत जाली. आठ दाहा मुकाम केले. उपरातिक छ २ रोजी दिलीहून कूच करून राा जनकोजी सिंदे याजकडे गेले. राा आताजीपंतहि सिंदीयाचे लष्कराहून दिलीसमीप आले. येका दोन दिवसा दिलीस येतील. माहाराजाचे भेटीस बहूत दिवस जाहाले. त्यास हेत बहूत आहे. त्यास ईश्वरसत्याने ते प्रांतीच सत्वरच येऊन भेटी घेऊं. कृपा करणार माहाराज समर्थ आहेत. बहूत काये लिहिणे हे विज्ञाति.

¶*The writer Bal Govind reports to Raghunathrao the arrangements made by the Scindia in the Punjab.*

---

No. 101] [15-5-1759

**श्री.**

छ ९ सवाल तिसा

श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवेसी विनंती सेवक जनकोजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ताा छ १७ साबान मोकाम शतद्रु स्वामीचे कृपावलोकनें करून येथास्थीत असे विशेष. सरकारचे आज्ञापत्रें छ १९ जमादिलावलचे पाटविलें ते छ २ रजबी सादर जालें. तेथें आज्ञा राणाजीकडील

मामलतीविसी व कोट्याकडील व मारवाडप्रांतीचा बंदोबस्त सत्वर करून लाहोराकडील व बंगाल्याकडील मनसबें मातबर असता पुष्कराभोवती बहुत दिवसे लाविलें, काये काये कामें केली, त्याचा तपशील खडणी वसूल काये, हे काहीच लिहिलें नाहीं. मोघम लिहिलें तरी सविस्तर लिहीत जाणे म्हणोन आज्ञा. ऐसियास आज्ञेप्रमाणे राणाकडील व कोट्याकडील व मारवाडचा बंदोबस्त जो जाला त्याप्रमाणे पूर्वी सेवेसी विनंती तपशीलवार लिहिलें असें ती पत्रे पावली असतील त्यावरून विदीत होईल. लाहूरचे वर्तमान आलाहिदा पुरवणी पत्री विनंती लिहिली असें. त्यावरून श्रुत होईल. येथून कूंच करून पुढे जो कर्तव्य अर्थ मनसब्याचा जेसा योजून येईल त्याप्रमाणें सेवेसी मागाहून लेहून पाठवू. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Jankoji Scindia's letter describing his doings in Rajputana.*

---

*No. 102*] [*4-6-1759*

**श्री.**

पौ ८ सवाल

**पु॥ श्रीमंत राजश्री पंत प्रधान**
**स्वामीचे सो.**

विनंती. राजश्री गोविंद बलाल अंतरवेदीहून सरदाराकडे यावे याजकरिता सिकंदऱ्यासमीप येऊन पावले. तेथे नजिबखानाचा अमल होता त्यास उठऊन देऊन त्या प्रांती अमल करून तेथील बंदोबस्त केला. हे वर्तमान ऐकून नजिबखानाने मिरापुराहून कूच करून, गुलावटी म्हणोन हापडेजवळ जागा आहे तेथे येऊन पावला. रा॥ गोविंदपंतहि हापडेजवळ पावले. उभैतामध्यें पांच साहा कोसाचा अंतराय राहिला. राजश्री अंताजीपंतानी सरदारासी बहूत बाजिदी केली की, या माहालावरी श्रीमंताचे ऐवजाचा तनखा आहे तेथे गोविंदपंतानी हंगामा केलिया नजिबखां पैका कैसा देईल? त्यास साफ मनाईची चिठी पाठऊन देणे की नजिबखानाच्या परगण्यांत खलखल न करीत, त्यासी रस राखून, फितूर न करिता तुम्हाकडे येत. त्यास अंताजीपंताची भीड जरूर जाणून गोविंदपंतास वरचेवरी पत्रे पाठविली. त्याकरितां नजिबखानासी सलूख केला. त्याजकडून सुजानराऊ म्हणोन ग्रहस्त व मेघराज वकील पंतमजकुराजवळ आले. काही दाणाघासास देऊ करून उभैतासी सख्यत्व करून दिधले. वजिरानी गोविंदपंतास आणावयासी आम्हाकडील कारकून बालाजीपंत म्हणोन ग्रहस्त होता त्यास पाठविले. त्यानी

जाऊन गोविंदपंतास नीट दिलीस आणिले. छ २२ शाबानी राजघाटावरी आले. छ २३ रोज रविवारी जलालुदीखां व दलेलसिंग व मेहदीकुलीखां पार जाऊन त्यास घेऊन आले. नवाब वजिराची भेट घेतली. येक घटिका खासा नवाब सिवगोविंदपंतासी खिलबत जाली. पंतमजकुरास सा पारंच्याचा[1] खिलत व जवाहीर दोन रकमा व येक घोडा व तिघा पुत्रास खिलत जवाहीर व खिलत समागमचे लोकास दिधले. गरमनोसी करून डेऱ्यास गेले. मागती येक भेट अणखी होणार आहे. पुढे जे ठहरेल ते सो विनंती लिहूं. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.

¶*Govindpant's overtures to Najibkhan and Vazier Gajiuddin.*

---

*No. 103*] [*1759*

(पहिला बंद गहाळ)

ष्टीसहि याकूबआलीखानाने जाबसाल साफ दिल्हा की, शाहाने खिलत दिल्हा होता तो तुम्हास दिल्हा; आणिक बगरहुकूमसिवाये आमच्याने होत नाही. तुम्ही आपल्या जोराने जैसे कलेल तैसे करणे. आजपावतो सर्व मथुरेस आहित. मरजी अवघ्याची आहे की नजीबखानास मधून दरमीयान उठऊन बदस्तूर[2] साबीक गाजुदीखास करावे. आवघा येख्तीयार सलतनतचा ठाकूर सुरजमल याचा होये यैसी मर्जी सर्वाची व ठाकराची आहे. बाकी मजकूर आहे की आयुधेकराकडून व पटिणाकडून व रोहिल्याकडून प्रांत सरकारचा सोडऊन ठाकरानी पडद्यांत आपण घ्यावे हे मरजी ठाकराची आहे. यास्तव आयुध्येकराचे व रोहिल्याचे वकिलानी साफ जाब दिल्हा की जाठाचे ताल्लुक करून आम्हाकडून सोडवायाचे कराल तर सोडणार नाही. याप्राा त्यानी उतर दिल्हे व खातरदास्त ठाकराचे आपले खाविंदास लिहितो म्हणौन सांगितले व बोलतात. वजिराने व ठाकराने आपले रफीक[3] करावयासी हाफीजरहमत व दुंदेखा व सादुलाखां यासी लिा आहे. टेकचंद वकील हाफीजाचा आला होता. त्यास आपले रफीक करावयासी हाफिजापासी पाा आहे. परंतु हाफीज वगैरे गोष्ट खुलून करणार नाहीतसे दिसते. व नजीबखां सोनपतावर आहे. जाठ वजिराचे मानस पातशाह दुसरा करावा. यास्तव आलीगौहरचे मायेने रोहिल्यास लाऊन घेतले आहे. यास्तव दिसता प्रकार यैसा दिसतो की फिरून खलसांची[4] जड कायेम होते. शाहवलीखां खुद सर्वा गोष्टीचा येख्तीयार स्वामीचा करून गेला आहे. याकूबआलीखां स्वामीपासी पोहचलियावर बाद सलुकाचे वजे स्वामी करतील

---

१ पार्चा—वस्त्र, पोशाख. सा पार्चांचा खिलत—सहा वस्त्रांचा पोशाख.

२ बदस्तूर साबीक=पूर्वील वहिवाटीप्रमाणें. ३ स्नेही. ४ तंट्याचें बीज.

ते प्रमाण आहे. स्वामीचे सो श्रुत व्हावे यास्तव मजकूर सो विनंती केली आहे. आतां बोलावणे याकूबआलीखानाचे, येख्तीयार स्वामीचा आहे. जर बोलावणे सलाह आसेल तर कृपापत्रे सन्माने तसलीची[1] याकूबआलीखानाचे नावाची पाठवावी व समाधान मित्रत्वाची पत्रे गाजुदीखानास व ठाकरास व राजे नागरमल व दरेलसिग व जलादुददौले व नवाब मजदुददौले आबदूल हयादखानास इनायेत[2] होत. याकुबआलीखानास हजूर बोलाऊन सर्वा गोष्टीचा सफा करून शाहासी येकोपा पका करून मग तेथून बसून हिदुस्थानचा बदोबस्त जैसा करणे तैसा करणार स्वामी समर्थ आहेत. बंगालियाचा सुबेदाराची खबर आली की बंगालेवाल्याने व फिरंलियाने आलीगौहरास किले पटणियात ठेविले आहे. हे खबर कितीक दिवस येतच आहे. या दिवसात नाजमसी व आलिगौहरासी सलूक जाला. आहे आणि आलीगौहरानें कूचहि हिदुस्थानाकडे केले. फिरंगी सांगातं आहेत. इकडे येतो यास्तव पूर्वी विनंती लिहिली आहे. त्याप्रा आर्जदास्त जरूर पाठविणार स्वामी समर्थ आहेत. हाली लाहोराहून शाहाचे चपल दोघे याकूब-आलीखानास तालीक[3] कच्या घेऊन आले की तुम्ही लौकर श्रीमंत स्वामीपासी जाऊन सर्वा गोष्टीचा सलूक करून येणे. त्यास नवाब याकूबआलीखानास घेऊन आम्ही सो दर्शनलाभ घेयासी येतो. मागाहून वृत होईल ते सो विनंती लिहू. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.

¶*This is an important document of which the first sheet is not forthcoming. It seems to be addressed to the Peshwa at a critical juncture in the situation at Delhi when Shahajada Ali Gouhar had taken flight to Patna and put himself under the protection of the British. The distracted condition of Delhi as much distressed Ahmedshah Abdali as the Peshwa who had taken upon himself the responsibility of protecting the North. Abdali was evidently anxious to come to an understanding with them and thus end the confusion. For this he sent his ambassador Yakub Ali Khan to negotiate terms. The writer asks the Peshwa his permission to visit him with the Abdali's agent.*

---

*No. 104]* *[6-8-1759*

**श्री.**

छ १२ जिल्काद सनसितैन.

सेवेसी विज्ञप्ति. आज्ञापत्र छ २४ रजबचे पाठविलें ते छ २९ साबानी पावलें. तेथें आज्ञा, वजिराचा महद् अन्याये जाला; तरी त्याचे पारपत्य करावें. क्षुल्लक गोष्टीसाठी चितावर न घेणें. नजीबखानानी श्रीमंत राजश्री दादासाहेबासी

१ खातरजमेची. २ पाठवून देणें. ३ कच्चे मसुदे.

दिलीस असता त्यानी येथास्थित वर्तणुक केली नाहीं. त्याचे पारपत्य करावें आण पुर्वेस जावयाचा विचार करून बंगाल्यास जाऊन मातबर पैका मेळऊन कर्ज वारावयाची तजवीज करणें, वजीरास समागमे घेऊन बंगाल्याचे काम करून घेणे. त्याच्या जाण्याचे प्रकार फार आहेत व पेच फार आहेत म्हणोन त्याचे येणे न जाह्ले तरी सुज्यातदौल्यासच हाती धरून पूर्वेची कामें करून घेणे म्हणोन आज्ञा.

आज्ञापत्र पावतांच शतद्रु नदीहून कूच केले. पूर्वेस जावयाचा मनसबा केला असें दिलीस गेल्यावर वजिरास समागमे आलातरी घेऊन जात आहों. त्यांनी आमचे मुद्दे मान्य केले तरी बराबर नेऊ.

१. प्रयागचा किला द्यावा.

१. श्रीची सनद द्यावी.

१. पटण सरकारांत द्यावें.

१. द्रव्य मिळेल ते दररुपयास.

·|= साहाआणे वजिरानी घ्यावें दाहाआणे आम्ही घ्यावें

यैन वाटा चौथाई बा

·||· ८=

येणेप्रमाणे आमचे मुद्दे त्यानी कबूल करून सनदापत्रा करून दिल्या तर त्यास घेऊन जात आहो. समागमे न ये दिलीस राहून स्वामीच्या कार्यास कांही कुविद्या करू लागला तर पूर्वेस गेल्यावर सुज्यातदोल्यासच हाती धरून पूर्वेकडील काम जैस दृष्टीस पडल तैसाच मनसबा करून स्वामी कार्य केले जाईल. छावणी पूर्वेस करावयाचा विचार केला असे. प्रजन्य काळीच बंगाल्याचे काम केले जाईल. स्वामीचे पुण्यप्रतापे करून सर्व उत्तम होऊन येईल.

नजीबखान याचा वकील येथे येऊन करार करून गेला आहे कीं फौज सुधां बराबर पूर्वेस यावें याप्रमाणे करार केला आहे. फौज सुधां समागमे येऊन येथास्थित वर्तणूक करू लागला. गेला तर उतम जाले. बराबर न ये तरी त्याचे पारपत्य केले जाईल. येमुना उतरते समयी येऊन केल्या कराराप्रमाणे फौजसुधा आला तर उतम जाले. न ये तरी आज्ञेप्रमाणे त्याचे पारपत्य करून तेथील बंदोबस्त करून पूर्वेस जाऊं. याचे कामास गुंतावे तरी दिवसगत लागेल. थोरल्या कामास अंतर पडल. गंगापार जावयास अवकाश थोडका यास्तव त्याची समजावीस काढून बराबर न्यावयाची तजवीज काढली असे १

अंतरवेदीतून जातां मुलकाची रखवाली करून गंगेस पूल बांधोन सुज्यात-दौल्याच्या मुलकांत जातो. तेथील जमीदार व भूमे हाती घेऊन जैसे दृष्टीस पडेल तैसा बदोबस्त केला जाईल.

सुज्यातदोला यांनी शहाजाद्यास दोन लाख रुपये देऊन बराबर आपली फौज देऊन मिरजाकोचलास (?) देखील दिल्हे असेत. पटण्यास गेले. पटण-वाल्याची याची कटकट जाली. शहा जाद्याचे ठिकाण लागले नाहीं. दुसर मागल करारपैकीं त्याजकडे बाकी येणे आहे. कासीची सनद जाली असतां अमल दिल्हा नाहीं. ऐसे निमित्य त्याजकडे आहे. हरएक निमित्य त्याजवर येऊन स्वामीकार्य करून घेतले जाईल.

कर्ज वारावयाची चिंता असो द्यावी म्हणून आज्ञा केली तरी कर्जाची चिंता आम्हास आहे. पूर्वेस गेल्या-वर * * मनसब्यामध्ये द्रव्यविशेस मिलल, अण कर्जवारे तेच केले जाईल. स्वामीस कर्ज जाले आहे त्याची काळजी रात्रंदिवस लागली असे. कायाकस्टे करून मिलल ते सेवेसी पाठऊन देऊ.

लग.

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*An important letter of Dattaji Scindia to the Peshwa describing how faithfully he was acting up to the instructions he had received from the latter.*

---

*No. 105]* *[1759*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब**
**स्वामीचे सेवेसी.**

विनंती सेवक विठल सिवदेव कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ १७ माहे जिल्हेज मु॥ इंद्रप्रस्थ येथे स्वामीचे कृपावलोकने करून वृत येथास्थित असे विशेष. राणोजी देवकर यानी लबाडी करून पागा दरोबस्त टाकून घोडी रानात सोडून राजश्री अंताजीपुत्राच्या समागमे देशास आले आहेत. बोर्लीचार्लीचे अनुसंधान त्याजकडे लाविले आहे. याखेरीज सिलेदार व बारगीर फिताऊन नेलेच आहेत. त्याच्या थोरपणाची रीत सेवेसी ल्याहावी येसे नाहीं. राजश्री अंताजीपंताचा व आमचा करार कीं त्याजकडील सिलेदार व बारगीर आम्हीं ठेऊ नयेत. व आम्हाकडील त्यानी ठेऊ नयेत येसे असतां ते अपल्या कर्तुत्वास चुकत नाहीत. बरे थोरच अहेत. येसियासी राणोजी देवकराची माणसे पुरी आहेत. तेथे स्वामीनी हुजरे पाठऊन त्याची मुलें माणसें कैद करून

---

१ हा मिर्झाकोचला कोण?

विंचुरास पाठवावयाची आज्ञा करावी. तेसे अलीमहात व नुरखान हे आम्हापासी बहुत दिवस होते. ते चाकरी टाकून राजश्री अंताजीपंताच्या पुत्रासमागमे देशास आले आहेत. त्यांजकडे दोन् हजार रुपयेपर्यंत फाजील आहे. त्याचे घर मौजे राशांमधे आहे. तेथे स्वामीनी चौकी बसऊन त्याची मुले माणसे विंचुरास पाठवावी. स्वामीनी याप्राा शिक्षा केलिया धास्त बेसोन दुसरा कोणी बदफैल करणार नाही. * महातानी दरोबस्त कारखाना टाकून अताजीपंती फिताऊन नेले. कारखाना सरकारचा. माहातानी बदमामली करावी येसे नाही. त्यांस शासन जाल्याखेरीज सरदारात कैद राहात नाही. तूर्त त्यास अताजीपंताचे पुत्र लपऊन ठेवितील. त्याची रांडापोर राशात आहेत. ते कैद करावयाची आज्ञा करावी. राणोजी देवकर लबाड. पागा राणात सोडून बेकैदी करून गेला. त्याचे घरी चौकी बसऊन त्याचे पारपत्य करणार स्वामी समर्थ आहेत. देसच्या माहालचा येवज कर्जास तरी नेमून देवणार स्वामि समर्थ असेत. चांदवडच्या किरकोल खेडीयाचा येवज दरोबस्तचा ठेवीदेखील आद्यात ल्याहावा, येसे यादीवार करार आहे. त्याप्रों तेथील येवज चाकरी सुधा पंधरा हजार होईल. त्यात टांक [सा] लीस दोन हजार तोटा आहे. आद्यात च्यार हजार तनख्या प्रों धरले. आकार दोन हजार केला आहे. ये गोष्टीची चौकसी पाहून तोटा मजरा देऊन बाकीचा येवज आघात धरवावा. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Vithal Shivdeo complains against Antaji Mankeshwar to Bhausaheb. He was later severely punished at the end of 1759.*

---

*No. 106]* *[11-11-1759*

**श्री.**

छ २९ रबिलाकर

**पु॥ श्रीमंत राजश्री पंतप्रधान**

**स्वामीचे सेवेसी.**

विज्ञाति ऐसीजे. अब्दालीचे चपेर[2] काबुलेहून छ २० रोवली दिलीस पोहचले. तालीकचे व रकम याकुब अलीखानास व नजीबखानास व राजे माधोसिग व राजे बिजेसिंग वगैरी यास आले आहेत की आम्ही फौज जमा करून हिंदुस्थानास यावयाची तयारी केली. येऊन पोहचतो. तुम्ही साफ लिहिणे कीं पातशाहाची

---

१ रासें–जि. नगर. २ चपराशी, दूत. * अक्षर भिन्न.

अतायेतमध्ये रोहिल्यांत व राज्यात कोण कोण आहे? श्रीमंताच्या घराची काय हकीकत अहे? शाहअलम व शुज्यातदौले कोणे फिकिरींत आहेत? वजीर व सुरजमल काय करितात? ठाकूर सुरजमल व नजीबखानाचे कार्ये जाले. मुफसल लिहिणे. ज्याहनरुवा सरदार पुढें रुखसत केला आहे, तो सत्वरच येऊन लाहोर दाखल होईल. याप्रा तालिकच्या[1] याकूब अलीखानास अला आहे. व नजीबखानास लिहिले आहे कीं हिंदुस्थानचे सलतनतचा नजराणा वाजबी आहे, तो सालबसाल पोहचावणे येविशयीं उजूर करील त्यासी समजून घेऊ. या प्रा सर्वांस लिहिलें आहे. श्रृत होये कृपा केली पाहिजे. हे विज्ञप्ति.

¶*Abdali's messengers came to Delhi with dispatches for Najibkhan, Madhosingh and others.*

---

*No. 107*] [*10-12-1759*

**श्रीकृष्णोजयेती.**

पौ छ १६ माहे जमादिलावल
सन सितैन पौश मास
मुकाम नगर

**श्रीमत माहाराज राजश्री पंडित प्रधान**
**बालाजीराव नाना स्वामीचे सेवेसी.**

पो राजा केशवराव सा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ १९ रालाखर झार्सात जाणून स्वकुशललेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. दिलींत वजिराने आलमगीर पातशाहास छ ८ रोज माहे रालाखरी मारून दुसरा पातशाह कामबक्षाचा नातू किकियात कैदेत होता त्यास काढोन तख्ती बसविले. आपण दिलीहून कुशलरूप कूच करून सिंदीयाचे लस्करात गेलो. मागे हे काम करविले. हे करावयास मूल, अबदाली लाहोराकडून दिलीकडे येणार व फौजा त्याच्या सिरहिंद पावेतो आल्या, हे जाणून, पातशाहाचे त्याचे सूत्र येक जाणून, वजिराने हे काम केले. व खानखाना वजिराचा सखा मामा पूर्वी वजीर होता त्यास वजिराने कैद करून घरदार लुटले होते त्यासहि जिवे मारून टाकिले. मूल आलमगीर पातशाह जो दिलीत होता त्याचे जागा दुसरा पातशाह जाला. व अलमगिराचे कबिलियांत लोक पाठऊन त्या सर्वास लुटले व बाहीर काढले. आतां अबदाली दिलीस अगर रोहिल्याचे कुमकेस जातो हे पाहावे. रोहिले व शुजाउदौला येक होऊन सिंदायाचे मुकाबिलीयावरी आहेत. अबदालीहि त्यात

---

[1] तालिकचा—आज्ञापत्र.

मिलाला तरी तिघे येक होतील. त्या तिघासी सिंदे मुकाविला घेतील. इतकियांत राजश्री मल्हारराव होल[कर] सुबेदार प्रस्तुत माधवसिगासी त्यासी प्रसंग आहे. जुंजहि मोठे जाले. इकडील काम उरकोन सिद्याकडे जाऊन कुमकेस पावायास तफावत फार आहे. माहाराजाचा प्रताप सर्वास सहाय आहे. विशेष कार्ये लिहावे. माहाराजास वर्तमान चहूकडून पावतच आहे. आम्हीहि वरचावरी विनंती पत्रें आज्ञेप्रमाणे पाठवीतच आहो. विदित होये व आज्ञेप्रमाणे सिदे सरदारासहि वरचे वरी लिहावयाचे लिहितों. विदित होये हे विनंति.

¶*Raja Keshav Rao writes to the Peshwa the arrival of Abdali's forces against Dattaji and Jankoji Scindias.*

---

*No. 107a*] [*30-4-1757*

**श्री.**

नकल

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री केशवरावस्वामी गोसावी यासी.**

पो बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष. पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले. अबदालीचा मजकूर व कर्तव्यमनसुबा याचा अर्थ विस्तारे लिहीला तो कलला. येशास चिरंजीव रा. दादा व रा मल्हारजी होलकर त्या प्रांते आहेत. उचित मनसबा त्यासही लिहीत जाणे आणि आम्हास तिकडील वर्तमान वरच्यावर लिहीत जाणे छ ११ साबान बहुत काये लिहीणे हे विनती.

---

*No. 108*] [*16-12-1759?*

**श्री**

छ २९ राखर

**पु॥ श्रीमंत राजश्री पंत प्रधान**

**स्वामीचे सेवेसी**

विज्ञाप्ति यैसीजे. ठाकूर सुरजमल व नजीबखान यांच्या भेटी जाल्यावर हे उभयेता व राजे नागरमल अवघी मंडळी पा * * * हजवळ जाणार. नवाब याकुब आलीखा(न) [ पुढील येक ओळ फाटली आहे] यावयाचे महकूब केले. परतु तार्कीद शाहाची व शाहावलीखानाची हमेश येत आहे. परंतु स्वामीचे आज्ञापत्र आल्यावाचून तिकडे येणार नाहीत. खलिता याकूब आलीखानाचा पत्राचे उत्तर पाठविले आहे. त्यावरून श्रुत होईल कृपा केली पाहिजे हे विज्ञाप्ति.

¶*Negotiations continued between Abdali and the Marathas through Yakub-khan, his agent.*

*No. 109]* *[21-12-1759*

श्री.

छ ४ जमादिलाखर
माघ सीतैन

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी विज्ञापना येसिजे. राजश्री जनकोजी शिंदे व रा दताजी सिंदे नवाब वजिरुल्ममालिक बाहादुर यांसहित शुकुरतालाहून निघाले. ते दरकूच * छ २७ रविलाखरी कुंजपुऱ्यापासी यमुना उतरले. तेथें बातमी ठीक आली कीं तैमुरशाह अबदाली जाहानखानासहित व शाहवलीखान व समंदखां वगैरे सर्व सरदारासहित चालसापंन्नासा हजारा फौजेनसी मौजे कलडु व बनोरा व छत येथें येऊन छ २४ माहे मजकुरी शनिवारी दाखल जाला. अंबाल्यापर्यंत हरोलाची फौज उतरली आहे. अंबाला सिरहिंदीहून अलाकडे वीस कोस व कुंजपुऱ्याहून चालीस कोस आहे. डावे उजवे बाजूने व अगाडीकडे फौज ताराज करीतात व दाहादाहा वीस वीस कोस राण सोडवीत जातात. यैसी ठीक बातमी अल्यावर राजश्री दताजी सिंदे यानी दोन फौजा केल्या. येक फौज तो भेल[1] घोडिये नामी नामी सरदार व कामाची माणसे भरोशाचे लोक जेरारी[2], पाल पडतल तंबू कनात बराबर नसे येसे निवडून पंचवीस तीस हजार आपल्या बा॥ घेतली व रा जनकोजी सिंदे याजला बाकीची फौज व तोपखाना घेऊन व नवाब वजीरुल्ममालिक यांस त्यांचे फौज व तोफखान्यासहित आपल्यापासून बारा पंध्रा कोसाचे अंतरें मागे पुस्तगर्मीवर ठिवले. व याजमागें आपली व नवाबाची बहीर ठीवली कीं बहीरेचेहि संरक्षण होय व काम पडल्यावर आपलेहि कुमकेस पोहचते. कदाचित अबदाली कावा करून डावे उजवे येखादी फौज घावरे करायासाठी बहीरेवर पाठवितील तर हे उभयेता पारपत्य करीत. येसी तजवीज व नेमणुक करून छ ३० राखरी शुकुरवारी आपण जरारी फौजेनसीं अबदालीच्या मुकाबल्यावर गेले व रा जनकोजी सिंदे व नवाब वजीर बहीरसहित कूच करून करनालेकडे आले. अबदालीचे अगाडीचे लोकासी व रो दताजी सिंदे यांच्या आगाडीचे लोकासी नजरनजर चोटफेटेहि[3] जाली. जुजास प्रारंभ जाला. उद्या परवा खासा दताजी पाटील ह्यांच्या मुकाबल्यावर जाऊन त्याचा वावदाव व जुंजाची तर्तूद पाहून बळावळ तोलून जुजात जलदी करीतात किंवा धीमेपणे जुंजतात या सर्व गोष्टी व

---

* १८-१२-१७५९.
२ मर्दे.
१ शिलेदारांची घोडी.
३ हातघाई झीटपीट.

तऱ्हे व त्यांची इंगितें पाहून तदनुरुप आपुणही जुंजाची तर्तुद करणार. मागाहून जसजसे वर्तमान होईल तसतसें विनंती करीत जाऊं. बहुत काय लिहिणे. कृपा केली पाहिजे हे विनंती.

¶*News-letter giving Dattaji Scindia's preparations to meet the onslaught of Abdali's forces, showing that Dattaji did not enter rashly into the conflict.*

---

*No. 110*] [*27-12-1759*

**श्री.**

पौ छ ६ जमादिलावल साईकाल

+ सेवेसी विज्ञाप्ति. येथील कुशल ताा छ ६ जमादिलावल मुाा भांडेर दोन प्रहर दिवस येथास्थित आसे विशेष. फौजेचा मोहरा येथून जुडला आहे. आपल्या सामानाहून त्याचे सामान भारी आहे. दुसरे काली गुजरहि जाऊन सामील आले आहेत. त्याची आमची लडाई जुडली आहे. दुसरें शाहरास बहीरकोंटा नाहीं. गाव आफाट. यैशास मोर्चेबंदी केली पाहिजे. यास्तव बेलदार शंभर पाठविले पाहिजेत. सदरहु संभर बेलदार जरूर पाठविणें. जाटाकडील फौजेचे कुच होऊन मौजे बारेच येथें मुकाम होणार आहे. त्याचें आमचें कोसाचें अंतर. मोहरा जुडला आहे. यैसियासी बुधसिंग व हरीसिंग आले असतील. त्याची बिदा पत्र पोचतां करावी. लढाईचा वखत आहे. त्यास दारुगोली आधी पाठविली पाहिजे. दारुगोळीस ढील न होय. दारुगोली सत्वर पाठवावी. बहूत काय लिहिणे हे विनंती.

राजश्री आपास्वामीस व समस्तमंडलीस सां नमस्कार लिाा परिसोन लोभ कीजे हे विनंती.

¶*May this letter refer to Jeta Gujar mentioned in Bhausaheb's bakhar? If so, some more light is necessary.*

---

*No. 111*] [*28-12-1759*

**श्री.**

छ २२ जमादिलाखर सुाा सीतैन

**श्रीमंत राजश्री......पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.**

विनंती सेवक दताजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा छ ७ जोवल मोा कुजपुरा परयेत स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित असें विशेष. सरकारची आज्ञापत्रे छ + सफरची पाठविली ती छ ९ रोाखरी

सादर जाली. तेथें आज्ञा कितेक मनसब्याचा अर्थ वजिराचे स्नेहाचे वर्तमान व सुज्याउदौला याजपासून माहाक्षेत्रे घ्यावयाचा अर्थ व रोहिले यांचा मजकूर व पुर्वेकडे जावयाचा मनसबा वगैरे कितेक तपसिले आज्ञापिले ते कलले. ऐसियास येतद्विशईचा अर्थ अलाहिदा पुरवणीपत्री तपसीलवार सेवेसी विनंती लिहिली असें त्यावरून विदीत होईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति[१].

*¶Dattaji's letter to the Peshwa showing how anxious he was to carry out the Peshwa's instructions to march into Bengal with Suja-ud-daula and take charge of the holy places of the Hindus.*

---

*No. 112*] [*3-1-1760*

**श्री.**

पौ छ १२ जमादिलाकर

शेवेसी विज्ञापना आज छ १२ जमादिलावली दिलीहून बातमीची पत्रे आली की राजश्री दताजी सिंदे कुजपुरियाहून सडे होऊन पुढे गिलज्याचे तोडावर गेले. राजश्री जनकोजी सिंदे व राजश्री गोविंदपंत व वजीर येसे बुणगियांत तेथेच राहिलेहेत. दताजी सिंदे यांसी व गिलज्याची फौजसी घाट पडली. च्यार साह घटका परस्परे युद्ध प्रसंग जाले. उपरांतिक उभयेता आपलाले ठिकाणी कायेम राहून मुकाम केले. तो तेच दिवसी गिलज्या रात्री कूच करून बुढियापासी येमुना उतरोन आंतरवेदीत गेले. पुढे नजीबखान हे येकत्र होणार. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

*No. 113*] [*1-1-1760*

( वरील भाग गहाळ )

फौज वीस हजार ज्याहनखान व संमदखान वगैरे सरदार शतद्रु नदी उतरोन आलीकडे आली. याजकरितां आम्ही नजीबखानाचा शह सोडोन कुजपुरियापासी येमुना उतरोन वर आलो, तर आपणहि तिकडील कामे टाकून इकडे सत्वर यावे म्हणून लिहिले. त्यावरून आम्ही उचित मनसबा जाणून तोफखाना माघारा लाविला. इकडील कामे मागे पुढे करावयासी कार्यास येतील. मागे दुसाल

---

१ ह्याच मजकुराचें जनकोजीचेंहि पेशव्यास एक पत्र आहे.

नुकसानी जाली. पुढे येकसाल होईल ते पुरवली; व स्वामीचीहि आज्ञा की तिकडील इकडील विचार पाहून मनसबा कर्तव्य तो करावा. म्हणून. त्यास काल छ ११ जमादिलावली कूच केले. आथ:पर या प्रांती कोठे येकक्षण न गुंतता मोठाल्या मजली करून गिलज्याचे पारपत्यासी जात आसो. होईल वर्तमान ते वरचेवर विनंतीपत्रे सेवेसी लिहीली जातील. तिकडील वृत्त सर्वदा लेखन करावयांसी आज्ञा करावी. सेवेसी श्रृत होय हे विज्ञापना.

¶*Malharrao Holkar to Dattaji Scindia, proposing to proceed immediately to meet the latter.*

---

*No. 114*] [*15-1-1760*

## श्रीवरद.

राजश्रियाविराजित राजमान्य रा महिपतराऊ दाजी स्वामी गो. स्नो पुरुषोतम माहादेव कृतानेक असीर्वाद विनती उपर. येथील क्षेम ताा २९ जमादिलावल मुाा कोटपुतली लस्कर रा जनकोजी सिंदे व रा मल्हारजी होलकर जाणून स्वक्षेम लिहणे विशेष. इकडील सविस्तर व्रत श्रीमंत स्वामीचे साो लिाा आहे त्यावरून विदित होईल. तात्पर्यार्थ हाच की दिलीजवल अबदाली व रोहिल्यासी जुंज झाले. रा दताजी सिंदे ठार पडले. जनकोजी सिंदे यासि दंड फोडून गोली गेली. तेथे आम्हास मांडीवर गोली जेजालेची लागली. वरकड तेथे दाहाबारा बारगीर पडले. गवताचे दाटीमुले यमुनेचे काठी निकड जाली. फौजेचे तोड न लागले. तसेच सतर कोस चालले आलो. त्यानीं वीस कोस पाठलाग केला. प्रथम सरदारासी गाठ पडल्यामुळे फौजेस तेज न राहिले. अतांच बाधवाई खबर आली की रा दताजी सिंदे जिवंत जखमेत चूर आहेत. ते मागून येतात म्हणोन लुटलेली माणसे येत्यांत ते सागत्यात. शुभवार्ता जाणून लिाा असें. ये समई आमचे समागमे पाचसात हजार माणूस असते तर श्रीकृपेनें श्रीमंत स्वामीचे सेवेंत चाकरीचा मुजरा दिसोन येता; व येईल तो श्रीकृपेने सुदीन करणे अर्ज करणे हे व्रत श्रीमंत स्वामीचे सेवेसी विनंती लिाा नाहीं यास्तव अर्ज करणे. कृपा करणार धणी समर्थ आहेत. भेट होये तो सुदिन. तिलशर्करायुक्त पाठविले आहेत. भक्षून उतर पाावे व पावते करणे. हरप्रकारे खाविंद कृपासागरता करीत ते करणे. जिणे थोडके व सेवाधर्मी तत्पर. श्रीमंत कृपा करोत हे विनंती.

¶*Hingne to Mahipatrao Chitnis. Writes details of Dattaji Scindia's fight and death at the battle of Delhi.*

---

१-१-१७६०

*No. 114a]* *[23-1-1760*

श्री.

छ ४ जमादिलाखर माघ सीतैन.

पुरवणी श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवेसी विज्ञापना ऐसीजे. पश्चमे कडुन आबदालीची दाटी जाली. याकरीतां राजश्री दत्ताजी सिंदे व जनकोजी सिंदे सुकुरतालाहून कांहीहि दार मदार न करतां वाहियात्कारे सी सुजाउदौला व पारच्या रोहील्यासी व नजीबखानासी श्नेहसंदर्भ न करतां उठुन आबदालीवर आले. याजकरतां रोहिले व सुजाउदौला केवळ इकडल्या (स)ळुकांसी[1] ना उमेद जाले व चितांत पूर्ण जाणलें कीं हे आबदालीची फते केल्यावर आम्हांस व आमच्या मुलकास सहसा सोडीत नाहींत. आबदाली तों आपलाच बोलाविला आला आहे. अत:पर त्याचींच पुर्ती रफाकत करावी व [स र्व मि] ळून यांच्या पराभव ऐ * * * * * * हिंदूस्थानातून यांचा पाय नीघे. बलकी[2] येथे * * हि विचार घाटीतात कीं याचा पराभव * * * यावर तैमूरशाहास दिलींत आणुन पातशाह करावे, सूजाउदौलाने वजीर व्हावे, नजीबखानाने मीरबक्षी व्हावे, व दिली हिंदूस्थान कायेम करावें. कां कीं तैमूरच्या औलोदीत[3] कोण्ही पातशाहत राखींसा नाहीं व आपल्या हातींहि नाहीं. वजीर तर केवळ मऱ्हाठ्यांचाच. मऱ्हाटे व वजीर यांचा बोलबाला जालियाने आम्हास जागा नाहीं, याकरतां सर्वात्मना आबदालीसच बलवावे येथ पर्यंतहि मनसबे घाटले. सुजाउदौलानी व पारच्या रोहील्यानींहि मनसबा बरा आहे म्हणुन मानिला. परंतु इतके परीछिन वादें नागवे उघडे होऊन आबदालीची रफिकत करावी व शामील व्हावे. यास राजी न (जाले. पार) चे रोहीले तर पारच्या कांठीच आहेत. सुजाउदौला दोन तीन मजली पलीकडे जाउन * * * * हे जोंवर आबदालीची व मऱ्हाठ्याची गो [ला गोली] तत्वी होय तोवर तेथेंच राहतील * * * खाही छ २९ राखर पावेतो सुकुरतालातच आहे. परंतु त्याची वासना व उत्कृष्ट हेत आहे कीं मऱ्हाठ्या फौजा व वजीर यमुनापार गेल्यावर, आपण फौजे सुधा धावून, बुडियाचे घाटे येमुना उतरून, अबदालीस शामील व्हावे, ऐसा त्याचा बेत फार आहे. बलकी येथवरहि त्याचा बेत कीं जर मी पावल्याअगोदर मऱ्हाटे अबदालीवर शेर जाले व आबदाली बुडियाच्या घाटे येमुना उतरून अंतरवेदींत आला तर निदान पारचे रोहिले व आपण शामील

---

१ मैत्री. २ बलकी=किंवा बहुना. ३ औलाद=कुल,

होऊन जुजावें. जर पळून मागती अटकेकडे गेला तर अलीगोहर शाहजाद्यास पटण्याहून आणून पारवाले व सुजाउदोला व बंगालेवाला त्याचे रफीक[१] होऊन फितूर उभा करावा. ऐसा नजीबखा बहुत वलगना व खटपट करू इछितों. पहावे ईश्वर इछा काय आहे. यद्यपि मनसबा तर भारीच पडला * * आहे. रजपुताकडे राजश्री मलारजी होळकर (गुतले) * * * चहुंकडून दुशमान फौजाही भारी व सारे अमित्र. परंतु स्वामीचा पुण्यप्रताप व थोर प्राक्तन सिकंदर[२] ताले व सिंदे मोठ्या हिमतीचे माणूस जवांमर्द शूर पराक्रमी. येवढे आवडंबर आले असतां किमपि भय अगर चिंता किंवा कसे होईल हा उद्योग ज्याच्या मुखश्रीवर दिसतच नाहीं. श्रीमंताच्या पुण्यप्रतापे मारूनच घेतो हेच तोंडावाटे अक्षरें निघतात. श्रीस्वामीची फते व बोलबालाच करील. श्रुत होय. बहुत काय लिहिणे. कृपा केली पाहिजे हे विनंती.

¶*This appears to be Ramaji Anant Dabholkar's (?) letter to the Peshwa giving vivid details of the situation of the Scindia's forces when Abdali advanced against him.*

---

*No. 115*] [*25-1-1760*

## श्रीमोरया.

×छ १३ जमादिलाखर.

सेवेसी विज्ञापना. इकडील वृत सर्वदा पत्री लिहिले आहे. पूर्वी लाकोडेस रांगड्याची फौज च्यार हजार व पायेदळ जमा होऊन त्यास मारून लुटून पस्त केले. जोतेसिंग नाथावत व राजावत व सेकावत व चव्हाण वगैरे वीस सरदार मारले गेले. त्या दिवसापासून रांगडा कोणी जमाव करून बाहर निघेनासे जाले. जागा जागा थांगा धरोन राहिले. पूर्वी राजश्री जनकोजी सिंदे याजकडील पत्रे आली होती. त्यावरून आम्ही तोफखाना माघारा लाऊन सडे होऊन दरमजल त्या प्रांतास जात होतो. तेणेकडोन रांगडे बहुतच वारा घ्याले. आम्ही व पुढील फौजा जे दिवसी एकत्र जालो तेच दिवसीं राजश्री जनकोजी सिंदे याजकडोन पत्रे आली. त्यात गिलज्याकडील बहुतसी गर्मीचा मजकूर नवता, आणि इकडील रागडीयांनी जमाव करून * * * *

(पुढील मजकूर फाटला आहे).

¶***This mutilated letter seems to be from Malharrao Holkar to the Peshwa.***

---

१ रफीक=दोस्त स्नेही. २ ताले सिकंदर=उच्चग्रह.

· No. 116] [1-2-1760

श्रीमोरया.

पो. छ १३ जमादिलाखर.

श्रीमंत स्वामीचे शेवेसी.

कृतानेक सां. नमस्कार विज्ञापना. स्वामी हस्ताक्षर आज्ञापत्र पाठविले ते पाउन आमृंतोल्हास जाला. ता। पुंस वद्य १ मु॥. झीलाये सेवकाचे वर्तमान येथास्थीत असे विज्ञप्ति. माधोसिंगाने बहूत कृतघ्नता केली. थोडसें पारपत्य जाहालें. पुर्ते पारपत्य करावें तों राजश्री जनकोजी सिंदे व राजश्री दताजी बावा पाटील यांचे पत्रें आली. आबदालीची दाटी फार जाहाली आणि नजीबखानाची गांव लढाई केली. आणि साबाजी सिंदा आवई ऐकुन पळाला तो तहद लस्करास अंतरवेदीनच आला. ठाणें सरहंद वगैरे होतीं तेथे दम न धरिला. तेणेकरून आबदाली सेर जाहला. नजीबखान आबदाली येक होणार, चौकडुन माधोसिंग व मुसलमान यांचे कान आबदालीकडे. यैसे बहूत जड दिसतें. परंतु राजश्री सुबेदार येकनिष्ट खावंदाच्या (पा) यासी तेणें करून कांहीं चिंता नाहीं आ (पले) प्रतापेंकरून पराभवाते शत्रु पावे. (फी) कीर नाहीं. राजश्री सुबेदार यांची (दुरं) देशी बहूत. यांच्या तजवीजने वर्तणुक केलिया मनसवा धको पावत नाही. शरमीने[1] हरयेक गोष्टीनें मागे बारीक दृष्टीने याचे मनोधारण राखणार स्वामी समर्थ आहेत. आवंदा फौज मातबर विशेष ठेविली. सर्व निर्वाह करणार स्वामीचे पुण्य आहे. मुजपरगाडदीयाने विस्वासघात केला होता. चांडाळास नतिजा देऊन मारून टाकिला. येणें करून बहूत संतोष जाहला. स्वामी पुण्येश्लोक आहेत. तेथे काये होणे आहे! परंतु ईभरामखान गाडदी निजामआलीकडील ठेविला आहे. त्याचाही विश्वास अतिनिकट धरीत न जावा. स्वामी तो सुज्ञ आहेत. राजश्री सुबेदार व राजश्री सिंदे येकत्र करितो. येकत्र जालियावर साहेबकाम उत्तम होईल. कर्जा बा। कार्तिक मासचा वाइदा बहूत प्रयेत्ने केला कीं स्वामीस सचोटी यावी. वरकड सदैव सेवकाचा सांभाळ करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Gangoba Chandrachud addresses this letter to the Peshwa in his own hand and asks him to follow the advise of Holkar in the struggle against Abdali.*

---

१ होळकराची शरम किंवा मान ठेवून.

*No. 117*] [*3-2-1760*

**श्रीमोरया.**

छ १९ जमादिलाखर.
सितैन माघ.

सेवेसी विज्ञापना. साहेबी छ २९ रबिलाखरीची पत्रे आली ते छ १२ जमादिलावली पाऊन बहुत संतोष जाला. नगरचा किला घेतला. मोगलाकडीलहि किल्याच्या सनदा व जागिरीची यादी निवडून पाठविली. ते खरल खोचल (?) जागा आहे. हैदरखान गाडदी दूर करून मुजफरखानास त्याचे ठाई ठेवणार होतों. तो आपले कर्मानरुप फल पावला. सांप्रत हैदरखानास सरकारांत ठेवितो. इकडील सरदारास दाबाव आस (?) * * * म्हणून स्वारी गंगातीर पावेतो आली. तुम्हाकडील वृत्त प्रस्तूत काये? गिलज्या आलियामुळे राजश्री जनकोजी सिंदे तिकडे गेले. त्याजला मनसबा, तुम्हास इकडे मनसबा, यैसे नसावें. उभयेता येक जागा होऊन भारीपणे जे काये करणे ते सेवटास न्यावे. सुज्यातदौला वजीर कोणे ठिकाणी? वजिराची बुध्धी सुधी नाहीं. उभयेतांसहि हाती राखून जाटास हातीं घेऊन भारी मनसबा करून सिध्धीस न्यावा. पठाणाचा मनसबा भारी तो आधी सेवटास नेऊन तिकडील बंदोबस्त करावा म्हणजे रजपूत सहजात सुरलीत होतील. माधवसिंगाने किला देऊन सुरळीतपणे वर्तला तर पुढे तिकडीलच विचार मनास आणावा. पठाणाचे दहशतीनें दिलीतील वजीर आदिकरून सर्वांचे कबिले बाहेर गेले तर तुम्ही त्याचे कार्यासी जाऊन कार्यसिधी करावी आणि पैदरपै वर्तमान लिहित जाणे. त्याप्रो इकडील मनसब्यास नेट देऊन करूं म्हणून विस्तारें आज्ञा केली. यैसियास इकडील वृत्त पेशजी सविस्तरें लिहिले आहे. लाकोडेस रागड्याची फौज बुडविल्यापासोन कोण्ही बाहेर जमाव करून निघेनासे जाले. परंतु जागाजागा आसरियाने राहून लबाडीस चुकेनात. आम्हास राजश्री जनकोजी सिंदे याजकडील पत्रे निकडीची आली की आम्ही गिलज्याकडे जातो, तुम्ही जलद येणे. त्यावरून आम्ही कोटेजैपुर वगैरे सर्व मामलत मनसबा सोडून तिकडे दरमजल चाललो. थोर तोफखाना बा। होता, तो फिरोन रामपुरीयास लाऊन दिल्हा. हे वृत्त रागड्यात कलल्या. बहुतच श्लाघा आरंभल्या. आम्ही जैपूर टाकून पुढें गेलो म्हणजे सर्वांनी एक होऊन धूम करावी. त्याचे पारपत्य जाले पाहिजे. त्यासी पुढील फौजा आम्ही सामील जालो तेच दिवसीं रा।। जनकोजी सिंदे याची पत्र आली. त्यांत गिलज्याचे गर्मीचा मजकूर नवता आणि आलिकडे आलियाची आवईहि नाहीं. नजीबखानावरच मोरचेबंदी करून होते. तिकडील अवसर

पाहून येथील रागड्यास जरब आठ पंधरा दिवस राहून द्यावी. यैसा विचार करून थोर तोफखाना आणून बलवाडा ठाणे भारी जोम राखीत होते त्याजला मोरचे लाऊन जेर केले. वित्र(क्र?)मादीत वगैरे राजावत व सेकावत सुलतानवत ठाण्यात होते ते बहुत बजीद होऊन कौल मागू लागले. त्यास आपल्या राज्याची रीत शरणास निग्रह न करावा यैसे जाणून त्यास जिवानसी काढून देऊन ठाणे आपले कायम केले. येणेकरून तमाम जागाजागाचे रजपूत भयाभीत जाले. उन्हेर सरदे सेवाड झिलाये आदीकरून सर्वांची राजकारणे येऊन मामलतीचा प्रकार बोलू लागले. त्याजकडे आमचा हाडोतीचा मुलूक आहे तो सोडून घ्यावा. त्याची वतनाची जागा त्यास देऊन मामलत करावी. हे कार्य आठापंधरा दिवसांत करून पुढील मनसबा बातनी येईल त्याप्रो करावा यैसे होते. त्यास छ ७ जावली (28-12-1759) फिरोन राजश्री जनकोजी सिंदे याजकडील पत्रे आली कीं आम्ही नजीबखानाकडील मनसबा सोडून गिलज्याकडे जातों. कुजपुरीयापासी येमुना उतरोन आलों. तुम्ही तिकडील सहश्र कार्य टाकून जलद यावें म्हणून बहुत निकडीने लिहिले. त्यास तिकडील कार्य आधी कर्तव्य. इकडील महालची वगैरे मागे दोन साले नुकसानी आली. त्याप्रमाणें तिसरें साल जाले ते पुरवले. सर्व अर्थ पाहून मनसबा करावा म्हणून स्वामीची आज्ञाहि आली. गिलज्याचे पारपत्य आधी करणे उचित जाणून छ १३ जावली (3-1-1760) कूच करून मुकाम मजकुरास आलों. तोंफखाना जुन्याकडे माघारा लाविला. इकडील मनसबा सर्व सोडून थोरथोर मजली करून गिलज्याचे पारपत्यासी जात असो. सांप्रत बातमीची पत्रे आज आली कीं आबदालीखासा मागेच आहे. ज्याहानखान अबदुल समधखान मातबर फौजेनसी कुरुक्षेत्राआलीकडे आला. राजश्री दत्तबा सडे फौजेने पुढे गेले. राजश्री जनकोजी सिंदे व वजीर याजला बुनगेसहवर्तमान मागे ठेविले. गिलज्या ठाणेश्वरीहून आलीकडे आला. पहिले आपल्या त्याच्या हरोलींची[1] झटपट जाली. मागाहून दतबाहि जाऊन पावले. याचे त्याचे एक जूज उत्तम प्रकारे होऊन नजीक बुढिया मुकाम जाला. आपल्या फौजाहि मुकाम करून राहिल्या. रात्री गिलज्या घाट मजकूर येमुना उतरोन पार अंतरवेदीत गेला. आपली फौजहि मागाहून उतरोन जाणार यैसे वर्तमान आले. सुज्यातदौला आपले हदेवर आहे. नजीबखान वगैरे रोहिले श्रुत्रताला-वर आहेत. जाटाकडील रूपराम आपल्या फौजेत होता तो सांप्रत दिलीकडे नागरमला बा आला. खासा आपल्या जागावर आहे. वरकड रजपूत आपलाले स्थली आहेत. आमच्या जाण्यामुळें माधवसिंग थंडेसे जाले. गिलज्याकडे

१ आघाडी.

सूत्र लाविले आहे. त्याजला इकडे यावयासी मोठे अनुमोदन नजीबखान माधवसिंग उभयेतांचेच आहे. वरकड दुरोन आहेत. प्रस्तूत काले कोणाचेहि कपट राहणार नाहीं. ज्याचे जैसे चलण त्याप्रमाणे निदर्शनास येईल. तदनुसार फल पावतील. इकडील कर्तव्यार्थ मनसबा होणे स्वामीचे प्रतापे उत्तम होऊन येईल. देशी नगरचा किला वगैरे येकदोन ठाणी घेऊन जागिरीचा तह होत आहे. बहुत उत्तम आहे. पुढील विचारहि सर्व साहेबाचे मनोदयानरूप होऊन अमित्र पादाक्रांत होतील. वजीर सांप्रत राजश्री जनकोजी सिंदे याजपासी आहे. त्यास त्याचे पदानरूप चलण नाहीं आणि शाश्वत कार्डामात्र नाहीं. श्वता सामर्थ्य कलतच आहे. परंतु बट्टेबाजीची वर्तनूक टाकीत नाहीं. भेट जाली म्हणजे अणुप्राय होऊन केले कर्म परिमार्जन करितो. अस्तु. आपल्या कर्तुत्वान-रूप फळ पावल. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.[१]

¶*Malharrao Holkar's letter to the Peshwa in Gangadhar Yeshwant's handwriting from Rajputana. It gives very useful details which explain why he did not hurriedly proceed to the rescue of Dattaji when he was attacked by Abdali.*

---

*No. 118*] [*5-3-1760*

**श्रीकृष्णोजयती.**

**श्रीमंत महाराज राजश्री पंडीत प्रधान बालाजीराव**
**नाना स्वामीचे शेवेशी.**

(राजे केशवराव ?) राव साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम तागायत छ १६ रजब मुक्काम झांसी जाणून स्वकुशल लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. पूर्वी विनंतीपत्रे अबदाली व राजश्री मलहारराव होलकर सुबेदार व राजश्री जनकोजी शिंदे सरदाराचे वर्तमानाची वरचेवरी पाठविली असेती त्यावरून सर्व विदीत जालेच असेल. सांप्रत राजे माधवसिंगापासी अबदालीचे येलची गुरबक्षराये व हरजसराये व महताबराये दिवान नजीबखान रोहिलाचा जाबसाला कारणे आले आहेत. माधवसिंगानें सिष्टाचार करून कांहीं कापड व जवाहीर व सलुकाची लिहिली अबदालीस पाठविली असतां त्यानें कबूल न केली. मार्गीहून वस्त्रे व जवाहीर परतून माधवसिंगापासी पाठविले. व पैगाम पाठविला कीं भेटीस येणे. नाहीं तरी मातबर माणूस व फौज पाठवणे व पैकाहि विशेष मागणार याजवरोन

---

१ पत्र गंगाधर यशवंताचे असावें.

राजे मजकूर विचारांत पडले आहेत. आबदालीचे कौलाचा यैतबार नाहीं. प्रस्तुत अबदाली जैपुराहून ४० चालसा कोसावरी बासईवरी मेवातप्रांती आहे. व मलहारराऊ होलकर * * * * प्रांती आहेत. कानोडीहून दहा हजार रुपये दाणा घास घेऊन सडी फौजेनें आहे. मुकाबिला काबू पाहून करीतील व अबदालीनें कढके खोबरी वगैरे राजे माधवसिंगाचा मुलुक मारून कत्तल केला. काहीं पातशाही करायाची रीति व ढंग नाहीं. जरी कौल नीट असतां तरी सर्व राजे जाऊन भेटते. परंतु मुकाबिला घेण्यासहि हिंमत कोणात नाहीं. अबदाली परतूनहि जाणार परंतु नजीबखान व सर्व रोहिले त्यास जाऊ देत नाहींत कीं तुम्ही गेलियावरी मऱ्हाठे सरदार आम्हास राहू देणार नाहींत. याजकरितां त्याचे तजविजेनें अबदाली आजमेरेस जाणार. व तेथें गेलियावरी व राजे राठोड व राणा व बडे व कच्छवा हे रुजू होतील. मग जे करणे ते करावे. किंबहुना रोहिले यासी संकट व तजवीज असी आहे कीं, प्रजन्यकालहि अबदालीनें या प्रांती करोन दसरा जालियावरी दक्षण व गुजराथेकडे जावे. परंतु अबदालीचा जुलूम फार व कौलाचा नीट (नाहीं) * * * * त्याचे राहावयास राजी नाहींत. हे दीर्घ रोग आहे. लाहोर व दिल्ली हे दोन्हीं मुलूक तरी खराब जाले. आतां आजमेर पुढें कोणे थरास जाते पहावे. महाराजाचा प्रताप सर्व विश्व इच्छित आहे. मोगलाची पातशाही दिल्लीची तो शेवटास आलिशी दिसते. नांवास पातशाह जादा आली गोहार पट्टणीयास पाऊन तेथील राम नारायेण सुबे याचा नायेब होता त्यास जुंजात जखमी केले. फौज लुटली. व तो पलोन गेला. व पातशाहजादा तखतावरी बसला. त्या प्रांती पठाण व जमातदार मिलोन वीस हजार स्वार त्याजबरोबर आहेत. गुजरान लुटींवरी असे. सुजाउदौलास आबदालीनें बोलाविले व पातशाहजादियासहि बोलाविले आहे. शुजाउदौलास अबदाली पैका फार मागतो. तोहि भयास्तव त्याजपाशीं जायास अनमान करितो. त्याप्रमाणें अहंमदखान बंगरश व सुरजमल जाठ यास पैगाम आला असतां जाबसाल वरचावरी * * * * व सरदार व अबदालीचा निवाडा काये होतो याचाहि मार्ग * * * * (पाहत) दोहीकडे सलूख ठेवितातो. परस्परे इतमाम करून मारिते तरी अबदाली व रोहिले दोघासहि समजाविते. महाराजास चहूकडून वर्तमान पावतच असेल. जे पारपत्य करायाचे व फौज वरचेवरी सरदाराचे कुमकेस पाठविणें ते पाठवितील. ज्यापक्षीं धण्यातून कोणास पाठवावयाचे असले तरी सामान भारी असला पाहिजे. तोफखाना सिंदीयाकडील तिकडे गेला व अबदाली व रोहिलीयाकडे तोफखाना फार; त्यांत रोहिलीयापासीं बाणाचा सामान बहुतच आहे. अशे कामास फिरंगीयाचा तोफखाना जरूर

असला पाहिजे. आम्हास सुचले ते विस्तार लिहिलियावाचोन राहावेना. अंतरवेद व बुंदेलखंड व मालवा धरून कमाविसदार अबदालीचे भयास्तव सुचिते[1] नाहीं. सर्वांची नजर मल्हार..............स्वस्थ अबदालीचा काये निवाडा होतो याजवरी असे. हे विनंती.

पैवस्ति छ १३ साबान सन सितैन.

¶*This letter of Raja Keshavrao addressed to the Peshwa gives valuable details of the political situation in the North created by the presence of Abdali : The devastations of Scindia's forces and the flight of the Emperor's Son. " The fate of India now hangs on Malharrao."*

---

*No. 119*] [*Pre-Panipat—Peshwa Balaji Rao*

**श्री.**

यादी तेथील सरदारास पत्रें.

कि॥

१. बाबूजी नाईक व अबाजी नाईकास पत्र कीं, पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. सविस्तर लिहित जाणे. बहुतां दिवशीं मातबरे झुंज पडलें. श्रीकृपेनें विशेष कामकाज होऊन आलें. येणेकरून बहुत संतोष जाहला.

१. समशेर बहादरास पत्र कीं, तुम्हास बुद्धिवाद रगडून लिहिला. तुम्ही जाऊन दोन वेळेस कामकाज विशेष केले. येणे करून संतोष जाहाला. तुम्हाजवळून हमेश सर्वांहून मेहनत मर्दुमकी अधिक व्हावी यांत आम्हास बहुत संतोष.

कि॥

१. बाजी हरीस पत्र कीं तुमचें पत्र येऊन वर्तमान कळले नाहीं. जखम बरी जाहाली किंवा नाहीं ते लिहिणें.

१. सदाशीवपंत पागा यासहि बाजी हरी प्रमाणें.

१. विसोबा बिनी. तुम्हाकडून पत्र आज यावें. येऊन वर्तमान कळले नाहीं. सविस्तर लिहिणें. सत्वर जाऊन आधीं सरहद्दीकराचे पारपत्य करणें.

---

१ स्वस्थ.

१. सदाशीव रामचंद्रास पत्र कीं तुम्ही गेलिया तागायत पत्र पाठविले नाहीं. तुम्हाकडील लोकांचें व स्वता कामकाज विशेष जाहालेंच असेल. सविस्तर वर्तमान लिहिणें.

१. येशवंतराव पवारास पत्र कीं पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं. यंदा स्वता मेहनत मर्दुमकी विशेष केली हें वर्तमान श्रवणे संतोष जाहाला. तुम्ही सर्वाहून अधिक करावें. योग्यच आहे.

१. सोनजी भापकर व शहाजी भापकर यास येशवंतराव पवाराचे पत्राप्रमाणें पत्र.

१. दमाजी गाईकवाडास पत्र कीं जखम अगदी बरी जाहाली किंवा नाहीं. यंदा स्वता कामकाम उत्तम केलें. तर ह्या गोष्टी योग्यच आहेत. कनिष्टपक्षीं पांच सात हजार फौज असावी. कामकाज विशेष व्हावें उत्तमच आहे.

१. द्वारकोजी राऊ पाटवणकर खंडेराव दरेकर यास पत्र कीं तुमच्या जखमा बऱ्या जाहालियाचे वर्तमान लिहिणें.

हरबा

रायाजी पवार

विठल सिवदेव.

¶*This paper appears to contain the Peshwa's orders for writing letters to several officers who were proceeding to the North with Bhau Saheb. The wounds referred to in the case of Damaji Gaekwad must have been those he received in the Udgir fight.*

---

*No. 120*] [*1-3-1760*

**श्रीमोरया.**

छ १९ साबान सन

सितैन चैत्र वद्य २

**श्रीमंत राजश्री......पंत प्रधान**

**स्वामीचे शेवेसी**

विनती सेवक गंगाधर येशवंत कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ताा छ १२ रजब साहेबाचे कृपा कटाक्षेकरून सेवकाचे वृत येथास्थित आसे विशेष. स्वामीनी छ ९ जमादिलाखरचे आज्ञापत्र पाठविले ते छ ९ रजबी श्रीयमुनातीरचे मुकामी पावोन, लेखनाभिप्राये अवगत जाला. जैपूरचे कार्यास न गुंतता आविलंबे दिलीकडे जाऊन, गिलज्याचे पारपत्य करावे म्हणून पत्री आज्ञा. त्यास याजपेक्षा दुसरी गोष्ट विशेष नाही. यैसे जाणून दर मजल

दिलीकडे अली. राजश्री जनकोजी सिंदे, आम्ही येकत्र होऊन, सविस्तर वृत येक दोन कासीद पत्रे देऊन रवाना केले आहेत; ते पावले अस्तील. सांप्रत आपली थोडी बहू फौज मोगलाच्या शहवर ठेऊन, काल मुकाम सिकंदरियासि केला. जर गिलजे रोहिले येमुना उतरून आले तर श्रीगंगाचे * * पार रोहिल्याच्या मुलकांत लढा * * * वी. कदाचित इकडे नच येत, तर रोहिल्याचा मुलूक पारचा व आलीकडील मारून, वैराण करून, फिरोन येमुना उतरोन, अबदाली रोहिले यांच्या मुकाबलियासि जावे; व या उद्येशे इकडे आलो. येका दो दिवसांत मोगलाचा रूख ध्यानास येईल. त्याजप्रमाणे तजवीज केली जाईल. तजविजीने शत्रूवर आपली दहशत बसऊन आपले लोक सेर केले पाहिजत. थोड्याच दिवसांत ईश्वर सतेने व स्वामीचे पुण्यप्रतापे करून आमित्राचे पारपत्य होऊन येईल. * शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

¶*Gangadhar Yashvant writes to the Peshwa an account of his activities against Abdali.*

---

*No. 121*] [*13-3-1760*

**श्री.**

पौ छ १८ साबान सन सितैन

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे शेवेसी.**

विनंती सेवक पुरुषोत्तम माहादेव कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ २४ माहे रजब मु॥ सारोट नजीक मौजे बयाना स्वामीचे कृपावलोकने करून येथास्थित असे विशेष. या प्रांतीचे तपसीलवार वर्तमान श्रीमंत स्वामीस विनंतीपत्रीं लिहिले आहे त्याजवरून श्रुत होईल. सारांष अबदालीस दमवावे व रोहिल्याचा अंतरवेदीतील व गंगापारील मुलुक खराब करावा या इराद्याने सरदार अंतरवेदीत जाऊन सिकंदराबाद लुटून पस्त केली. दाहालक्ष रु॥ खजाना नजीबखानाचा गंगापार त्या कांठपरियेंत अनुपशहराजवल आला होता म्हणोन गंगापायाब[१] पाहावया निमित्य शोधक पाठविले. तेथे तीन च्यार दिवस मुकाम केले. अबदालीस हे वर्तमान कलताच जैपुरचा रूख सोडून दिल्लीस गेला; तेथून जहानखानास व नजीबखानास तिसापसतीसा हजारा जरीदे फौजेनसी अंतरवेदींत पाठविले. रा। गंगाधर येशवंत सरदाराहून च्यार कोस पुढे होते. तेथें येऊन

---

१ पलीकडील.

जुंज घेतले. दोनच्यार घटिका * * * गले जुंज जाहाले. तेथें रा आनं * * राम व शेटाजी खराडे व त्याचा पुत्र यैसे तिघेजण कार्यास आले. तेव्हां रा गंगाधरपंत माघोरे फिरले. सरदार आगऱ्याच्या मैदानात आले व पंतमजकूर मथुरेस गेले. तेथून भरतपुरास येऊन नवाब वजीर यांच्या विद्यमाने हाफीजरमतखानाचे सलुखाचा जाबसालाचा मजकूर पूर्वी सो लिहिला आहे त्या प्राा त्याचे वकिलास बोलाऊन पाठविले. आम्हासहि डिगेहून बोलाविले. आम्ही भरतपुरास येऊन हाफीजरहमतचे वकिलास रा गंगाधरपंतासी भेटविले. हाफीजरहमताने सरदारास येऊन भेटावे व अबदालीस मार्गस्त करावे व फौजेसुधा शामील व्हावे. नजीबखानाचे पारपत्य होईल. त्याची कुमक न करावी. सरदारानी त्याच्या वाटे न जावे व त्याच्या मुलखासी मुजाहिम[१] न व्हावे. या प्रकारे करार होऊन आणभाष शपथ देऊन वकिलास रुखसत[२] केले. सरदारहि भरतपुराजवळ पंधरा सोला कोसाचे अंतराने आले. तेथे सुरजमल येऊन भेटला. सरदारानी बेलभंडार गंगाजल आणभाश शपथ दिल्ही. पुर्वी जे जे करार केले होते, ज्यांत सरदाराची मर्जी असेल तेच गोष्ट करावी. सुरजमलास वस्त्रें प्रावर्णे देऊन रुखसत केले. तो भरतपुरास गेला. सरदार कुच करून दाहाकोस मौजे बयानाहून सारोटास आले. पुढे निदर्शणास येईल ते सो विनंती लिहूं. कृपा केली पाो हे विज्ञप्ति.

¶*Purushottam Mahadeo Hingane gives a description of a skirmish between Gangadher Yeshwant and Najibkhan and mentions details about the negotiations which the Scindia and Holkar were carrying on with Abdali through Hafij Khan on the point of Najibkhan being held in check.*

---

*No. 122*] [*31-3-1760*

**श्री.**

पौ छ १३ शाबान

चैत्र सु सितैन

**श्रीमंत राजश्री......पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.**

विनंती सेवक नारो बाबाजी सां नमस्कार विज्ञापना. ताा छ साबान पावेतो स्वामीचे कृपावलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. यानंतर हुजुरचे आज्ञापत्र सादर जाहाले. तेथे आज्ञा कीं स्वारीतील जिनस सरला.

---

१ प्रतिबंध करणारा. २ निरोप.

हिंदुस्थानाचे स्वारीस जिनस जंगी पाठवावयासी पाहिजे. याजकरिता सरंजाम येणे प्रमाणे किले नगर येथील जकिऱ्यापैकीं रवाना करणे. बित॥

गोळे तोफाचे ब॥ फरम्याची याद

सुमार
१९०००

सिसे वजन पक्के खंडी
१०

कागद फिरगाणी रजमे सुमार
२०००

साल मजकुरी दारू नवी आली आहे. वैजापुरपैकीं वगैरे त्या दारूपैकीं दारू
वजन पक्के खंडी
४०

गारा फतरी सुमार
१०००००

सदरहू प्रमाणे जिनस रवाना करणे. दारू सिसे आणावयासी येथून पाचसे बैल पाठविले आहेत. याजवर रवाना करणे. तोफाचे गोळे बैल भाड्यानें करून फर्म्याप्रमाणे पाठवणे म्हणून आज्ञा. त्यास हुजुरून बैल पाचसे खिजमतगारास-मागमे आले, व आम्ही नगरी भाड्याचे बैल करविले अडिचसे. येकूण साडेसातसे बैलावर जिनस भरून रवाना करितो. बित॥

तोफाच्या गोळ्याची नेमणूक येकुणीस हजारपैकीं हुजुरचे फर्मे आले, त्याप्रमाणे
किल्यात होते, ते गोळे सुमार
८१८४

सिसे खंडी नेमणूक दाहा त्यापैकीं सिसे खंडी
५ पुण्याहून सिसे किल्यात आलेपैकीं होते ते सिसे
३ खोा पैकीं

---
८

दारूची नेमणूक चालीस खंडी त्याप्रमाणे दारू वजन
पक्के खंडी
४०

गारा फतरी नेमणूक येक लाख पैकी रवानगी गारा सुमार
९९१५०

---

• जकिरा=कोठार सामुग्री.

फिरगाणी कागद रजमे नेमणूक दोन हजार पैकीं शहरात शोध केला. फिरगाणी कागद मिलत नाहींत. साठसतर रजमे मिळाली ती पाठवितो. आणिखी तलास करितो. जी मिलतील ती पाठवितो.

येकूण गोळे आठहजार येकसे चौऱ्यासी व सिसे खंडी आठ व दारू खंडी चालीस व गारा नव्याणव हजार येकसे पनास, व फिरगाणी कागद मिलतील ते, असे बैल भरून, वाटेन प्रज्यन्याकरिता पाले व दारूच्या बैलावर चवाली देऊन, रवाना करितो. बैल भाड्याचे बराणपुरपावेतो केले. भाड्याचे बैल न मिलत. मोठ्या प्रेत्ने बैल मिळाले. वाण्यानी करार करून दरम्यान मध्यस्त घेतला कीं, बराणपुरापुढे न न्यावे. दर बैली बारा रुपये प्रमाणे भाडे केले. म्हणून नगरीहून राजश्री धोंडो माहादेव याणी लि।। आहे. त्यावरून आम्ही त्यास लिहिले कीं बैलास भाडे फार पडते. यात रुपया दोन रुपये दर बैलास कम करून बैल करार करावे. हिंदुस्तानाचे स्वारीचा जिनस बैल भरून छ १२ सावानी गंगेवर येतील. यासिवाय हुजुर दारू व गोळे सिसे आणविले आहे. फर्म्याप्रमाणे गोळे भरतील ते व सिसे दोन खंडी खोपैकीं व दारू असे च्यारसे साडेच्यारसे बैल भाड्याचे करून जिनस भरून तेहि बैल येकादोदिवसाचे अंतरेयाने येतात. हिंदुस्तानाचे स्वारीच्या जिनसाचे भाड्याचे बैल बराणपुर-पावेतो गेलियावर तेथे दुसरे बैल भाड्याचे करून या भाड्याचे बैलास माघारे यावयाची आज्ञा देविणार स्वामी समर्थ आहेत. दारू पंचवीस खंडी तीस खंडी किल्यात नवी होती ती व जुनी दारू चांगली केली होती ती असी रवाना केली आहे. किल्याचे बेगमीचा जंगी जिनस दारू व गोळे व सिसे होते तेहि हिंदुस्तानाचे स्वारीस व हुजुर रवाना केले. किल्याची बेगमी जकिऱ्याची करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Naro Babaji Nagarkar, Kiledar of Ahmednagar, submits a list of ammunition to be approved by the Peshwa to be despatched with the armies proceeding to the North. The details of the list will be serviceable in determining what kind of ammunition was being manufactured here.*

---

*No. 123]* *[1760?*

**श्री.**

शेवेसी विज्ञापना. राजश्री नारो शंकर याची फौज राजश्री मनोहरपंतासमागमे दिल्ही होती. येथेहि फौजेचे प्रयोजन आहेच. भरतपुरीहून रसद कुंभेरीस येणार. त्या मार्गाचा बंदोवस्त त्यांजकडून करवावा. राजश्री मनोहरपंता समागमे याच्या फौजे

खेरीज लॉक नेमून दिल्हेच आहेत. याच्याहि फौजे पैकी सेपनास स्वार देणे तर देवावे आणि वरकड त्याची फौज बोलवावी म्हणजे भरतपुरच्या मार्गाचा बंदोबस्त राखतील तर त्याची फौज बोलाविली पाहिजे. शेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Naro Shanker is asked to keep the Bharatpur road safe for supplies.*

---

*No. 124*] [*12-6-1760*

**श्री.**

**राजश्री विष्णु महादेव गोसावी यांसी.**

ॐ अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेो मलारजी होलकर दंडवत सु॥ इहिदे सितैन मया व अलफ. तुम्ही पत्र टोंक्यांचे मुकामीहून पाठविले ते पावोन लेखनार्थ अवगत जाला. ता॥ कोन्हाळे येथील व चांदवडच्या कुरणाचा मजकूर व सुरतराम महता याजकडील यैवजाचा मा॥र तपसिले लिहिला तो सर्व कळला. यैसियासी श्रीमंत राजश्री भाऊ साहेबहि चमेल उतरोन आले; सत्वरच भेटी होतील. त्यासी विनंती करून कोन्हालियाच्या कमाविशदारास व आपाजी हारि चांदवडकर यासी ताकीद पत्रे घेऊन पाठवितो. यैवजाविषई सुरतरामास ताकीद केलीच आहे. रुपये पावते करील. इकडील वर्तमान तर प्रस्तुत आपला मुकाम प्रांत जटवाडा येथे गिलज्या कोलेवर अंतरवेदीत आहे. नजीबखान व ज्याहान इटावियाकडे गेलेत. गिलज्याच्या फौजेतून हाफीजरहिमतखान रोहिला भरतपुरासी आला. आपले राजश्री गंगाधरपंत आहेत. रोहिलीयाने सलूखाचा संदर्भ केला, परंतु आपल्या विचाराणरूप बनत नाही. श्रीमंतहि संनिध आले. अवघ्या फौजा येकत्र जालिया श्रीइच्छेने शत्रूचे पारपत्य होऊन येईल. तुम्हीहि श्रीमंतास विनंती ताकीद पत्राविशाई करोन होईल कार्य ते करून घेणे. सर्वदा पत्र पाठऊन वर्तमान लिहीत जावे. रा॥ छ २७ सवाल बहुत काय लिहिणे हे विनंती.*

मोर्तब सुद.

¶*Malharrao Holkar's letter to Vishnu Mahadeo Gadre, Banker of Poona, giving details of the situation of the Maratha and Mussalman armies and adding that Hafiz Rahmat has come from Abdali with proposals of peace and that Gangadharpant was sent on to interview him.*

---

* ता. ६ जुलैस होळकर व सदाशिवराव यांच्या भटी झाल्या. त्यापूर्वीचें पानिपत मोहिमेचें पत्र.

No. 125] [11-5-1760

श्री.

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री बाबूराव राम
स्वामी गोसावी यांसी.

पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. उजनी व इंदूरच्या हुंड्या रुपये.

| | | | |
|---|---|---|---|
| १२५००० तुम्ही पुण्याहून पाठविल्या. | | | |
| | २५००० अंतार्जी नारायण याजवर इंदूरची | | १ |
| | १००००० उजनीच्या | | |
| | | २५००० लखमीचंद अजबसिंग यावर | १ |
| | | ५०००० वलभ सुदर | १ |
| | | ६००० कळु संकरसा | १ |
| | | १९००० मोहनजी नाथुराम | ३ |
| | | १००००० | ६ |
| | १२५००० | | ७ |
| ६३००० भगवंत भैरव थथे याजकडून तुम्ही रवाना करविल्या त्या. | | | |
| | १६५०० इंदूरच्या | | |
| | | ५००० हरचंद किसनचंद यावर | १ |
| | | ४००० नानासा दुलभसा | २ |
| | | ४००० हसराज देवराज | २ |
| | | २५०० नाना महता | २ |
| | | १००० रूपसा देवीलाल | १ |
| | | १६५०० | ८ |

१४१

४६५०० उजनीच्या

| | | |
|---|---|---|
| १०००० | हरचंद किसनचंद | ३ |
| १५०० | नाना महता | १ |
| ७००० | गोपाळदास गोकुळदास | २ |
| ७००० | मोहनी नाथुजी | १ |
| ४००० | मोहनी विठलजी | १ |
| २००० | पुंज्यासा अमोलक | १ |
| १५००० | चिंतामण हिराचंद | १ |
| ४६५०० | | १० |

| | |
|---|---|
| ६३००० | १८ |
| १८८००० | २४ |

येकूण चोवीस हुंड्या एक लक्ष अठ्यासी हजार रुपयाच्या पाठविल्या त्या सिरोजच्या मुकामी पावल्या. येथून सावकाराकडे उजनी इंदुरास रवाना केल्या आहेत. सावकारांकडील मुदतीप्रमाणें ऐवज वसूल जालियावर तुम्हास लेहून पाठवूं. र॥ छ २४ रमजान सु॥ सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Sadashivrao Bhau acknowledges the drafts of money supplied by Babuji Naik.*

---

*No. 126*] [*June 1760*

**श्री.**

विनंती उपरी. उद्यांपासून जाटाचा मुलुक लागला याजकरितां कोणतेहि गावास आग लाऊं नये. उपसर्ग येकंदर करूं नये ऐसें आहे. याजकरितां आपण आपले गोटांत ताकीद करून उपसग लाऊं न देणे. पारपात्य केलें जाईल. याप्रमाणें परिछिन्न ताकीद करावी.

¶*Appears to be Bhausaheb's strict orders to his subordinates to desist from molesting the territories of the Jath, which they are to enter the next day.*

*No. 127*] [*27-6-1760*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री राऊ स्वामीचे सेवेसी.**

पौ छ १६ जिल्हेज सन

इहिदे सितैन-अधिकश्रावण.

विनंती सेवक बापुजी बलाळ सां नमस्कार विनंती ताा. छ १३ जिल्काद मु॥ नजीक आगरे यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तरी सरदाराच्या श्रीमंताच्या भेटी जाल्या. सुरजमल जाट याची येथें दो रोजी भेट होईल. आबदालीचा सलुखाचा मजकूर होता. त्यास सुज्यातदोलाकडे नजीबखान व ज्याहानखान गेले. त्यांणीं त्यास कांही राजी केले. यामुळे सलुख लांबणीवर पडला. आपली पत्रे सुजातदौलाकडे जातात. मातबर माणूसहि पाठविणार आहेत. येदा पठाणांची छावणी जाली असें दिसते. येमुनेस पाणी आलें. गुंज[1] बळावत चालली. मनसबा भारी दिसतो. श्रीमंताचे प्रतापें सर्व पार पडेल. स्वामीस कळावें म्हणून लिहिले असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Bapuji Ballal Phadke, brother of Haripant Phadke of later times, writes from Agra about the overtures of peace which Abdali was making. The fate of peace depended on the attitude of Shuja-ud-daula who was being courted by both the parties.*

---

*No. 128*] [*19-8-1760 ?*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी.**

विनंती शेवक त्र्यंबक कृष्ण व जनार्दन राम नि॥ गंगाधर बाजीराव कृतानेक सां नमस्कार विज्ञापना ताा छ ७ मोहरम मुकाम अहीरव पाा मइनपुरी प्रांत अंतरवेद स्वामीच्या कृपावलोकने करून वर्तमान यथास्थित असे विशेष. अंतरवेदीत आल्यावर सविस्तर वर्तमान पुर्वी शेवेसी विनंती लिहिली आहे त्यावरून विदित जाले असेल. सांप्रत आजपर्यंत अंतरवेदीतील दोनतीनशें गढी मवासी हस्तगत जाली. त्यामध्यें कांहीं सरकारी ठाणी ठेविलीं, कांही पाडून टाकील्यां, याप्रमाणे अमल सुरळीत स्वामीच्या प्रतापें अंतरवेदींत होत आहे. फार करून अंमल सुरळीत जाला; कांही राहिला आहे तोहि थोडक्याच

---

१ जमाव.

दिवसांत सुरलीत होईल. विदित असावें. ये विसीचा सविस्तर अर्थ राजश्री गोविंद बल्लाळ शेवेसी लिहित असतील त्यावरून विदित असेल. पथकांतील अर्थ आजपर्यंत शंभर माणूस जखमी व मयेत वीसपंचवीस याप्रमाणें वर्तमान. पर्जन्यकाल, फिरती छावणी व कुंभेरीवरीलहि हैरानगत, लोकांस मेहनत भारी पडली. पुणियांत समजावीस भारी निघाली, त्याजमुळे नालबंदी कमी पावली. स्वारीत रोजमरा झाडून न पावला. याजमुळें आदा थोडा जाला. बाकी फार निघाली. नेंमणुक छावणीस रवानगी जाली तेसमई कोती जाली. ये विसीचा सविस्तर अर्थ पूर्वपत्रीं विनंती लिहिलीच आहे. त्यावरून जाजती ऐवजाची सनद गोविंदपंतास रवाना जालीच असेल. कदाचित सनद रवाना जाली नसेल तरी हली सेवेसी विनंती लिहिली आहे. जाजती ऐवजाची सनद राजश्री गोविंदपंतास पाठविली पाहिजे, म्हणजे लोकांची स्थीत राहील. छावणीचा कारभार विदितच आहे तेथे शेवकलोकांही काये लिहावें. शेवेशी विदित होये हे विज्ञापना.

¶*Trimbak Krishna Kanitkar, the Peshwa's accountant residing with Govind Ballal Kher, writes to Bhausaheb about Maratha activities in the Doab and the troubles of Govindpant Bundele.*

---

*No. 129]* *[26-8-1760*

**श्रीशंकर.**

विनंती उपरी. आज आम्ही उतारावरून नदी उतरून आलिकडे आलों. ढाला व डेरे आगोधरच आले होते. व ताकपीर व नागरमल आलिकडे आले होते ते माघारे पलीकडे गेले. याचा विचार काय आहे? वजीर आज सिकंदऱ्यास आले. त्याचे भेटीचा विचार काय केला आहे हे ल्याहावे. आम्ही उदईक पटपटगंजावर जावें की काय? रोहिल्याची फौज अलीकडे आली होती ते माघारी गेली. पटपटगंजावर गेलियानें त्यांस दशहत पडेल. कदाचित लाहोराकडे रोहिले जाऊं लागले तर सडे होऊन त्याचे पाठीमागें जावे लागेल; तर याचा विचार करून ल्याहावे. वजीर आले तर आम्ही पटपटगंजावरोन माघारे भेटावयास येऊं व उदईक श्रावणी आहे तर याचा विचार करून ल्याहावें. उदईक आपला मुकाम पलीकडेच होईल कीं अलीकडे होईल. आलीकडे येणें तर लागलेच पटपट गजावरी जावें. वजीरास सामोरे येणे हे नदी पावेतो यावें. मेरटेचे काम यावर लांबणीवर पडत नाहीं. फौज उतरली ह्या आश्रयावर दम धरला होता. याउपर ठाणे दम धरीत नाहीं. कदाचित दम धरला तर मग जे तजवीज करणे ते करावी. श्रीमंताची पत्रे आज आली त्यांचा भाव कांही उत्तम नाहीं. भेटीनंतर

बोलणे ते बोलूं. उतर पाठवावे त्याप्रमाणे कूच मुकाम करणे तर करूं. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*The hand-writing shows the letter to be from Vithal Shivdeo to some other officer, both at some distance from the main camp. The letter as it is, cannot be fully explained.*

---

*No. 130*] [*15-9-1760*

**श्री.**

**राजश्रिया विराजित राजश्री नारोपंत नाना स्वामीचे सेवेसी.**

पोष्य बापूजी बलाल सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता॥ छ ९ सफर मु॥ दिली येथास्थित असे विशेष. आपले पत्र आले पावोन आनंद जाला. इकडील वर्तमान तर यमुनेचे पाणी उतरावयास महिना पंधरा दिवस पाहिजेत. उपरातिक लडाई होईल. सला होता दिसत नाही. लस्करात मोठ. मोठे माणसास फाके जातात. घोड्यास दाणा ठाऊक नाही. लस्कर गलाले. कर्ज कोठे मिलत नाहीं. अशी तवाई[1] आजपर्यंत कधी गुदरली नव्हती. घोड्या माणसात जीव राहिला नाही. श्रीमंताचे दैव थोर आहे. परिणाम कठीण दिसतो. याचमधे सर्वाची आबादी दिसोन आली. सर्व गोष्टीने असे साल पाहिले नव्हते. सदैव पत्री सांभाळ करावा. चिरंजीव तात्यास आमचे जागास आपण आहेत. सर्वप्रकारे सांभाळ करावा. विस्तारे लिहिणे नलगे. बाळकृष्ण पंताविसी काळजी न करावी. बहुत काये लिहिणे. तातडीने पत्र लिा. मागाहून सविस्तर लिहून पाठऊं. राजश्री धाकटे नानास पत्र आपण लि॥ त्याचा जाब पा॥ आहे हे विनंती.

¶*Bapuji Ballal Phadke writes from Delhi to Naro Appaji at Poona and communicates the awkward predicament of Maratha forces owing to starvation, full five months previous to the final battle.*

---

*No. 131*] [*15-9-1760*

**श्री.**

पौ छ १४ रबिलावल सन इहिदे आश्विन.

**तीर्थरूप राजश्री............बाबा वडिलाचे सेवेसी.**

आपले बाळाचे साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान तागाईत छ ९ सफर मुकाम इंद्रप्रस्थ येथास्थित असें विशेष. ईकडील वर्तमान तर दिल्लीचा

---

१ तवाई=संकट.

किल्ला श्रीमंतांनीं घेतला हें पूर्वी लिहिलें आहे. त्यावर अबदाली अनुपशहराकडे होता, तो दिल्लीजवळ पलीकडे येऊन राहिला. त्यास पाणी यमुनेस फार, उपाय नाहीं. नावा सर्व होत्या त्या आपले हातीं लागल्या. तेथेंच मुकाम करून राहिला आहे. श्रीमंत अलीकडे आहेत. सर्व फौज दिसतें. सुज्यातदौला नजीबखान सर्व रोहिले मिळाले आहेत. सल्लयाचा मजकूर सुज्यातदौला बोलतो तो लबाड आहे, परिणाम नाहीं. आपली फौज भारीच आहे; परंतु पोटास नाहीं. घोडीं दाणा खावयास विसरलीं. माणसांस अन्न मिळतां कठीण दिवस इतकेंच मात्र संकट आहे; त्याची तजवीज माहालकरियांकडील ऐवज येईल तेव्हां फौजेस पोटास मिळेल. कर्ज तों कोठें मिळत नाहीं. फौज आपली भारीच आहे. महिन्याभरां पाणी उतरेल. लढाई मातबर व्हावी असा विचार दिसतो. त्याजमध्यें दम दिसतो. आपली सारी फौज येकदिल आहे. श्रीमंतांचें प्रालब्ध थोर आहे. सर्व अरिष्टें वारतील. पारपत्य लौकरच होईल. पुढें होईल मनसबा तो लिहून पाठऊं. बहुत काय लिहूं. कृपा करावी हें विनंती.

¶*Nana Phadnis's letter to his uncle Baburao, saying negotiations of peace had failed and that the issue depended upon a final fight.*

---

*No. 132]* *[October 1760 ?*

**श्री.**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री चिंतोपंत स्वामी गोसावी यांस**

सेवक गोविंद बलाल नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणे विशेष. फर्काबदवाल्यांनी अकबरपुरच्या जमीदारास चिठ्या लिहिल्या कीं तुम्ही गुंळु[१] करून ठाणे उठउन देणे म्हणजे आम्ही येतो. केवल आमचे ठाणे असतां त्याच्याने येवत नाहीं. ते बदनामीस आमचे ठाणे उठवित नाहीं. युक्तीने गवरांकडु ठाणी उठऊन म(ग) आपण तुमची ठाणी उठोन गेली म्हणून बसविलें असें म्हणतात. यास्तव आमचे ठाणे असतां ते येत. जमीदारांस मात्र पठाणाने लिहिले त्याजवरून जमीदार हुलकावितील तर सावधानी ठाण्याची करून राहाणे. जमीदारांचा कोणाचाहि विस्वास न धरणे. आम्हीहि समीपच आहो नजीबखान माघारा सरकला म्हणजे आम्ही पुढे मोहऱ्यावर येतो. च्यार रोज सावधान राहाणे. बहुत काये लिहिणे. लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Govindpant Bundele's letter to some Chintopant as regards Maratha outposts being deserted.*

---

१ गुळु=दंगा.

No. 133] [26-11-1760

श्री.

शेवेसी नारो गंगाधर कृतानेक साा नमस्कार विज्ञापना. ताा कार्तिक वद्य चतुर्थी मु॥ सिधटेक वर्तमान स्वामीच्या आसीर्वादे येथास्थित असे विशेष. इकडील वृत तर खासा श्रीमंत हिंदुस्थानांत जाणार. बंधूसहितहि जावे येक विचार येक प्रकार त्याजबाा दाहा पाच हजार फौज देऊन देशी ठेवावे, आपण खामखा जावे. निजामअलीस बाा घेणार असेहि आहे. त्याणे उगेच राजकारण लाऊन ठेविले आहे. कागदीपत्री ममता दर्शवितो परंतु लबाड कारभार. हिंदुस्थानच्या मनसब्यावर त्याची द्रिष्ट आहे. तिकडील काय होते हे पाहातात. तूर्त यासी सलुखाने लिहिण्या पुसण्यात दर्शवितात. श्रीमंत लग्न मार्गसीर्ष मासी आपले निश्चयरूप करणार. वधुविचारणेस जिकडे तिकडे पाठविले आहेत. कऱ्हाडे, देशस्त, चिपोलेणे यात जी अनकूल पडे ती करावी हा निश्चय. लग्न जाल्यावर वराडातून चांदे देवगडच्या मार्गे प्रयागास जावे हा सिधांत. हिंदुस्थानच्या ग्रहस्तांची तो कालजी अगदी सोडली. त्यांचे स्मरणहि नाही. त्यांचे साहित्याची चर्चाहि करणे अनकूल पडत नाही. प्रस्तुत सिधटेकाहून कूच जाले म्हणजे तोफखाना व काही फौज बाा सखारामपंत असे नगरावरून धारूरचे सुमारे लावणार, आपण करमलेयास जाणार. जानोजीचा लेक येथे आला आहे. करमलेयास जरूर जाणार. वरकड प्रक्रत तो दिवसे दिवस येक प्रकारच होत चालली त्याचा विस्तार काय ल्याहावा? माहालकरी पथके पागा यांस दरबार खर्चाच्या यादीविसी पुरसीस चालली आहे. यादीं कुल जमा करितात. तूर्त पोतेनिशिची घालमेल जरूर होणार. सवा लाख इजारा जो करील त्यांस देणार. जुनेयांस तो ठेवित नाहीत. असा निश्चय आपले जागां करून ठेविला आहे. कुशाबांचे गला फार फार पडले आहेत. तो कबूल करीत नाही. इजारा होईना म्हणतो. परंतु फार गलाच पडले आहेत. शेवटास जाईल ते खरे. श्रीमंत राजश्री मोरोबादादास यास च्यार दिवस थोडकासा ज्वर आला. त्यामुले दरबारास न गेले म्हणऊन परभारे श्रीमंत रायांस चिटी लि॥ की हे आमचे म्हटले आइकत नाहीं, तूर्त बरे वाटत नाही. यांस फजित करून लिहिणे की आमचे आइकत जात व तूर्त घरी घेऊन जाऊन ओषध देऊन बरे होऊन पाठऊन देणे असे लि॥. निमित्य तो काहीं दिसत नाहीं. काय चितात आले देव जाणे. अशे प्रकारचे तमासे जाले आहेत. वर्तमान कलावे म्हणोन लि॥ असे. कृपा करावी हे विज्ञापना. मागाहून सविस्तर लिहून पाठवीन.

¶*This is an important letter of Naro Gangadhar despatched from Sidhtek near Poona, probably to Bhausaheb. It gives details about Peshwa's marriage and his culpable indifference to affairs in the North.*

No. 134] [6-12-1760

## श्रीगजानन.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
गोपालराव गणेश स्वामी गोसांवी यांसी,

पो सदासिव चिमणाजी नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जाणे विशेष. तुम्ही छ १३ रबिलाखरचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिले वर्तमान सविस्तर कललें. आज्ञेप्रमाणे आपले फौज सुधा पार उतरतों, सरकार काम यथास्थित करून लिहितों, जमीदार आदीकरून सिधच आहेत म्हणुन लिहिले, ते कललें. यैसेयासी उतम आहे. सत्वर पार उतरोन सारे जमीदार हातीं घेऊन लिहिल्याप्रमाणे कार्य करून दाखविल्याने तुमचे चाकरीचा मजुरा आहे. नाहींतर बोलावें फार, होऊन कांहीच न ये, असें जाहाल्यानें आहे विचार तो कलतच आहे. तरी जपून सर्व येथास्थित सत्वर बज्याऊन दाखवणे. तुमची फौज राजश्री गोविंद बलालाबरोबर होती, ती तुम्हाकडे येईलच, व राजश्री गणेश संभाजी याजलाहि तुम्हाकडे यावें अगर फौज पाठऊन कुमक करणे म्हणोन पत्र पाठविलें आहे. त्याकडे पाठऊन फौज आणवणे. तुम्ही याउपरी येकंदर दिरंग न लावणे. इकडे आबदालीचाहि आवभाव कलोन गेला. येकदोन लडायाहि सरदारांकडील किरकोळ फौजेसी जाहल्या. त्याचा मोड करून गोटांत सारून घात (त) ले. याउपरी त्याचा दम चालून येऊन लडाई करावयाचा राहिला नाहीं. सरकारच्या मोर्च्यास त्यांच्या मोरच्यास बाणाबाणाची तफावत होती. ते सरकारच्या मोर्च्यापुढे जेजालेच्या गोलीवर धमधमा बांधून त्यावरी तोफा ठेऊन मार दिल्हा. तो त्याच्या डेऱ्यापावेतों लस्करांत लागू होऊन माणसें घोडीं मरूं लागली. त्या भयानें त्याणी तेथून कूच करून दोन कोस मागें सरून गेले. आपले मोरचे देखील उठऊन नेले, हे त्याची हिमत आहे. लौकरीच पुर्ते पारपत्य येथास्थित होईल. दिवसेंदिवस कमहिमती होत चालले. सत्वरीच चांगलें पारपत्य होईल. तुम्ही लिहिल्या गोष्टी करून दाखवाल, तेव्हांच फौज ठेविल्याचें, पैका खर्च केल्याचे, व उंमदगी[१] मनात आणून लांबलांब लिहितां व बोलत होतां त्याचें सार्थक आहे. ही संध फिरून येणार नाहीं. सर्व हातीं घ्यावें. त्याचा अमल उठऊन आपला अमल करावा, हे खबर पाठवणे. जाणिजे. छ १९ राखर पार जमीदारानी दंगा केला होता. त्या दिवसांत आपली फौज न गेली. आतां जमीदार सुजातदौलाचे मातुश्रीने बेणीबाहादराने

---

१ उमेदवारी

समजावले. असो जमीदारांस हालामाजी[1] पाहिजेच. तुम्ही पार जाऊन दमाने जमीदार हाती घेऊन आपण तूट सोसून जमीदार न दुखावितां कार्य करणे. सर्व सामील होतील. ज्यास पत्रें पाहिजेत ते लिहिणे. पाठऊन देऊं. मोगलाची फौजहि सुभ्यांत जमीदार तुम्हासी बिघडले तरी पेच पडेल. सारा बंदोबस्त जालियावर बारिक बंदोबस्त होईल. तूर्त सर्वांस सुखलगाम रजावंदी[2] उमेदवार करून भारी जमाव करणे. सामील होतील त्यांवर कारकुनी तूर्त न काढणे. जागीर मनसबाविसी उमेदवार करणे. दिलीपर्यंत डांक बसवणे. आजुरा पडेल तो खर्च करणे. प्रतापगडवाले व बलवंतसिंग वगैरे सर्व हातीं घेणे. कासीमधें अमल होऊन जमीदारांमुळें उठला तसे न करणे. आपण उपास करून त्यास रजावंद करून मोठे काम करून दाखवणें. मेहनतीनेच सर्व थोर जाहले. ईस्वरे थोर यश दिल्हें तरी थोरपणहि होईल. सत्वर जाऊन काम करणे. रा छ २७ राखर हे विनंति. गंगापारचे रोहिले यांचे मुलकांतहि दंगा जमीदारांपासून होई हे जरूर करणे. जमीदार उमेदवार करावे तेव्हां सर्व होईल हे विनंती

¶*Bhau's instructions from the field of Panipat to Gopalrao Ganesh who along with Govind Balal was acting in the Doab.*

---

*No. 135*] [*March 1760*

**श्री.**

**राजश्री महिपतराव यांसी.**

×आशीर्वाद. गाडदी उतरले उत्तम. इभरामखान सुधा येथेंच राहवणें. तोफा कोसावर गेल्या. मागील थोरल्या ओढ्यावर तेथे जाऊन समाधान करून सकाळच सारे येई असे करणे. अथवा दोन तीन थोर तोफा व गाडद्याच्या तोफा व गाडदी आम्हाजवळ राहत असे एकजण त्यांत कारभारी असे चादण्याचेच येऊन राहावे. या प्रमाणे करणे आशीर्वाद.

¶*The hand-writing of Sadashivrao Bhau shows this letter to contain his instructions about the camping of Ibrahim Khan Gadadi.*

---

१ हालामाजी=बेकैद, बेबंदशाही   २ रजावंदी=खुश, संतुष्ट.

× सदाशिवराव पानपतचे स्वारीस निघतेवेळचें पत्र महिपतराव चिटणीसास.

No. 136] [1758 ?

**श्री.**

विनंती उपरी. आम्ही आज कूच करोन सालेमार बागा आलीकडे मुकाम केला. त्यास इकडून पाणिपतापलीकडोन चाळीस पन्नास कोस बातनी आली कीं कोठें फौजेची आवाई नाहीं. परस्परें आपल्याकडेहि बातन्या आल्या आस्तील त्यास उदैक मंगळवारी आमचा मुकामच आहे तर आपण बहादूरखानास व नागरमलास इकडे पाठवावे. बनेल तर नवाब गाजुदीखानासहि इकडे पाठविले पाहिजे, म्हणजे मोगलपुरी याचे सूत्र ठीक करोन कार्य करूं. नवाबाचे मारफातीचे मोंगल पुरियाचे सूत्र आहे याजकरितां नवाबांनी तेथे येऊन ठीक करावें. इकडे आम्हीहि जवळच आहे. तर आत:पर सुस्ती न करावी. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

No. 137] [Date of receipt 12-1-1761 ?

**श्रीशंकर.**

पैवास्ति छ ४ जमादिलाखर.

**राजश्री गणेशपंत व बाबूराव यांस.**

विनंती उपरी. जाटाकडील फौज येमुनेचे घांटाने जागा जागा थोडी थोडी फौज उतरती, व तिकडे रोहिले पठाण यांची फौज गंगा उतरून फरकाबादेस येती. ऐसें वर्तमान येथें चहूंकडून येतें. त्यास तुम्ही आपली फौज सावधपणें आसो देणें. जागा जागा माहालांत स्वार पाठविले असतील ते कार्या कारण मात्र थोडे थोडे ठेवणें. वरकड सर्व आपले जवळ आणून ठेवणें. येथून जे क्षणी जसे पत्र जाऊन पोहोंचेल तसे ते क्षणीच करणे लागेल. यास्तव लिहिल्याप्रमाणें तरतूद आसो देणें. रोहिल्याची फौज गंगापारीहून फरकाबादेस जमा होती. तुम्हावर तेथून दगा होणार म्हणून बातमी ऐकतों तरी बहुत सावध राहणें. फरकाबादेची बातमी चांगली राखणे. तुमची फौज माहालो माहालीं बहुत गेली आहे ते आपले जवळ बोलाऊन मजबुदीने राहाणे. माहालाचे स्वार सारे उठून आणिल्यानें लौकिकांत वाईट दिसेल तरी तसें तरी न करावें. कार्याकारण राउत ठेऊन वरकड सर्व बलाऊन घेणें. चारणीस गेले असतील तेहि आपले जवळ आणवणे. रवाना छ ३ जमादिलौवल बहुत काय लिहिणें हें विनंती.

पैवस्ति छ ४ जमादिलाखर.

¶*In the absence of further details about the writer, the addressee and the date this and the next letter cannot be properly deciphered. The mention of Gaziuddin Khan may refer this letter to an earlier date, i.e., the monsoon of 1758.*

No. 138] [18-1-1761

श्री.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

स्वामी गोसावी यांस.

* * *

साष्टांग नमस्कार विनंती. येथील.

* * *

लिहित जाणे विशेष

* * * * * *

साहेबाची पत्रे आली कीं भाऊसाहेबानीं

* * * * *

अबादालीस मारून लुटून गर्दस मेळविला. श्रीमंताची फत्ते जाहाली. यास्तव तुम्हास * * *

हे पत्र लिहिले आहे. तरी पत्र पावते क्षणी तोफाची तीन वेळा सरबती करणे. आवादाली पळोन गेला. फौज आमचा पाठी लागली. आहे एके जागा घेरला आहे. धरतील अथवा मारून टाकीतील. या प्रमाणे वर्तमान श्रीमंतानीं लिहिले आहे. तिकडे लष्करांत ही पत्रे * * * * * तरी जलदीनें आम्हाकडे रवाना करणे * *

सरबत्या तोफाच्या करणें मामाच्या नांवें पत्र * * नाना साहेबांचे * * * कांहीं संशय नाहीं * * * तिकडे लष्करास परभारे येतील * * * * येतील. त्याच वेळेस चार माणसे देऊन रवाना करणे. ह्या संतोषास जोडा नाहीं. तुम्हास कळावे म्हणून लिहिले आहे. सर्वांस सांगणे. रवाना छ १० जमादिलाखर सन इहिदे सितेन. बहुत काय लिहिणे. लोभ असो दीजे हे विनंती.

( मथाळ्यावर आडवा मजकूर )—

चिरंजीव राजश्री आपाजीपंत यास आशीर्वाद लिो परिसीजे हे आशीर्वाद.

¶*This paper is unfortunately found in a mutilated condition. It mentions how Sadashivrao Bhau gave a crushing defeat to Abdali and advises the addressee to announce the victory with a discharge of three vollies from the guns. The writer is not present at Panipat, and the news is despatched to him from some place, not mentioned ; but it evidently reached the writer from the field of action long before the final battle of January 14th, 1761, and must therefore be taken to refer to one of the earlier actions that were fought with the Abdali.*

---

*No. 139*] [*1-2-1761*

**श्री.**

शेवेसी राजे बखतसिंग भदौरकर विज्ञापना एसीजे, आम्हास सुभेदार व जनकोजी सिंदे यानी आज्ञा केली की तुम्ही सिबंदी ठेऊन नाकेयाचा (बंदो)बस्त करणें. सिबदीचा ऐवज मजुरा दिल्हा जाईल. त्यावरून नजीबखान व ज्याहानखान इटाव्याकडे आले ते समई सिबंदी ठेऊन नाकेयाचा बंदोबस्त केला. सिबंदीचा आकार रु. २६००० सवीस हजार आकार जाला त्यापैकीं सुभेदार व जनकोजी सिंदे यानी रु. १६००० सोला हजार मजुरा दिल्हे. बाकी रु. १०००० दाहा हजार राहिले ते हाली द्यावयाची आज्ञा. सरकारची मामलतीची बाकी तुम्हाकडे आहे. त्यापैकीं दाहा हजार रुपये मजुरा घेणे म्हणून सनद देणे.

छ २४ जाखर सन इहिदे सितैन पौष वद्य येकादसी.

¶*Charges of Bakhatsing Bhadorkar's troops for guarding military posts from the enemy.*

---

*No. 140*] [*February 1761*

**श्री.**

सौभाग्यवती पार्वतीबाईचे पत्र रात्री आले. अम्ही वाचले. भाऊ रूपनगरी दाहा सहस्त्र फौजेनिशी ग्वालरीस एणार. बाईपासी आठ हजार सैन्य आहे. सुखी आहेत. तुम्ही दयारामाचे घरची साखर दों रुपयाची घेऊन भोजनोत्तर येऊन अम्हास नेणे. ×

¶*This bit of a paper mentions how Parvatibai was expecting Bhausaheb to arrive at Gwalior with a force of ten thousand.*

---

× कोणा भिक्षुकाचें पत्र दिसतें. अक्षर मोठें बालबोध जुन्या कागदावर आहे.

*No. 141]* *[18-3-1761*

**श्री.**

पौ छ १० साबान फाल्गून.

शेवेसी लक्ष्मण नारायण सां नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ ४ साबान मुकाम सिरोज येथे स्वामीचे कृपेकरून सुखरूप असे विशेष, स्वामीनी छ २४ रजबचे पत्र पाो ते छ २ साबानी पावले. पावोन परम संतोष जाहला तो पत्री काय लिहूं. स्वामीस यासमई जे दुख जाहले आहे तो एक परमेश्वर जाणे. परंतु काय करावे. आता सारांष हेच की चिताचे विवेके करून शांतवन करावे. आणि श्रीमंत राजश्री दादा स्वामींनी एक दोन वेळा पत्रे लिहिली आहेत त्याअन्वये जरूर करावे. दादास आपली काळजी बहुतच लागली आहे. ती काय ल्याहावी. दादाचा आग्रह आपण एकवेळ येथे यावे. मग जो मनसबा कर्तव्य तो करावा. श्रीमत सौ मातुश्री पार्वतीबाई बाो यावे, हा पोक्त विचार दादानी आपली पालखी व सामान वासुदेवपंत दि॥ विनायक गंगाधर नि॥ त्रिबकराव शिवदेव याज बाा छ २ सावानी रवाना केले आहे. सत्वर पावेल. श्रीमत राजश्री दादा साहेबा बाा हरीपत फडके बाबूराव केशव गणोबा बेहरा या प्राो गेले. बाकी गुरुजीबावा, महादाजीपंत तात्या, महादाजीपंत जोशी, बाळाजीपंत लेले, आम्ही बावाजीपंत व माणकोपत व केसोपत या प्राो बरोबर आहो. नारोपत पालदे बरे वाटेना सबब पुण्यास गेले. हे विज्ञापना.

¶*This letter from Sirouj mentions how Raghoba was anxious about the Peshwa's health and what persons were returning to Poona.*

---

*No. 142]* *[27-4-1761*

**श्री.**

चिरंजीव राजमान्य राजश्री बाजीपंत यासी नारो गंगाधर कृतानेक आशिर्वाद उपरी. येथील कुशल चैत्र कृष्ण अष्टमी मु॥ पुणे कुशल असो विशेष. शरीरभावनेचा प्रकार तर आद्यापवर आहे तेच आहे. उपाय करीत आहो. फळदेता श्रीहरी आहे. श्रीमंत राजश्री यजमान स्वामी बुराणपुरास आले. कांही दिवस त्यास्थळीं मुकाम होतील. श्रीमंत नारायणरावजी यास देवी निघाल्या आहेत. उत्तमच आहेत. पाणी घातल्यावर तेथुन निघोन येतील. श्रीमंत राजश्री दादासाहेब पुण्यास दाखल जाले. श्रीमंत मुख्य कांही दिवस गंगातीरी येऊन

वास करणार असा मनसबा आहे. मुंज नारायणरावजीची करावी असाहि अर्थ आहे. घडेल ते खरे. वरकड हिंदुस्थानचा अर्थ तर राजश्री गोपाळराव, जानोजी भोसले खेचीच्या पारपत्यास ठेविले. ग्वालियेरी राजश्री मल्हारजी होळकर व नाना पुरंधरे वगैरे मुतसदी सरदार फौज दहापंधरा हजार व श्रीमत सौभाग्यादिसंपन्न पार्वतीबाई देखील तेथें आजवर होती. सांप्रत श्रीमत माघारे फिरता त्यास आज्ञा गेली कीं मल्हारबांनीं व बाबुजी नाईक याजसमागमे फौज गेली ते सुधां राहावयाची आज्ञा केली. वरकड सर्वांनी श्रीमत सौ पार्वतीबाई सहवर्तमान यावें या प्रों आज्ञा गेली. त्याजवरून तेथून अवघे निघून बाईसह खेचीच्या मुलखांत आली. तेथें श्रीमत बाईनी आग्रह आरंभिला कीं श्रीमताचे ठिकाण काय लागले. आज तीन मास मार्ग पाहिला त्याचे सार्थ काय जाले? आम्हांस तोंड दाखवावयास पुणेयास परिछिन येणे नाहीं; अति दुराग्रह करून उजनीस राहिली. समागमे राजश्री सदासिव बाबाजी व फौज ऐशी ठेऊन वरकड सर्व श्रीमंताकडे येता बुराणपुरावर भेटी होतील. अबदालीकडील मजकूर तर अबदालीच्या मुलकांत सिखांनी व ईराणियांनी बहुतच दंगा केला. बहुत खराबी याची जाली. त्याजवरून हा तिकडे निकडीने जाणार. छ ११ साबानी निघोन गेला म्हणोन वर्तमान आले. तीन दिवस जाल्येसमई दिली लुटून घेऊन गेला. सुजायेतदौला नजीबखानहि आपलाले जाग्यास निघोन गेले. प्रस्तूत दिलीमधें अलीगोहोर पाछाजादा पटण्याकडे आहे. त्या (चा) लेक श्रीमत भाऊसाहेबी दिलीमध्यें कायम केला होता त्यासच याणी ठेऊन गेले. वरकड कोण्ही नाहीं. दिलीहि केवळ फकीर होऊन गेली. कांही आब राहिला नाहीं याप्रमाणें वर्तमान आहे. पुढें होईल ते खरें. मल्हार वगैरे याची कस्त[१] मागती दिलीकडे जाण्याची आहे. श्रीमंतानी उजनीस आले तेव्हा सिंद्याच्या कारभान्यापासून पैका अकरा लक्ष रुपये घेतले. कांहीं कापड जवाहीरहि घेतले याप्रमाणे मजकूर त्याचा. यशवंतराऊ पवार वारले. त्याचाही सरंजाम जप्त करविला. ये * * कास सार्थकाची जात चांगले तऱ्हेनें दिसोन आली. पुढें उमेद धरावयास जागा असो रिणानबध प्रमाणे होईल ते पाहावें. बहुत काय लिहिणे. लोभ असो दीजे हे आशीर्वाद.

¶*Naro Gangadhar writes from Barhanpur to Bajipant the details of the situation at Delhi after Abdali's departure and about the confiscation of the estates of several Sardars.*

---

१ कस्त=विचार हेतु.

No. 143] [May 1761 ?

जिलकाद इसंने

पुरवणी राजश्री कुकाजीपंतस्वामी सेवेसी. तुम्ही श्रीमंत राजश्री दादासाहेबासी विनंती करून रायापासून आजपर्यंत चालवीत आहेत त्याप्रमाणें पुढें असावें. यांत सरकार कामें फार. व यांच्याहि स्वरूपासी योग्य. स्वामी कार्यावर राजश्री जनकोजी सिंदे यांच्या अशा गती. वरचेवर कुशलतेचीं वर्तमानेहि येतात. असें असोन कांहीहि ध्यानास न आणितां त्यांच्या स्थळासी जाऊन करावयाचें नवतें तें केलें. साहेब चाकरिवर राणोजी बावा, जयापा, दतबा कामावर आले तें ध्यानांत आणून खावंदानी सर्फराजी करावी ते येकीकडेच ठेऊन नवेंच अडकत येते, येणेंकरून राजश्री सुभेदार साहेब म्हणतात कीं चाकरी केल्याचें सार्थक हें. अशा कितेक कल्पना चितांत आणितात. येणेप्रमाणे आसताहि सेवा करावयास चुकत नाहींत. फौज इकडे श्रीमंतानी ठेविली नाहीं आणि बंदोबस्त तो पत्रीं आज्ञा येती कीं सर्व हिंदुस्थानचा देखील करावा. गोष्टीनेंच होत नाहीं. तीर्थरूप राजश्री तात्या[१] मथुरेस ठाकूर नवाबासुधां येके ठिकाणींच * * * * * यजमानानी ठेविलें * * * * * फौज या प्रांता * * * * * * बंदोबस्त होऊन ये * * * * * पूर्वी येजमानानी विचार केला होता कीं आपणच ग्वालेर प्रांतीं राहावें म्हणजे आंतरवेदीचा वगैरे मुलकाचा बंदोबस्त होईल. परंतु श्रीमंतानीं इकडे बखेडा केला, याजकरितां येणेसें येजमानास जालें. श्रीमंत राजश्री दादासाहेबाचे विचारास आलें तर प्रस्तुतच पर्जन्यकाळाचे अगोदर च्यारपांच हजार फौज या प्रांतांत आलिया उत्तम आहे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

¶*The writer reprehends the Peshwa's action in attaching the Jagirs of Scindia and Holkar.*

---

No. 144] [26-5-1761

**श्रीशंकर.**

छ ११ जिलकाद सन
इसंने जेष्ट मास

**श्रीमंत राजश्री दादा साहेब स्वामीचे शेवेसी.**

विनंती सेवक रामचंद्र तुकदेऊ चरणावरी मस्तक ठेऊन सां नमस्कार विनंती विज्ञापना. येथील क्षेम ता वैशाख वद्य ७ सप्तमीपरियेत साहेबाचे

---

१ गंगाधर यशवंत.

प्रतापे करून मु॥ जयेनगर येथास्थित असे. यानंतर बहूत दिवस जाले. आज्ञापत्र सादर होऊन साप्रत आज्ञापत्री साभाल न जाला. याजकरिता बहूत चितातुर असो. तरी सदैव कृपाळू होऊन आज्ञापत्री कुशल वर्तमान लिहून साभाल करावयासी साहेब धणी समर्थ आहेत. वरकड या प्रातीचे वर्तमान तरी पठान आबदाली लाहोरापलीकड दोन मजली पावलियाचे वर्तमान आले. तेथे छावणी करणार येसे वर्तमान आहे. दिलीस राजे नागरमल याजकडचे दल मामलीतीच्या येवजाचे ताकिदीस पाठविले. ते दिलीस येऊन दाखल जाले आहेत. दिलीचा बदोबस्त नजीबखान यानी पातशाहजादेयासी सर्व प्रकारे मायेत घेऊन, बहूत मजबुती व बदोबस्ती करून, फौज पाच सात हजार ठेऊन, आपण आगरियावरी शेह द्यावयासी कूच केले आहे. दबाव जाटावरी टाकिला आहे. मुसेखान बहादरखान बलोचे दोन च्यार हजार फौजेनसी नजीबखान रोहिले यासी दिलीस येऊन सामील जाले आहेत. जाठ सुरजमल यानी आगरियाचा तमाम शेहरपेन्हाचा[२] बदोबस्त करून किलीयासी मोर्चे लाविले आहेत. किला जेर आहे. सरजाम थोडा बहूत आहे येक हला जाठाचा मारोन काढिली. याजकरिता शहर काही लुटोन घेऊन किल्यास मोर्चे लाऊन बैसले आहे. काही फौज पार बदोबस्तास उतरली आहे. गाजुदीखान मथुरेस आहे. आफज रहिमत यासी पैगाम लाविले आहे. त्याच्या याच्या भेटी होणार येसे वर्तमान आहे. राजश्री गंगाधरपंत तात्या दोन च्यार हजार फौजनसी जाठापासी आहेत. जाठास प्रस्तुत अगरियाचा घ्यावयाचा मजकूर भारी पडिला आहे. पुढे जो विचार होईल ते लिहित असो. शाहाआलीगोहर पातशाह पाच मजली आलीकड पटणियाहून आला आहे. नवाब सुज्यावतदउले पुढे सामारे आनावयासि लखणेहून गेले आहेत. ते दर मजल येऊन दिलीस दाखल होणार येसे वर्तमान. शाहअलम याचा गाजुदीखानाचा विचार सर्व साहेब जाणतच आहे. याजकरिता परसपरे सधेह आहे. पुढे जो विचार ध्यानास येईल ते सविस्तर साहेबाचे शेवेसी लिहित असो. राजे माधोसिगजी याजकडील वर्तमान (या पुढील बंद गहाळ)

¶*A mutilated letter ; it shows how the Holkar and other Maratha Sardars tried to save the various Maratha stations in Northern regions.*

---

१ जवानबख्त. २ शेहरपन्हा=तटबंदी, कोट

*No. 145*] [*17-6-1761*

**श्री.**

पौ छ १३ जिल्काद

ज्येष्ठ इसने

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.**

विज्ञाप्ति. कीं येमुनापार अंतरवेदातील मुलुक सरकारचा आहे. त्यास अयुध्येकर व रोहिले व पटाण याची ठाणी बसली आहेत. ते त्याजकडून काहाडून ठाकराकडे द्यावी यैसे त्यास कळले. ते न सोडीत. त्याजवरून राजश्री गंगाधरपंत याची पत्रें आयुध्येकरास व रोहिले व पठाणास गेली कीं मुलुक आम्ही कोणास देत नाहीं. आम्हीच घेऊ. हे वर्तमान छ मजकुरींच जालें. ते सेवेसी विनंती लिहिली आसे. पुढे होईल ते विनंती करूं. कृपा केली पाहिजे हे विज्ञाप्ति.

¶*The writer informs the Peshwa how he was trying to garrison the posts in the Doab in the Maratha interests.*

---

*No. 146*] [*17-6-1761*

**श्री.**

पौ छ १३ जिल्काद जेष्ट इसने.

**श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवेसी.**

[१]विज्ञप्ति कीं, नवाब याकुब अली खानास ताकीद शाहची लाहोरापासून आली की तुम्ही श्रीमंत स्वामीपासी जाऊन सर्वा गोष्टींचा तहरह करून सल्य करून मग दिल्लीस येणे. त्यावरून याकूब आलीखां व तीर्थस्वरूप रा। बापूजी महादेव येथे मथुरेस आले. येथील मंडली वजीर व ठाकूर सुरजमल वगैरे सर्व मिळून त्यास सांगीतले कीं श्रीमंत स्वामीकडे कोण्या गोष्टीसाठीं जाता. जे होणे ते येथेंच होईल. या गोष्टींवरून येथे राहिले. वीस रोज होत आले, परंतु काम कांहींच जाले नाहीं. बखेडाच राहिला. याकूब आलीखां आज उदईक दिलीस जाणार. आलीगौहर फौजेसह वर्तमान वारानसीस दाखल जाले. मजल दर मजल दिलीस येतात. नजीबखां बागपतावर आहे. वजीराचे व जाटाचे मानस आहे कीं आलीगौहरासी सल्य करावे. या विचारांत आहेत. शाह येरावती

---

१ पत्र हिंगण्यांचें.

नदी लाहोरा पलीकडे आहे, तेथवर जाऊन पोहचला. पुढे चालला जातो. सो कळावे म्हणून विनंती लिहली आहे. मागाहून वृत होईल ते सो लिहू. याकूब आलीखा दिलीस जाऊन स्वामीच्या पत्राची मार्गप्रतीक्षा करील. जेव्हां आज्ञापत्र येईल तेव्हा सो येऊन पोहचल. श्रुत होय कृपा केली पाहिजे हे विज्ञाप्ति.

¶*Hingne writes to the Peshwa about the arrival at Delhi of Yakub Alikhan, Abdali's envoy, to effect a reconciliation with the Marathas.*

---

*No. 147*] [*8-7-1761*

**श्री.**

**श्रीमंत राजश्री नाना फडनिवीस स्वामीचे सेवेसी.**

आज्ञाधारक दादो हरि चरणावरी मस्तक ठेऊन स|| नमस्कार विनंती. त|| छ ९ जिल्हेज पावेतो जंजिरे विजयदुर्गी क्षेम असों विशेष. स्वामींचे दर्शनाची मोठी उत्कंठा लागली आहे. श्री पूर्ण करील तो सुदिन. प्रस्तुत यावयास सिध जाहालो. निघालो तो थोरले वर्तमान अवतार समाप्त जाहालियाचे आले. तेणे-करून सर्व शोकार्णवी पडलो आहो. केवल कैलासच कोसललेसे वाटते. येशास स्वाक्षरामृतवर्षणे संजीवन करणार आपण खावंद आहेत. कधी आपले चरण दृष्टीस पडतील हा निजध्यास लागला आहे. सत्वर श्री सेवकाचे मनोरथ पूर्ण करील. श्रीमंत राजश्री भाऊसाहिबांकडील प्रस्तुत नूतन तहकीक वर्तमान काय आले आहे ते स्वहस्ते ल्याहावे. सेवेसी श्रुत होय. दरबारचेहि वर्तमान पुढील बंदोबस्त कोणाचे माथां हे साद्यंत ल्याहावे. सलगीने लिहिले आहे. कृपा करावी हे विनंती.

सेवेसी दामोदर रघुनाथ स|| नमस्कार विज्ञापना. स्वामीच्या दर्शनास यावे हा फार मानस आहे. श्रीकृपे लवकरीच दर्शनास येऊ. आल्यावर सविस्तर निवेदन होईल. पूर्ववत प्र|| कृपा करीत असावे. पदरीचे स्थापित आहो हे विज्ञापना.

¶*The writer Dado Hari (?) writes to Nana Phadnis how shocked he was to hear the news of the Peshwa's death and sends his condolences.*

---

१ लेखक दादो हरि हा कोण?

No. 148] [24-2-1761

## श्रीसांब शिव प्रां.

### श्रीमंत रा पंत प्रधान स्वामीचे सेवेसी.

पोो काशीराज शिवदेव दिा नवाब शुजाउदवला कृतानेक सां नमस्कार विज्ञापना यैसीजे : येथील कुशल जाणून स्वामीहीं निजानंदवेभवलेखनास आज्ञा करित असले पाहिजे विशेष. येथील प्रसंग आपले सैन्यांचा व गिलज्यांचा मुकाबिला होता. कालचक्रानुसार विपरीतार्थ निदर्शनास आला तो परस्परें सौ विनंती जाली असेल. येजमानांचा आपला स्नेह अविछिन आक्रित्रीम आहे तोच आहे. अगतिकत्वें येणे जालें. यथाशक्य सोरस्यास मनोदये होता, परंतु भगवतसत्ता यैसीच होती. त्यास उपाये काये. जुंज मोडलियां माहा-येवनेछा विपरीतभावें होती. त्यास आम्ही ब्राह्मण व आपले सेवक असतां असा अर्थ व्हावा हे अनुचित जाणून येजमानांस बोध करून महतायासें श्रीमंत भाऊसौ व श्रीमंत रावसौवांची शवें रणांगणीहून आणून ब्राह्मणमंडळीचे सहित चंदनादि उपचारें संस्कार केला हेहि त्यांचेंच पुण्यसहाये जालें कीं यैसा योग जाला असतां संस्कार येथाविधि जाला. जे शर्तमर्दीची ते केली का नसे आपले आंश होते. येजमानांस या प्रसंगामुळें बहूत खेदावह जाले. स्वामीराजांसहि परम दुखावह होईल. परंतु भगवत इच्छेस उपाये काये. स्वामी सर्वज्ञ आहेत. विज्ञापना करावी यैसा अर्थ नाहीं. सेवकास दासवर्गीत जाणून सदैव आज्ञापत्रीं सनाथ करित जावें. बहूत काये लिहिणें. कृपा निरंतर आसो दीजे हे विज्ञापना. माघ कृष्ण १२ मुा दिल्ली.

*Kashiraj Shivdeo informs the Peshwa how through the good offices of his master Suja-ud-dowla, the dead bodies of Vishwasrao and Bhausaheb were recovered after great effort and cremated with proper ceremony. The whole letter is in the writer's hand, who seems to be a Deccani Brahmin in the employ of the Vazeer of Lucknow and whose famous Bakhar on Panipat is already well known. This letter will serve to settle the doubt whether Sadashivrao Bhau's dead body was at all recovered.*

*No. 149*] [*11-10-1760*

रोजकीर्द
सुा ईहीदे

# राजमंडळ.

## स्वारी राजश्री पंतप्रधान

माहे रबिलावल.

तेरीख. १

(१) तसलमात हरी विश्वनाथ [भावे] याजकडे चिरजीव सौ लक्ष्मीबाई श्रीत्रिंबकेश्वरी आहेत त्यास खर्चाबदल पा राजश्री नाना; रसानगी रामाजी विश्वनाथ बर्वे; जबानी कृष्णाजी माहादेव चिपोलणकर कारकून सिलेदार रु. ३०००

तीन हजार रुो पा नासिक नि॥ मोरो विनायेक व त्रिंबकराव सदासीव [दीक्षित पटवर्धन] याजकडून देविले. रु.

[याच बाबतींत पुढें एक दफातेपत्र बार आहे]

---

[*9-12-1760*

## स्वारी राजश्री पंतप्रधान.

जामदारखानापैकी

छ ३० माहे रबिलाखर

बाजीराव माणकेश्वर याची मूल पाहावयासि आणिली होती. त्यास निरोपसमई पा खासा रसानगी नारो अपाजी ताा दामाजी रंगाजी कारकून सिलेदार सनगे यो आख

खासगत राजश्री नानाकडे टोपी कोल्याच्या कातड्याची आहे त्यास अस्तर गुाा नागू सिदी जामेवार पस्मी ८÷

आंख ४०

१६०

[17-12-1760

छ ८ जमादिलोवल

खर्च पोतापैकी,

१०० नवऱ्या मुली आणिल्या; त्यास तूर्त घरास जावयास निरोप दिल्हा; सबब खर्चास रसानगी विरेश्वर दीक्षित रुपये
५० उचेगाव पा। आबाड येथील कुलकर्णी याची मूल आणिली तीस.
५० नारायण नाईक वाखरे पैठणकर याची मूल आणिली तीस.

जामदारखानापैकी

इनामखर्च अजूरदार कासीद यासि. दिल्लीहून बातमीची पत्रे घेऊन येत होते, त्यास पठाणाने धरून नेऊन बसविले होते परंतु आपला बच्याव करून निभाऊन आले, सा। पा। रुबरू राजश्री नाना चिठी छ मजकूर

आख

२० रामचंद्र
२० संतोख
२० बसना
२० गोविंद

ता। न्याहार कासीद
[सनगांचा तपशील]

---

[18-12-1760

छ ९ जमादिलोवल

खर्च पोतापैकी

१५० स्वार दिमत गोविंद हरी. रवाना पुण्यास तुळाजी आगरे यास आणावयासि असामी २५ येकून दोन आठवड्याबदल पा। रुबरू राजश्री नाना रु॥

[19-12-1760

छ १० जावल

खर्च पोतापैकी

९० नवऱ्या मुलीस खर्च. बाबुराव ठकार नांदेडकर यांची कन्या लस्करात पाहावयासि आणिली होती ती माघारी पाठविली; सा मुलीस खर्चास पा राजश्री नाना; रसानगी बालाजी वामन दामले शागीर्द रुो

[ही मुलगी पुण्याहून बाबुराव राम फडणीस यांनीं पाठविली होती असे या खालच्या नोंदीवरून दिसते; तेव्हां हे 'नांदेडगांव' पुण्याजवळचेंच धरलें पाहिजे]

---

[29-12-1760

छ २० जमादिलोवल

खर्च पोतापैकी

७९ रामभट बर्वे वार्डीकर दिमत विरेश्वर दीक्षित मनोहर आश्रित याचे सासरे. यास निरोप समई रवानगी रसानगी यादी [तपशील]

२०४॥ लग्नखर्च राजश्री नाना. देणे सोइऱ्याकडील ब्राह्मणास दक्षणा वगैरे; गुा नारो बाबाजी रसानगी यादी
[तपशील]

८३॥ जासूद जथेहाय गढेमंडल्याकडे वाट पाहावयास जातात सबब.

## १६२

[31-12-1760

छ २२ जमादिलोवल

खर्च पोतापैकी

४०१ विरेस्वर दीक्षित याचे लग्न जाहाले
त्यास सामान बा रसानगी याद
[तपशील]

२५ धर्मादाव देणे. वसुघेंद्र स्वामी याजकडून वस्त्रे घेऊन ब्राह्मण आला, त्यास बिदाई रसानगी याद [तपशील]

२० इनामखर्च देणे अजूरदार कासीद पुरुषोतम माहादेव याजकडून दिलीहून पत्रे घेऊन आले सा पा राजश्री नाना रसानगी लक्ष्मण विश्वनाथ बर्वे रुा

---

[26-12-1760

छ १७ जमादिलोवल

खर्च पोतापैकी

२५ नवरीमूल सावताचे वाडीहून आणिली आहे. तीसमागमे माणसे वगैरे आली आहेत त्यास खर्चास रसानगी याद.

---

[30-12-1760

छ १८ जमादिलोवल

खर्च पोतापैकी

१२ काशीद जथे निगाई, रवाना विसाजी कृष्ण याजकडे पत्रे घेऊन जातात त्यास रोजमरा येकमाही रुा

[तपशील]

१२ कासीद जथे रायमल; रवाना त्रिंबकराव विस्वनाथ याजकडे पत्रे घेऊन जातात त्यास रोजमरा येकमाही रुा

[ तपशील ]

जामदारखानापैकी

लग्नखर्च विड्याकडे ताा

जंगनाथ सुभराव रुमाल

[ तपशील ]

---

[31-12-1760

छ १९ जमादिलोवल

खर्च पोतापैकी

१६३६७।। धर्मादाव दक्षणा लग्नाची राजश्री खासानी केले त्याची, रुपये

१५५६० विाा जनार्दनभट गाडगीळ, ब्राह्मण आसामी ३११२ दर आसामी ५ प्राो

८०७।। विाा विश्वासराव त्र्यंबक, बायका

---

[4-1-1761

छ २६ जमादिलोवल

खर्च पोतापैकी

३११० निळकंठ माहादेव कारकून याजकडे दक्षणेबद्दल पाा राजश्री नाना; रसानगी वेंकोजी माणकेश्वर पोतनीस खाो चिठी

[6-1-1761

छ २८ जमादिलोवल

खर्च पोतापैकी

४९॥– गुा विठल कृष्ण, कारकून सिलेदार, नरसिंगराव नारायेण लेले याजकडील नवरीमूल आणावयासि जमखडीस मारनिलेस पाठविले; त्यासमई सरकारची घोडी वगैरे होती, त्यास खर्च जाला तो; रसानगी यादी इा छ ३० राखर ता छ १६ जमादिलोवल रोज १७ येकूनं [ तपशील ]

---

[27-1-1761

खर्च जामदारखानापैकी कापड

देणे नारोबा नाईक वाखरे पैठणकर सोइरे यासी. छ १८ जावली लग्ननिमित्य सनगे देविली ती छ मजकूरी खर्च पा राजश्री नाना, रसानगी नारो बाबाजी. खासगत खर्च सौ राधाबाईकडे छ १८ जावली लग्नात सनगे नेली ता अंताजी मल्हार वाकेनीस सनगे आख

| | | |
|---|---|---|
| ४५३ | पातले जरी पौ<br>९० २८८ ७५<br>४५३ | ३ |
| ६६ | दुपटा पौ | १ |
| १०७॥ | पितांब्र जनानी | १ |
| ३८२ | वोढण्या बादली<br>१४२ २४०<br>३८२ | २ |
| ३२५ | शाळा थरमे<br>१५० १७५<br>३२५ | २ |
| ९७॥ | पाटाऊ जनानी | १ |
| १४३१ | | १० |

१६९

[14-3-1761

छ ६ माहे साबान

खर्च पोतापैकी

४० जयनगराहून रामचद्र तुकदेव याजकडून पत्रे घेऊन आले. त्याचा करार विसा कोसास दोन रुपये अजुरा द्यावा. त्यास भेलेशास कासीद पोहचले त्यास अजुरा.

१० नंदलाल
१० भंवानी
१० उंदा
१० नंदराम
———
४०

१०० गुलराय वकील दिमंत आबदली यास मेजवानीबदल; पा। राजश्री नाना रसांनगी कृष्णराव बापूर्जा पारसनीस; जबानी व ता। रतन वलद कलमण चोपदार; रा। जासूद जथे हाय यास इनाम.

१९२६८≡ छ १७ रजब (23-2-1761) राजश्री विश्वासराव याचे उतरकार्यास प्रारंभ केला होता त्यास, वि। नारो त्रिबक देशमूख.
[ खर्चाचा तपशील ]

खर्च जामदारखाना

खिजमतगार नि। खास जिलीब स्वारी राजश्री भाऊ. ग्वालेरीहून आले; लुटले आले, त्यास रा। यादी चिठी छ २९ रजब आख

[ तपशील ]

सवस्थान भूपालकराकडील माणसास परदरबार खर्च इनाम रसानगी यादी चिठी छ १ साबान कापड आख

[ तपशील ]

१६६

[17-3-1761

छ ९ साबान

खर्च पोतापैकी

४४ पथक दिा नीलकठ माहादेव मौजे टंक पाा खेचीवाडा येथे जखमी जाहले त्यास खर्चास बाा यादी

[ तपशील ]

---

•

[19-3-1761

छ ११ साबान

खर्च पोतापैकी

१९२ जासूद जथे गगाजी नाईक; जानोजी भोसले याजकडे भगवत विष्णु याजबाा बातमीचे कामास आहेत; साा नेबाद तिसाचे रुा

[ तपशील ]

१२० कासीद जथे हाय रवाना अबदालीकडे वकिलीबराबरी जातात; साा रोजमरे दोन महिने रुपये

[ तपशील ]

जामदारखानापैकी

वैजनाथपुरी गोसावी दिा राजश्री कासीद दिा गाजदीखान वजीर परदर- जानोजी भोसले सेनासाहेब सुभा यास बारखर्च सदरेस सनगे रुबरू खाशानी निरोपसमई वस्त्रे सदरेस विा राजश्री दिल्ही.
नाना. सनगे आख

[ तपशील ]

[ तपशील ]

१६७

[22-3-1761

छ १४ साबान.

खर्च पोतापैकीं

४००० मिर अनवरुलाखान त्रिंबककर; रवाना
अबदाआलीकडे सां रसानगी यादी
रुो

[तपशील]

३६ अजुराखर्च; कासीद पत्रे वकिलाकडून
घेऊन आले त्यास बाा पत्रे वकील रुाा

२० दिलीहून बापूजी महादेव
याजकडून छ ८ साबानी
आले; त्यास रुाा

१० सेदू.
१० अगडी.

१६ डिगेहून पुरुषोतम माहादेव
याजकडून छ ८ साबानी
आले त्यास

८ जोगी.
८ रतीराम.

१६

३६

जामदारखानापैकीं.

जासूद दिमत प्रतापसिंग राजे साा
चंदावर याजकडून पत्रे घेऊन आले होते,
त्यास निरोपसमई इनाम आख

९ सुभानजी नागोजी.
९ तुकोजी धारोजी.

१८

ताा खुद, सेले व जोट २ दर ६. आख १८

[24-3-1761

छ १६ माहे साबान.

जामदारखानापैकीं कापड.

परदरबार खर्च. शाहा अबदली यास वस्त्रे दिलीस पाठविली विा राजश्री नाना, बरोबर. मिर अनवरुला-खान त्रिंबककर; सनगे
सनगे यो आख

२५७८॥ खासा अबदाली
१३३० कारचोबी पोशाख. यो आख
[ सनगे ९ तपशीलवार ]
७३९॥ बादली पोशाख
[ सनगे ६ तपशीलवार ]
८८ तिवट चुनडी १
२५० पा पैठणी १
१७ सेला कलसपाकी १
———— ——
२५७८॥ १४
२१८९॥ वजीर शावली
[ तपशील ]

परदरबार खर्च दिमत सां भूपालकर रोहिले यासि वस्त्रे पाठविली. बरोबर कारकून गोपाल विठल आख
[ तपशील ]

खासगत सौ राधाबाईकडे कोतवाल सनगे बाधावयासि बेत गुा बनाजी सिपी सनगे आख

मीर अनवरूलखान त्रिंबककर सिलेदार यासी रवाना अबदलीकडे दिलीस जातात सा आख
[ तपशील ]

---

[3-4-1761

छ २६ साबान.

जिरातखानापैकीं.

नुकसाने खर्च.

टंकचे गढीवर खास जिलेबिकडील लोकाचा मोर्चा होता. तेथे गोल्या

लागो [ न ] मोडल्या वगैरे नुकसान
जाहालें. ते पा। राजश्री नाना रसानगी
बालाजी कृष्ण ठोसर.

सुमार

[ तपशील ]

---

[4-4-1761

छ २७ माहे साबान.

जामदारखानापैकीं.

तुळाजी पवार खिजमतगार स्वारी राजश्री नाना भाऊचे लस्करांतून लुटून आले सा। बक्षीस पा। खासा रा। गर्वाजी पठग चिठी छ मा।र

आख

२९

---

[6-4-1761

छ २९ माहे साबान.

जामदारखानापैकीं.

दिमत राजश्री मल्हारजी होळकर याच्या नातवास वस्त्र सदरस वि॥ राजश्री नाना सनगे यो।

आख

४६१ मालोजी होळकर नातू

[ सनगांचा तपशील ]

जिनसखानापैकीं खाजगत खर्च.

मेजवानखर्च. सौ गौतमाबाई, मल्हारजी होळकर याची स्त्री डेन्यास आली त्यासमई वजन तोले.

[ जिनसांचा तपशील ]

खर्च पोतापो।.

९० कृष्णाजी गोपाळ हर्जीब, नारो शंकर याजकडील, यास मागे चिरंजीव राजश्री भाऊकडे यैवज देऊन रवाना केले होते; ते हाली हुजूर आले त्यास रोजमरा दीडमाही हालीचा छ १ रमजानचा

[29-5-1761

छ २३ सवाल [ चालू ]

जामदारखानापैकीं.

झाबरोजी वाग पोर्गा दिमत पागा हुजूर याणे हिंदुस्थानचे लढाईत सिकस्त जाहाली ते समई सौ पार्वतीबाई समागमे कस्त मेहनत फार चांगली केली; सरकार कामास आला. सा बक्षीस रसानगी चिठी छ २१ सवाल आख

१९ तिवट १

२० सेला १

---

[2-6-1761

छ २८ (२७?) माहे सवाल

जमा पोता.

बा स्वारी सौ गोपिकाबाई चिरंजीव राजश्री नारायेणराव यास देवी निघाल्या होत्या, तेव्हां नर्मदा तिरी मागे राहिली होती इा छ ११ रमजान ता छ १२ सवाल जमा रु॥ [ तपशील ]

खर्च पोतापैकीं.

५ छ ११ रमजान निबाजी रासकर यास सौ पार्वतीबाई यांजकडे रवाना केले; सा वाटेने खर्चास बा मु रा वाल्होजी बिबवा पावलोक

२ छ २३ रमजान सिदोजी वाळूज खिजमतगार सौभाग्यवती पार्वतीबाई याजकडून पत्रे घेऊन आला, सबब इनाम पा सौ बाई रा व ता राघोजी चव्हाण

१७१

१००० छ २९ रमजान जानोजी भिताडा खिजमतगार स्वारी राजश्री भाऊ, सौ पार्वतीबाई यास घेऊन आला; सा बक्षीस पा सौ बाई रा बच्याजी विश्वनाथ बरवे

---

[3-6-1761

छ २८ सवाल

खर्च पोतपैकी

११८÷ गुा आपाजी चिमणाजी, कारकून निा दफ्तर स्वारी भाऊ, टोक्याहून स्वारीचे दफ्तर घेऊन पुण्यास आले; त्यास येते समई खर्च जाहाला तो बा यादी इ॥ छ २६ सवाल ता छ २ जिलकाद रोज ७ पौ वजा छ २८ रोजी नारो बाबाजी याजकडून पा पारनेरपैकी दाणा घेतला बाकी रोज ६ येकूण.

[तपशील]

९९ देहेनगी देणे बाजंत्री व कर्णेकरी साल मजकुरी श्रीमंत नाना साहेबांचे लग्न हिरडपुरी जाहाले. ते समई वाटणी बा आपूजी अनंदराव याचे तसलमातीस पोत्याहून रुो दिल्हे होते; त्यास मारनिलेनी वाटणी करून जमाखर्च न करितां पुण्यास आले. त्यास त्याची हाली माानिलेनी वाटणी आणिली ते रुो

७९ बाजंत्री

१० घेकू विज्ञानेश्वरकर गुरव

[वगैरे तपशील]

१६२ रत्नशाळेकडे राजश्री नीलकंठ माहादेव याचे लग्न हिरडपुरीवरी जाहाले. तेसमई

रुईचे लग्नास वस्ता बा। तसलमातीस
नेल्या त्या खर्च पडल्या नवत्या; सबब
हाली मोहरा नाणे १२ दर १३।। प्रमाणे

कामाठी दिाहाय यास रोजमरे रा। यादि रुा

९३२२ खासा स्वारी होते त्यास आ ६६६ रुा.

१८२५। स्वारी राजश्री भाऊपैकी आले २९९

त्यास आ ९६५

---

[3-6-1761

छ २८ सवाल

खर्चपोतापैकी

कामाठी दिमतहाय दिा तोफखाना स्वारी राजश्री भाऊपैकी आले त्यास
येकमाही रा। यादि

[ इसम ६७ व रक्कम रुपये २६६ ]

खर्च जामदारखानापैकी कापड

विठल नारायण वाखरे, कारकून सिलेदार यासी रा। चिठ्या ३ चिठी छ २९ रमजान आख १७५

[ तपशील ]

नारो अपाजी दिमत सुभा प्रा। पुणे यासी रा। चिठी चिठी छ १८ सवाल आख ३४०

[ तपशील ]

नागवा नाईक वाखरे पैठणकर सोडर यासि मेजवानी बा। पा। राजश्री
नाना; रसानगी धोडो रामचंद्र कापड आख
१०००

ना। विठल नारायण वाखरे

[ तपशील ]

इनाम खर्च. खासास्वारी आसरीवरी गेली ते समई सनगे
या। आख

[ तपशील ]

देणे मिलेदार स्वारी राजश्री भाऊपैकी चाकरीस हजीर जाहाले त्यास
मोघम लुटले आले; सा। रसानगी यादी चिठी छ मजकूर आदा
छ १६ साबान कापड आख

[ तपशील ]

[3-6-1761

छ २८ सवाल

खर्च जमदारखानापैकी

(१) गुा रामाजी कासी वाकेनीस श्रीक्षेत्र टोके गंगातीर येथे गोसहस्र माहादान केले; विद्यमान राजश्री नाना छ १२ सवाल

[ तपशील ]

(१) दुब्रेजी खर्च, स्वारी राजश्री भाऊ याजकडे फौज विा राजश्री नाना पुरंधरे याजबरोबर आली, त्याजकडे ग्वालेरीस कापड बाबुराव सदासीव याजबरोबर पाठविले ते खर्च बाा पटी अलाहिदा सनगे

[ तपशील ]

[ येकूण ]

३९२४१०८≡ ११९६४।.

[18-3-1761

(१) तारीख १०. रोज फाल्गुन शुा द्वादसी शके १६८२ सौम्यवासरे

जमा जामदारखाना.

कमावीस भेट सनगे येकून किमत

१४० राजश्री नानास हा. आबदली. बरोबर गुलराज वकील याजबरोबर वस्त्रें पाठविली तो गुा. साखरोजी उदरा. स.

| | | |
|---|---|---|
| ४० | चीरा बलासी | १ |
| १०० | कुडतीस दाना केस | १ |
| १४० | | २ |

(२) २० साबान शनिवार. ( २८ मार्च १७६१ )

१४५०७६ तसलमात कृष्णाजी गोपाळ; कारकून सिलेदार याज हा चिरंजीव राजश्री भाउ-कडे दाहा लक्ष रुपये रवाना केले होते त्यास ऐवज चिरंजीवाकडे न पोहोचला, मार्गी राहीला, त्या पैकी जमा गुा. खुद कृष्णाजी गोपाळ.

पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद

# ४

# आनंदीबाईची दिनचर्या

## सप्टेंबर १७८६—आक्टोबर १७८८




[किंमत—१ रुपया किंवा १ शिलिंग ८ पेन्स]

संपादक—**गो. स. सरदेसाई**, बी. ए.



गव्हर्न्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई
१९३०

## *SELECTIONS FROM REPORTS ABOUT ANANDIBAI*

*September 1786 - October 1788*

Anandibai, born, as she herself says, in 1747, in the family of the Oke of Guhagar, was the second wife of Raghunathrao. She was married on 17th December 1755, within a few months of the death of Jankibai (Barve), Raghunathrao's first wife, and died at Anandvalli, three miles west of Nasik, on 27th March 1794. She was one of the famous ladies of the Peshwas' family and has attained undeserved notoriety, on account of her alleged complicity in the conspiracy to murder Narayanrao. The murder resulted in a war with the British, who sheltered Raghoba at Surat. When it was over, Raghoba with his family came to reside at Kopergaon on the Godavari in August 1783, completely broken in health and spirit, and died there four months after, on 11th December.

How original papers correct popular errors and historical inaccuracies, is well illustrated in the case of Anandibai. The 74 documents here printed refer to a period of nearly two years (September 1786 to October 1788) with many gaps between. They describe the daily life and routine of Raghoba's entourage at Kopergaon and report to Nana Fadnis at Poona all the utterances and actions not only of the lady herself but of her sons and retainers, who were closely watched and deprived of all liberty of movement except permission to visit a few temples in the immediate vicinity. The entries are full, pithy and pointed, and reveal the galling nature of Anadibai's confinement when scarcely anything beyond the needs of life were supplied. It is so entertaining to read these vivacious reports that one cannot help wishing that more letters had survived covering the whole period of the lady's widowhood. Anandibai's character is most graphically depicted in these letters, which contain as well many reminiscences of past events of a political or domestic nature. She criticises in an extremely frank manner the personal peculiarities of the various Peshwas, not excepting her own husband, and their ways and doings in general ; and this enables us to correct many misconceptions which have crept into history. She describes the haughty and imperious character of Gopikabai, wife of Nanasaheb, the intriguing nature of Sakharam Bapu, and the stern discipline of Nana Fadnis. She constantly bewails her own sad fate in having to submit to the dictates of men like Nana Fadnis whom it should have been in her power to command. Nana suspected her of necromancy and checked the tendency with a strong hand. Her household consisted of Amritrao (adopted son) with his wife Savitribai, Bajirao (born at Dahr on 10th January 1775), his wife Bhagirathibai, and of Chimaji Appa born on 30th March 1784, who only figures as a child in these papers. Bajirao's early tendencies are sufficiently described in the mother's own words which amply justify the character he later on came to bear in the Maratha State. He was unruly, fanciful, licentious, given to ostentatious piety, disobedient and faithless. He had no heart in his studies and often received severe rebukes and even floggings from his mother.

Having become thoroughly sick of her long confinement at Kopergaon, Anandibai tried hard to be removed to some other place on the Krishna : but she was not allowed to do so. In October 1792, however, she came to live at Anandvalli, about three miles west of Nasik, where she eventually died at the comparatively early age of 47. She was a clever writer and herself penned several charming and dignified letters some of which are extant. She was shrewd and wise, honest and outspoken, and always anxious to preserve the dignity and the prestige of the Peshwas. If she had been wedded to a better husband, there seems to be little doubt that she would have figured as one of the most patriotic members of the Peshwas' family. As matters stand, however, she has suffered in popular estimation not so much for her own drawbacks as for those of her husband and of circumstances beyond her control. It is creditable to her that through thick and thin, she honestly helped her husband's cause and did all that a dutiful wife could to retrieve his fallen fortunes.

She bore, as we know, many children, at least four sons and one daughter Durgabai, who was married to Pandurang Babuji Naik of Baramati but who died in 1783 in the life-time of her parents.

The effect of this long confinement was inevitably demoralizing. Had Nana Fadnis, on the death of Raghoba, buried the past and restored this gallant lady and her children to liberty, and allowed the young Peshwa to associate with them as was the practice of the family before, it is permitted to the historian to conjecture whether the course of Maratha affairs might not have been changed to some extent.

पौ छ १३ जिलकाद
सु॥ सबा

**श्री.**

विज्ञापना विशेष. कलमे येणे प्रो. आपाजी विश्वनाथ व बालाजी बाबुराव घाणेकर याचा वाटणीचा कज्या आहे म्हणून सरकारांतून कारकून व ढलाईत व जासूद देऊन लोकाकडें कर्ज येणे ते वसूल करून सरकार चौथाई घेऊन बाकी वाटणी करून घाणेकर यास द्यावी. ज्यांकडे कर्ज येणे त्याचे नावे सरकारचीं पत्रे दिल्ही आहेत की, वाजबी कर्जाचा फडशा करून देणे. त्यांत तान्हाजी (तानबाजी) धायभर यांस पत्रें होती ती त्यास दाखविली. त्याचे कारकुनाने वाचून पाहून फाडून टाकिली. ती येथे आली. त्यावरून येथून त्या कारकुनास आणावयास स्वार पाठविले आहेत. कलमे १

वासुदेव रामकृष्ण यांस विसाजी आपाजी याचे ऐवजाकरितां मामलतीवरून सरकारची आज्ञा नसेतां कोंपरगावी नेऊन तगादा केला हें ठीक नाहीं, म्हणून पत्री आज्ञा; त्यास लस्करची आज्ञापत्रें आली, त्याच्या नकला शेवेसी पाठविल्या आहेत, त्यावरून निवेदन होईल. कलमे १

मौजे उंदीरवाडी पो पाटोदे नि॥ आंबीकर व मौजे अंदरसूल पो मजकूर नि॥ माहादजी सिंदे कमावीस त्रिबकराव देशमुखाकडे आहे; त्यास उंदीरवाडीची जमीन सात वर्षें अंदरसूलकरानी दाबिली आहे, म्हणून पाटील बावा यानी देशमुखास पत्र दिल्हे आहे की, वाजबी मनास आणून विल्हेस लावणे. असें पत्र आले असतां मनास आणित नाही, आणि पांच साचाहूर जमीन अंदरसूलकर वाहून खातात. उंदीरवाडीकर येथे फिर्याद आले आहेत. वाजबी मनास आणून विल्हेस लाविल्यास हजार बाराशे रुो पावेतो सरकारांत देतील; येविसीची आज्ञा. कलमे १

सगुणाजी देशमूख याचे देशमुखीचे जफ्ती प्रकरणी पेशजी विनंतीपत्र लिहिले, त्याचे उतर अद्यापि येत नाही; येविसीं बाबाजीपंत साठये विनंती करितीच असतील. उतराची आज्ञा जाली पाहिजे. कलमे १

मशालेचे पोतांविसी पेशजी विनंती लिहिली होती. आज्ञा जाली नाहीं.

पालख्यांच्या दांड्या फार वर्षांच्या जुन्या जाल्या. उपयोगी नाही, याजकरिता नव्या करावयाची आज्ञा व सामान दोन वर्षे जाली, मजीद[१] जाले आहे, ते नवे करावयाची फरासखान्याकडे आज्ञा जाली पाहिजे.

पालख्या—

१ श्रीसाबाची,

१ मातुश्रीबाईसाहेबाची,

१ श्रीमंत राजश्री बाबासाहेबाची,

२ राजश्री अमृतराव,

१ खासा,

१ सौ सावित्रीबाई,

—

२

—

५

कलमे १

श्रीमंत राजश्री आपासाहेब यांस कडीं तोडे सोन्याचे पाहिजेत, ते नवे करून पाठऊन द्यावयाची आज्ञा जाली पाहिजे. कलमे १

पागा दिंमत केसो माहादेव याजकडे दसरियाचें कापड सालाबाद पावते त्याप्रो पाठऊन द्यावयाची आज्ञा जाली पाहिजे. कलमे १

उपाध्ये यांस पत्र ल्याहावयास सांगतात. न लिहिले तर बोलण्याचे आशय समजणार नाही म्हणून लिहून फरासखान्यातून देवावयाची आज्ञा जाली पाहिजे. कलमे १

अफ्तागिरे दसरे यास नवी करावयाची दाड्या सरंजाम सुध्धा.

४ पहिली,

२ हाली नवी केली पाहिजेत,

१ श्रीमंत राजश्री आपासाहेब यांजकडे,

१ सौवती ताईसाहेब यांजकडे,

—

२

—

६

येणे प्रो साहा अफ्तागिरे नवी जुनी मिलोन दसरियास तयार करून द्यावयाची आज्ञा फरासखान्यात जाली पाहिजे. कलमे १

मौजे आसी येथील कुरणे दरोबस्त व शेन्या पहिले नेमणुकीचे अजमासास लाऊन दिल्हे आहे, असे असता आलीकडे विसाजीपंतानी काय समजाविले न कले. शेन्यांचा गला कोंपरगांवचे हिसेबी जमा होत आहे. लस्करची पत्रे आलीं. त्याच्या नकला सेवेसी पेशजी पाठविल्या आहेत. विसाजीपंताचे पागेचे बेगमीस कुरण पाहिजे तर दुसरीकडे नेमावे. आसीची नेमणूक दरोबस्त कुरण सेरीगांवचे ऐवजासुधां येथील

१ मजीद = जुने.

त्याची नकल पाहावयास पाठविली. तर जे शब्द लिहिल्यात येतील त्याचा अर्थ चितांत येईल ते पत्र लिहिणें, तर कृष्णाजीपंताकडून लिहिवितो. इतकियावर जसी मर्जी असेल तसी आज्ञा जाली पाहिजे. कलमे
१

या बेटांत बाहेरील कोणी येणार व येथील बाहेर जाणार त्यास चौक्या. राघोपंत याकडील गाडदी व कासिपंताकडील आहेत. चौकसी ज्याकडे येईल त्याणे रात्रीस सांगावें. जो बाहेर जिकडील जाणार त्याणे जातेसमई परवानगीने जावे. हे काम मोठेच आहे व वाड्यात जाणारास परवानगी हे काम एकीकडे परवानगीचे असावें. नित्याचे राबत्या खेरीज येणारास जाणारयास परवानगी या प्रकारची असल्याविनाहि कोणाचे तरी जिमेस काम लावावे. हे फार उपयेगी जाणून विनंती लिहिली आहे. ज्याकडे परवानगी त्यास पुसावयास जागा नाही तर कोणास पुसावे? यांकरतां आज्ञा असावी. कलमे
१

कर्मविपाकाचे पुस्तक सूर्यअरुणसंवाद आणवावा म्हणून सांगितले आहे. कलमे
१

बेरजेस धरली आहे. इतकियावर स्वामींची मर्जी. कुरणाचे तपसिलाची याद आलाहिदा पाठविली आहे. पाहिल्यानंतर ध्यानात येऊन आज्ञा होईल त्या प्रो करूं. कलमे
१

उपाध्ये यांस पत्र लिहिलें आहे; त्याची नकल करून पाठविली आहे; ती उपाध्ये यास दाखविल्याने खुलासा निघणार नाही. येथून किती लिहितो, ते तेथें किती बोलतात, याचा भाव समजणे. तो मार्ग येक वेल त्यांस समजल्यानंतर खुलासा निघणार नाही; याजकरितां विनंती लिहिली आहे. नकलेवरून खुलासा पुसावयास चांगलें असें वाटतें, त्यांत जसी मर्जी असेल तसेंच करावे. कलम
१

अमृतराव व मातुश्रीबाई साहेबांचे बोलणे येकांती होत असते. त्या बोलण्याचे भाव काही समजत नाही. सारे बाहेर घालून येकांत होतो. इलाज करून पाहातो, चालत नाही. कलम
१

येणेप्रो पंधरा कलमे लिहिली आहेत. निवेदन होतील. उतरपत्री आज्ञा जाली पाहिजे. रा छ ७ जिलकाद. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Here is an account of several days' talks reported to Nana from Kopargam, containing many interesting episodes.*

No. 2] [21-5-1787

पौ छ १२ साबान

सु ॥ समान.

श्री *

सेवेसी केसो माहादेव कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना. ताा छ ३ साबान पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री राघोपंत ठोसर येथून पुणियास गेल्यापासून श्रीमत बाबासाहेब याचे लिहिणे पढणे होत नाही. मनश्चील वर्तणुकी होतात. काल छ २ साबानी श्रीमंत मातुश्री बाईसाहेब याची व बाबासाहेबाची कटकट जाहाली. येथे कोणास भीत नाही. बाईस टाकून बोलतात. त्याजवरून मातुश्रींनी सागितले की, आपणास लिहून राघोपंत यास आणवावे; म्हणौन सेवेसी विनंती लिहिली आहे. तरी मशारनिल्हेचा बंदोबस्त करून रवानगी केली पाहिजे. ते आल्याविना कोणाचे आईकत नाही; याकरिता माारनिल्हेस सत्वर पठवावयास अज्ञा करावी. श्रीमंत बाबासाहेबास आज तीन रोज ज्वर येतो. व श्रीमंत सौ ताईसाहेब यासहि ज्वर आज पंधरा दिवस येत होता. मधे दोन च्यार दिवस निघाला होता. आता मागतीहि ज्वर येत असतो. वैद्यापासोन औशधे देवित असतो. सेवेसी श्रृत होय. बहूत काय लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*Keso Mahadeo reports to Nana news of Bajirao's rowdyism and requests him to send back Raghopant Thosar who alone could control him.*

---

No. 3] [22-5-1787

श्री ७

पु॥ सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. दिनचर्येचे वर्तमान.

छ ४ साबान. वाड्यांत लक्षहोम जाला.

आपासाहेबास येक दोन दिवस ज्वर येत होता. आता प्रकृत बरींच आहे.

बाईनी सर्व प्रायश्चित्त छ २ रोजी केलें.

छ ३ साबान.

१ अमृतराव यांस स्वप्न पडलें की, गाईवर बसलों आहे. बाई बोलली कीं, गाय पृथ्वी, चांगलें आहे.

१ बाईनी स्वप्न पाहिलें की, त्रिवर्ग कारभारी येथील जवल आले. इत-

---

* पत्र रुजू घेतल्यासंबंधी चिन्ह. असेंच चिन्ह पुष्कळ पत्रांच्या माथ्यावर आहे.

५

सप्तशतीचा पाठ बाई करीत असतात. पहिली दोन चरित्रें पाठ होतीं. आलिकडे म्हणत नाही म्हणोन विस्मरण जाले. आतां मागती म्हणावे आसे बोलोन छ २९ रजबपासून येक पाठ नित्य पोथीवरून होत असतो.

कलम
१

क्यात साहेबांची स्वारी आलीसें पाहिले तों कुणबीण बोलली कीं थोडे उरले. आसे बोललियाचा अर्थ आमचें आयुष्य थोडे आहे आसें बोलली.

१ वाड्यांतील पुराणिक सप्तशृंगास देवदर्शनास गेले; तेव्हा निरोपास आले. त्या वेळेस त्याजबराबर बाईनी निरोप देवीस सांगितला कीं आमचे मुलाबालांचे नवस फार आहेत. आम्ही यावें तर आपलें स्वाधीन नाही. श्रीत्रिंबकेश्वरचेहि नवस आहेत. परंतु आमचे जाणें घडत नाही. आम्ही परस्वाधीन आहो. हा शब्द आम्हाकडे नाही. आम्ही माजोरीपणा करीत नाही. आमचें बरें होईल तेव्हां डोईचे वाटेनें चालत येऊ, आसे बाईनी सांगितले.

—

५

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Anandibai's doings are here reported to Nana at Poona. They are an interesting reading.*

---

*No. 4]* *[23-5-1787*

पौ छ १६ साबान सु॥
समान वैशाख.

**श्री रू**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ ९ साबानपावेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत राजश्री बाबासाहेब यास ज्वर फार येत असतो. आज पांच दिवस जाले. औषधे काढे फिरकोळ चालली आहेत. सर्दीचा ज्वर आहे. लौकरच आरोग्य होईल. रा। राघोपंत ठोसर यास जाऊन फार दिवस जालेत. येथे असल्यास बाबासाहेब अरवली (?) फार

करितात, यास्तव त्याची काय सोय करावयाची असेल ते करून देऊन त्यास कोपरगावी लवकर रवाना करावे. राघोपंत ठोसर बाबा (सा) हेबाचे प्रकृतीस वाकफ आहेत. तेहि थोडीबहुत औषधे जाणतात. त्यास आणवावे म्हणौन श्रीमंत मातुश्री बाईसाहेबानीं आज्ञा केली, त्यावरून लि॥ आहे. बहुत काय लिहिणें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole asks Raghopant Thosar to be sent back and reports that Bajirao was getting fever.*

---

*No. 5*] [*9-6-1787*

पौ छ १० रमजान

सु॥ समान.

## श्री.

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसां नमस्कार विज्ञापना. ता छ २२ साबानपर्यंत यथास्तित असें विशेष. श्रीमंत मातुश्री आनंदीबाई यांचे बोलण्यातील आन्वय दिनचर्येचे भाव येणेप्रो.

छ १४ साबान.

१ सावित्रीबाईकडून लक्ष्मीवृत पुत्रार्थ करणार.

१ भानूच्या कुलामध्ये नाना मात्र चौकस. बार्कांचे सारे भले आहेत.

१ आमृतराव यांणी स्वप्न पाहिले की माहापुरूष गोसावी पाहिला. बाईचे दर्शन घेतलें. चांगले आहे बोलिली.

---
३

छ १६ साबान.

१ आंनाजी फांटागरा भगत जेऊराहून बलाविला होता. त्यास आपल्या बंगपणाविसी विचारणेच नलगें आसें म्हणून विचारिलें नाही.

छ १५ साबान.

१ आश्रित जोसी आहेत त्यास सांगितलें की जन्मपत्रिका पाहून आंतकाळी योग कसे आहेत ते पहावें.

१ पुण्याहून बाण आले, गैरउपयोगी आले. लांबून आले आसतां वाईट. सारांश आस्ता नाहीं हेच खरें.

१ बाजीराव यांचे स्वरूप पाहून आमृतराव तेजस्वी दिसतात. तपश्वी ब्राम्हचर्य आशी रीत आहे. परंतु गुणाग्राह कोणी नाही.

१ थोर बाण आला आहे त्यास देवालय बांधणार. त्यास पुण्याची

१ पेंचाविसी मुक्तता होण्याचा उद्योग करीतच असावें. जे होणे ते होऊ. रूबरू दर्शन होते म्हणजे चांगले, परंतु नष्टचर्य सरले नाहीं.

—

२

छ १८ साबान.

१ वैराग्य होण्याची कारणे पदोपदी आहेत, परंतु निश्चय राहात नाही.

१ येथे सभोंवते गावी थोरथोर ब्राम्हण आहेत. चौकसीमुले बला-वीत नाही.

१ स्वसत्तेत जन्म गेला, यामुलें पर-स्वाधीनता साहवत नाही. भावीस उपाय नाही.

१ पूर्वजन्मी तपश्चर्या केली, तेव्हां कोणासी द्वेष केले, त्याचे फल उगऊन घेतात. बरें, पुढें राहाणार नाहीं.

१ धारेत होतो तेव्हा मुलाबालावरी चढाई करावयास आशंका आली नाही. मर्द माणूस याजकरिता लढाई केली.

१ अमृतराव याची (याची) शरीर प्रकृत ठीक नवती त्यास परवानगी येईल कीं नाहीं ? सारांश आमचे हातून पुण्यकर्मे होऊ देत नाही.

—

४

छ १७ साबान.

१ पत्रिका पाहावयाविसी जोशांस सांगितलें त्याजवरून पाहिली. त्यास पांसष्ट वर्षे आवधी आहेसे दिसते.

१ अमृतराव बोलिले की कोणी पेशजी सांगितले कीं कासीयात्रा होईल. त्यास फार दिवस जाले. पुढें पाहावे.

—

२

छ १९ साबान.

१ पेशजी श्रीमंत होते तेव्हांची तऱ्हा व हाली बारभाईनी येथे ठेविले याची तऱ्हा बराबरच आहे. पूर्वीचे स्मरण येणेकरून वारंवार होतें. आम्हास दोनी बराबरच आहेत. मोठ्यामोठ्या जागा केंदूर पाबल व जुनर चांगले बागाइती गावें आसें टाकून आम्हास आशा कुग्रामात ठेविले आहे. वेलेस काही लागले तर सत्ता पुरूषास मिलणार नाहीं.

—

२

८

श्री २

पु॥ सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. बोलण्यातील भाव—

छ १८ साबान.

मेहेनत कमी जाली. सुखांत आहां. किमपि काम नाही. नित्यांत मेहेनत आसती म्हणजे हालेखूद[1] आसता ते ईश्वरास वाहिलें.

१ आम्ही केवढीं माणसें होतो आणि कोणत्या योग्यतेस आलो. आन्याय कोणी पाहात नाही. उगेच निःकारण कैदेत ठेविले आहे. त्यास आमचेणे प्रयत्न होणे समजत आहे. धनी आसते म्हणजे ताकत नवती. आम्ही निर्बल जालो ते समई गांजितात.

छ २० साबान. बालाजी विश्वनाथ फाटक होते तेव्हा घर बांधिलें, त्याचे अर्धेच काम राहिले. हाली काम चालविले. कोठी करणार, ते पाहावयास गेली तेथे बोलणी :

१ सिताब खेड्यास आइतेच धोंडे येथे आणावयाकरितांच ठेविले होतें.

१ पेठेस कौल दिल्हा तर बहुत घरे बांधतील. परंतु येथे बंदोबस्त आहे की कोणी पाहिले तर डोले काढावयास सलया हांती घेतल्यांच आहेत.

१ काही तरी काम सांगितलें तर होत नाही त्यापक्षी सांगत नाही. आम्ही सांगू ते दिवसी तुम्ही आसाल की नाही हें कलेना.

१ राज्यास ममता आसली तर यथास्तित चालत नाही याचा आनुभव आम्ही घेतला.

१ माहायात्रेस जाण्याची हौस आहे. परंतु आमचे हातून धर्म होऊ देत नाही. धर्म जाल्यास चल होईल. पदोपदी आम्हास जपतात.

—

६

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Doings of Anandibai reported to Nana at Poona.*

---

१ टीक.

No. 6] [17-6-1787

श्री.

यादी आजमास मु॥ कोपरगांव सु॥ समान समानीन मया व अलफ. पेस्तर साल च्यातुर्मासाची बेगमी ई॥ छ १ रमजान जेष्टमास ता। सफर अखेर कार्तिकमास पावेतो खर्चास बा। नेमणूक सालिना— रुपये.

| | | |
|---|---|---|
| १००००० | डौलाकडे नेमणूक | रुपये. |
| १००००० | हुजूर विल्हेकडे नेमणूक | रुपये. |
| २००००० | | |

पौ यकमाही रुा। १७००० प्रो साहामाही आजमासें नेमणूक पो करार १०००००,

यक लाख रुपयाची तरतूद होऊन यैवज वैशाख अखेर पावता जाला पाहिजे. पुढे पर्जन्याचे दिवसच आले. हा यैवज आजपावेतो पावला असावा; परंतु मर्जीस भिऊन राहिलों. अद्यापहि एक महिन्याचे आंत पावल्यास सोय आहे.

¶*Provision of funds for Anandibai's expenses is requested in this letter : it is twenty thousand rupees for 6 months.*

---

No. 7] [23-9-1787

पौ छ १६ जिल्हेज सुा। समान.

श्री.

सेवेसी केसो महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. ता। छ १० जिल्हेज मो कोपरगांव वर्तमान यथास्थित असे विशेष. फरकाबादेहून लाखोटे इंग्रजाकडील लाखोटे चवकीवर आले, ते स्वामीकडेस पाठविले आहेत; व इकडील वर्तमान तरी श्रीमंत उभयतां खुशाल आहेत व श्रीमंत मातुश्रीबाई-साहेब याची मरजी ठीक आहे. पेशजी देवास देवारा पाहिजे याजकरितां सेवेसी विनंती लिहिली होती; परंतु स्वामीची आज्ञा कांही आली नाहीं. वरकड वर्तमान बारीक मोठे राजश्री गोविंदपंत यांणी सर्व लिहिले आहे, त्यावरून सेवेसी कलो येईल. नगरदेवळेकर अनपूर्णाबाई याणी लढाईचा प्रसंग माडिला आहे. आणीक लोक व पागेचे लोक पाठविले. सेवेसी कलावे म्हणून विनंती लिहिली असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Keso Mahadeo reports to Poona news of Anandibai and children's health.*

*No. 8*] [*28-9-1787*

पैा छ २२ जिल्हेज
सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी आपाजी राम सहस्त्रबुध्ये कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ १९ जिल्हेजपावेतों स्वामीचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. सौ भागिर्थीबाई साहेब यांची स्वारी कोपरगांवी दाखल जाहालियावर गाडदी यांस निरोप दिल्हा. फर्काबादेहून इंग्रेजाचीं पत्रे घेऊन कासीद आला तो हली गाडदी दिमत सैद आहमद याजबोार स्वामीकडे रवाना केला आहे. पावलियाचे उत्तर देवावे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Appaji Ram reports arrival of Bhagirthibai at Kopargam.*

---

*No. 9*] [*2-10-1787*

पौ छ २९ जिल्हेज सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी आपाजी राम सहस्त्रबुध्ये कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ १९ जिल्हेजपावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. आज प्रात:काळापासून श्रीगंगेस कपिलाशष्टीमुळें यात्रा दोन च्यार हजार आली. त्यास बेटांत श्रीशुक्रेश्वराचे दर्शनास येण्याविसीं चौकीवरून कारकून बसऊन येऊ दिल्ही. महापर्व याजकरितां दोन प्रहर जागा जागा वाड्या भोवत्या जाजती चौक्या ठेऊन मोकलीक केली होती. श्रीमंत मातुश्री बाईसाहेब आपले धर्मादायाचे नेमणुकेतील रुपये राजश्री अमृतराव याजकडे देऊन बरोबर धर्म दानधर्म करवीत आहेत. वरकड बोलणे नेहमी वारभाईसिवाय भाषण नाहीं. भविषोत्तर पुराण श्रवण करीत आहेत. त्यांत नाना प्रकारची व्रते निघतात. त्याचा उपक्रम करावयाविसीं करीत आहेत. नेमणुकी धर्मादाय जेथील ज्या व्रतास आहे त्यांत कमी जाजती करून कांही कसर काढून दुसरें व्रत नवें करावें. राजश्री अमृतराव याजकडे आपले नेमणुकीपैकीं च्यार रुपये देत असतात. सारांश श्रीमंत रा॥ बाजीराव याचे बरोबर कांहीं जाजतीच असावें असा मानस. श्री सौ भागिर्थीबाई याजसमागमे आजी व धोंडभट भागवत याचे चुलत बंधु वैज्यनाथभट व येक कारकून ब्राम्हणसुधां वाड्यांत राहिली आहेत. च्यार दिवस गंगेस उतार जाहलियापासून मातुश्री श्रीकचेश्वरी देवदर्शनास जात येत आहेत. सायंकाळी नित्य श्रीशुक्रेश्वरी नाटकशाळा आणून गावीत आहेत. देवाची पूजा व आरती करून एक घटका रात्रीस

वाड्यांत जातात याप्रमाणें चालत आहे. सवासणी बायका कोपरगांवच्या वगैरे मिळोन नित्य एकदोन, सिवाये व्रत वगैरे उगेच नाव सांगोन दहापांच दोनच्यार दिवसीं भोज्यनास आणवीत आहेत. नेमणुकेसिवाये खर्च लागतो याचा तपसीलवार राजश्री गोविंदपंत गोडबोले लिहितच असतील. चौकी पाहारे याचे पुर्ववत प्रमाणे आहे. वरकंड बोलण्यांतील भाव नाना प्रकारचे बोलत असावे. जसा प्रसंग तैसे भाशण करीत आहेत. बोलण्यास धर कांहीं नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Appaji Ram reports extravagant expenses which Anandibai incurs at Kopargam.*

---

*No. 10*] [*4-10-1787*

**श्री.**

यादी कपिलाशष्टी नि॥ धर्मादाय वि॥ मातुश्री आनंदीबाई यांजकडें सु॥ समान समानीन मयां व अलफ.

छ २० जिल्हेज शष्टीचे दिवसी गोप्रदाने जाली, त्यास खर्च रु. २९॥. वि। राजश्री आमृतराव देणे. रघुनाथ भट वैशंपायन.

९ दक्षणा पुतल्या, तार्टे २ दर ४॥
१ आलंकारार्थ,
•॥• गाईस दक्षणा,
३८— सोने श्रृंगे वजन, ८२। दर १६।
४ खूर रुप्याचे,
१। धोत्रजोडा १,
८≡ वाटी कांशाची,
•॥• आर्घ्यास,
८= पाठ ताब्याची,
•।• घाट पितली १,
८॥ गाईची किंमत,
१८= खारवा गाईस १,

---

२९॥

छ २१ जिल्हेज

५३ गोप्रदान देणे देवभट सोहनी वि॥ बाई

९८= पुतल्या ताटे २ तील पात्रास व घृतपात्रास
१५ मोहर नाणे १ दक्षणा
४ तीलपात्र व घृतपात्रास दक्षणा
१ आलंकारार्थ
५ भूमिनिष्क्रय
•॥• आरघ्यास
१ गाईस दक्षणा
•॥• ब्राह्मणास दक्षणा
•॥• पाद्यास,
३८— सोने श्रृंगे वजन ८=। दर १६।
४ खूर रुप्याचे
१। धोत्रजोडा १
८≡ वाटी काशाची

२८।।।= वि।। बाई देणे गोपालभट घाणेकर

४।। दक्षणा पुतली तांट
२ तीलपात्रास दक्षणा
२ घृतपात्रास दक्षणा
१ आलंकारार्थ
॥ आर्घ्यास
॥ गाईस दक्षणा
॥ ब्राह्मणास दक्षणा
॥ पाद्यास
३८– सोने श्रृंगे वजन ८=। दर १६।
४ खूर रुप्याचे
१। धोत्रजोडा १
८≡ वाटी कांशाची
८= पाठ ताब्याची
। घाट पितली
८ गाईची किंमत
।= वाटी पितली
८= तबकडी तांबे

२८।।।=

५८।=

२४६।≡।। छ २१ रोज

३०४।।।–।।

पैकी नेमणूक रुा ११०
बाकी जाजती रुा १९४।।।–।।

८= पाठ ताब्याची
८= तबकडी तांबे
। घाट पितली
।= वाटी पितली
७ गाईची किमत

५३

२९ वि।। राजश्री आमृतराव याणी गोप्रदान देणे रंगभट आग्निहोत्री पुणतांबकर

४।। पुतली ताट १
॥ आरघ्यास
॥ गाईस दक्षणा
२ तीलपात्र व घृतपात्रास दक्षणा
१ आलंकारार्थ

८।।

३८– सोने श्रृंगे वजन ८२। दर १६।
४ खूर रुप्याचे
१। धोत्रजोडा १
८= पाठ ताब्याची
। वाटी काशाची
।= वाटी पितली
८= तबकडी तांबे
।– घाट पितली
७ गाईची किंमत

२९

२ पु॥ याद कपिलाशष्टी नि॥ धर्मादाय वि॥ मातुश्री आनंदीबाई याजकडील सु॥ समान समानीन मयां व अलफ. नेमणुकें प्रा॥ खर्च

जाला रु॥ छ २१ जिल्हेज

८५ राजश्री बाजीराव यांजकडे
१५ राजश्री आमृतराव यांजकडे
२० राजश्री चिमाजी आपा
४० सौ॥ भागिर्थीबाई
१९ सौ॥ सावित्रीबाई

१७०

३२ व्यतिपातानि॥ देणे माहादेवभट वोझे, बाईचे माहेरचे वस्ती पुणें यांस दिल्हा.

४५ देणे, सुभाभट तेलंग याणी शुक्रेश्वरास प्रदक्षणा घातल्या ११००० व बाईनी विष्णुसहश्रनाम आवर्ती सहश्र व सिवसहश्रनाम सहश्रआवर्ती व तत्प्रीत्यर्थ गोप्रदान यो॥ दक्षणा दिल्ही ते.

९१।≡॥ कपिलाषष्टीचे व्रत बाईनी व आमृतराव याणी केलें त्यास खर्च रु॥

४३।॥. सोने सूर्यप्रतिमा २ यो॥ वजन २॥= दर १६।.

५८= कित्ता प्रतिमा लाहान सूर्याच्या ३ वजन ॰।॰॥ दर १६।.

४ प्रतिमा रुपे २ रुपे भार

१॥ प्रथम पूजेस तीन दिवस दक्षणा दर ॰॥॰

४ पीठदान आमृतराव याकडील

४ होमास ब्राह्मण आ॥ ८ दर ॰॥॰

१९ प्रतिमा दान दिल्ही त्यास दक्षणा
४ ऋत्विज शंकरभट वेलणकर
१॥ आग्नीस दक्षणा दर ·॥·
६॥–॥ देवास दोन वेळ पूजेस दक्षणा
 ३ वि॥ बाई
 २ वि। खासा
 १ वि॥ आमृतराव
 ·॥· वि॥ सावित्रीबाई
 ८–॥ किता
६॥–॥
२ पीठदान बाजीराव याजकडील

९१।≡॥

२४६।≡॥

¶*This list of Anandibai's charities on the Kapila-Shasthi day will be read with interest by those who care to know the religious observances of those days.*

---

*No. 11*] [*8-10-1787*

पैा छ १ मोहरम मु॥ समान.

**श्री.**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ २९ जिल्हेजपावेतो क्षेम असे विशेष. कपिलाशष्टीनिमित्य धर्मादायास तीनसे दाहा रुपयांची नेमणूक करून पाठविली. याजवर श्रीमंत मातुश्रीबाईसाहेब यानी आपले आठशा रुपयापैकी दोनसे रु॥ खर्च केले. त्यांची याद पाठविली आहे. येथे किरकोळ अधिक उणे कर्तव्य ते करावे लागते. ते करून जाता काही करावे न करावे येैसे म्हणावे लागते. थोड्याचाहि विशय, परतु समजोन केले पाहिजे. त्यांत येकादी गोष्ट थोड्याचीच परतु विचारून करतां विलंब लागला अथवा काही जाबसाल पडला मणजे तेथे धनीपणाचे बोलणे निघोन

कोणकोणते वर्णोच्यार ते काय ल्याहावे. दोनी लक्षे तीव्रद्रिष्टीची; त्यांत निमित्य मात्र द्रिष्टीस पडले असतां क्षमा येकीकडूनहि व्हावयाची नाही. दोनी मर्ज्या संपादून आपल्यास चांगले लौकीक सांभाळणे. इतकी कारणे सांभाळणे तो ईस्वर आहे. विशेष पाहाता काही अवघड दिसत नाही. स्वामींचे आज्ञेकरून सर्व निर्वाह होत आहे. वो राजश्री लक्ष्मणभट उपाध्ये याणी मजला पत्र पाठविले आहे की, श्रीमंत मातुश्रींच्या बहिणी अथवा कोणी भेटावयास बोलावणे. याविसीं आज्ञा जाल्यास बलावीत जावी. यास्तव स्वामीस विनंतीपत्र लि॥ आहे. जसे उपाध्ये याजवळ बोलणे जाले असेल ते आज्ञा जाली, म्हणजे त्याप्रमाणें करतां येईल. हली उपाध्ये यास बाई साहेबानीं पत्र पाठविले आहे, त्याची नक्कल पाठविली आहे, त्यावरून ध्यानास येईल. श्रीमंत राजश्री बाबासाहेब याचे धार्य[1] चालते करावयाविसीं लेहून पाठऊन उत्तर आणावे म्हणून बाई साहे(बा)ची आज्ञा जाली. याचे उत्तर येईल त्याप्रमाणें विनंती करीन. शहराहून ऐवज खर्चास देविला तो लौकर पावला नाहीं म्हणून पंचवीस हजार रुपयांच्या हुंड्या पाठविल्या त्या पावल्या. ऐवज पावल्यावर पावती लिहून येईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Letter from Govind Krishna to Nana Fadnis requesting orders on certain expenses of Anandibai.*

---

*No. 12*] [*9-10-1787*

पैा छ १ मोहरम सुा समान.

**श्री.**

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसां नमस्कार विज्ञापना. ताा. २६ जिल्हेजपर्यंत मुकाम कोपरगांव येथें आसें विशेष. श्रीमंत मातुश्री आनंदीबाई यांचे बोलण्याचे भाव व दिनचर्येचें वर्तमान बितपसील.

छ २७ जिलकाद सोमवार

१ त्रितीय प्रहरीं स्वारी बाजीराव व अमृतराव कचेश्वरास देवदर्शनास गेले होते.

छ २८ जिलकाद दोन प्रहरीं अस्पर्श जाली. त्रितीय प्रहरीं वाड्यांतील बागांत बसली होती, आणि बोलिली कीं श्री कचेश्वरीं बाग कराव-

---

१ धार्य म्हणजे काय ? अग्निहोत्रापैकीं कांहीं भाग कीं काय ?.

१ सायंकाळीं शुक्रेश्वरास अग्निहोत्री यांजकडे बाई गेली होती. येथें आमच्या बंदोबस्तामुळें कोणी येत नाहीं. इतके मात्र आम्ही केले असें बोलिली.

—

२

छ २९ जिलकाद. अस्पर्शपणा-मध्यें वेळ जात नाहीं, म्हणोन प्रातःकाळीं बागांत गेली होती. कलम १

छ १ जिल्हेज.

१ हरतालिकेचे उद्यापन सावित्रीबाई यांणी केले.

१ बाईनीं हरतालिकाव्रत नूतन निघाले ते केले.

—

२

छ ३ जिल्हेज.

१ श्रीरामचंद्रानें अवतार धरिला परंतु कर्म संनिधच होतें. रावणादिकाच्या पीडा जाल्या परंतु शेवटीं रामचंद्र याणे भूभार काढिला. तस्मात त्याची सता हेंच खरें.

१ व्रतें वैकल्यें करावी. हेच दिवस आहेत. कोठे लढाई व कामकाज किंवा राज्याची काळजी किमपि कारभारी याणी आम्हांस ठेविली नाहीं. आमचे मुखावर आहेत.

१ श्रीगणेशचतुर्थी नि॥ प्रतिवर्षी अमृतराव श्रावणशुध चतुर्थीपासून नक्त करून पंक्तीस ब्राम्हण.

यास जागा चांगली आहे. आम्हा जवळ साहित्य आहे, परंतु धनीपणा मात्र नाहीं यामुळें कसें होतें असें बोलणे जालें.

छ ३० जिलकाद.

१ बाई प्रातःकाळीं बागांत गेली होती.

१ श्रावण मासची दक्षणा मोघम ऐवज पाठऊन येथें वाटवावे ते नाहीं. पाणके इत्यादिक नावनिसी होऊन आंख घालून पाठवितात यांत विशेष काय?

—

२

छ २ जिल्हेज गणेश चतुर्थी

१ श्रीगणेशस्थापन प्रहर दिवसास जालें.

१ दोन प्रहरीं बाई दर्शनास आली होती आणि बोलिली कीं प्रतिवर्षी नवी तऱ्हा असावी तें नाहीं.

१ भागिर्थीबाई ताईसाहेब येतात म्हणून ऐकिले, परंतु येथून थोडी माणूस गेली नाही. तेव्हां तेथे तरी कसी मिळतील. येथून जातील तेव्हां येतील.

छ ४ जिल्हेज. हरतालिकेनिमित्य वाड्यांत हळदकूंकू जाले. कोपरगांवच्या वगैरे बायका आल्या होत्या. कलम १

छ ९ जिल्हेज. चिमाजीआपा दैव-
वान म्हणून अगोधरच साहेब कैलास-
वासी आणि आम्ही पेचांत.

"अपुरें"

(यापुढें आणखी तीन बंद आहेत पण मिळाले नाहींत)

¶*A week's programme of Anandibai's life is reported in this paper to Poona. It shews how the lady bewailed her sad lot.*

---

*No. 13]* *[10-10-1787*

पौ छ १ मोहरम सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी आपाजी राम सहस्त्रबुध्ये कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता छ २७ जिल्हेजपावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनी छ १७ जिल्हेजचे पत्र पाठविले तें छ २९ रोजी पावलें. हिकडील वर्तमान श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब याची स्वारी गंगा प्रदक्षणा व सिताव्रखेडे व श्रीकचेश्वरी जांत येत आहे. पंधरा दिवसा आलिकडे राजश्री अमृतराव स्वारीसमागमें वगैरे जवळ असलियावर बाबासाहेब चवरी आपणावर वारू देत नाही. याचे कारण पुसिले कीं, हे नवेच काय ? तेव्हां आज्ञा जाहली कीं वडिलाची मर्जी अमृतराव समागमें असतां एकंदर खिजमतगार याणी चवरी बो घेऊन येऊ नये. याप्रमाणें ताकीद करीत आहेत. घेऊन गेलिया रागे येतात. श्रीमंत मातुश्रीबाईनी उपाध्ये यास पत्र लिहून पाठविले आहे. त्याची नकल स्वामीकडे राजश्री गोविंदपंत गोडबोले याणी करून पाठविली आहे; त्यावरून सेवेसी ध्यानास येईल. इकडे पर्ज्यन्य नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Letter of Appaji Ram to Nana Fadnis informing him that Bajirao does not allow the* Chowri *to be waved over him when he is in company with his elder brother Amritrao.*

No. 14] [13-10-1787

पौ छ १ मोहरम

सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी केसो माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ २६ जिल्हेज पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामींनी आज्ञापत्र पाठविले ते पावले. पत्री आज्ञा की लाखोटे इंग्रजाचे वकिलाचे होते ते वकिलाकडे दिल्हे व जासूद येथे आल्यावर त्याजकडेस जाईल म्हणोन व नगर-देवलेकर पवार याची समजुत पडत आहे; मागाहून लिहून पाठऊ; त्याप्रो करावे म्हणोन आज्ञा. त्यास राजश्री रामाजीपंत नगरदेवले येथे गेले आहेत. त्याचे पत्र आले की गाडदी वाड्यात होते ते बाहेर काढून दिल्हे आहेत. इतके वर्तमान त्याणी लि॥ होते त्यावरून सेवेसी लि॥ आहे. पुढे तिकडील वर्तमान येईल त्याप्रमाणे सेवेसी लिहीन. येथील वर्तमान श्रीमंताची प्रकृत येथास्थित आहे व मातुश्री बाईची मर्जी बरीच आहे. वरकड वर्तमान राजश्री गोविंदपंतानी लि॥ आहे त्यावरून कलले. लागवडाविसी विनंती वारंवार लिहितो; त्यास घोड्यास सरंजाम केला पाहिजे याविसी जसी आज्ञा येईल त्याप्रो करीन. का। लासूर मोगलाकडेस होते. तेथील जाहागीरदारहि पेशजीच मेला हाली त्याची श्री होती तेहि मृत्य पावली आहे. त्यास सरकारात गाव तूर्त ठेवावयाचा असिलियासी आज्ञा आली तरी तेथील बंदोबस्त करीन. त्याजला आता नव्या सनदा आल्या पाहिजेत, याजकारिता आज्ञा आलियासी बंदोबस्त करितो. का। धदरफाल येथील मामलत येक ग्रहस्त सालमजकुरापासून मक्तेयाने करीत आहे. सात साडे सात परियेत मागील जमा असेल त्याजवर चढ देत आहे. स्वामीची आज्ञा जसी येईल त्याप्रमाणे करीन. त्यास आज्ञा जाहाली पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Keso Mahadeo reports to Nana among other matters the well-being of Anandibai and her sons.*

---

No. 15] [16-10-1787

पौ छ ७ मोहरम

सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी विज्ञापना. ता। छ ४ मोहरम पावेतो क्षेम असे विशेष. कोपरगावी दसरियास पोशाख वगैरे सरदार लोक यास वस्त्रे पाठवावयाची त्याची रवानगी

जाली असेल. वरकड किरकोळ कारखानेयांत सामान सरंजाम नवा करावयाचा तो सालाबादप्रो करितो. श्रीमंत राजश्री बाबासाहेब यांस पालखी साल गु॥ पाठविली. ते समई श्रीमंत राजश्री अमृतराव यास पाठविली नाही, यास्तव बाबासाहेब पालखीत बसत नवते. साल मजकुरी पालख्या खाशास पाठवावयाच्या असतील त्या पाठविल्या पाहिजेत. बहूत काय लिहावे ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Nana Fadnis is asked from Kopargaum to send clothes for the Dassera and the Palkhis for Bajirao and Amritrao.*

---

*No. 16*] [*16-10-1787*

पौ छ ७ मोहरम

सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ ४ मोहरम पावेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत मातुश्री आनंदीबाईसाहेब याणी पत्रे ल्याहावयासी आज्ञा केली. कलमे—

भारताचे पुस्तक सरकारचे मागे बहूत प्रती मेळऊन शोधून ठीक केले आहे, ते श्रवणास पाहिजे. येथे पुस्तक आहे तो त्रुटित ग्रंथ आहे. यास्तव ते पुस्तक आल्याने श्रवणाचे उपयोगी पडून दुसरी प्रत त्याजवरून नीट करावयास येईल. यास्तव लेहून ते पुस्तक आणवावे. कलम १

श्रीमंत राजश्री अमृतराव कार्तिके पूर्णिमेस वृषोत्सर्ग करणार. त्यास सर

१ गोऱ्हा नीलवर्ण
४ कालवडी
---
५

पाच सोडून द्यावी. यास खर्च त्याचा यैवज आठसे येकण्याणव रुो राा कृष्णाजी जनार्दन याजवळ आहे, त्यापैकी देणार. पितृकामार्थ करावयाचा. कलम.

दोन कलमे लि॥ आहेत. याची आज्ञा होईल त्याप्रो विनंती करीन. याखेरीज रामचंद्र गणेश याचे पुस्तक मोक्षधर्माचे मागे श्रीमंत कैलासवासी दादासाहेब याणी आणिले होते ते तसेच राहिले. यास्तव हालीं त्याचे घरी

पावते करावयासाठी उपाध्याकडे पाठविले आहे. त्याणी पावते करावे, व भागवताचे पारायण करावयाचे यास्तव उपाध्याचे पुस्तक आणविले आहे. त्या पत्राची नकल पाठविली आहे, पावेल. बहुत काय लिहावे? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna to Nana Fadnis with reference to Anandibai asking for a copy of the Mahabharat containing the revised and corrected text after consulting many copies.*

---

*No. 17*] [*16-10-1787*

पो छ ७ मोहरम सु॥ समान.

**श्री**

सेवेसी केसो महादेव कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. ता छ ४ मोहरमपरियेत वर्तमान यथास्थित असे विशेष. वाघोलीकर जाधव संभाजी जाधव व मलोजी जाधव हे उभयेता पेशजी निरोप घेऊन गेले त्याजला एक वर्ष जाहले. स्वामीस विनंतीहि पेशजी लिहिले. त्यास आज्ञा जाहली कीं ताकीद जाहली आहे, परंतु अद्यापपरियेत येत नाहीं. येथे नेमणुक दीडसे असावे. त्यास येथें चाकरीस पाऊणसे पर्यंत आहेत. येथें आम्ही बहुत ताकीद त्याचे कारभारी यासी ताकीद करितों, परंतु ऐकत नाहीं. स्वामीसहि विनंती लिहितों. पतकात खासे असावे ते काहीच नाहीं. सेखमिराहि जाऊन तेथे राहिले आहेत. त्याचे चुलते आले परंतु खाशांनी असावें ते नाहींत. त्यास स्वामी मागती रागे भरतील कीं लिहिले कां नाहीं? यास येथील चाकरी नाजूक आहे. परंतु आपले लोकात सरदारांनी असावें ते कोणी रहात नाहीं. येविसी विनंती स्वामीस केली असे. आज्ञा येईल त्याप्रो वर्तणूक करीन. रा बलवंतराव कदमहि नाहींत. त्याजलाहि स्वामीनीं लाऊन देवावयाची आज्ञा केली पाहिजे. बहुत काय लिहिणे? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Keso Mahadeo informs Nana Fadnis that Sambhaji and Maloji Jadhao of Wagholi (belonging to Pilaji Jadhao's family), Shekmira and Balavantrao Kadam, who have been posted with their following to keep guard at Kopargam, do not attend personally. They should be ordered to be there in person.*

No. 18] [16-10-1787

पौ छ ७ मोहरम सु॥ समान.

श्री

सेवेसी केसो माहादेव कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. ता। छ ४ मोहरम पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीकडून अज्ञापत्र यत नाही, त्यास आज्ञा जाहाली पाहिजे. यानंतर हिंकडील वर्तमान तर श्रीमत मातुश्री बाईनी आज्ञा केली की माहाभारथाची पोथी व भागवताची पोथी येथे आहे. परंतु संकलीत आहे. त्यास सरकारात ग्रंथ दोनी आहेत. त्यास येविसीचें आपणास ल्याहावयास सागितले आहे. त्यावरून विनंती लि॥ आहे. तर पुस्तके आलियास येथे प्रत करून घेऊन मागती पाठऊन देऊ म्हणौन सागितले. व राजश्री अमृतराव याजकडून कार्तिक मासी वसोछोर्ग[१] करावयाचे बाईचे मानस आहे, व आपणास ल्याहावयास सागितले आहे, त्यावरून सेवेसी विनंती लिहिली आहे. जसी आज्ञा येईल त्याप्रो विनंती करीन. लागवडाविसी विनतीपत्रे पाठवीत गेलो. परतु अज्ञा येत नाही. त्यास येविसीची अज्ञा व बारगिराचे कापडाविसीचीहि अज्ञा जाहाली पाहिजे. दसरा सनिध आला आहे. सेवेसी श्रृत होय. बहूत काय ल्याहावे हे विज्ञापना.

¶*Keso Mahadeo to Nana Fadnis asking him to send the Mahabharat and the Bhagawat for the use of Anandibai.*

---

No. 19] [16-10-1787

पौ छ ७ मोहरम सु॥ समान

श्री.

शेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ ४ मोहरमपर्यंत मु॥ कोपरगांव येथें आसें विशेष. दिनचर्येचें वर्तमान व श्रीमंत मातुश्री आनंदीबाई यांचे बोलण्यातील भाव.

छ २७ जिल्हेज. येथें आम्हीं काम सांगतो त्याविसी पुण्यास लिहिले म्हणजे हिसका पडतो, आणि येथेहि येकादी गोष्ट केली तर पुणेकर

छ १ मोहरम. पूर्वी लग्नामध्ये पंचवटीहून श्रीमंत मातुश्रीबाईकडून मनुबाई म्हातारी आली होती. मागती हाली आली. मुलाबालाचा समाचार

१ गाईचें वासरूं देवास सोडणें; किंवा दान देणें.

काहींच म्हणत नाही. तस्मांत यांचे संगनमत्त आहे आसें दिसतें. च्यार वर्षे अनुभव आला, आणि आजूनहि समजेना, मग काय ? आसें बोलिली.
कलम १

छ २८ जिल्हेज. गोविंद कृष्ण व आपाजी राम वगैरे जवलचें ब्राह्मण मंडली चांगले ग्रहस्त आहेत. परंतु आमचे दैव वाईट म्हणोन आमचे त्यांस व त्यांचे आम्हास चांगले वाटत नाही. तस्मांत दैव योग हेच खरें.
कलम १

मनूबाईस जाते समई निरोप सांगितला.

१ सर्व खुशाल आहों. तुमच्या व कारभान्याच्या अनुमताचे बंदोबस्तानें खुशाल आहों. वरकड इतर गोष्टी सांगू नये.

१ चासेस सांगावें कीं ताईसाहेबाचा वंश मात्र खुशाल आहे. तुमच्या डोल्या देखत पराक्रमी होतील कीं काय कलेना.

१ पुण्यात गेल्यावर गोदूबाईस नमस्कार सांगावा. रामचंद्रपंत गोरे जुने आहेत. त्यास मात्र (न ?) नमस्कार सांगावा. वरकड नवे आहेत.

पाहून येणे म्हणोन बाईचे आज्ञेने आली होती. तीसी बोलणें—

१ कसेहि जाले तरी तिकडील माणूस भेटले म्हणजे समाचार पुसावा असे वाटते. त्यांसहि असेच वाटते. सारांश ममता निराळीच आसते.

१ येथे आम्ही बहूत संकटांत आहे. कारभारी चैन पडो देत नाहीं. साहेबांच्या आस्ती देखिल श्रीकासीस पाठवित नाहीं. मेल्यावर दावा उगवितात. आम्ही तर जिवंत आहो मग चैन कसे पडों देतील. आस्तीविसी पुण्यास लि॥. पाठऊ म्हणतात. परंतु पाठवित नाही. याप्रो वर्तमान आहे.

१ बाई माहायात्रेस किमर्थ जात नाही. गनिमाई म्हणावी तर पूर्वी ताईसाहेब गेली तेव्हां धनी होते. आतां कोण आहे. त्यापक्षी जाणें कठीण.

१ त्रितीय प्रहरी बाजीराव व आमृतराव याची स्वारी कोपरगांवाकडून संवछरास गेली. नंतर आली.

३

¶*This is an account of Anandibai's utterances during some four days. It contains many important hits and bits.*

No. 20] [17-10-1787

श्री.

पौ छ १२ मोहरम समान समानीन आस्वीन मास.

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ ९ मोहरमपावेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत मातुश्री आनंदीबाईसाहेब याचे दागिने जवाहीरखान्याकडील जडाव सुधा सौ सावित्रीबाई याजकडे वहिवाटीस पडले आहेत. परतु त्या दागिन्यातील दागिने आज पावेतो जुने मोडून नवे केले, यैसे जाले नाहीं. हाली काही किरकोल यकादा दागिना मोडून दुसरा करावा अथवा थोरला मोडून दुसरे दागिने करावे अथवा देवाच्या मुहूर्ती आहेत त्यांस लहान मोठे दागिने करून देवावर घालावे. . यास्तव दागिनेयाची घालमेल रासकर्दनोची[1] होईल येविसी आज्ञा जाली पाहिजे. जसी आज्ञा होईल येईल त्या प्रो विनंती करावी लागेल. मजला बाईसाहेबानी दागिन्याविसी विचारीले. ते समई पुणियास लेहून पाठवितो. तेथून लिहिले येईल त्याप्रो करावयास येईल म्हणून विनंती केली; ते समई मर्जीस ठीक पडिले नाही. लिा। अन्वय ध्यानास आणून आज्ञा कर्तव्य ते केली पाहिजे. बहुत काय लिहावे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. श्रीमंत राजश्री बाबासाहेबाचे लग्नांत चिमाजीआपा साहेब यास दागिने तेंथील जवाहिर पाहून करावे म्हणून बालाजीपंतास आज्ञा जाली. त्यावरून येक दोन दागिने मोडून सिरपेच तुरा कंठी चौकडा केला आहे. त्याविसी बाईसाहेब आज्ञा करितात. ते दागिने पहिले जसे होते तसे करावे. तेव्हां मी विनंती केली कीं पुणियाहून लिहून आले त्या प्रो दागिने केले आहेत. हाली आपली आज्ञा पहिले प्रो जिकडील तिकडे दागिने करून द्यावयाविसीची होत्ये. त्यास हे पुणियास लिहिल्याखेरीज करता नये. त्याजवर ते गोष्ट तसीच राहिली आहे. फिरोन विचारितील तेव्हा उतर जाले पाहिजे. याविसी आज्ञाकर्तव्य ते करावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Godbole to Nana Fadnis communicating the Bai's desire to have the old ornaments renewed.*

---

No. 21] [19-10-1787

पो छ ७ मोहरम सुाा समान.

श्री.

सेवेसी आपाजी राम सहस्त्रबुध्ये कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ताा छ ३ मोहरमपावेतो स्वामींचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित

---

१ बनावट हिशेब.

असे विशेष. साल गुा लग्नाचे समई मनुबाई गंगापुराहुन वाड्यात आली होती. तीस लुगडे वगेरे देऊन रवानगी केली असता मधेच तट्ट माणसे माघारी लाविली. याजवर स्वामीनी लिा की बारकाईने शोध करून लिा पाठवणें. त्यास हाली छ २९ जिल्हेजी तीच मनुबाई गंगापुराहून कचेश्वरी आली. तेथून श्रीशुक्रेश्वरी दर्शन घेऊन राजश्री गोविंदपंत गोडबोले याचे घरीं गेली. आणि सागो लागली की मी श्रीमंत मातोश्री बाईसाहेबापासून देवास आल्ये. आज्ञा जाहली आहे की तेथे जात्येस तरी वाड्यांत जाऊन आनंदीबाईस भेटोन मुले पाहून येणे. त्यावरुन वाड्यात जाऊ दिल्ही नाही. राहून घेऊन राजश्री गोविंदपंत याणी पत्र गंगापुरास कारभारी यास हे वर्तमान लिहून पाठविले. तेथून उतर आले की मनुबाई येथून जातेसमई पुसोन गेली. सहजात देवास जासील. वाड्यात जाऊ दिल्हिया भेटोन येणे व बाई गेलीच आहे तरी बंदोबस्ताने भेट करून देणे. यैसे पत्र गंगापुराहूनँ राजश्री गोविंदपंत यास आलें. त्या पत्रावर 'बालकृष्ण प्रभु जयति' असे आहे. त्याजवरून मनुबाईस येथे समागमे कारकून देऊन वाड्यांत श्रीमंत मातुश्री बाईची भेट करोन दिल्ही. बोलणे काही विशेष नाही. म्हातारी यात्रेस जाणार, याचे उद्योगे काही मागावयास आली असे बोलणे बोलत होती. फिरोन वाड्यात जाऊ दिल्ही नाही. स्वामींचे आज्ञेसिवाये वाड्यात जाऊ देणार नव्हतो परंतु येथे राजश्री केसोपंत व गोविंदपंत याचे विचारे जाहले, त्याप्रमाणे केले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Appaji Ram to Nana Fadnis, informing the latter of the visit of Manubai with Anandibai. The letter shews that nobody was allowed to visit Anandibai without written orders from Nana himself.*

---

*No. 22]* *[29-10-1787*

पौ छ ७ माहे सफर

मुा समान.

**श्री.**

सेवेसी केसो माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ १७ मोहरमपावेतो स्वामींचे कृपे करून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. इंग्रजाकडील जासुदाची जबानी पुण्यात लेहून घेतली. त्या जबानीत त्याणे लिहून दिल्हे की फरकाबादेहून येते समई बऱ्हाणपुरास गेलो. तेथे चउऱ्यावर कागदाची चौकसी केली. त्यास कागद वाचले नाही, म्हणून बऱ्हाणपुराहून तुम्हाकडे जासुद देऊन पाठविले. कोपरगावास दाखल जाहाल्यावर तेथे मजपासून कागद

घेऊन स्वाराबरोबर रवाना केले. मागाहून मजबरोबर पंच्यवीस गाडदी देऊन मुसक्या बांधोन पुणियास पाठविले. असे त्याणे लिहून दिल्हे. त्यावरून स्वामीनी शब्द लाऊन लिहिले की प्रथम कोपरगावी जबानी लिहून घेतली ते व पत्र पाठविले, की हा फक्त अजुरदार आहे; यास सोडावयाची आज्ञा जाहाली पाहिजे. ऐशास कोपरगावचे जबानीत व हालीचे जबानीत अंतर दिसोन आलें. तेथे चौकसी करीत असता कासिदास बराणपुराहून तुम्हाकडे पाठविला असता तुम्ही लिहिता की चौकीवर सापडला. आणि चौकसी न करिता मुसक्या बांधोन पाठविलात. याच्या मुसक्या बांधावयाचे प्रयोज्यन काय होते? इंग्रजाचा व सरकारचा स्नेह. त्याजकडील वकील येथे आहे. त्यास या गोष्टीवरून फार वाईट वाटलें त्याचे शातवन अद्यापि होत नाही. कासिदाची जबानी येथे लिहून घेतली. त्याची नकल पाठविली आहे. पाहोन उत्तर पाठवणे म्हणोन आज्ञा; त्यास कासिदाने पुण्यात जबानी लिहून दिल्ही. त्यांत सदर्भ दुसराच लिहून दिल्हा. त्याजवरून स्वामीस संशय वाटला, म्हणोन शब्द लाऊन लिहिलें. परंतु बराणपुराहून कासिदास कोपरगावी पाठवावे ऐसा तेथे कोण आहे? त्याचे पत्र अथवा माणुस या कासिदास घेऊन आला असता, तर जसा मागाहून आला तसाच पुढे जाता. कोपरगावाजवळोन माणुस बहुत करून जात नाही. ऐसे असता कोणी गेले तर त्याचा झाडा घ्यावा लागतो. या कासिदाजवळ कागद कागद+ असोन नाही बोलला. तेव्हा झाडा घेतला. मग कागद सापडले. त्या समयातच पुण्याकडील बाजार आवंई ऐकिली की इंग्रजाकडील कोणी पळोन गेला. काही गलबल जाहाली आहे. त्या कारणास्तव त्याजवळचे कागद घेऊन सरकारात पावते केले. कासिदास लागलाच पाठवावा तर जबानी करिता मागे ठेविला होता. सहजात श्रीमंत सौ भागिर्थीबाई याचे स्वारीपौ गाडदी जावयास निघाले, त्याजबरोबर पाठविला. त्यास या कासिदाच्या मुसक्या बाधावयास सागितल्या नाहीत. हे वाटेतील वर्तमान राजश्री राघोपंत गोडबोले याजकडील कारकून बरोबर होते त्यास ठाऊक असेल. बराणपुराहून आम्हाकडे पाठविल्यावर त्याचे चौकसीचे व झाड्याचे प्रयोज्यनच नाही. गोटगस्तीचे जासुदास आढलला कागदपत्र नाही म्हणून बोलला. झाडा घेतला तेव्हा सापडले म्हणून पुसतपास केली. आणि इग्रजाची आवाई त्याच दिवसी आइकिली, त्यावरून ती पत्रे सरकारात दाखल केली. इतका मजकुर आहे. त्या कासिदाने जबानी पुणेयात लेहुन दिल्हे. बराणपुरासच मुसक्या बांधोन पाठविले, तेव्हा तो काय लिहून देतो आणि पुरसीस काय करावी याचा विचार स्वामीच कर्तव्य तो केला पाहिजे.

---

+ ज्यास्त शब्द.

आम्ही आपले तर्फेने येथील चौकसी करावयाची त्या तऱ्हेने केली. परंतु इंग्रजाचे श्नेहामुळे वाकडे पडले असले तर स्वाम धनी आहेत. आम्ही तर सरकार काम साभालावे या बुधीने केले, आणि जाहाला मजकुर सेवेसी लिहिला आहे. याजवर स्वामीचेहि ध्यानात आलेच असेल. बराणपुराहोन त्यास येथे कोण कशासाठी पाठविल? कदाचित तसा पाठविला असता तर आम्ही मुसक्या बांधावयास सांगाव्या त्या कशासाठीं? तशाच तोच जबानी लिहून पुणेयात लिहून देतो, कीं बराणपुरास मुसक्या बांधिल्या तेव्हा खरे लिहितो की लबाडी लिहितो, याविसी सेवकाने काय ल्याहावयाचे आहे? कचा मजकुर ध्यानास आला पाहिजे म्हणोन तपसिले लिहिले आहे. याचा इत्यार्थ तेथे स्वामीजवल ठरोन काय आज्ञा होईल ते वंद्य आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Keso Mahadeo's report to Nana Fadnis about a British spy being detained under arrest. The affair shews how strictly the premises of Anandibai were watched.*

---

*No. 23*] [*31-10-1787*

पौ छ २९ मोहरम सु।। समान.

श्री

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ १९ मोहरमपर्यंत मुकाम कोपरगांव येथें आसें विशेष. दिनचर्येचे वर्तमान व श्रीमंत मातुश्री आनंदीबाई यांचे बोलण्यांतील भाव लिहिलें आसेत—

छ ४ मोहरम त्रितीय प्रहरीं वाड्यांत बाजीराव घोडी फेरीत होते.

छ ६ मोहरम.

१ आलिकडे बागाभाईस आम्हाकडील कालजी नाही. दक्षिणेकडील गनीम संभाळिला म्हणजे जालें. बारा वर्षे दोहींकडील वोढ होती. आज तीन वर्षे आम्हाकडील कालजी नाही यामुळें सुखांत आहेत. दुसऱ्याचा दर नाही आसा लक्ष्मीचा महिमा आहे. परंतु कुलीणास आसें करीत नाही.

छ ५ मोहरम. पहिली चाल सुनांचे आईबाप जवळ ठेवावे किंवा साहा महिन्याने भेटावयास आणावे. आलिकडे ममताच नाही यामुलें आसे होतें.

छ ७ मोहरम. वाड्यांतील बागेच्या सोप्यांत सावित्रीबाई भोजनास गेली होती. बाजीराव व भागिर्थीबाई येके जागें भोजनास बसली होती.

छ ८ मोहरम. बाई अस्पर्श जाली. प्रात:काली बागांत गेली होती.

१ पूर्वी हेच आम्हास मानीत होते. आतां त्यांसच मानावें लागतें. तस्मांत काळचर्या निराळीच आहे. कांही ईश्वर पाहात नाही. बरे इच्छा त्याची,

—

२

छ १० मोहरम.

१ त्रितीय प्रहरी स्वारी आमृतराव व आपासाहेब कोकमठाणास गेले होते.

१ सौ भागिर्थीबाईस किंचित ज्वर आला होता. कधीकधी येतो.

—

२

छ १९ मोहरम दोन प्रहरी भोजनास स्वारी कोपरगांवी पवाराचे बागात बाजीराव व अमृतराव गेले होते. तेथे आगांतुक वेलेस आला, त्यास भोजनास बोलाविलें. येत्ये समई पाहातां किंचित संशय वाटला म्हणोन निराळे पात्र मांडिलें. पंक्तीस बसविले नाही. भोजन जाल्यावर चौकसी केली तों त्यास शेंडी नव्हती. नंतर मारहाण केली तों कोष्टी आसें ठरले. नंतर—

छ ९ मोहरम. विजयादशमीस सीमाउलंघनास स्वारी पूर्वेकडे गंगा उतरून कोकमठाणचे सिवारांत गेले होते. प्रातः सर्व कारखान्याची पूजने बाजीराव याणी केलीं.

छ १२ मोहरम.

१ त्रितीय प्रहरी बाजीराव व आमृतराव कुंभारीस स्वारी देवदर्शनास गेली होती.

१ धोंड जोसी वाड्यात आश्रित आहेत त्यास बलाऊन जन्मकाळचें नाव नक्षत्र पाहून विचक्षणा होत असते.

—

२

छ १७ मोहरम इंदुवार.

१ कचेश्वरास देवदर्शनास बाजीराव त्रितिय प्रहरी गेले होते.

१ बाजीराव व आमृतराव संकटचतुर्थी मौनयुक्त करितात.

—

२

आपणास पत्र लिहिलें तेव्हां बोलिली कीं मागें पत्रें पाठविली त्याची उतरेंच आली नाही. परंतु

¶*Details of Anandibai's life at Kopargam reported to Nana.*

No. 24] [8-11-1787

पै छ २७ मोहरम सु॥ समान.

श्री.

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ १९ मोहरमपावेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत मातोश्री आनंदीबाई याणी भाऊबिजेकरिता राजश्री नारायणराव वोक यांस व सौ सावित्रीबाई याचे बंधुस वगैरे आणावयास घोडी माणसे पाठवावयास सांगितली त्यावरून पाठविली आहेत. त्याचे नावनिसीची याद आलाहिदा आहे. त्यास आमंत्रण वो राजश्री उपाध्ये करितील. भाऊबिजेस येथे आले मणजे सालाबाद सि॥ प्रो सेले पागोटी द्यावी लागतील. आठ पंधरा दिवस राहावयाचे ते राहून निरोप घेऊन रवाना होतील. बहुत काय लिहावे ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole, looking after the management of Anandibai at Kopargam, informs Nana Fadnis that she had invited Narayanrao Oke (her brother ?) and party for the Bhaubij. (11th November.)*

---

No. 25] [12-11-1787

पौ छ ११ सफर मुरसन समान.

श्री.

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ १ सफरपर्यंत मुक्काम कोपरगांव येथें आसे विशेष. दिनचर्येचे वर्तमान व श्रीमंत मातुश्री आनंदीबाई यांचे बोलण्यांतील भाव लिहिले आसत.

छ २० मोहरम.

१ तृतीय प्रहरी बाई कचेश्वरास गेली तेव्हां बाजीराव बराबर गेले होते.

१ पर्जन्यादिक दुष्काळ पडतात. त्यास आधिकारी याणी निग्रह केले पाहिजेन. आम्हाकडे आसते तर आम्ही उपापणच केलीच असती, असे बाई बोलली.

छ २१ मोहरम.

१ दोन प्रहरी बाई व भागिर्थीबाई व अपासाहेब यांची स्वारी कोकमठाणास देवदर्शनास गेली. नंतर सवछरास गेली होती. मागाहून बाजीराव व आमृतराव यांची स्वारी कोकमठाणास देवदर्शनास गेले होते.

१ इंग्रजानीं श्रीमंताची मर्जी पाहून रथ चार घोडे सुद्धा दिलहा. अशा

छ २२ मोहरम. कामिक अनुष्टानाचे फल थोडें परंतु काम होणे ते लोकर होते; परंतु परमार्थ नाहीं असे बोलत होती. कलम १

छ २३ मोहरम दोन प्रहरी बाई व बाजीराव व भागिर्थीबाई ऐसी भोजनास बागांत गेली होती, नंतर आली.

छ २६ मोहरम,

१ पूर्वी साहेबानीं अन्ना उपोषणे केली. याविसी माधवरायास दरद आला नाहीं, आपण तसेच जेवित. याची फले पावले. उपोषणानें एक दिवस वाखा जाला, तेव्हां थोरलीबाई दुरुत्तरे फार बोलली. त्याचे फल जाले. इतके सर्व करावयास सखारामबापू होता. मागें नानासाहेब असतां पांच लक्ष रुपये व तीन किल्ले या करारावर राहावे हे ठीक नव्हे, आसे बापू बोलला. पुढें अधिक जाले. आम्हाविसी निकर्ष करीत परंतु ममता असे. कसेहि जाले तरी घरचे पुरुष होते. आतां यास आमची दरद यावयाची नाहीं, असे बोलत होती.

छ २६ मोहरम,

१ बाबूराव फडणीस व त्रिंबकराव मामा हे सर्व भले नव्हते. कर्मानुरुप फले जाली. वस्ता मेलविल्या होत्या; परंतु सर्व वस्तभाव ठिकाणी राहिलीं, नाश जाला, लूटच जाली, असे बोलत होती.

—

२

छ २९ मोहरम द्वादशी.

१ दोनप्रहरी कोपरगांवचे पवांराचे बागांत भोजनास बाई व अमृतराव गेले होते.

० लंग

—

१

छ २७ मोहरम, दिपवाली प्रातःकाली अभ्यंग जाला.

छ २८ मोहरम,

१ तृतीयप्रहरी बाई कोपरगांवास देवदर्शनास गेली, नंतर कचेश्वरास गेली.

१ सायंकाली आतसबाजी वाड्यांत सोडली.

—

२

छ ३० मोहरम,

१ प्रातःकाली बाई आस्पर्श जाली.

१ दोन प्रहरी सर्व भाऊबीज मंडली भोजन जाले. नंतर पोषाख सर्वास दिल्हे.

—

२

१ तृतीयप्रहरी बाजीराव कुंभारीस देवदर्शनास स्वारी गेली होती. जाते समई खासी घोडी बोर सालस होती. वाटेनें अकस्मात पडली आणि तेव्हाच मृत्य पावली.

१ इतकी सर्व दौलत गेली तेव्हां काय केले. आपले देखत मेली हे सार्थक आहे, असे बोलली

—

४

बाईस शैत्यानें ज्वर येत असतो. छ २८ मोहरमोपासून.

भाऊबिजेस मंडली आली.

१ नारो रघुनाथ ओक पुण्याहून आले.

२ राघो धोंडदेव भागवत व अंताजी गंगाधर जोशी मामेभाऊ उभयता आले.

१ रामाजीपंत ओक नासिककर याचे पुत्र आले.

२ बालकृष्ण शास्त्री व वेकणभट परांजपे, सावित्रीबाईचे बंधू गंगापुराहून आले.

१ व्यंकट सदाशिव पेंडसे आले आहेत.

१ देवाजी बावाजी मराठे, बाईचे मेहुणे नाशिकाहून मुलाचे लग्नाचे योजनेस आले आहेत.

—

८

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Krishnaji Janardan reports Anandibai's doings from Kopargam ; this was the Diwali time for which some guests had come to pay visits.*

---

*No. 26*] [*15-2-1788*

पौ छ १६ जावल सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ ७ जावल पावेतो क्षेम असे विशेष. राजश्री राघोपंत ठोसर यांस घरी यावयास येक महिन्याचा निरोप दिल्हा असे. तरी तेथील चाकरीचा बदोवस्त राखोन येक महिनाभर निरोप द्यावा म्हणौन आज्ञा केली. यावरून आज्ञेप्रा। महिनाभर कामकाज याजकडील संभालावयाची सोय करून निरोप दिल्हा आहे. हे तेथे आलियावर स्वामीचीं भेटी होईल. याणी फार दिवस चाकरी केली

तैनातेची सोय नाही याजविसी रामचंद्रपंत गोरे[१] याणी विनंती केली आहे. ते सर्व स्वामीचे ध्यानात आहेंच. सरकारची चाकरी करून तैनात नाही, याजमुळे कर्ज फार जाले आहे. याजवर कृपाकरून संसार कालक्षेप चालेल यैसी तैनातिची सोय करून देविली पाहिजे. बहुत काय लिहावे, सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Raghopant Thosar was employed as tutor to Bajirao. The writer Govind Krishna requests Thosar being given the necessary emoluments.*

---

*No. 27*] [*17-3-1788*

पौ छ २३ जाखर सु॥ समान.

**श्रीशंकर.**

श्रीमंत राजश्री नाना याप्रति आश्रित लक्ष्मणभट्ट कर्वे यांचे अनेक अशीर्वाद विनंती. येथील क्षेम फाल्गुन शु॥ १० पर्यंत जाणून आपले कुशल लिहिणे विशेष. राजश्री गोविंदपंत गोडबोले यांस पत्रांत लिहिले कीं नक्षत्रसत्र काम्य होय की नव्हे हे पाहावें त्याजवरून मजजवळ बोलिले. त्यांस प्रात:संध्येपासोन जितके नित्य कर्म गायत्रीजप व शिवकवच आदिकरून यांतहि षडविधी प्रयोग आहेत. परंतु येथील रीत समजोन विनंती लिहिणे ते लिहितो. मी उभयतांचाहि उपाध्या. मला दोन्ही डोळे सारखे हे पूर्वीपासोन श्रीमंत थोरले राव व आपणास ठाऊक आहे. परंतु येथील रीत काम्यकर्म करावयाचे नाहीं. जो संकल्प करणे तो श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थ करितात. श्रीमंत दादासाहेबापासून ऐशी रीत आहे. हे समजोन कोणतेहि गोष्टी विषईचा चितांत संशय न धरिता लिहित असतो. कदाचित आपणास कोण्ही सांवितला असल्यास मी येथे आहेत व आपण कोण्हे विषयीं संशय धरित नसतील, आणि धरूहि नये. अजुनहि आज्ञा आल्यास नक्षत्रसत्र करून येऊ. मर्जी नसल्यास राहिलेच आहे. सुज्ञाप्रति बहुत काय लिहिणे. कृपावृद्धि करावी हे आशीर्वाद.

¶*Lakshmanbhat Karve, family priest of the Peshwas, informs Nana from Anandibai's quarters that the Nakshatra sacrifice was not being performed with a view to ruin anyone by the influence of astral magic.*

---

१ गोपिकाबाईकडे व्यवस्था पाहणारा कारकून.

*No. 28]* *[26-3-1788*

पौ छ २४ जाखर

सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता॥ छ १७ जाखर पावेतो क्षेम असे विशेष. राजश्री हणमंतराव जाधव यांस पथक सुधा अलिबाहादर यांजबरोबर हिंदुस्थानचे स्वारीस नेमले. त्याचे मोबादला कोपरगावीं चाकरीस राजश्री सिवराव पवार याचे पथक दीडसे स्वाराची नेमणु (क) केली. येविसींची पत्रे पवाराकडील कारकुनानी दाखविली. येसियास स्वामींनी जे सरदारास जी चाकरीची आज्ञा केली ते त्यांस करावीच लागेल. परंतु येथील प्रकार मजला चांगला दिसोन येईल तो सेवेसी लिहिला पाहिजे. पवाराचे पथकांत सरदार मुले आहेत ते निकामी असी माझी समज नाही. थोराचे लेक उमेदवार, नावाचे माणुस खरेच. अशावरच स्वामीनी कृपा केली पाहिजे. हेच कामकाजे करून धन्याचे पुन्यप्रतापे यश येत असते. परंतु या प्रांती हे जाधव प्रख्यात; समयांस यांनीं मोगलासी प्रसंग घालोन कामे बज्याऊन आणिली आहेत. निदान सर्वस्व भरीस घालोन सरकार कामांत बाट न ये येसे बशर्त काम करावे, असीच परंपरा आहे. पवाराची नूतन वयस्कता; ते समयास फक्त तरवारेचे काम करितील, परंतु येथे फक्त सिपाईगिरीचे मात्र काम आहे, यैसा प्रकार नाही. येक तर इभरत नावाची असते. कार्याकारण मसलत पोख्त केल्या पुरुषार्थाच असते. ही प्रकर्णे ध्यानास आणून मी आपले बुधीने सेवेसी पत्र लि॥ आहे. जाधव येथील उपयोगी. हे येथेच ठेविले पाहिजेत, स्वामीस तेथे ज्यास जसे सुचेल तसी विनंती करितील. यास्तव मी श्रीमंत राजश्री तात्यासहि पत्र लि॥ आहे, त्याचा विचार करावा. धन्यानी जे आज्ञा केली ते सेवकानीं आचरावीं हा धर्म मजलाहि समजतो. त्यांत कार्याकारण समजेल तोच सेवक खरा. केवल निरोप्या चाकराचे काम काही चमत्कारीक नाही हे समजतो. यास्तव सुचला मजकूर लि॥ आहे. याजवर मर्जीस येईल ते करावे. माझा आग्र (ह) नाहीं, परंतु बुधीत निश्चय हाच कीं हणमंतराव जाधव व वाघवलीकर जाधव याची येथून घालमेल केल्यास चांगले नाही. या पत्राचे उत्तर येईल तेव्हा हणमंतराव यांस आज्ञेप्रो पत्रे पावतीं करू. तोपर्यंत पत्रे त्यास सरकारचीं आलीं तीं देत नाही. बहुत काय लिहावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole requests Nana Fadnis to cancel his order of transferring Hanamantrao Jadhao and bringing to Kopargam Shivrao Pawar.*

No. 29] [29-3-1788

पौ छ १ जाखर सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी केसो माहादेव कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना. ता। छ २० जाखर पावेतो स्वामींचे कृपे करून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीकडून अज्ञापत्र येत नाही त्यास आज्ञापत्र पाठवावयास आज्ञा जाहाली पाहिजे. यानंतर राजश्री रामचंद्रपंत सबनिसाकडील कारकून येथे होते ते यका महिन्याचा निरोप घेऊन घरास गेले आहेत. त्यास ताकीद करावी की मागती सत्वर जावे. याप्रो मारनिल्हेस ताकीद जाहाली पाहिजे व रा। राघोपंत ठोसर हे पुण्यास अज्ञेवरून गेले होते. त्यास दोन महिने जाहाले अद्याप यत नाहीत. त्यास ताकीद होऊन येथे आले पाहिजेत. ते आल्याविना श्रीमंताचे लिहिणे होत नाही. मारनिल्हेचा दाब चांगला होता यास्तव सेवेसी विनंती लिहिली आहे. प्रज्यनकाली रावच्या जिन सामानाकरिता सालास नव्या कराव्या लागतात याकरिता पेसजी विनंती लिहिली होती. त्यास आज्ञा आली होती की मागाहून लिहून पाठऊ त्याप्रमाणे करावें, त्याजवरून हाली सेवेसी विनती लिहिली आहे. तीन च्यारसे रुो सोपा बाधावयास लागतील परंतु सरंजाम चागला राहील. येवि-सीची आज्ञा आलियास सोपा बाधितो. प्रज्यनकालहि समीप आला आहे. यास्तव सेवेसी विनंती लिंहिली आहे, ही ध्यानास आणोन आज्ञा करावी. सेवेसी श्रुत होये. बहुत काय ल्याहावे हे विज्ञाप्ति.

¶*Keso Mahadeo asks Nana's orders on several points referring to the expenses of Anandibai's household.*

---

No. 30] [1-4-1788

**श्री.**

पु॥ सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिर सां नमस्कार विज्ञापना दिनचर्येचे वर्तमान.

छ २३ जाखर. बाजीराव याचा डावा कान दुखत आहे, प्रकृत बरी नाहीं, आंगावर पित्त उठले आहे, प्रकृती उष्ण आहे, उपाय होत असतो.

छ २१ जाखर

कोणते काळी चांगले होईल हे कलेना.

२

छ २६ जाखर, येथे नेहमी राहणे असेन श्रीशुक्रेश्वराची ऊर्जा विशेष नाहीं. आम्ही आहो त्यापक्षीं वाजंत्रे व कर्णे व छबिने निघावे हे काहीच नाहीं. आम्हास पावला तर आम्हीच करूं असें बाई बोलली.

छ २७ जाखर, आम्ही इंग्रजाजवळ होतो; पुढें तळे ( गावा ) वर आला. त्यापक्षीं ......ळें उपकार आम्हावर आहेत, व सिंद्याने रक्षिले म्हणोन सिंद्याचे पात्र उपकार होते. परंतु पुढें शुक्रेश्वरीं यावयास कारण सिंदा; त्यापक्षी गुलामपणा केला.

१ अमृतराव रात्रौ निद्रिस्त असतां पिशाचदर्शन जालें. आंत खोलीत आलें, त्यामुळें जागृत होऊन बाहेर येत तो पर्यंत पाहात होते. मागेंहि दोन तीन महिन्याअलिकडे सावित्री[१] बाईचें दर्शन जालें होतें, म्हणोन कोपरगांवी नथू भगत कुंभार जाणता आहे, त्यास आणिले होते. त्याणे बंदोबस्त केला आहे.

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Krishnaji Janardan reports the conversations of Anandibai at Kopargaon.*

---

*No. 31*] [*3-4-1788*

पौ छ ७ रजब सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी विज्ञापना. ता. छ २५ जाखर पावेतो क्षेम असे विशेष. सौ सावित्रीबाई याजकडे दागिने केले पाहिजेत. कलमे

हलकडीची नथ नवी केली पाहिजे. कलम १

हातसर जुने आहेत. जडाव मण्याचे त्यांस मणी पोवळी जाजती घातली पाहिजेत. कलम १

सदरहु त्याचेच दागिन्यापैकीं करावयाजोगे आहेत आज्ञा जाल्यास होईल. यकादा दागिना श्रीमंत मातुश्री बाईसाहेब पाहावयास म्हणून आणून सावित्रीबाईकडे देतात. त्यास कसे करावे ? बहुत करून बाईसाहेबांचे दागिने सावित्रीबाईकडेच आहेत, ऐसे असेन पुढें अधिक अधिक देतात. येविसीची आज्ञा येईल त्या प्रो पुढें चालेल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer informs Nana that Anandibai has given many of her ornaments to Amritrao's wife Savitribai.*

---

१ सावित्रीबाई, अमृतरावाची पहिली बायको.

*No. 32*] [*3-4-1788*

पौ छ ७ रजब सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी विज्ञापना ताा छ २९ जाखर पावेतो क्षेम असे विशेष.

श्रीमंत मातुश्री आनंदीबाई साहेब चैत्र सुध पुर्णिमेपासून दरमहा पूर्णिमेस बारा महिन्याची बारा लिंगे ब्राम्हणास देणार त्याची योजना.

९ नवरत्नाची लिंगे येथील जवाहीर खान्यापैकीं खड्याचे ठाई लिंगाची कल्पना करून द्यावी.

५ आंगठ्यांतील खडे काढून द्यावे.

१ हिरा
१ पाच
१ नील
१ पुष्कराज
१ लसण्या
—
५

१ माणीक मोत्याचे घाटपैकीं
—
६

३ मोकळ सुमार पाहून काढावयाचे.

१ मोती
१ पोवळे
१ गोमेद
—
३
—
९

वो राजश्री सिवशंकर शास्त्री यांस सौ सावित्रीबाईस भेटावयास आणिले पाहिजेत. यास्तव ल्याहावयास आज्ञा जाली आहे. येथे भेटोन पुढें नाशिकास राहावें यैसे दिसतें. त्यास आणावयाची आज्ञा जाल्यास घोडी माणसें येथून पाठऊन आणावी लागतील. याची आज्ञा काय ते जाली पाहिजे.

१

श्रीमंत सौ भागिर्थीबाई याजकडे नित्याचे राबत्याचे दागिने केले पाहिजेत.

१ नथ लाहान मोत्याची

२ हातसर जडाव मण्याचे; त्यांत पोवळी घालोन मोठाल्या हरभऱ्या एवढे मणी पोवळी असावी. पोवळ्याहून मणी मोठेच असावे. जोड १ दागिने

४ बाळ्या जोड २ प्रो
२ पोवळ्याचे जोड १
२ पाचेचे लोलकाचा जोड १
—
४
—
७

पौ साहा दागिने यातून खडे काढून घ्यावे. दागिन्याच्या किमती येथें मोजदादीस ठीक लागल्या नाही, व आज्ञेसिवाय खर्च करता येत नाही. यास्तव पाहावयास पाठविले आहेत. हे पाहून धर्मादाय करावयाची आज्ञा करावयाची असल्यास तेथेच किमत ठराऊन देऊन ल्याहावयास आज्ञा जाली पाहिजे.

३ कि॥ लिंगे करावी.
 १ स्फटिकाचे.
 १ सुवर्णाचे.
 १ रुप्याचे अथवा चंदनाचे.
 —
 ३
—
१२

जवाहीर सुधा बारा लिंगे लि॥ प्रो देणार याची आज्ञा. कलम १

सात दागिने केले पाहिजेत. तेथून करून पाठवावयाचे असिल्यास पाठवावे अथवा तेथील जवाहीर पैकी करून द्यावयाची आज्ञा जाल्यास श्रीमंत मातुश्री आनंदीबाईसाहेब करावयास सांगतील तसे करून द्यावे लागतील. यास्तव जसी आज्ञा येईल त्याप्रमाणे करीन.

कलम १

येथील जवाहिरास किमत लागली नाही हे कठीण पडते.

श्रीमंत राजश्री आपासाहेबास तेथून करून पाठवावे.

२ पायाती (ल) सोन्याच्या साखळ्या दागिने
० घागऱ्या पायातील जुन्या आहेत त्याचे भरतीस कांही लागतील येथें करितों.
—
२

सदरहुची आज्ञा जाली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer asks certain ornaments being made for the use of Bhagirathibai and Chimaji Appa and jewelled Lingas to be given as charity by Anandibai.*

---

*No. 33]* *[3-4-1788*

पो छ ७ रजब सु॥ समान.

**श्री.**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक सां नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता॥ छ २९ जाखर पावेतो क्षेम असे विशेष. राजश्री रावोपंत ठोसर यांस एक महिन्याचा निरोप देऊन पाठवावे म्हणौन आज्ञा जाली. त्यावरून येथून पुणियास गेले. त्यास फार दिवस जाले. श्रीमंत राजश्री बाबा साहेब ल्याहावयास पढा-

वयास त्याजखेरीज ठीक बसत नाहीं. त्यास तैनात काय करावयाची योजना केली असेल ते जालियावर त्यास तेथे दुसरे काम नाहीं. सोय होऊन त्यांस इकडे येण्याची आज्ञा जाली पाहिजे. श्रीमंत मातुश्री आनंदीबाई साहेब यांणी राजश्री राघोपंत ठोसर यास पत्र ल्याहावयास आज्ञा केली; त्यावरून पत्र लेहून त्याची नकल पाठविली आहे; पावेल. राघोपंतास बाई साहेबांचे नावचे पत्र लि|| आहे. याचे कारण राघोपंत तेथेंच आले आहेत; आणि बाई साहेबानीं दोनच्यार वेळां आज्ञा केली, सा। लिहिलें आहे. उपाध्ये पुणियांत असतात तेव्हां बाईसाहेबांचे पत्र त्यास लिहित असतों, त्याची नकल येतच असते. त्याखेरीज पत्र ल्याहावयाचें कारण नाहीं; लिहित नसतों. कदाचित असे पत्र राघोपंतास ल्याहावयाची आज्ञा जाल्यास ल्याहावें न ल्याहावें याची आज्ञा होईल तसें करीन. बहुत काय लिहावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Raghopant Thosar is asked to be sent back from Poona without delay.*

---

*No. 34]* *[4-4-1788*

पौ छ ७ रजब सु|| समान.

## श्रीशंकर

### श्रीमंत राजश्री नाना याप्रति

आश्रित लक्ष्मणभट्ट कर्वे यांचे अनेक आशीर्वाद विनंती. येथील क्षेम फाल्गून व|| १२ पर्यंत जाणोन आपुले कुशल लिहिवयास आज्ञा केली पाहिजे विशेष. पुर्वी विनंतीपत्र व याद पाठविली आहे; ते पाहोन काय उत्तर मर्जीस येईल त्याप्रमाणे आज्ञा करावी; त्या अन्वये करण्यांत येईल. वेदमूर्ति शिवशंकर शास्त्री यांस भेटोन दोन वर्षे जाहाली तर महिनापंधरा रोज राहोन जातील तर येथे कारभारियांस आज्ञा आली म्हणजे घोडी मनुष्ये पाठऊन आणतील. सुज्ञाप्रति बहुत काय लिहिणे.[1] कृपावृद्धि करावी हे आशीर्वाद.

¶*Laxmanbhat Karve, the family priest of the Peshwa, requests Nana Fadnis to send replies to his previous queries and permission to call Shivshankar Shastri to visit Anandibai.*

---

१ सबंध पत्र बालबोध आहे. नकल मुळाबरहुकूम.

No. 35] [5-4-1788

पौा छ ९ रजब सु॥ समान.

श्री

सेवेसी आपाजीराम सहस्त्रबुध्ये कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ताा छ २७ जमादिलाखर पावेतो स्वामीचे कृपे करून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. सुरतेहून थैलीची पत्रें वाहुजी (?) महाराणी याणीं श्रीचा प्रसाद पाठविला त्यास थैली तैसीच स्वामीकडे पाठविली आहे. प्रसाद येथें सोडून पाहिला, तो हालवे नानाप्रकारचे व साखरेचे गाठी याप्रमाणे आहे मागेहि एकवेळ याप्रमाणें येथें आले तेहि पत्रे पुण्यास पाठविलीच होती. श्रीमंत राजश्री बाजीराव यास च्यार दिवस पित्त आंगावर येत आहे. तिसरे प्रहरी आंगास कंडून सुटोन गांधी येत आहेत. औषधी उपाय करीत आहेत काल पासून काही कमी झाले आहे. श्रीमंत मातुश्रीनीं पत्र लिहिविले आहे. वो राजश्री शिवशंकरशास्त्री यास भेटीस येण्याविसीं वगैरे (व) दागिन्याचे तोडमोड याप्रमाणे आहे. दोन अडीच महिने पत्राचे उत्तर येत नाहीं. त्यास उतर देववायाची आज्ञा करावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Appaji Ram Sahasrabudhe informs Nana of some letters and sweets received by Anandibai from Surat.*

---

No. 36] [5-4-1788

पौ छ ७ रजब

मु॥ समान.

श्री.

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २७ जाखर पावेतो क्षेम असे विशेष श्रीमंत कैलासवासी दादासाहेब मुर्तेस होते तें समई वहुजी माहाराणी म्हणून गुजराथी ब्राह्मण बायको श्रीबालकृष्णजीची पूजा करीत असते. ठाकुरद्वारा मोठा नामांकित आहे. ते बाई तेथे प्रसाद देत होती. दादासाहेब इकडे आलियावर प्रसाद आला व त्याचा काल जाल्यावर येकवेळ प्रसाद कोंपरगावी मागे आला. तेव्हा त्याची पत्रे विसाजी आपाजी याजकडे पाठविली होती. त्याणी सरकारांत दाखविली की नाही, समजले नाहीं. त्याजवर हाली प्रसाद आला. साखरेचे जिनस पेढे बर्फी हलवे व मनुका वगैरे मिलोन जिनस सुमारी साठपावेतो, येकक जिनस च्यार च्यार

पैसे भार अजमासे येके लाहानसे बुर्डीची पेटारीत आणिला, तो येथे पाहून ठेविला आहे. आज्ञा येईल त्याप्रोा करीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. पत्राची थैली सबंध पाठविली आहे. पावल्याचे उतर पाठवावयास आज्ञा जाली पाहिजे हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole requests Nana's permission to hand over certain sweets to Anandibai, which had been received for her from a Gujarati lady Wahuji Maharani.*

---

*No. 37*] [*7-4-1788*

पौ छ ७ रजब सु॥ समान.

**श्री**

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ २९ जााखरपर्यंत मुकाम कोपरगांव येथे यथास्तित असे विशेष. दिनचर्येचे वर्तमान—

छ ९ जााखर, आग्निहोत्राकडे चातुर्मास्यें होत आहेत. त्या नि॥ आवभृतस्नानास कचेश्वरचे घाटाकडे गेले होते.

छ १२ जााखर, हुताशनीचे पूजन जाहाले.

छ १६ जााखर, सिमग्यानि॥ प्रात:काली बाहेर खेलावयास बाजीराव व आमृतराव च्यार दिवस जात होते.

छ १७ जााखर, फाल्गून वद्य पचमी नि॥ वाड्यांत बैठक करून सिलेदार वगैरे मंडली बलाऊन रंग केला होता.

छ १९ जााखर, जिऊबाई चापेकर याणी बागांत समाराधना केली, तेथे बाई गेली होती.

छ ११ जााखर, बाई व भागिर्थीबाई यांची स्वारी मुक्तेश्वराचे दर्शनास हिंगणीस गेली होती.

छ १४ जााखर, बाईचे बोलणे—

१ रामचंद्र तुलपुला याणे फडणिसी केली. त्या वेलेची कारकुनी घेतली. आम्हाकडील फडणिसीचे धनी नाहीत. कारकुनी मात्र घेतात.

१ आमच्या व त्यांच्या बोलण्यात तिराईत चांगला असता तर परस्परे किलाफ जाते. परंतु आमचाहि भोग सरला नाही.

—

२

छ २० जाखर, बाईचे बोलणे—

१ आमृतराव पहिल्याने घेतले तेव्हा प्रथम घेतांच निरालें तेज दिसों लागलें. पुढेंहि माधवराव देखील द्वेष करीत परतु यांचे दैव चांगले; दैववान आहेत.

१ पूर्वीचे द्वेष चांगले होते. इतका पेच. परंतु खर्च बहूत. आसे कसे जालें तरी ते आपले, हेहि आपलेच. परंतु कालानुसार हेंच खरें.

छ १८ जाखर,

१ बागांत पिंपलाची मुंज जिऊबाई चांपेकर याणी केली तेथे बाई गेली होती.

१ वाड्यात नटव्याचा खेळ जाला.
—
२

छ २१ जाखर,

१ पहिले सरदार मातबर प्रमाणिक फार होते आतां थोडे आहेत. पहिलें तसेच आसते तर कोणीतरी आम्हा-कडील निखालसतेची गोष्ट ऐकता. सारांश आमचें दैव वाईट आहे.

१ बाजीराव याचें दैवाची परीक्षा प्रथम जाली. यांचे दैवास प्रारंभ जाला तेव्हापासून कैद जाली.[1]

(अपूर्ण)

¶*Krishnaji Janardan reports Anandibai's remarks on her situation to Nana. Evidently she felt her liberty altogether curtailed and blamed her fate.*

---

*No. 38*] [*11-4-1788*

पौ छ १० रजब सु॥
समान चैत्र.

**श्री.**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता छ ४ रजब पावेतो क्षेम असे विशेष. स्वामीनी कोपरगावचे चाकरांपैकीं खिजमतगार जासूद वगैरे पाठवावयास आज्ञा केली. त्यास आज्ञेप्रो झाडून पाठऊन देतों. तूर्त जानाजी नाईक जासूद जथे मजकूर यास पाठविला आहे. पावल्याचें उत्तर पाठवावयास आज्ञा जाली पाहिजे. बहुत काय लिहावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Servants in personal attendance at Kopargaon are invited to Poona to visit Nana.*

---

१ यापुढील एक बंद गहाळ.

No. 39] [14-4-1788

पौ छ ७ रजब सु॥ समान.

श्री.

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ २७ जाखर पावेतो क्षेम असे विशेष. मी येण्याविसीं बहुत वेळां लि॥ परंतु आज्ञा जाली नाहीं. यास कसें करावें ? स्वामीचे चिता मजला फार दिवस पुणियात ठेवावयाचें नसिल्यास मी आपले मतें बळेच राहीन कीं काय ? जसी मर्जी असेल तसा लौकरच इकडे येईन. परंतु अगदींच यावयाची आज्ञा न जाल्यास माझे बुधीचा खुलासा राहत नाहीं. मी वरचेवर आलो गेलों असे जाल्यानें लिहिणे वरचेवर आटोपत जाईल. च्यार वर्षाचे बोटखत राहिले आहे असें पुढें किती ठेवावे ? पुढे स्वामीच मजला फिजत (फजित) करतील. येथील जवाहिरास किमती लागल्या पाहिजेत; त्यास जोहरी पाठविला पाहिजे म्हणून वारंवार विनंतीपत्रे पाठविलीं. जोहरी आला नाही. येथे जोहरी येऊन किमत ठीक होणार नाहीं असे असल्यास पेश्या पुण्यास आणून तेथेच किमती करून पाठवावयाच्या असिल्यास पोतनिसाकडील कारकून बरोबर देऊन जवाहीर पाठवितों. तेथें किमती घालोन द्याव्या. जवाहिराची पकी किमत आ(जा)ल्यासिवाय जवाहीर कीर्दीस जमेस धरतां न ये. यास्तव ज्ञाड्यावरच कामकाज चालले आहे. किमत जाल्यावर जमेस धरून खर्चेहि कीर्दीस लिहूं. खर्च कांहींच नाहीं परंतु किरकोळ खर्च धर्मादाय कोठे मोती पोवळे जाला आहे तो लिहिला पाहिजे यास्तव मजला येण्याची व जवाहिराचे किमतीची काय ते आज्ञा जाली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole informs Nana that he should be allowed to visit Poona and finish the long standing arrears of accounts, price-lists of jewellery and other matters.*

---

No. 40] [18-5-1788

पैा छ १६ साबान.

श्री.

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ ११ साबान (पा)वेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत मातुश्री आनंदीबाईसाहेब याणी आज्ञा केली की आम्हा जवळ थोरले देवघरांत सोन्याच्या मुर्ती

आहेत, त्या आम्हास उग्र वाटतात. यास्तव ब्राह्मणास देणार. पुणियास लेहून पाठवावे. तेथून द्यावयास सांगितल्यावर आम्ही ब्राह्मणाची योजना करून त्यास देऊ कदाचित मुर्ती न द्याव्या म्हणौन लिहून आले तर आम्हास आपले जवळ ठेवावयाच्या नाहीत. वो राजश्री उपाध्ये पुणियास जाणार आहेत याजबरोबर पाठवून देऊ. मग तेथे सरकारात ठेऊत किंवा कोणास देऊत; याप्रों त्याहावे. त्यावरून मूर्ति सोन्याच्या अजमासे वजन तोळे,

| | | | |
|---|---|---|---|
| २७। | सांबाकडील मुर्ति, | | |
| | १२ | पार्वतीची | १ |
| | ५। | गणपतीची | १ |
| | १०। | स्कंदाची | १ |
| | २७। | | ३ |
| ९॥। | | भैरवी यंत्र | १ |
| ३७ | | | ४ |

येकून तीन मुर्ति व येक यंत्र मिळोन सततीस तोळे. याचे किमतीचा अजमास पावणेसहाशे रुपये पावेतो आहे. बाईसाहेबाची मर्जी मूर्ति ठेवू नयेत यैसी जाली. तमसई उपाध्ये बहुत बोलले. बहुतां दिवसाच्या मूर्ति सांबाजवळच्या, ह्या देऊ नयेत. त्यांणी एकच निक्षूण गोष्ट सांगितली. ह्या उग्र मूर्ति आहेत; आम्ही ठेवीत नाहीं व ऐसे त्याहाची आज्ञा जाली त्यावरून लिहित आहे. आज्ञा होईल त्याप्रमाणे विनंती करीन. याखेरीज येथे देवघरांत पोवळ्याचा गणपती व सोन्याचे मोर आहे ते श्रीमंत राजश्री रावसाहेबास आम्ही पाठवितो म्हणोन बोलली. उपाध्ये येते समई घेऊन येणार आहेत. कलमे.

मोर सोन्याचे वजन तोळे त्यास ३६

मोरांसारखा सोन्याचा रंग आहे १

पिसारा पाचेचा आहे त्यास अजमास सोने वजन तोळे ८ येकच पाचेचा पिसारा, तीन तीन बोटे लांबी रुंदी, ऐसी वाटोळी पाच आहे.

वजन तोळे १० पाच फिके रंगाचे जिरीमदार दिसते.

१

मदरहूप्रमाणे मोर व गणपतीचा मजकूर आहे. येविसीची आज्ञा काय ते जाली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Anandibai requests permission to exchange the gold idols in her possession for new ones from Poona. These, she fancies, possess a frowning countenance, reminding of Raghoba's days.*

No. 41] [19-5-1788

पौ छ १२ साबान समान
समानीन वैशाखमास.

श्री

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ ५ साबानपर्यंत मुकाम कोपरगांव येथें आसें विशेष. येथील दिनचर्येचें वर्तमान.

छ २ रजब, सोईच्या गोष्टी आसल्या तर येथें शुक्रेश्वरी शहर वसतें, उदमी वगैरे येऊन राहाते. याप्रसंगी आम्हीं आहो ते येक देवाल्य देखील होत नाहीं, आसी काळचर्या आहे असें बाई बोलत होती.

छ ४ रजब, चैत्रागौरीनिमित्त वाड्यांत हलदकुंकू जाहालें. कोपरगांवच्या व कचेश्वर(च्या) बायका आल्या होत्या.

छ ५ रजब, खासगीकडील जुनीं सनगें द्यावयाचीं म्हणतात. त्याजवरून बोलणें. पूर्वी माधवराव यांचे वेलेस बंदोबस्त फितुराचा मात्र होता. आतां येथें सनगें जुनी जाली तरि देऊं देत नाहीं, कारभारी मनस्वी आहेत, असें बाई बोलत होती.

छ १० रजब, बाईचें बोलणें—

१ पूर्वी गरोदरपणामध्ये स्वारीबराबर असतां कोठें राहावयाची सोय न होय. नंतर पवार याणें धारेचा किला रिकामा करून तेथें राहिलों. आम्हांवर उपकार फार केले आहेत आसें बाई बोलली.

छ ३ रजब, आमृतराव याणी आपत्ती बहुत पाहिल्या आहेत म्हणौन त्यांस हें कठीण वाटत नाहीं. याहिपेक्षां दुसरे कारभारी येथें वाईटमिलते तर आम्ही काय करितों म्हणोन हे चांगले आहेत ! आसें आमृतराव म्हणतात. आम्हांस तों अनुभव किमपिच नाहीं ! पूर्वी कसेहिं पेचांत होतों, तथापि कोणी शब्द खालीं पाडिला नवता आसें बाई बोलत होती.

छ ७ रजब, इदुंवार नि॥ बाजीराव याची स्वारी त्रितीप्रहरीं कुंभारीस देवदर्शनास गेले होते.

छ ९ रजब, येकादशीनिमत्य त्रितीय प्रहरीं स्वारी हिंगर्णास श्रीमुक्तेश्वरास दर्शनास बाजीराव गले होते.

छ ११ रजब,

१ दोन प्रहरीं बागेतील बंगल्यांत बाई भोजनास गेली होती.

० लग

—

१

छ १२ रजब, भागीर्थीबाई यांस सीत ज्वर आला.

१ धारेंतून निघाल्यावर वोढेकरानी मर्जी फार रक्षिली. वोढेकरांचा येक भाऊ फार लबाड होता. त्यासहि आंती वाईट जालें; हाल जाले; माधवरायाप्रमाणें जाले.

—
२

छ १० रजब,

१ दोन प्रहरानंतर बाई व भागीर्थीबाई यांची स्वारी संवछरास गेली होती.

—
३

छ १४ रजब, सोमवार नि॥ बाजीराव यांची स्वारी संवछराजवल गणपतीस गेली. नंतर कोकमठाणास देवदर्शनास गेली होती.

छ १५ रजब.

१ बाईस जन्म काळीं शुक्र आठवा आहे. त्याचें फल शत्रु आसावा आणि त्याचें पारिपत्यहि व्हावें असें फल आहे.

१ आमृतराव यांस साहावे स्थानी बुध आहे. त्याचें फल वंश शत्रू असावा असें आहे.

१ ग्रह उंच उंच आहेत परंतु कांहीं वेध आहेत.

—
३

छ १६ रजब, संकटचतुर्थीनिमित्त मौनव्रत बाई व बाजीराव व अमृतराव याणी केलें.

छ १३ रजब,

१ त्रितीय प्रहरीं बाईची स्वारी कोपरगांवास भवानीचे देवदर्शनास गेली होती.

१ सावित्रीबाई यास पुत्र होईल असें कुणबिणीचे आंगी देव आला त्यानें सांगितलें.

१ रामभट उदगीर करंजगांवकर यास भूमीदान दिल्हे. याविसी पुण्यांत बोलले कीं बाईची मर्जी आहे त्यापक्षीं चांगली द्यावयाची आसें भटजीनी सांगितलें. त्याजवरून बोलली कीं आमचे मर्जीचें अगत्य फार आहे हें चांगलें.

—
३

छ १७ रजब, बाईचें बोलणें.

१ बाजीराव आरबाचगिरी फार करितात. ऐकत नाही, हें काय जालें? साहेबाची द्रष्टी पुढें पाचा वर्षीं काय होईल हे सांगत होते आणि हे कसे आहेत? त्यांची बुद्धि सुर्तेहून येण्याविसीं मात्र चकली. त्याचें कारण जालें.

१ सिंद्याकडे गेल्यानें सिंदा त्यांचा आहे. त्यापक्षीं आम्हांस त्यांचे हातीं देतील म्हणोन तिकडे गेले नाहीं.

१ गाईकवाड व इंग्रज वगैरे यांस आम्हांस ठेवावयाचें सामर्थ्य नव्हतें.

—
२

छ १९ रजब, बाईचें बोलणें—

१ चांगले ग्रह आसले तर त्यांचें फल येत नाहीं वाईट आहेत त्याचें फल येतें.

१ यंदा समानसमानीनांत *आश्विनापासून येकेचालीसावें वर्ष आहे त्यांस पुढें आकरा महिन्यांनीं भाद्रपद मासीं सूर्याची दशा साडेच्यार महिने आहे. त्यामध्यें शरिरास दुखणें फार व्हावें; कठिण आवस्था व्हावी; क्लेश आसावे; आपमृत्यु स्थान आहे; याजकरितां श्रीसूर्यप्रीत्यर्थ आर्घ्यप्रदानास ब्राह्मण लावावयाविसीं उपाध्येबावाजवळ सागितलें आहे.

—
२

छ २० रजब,

१ आपा साहेब्रांचा वृतबंध पुढें फाल्गुन मासीं करावा व आठवे वर्षी लग्न करावें आसें बाई बोलली. मुंजीविसीं उपाध्ये याप्रमाणें बोलले—

१ उपाध्ये श्रीत्रिंबकेश्वरास सहस्रभोजन व माहारुद्र करावयास जावयाची गोष्ट काढिली. त्याजवरून बाजीराव बोलले कीं आम्हीं जातों. देवदर्शन घेऊन पंधरा दिवसीं येऊं, याविसीं पुण्यास पत्र लिहावें. बाई बोलली कीं येथें कैद कोणाचे दैवाने समजत नाहीं ! आम्हासच असली आसें समजोन देशीं आलों; त्यांत कारभारी प्रामाणिक येकवचनी आणि नाना आम्हासी मात्र आसें बोलले. परंतु सर्वांशीं प्रामाणिकत्व आहे. आशा योगानें जालें भावी होणार तें चुकत नाहीं.

१ बाजीराव फार खेलतात म्हणोन राघो केशव ठोंसर यास आणावें आसे उपाध्ये बोलिले. त्याजवरून बाई बोलिली कीं याणी विद्या सिकावी किंवा शहाणें व्हावें हें कोणास आगत्य नाहीं. आजून त्याचाहि बंदोबस्तच केला नाहीं. जाल्याशिवाय तो तरी कशास येईल आसें बोलली.

—
२

छ २१

१ रोज येकाद्यास चांगलें वाईट म्हणतात. हें सर्व दैवाचें देणें आहे. आम्हास उगीच वाईट म्हणतात.

१ त्रिंबकरावमामा[1] यांस शेणमार दिला. आम्हींच करविलें.

१ हरी बावाजीविसी आम्हांस पहिल्यानें किमपि ठाऊक नवतें, तथापि लोक म्हणतात. नारायणराव यास दगा जाला हेहि आम्हास ठाऊक नाहीं. याविसीं आमचे आंगीं लावणारानें लावावें. आमचा विश्वास काय गेला

—
३

* Anandibai completed 40th year of her age in September 1787. So that she must have been born in 1747 and so 8 years of age when she was married.

1 He was suddenly attacked and killed by Raghoba in May 1779.

तर कळेना. यास जावयाचें जाल्यास बेंरच आहे. देवदर्शन होईल. पुण्यास पत्र लिहावें आसें बाईनीं सांगितलें.

२

छ २३ रजब, येथें बंदोबस्त करण्याविसीं येथील कारभारियांचें हातीं नाहीं. पुण्याहून बंदोबस्ताविसीं मुजरद वरचेवर लिहून येत आसतें, म्हणोन आसें होतें. यांचे स्वाधीन काये आहे? हे आपले तर्फेनें चांगलेंच करितात असें बाई बोलली. कलम १

छ २४ रजब, अस्पर्श जाली. बागेंत गेली होती. केसो महादेव बरोबर होते.

छ २५ रजब येकादशी.

१ त्रितीय प्रहरीं बाजीराव आमृतराव यांची स्वारी कुंभारीस देवदर्शनास गेली होती. केसो महादेव व आपाजीराम गेले होते.

१ आपासाहेबांचे मुंजीचा निश्चय पुढील फाल्गुनमासीं करावयाचा जाला असें उपाध्ये बोलत होते.

२

आसें किमर्थ बोलत नाहीं. उगीच हाल करावे हें काय आसें बाई बोलत होती.*

१ केसो माहादेव यांस बाजीराव याणी छडी मारिली, असी लटकी आवई. दुर्लौकिक दैवानें होतो. आन्याय जाल्यास मोठा आसला तर चौकी बसवावी. पुणेकर अविश्वासू, परंतु आन्यां(या) नत आल्यास चौकीच बसवितात. माध(व)रा(व) याणी दिनकर माहादेव याचे तोंडांत मारिली. बाईनी सर्वांनीं वाईट म्हटलें. थोरास लाहानास आंतर आहे. त्यांत आम्ही याचे कैदेंत आहों, त्यापक्षीं कसें होईल. उगीच लोक लबाडी बोलतात, असें बाई बोलत होती.

१ दौलत नानासाहेब व दादासाहेब त्रिवर्गांनीं मेळविली. माधवरावहि आमची मर्यादाच रक्षित होते. त्यासमई दोन लक्ष धर्म होता. आतां पंचविस हजार रुपये नाहीं. त्या वेळेस हे कारभारी कोठें होते? इतकी सिपाईगिरी त्यांजवर जाली नाहीं. गेल्याचें घर मेल्याची बायको आसें केलें! यांत अधिक काय केलें आसें बाई बोलत होती.

१ उपाध्ये बावा बोलले. कर्मविपाक पोथी नाहीं व भारथ चांगली प्रत पाहतो, आसें पुण्याचे पत्र आलें आहे आसें बोलले. त्याजवरून बाई

* Anandibai here denies any knowledge of Narayanrao's murder-plot or of Hari Babaji.

छ २६ रोज रजब.

१ येथें कारभारी कोणी चांगले नाहीं. आमचे हित करून बरेपणा सांगे आसा नाहीं. चांगलें करावें हें नाहीं. वोढेकरांजवल सवादोन वर्षें होतो. त्याणी प्रथम बोलणें कठीण बोलले, ते अमार्यादा वाटली. परंतु पुढें येथास्थित चागलें जालें आसें बाई बोलत होती.

१ येकास नवरी वाईट केली. आतां आपासाहेबांस तरी नवरी चांगली पहावी आसें बाई बोलत होती.

१ मागील चौकांत निम पडवी आहे. त्याची येक बाजू गची करावयाची योजना होत आहे.

३

छ २८ रजब (९-९-१७८८)

१ बाजीराव यांस गर्मी जाली आहे. बायको थोर नाहीं हेच बाधा फार आहे आसें बाई बोलली.

१ पूर्वी नासिकास स्वारी गेली होती, तेव्हां तेथील लोक थोरले बाईस बोलत की तुम्हांस भिकेस लाऊन आपण भीक मागतात आसे लबाड लोक बोलत. परंतु बाईची धन्य आहे. दोन मूल हत्तीप्रमाणें गेले. आम्हांस किती वाईट वाटते. मग त्यांचे काय पुसावें आसे बाई बोलत होती.

बोलली कीं उपाध्ये बावानीच कर्मविपाक पाहिला आहे आणि शोध न पाहाता त्याणीच आसें लिहिलें. तेव्हां आगत्य किती आहे हें समजलेंच आहे. योगवसिष्ठाची पोथी पाहिजे. परंतु आणविल्यानें येणार नाहीं. परिक्षा पाहाणें तर पहावी. आसें उपाध्याजवल बोलली.

४

छ २९ रजब

१ पहिले पंचभाई नाव होतें मग बारभाई जालें. श्रीमंत तर 'फितुरी' आसें पत्रांत लिहित होते आसे बाई बोलली.

१ पूर्वी आम्हीं परस्वाधीन होतों आताहि तसेंच आहे. ही गोष्ट कारभाऱ्यानी चालविली. परंतु मर्जी रक्षणें किंवा मर्यादा हें नाही आसें बाई बोलली.

२

छ ३० रजब, बाईचें बोलणें.

१ आम्हीं पूर्वी केवढीं होतों ! सिंदे होलकर सुधां आमचे तेजाखालीं होते. तींच माणसें आता आम्ही कसीं जालों !

१ नाना साहेबांचे वेलेस चांगली दौलत जाली. पुढें माधवराव छचोरीपणा करित आसत. नारायणराव तर नऊ महिने जाले. त्यांत काय पाहावें ? परंतु बहुत मर्यादशील होता.

१ बाजीराव आमर्याद फार जाले आहेत. पूर्वी नारायणराव फार मर्यादशीळ होते आसें बाई बोलत होती.

१ थोरली बाई नाटकशालांजवलहि पूर्वी स्वच्छ बोलत नसत. आंतरयामी फार कठीण आहे. त्याचे फलहि जालें आसें बाई बोलली.

---

४

छ १ साबान,

१ बाईकडे देवाची पूजा वसंतऋतुमध्यें आरुणोदई च्यार घटका रात्रीस करावी आसी मर्जी होती. परतु उपाध्यानीं प्रातःकालीं करावी आसी विनंती केली. त्याजवरून बोलली आम्हांकडे भट कशास पाहिजे. आम्हीं पूजा करूं. त्यांत आम्हांस देवच नको. सूर्याचें ध्यान करून राहूं. तेंहि मोठेंच आहे. परंतु यांजवल रदबदली करणें हे नको. आलिकडे प्राया करित नाहीं. यांचे तोंडास कोणी लागावें, आसें बाई बोलली.

१ शास्त्रामध्यें बारभाईचा प्रवेश नाहीं. आसीं आनुष्ठानें केल्यानें काय होतें. कामनिक केल्यानें दुर्गत होते. इतका यांचा शोधच नाहीं.

छ १ साबान.

१ येथें जितके आहेत तितक्यांचे मागील जन्मीं भक्षिलें आहे म्हणोन आतां आम्हांपासून फेड करून घेतात असें बाई बोलली.

१ पूर्वी दुर्गाबाईचें लग्न जालें. तेव्हां लुगडीं वगैरे खर्च आम्हीं सांगितल्याप्रमाणें जालें. तशांत विहिणी रुसत. आतां याजकरितांच विहिणी गरिब मेलविल्या.

१ पूर्वी आमची तऱ्हा कांही काम येकाद्यास सांगावें, पाहावें तों तें तयार जालें हें ठाउक आहे. कधीं काय लागतें किंवा किती रुपये लागतात हें ठाउक नाहीं. हें आतांच आधेली पावली पैसे कलों लागले.

छ ३० रजब,

१ तृतीय प्रहरीं स्वारी बाजीराव व आमृतराव शृंगेश्वरास देवदर्शनास गेली होती.

---

५

छ २ साबान. दोन महिन्यामागें बाजीराव रात्रौ भागीर्थीबाई यांस बोलावित असत. आसें येक दोन तीन वेलां जालें. हें बाईस कललें. त्याजवरून बाईनी मनाई केली. त्यास रागावून बाजीराव बोलूं लागले कीं आसे आहे, त्यापक्षीं आम्हांस बायको नको, आमचे मातेप्रमाणें आहे. आसें येक दोन च्यार वेलां बाईजवल बोलले. बाईहि रागें भरत. परंतु न ऐकत. त्यास आज गोष्ट निघाली. त्याजवर बोलले कीं ती तुमची सवत आहे. आसें बोलतांच रागें भरली, आणि मारूं लागली. तोंडांत व लाता आशा

१ पत्रें व वाती वगैरे लिहिवित होतों तें बंद केलें. हें मला बरेंच आहे. माझे चितास येईल तो जप करीन. कोणास कलणार नाहीं आसें बाई बोलली.

१ पहिले प्रमाणें मेहेनत नाहीं. सुखानें बसोन आइतें खावें. हें दैवानें चांगलें केलें. त्यांत भक्षावयास चांगलें आहे, परंतु खाशास मात्र आहे. ब्राम्हणास घालीन म्हटलें तर नाहीं आसें बाई बोलली.

१ सुर्तेत आपले स्वाधीन होतो. तेथून याप्रांतीं येऊन ही दशा व्हावी हे मनांत देखील नव्हतें. परंतु भावी हे खरे. कारभारी प्रामाणिक होते आणि यांच्या करण्याची तऱ्हा चांगली. ज्याचे बोट सांपडले त्याचा हात धरिला. परंतु उगेच कोणाचेंहि वाईट करीत नाहीं. यास्तव येवढा तरी खोटेपणा त्यांचे पदरीं घातला, हेंच पुरे आसें बाई बोलली.

१ व्यंकट सदासिव पेंडसे याचे चुलत बंधु केसो माहादेव यांचे घरीं आहे. त्यास देवी आल्या आहेत म्हणोन समाचारास बाई गेली होती. मारिल्या बहुत क्रोध आला. मोठे मोठे हती गेले, तेव्हां काय जालें, आसें आसोन काय करावें ? आशा प्रकर्णी गोष्टी बोलली. कलम १

छ ३ साबान,

१ बाजीराव यांस ज्वर आला. काविलीचा उपद्रव जाला आहे. सारावेल खेलतात, यामुलें रागें भरतात, म्हणोन शरीर किंचित् क्षीण जालें आहे. त्यांत ज्वरांश होतो.

१ भागीर्थीबाई यांस ज्वर येतच आसतो. किंचित कमी आधिक होतो. शरीर क्षीण जालें आहे.




---

७

¶*This report of Anandibai's doings and utterances sent by Krishnaji Janardan from Kopargaon to Nana Fadnis is a very important document running over about a month's period and received within a week of its arrival. This proves among other things that Anandibai was born in September 1747, that she had no knowledge of the plot to murder Narayanrao or Hari Babaji, that Bajirao was suffering from immoral diseases at the age of 13 and that Anandibai had absolutely no liberty beyond possessing food and clothing.*

No. 42] [19-5-1788

पा छ १२ साबान सु|| सम्मान.

श्री

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता छ १ साबान पावेतो क्षेम असे विशेष. येथील चाकरीविसी स्वामीनी कर्नाटकचे स्वारीस जातेसमई समक्ष आज्ञा केली आहे ते लक्ष धरून चाकरी करीत आहे. येथील चाकरी सारी संशयाची आहे. कोणी जितके संशय घेतील तितके समजावयास संभव दिसतात. यास्तवच मी स्वामीस पुर्वी विनंती केली की माझे वर्तणुकेत दोष येईल येसे कदापि घडणार नाहीं. कदाचित काहीक संशयाची गोष्ट श्रवणास आल्यास त्याची छान स्वामीनी समक्ष केली पाहिजे, कां की माझा बोलणारा स्वामीखेरीज स्वामीजवळ मजवाचून दुसरा कोणी नाहीं. त्यावरून मजला आश्वासन जाले ते ध्यानातच असेल. ईतके ल्याहवयाचे कारण काय तर माणुस तुफानी फार जाले आहे. अंगुष्टाचा दशासीर[1] करून दाखविणार. कोणते निमित्ते काय दोष समजवितील हे कळत नाही. बाहेर बाजारआवाई, मनस्वी लोक बोलतात. त्यास काय करावें? असो. बाजारआवाईसी मजला गरज नाहीं. मी पत्री फार काय लिहू? श्रीमंत राजश्री बाबासाहेबांचे लग्नास राजश्री सिव-रामपंत खासगी येथे आले होते. त्याणी येथील वर्तणुक सर्व दृष्टींनें पाहिली आहे. शोध केल्यास परस्परेच ध्यानास येईल. काही येक संशयाची छान मी समक्ष असोन जाल्याने मजला फार संतोष आहे तेणे करून माझी चाकरी करावयाची रीत ध्यानास येईल. स्वामीचीहि खातरजमा होईल. चिंता नाहीं. पुणियांत हजारो रुपये लाऊन लोकानी क्षुल्लक कामे विहिरी भिंती वगैरे केली व करतात, ते सहजा खाली जाते. संसारच आहे. करणे प्राप्त. त्यामध्ये स्वामीचे कृपेकरून मी लहानसे श्री गोपालकृष्णाचे देवालय बांधिले. त्याची सोय सुतार बेगारीचे मिलाले. लाकडे बेगारीनेच आली. जकात पडली नाहीं. मजुरी मसाला फार सवंग किफायतवार जाले म्हणून केले. तीर्थरुपाचे मानस होते त्याचा योग गंगा-तीरी घडोन आला. तेव्हां स्वामीस श्रुत केलेच आहे. तीर्थरूपाचे श्रम काय होते ते स्वामीचे ध्यानांत आहेत. त्याचे सार्थक स्वामीचे कृपेकरून जाले. मी येथे राहिलो. परंतु मजला स्वामीचे पायासिवाय दुसरा आश्रा काय आहे? जे होणे ते कृपेनेच होईल व जे जाले ते कृपावलोकनेकरूनच जाले. सर्व लौकिक स्वामीचाच आहे. आम्हो सेवकानी चाकरी मात्र करावी. सेवकाची आबरु वाढविणे धन्याकडे आहे. स्वामी सर्वज्ञ आहेत, मी निर्दोष चाकरी केली; समज-

---

[1] रावण.

ण्यात आले असल्यास उत्तम, नासिले आल्यास छान करून पाहिल्यावर ध्यानास येईल. त्याची मी चिंता करीत नाही. सर्व चिंता स्वामीस असत आहे. कलेल तसा प्रतिपाळ करावा. बहुत काय लिहणे ? सेवेस श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole, Head Officer appointed by Nana Fadnis to look after Anandibai's arrangements, writes a personal explanation saying how delicate is the position in which he has to work.*

---

*No. 43*] [*21-5-1788*

पौ छ १० रमजौन सु|| तिसा ज्येष्ठ.

**श्री**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। १४ साबान पावेतो क्षेम असे विशेष. कोपरगावी च्यातुर्मासाचे बेगमी बा। खर्चास यैवज पाहिजे, येविसी पूर्वी विनंतीपत्र व अजमास लिहून पाठविला. ते याद व पत्र पावले असेल. त्याप्रो। येवजाची आज्ञा जाली पाहिजे. याखेरीज कलमे.

यंदा सूर्यग्रहण परवणी मोठी आहे. यास्तव श्रीमंत मातुश्री आनंदीबाईसाहेब याणी तुला करावयाविसी लेहून पाठवावे म्हणोन आज्ञा केली. त्यावरून पूर्वी लि|| आहे. ग्रहण समीप आले आज्ञा जाली पाहिजे. त्या प्रो विनंती करीन. १

ग्रहणास स्वारी टोकियास येणार. मजला विनंती करावयाची आहे अजमास वहवाट समजावयाचे आहेत. तेथे दर्शनास येईन.

पा। धांवरफल येथील मामलत तुको मल्हार याजकडून दूर करून रा। धोंडो पंत थोरात याजकडे सांगोन माहालचे रुजुवातीस कारकून पाठविले असेत. १

पा। दाहिवेल येथील जावसाल रा। पांडुरंगपंत आचवल याणी गैरवाका समजाऊन पत्र पाठविले. त्याचे उतर स्वामीस लिहून पाठविले त्यावरून ध्यानास आले असेल हली सालमजकूर समानचा यैवज मारनिलेपासून घ्यावयाची त्यानी वराता केली आहे. पेशजी सालमजकूर पो म्हणोन मारनिलेपासून पाच हजार रुो घेतले होते. परंतु मागील आमीचे सुर्टीचे यैवजी घेतले पाहिजेत. सा। सालमजकूरचे यैवजाचा भरणा हाली करून घ्यावयास त्यास निक्षूण आज्ञा जाली पाहिजे. कलम १

चार कलमे लि|| असेत. याजवरून ध्यानास येईल. बहुत काय लिहावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole reports from Kopargaon of Anandibai's desire to weigh herself on account of solar eclipse and further solicits orders regarding the budgets for the next four months.*

*No. 44*] [*23-5-1788*

पा। छ १६ साबान

श्री

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ १० साबानपर्यंत मुकाम कोंपरगांव येथें आसे विशेष. श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब यांस ज्वर व काविळीचा उपद्रव जाला होता, त्यास दोन तीन दिवस उतार आहे. देवघरांत श्रीसांबाजवळ देवीची व स्कंदाची व गणपतीची आशा सोन्याच्या मुहुर्ती पहिल्या आहेत. त्यास सोन्याची मुहुर्त उग्र पूजेस नसावी आसी गोष्ट निघाली म्हणून ब्राह्मणास द्यावयाविसी उपध्येयाजवळ बोलली कीं याविसी पुण्यास लिहून उतर आणवावे. तेथून परवानगी न आली तर उपाध्यांचे जवळ बळें देईन आसे बोलली. पुण्याची परवानगी येके पक्षीं येणार नाहीं. पेशजी शुचिश्रुवे[1] सोन्याचे विसाजी आपाजी याणी नेले ते तसेच जामदारखान्यांत ठेविले आहेत. होमहवने जालेले ब्राम्हणास द्यावे ते तसेच आहेत. उदार बुद्धि नाहीं. त्यांत आमची मर्जी कोण पाहतो. धोंडो खंडाजी विठल गोपाळ घन:श्यामसिंग याप्रमाणें बाजीराव आसे करून ठेविले आहे. मग इतके कशास पाहिजे. सारांश पुण्याची परवानगी मुहुर्तीविसी न आली तर पुण्यासच पाठऊं. प्रवालाचा गणपतीहि देणार; पाचेचे मोर पुण्यास श्रीमंतास पाठवावे. त्याजयोग्य आहे. त्यापक्षीं तिकडे पाठवावे अशा गोष्टी बाई बोलत होती. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

¶*Krishnaji Janardan reports that Anandibai wishes to dispose of the gold idols of certain deities which have a frowning appearance. Anandibai bewails her lot.*

---

*No. 45*] [*31-5-1788*

पौ छ १० सवाल सु॥

तिसा आशाढ.

श्री.

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ २४ साबान पावेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत मातुश्री आनंदीबाई-साहेब याणी श्रीसांबाकडील सोन्याच्या मुहुर्ती उग्र आहित त्या ब्राह्मणास द्यावयाची

---

१ शुचिस्रुवा = पळी.

योजना केली त्यावरून पूर्वी सेवेसी विनंतीपत्र लि॥ आहे. त्याचें उतरी आज्ञा जाली कीं, सांबाजवलच्या मुहुर्ती बहुता दिवसाच्या देऊ नये म्हणौन विनंती करावी; त्याप्रो विनंती केली. त्यावरून हाली त्याणीच आपणास पत्र लिहिविले आहे ते अलाहिदा पाठविले आहे. पावेल. जसी आज्ञा होईल त्याप्रो विनंती करीन. कोंपरगाव येथील मुकामचे खर्चास रा जनार्दन गोपाल याजकडून पंनास हजार रुो देविले. परंतु मारनिलेनी पूर्वी मजला लिा होते कीं चालीस हजार रुो आम्हांकडून पावतील. तो मजकूर मी पुणियास लिा आहे. त्याजकडे यैवज असेल म्हणौनच पंनास हजार रु॥ देविले असतील. हाली त्याजकडे पत्रे पाठविली आहेत. उतर येईल ते सेवेसी लिहून पाठवीन. बहुत काय लिहावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री राघो केशव ठोसर यांस श्रीमंत मातुश्री बाईसाहेब याणी पत्र ल्याहावयांस सांगितले ते लिहून त्याची नकल पाठविली आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole communicates Anandibai's wishes to have three golden idols disposed of.*

---

*No. 46*] [*12-6-1788*

पौ छ १० रमजान सु॥

तिसा जेष्ठ.

**श्री.**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानिक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता छ ७ रमजान पावेतो क्षेम असे विशेष. कोपरगाव येथील मुकामचे खर्चास यैवज कार्तिक अखेर पावेतो बेंगमी बा द्यावयाचा आहे. त्यास रा जनार्दन गोपाल कारकून शहरास यैवजाचे वसुलास गेले आहेत. त्याजकडे सिलकेस यैवज किती राहिला असेल त्याचा शोध घेऊन लिहून पाठवणे म्हणौन आज्ञापत्र आले. त्यावरून मारनिलेकडे पत्र पाठविले. त्याचे उतर आले कीं पंनास हजार रुा सुभ्याकडून यावयाचे राहिले आहेत. ते वसूल करावयास दोन मास लागतील. तोंपावेतो आम्हांबरोबर पागेची घोडी वगैरे खर्च आहे. त्यास चंदीबा व बारगीर गाडदी आहेत त्यास रोजमरा मिळोन दरमहा पाच हजार रुपयांचा खर्च आहे. त्यांस दोन मिहिन्याचे अजमासे दाहा हजार रुो लागतील. ते वजा करून बाकी चालीस हजार रुो दोन महिन्याचे सुमारे पावतील. याप्रमाणे लिा आहे. असो; हा यैवज देविल्यास जवलचे जवल पुढे उपयोगीं पडेल; परतु लाख रुपये पाहिजेत. त्यापक्षी निमे पंनास हजार पावेतो दुसरेकडून पावते

जाल्यास काम सोईस लागेल. पुढे निमे पंनास हजारास शहरचा यैवज काय येईल, तो ठीकच समयास पाविल असा पर्याय आहे. याजवर जसी स्वामीची आज्ञा येईल त्याप्रमाणे वर्तणूक करीन. सारांश पर्जन्य लागला नाही तों यैवज पावता जाला पाहिजे. येथील खर्चास यैवज द्यावाच लागतो. त्या[प]क्षी कांही नेहेमीची नेमणूक हरयेक माहाली केल्यास, नित्य नवी तरतूद करावी लागणार नाही; आणि येथीलहि सोय निघोन येईल. सर्व स्वामीचे ध्यानांत आहेच. वरचेवर यैवज पावता जाल्यास क्रम चालला आहे, हाहि चागलाच आहे. बहुत काय लिहावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole requests supply of funds for Anandibai's expenses.*

---

*No. 47*] [*12-6-1788*

पौ छ १० रमजान सु॥

तिसा जेष्ट.

**श्री.**

सेवेसी आपाजी राम सहस्रबुध्ये कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ ७ रमजानपावेतों स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीस येथील वर्तमानाची पत्रे पाठवितो ती प्रविष्ट होतच आहेत. उतरे देवावयाची आज्ञा असावी. पेशजी सबनिसीकडील कारकुनाचे नाते वाड्यांत आहे म्हणून येथून लिहून पाठविले होते; व सिलेदार मंडलीस भोजनास बागेत बलाविले वगैरे याचे उतर आले नाही; त्यास उतर देवावयाची आज्ञा असावी. श्रीमंत मातुश्रीबाईसाहेब जेष्ट शु॥ ८ अष्टमी बुध (वा ?) री आंबे याचे वृत करीत आहेत. खर्चास अजमासे रुो ४० चालीस पावेतो लागतील. बागेचे बंगल्यात भोज्यनास गेली. तेथे कृष्णाजीपंत आबेकर व सबनिसीकडील रामाजीपंत पटवर्धन व येक पुराणिक याप्रमाणे होते. स्वारी सिकारी देवदर्शनास जात येत आहेत. बाईसाहेब कुभारीस सोमवारी गेली होती. मागाहून सविस्तर लिहितो. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Appaji Ram reports Anandibai's doings from Kopargaon.*

---

*No. 48*] [*18-6-1788*

**श्री**

सेवेसी विज्ञापना ता। छ ११ सावान पावेतो क्षेम असे विशेष. येथील खर्चा-वेचाचे वृत्त श्रुत करावयाचे आहे. भेटी जाल्यावर सविस्तर निवेदन होईल.

नित्यातील किरकोळ कार्याकारण समजोन केले पाहिजे ते करीत आहेंच. त्याचा तपसील पूर्वापरसंमत्र स्वामीचे आज्ञेचा आहे. कदाचित उपाध्येबावाचे बाळण्यांत खर्चाविसीचे बोलणे कांहीं निघाल्यास मी समक्ष असल्यावाचून समज पडणार नाही, यास्तव सू[च]नार्थ लि॥ आहे. विशेष अर्थ नाही. परतु वहिवाट समजोन आज्ञा होणे ते जाली पाहिजे. हे चिठी गोप्यच राहिली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. याचे उतराचेहि कारण नाही. चिठी वाचिल्यावर ठेवावयाचेहि कारण नाही. हे [वि] ज्ञापना.[१]

¶*Govind Krishna Godbole to Nana Fadnis proposing a personal visit for arranging the expenses of Anandibai.*

---

*No. 49*] [*19-6-1788*

पौ छ २६ रमजान

सु॥ तिसा.

श्री.

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ १४ रमजान पावेतो क्षेम असे विशेष. पाा धाधरफळ येथील कमाविसीचा मजकूर तुम्ही व राजश्री धोंडोपंत माळेवाडीकर याणी लिहिला. त्यास धोंडोपंत याणी लिाा कीं, कमाविसीने मजकडे सांगावी. कमाल आकाराप्रो बेरजेस आणून देऊ. कचा हिसेब सरकारांत समजाऊ म्हणौन लि॥; व तुम्ही मख्त्याने सांगावी म्हणून लि॥. त्याजवरून धोंडोपंतानी लि॥ आहे हे बरेसे दिसते. येविसीचा दुसरा पर्याय काही तुमचे समजण्यात असिल्यास सविस्तर लेहून पाठवणे म्हणौन आज्ञा. यैशास मामलतीचे पर्याय दोन. त्यात मख्त्याने सागितली तत्रापि पर्जन्याचे स्वाधीन आहे. आपत्ती पडल्यास पुन्हा सुटीचा हिसका आहे. तशांत धोंडोपंत जुने कोठीतील. याचे करण्याची रीत आली-कडील काहीयेक करण्यास मिळावयाची नाही. यास कमाविसीने मामलत सांगितली असतां सरकार किफायत करावयास कमी करणार नाहीं. यास्तव कमाविसीनेच याजकडे मामलत सांगावी, हा पर्याय मजला चांगला दिसतो. येविसीची काय आज्ञा ते सत्वर जाली पाहिजे. बहुत काय लिहावे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna asks Nana Fadnis the arrangement of the revenues of Dhadharfal.*

---

१ चिठी गोविंद कृष्ण गोडबोले यांजकडून

No. 50] [20-6-1788

पौ छ १० रमजान सुरु तिसा जेष्ट.

श्री

सेवेसी केसो माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ १३ साबान परियेत स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्तित असे. राजश्री सिवराव पवार याचे पतक कोपरगावी चाकरीस आले; व राा धिराजी पवार याणी चाकरीस यावे ते अद्याप परियेत येत नाहीत. स्वामीची आज्ञा होती त्याजवरून त्याजकडेहि पत्र पाठविले आहे; परतु यावयाचा प्रकार काडीमात्र दिसत नाही. प्राा बाहाल येथील गावगना कही करून गाव खराब केले आहेत. घोडी वगैरे त्याजकडेस आहेत. स्वामींस कलावे म्हणोन लिहिले असे. इकडील वर्तमान उभयेता श्रीमंत सुखरूप आहेत. श्रीमंत मातुश्री बाईसाहेबहि बोलली कीं, आमचे व कारभारी याचे कधीं येकोपा होऊन चांगलें कधीं होईल ते पाहावें. काये निमित्य, असे किती दिवस वेगलेपणे आसावे, हे काही चागले नाहीं. मी उतर केले नाहीं. लटके उतर करून कलागत लावावी याजकरिता उतर केले नाहीं. पोवाराचा बदोबस्त स्वामीनी आज्ञा केली पाहिजे. सेवेसी कलावे म्हणौन सेवेसी विनंती लिहिली असे. बहुत काय लिहिणे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Keso Mahadeo writes from Kopargaon an account of Anandibai's doings. She expresses desire to be reconciled to Nana Fadnis.*

---

No. 51] [23-6-1788

पौ छ १६ साबान

मु॥ समान वैशाख

श्री

सेवेसी विज्ञापना. येथील प्यादे कुलबिणी पुणियास जाऊन जेथे जसे पाहिजे तसे बोलतात. त्याजवरून येथील कारकून वगैरे याजकडे दोष काय समजण्यांत आले असतील, त्याचे फडशे स्वाम तेथील करीतच आहेत. कोणांकडे काय दोष हा पुर्ता समजोन, ज्याची त्यास सिक्षा जाल्याने येकक काम उलगड्यांत आले. येथील राहाण्यातील सेवटी फलश्रुत हीच आहे. होय नाही काही म्हणवत नाही. स्वामीचे पायासी निष्टेने चालल्यास पार पडेल. चिंता नाही; परतु लाहान माणसाचे पगतीस बसावे लागते, हाच मृत्य आहे. असो; स्वामीनी पाहिजे तसे करावें. दोपियाचे पारपत्याचा संतोष आहे. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*Nana Fadnis' agent with Anandibai makes a complaint to him of the false reports that menial servants carry to Poona.*

No. 52] [24-6-1788

श्री

पैवस्ती छ १३ सवाल सुरु तिसा आषाढ.

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १९ रमजानपर्यंत मुकाम कोपरगांव येथें असें विशेष. दिनचर्येचें वर्तमान विनंतीपत्र लिहिलें आहे.

छ ६ साबान. सौभाग्यवती भागिर्थीबाई यांस समाधान नाहीं, म्हणोन आंतोजी फटांगरा जेऊरकर भगत बोलावितात. तो म्हणतों कीं तुमचे मागील नवस कांहीं तरी आहेत ते फेडावें म्हण जे चांगलें होईल. त्यास हें खरें; आमचे मागील नवस श्री त्रिबकेश्वर व सप्तशृंग व कोंकणांत हरिहरेश्वरास व गणपती पुळ्यांचा व ग्रामदेव ऐसें नवस पहिलेंच आहेत; परंतु म्हटलें तर लबाडी दिसतें. आणि आमचें अगत्य कोणास आहे ? आणि देवास आमची आवस्ता सर्व ठाऊक आहे, असें बाई बोलत होती.

कलम १

छ ७ साबान पहिल्या ममता किंवा अगत्यें ही सर्व गेलीं. ते कसें तरी घरचे पुरूष होते. आतां कोण आहे ? असें बाई बोलत होती. कलम १

छ ८ साबान. देवघरांत श्री सांबाकडील सोन्याच्या मुहूर्ती आहेत. त्यास सुवर्णाची मुहूर्त उग्र असते; त्यापक्षीं असों नयेत. ब्राम्हणास द्यावयाविशीं फार वेळ सांगितलें; परंतु कोणी न ऐकत. त्यापक्षीं आतां देण्यावसी उत्तर आणावें. नाहीं तर तुमच्या घरीं ठेऊं, असें उपाध्याजवळ बाई बोलत होती.

कलम १

छ ९ साबान. येकादशीस बाईनी वसंतपूजा केली. कोपरगांवचे व येथील ब्राम्हण पस्तीस होते. कलम १

छ १० साबान. पहिल्यानें भेटी जाल्या तेव्हां हरिपंत बहुत मर्यादेनें स्वछ बोलत आणि आम्हासहि फार भरवसा होता; परंतु त्याचें लक्ष दौलत रक्षणाकडें आहे. त्यापक्षीं दुसरें जाणत नाहीं. चांगलें आहे. असे चाकर मिळणें कठीण आहे; असें बाई बोलत होती. कलम १

१९-५-१७८८

छ १२ साबान. सोमवारनिमित्य बाजीराव यांची स्वारी सिंगेश्वरास गेली होती. बराबर केसो माहादेव व आपाजी राम होते. कलम १

छ १३ साबान. खिलार वगैरे जुनें फार होतें. घोडीं व सर्व सरंजाम स्वारींचे तयारींचा निवडक आम्हाबराबर होता, तितका सर्व लूट केली. मोठी लढाई करून गर्नीम मोडला म्हणोन लूट केली. बरें, वस्तवानी जपून तरी न्यावी तेंहि जालें नाहीं; असें बाई बोलत होती. कलम १

छ १८ साबान. भागिर्थीबाई यांस समाधान नव्हतें. म्हणोन ब्राम्हणभोजनाचा नवस केला होता. म्हणोन कचेश्वरीं बाई दोन प्रहरीं भोजनास गेली होती. पंचवीस ब्राम्हणभोजन जाहालें. बाहेर मंडप कनाता दिल्ह्या, तेथें बाईचें भोजन जाहालें कलम १

छ २० साबान. पूर्वी सुरतेमध्यें इंग्रजानें आम्हांस बहुत सुख दिल्हें. पूर्वद्वेष होते, परंतु त्या द्वेषानें हालीं आम्हास कैदेंत ठेवावें तें कांहींच न केलें. तस्मात राज्याची आशी तऱ्हा असते कीं दुसऱ्या राज्यासीं वाईटपणा असल्यास त्यास युध्यामध्यें धरावें आणि परागंदा होऊन आल्यास त्याचें संरक्षण करावें असा धर्म आहे; असें इंग्रजानें केलें. आणि ब्राम्हणी राज्यामध्यें न्यायच नाहीं; असें बाई बोलत होती. कलम १

छ १६ साबान. गुदस्तां गंगेस पूर आला. असा यंदा आल्यास पहिल्यानें आम्ही मुलांसुद्धां बाहेर निघोन जेथें पाणी येत नाहीं तेथें जाऊं. येथें वाड्यांत राहाणार नाहीं; असें बाई बोलत होती. कलम १

बाजीराव संकट चतुर्थीस मौन करीत होतें. त्याचें उद्यापन केलें. कलम १

छ १७ साबान. बाईची स्वारी कोपरगांवास गेली. यज्ञेश्वरभट पुराणीक वाड्यांत असतात. त्यांची स्त्री प्रसूत जाली आहे म्हणोन समाचारास गेली होती. येत्यें समयीं कोठींचें घर नवें होत आहे तेथें पाहावयास गेली होती. कलम १

छ १९ साबान. सोमवारनिमित्य स्वारी तृतीय प्रहरीं बाजीराव यांचा संवत्सरास देवदर्शनास गेली होती. आपाजी राम व केसो माहादेव यांचे चिरंजीव बराबर होते. कलम १

छ २१ साबान. आतां या मंडलांत शिंदा मात्र नामधारी आहे; त्याचें तेजानें येथें देखील दाब आहे. यांचेणें मोठें काम त्याशिवाय करवत नाहीं. आम्ही इतक्या पेंचांत पडावयास कारण शिंदा. सारांश कलियुगांत निमकहरामी केल्यानें येश येतें हें खरें; असें बाई बोलत होती. कलम १

छ २३ साबान. नानास या दौलतेचें सूख काय आहे ? घरांत मूलबाळ संसारिकाचें सूख तें नाहीं. दौलत तरी काय करावी ? उगीच डोईवर जी गोष्ट घेतली ती आतां उपाय नाहीं म्हणोन करितात; नाहींतर त्याचें सुख ते जाणत. त्यांत आम्हीमात्र सुखांतच आहों. नित्यखर्चाची काळजी किमपि नाहीं, असे बाई बोलत होती.

कलम
१

छ २५ साबान द्वादशीस दोन प्रहरीं भोजनास बाईची स्वारी व अमृतराव कोपरगांवीं पवारांचे बागांत गेली होती. त्यास प्रहर दिवसापासून स्वारीची तयारी जाली. बराबर जाधव व बांडे वगैरे होते. त्यांत कोणी उपाशी आहेत अशी गोष्ट निघाली; त्यावरून शिलेदार मंडळीस भोजनास बलाविलें.

१ हणमंतराव जाधव यांचा पुत्र.
१ बांडे.
१ शेख मिरा.
२ पवार.
१ वाघोलीकर जाधव.
३ शेला(क ?) रांचीं मुलें.
—
९

इतक्यांस भोजनास बलाविलें. भोजनसमयीं पंवारांची प्रार्थना केली कीं आम्ही ते धारेस होतों, तेव्हा पंवार याचा

छ २२ साबान. बाजीराव याची स्वारी सिंगेश्वरास देवदर्शनास गेली होती. नंतर घोडी फेरून आले. बराबर केसो महादेव व आपाजी राम होते.

कलम
१

छ २४ साबान.

१ तृतीय प्रहरीं बाजीराव याची स्वारी सोनारीस देवदर्शनास गेली. येत्येंसमयीं हिंगणीकडून आले. बराबर आपाजी राम व केसो माहादेव होते. कलम.

१ बाईची स्वारी गंगाप्रदक्षणेस गेली होती. संवत्सरास गेली तेथें रामचंद्र बलाळ केळकर भेटला. तो पुण्याहून प्रस्तुतच जयरामपंत बापटाकडून आला, म्हणोन त्याजवळ पुसत होती. तुझें आंगीं काय लागलें किंवा कसें जालें ? त्याजवरून बो(ल)ला कीं कांहीं लागलें नाहीं. उगेंच कैद करितात असें बोलणें जालें. कांहीं दुसऱ्याचें सांगितल्यावरून करितात; चौकशीनें खरेंपणा जाल्यानें सोडितात; असें आहे म्हणोन बोलत होता. नंतर स्वारी आली. कलम
—
२

छ २६ रोज सोमवारनिमित्य बाजीराव यांची स्वारी कुंभारीस देवदर्शनास गेली होती. टोंक्यास तुला होणार ही गोष्ट निघाली होती. त्यावरून

भाऊपणा पहिला होता. त्यांस हें धनीपण्याचें जेवण नव्हें भाऊपण्याचें आहे; असें खिजमतगाराबराबर सांगून पाठविलें. भोजनें जाल्यावर बाहेर त्यांणीं विडे घेऊन स्वारी निघाली. बराबर केसो माहादेव होते. कलम १

छ २८ साबान. सूर्यग्रहणानिमित्य वाड्यांत दानधर्म जाला. भागिर्थीबाई यांचे राशीस वाईट होतें म्हणोन शांत जाली. कलम १

छ २ रमजानीं. भागिर्थीबाई यास ज्वर येत होता, तो कमी जाला होता. तो छ मजकुरीं मागती आला. कलम १

छ ४ रमजान. दोनप्रहरीं बाईची स्वारी हिंगणीस मुक्तेश्वरास गेली. नंतर गांवांमध्यें जनार्दनभट दिघे आहेत, त्यांचें घरीं गेली होती. नंतर कुंभारीस देवास स्वारी गेली. नंतर सायंकाळीं च्यार घटका दिवसास स्वारी आली. बराबर केसो माहादेव यांचे चिरंजीव जगंनाथ केशव होते. कलम १

छ ८ रोज रमजान; बाईचें बोलणें.

१ माहायात्रेस जाण्याची गोष्ट निघाली. पूर्वी माधवराव असतां थोरली बाईचें जाणें जालें नाहीं. त्यापक्षीं आतां कोण पाठवितो ? घरांतील म्हातारी भोंवतें आहेत. नाना, बोलली कीं योग्य आहे. थोर आहेत. आम्हासारख्यांनीं काय करणें ? परस्वाधिनतेमध्येंच सारे दिवस गेले. मग होणें समजलेंच आहे. असें बाई बोलत होती. कलम १

छ २९ साबान. येथें खर्चाच्या नेमणुका जशा आसाव्या तशा आहेत. परंतु आमचा धनीपणा यांतच असतां तर आमची मर्जीनरूप होतें, तें नाहीं; त्यामुळें हीं माणसें सांगितल्याप्रमाणें करीत नाहींत; असें बाई बोलत होती. कलम १

छ ६ रमजान बुधाष्टमीचें व्रत केलें. त्यांस हें व्रत आठ बुधाष्टम्या पूजन करावें असें आहे. त्यास इतक्यास फार दिवस लागतात म्हणोन आतांच आठ पूजा करून उद्यापन केलें. बाईने केले. कलम १

छ ७ रमजान. पुण्याहून धोंडभट भागवत याजकडून परशराम कृष्ण काणे भागिर्थीबाईचे समाचारास आले होते. ते मागती जातें समयीं बाईकडें निरोपास आले. त्यास पुण्यास जातेसमयीं बोलणें जालें.

१ हरीहरेश्वर कोल्हापूर व पुळ्याचा गणपती व त्रिंबकेश्वर व सप्तशृंग इतके जागचे पूर्वीचे नवस आहेत, तेथें जाणें होत नाहीं म्हणोन घरांत शरिरास उपद्रव होतात ; अशी गोष्ट

व भाऊ व साहेब यांचे अलीकडे कोणी पराक्रमी नाहीं. माधवराव यांणी वडिलांस कैद केलें म्हणोन आतां कारभारी धन्यासच कैद करितात. या गोष्टी माधवराव याजपासून जाल्या, त्यापासून चालतात.

१ अमृतराव यास टाकावें याविशीं विसाजी बापू बोलत होता कीं निराळें ठेवावें; असें घरांत फोडीत होते. घर फोडणार सारे आहेत.

१ बाजीराव याची स्वारी हिंगणीस देवदर्शनास प्रहर दिवसास गेली, ती दोन प्रहरां आली. केसो माहादेव यांचे चिरंजीव व आपाजी राम होते.

---
३

छ ११ रमजान. कोपरगावीं माहादेवभट अग्निहोत्री याचें घरीं चतुर्मास्यें जालीं. त्यानिमित्य आवभृत स्नानास बाजीराव व आमृतराव व चिमाजी आपा व बाई व सावित्रीबाई व भागिर्थीबाई यांची स्वारी गेली होती. बराबर केसो माहादेव यांचे चिरंजीव व आपाजी राम ऐसें होते. येत्यें समयीं त्रिवर्ग तीन हतीवर किलाव्यांत बसलें होते.

कलम
१

छ १२ रमजान.

१ सरंजामी शिलेदार यांस भोजनास बलावीत जाउं नये, म्हणोन केसो माहादेव यांणीं बाईस विनंती केली, ही गोष्ट बाईनी आमृतराव यांजवळ बाळाजीपंत लेले वगैरें यांजवळ काढावी म्हणजे परस्परें नानाचें कानीं जाईल. येणेंकरून तरी जाणें होईल असें बोलली.

१ धोंडभट भागवत यांचे स्त्रीस येथें पाठवावें. दोन महिन्यांनीं जातील.

१ शिवशंकर शास्त्री यांस येथें पाठवावें.

---
३

छ १० रमजान; बाईचें बोलणें.

१ बाजीराव थोर जाले असतां अद्यापि मर्यादेची तऱ्हा नाहीं. कालचर्येस काय म्हणावें ? आम्ही पेचांत आणि मुलें अशीं. तशांत हा मुख्य. याची तऱ्हा अशी नसावी. याचें दैवानें चालतें आणि यांणी असें असणें हा दैवयोग आहे.

१ राज्यानें जुने कारभारी दूर करुं नये, अशी गोष्ट निघाली. त्यावरून बोलली कीं पूर्वी साहेबांस मी सांगत होत्यें कीं नाना व सखारामपंत व मोरोबा व हरिपंत इतक्यास निरोप देऊं नयें. उगेंच असणें. तथापि लष्करांत राहातील असें बोलणें जालें. त्यास या गरीबांनीं काय करणें ? असें उत्तर बोलिलें. त्यांणीं गरीबी काय करणें तें केली, हें आतां पाहावी.

१ येथें आलीकडें पायमली होते येथें सर्वांस कळलें कीं हे धनी नाहीं. हें सर्वांस समजलें यामुळें कोणी ऐकत नाहीं.

---
३

सांगितलें; आणि बाई बोलली कीं इतके संशय त्यास आहेत, त्यापक्षीं येथें कोणा कारभाऱ्यांस किंवा बाहेर कोणांस भोजनास बलावितो, त्यांसहि बलाऊं नयें असें असल्यास यांसहि बलावणार नाहीं; याविशीं बातमीच्या पत्रांत लिहावें म्हणोन मला बाईची आज्ञा जाली, त्याप्रमाणें लिहिलें आहे.

१ सायंकाळीं स्वारी बाई बाजीराव यांची, सालगुदस्तां गंगेस पूर आला तेव्हां जेथें पाणी आलें नव्हतें त्याजाग्यांस गौखाना बांधितात, छपरें घातलीं, तेथें पाहावयास गेली होती.

१ पूर्वी पुण्यांत असतां साहेब उष्णा पाण्यानें अर्घ्यें देतात असी गोष्ट निघाली. त्यावरून चौकसी पाहातां देत नाहीं असें जालें. ही गोष्ट साहेबांचें कांनीं गेल्यावर बोललें कीं माधवराव सर्वशंकी जाला. हा फार दिवस वांचत नाहीं. सर्वशंकीपणा वाईट. अशीच नानाची तऱ्हा जाली आहे. असें असों नयें. याप्रमाणें बाई बोलत होती

—
३

छ १५ रमजान.

१ बाई चतुर्मासांत उपोषणें करणार आहेत. फराळाचे तरतूद पाहावयाविशीं आज्ञा जाली आहे.

छ १३ रमजान.

१ कोणास भोजनास बलाऊं नयें असें असल्यास बायकोस देखील भोजनास बलावीत नाहीं असें बाई बोलली.

१ बाजीराव खेळत होते, इतक्यांत उंदीर मेलेला सांपडला. त्यास धाल्प्या मेळऊन अग्न लाविली. असें मनस्वी खेळणें खेळतात.

१ उपाध्येबावा श्रीत्रिंबकेश्वरास गेले होते. ते आले. तेथें माहारुद्रकरून आले.

—
३

छ १४ रमजान. पहिल्यानें विसाजीबापू आला तेव्हां सांगितलें कीं तुम्हास जवाहिरखाना व तोफखाना या दोन कारखान्यांचा भ्रम आहे त्यापक्षीं हें घ्यावें. वरकड सरंजाम आमचे तुमचे विचारें जसें करणें तसें करूं, असें सांगितलें; परंतु कांहींच केलें नाहीं. उगीच धरावर केली. याणे आमचा व तुमचा दोघांचा नाश जाला. हेंच पहिल्याने समजून करतें तर ठीक होतें; परंतु आमची अमर्यादा करून डौल मोडले हें काय? असें बाई बोलत होती.

कलम
१

छ १६ रमजान. श्रीगंगेस माहापूर आला म्हणोन बाई व बाजीराव यांची स्वारी चापसरीकडे पाहावयास गेली होती. नंतर बाईनीं सायंकाळी गंगेची पूजा केली.

कलम
१

१ बाळाजी विश्वनाथ फाटक होता, तेव्हां वाड्यांतील भाजी व दूध व फराळाचें जिनस वगैरें वाड्यांतील चौकशी वरचेवर पाहत होता. आतां कोणी पाहात नाहीं, असें बाई बोलत होती.

१ कोपरगांवीं ऋग्वेदी व यजुर्वेदी ब्राह्मण यांचा कजिया आहे; तो मनास आणावा म्हणौन बाईनी केसो माहादेव यांस आज्ञा केली आहे.

---
३

सप्तशतीचा पाठ बाई नित्य करित असतात. चातुर्मासांत नेम करणार आहेत. अमृतराव अष्टमी चतुर्दशीस नवमी इतक्या दिवशीं सप्तशती पाठ करीत असतात. कलम १

छ १७ रमजान. संकटचतुर्थी बाई व अमृतराव मौन करीत असतात.
कलम १

छ १८ रमजान

१ उदाजी शिंदा खिजमतगार पहिला बाजीराव याजकडे होता, त्याचा लाहानपणापासून धाक होता; आणि तो चांगला होता. औषधें व मंत्र विंचूचे वगैरें बहुत येत असत. वेळेस उपयोगीं पडत असें. त्यास निर्निमित्य घालविलें. असा होता तो वाईट जाला असें बाई बोलली.

१ येथें खिजमतगार व कारकून वगैरें माणसें आहेत. यातून आमची जो अमर्यादा करील तो कारभाऱ्यास चांगला वाटतो, हें काय? सारें कालानरूप आहेत.

१ मागील चौकांत येक आंगें पूर्वेकडें निमपडवीची गच्ची होत आहे.

---
३

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Anandibai's words and actions are reported to Nana Fadnis from Kopargaon by Krishnaji Janardan.*

---

*No. 53*] [*29-6-1788*

पौ छ १० सवाल सु॥
तिसा आशाढ.

**श्री**

सेवेसी केसो माहादेव कृतानक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ २४ रमजानपावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीकडून आज्ञापत्र येऊन वर्तमान कळत नाही. आज्ञापत्र पाठवावयास आज्ञा

जाहाली पाहिजे.. यानंतर हिकडील वर्तमान येथास्थित आहे. वरकड वर्तमान राजश्री गोविंदपंत याणी लिहिले आहे त्यावरून कलेल. येथील बंदोबस्त आज्ञे-प्रमाणे राखून आहे. +श्रीमंत बाबासाहेब कांही कोणाचे लिहिणे याजविसी बहुत बोलतात, परंतु आईकत नाहीत. याजकरिता राजश्री राघोपंत याजला पाठविले पाहिजे. श्रीमंत मातुश्री बाईसाहिब नाना प्रकारे सिव्या सर्वास देत आहेत, की कारभारी आमचे आज्ञेत नाहीत. आम्ही त्याच्या कईदेंत आहो. जसे करतील तसे चालावे लागेल. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*Keso Mahadeo reports the bad manners of Bajirao.*

---

*No. 54*] [*30-6-1788*

पो १० सवाल सु॥ तिसा आशाढ.

श्री

सेवेसी आपाजीराम सहस्त्रबुध्ये कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता छ २९ रमजानपावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब याणी आठचार दिवस छंद घेतला कीं कोपरगावी पोवाराचे वाड्यात जाऊन राहाणें. कारण काय तरी साल गु॥ माहापूर आला तैसाच सालमजकुरी येईल. त्यास विनंती केली की असा पूर वारंवार येत नाही. काळजी करू नये. श्रीमंत राजश्री बाईस पुसिले. उत्तर केलें की मी व आमृतराव जात नाही. मूल लाहान याजकरिता भितो. नंतर त्रिवर्गानी विचार केला कीं हे चांगले नाही. मंग त्याची समजी काढावयाकरिता राजश्री गोविंदपंत गोड(बो)ल यांजकडून विनंती करविली जे पुण्यास लिहून पाठवितो. तेथून उत्तर येईल त्याप्रमाणे विनंती का. सारांश जावयाचे ठीक नाही. दोहो जागा चौकी पाहारा करावयास दोन ताण हे जाणून येथून जावयाचे चांगले नाही. परंतु वे॥ राजश्री लक्ष्मणभट कर्वे उपाध्ये स्वामीस कोपरगावी जाण्याविसी लिहितील याजकरितां जाहाले वर्तमान सेवेसी लिहिले आहे. दोन जागां राहावयाची सोय चांगलीसी दिसत नाही. ऐसा माहापूरहि वारंवार येत नाही. सबनिसीकडील कारकून पुण्यास निघोन गेला. छ २२ रमजानी स्वारी कुभारीस गेली होती. वरकड मातुश्रीचे भापण दिनचर्येचे कचे राजश्री कृष्णाजीपंत आंबेकर लिहितात. बोलण्यात दिवसामध्यें काय बोलावे हे भानच राहत नाही. अनिवार भाषण

---

+ येथून अक्षराचें वळण निराळें.

करित असतात. सोन्याच्या मुहूर्ती दोन देण्याचा आग्रह आहे. सेवेसी कचे वर्तमान राजश्री गोविंदपंत गोडबोले याणी लिहिले आहे. दुरुक्त बोलणे जे आपण सोन्याची तूला केली आणि आम्हास पाच सातशे रूपयाच्या मुहुर्ती देऊ देत नाही. ऐसे कितेक प्रकारे बोलली. सेवेसी श्रृत होय हे विज्ञापना.

¶*This is a daily report from Kopargaon about Anandibai. Bajirao anticipates high floods to the river and therefore entreats to be removed to a safer place. Orders for the same are solicited from Poona.*

---

*No. 55*] [*30-6-1788*

पेाा छ १३ सवाल सु॥ तिसा आशाढ.

**श्री**

विज्ञापना. तागायत छ २९ रमजानपर्यंत मुकाम कोंपरगांव येथे आसें विशेष. दिनचर्येचें वर्तमान—

छ १९ रमजान.

१ धोंडो खंडाजी कवले गरीब बहुभाष्य मात्र होता. निरापराध कैदेंत आहे. बरें; तो त्यांचे पक्षांतील होता. आम्हीं तर कारभाऱ्याचे पक्षांतील होतों. आम्हांवर तरी निमित्य काय ठेविलें. निरापराध कैद केलें. त्यांत आमचे मुलींची देखील भेट होऊं दिल्ही नाहीं. पूर्ववयांत आली हेंहि पाहों दिल्हें नाहीं. यांसहि मुलें आहेत. नाना मात्र येकटे आहेत. हरिपंताचीं मुलें लेकरें आहेत. पेशजी हरिपंत आले तेव्हां विचारिलें. आसें होईल, हें ठाऊक नवतें आसें उत्तर केलें. यांचे मागील जन्मी मुलाबालास दुःख दिल्हें त्याचें उसणें

छ २० रमजान.

१ गंगेस पूर आला तेव्हां जेथें पाणी आलें नव्हतें तेथें गाईस छपरें घातलीं आहेत; तेथें बाईची स्वारी गेली होती. उंचवटा पाहून सभोंवते शेर लावावयाची ताकीद जाली आहे. बाई बोलली—

१ श्रीसांबाकडील सुवर्णाच्या मुहूर्तीविसीं बोलणें : देव फार दिवस आहेत; परंतु जेव्हांपासून जालें तेव्हांपासून वाईटच जालें. ज्यांजवल सोन्याच्या मुहूर्ती होत्या त्यांचें बरें काय जालें.

१ नारायणराव यांजवल गणपती होता.

१ या मूर्ती जाल्या त्यापासून.

—

२

याणी घेतलें. इतक्यानें जन्मांतर फिटलें आसें आम्हीं यांचे काय केलें होतें; परंतु त्यांत येक चांगलें झालें. मुल थोर जाली हें पाहिलें आसतें तर बहुत दुःख होतें व पूर्वद्वेषांतून सुटलों. या दोन गोष्टी चांगल्या जाव्या ; आसें बाई बोलत होती.

१ मागील चौकांत भोजनशालेच्या ओटीवर बाजीराव यांचे स्मार्ताची खोली आहे ती मोडून दुसऱ्या कोनावर बाईचे खोलीचे आंगें करावी आसें बाईनी सांगितलें. त्यांस बाईचे खोलीजवल चौकीदार बसावयाची सोय नाहीं म्हणोन केली नाहीं. त्याजवरून बोलली कीं त्यांचे विचारास आलें तें केलें. यांची तेजें विशेषच आहेत म्हणोन यांचें चालतें. दुसऱ्याचे घरांत दुसऱ्याचेणे सोय होत नाहीं. ज्यांची त्यास सोय कलते. सारांश आमची मर्जी मोडावी हे मात्र आहे; आसें बाई बोलली.

१ पूर्वी आम्हीं पुण्यांत आसतां लाहान मोठ्या कामास नाना आम्हांकडे येत असत. फार मर्यादशील आहेत. तेव्हां आमचें तेज त्यांजवर होतें. आतां तेच नाना, त्यांचे तेज आम्हांवर आहे. तस्मात् ईश्वरी आंश त्यांजवर जाला आहे. त्यापक्षीं आम्हीं त्यांस नवस करितों. जे थोर आहेत त्यांस नवस करित आसतात, म्हणोन आम्हीं यांस करितों. त्यांत

१ देव ब्राह्मणांस देऊन संस्थान मा[मो ?]डणार कीं काय असें उपाध्ये बोलले. त्याचें उत्तर, देव दिल्यानें आसें होत नाहीं. आम्हांस सर्वस्व दान करावयाचेंच आहे. श्रीसांबाची मुहूर्त स्फटिकाची आहे. ही देखील देऊन मागती सुवर्णाची तूला करून घेऊं. येथें आम्हांजवल विशेष काय आहे. सर्व जवाहिर व दागिने मिलोन लाख रुपयेपर्यंत आहे; फार नाहीं. आमचीं पहिलीं जुनी भांडीं बारा ताटें ब्राह्मणाचीं व देवारा असीं मिलोन आठ दाहा पेटारे होते. पुण्याहून निघतेसमईं दोन महिन्यानी माघारें जावयाचें सबब वोझ्याकरितां माघारी दागिनें व सनंगें पाठविलीं. आसें पुढें होईल हें समजलें नाहीं. त्यातुनहि धारेस व मुंबईस दागिने विकलें ! मुमईस साडे साहा लक्षांचें जवाहिर विकलें. आपलें हातें मोडलें तें चांगले जालें. पुढें कोणी लूट करिता तर आम्ही काय करितो ? आम्ही येत्येसमईं जडावपाटल्या वगैरे दागिने होत होते. मागें काय जालें आसेल तें खरें. आसें बाई बोलली.

१ पहिल्यानें विसाजीपंत आला म्हणोन इतका नाश जाला. दुसरा कोणी येता तर इतकें न होतें. नानाची तऱ्हा इतकी आमर्यादेची नाहीं. आम्हांस लहानपणापासून

भेटी होण्याचा नवस करित नाहीं. दुसरा कांहीतरी नवस करितों; आसें बाई बोलली.

१ आमृतराव बाईस बोलले कीं तुमचें शरीर व मुख काळें दिसतें. पहिले सारिखें तेज नाहीं. आसी आवस्था कालानें केली. शरिरास देखील काली आली आसे बाई बोलली.

१ श्रीवर्धनची गोष्ट निघाली. त्यास तेथील सर्व वतनें जोसीपणा भटपणा सरकारांत होते ते ज्याचे त्यास द्यावे आसी गोष्ट पूर्वी जाली होती. त्याप्रमाणे जालें न जालें याचा शोध पुण्यांत गोदूबाईस विचारावा म्हणोन उपाध्येबावांजवळ बाईनीं सांगितले.

१ गंगेस पूर बहुत येईल. सालगुदस्तां फार आला होता, त्यामुलें बाजीराव याणीं भय घेतले आहे. कोपरगावीं जातों आसें म्हणतात.

६

छ २२ रमजान.

१ दोनप्रहरांनंतर स्वारी बाजीराव व आमृतराव मौजे सोनारी परगणें कुंभारी तेथें बहिरोबा देव आहे तेथें देवदर्शनास स्वारी गेली होती. सोमवारीं स्वारी गेली नवती, म्हणोन आज गेली.

१ बाजीराव याचे लग्नांत बागेमध्यें हौद बाधिले आहेत. तेथें बंगला करणार होते. मग कोण करितो? सिवराम रघुनाथ याणी बोलले होते. आतां कोण करितो, आसें बाई बोलली.

पुर्ती माहितगिरी आम्हांस आहे. सारांश दैवयोग हें खरें; असें बाई बोलत होती.

१ बाजीराव यांचे पत्रिकेंत आहे कीं याजवल वडिलांचे वेलेचें कांहीं राहू नये; परंतु येथें त्यांचेंच आहे. नवें कोणी दिल्हे नाहीं. पहिले मात्र घेऊन गेलें; आसें बाई बोलत होती.

१ मोर पाचेचे पुण्यास पाठवावयाचें ते चांगले करून पाठऊं. येथून ठेवावयास पाठवावयाचें नाहीं. माधवराव यांस पुजेस पाठवावयाचे. त्यापक्षीं चांगलें करून पाठवावें आसें बाई बोलली.

१ पाटी घालून वर घर बांधावयाचा नकाशा बाई काढित होती.

७

छ २१ रमजान.

१ पूर्वी आम्हांजवल लबाड होते व लाहानाच्या गोष्टी ऐकणे अशी तऱ्हा होती. त्यास आतां कमी काय आहे? उगेच दोष मात्र ठेवावे हें कलतें. श्रीमंताची तऱ्हा, कांहीं गोष्ट पकी समजल्यावांचून करित नवते. लोक उगेच दोष ठेवितात; आसे बाई बोलली.

१ भास्करभट पुराणिक यांस येथून पेशजीं धरून पाठविलें. तो पुण्यांत कैदेंत होता. नंतर त्याजवर दोष नाहीं आसें जाणून सोडून दिल्हा; परंतु

१ कैदविमोचनाचा मंत्र आम्हांस ठाऊक आहे. पूर्वी सदाशिवराव घोरपडा यास बिडी पूर्वी घातली होती, तेव्हां त्याणें जप केला. त्यास गुण आला. आम्हीं करणार आहों; परंतु कोण करितो? भावी चुकत नाहीं; आसें बाई बोलली.

१ आपाजी राम यांजवल बाई बोलली कीं, तुम्हीं आमचें ऐकता तर कैदच नवती. एकत नाहीं म्हणोन कैद आहे.

—

४

छ २३ रमजान बाईचें बोलणें.

१ बाजीराव फार खेलतात. यास कोणी जपत नाहीं. येथं कारभारी आहेत, यातून कोणी जवल आसावें तें नाहीं. मूल शाहाणें होऊं नये, असें साऱ्यांस वाटतें; असें बाई बोलत होती.

१ माधवराव आसेच. थोरलीबाई फार मारीत. परंतु रूबरू मर्यादा फार होती. बाहेर गेल्यावर मनश्वी करित. असे होते तरी थोरपणीं काय केलें. नानासाहेबाचे वेलचे होतें तें मात्र रक्षिलें. आधिक जालें नाहीं. घरांत वडिलांस कैद केलें. विरुध्वें वाढविलीं इतकें मात्र केलें. हा बाजीराव तर फारच आरवाचपणा करितात.

पहिल्यानें चौकसी न करितां धरून कसें पाठविलें? आसें नानानी कसें रागें भरून लिहिलें नाहीं? त्यांतहि नानांजवल रुबरू गोष्ट गैरवाजवी होत नाहीं. आशा गोष्टी कर्णोंप-कर्णी कलतात म्हणोन आसें होतें; आसें बाई बोलली.

१ खोटेपणा केल्यावांचून प्रतिष्ठा वाढत नाहीं. उगेच यांस कोण पुसतो म्हणोन लबाड्या करितात असें येथील कारभाऱ्यांस बाई बोलत होती.

१ येथें बाजीराव यांजवल शाहाणा माणूस कोण ठेविला आहे, तरबेद किती जाले हे कललें आहे. मूल नासून टाकलें हें काय जालें? कार-भाऱ्यांजवल कोणी लबाड नाहीं म्हणोन आसें जालें; आसें बाई बोलली.

१ बाजीराव याची स्वारी सोमवारीं जात्रयाची होत आहे. त्यांत पर्जन्या-मुलें येकादे सोमवारीं जात नाहीं म्हणोन जात्रयाची गोष्ट काढिली: त्यावर केसो माहादेव बोलले कीं चांगली उघाड पडली म्हणजे जावें. त्यावरून बाजीराव बोलले कीं यांचे डोले फिरले आहेत. बाई बोलली कीं फुटले नाहीं म्हणजे फार आहे.

१ थोरलीबाई माधवराव यांस बुद्धि-वाद बहुत सांगत. त्यांतहि घर फोडावयाच्या गोष्टी सांगत असत. सराफी बुद्धि होती.

—
३

छ २४ रमजान येकादसीस स्वारी गेली.

१ दोन प्रहरानंतर गंगाप्रदक्षणेस बाई व सावित्रीबाई व भागिर्थीबाई ऐसीं गेलीं होतीं. सावित्रीबाई सव-छराजवळून माघारी आली; बाईची स्वारी सायंकाली आली. जगनाथ केशव बरोबर होते.

१ त्रितीय प्रहरीं बाजीराव अमृतराव यांची स्वारी कुंभारीस देवदर्शनास गेली होती. बराबर केसो महादेव व आपाजी राम होते.

—
२

१ बाईची शरीरप्रकृत आलीकडे महिनाभर ठीक नाहीं आसी गोष्ट निघाली. चातुर्मासांत उपोषणें कसीं होतील ? त्यावरून बोलली कीं आम्ही तसींच करूं. कोणी बोल-ल्यास परिछिन्न ऐकणार नाहीं. आज येथें प्रयाग मानिल्यास कोणी म्हटलें तर मानणार नाहीं. मी कोणाची धनीन नव्हें आणि माझे कोणी चाकर नवत. कांही केले तरी मला कोणी बोले असा नाहीं ?

१ चिमाजी आपा यांचा उजवा कान दुखत आसतो. आंत फोडे जाले आहेत.

—
७

सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Daily doings and utterances of Anandibai are profusely illustrated and reported to Poona.*

---

*No. 56*] [*1-7-1788*

पौ छ २ सवाल सु॥
तिसा आशाढ.

**श्री**

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २६ रमजानपावेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत सौ भागिर्थीबाई यांस ताप येत होता, याजकरितां दोन महिने माहेरास आल्याने ठीक पडेल म्हणौन वौ राजश्री धोंडभट भागवत म्हणतात. याजकरितां तुम्ही श्रीमंत मातुश्री बाईसाहेबांस विनंती करून त्यास माहेरास यावयाचा सरंजाम देऊन

रवानगी करावी म्हणून आज्ञा केली त्यावरून विनंती केली. बाईसाहेबांनी उतर केले कीं प्रस्तुत ताप चागला बरा जाला. येथील हवेपेक्षा पुणियाची हवा मानते असा अर्थ नाही. भाद्रपदमासी त्यांस पदर घालावयाचा आहे. दीपवालीस त्याचे बंधू येथे येतील, त्यांस भाऊबीज करून पुणियास जावे यैसे त्याचेहि मानस आहे. याजकरितां तूर्त पाठविली नाही म्हणौन ल्याहावे, त्याजवरून सेवेसी लि॥ आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Bajirao's wife Bhagirathibai is reported to be getting fever, and therefore recommended to be sent to her father's after the Diwali.*

---

*No. 57*] [*2-7-1788*

पौ छ १० सवाल सु॥

तिसा आशाढ.

श्री

सेवेसी आपाजी राम सहस्त्रबुध्ये कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ २७ रमजानपावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंताची स्वारी कुमारीस जाऊन आली. वरकंड श्रीमंत सौ भागिर्थीबाईस दसरेयापावेतो पाठवीत नाही म्हणून श्रीमंत मातुश्रीनी सांगितले. श्रीमंत राजश्री बाबासाहेबास कोपरगावी जाऊन राहाण्याविसी स्वामीस पत्र राजश्री उपाध्ये याणी लिहिले. नंतर मातुश्रीनी सांगितले कीं पुण्यास लिहून पाठऊ नये; कोपरगावी जावयाचे नाही; त्यावरून पत्र लिहिले ते तैसेच राहिले. वाड्यात आम्रभोजन ग्रहस्त मडली वगैरे बोलाविली होती. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*Appaji Ram reports Bajirao's departure for Kopargaon having been cancelled.*

---

*No. 58*] [*15-7-1788*

पौ छ २९ सवाल सु॥

तिसा आशाढ.

श्री

सेवेसी आपाजी राम सहस्त्रबुध्ये कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ ११ सवालपावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील मजकूर,

श्रीमंत मातुश्री बाईसाहेब सनसितीचे पोथींचे वाचावयास प्रारंभ केला. दोन चार दिवस ब्राह्मणाकरून वाचऊन पुराणासारखे श्रवण करीत होती. हाली पंधरा दिवस आपणच वाचू लागली. याजकरिता विवर्गानी वो राजश्री लक्ष्मण-भट कर्वे याजकडून विनंती करावयास सांगितली जे, सनसिती नेहमीच आपण वाचू लागला याचे कारण काय ? तेव्हा उतर केले की आम्हास भुताचा उपद्रव होतो, याजकरितां वाचितो. त्याजवरून बहुत क्रोधायमान होऊन मनमाने तसे अपरमित भाषण केले. कोणास काय बोलावे हेहि भान राहिले नाही. पुसावयास गेले असता राग आला तो ईश्वर जाणे. बोलणं बोलली ती किती ल्याहावीं ? नंतर राजश्री गोविंदपंत गोडबोले याणी च्यार गोष्टी बोधाच्या व काही जरबेच्या सांगोन शांतवन केले. परंतु क्रोधामध्ये याची मर्जी कोणत्ये तरेस जाईल हे कोणासच समजेनासे जाहाले. त्यास राजश्री गोविंदपंत गोडबोले याणी दोन घटका मातुश्रीपासी भाषण केले, त्यात काही बोध व जरब दाखऊन मर्जी ठिकाणी आणिली. त्यास च्यार पाच दिवस जाहाले. त्या वेळेपासून पूर्वस्थितीवर आहेत. जाहाले वर्तमान सेवेसी लिहिले आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Anandibai is reported to have gone into furious excitement, which it took long to pacify.*

---

*No. 59]* *[21-7-1788*

पैा छ २२ सवाल सु॥
तिसा आशाढ.

**श्री**

सेवेसी आपाजी राम सहस्त्रबुध्ये कृतानेक साा नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ताा छ १७ सवालपावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. वो राजश्री लक्ष्मणभट उपाध्ये याजसमागमे श्रीमंत मातुश्री आनंदीबाई याणी राजश्री हरिपंततात्यास पत्र गोविंदपंत गोडबोले यांजकडून लिहिविले, त्याची नकल करून स्वामीकडे पाठविली आहे त्यावरून ध्यानास येईल. येथे पत्र न ल्याहावे तरी मर्जी ठीक राहांत नाही; याजकरिता लिहिणे प्राप्त आहे. विनंती करावयास गेले असेता राग येतो आणि भाषणे नाना प्रकारची करीत आहेत ती पत्री लिहून कोठवर कलवावी ? पत्री लिहिले जे, हाली तुफानेहि घेऊन लागले ; याचा विस्तारे करून उपाध्ये निवेदन करितील. राा रावोपंत ठोसर यास

तैनातेचा बंदोबस्त करून देवावयाचा तो देऊन निरोप देवावा. कारण मारनिले येथे असलियानें उभयंता श्रीमंताचे प्रकृतीस जपत असतात. बोलापच्यारास सुज्ञ आहेत याजकरिता विनंती लिहिली आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Appaji Ram to Nana Fadnis : reports the excited temper of Anandibai.*

---

*No. 60*] [*21-7-1788*

पौ छ २९ सवाल सु॥ तिसा आशाढ.

श्री

सेवेसी केसो महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ १७ सवालपावेतो क्षेम असो विशेष. श्रीमंत राजश्री आपासाहेब याचा कान फार दुखतो, पाणी वाहात असतें. राजश्री राघोपंत ठोसर आपासाहेबास पहिल्यापासून ओशध तेच देत होते. त्यास हाली वैद्य ओशधे देत आहेत. परंतु प्रकृत लहानपणापासून प्रकृत त्यासच माहीत आहे. व श्रीमंत राजश्री बाबासाहेबाचे लिहिणे पढणे तें गेल्यापासोन येथास्थित होत नाही. याकरिता राघोपंत ठोसर याचा बंदोबस्त करून पाठऊन देण्याविसी आज्ञा जाहली पाहिजे, म्हणजे येतील. श्रीमंत मातुश्री बाईसाहेब सतसितीची पाठ करू लागली हे आम्हास समजल्यावर आम्ही त्रिवर्ग जाऊन विनंती केली ते यकीकडेच राहिले. आम्हावर मनस्वी रागे भरली ते पत्री लिहिता येत नाही. त्यावरून बाईनी श्रीमंत राजश्री हरिपंत-तात्यास कागद ल्याहावयाविसी आज्ञा राजश्री गोविंदपंत यास केली. त्यावरून विनंतीहि केली, परंतु रागसा दिसोन आला. त्यावरून त्याणी कागद तात्यास लिहिला. त्यामधे की, आम्हावर तुफाने उचलू लागले आहेत ऐसे लि॥ आहे. त्या कागदाची नकल गोविंदपंतानी सेवेसी पाठविली आहे त्यावरून सविस्तर सेवेसी श्रुत होईल. येविसीचे सविस्तर वर्तमान वो। राजश्री लक्षुमण भट उपाध्ये बाईची. आज्ञा घेऊन आले आहेत ते सविस्तर विनंती करितील. होईल वर्तमान सेवेसी लिहून पाठवीन. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Keso Mahadeo reports to Nana Fadnis news of Anandibai and her sons Bajirao and Chimaji, complains about their behaviour, and mentions the excited talks of the lady.*

No. 61] [21-7-1788

पों छ २५ सवाल सु॥
तिसा आशाढ.

श्रीरू

सेवेसी विज्ञापना. ताा छ १७ सवाल पावेतो क्षेम असे विशेष.

पाा दहीवेल येथील आपत्तीचा[1] यैवज राा पांडुरंगपंत आचवल याणीं मजुरा घेतला तो तफावतीत निघाला. ते समई पाडुरंगपंत याणी पत्र पाठविले की, आपत्तीचा यैवज माघारा घेऊन मामलत मजकडे ठेवावी. त्यावरून जो कोणी बोलावया आला होता त्यास निरोप देऊन मामलत पाडुरंगपताकडे ठेविली. यैसे जाले असतां पाडुरंगपतानी स्वामीस विनंती केली की, जो तफावत लागू करणार त्याची निशा घ्यावी. त्यावरून स्वामीनी आज्ञापत्र पाा होते, त्याचे उतर मी लि॥ की, पांडुरगपंताचे पत्रावरून निशा पांडुरंगपंताकडे जाली त्यास येक महिना जाला. तो गऱ्हस्तहि उठोन गेला. आता निशा दुसरी कोणाची घ्यावी? त्याजवर आज्ञा जाली की, पाडुरंगपंताचे दस्तयैवजी पत्र आहे ते पाा. त्यावरून पेशजी पत्राची नकल पाठविली आहे ते पावली असेल. त्यास फार दिवस होत आले, त्याचे उतर समजले नाही. कोणी तफावत कोणावर बोलला ते गोष्ट न आइकली, न केली, तरी दोष येणार. पांडुरंग-

श्रीमंत राजश्री बाबासाहेब यास धार्योअग्निनिमित्य अग्नींस[2] दक्षणा व पिंडपितृयज्ञ वगैरे मिलोन सालिना शंभर रुपयांत करावे म्हणून आज्ञा जाली. त्या प्राो नेमणूक केली, खर्च चालला आहे. कलम १

श्रीमंत राजश्री आपासाहेब व श्रीमंत सौ भागिर्थीबाई यांस तथी पर्वणीस वगैरे खर्च करावा लागतो, तो मी समजोन कार्याकारण करीत आहे. येकंदर सालाचा खर्च आकारेल त्याप्राो नेमणुकेची याद मी आलियावर करून वेईन. येथील खर्चाचे अजमासे यास किती असावे तो अजमास ध्यानास आणून कर्तव्य ते केले आहे. कलम १

श्रीमंत मातुश्रीबाई साहेब याणी मोर पांचेचे पिसाऱ्याचे श्रीमंत राजश्री रावसाहेब यास देवपूजेसमई देव मांडावयास पाठवितो म्हणौन पूर्वी पत्र ल्याहावयास आज्ञा केली त्यावरून मी सेवेसी लिा होते. त्याचे उतर आले की, मोर पाठवावे. हाली उपाध्ये

१ दुष्काळांत घेतलेला ऐवज. २ अग्नीचें नांव.

पंतानी यैवज माघारा देतो म्हणौन लिा असता घ्यावयास बल लागले. असो. धण्याचे धन्यानी हरयेक समजोन बक्षीस केले तत्रापि चिंता नाहीं. परंतु पत्री काही येक आज्ञा जाली पाहिजे. कलम १

जाऊ लागले तें समई जडावाची झारी व तबकडी पूर्वीपासून सांब मांडून पूजा करीत होते ते आम्ही रावसाहेबास पूजा करावयास पाठवितो ; आताच उपाध्याजवल द्यावी म्हणौन सुकेश्वराचे देवलांत आणून त्याजवळ देऊ लागली आणि श्रीमंत राजश्री बाबासाहेब याचे नावे पत्र रावसाहेबास लिहिणे म्हणौन फार आग्रह केला. परंतु आज्ञा नसता पत्र लिहिणे ठीक नाही यास्तव लिा नाही. याची आज्ञा जाली पाहिजे.

सदरहू च्यार कलमाचे उतरी आज्ञा जाली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Orders are asked from Nana Fadnis on several points in connection with the arrangements of Anandibai.*

---

*No. 62*] [*22-7-1788*

पौ १० जिल्काद सुाा सन तिसां.

**श्री**

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ २९ सवालपर्यंत मुक्काम कोपरगांव येथें असो विशेष. येथील दिनचर्येचे वर्तमान :

छ १९ सवाल.

१ तृतीय प्रहरी बाईची स्वारी गौशाळा नवी जागा बांधिली आहे तेथें गेली होती.

१ बाजीराव याची स्वारी याच आंगे गंगेच्या काठानें फिरत फिरत स्वारी आली. आपाजी राम व केसो महादेव यांचे चिरंजीव त्रिंबकराव बरावर होते.

२

छ २२ सवाल. बाई बोलली :

१ साहेब यांचे पुण्य शरीर पंधरावे वर्षी गुजराथ प्रांतीं गेली आणि चौथाई बसविली. मोठी लढाई इतके दिवसांत या सिवाय फत्ते कोणी केली नाहीं. गोहोदचे स्वारीस नाटकशाळा बालगिल्या तेव्हांपासून बुद्धीस आंतर पडले. बराबर कारभारी सखारामपंत व त्रिंबकराव होते. हे दोहोकडे दोवे बोढू लागले त्यामुळें आपेश आले.

छ २३ सवाल रविवासर.

१ पुढील सदरेच्या ओटीवर गाय बांधली होती ती अकस्मात भयभीत होऊन मोठ्यानें शब्द केला. प्रथम प्रहर रात्र जाली होती.

१ वाड्यास पूर्वचे आंगे भिंतीस मोहोळ लागले होते ते काढून टाकिले. शांत करणार आहेत.

—
२

छ २४ सवाल इंदुवासर.

१ तृतीय प्रहरी श्रीकचेश्वरास स्वारी बाजीराव व आमृतराव नावेंतून बसून गेले होते.

१ युध्यामध्यें परस्परे वर्मशब्द बोलतात तेणे करून लढाई जमते, आशी गोष्ट निघाली. त्यावरून बोलली, पूर्वी त्रिंबकराव मामाची लढाई जाली ते दिवशीं आसेच जाले, आसे बाई बोलली.

—
२

चतुर्मासांत दुसरे गंगास्नान निमित्य होत होते. परंतु कधी कधी शरीर स्वस्त नसते म्हणोन जात नाहीं. स्वस्त असल्यास नित्यात स्नान होते.

कलम
१

उपाध्ये गेले तेव्हां बाईचे बोलणे जाले कीं, येथें आम्हाजवळ मनुष्यें पांच वर्षे नेहमी आहेत. आमची चाल किंवा रीत ही सर्वास कळली. तेव्हांपासून श्री राहिली नाहीं. दिवसे दिवस कमी जाहाले.

१ पूर्वी नानासाहेब यांचे चित्तात कीं, ही दौलत कोणाचे दैवानें चालत्ये हे कळेना. याजकरितां वेगळे स्वारीस पाठवावें. त्याजवरून वेगळे पाठवित असत. भाऊसाहेब व विश्वासराव व त्रिंबकराव व पुरंदरे व समशेरबहाद्दर इतक्यास फौजा देऊन पाठविले परंतु याणी विशेष केला नाहीं. बाबा फडणीस यास कोठे पाठवित तेथें चांगले करून येत. त्यावरून दैववान् असे म्हणत. येथें गोविंदपंत गडबोले आहेत हेहि कलपक चांगले आहेत. मोठ्या कामास पडल्यास शहाणपणे करितील. आसेच पहिले चिंतो विठ्ठल होते. शहाणपणा पाहून वाढविले. आतां चांगले माणूस कोणी राहिले नाहीं. उतरास उतर करी असा हरिपंत आहे. शहाणे माणसे कोणी नसतां चालले आहे हे माधव(रा)याचे दैवाची सीमा आहे. मोठा पुण्य-पुरुष आहे.

—
२

राजश्री बाजीराव विद्याभ्यास लिहिणे पढणे याविसी अनमान करितात. गंगेस स्नान समई पोहोणे व बाईनी रागे भरले असतां मानूं नये आशा

त्यात आमचे त्याचे चांगले जाल्यानें यांचे रोजगार चालणार नाहीं म्हणोन येथील चा(हा)ड्या सर्व बातमी सांगतात. दिवसे दिवस वाईट जाल्यानें चांगले आहे. अत:पर आम्ही अधिक उणेच बोलत नाहीं. उपाध्यानीं असेच सांगितलें. कलम १

तऱ्हा आहेत. पूर्वी राघो केशव ठोसर याचा धाक चांगला होता. तेव्हां असे नव्हते. आलीकडे विशेष खेलतात. कलम १

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति

¶ *Anandibai's and Bajirao's doings, health and study and their utterances are reported in this letter to Nana Fadnis at Poona.*

---

*No. 63*] [*23-7-1788*

पो। छ २२ सवाल

सु।। तिसा आशाढ.

श्री

सेवेसी आपाजीराम सहस्त्रबुध्ये कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ १९ सवालपावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब आषाढ शु।। १५ पोर्णिमापासून चार मास नेम केला, मौनवृत धरिले आहे. सूर्योदयापासून सूर्यास्तपावेतो बोलत नाही. त्रिवर्गानी मिलोन विनंति केली जे, या वयात मौनवृत धरावयाचे दिवस नवत. त्यात चार मास नेम हे चांगले वाटत नाही. परंतु त्यांची मर्जी कोणाचे समजोन सांगितलियाचे ध्यानात येऊ नये. सोमवारी श्रीकचेश्वरी नावेत बसोन दर्शनास जाऊन आले. समागमे मी होतो. पेठ येवले येथील अमलाकरितां राजश्री विठलराव रामचंद्र आंबीकर व पेठ मजकुरचे पाटील होलकर याजकडील गुमस्ते कज्यांस प्र[व]र्तल आहेत. उभयतानी मिलोन पाचपाचशे माणसे सिबंदी ठेविली आहेत. जेजाला व जंबुरे येकदोन जमा केले आहेत. येथोन पत्रे कारकून मा।निलेकडे पाठविले की, सिबंदी दूर करून जाबसालाने जे कर्णे ते करीत जावे. त्यास उभयतांस ईर[१] जे आगोधर कोणी लोक उठवावे त्यात आंबीकर उठवितील परंतु गुमस्ता मजकूर बोलतो जे, आम्ही हे वर्तमान होलकर यजमानास

---

१ ईर्षा.

लिहिले. तेथून आज्ञा येईल तैसे करू. सारांश कोपरगावापासून पाचसाहा कोशावर, याजकरिता समजले वर्तमान सेवेसी लिहिले. आज्ञा जाहालिया तोफा व जेजाला घेऊन येऊ. आढलली गोष्ट कलविली. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Appaji Ram reports that Bajirao observes complete silence during the day and that Ambikar and Holkar Patil have started troubles not far from Kopargaon.*

---

*No. 64]* *[23-7-1788*

पो छ २९ सवाल तिसा.

श्री

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ १९ सवालपर्यंत मुक्काम कोपरगांव येथें आसे विशेष. दिनचर्येचे वर्तमान :

छ २६ रमजान. वाड्यांत आग्निहोत्राकडे चतुर्मास्यें जाली तेव्हां ब्राम्हणभोजन जाले. त्यास बाईचे बोलणे कीं, शंभर ब्राम्हणभोजनाविसी पुण्याची आज्ञा पुसावी. इसका घेणार नाहीं. गरीबांचे घरीं जाली तर सामर्थ्याप्रमाणें करितात आसें बाई बोलली.

कलम १

छ २८ रमजान. पूर्वी आम्हाजवल फौज थोडी होती आणि हरिपंताजवल फौज फार होती. परंतु रुबरु गांठ कधींच घातली नाहीं. यांस शूरत्व नाहीं. दैव मात्र चांगलें आहे असे बाई बोलली.

कलम १

छ २७ रमजान.

१ उपश्रुत महायात्रेस जाण्याविसी बाई पाहिली. त्यांत उत्तरे आले कीं, धीराधीरान होईल आसें आलें.

१ पूर्वी साहेब नारायणराव यास गोहोदचे स्वारीस जातेसमई नेत होते. तेव्हां बाईनीं अनमान केला. जिकडील तिकडे ममता हे जाणोन दत्तपुत्र घेतला. पुढें माधवराव याणी बाईस शब्द लाविला अशी गोष्ट बाई बोलत होती.

२

छ २९ रमजान. पूर्वी दुर्गाबाईचे लग्नांत सोयरे मंडळी आली होती. त्यास द्यावयाविसी नारायणराव रुबरु सांगून

छ १ सवाल. बंदिविमोचनाचा मंत्र आम्हास ठाऊक आहे. पूर्वी मुंबईमध्यें सदाशिवराव घोरपडे यांजवर पेंच आला तेव्हां आम्हीं त्यास सांगितला होता. त्यास गुण आला. आम्ही करणार होतो, परंतु भावी चुकत नाहीं हा निश्चय आहे. त्यापक्षी जपानें काये होतं असें बाई बोलली.

कलम १

छ २ सवाल. सप्तशतीचा पाठ करण्याविसी बाई व आमृतराव बोलत होते कीं प्रारंभीं मधें व आंती असा नवार्णवाचा मंत्राचा जप करावा, असें बोलत होतीं.

कलम १

छ ४ सवाल. बाईचे बोलणें :

१ सालगुदस्ता गंगेस पूर आल्यापासून केली व पेरू फराळाचा जिन्नस मिळत नाहीं. यावरून बोलली कीं जुनराहून केली बाळाजी विश्वनाथ फाटक होते तेव्हां येत आसत. आता आणित नाहीं. आंबे वर्षाप्रमाणें नाहीं. नाशिकास फार आहेत परंतु आणित नाहीं. साल गुदस्ता आंब्ररस एक वेळ जाला; यंदा दोनवेला जाला, तथापि आसे बोलणे आहे.

पाठवित कीं, कोणास काय देणे ते द्या. अशी तऱ्हा होती. हे सर्व कृष्णराव काले यास ठाऊक आहे. आम्हाकडे राबऱ्यांत फार असत. त्या आलींकडे नानासहि पुर्ती माहितगिरी आहे. परंतु दैवयोग हे खरे आसे बाई बोलली.

कलम १

छ ३ सवाल. शुक्रेश्वरी आग्निहोत्री आहेत, यांजकडे चतुर्मास्यें जालीं. त्यास बाजीराव व आमृतराव प्रातःकाली च्यार च्यार घटका जाऊन बसत. आज त्याजकडे आवभृत स्नान जालें म्हणोन सर्व खाशी गेली होती.

कलम १

छ ५ सवाल. बाई आस्पर्श जाली. बागांत गेली होती.

कलम १

छ ६ सवाल. सप्तशतीचा पाठ यांत जप हे कामानिक अनुष्टान काये आहे, असें बाईजवल केसो महादेव व फडणीस व आपाजी राम असे बोलले. त्यावरून बाई बोलली कीं, आम्ही नानास वाईट करितो असे कोणी सांगितले ? अशाच आमच्या लबाड गोष्टी तुम्हीच लावितां आणि दिवसेंदिवस अधिक पेच पाडितां. आसे अर्ज कशास करितां असे बहुत बोलून रुबरु रागे भरून शिव्या दिल्ह्या

कलम १

१ केवड्याची लाखोली वाहेची, परंतु कोठे मिलत नाहीं हे काय? समर्थास उणें काय आसते? मागें सिताब खेड्याचें मुक्कामी जांबगांवची डांक फुलास ठेविली होती. आतां ठेवणे तर नानास पुसिले पाहिजे. पुसलयावर परवानगी होणार नाहीं.

१ आपा साहेबाचा कान दुखत आहे. त्यानिा जेऊरकर अंताजी फटागरा भगत आणिला तो बोलिला कीं, तुमचे घरांत देव आहे, त्याची उर्जा होत नाहीं, त्यामुळें दुखणे होते. त्यावरून उपाध्याजवल गोष्ट काढली. श्रीव्यंकटेशाच्या मुहूर्ती जुन्या पुण्यांत आहेत, त्याची वर्षामध्यें समाराधना किंवा अनुष्टान हे कांहींच होत नाहीं, हे आम्हास बाधते. अशावरून बोलली कीं, श्रीव्यंकटेशपंचायतन मुहूर्ती नाशिकाहून आणाव्या असा बेत जाला.

३

छ १४ रोज सवाल. बाईचे बोलणे :

१ मागें बाजीराव यांचा धारेस जन्म जाला हे वर्तमान ऐकोन पार्वतीबाई याणी सर्व किलयास तोफा करविल्या. आतां चिमाजी अपा जाले हे ऐकोन आनंद जाला नाहीं. शर्कराहि वाटली नाहीं. पहिला एक वैरी होता त्याचा बंद केला होता. पुढें दुसरा वैरी निर्माण जाला आहे. त्यास दु:ख जाले; त्यामुळें शर्करा वाटणेयाचे विस्मरण जाले.

छ ७ सवाल.

१ प्रात:काली बाई बागेत गेली होती.

१ तृतीय प्रहरी बाजीराव यांची स्वारी कुंभारीस देवदर्शनास गेली. पाणी गंगेस फार होते, म्हणोन आलीकडे धरणगांवींहून फिरोन आले. बराबर फडणीस व केसो महादेव होते.

२

छ ८ सवाल. उपाध्याजवल कामे सांगितली कीं पुण्यास नानास पुसावी असे बाई बोलली. कलमे :

१ श्रीहरिहरेश्वरास ब्राम्हण अनुष्ठानास पहिले पांच होते तसे आता ठेवावे.

१ आपासाहेबाची मुंज करावयाची.

१ गयावर्जन करावयाचे.

१ उमामहेश्वर व्रत.

१ मंगलागौरीचे व्रत, सावित्रीबाईचे.

१ आर्घ्यप्रधानास ब्राम्हण तीन नवे, यंदाचे वर्ष मृत्युयोगाचे आहे म्हणोन.

१ सौभाग्यवति भागिर्थीबाईस दसन्यास पदर घालावयाचा.

१ घर ब्राम्हणास बांधून द्यावयाचे.

१ सिंव्हस्तात ब्रम्हपुरीसाहित पांचा ब्राम्हणास गांव द्यावा.

१ नक्षत्रसत्र करावयाचे.

१ गोपद्माचे व्रत सावित्रीबाईकडील.

१ बाण थोर आहे त्याचे स्थापना करावयाची.

१ नाना लहान किंवा नवे किंवा आज्ञान इतक्या गोष्टींतून कांहींच गोष्ट नाहीं. दान धर्म करितात व करवितात. इतके असोन नक्षत्र-सत्र करूं नये. अशा आनुष्टानानें वाईट होते तर सारे अग्निहोत्री करितात. मग आम्हास किमर्थ मना केले? खर्चास पाठवणे तर पाठवावे नाहींतर आम्ही येथें करूं असे लिहिले असतां परवानगी पाठविली. नाहीं. तस्मात आमचे मर्जीचे आगत्य कोणास नाहीं.

१ आपासाहेबाची मुंज यंदा फाल्गुन मासी करावी आणि कन्यागती लग्न करावे.

१ आस्ती माधवराव व नारायणराव यांच्या आजून ठेविल्या आहेत. ज्याचेसाठीं इतके केले, दौलत रक्षिली, त्याच्या आस्ती आजून ठेविल्या आहेत, त्यापक्षीं या अस्ती कशा जातील? हे तर बोलावयाचेच नाहीं. अत:पर अस्तीविसी त्यास पुसो नये. पूर्वी सुपत्ते होते तेव्हां केले नाहीं. आतां तर सिंध्याचा मात्र किंचित जोर आहे. आशानें काय होणे? दौलतेस कोट्यावधी रुपये खर्च केले, त्यातून पंचवीस हजार रुपये पाठऊन आस्ती पाठविते तर काय होते? परंतु घरच्या माणसाशिवाय आगत्य आसत नाहीं.

488

१ स्नानसंधेस जागा वेगळी बांधावयाची.

१ रंगभट आग्निहोत्री कोपरगांवीं आहेत. कुटुंबवत्सल आहेत यास वर्षासन करावे.

---

१४

छ ९ सवाल. एकादशीस स्वारी गेली होती.

१ गंगाप्रदक्षणेस स्वारी बाई व सावित्रीबाई व भागिर्थीबाई ऐसी गेली होती. बराबर जंगनाथ केशव होते.

१ तृतीय प्रहरी कोपरगांवास देवदर्शनास बाजीराव व आमृतराव गेले होते. बराबर आपाजी राम व केसो महादेव होते.

---

२

छ १३ सवाल.

१ तृतीय प्रहरी बाजीराव केसो महादेव यांचे बागेंत गेले. नंतर गौशाळा बांधितात तेथें गेले. बरोबर केसो महादेव याचे चिरंजीव होते.

१ पूर्वी नानासाहेबाचे वेलेस दानधर्म होता तेव्हां राज्य मोठे होते. आतां नवे कोणी केले नाहीं. त्यावेलचे पुण्य आहे त्यामुले चालले आहे, आसे बाई बोलली.

---

२

१ यंदा आम्हास वाईट आहे. आधिकउणे जाल्यास आमच्या आस्ती ठेऊ नये. येथें पश्चम-वाईनीमध्यें टाकाव्या. सिंहस्थांत साहेबाच्या आस्ती गंगेंत टाकाव्या.

१ उपाध्यास सांगितले कीं, आम्ही कामे स्मरणाची याद लिहिविली आहे त्याविसी एक वेळ मात्र पुसावे. वारंवार चिलवणपण करून पुसू नये. आमचे नाव ऐकिल्यानें त्यास वाईट वाटते. त्यापक्षीं आगत्याअगत्य काम असल्यास येकवेळ पुसावे. पुन्हा पुसो नये.

१ आपासाहेब जाले हे माधवराव याणी ऐकून संतोष जाला. साकर वाटावी आसे बोलले. त्यास चुलता जाला म्हणोन संतोष वाटला. याचे-हि धनीच होत. हे कारभारी बाजीराव यांचे चाकर. पहिले राज्यानी मजमदार दिल्हे म्हणोन याणी आपला वंश कन्येचा हे घरचे विश्वासु यास व खासगीवाले ऐसे दोघे ममतेचे म्हणोन कारभारी केले. सर्व लहान मोठें माहीत केलें. परंतु याणी दौलत संभालिली म्हणोन आसे केले.

७

छ १६ सवाल.

१ उपाध्येबावा पुण्यास गेले.

१ श्रीसांबाकडील मोर मिनेगर पाचेचे आहेत ते पुण्यास श्रीमंतास पाठविले.

२

छ १७ सवाल. सोमवारनिमित्य स्वारी श्रीकचेश्वरास नावेंतून बसून गेली होती. बाजीराव गेले होते. बराबर आपाजीराम होते.

जेष्ठ वद्य एकादशीपासून बाई उपोषणे करीतात. चतुर्मासात धरणी-पारणी उपोषणात होतात. कलम १

चिमाजीआपा यांचा कान दुखतो. आंतून पू येतो. औषधउपाय चालले आहेत. कलम १

येथील जितकी चाकरीची माणसे आहेत तितक्यांत येकहि सोईचे नाहीं वाईट अमर्याद आहेत. चा(हा)ड्या करून आहेत आसे बोलतात.

कलम

बाजीराव ( याचे ) खेळण्यामध्यें फार चित्त आहे. चातुर्मासांत मौन दिवसा केले आहे. बाई रागे भरतात परंतु विशेष ऐकत नाहीं.

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Krishnaji Janardan reports Anandibai and Bajirao's doings and saying at Kopargaon : they are all full of interest and contain past reminiscences of many occurrences, and religious observances undertaken by Anandibai.*

No. 65] [26-7-1788

पौ छ १० जिलकाद

सु॥ तिसा.

श्री

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २२ सवाल पावेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत मातुश्री आनंदीबाई साहेब याणी वेदमूर्ति राजश्री लक्ष्मणभट उपाध्ये यास पत्र लिहावयास आज्ञा केली, त्याप्रो लेहून त्याची नकल पाा आहे त्यावरून ध्यानास येईल. याखेरीज मला आज्ञा केली की, श्रावणमासी दक्षणा पंचमी जालियावर येथील ब्राह्मणास येत्ये. त्यांस, आम्ही सुर्तेस व आणखी जांगा होतो परंतु समयानरूप थोडी बहुत दक्षणा देणे ते श्रावण शुद्ध त्रितीयेपासून पंचमी पावेतो द्यावी; सेवटी पंचमीस तरी द्यावी. प्रस्तुत पुणियाहून दक्षणेचा यैवज येतो तो पंचमीस येथे द्यावयाचे उपयोगी पडे यैसा आगोदर पाठवावा यैसे लिहून पाठवावे, त्यावरून लिंहिले अ[१]से.

¶*Govind Krishna Godbole sends instructions from Anandibai about the Shrawan Dakshana at Kopargaon.*

---

No. 66] [27-7-1788

पौ छ १९ जिलकाद

सु॥ तिसा.

श्री

**वो राजश्री लक्ष्मणभट उपाध्ये बाबा यांसी.**

नमस्कार विनंती. येथील कुशल आषाढ वाा ९ पावेतो यथास्थित असे विशेष. कैलासवासी थोरली सासूबाई काय काय कुळधर्म करीत होती तो तीर्थस्वरूप मातुश्री गोदा[२]वरी सासूबाईस पुसोन ल्याहावे. रामनवमीस व गोकुलाष्टमी व गोकुलाची पूजा व नवरात्र व गणपतीचे त्रिरात्र व आणखी कांहीं अधिक उणे करीत असतील ते सर्व वतनाकडील देव बाबदेव व बहिरव व हरिहरेश्वर व स्थानपुरुष व आणि कोणाचे कांही उपास नेम असतील ते सासूबाईस पुसोन ल्याहावे.

---

१ पत्र पुरें कां केलें नाहीं? २ गोदूबाई देशमुखीण म्हणून जुन्या वृद्ध बाईचें नांव कागदांत येतें तीच ही असेल. ही कोण कोणाची?

येथे ब्राह्मणास दक्षणा पंधरा दिवसीं पाठीमागाहून येते ते पंचमीस द्यावयाची सोय करावी. पूर्वील कुळधर्म व देवाची पूजनें होत नाहींत ती नीट करावी म्हणोन श्रीची आज्ञा जाली आहे ; त्यावरून लिहिले आहे ; हे विनंती.

*¶The writer asks information from Laxmanbhat Karve what religious functions used to be performed during the days of the first Peshwa and his wife.*

---

*No. 67*] [*4-8-1788*

पैा ७ जिलकाद

सु॥ सन तिसां.

**श्री**

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ १ जिलकादपर्यंत मुक्काम कोपरगांव येथें आसें विशेष. दिनचर्येचें वर्तमान :

छ २५ सवाल. आनंदवल्लीची जागा चांगली आहे. त्रिंबकेश्वर संनिध किंवा नाशिक संनिध, उंचवटा व बेलाची झाडे फार आसी आहे, आसी गोष्ट बाई बोलली.

१

छ २७ सवाल. मास शिवरात्रीस बाई जागर करितात. चार प्रहरास च्यार पुजा करितात.

कलम.

छ ३० सवाल. दोन प्रहरी बाई बागामध्यें पुराणश्रवणास गेली होती. बाजीराव चातुर्मासांत मौन करीत आहेत.

छ २६ सवाल. धारेत होतो स्वसत्तेत होते. वोढेकरानीं पहिल्यानें कठीण बोलले परंतु मागाहून चांगले केले आसे बाई बोलली.

कलम.

छ २९ सवाल. पर्वतीची गोष्ट निघाली त्याजवरून बोलली, स्वामी कार्तिकाची मूर्त दुसरे जागा पर्वतावर बांधिते तर नांव होते. नावाची गोष्ट तेव्हांच कलली आसती तर करिते. तल्यामध्यें देवालय आहे तेथें देवस्थापना केली नाहीं हे काय ? कांहीं तर देव ठेवावा असे बाई बोलत होती.

कलम.

सेवेसी श्रुत होये विज्ञाप्ति.

*¶Krishnaji Janardan reports Anandibai's and Bajirao's doings. Bajirao observes silence for the four months. Anandibai regrets her husband not having built a separate temple ,or Kartikeya, instead of at Parwati.*

No. 68] [10-8-1788

पौ छ १९ जिल्काद सुरु तिसा.

श्री

सेवेसी विज्ञापना. ताा छ ७ जिल्काद पावेतो क्षेम असे विशेष. येथे वर्षास पूर येतो. चौकीचे लोकांची छपरे व जासुदांची छपरे वर्षास पडतात. यंदा वाड्याचे दरवाज्यापासून पंनास हातावर पुराचे पाणी जवलपास आले होते. असे दरसाल येते. वारा भारी. नासिक त्रिंबकाकडे घरे फार आहेत. येथे जुलमाने राहिलो असे भाव बोलण्यात दिसतात. येथे राहावे असी मर्जी दिसत नाहीं. याचा विचार काय करावयाचा असेल तो करावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Anandibai desires to stay near Nasik and Trimbak and not at Kopargaon.*

---

No. 69] [10-8-1788

पौ छ ७ जिल्काद

सुा तिसा श्रावण.

श्री

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २४ सवाल पावेतो क्षेम असे विशेष. राजश्री राघोपंत ठोसर यांस घरी जावयास येक महिन्याचा निरोप द्यावा म्हणोन आज्ञा जाली, त्यावरून ते निरोप घेऊन गेले. त्यास साहा महिने होत आले. पुणियांत त्यांचे तैनातेचा जावसाल पडला होता म्हणौन राहिले. तैनातेचे बोलणे फार करून जालेच असेल. काही राहिले असल्यास स्वामींनी ध्यानास आणून योजने प्रो कर्तव्य ते करून त्यास येथे पाठविले पाहिजेत. प्रस्तुत श्रीमंत राजश्री बाबासाहेब यांचे लिहिणे पढणे त्याजसिवाय सुरलीत चालत नाही व श्रीमंत राजश्री आपासाहेब यास ते औषध पूर्वीपासून देत असतात. प्रकृतीस माहीत आहेत. त्यांचे कानातून पाणी वाहात असते. दुसऱ्यापासून उपाय लागू जाला नाही. ते आल्याने उपाय होईल. यास्तव त्याची सोय तैनातेची होऊन त्यास इकडे यावयाची आज्ञा जाली पाहिजे. बहुत काय लिहावे, सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna asks Raghopant Thosar to be sent back at once.*

No. 70] [10-8-1788

पैा छ १९ जिलकाद
सुा तिसा

श्री.

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ ७ जिलकादपावेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत मातुश्री बाईसाहेब यास श्रावण शुध्ध द्वितीयेस रविवारी पंचवटीस कैलासवास जाला, ते वर्तमान येथे कलावे म्हणून छ ३ जिलकादचे पत्र रवाना जाले ते आज प्रात:कालीच पावले. जासुदास पुसिले, च्यार दिवस वाटेत लागले याचे कारण काय ? त्याणी तपसील सांगितला. कागद अस्तमानी तिसरे तेरिखेस दिल्हा. तिसरे दिवसी दोन प्रहरी कचेस्वरास आलो. गंगेस पूर फार याजमुले आलीकडे येणे न जालें. आज प्रात:काली आलो. तेव्हा अडचावे दिवसी येथे पावले खरे. बाईसाहेबांस पंचवटीस रविवारी कैलासवास जाल्याचे वर्तमान सोमवारी सायंकाली येथे आफवा आली. मंगलवारी प्रात:काली नासिकचे सराफाचा माणूस आला त्याणे पके वर्तमान सांगितले. त्यावरून बुधवारापासून येथे स्पष्ट जाले. बुधवारापासून सुतक धरिले. अमृतराव यास त्रिरात्र आशौच ; त्यास त्रिरात्र क्रमिल्यानंतर समजले, यास्तव श्नान करून सुध जाले. आपले पत्र कालच आले म्हणौन विनंति केली. त्यावरून पंचवटीहून वर्तमान पुणियास जाऊन तेथून लिहून ठीक् आलें, म्हणौन बोलली. सुतकाचा विषय येक दिवस मागाहून कलवावा असा सांप्रदायहि आहे म्हणौन विनंती केली. श्रीमंत माहाराज राजश्री रावसाहेब याचें सामाधान बहुत प्रकारे करावे म्हणौन ल्याहावयास आज्ञा केली. चिरंजीवास आई बाप भाऊ कोणीच नाहीं. आम्ही दूरच आहों. येक आजी तेहि दूरच होती. परंतु ममतेचे तेवढेच मनुश्य होतें. याअर्थी चिरंजीवास श्रम बहुत होतील. परंतु बहुत प्रकारे समजोन सांगावे. त्यांचाहि कालच जाला होता. सृष्टीची वाट हीच आहे. त्यापक्षी अशा गोष्टी सांगोन त्याचे शांतवन होय ते करावे याप्रो म्हणौन बोलली. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Anandibai sends condolences to young Madhaorao on the death of Gopikabai.*

No. 71] [11-8-1788

पौ छ १९ जिल्काद सुरू तिसा.

श्री

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिर सां नमस्कार विज्ञापना. ता छ ८ जिल्कादपर्यंत मु॥ कोंपरगांव येथे आसे विशेष. दिनचर्येचें वर्तमान.

छ ५ जिल्कादी श्रीगंगेस पूर फार आला. वाड्यापुढें पंनास साठ हातावर पाणी आले होतें. काठीं जासूद माहाल वगैरे घरें वाहावली. आंत पाणी सिरलें. गुदस्ताचे दहशतीने लोक घाबरले होते. श्रीमंतहि किंचित् भयभीत जाले होते. कलम १

छ ६ जिल्काद,

बाजीराव व बाई त्रितीय प्रहरी केसो माहादेव याचे बागांत गेली होती. अशौच्यांत वेल जात नाहीं म्हणौन गेली होती. कलम १

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Krishnaji Janardan reports about the heavy floods at Kopargaon.*

---

No. 72] [21-8-1788

पौा २६ सवाल सु॥ तिसा आशाढ.

श्री.

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता छ १७ सवाल पावेतों क्षेम असे विशेष. श्रीमंत राजश्री आपासाहेब याचा कान फार दुखतो. पाणी वहात असते. राजश्री रावोपंत ठोसर आपासाहेबास पहिल्यापासून काही येक औषध देणे तर तेच देत असतात. प्रस्तुत ते आपले तेनातेचे कार्याकरिता पुणियास गेले. तेव्हापासून आपासाहेबाची प्रकृती दुसऱ्यास ठीक सांभालता येत नाहीं. श्रीमंत राजश्री बाबासाहेब यांचे लिहिणे पढणे यथास्थित चालत नाहीं. फार खेलतात. कोणाचे आइकत नाहीं. यास्तव त्याचे तैनातिची काय येजना केली असेल त्या प्रो करून त्यास लौकर रवाना केले पाहिजेत. वो राजश्री लक्ष्मणभट उपाध्ये काल श्रीमंत मातुश्रीबाई साहेबाची आज्ञा घेऊन पुणियास जावयाकरिता निघोन गेले. बाईसाहेबानी राजश्री हरिपंत तात्यास पत्र त्याहातवयास आज्ञा केली. तेच पत्र आपणास दाखवावे म्हणोन त्याच पत्रात लि॥ आहे. परंतु त्या पत्राची नकल करून स्वामीचे पत्रांत

घालोन लाखोटा करून उपाध्ये याजवळ पत्रे देविली. सा दील्ही आहेत; पावतील. मनस्वी नानाप्रकारची पत्रे ल्याहावयास सांगतात. आम्ही त्रिवर्गेहि विनंती करीत असतो. परंतु त्याचे कल्पनेस दुसऱ्याने दोष ठेविला मणजे रागे भरतात. असी येक दोन पत्रे बलेबले राहाविली. परंतु आता हे पत्र न लिहिले तर फारच मर्जीस वाईट पडूं लागले. यास्तव लिहिले आहे. असी पत्रे लिहिल्याने लिहिणाराकडेस समयानरूप दोष येईल यास्तव विनंती लि॥ आहे. यैसे पत्र लिहिणे ठीक नाही. तेव्हां निक्षूण विनंती करावी लागेल. यास्तव काय आज्ञा ते जाली पाहिजे. या पत्राचे उतर लि॥च पाहिजे. स्पष्टात न आल्यास आम्हास येथे अडचण पडत्ये. कदाचित उत्तर न आले तर असे पत्र लिहू नये यैसेच आम्ही समजोन पुन्हा पत्र याप्रकारचे ल्याहावयास आज्ञा केली तत्रापि लिहिणार नाही. त्याचे मते जे आम्ही लिहितो ते सारे सरल आहे. न लि॥ तरी तिकडून कठीण. लिहिले तर रिकामा चिताचा क्षोभ. यैसा प्रकार आहे. यात सर्व स्वाम संरक्षण करणार आहेत. बहुत काय लिहावे, सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. स्वामीचे मर्जीचा कांहीं उलेख पत्री लिहून आला मणजे येथें प्रसंगानरूप बोलावयासहि ठीक पडेल. श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री तात्याचे पत्री, तुफानास प्रारंभ जाला आहे, म्हणून बाईसाहिबानी लि॥ आहे. त्याचे उतर वो राजश्री उपाध्येबावास ठाऊक आहे ते करितील, हे विज्ञापना.

*¶Godbole reports to Nana Fadnis some items in the daily life of Anandibai from Kopargaon. Raghopant Thosar's presence is very badly needed there as without him, Bajirao is but playing a truant. The writer explains how difficult it is to manage the things there as against his will he is required to write unpleasant letters to Nanasaheb according to the instructions from Anandibai.*

---

*No. 73]* *[3-9-1788*

## श्री २

पु॥ शेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसांा नमस्कार विज्ञापना. दिनचर्येचे वगैरे वर्तमान :

छ ३ जिल्हेज.

व भाद्रपद शुध्ध प्रतिपदेपासून उपोषणें व रात्रौ पूजा करून ब्राम्हण पढतात. याप्रो च्यार दिवस चतु-

छ ५ जिल्हेज.

त आहों हे पराक्रम यांचेच आहेत.

कलम १

र्थीचे दिवसी रात्रौ जागर करितात. नंतर आज पारणे जालें. येकवीस ब्राम्हण भोजन जाले.

छ ७ जिल्हेज.

१ माहदजी सिंदा मात्र मोठा सरदार आहे. तो तर या प्रांती नाही. कारभारी यांस धाक नाही. तो असला म्हणजे वचक असतो. दुसरा डोईजड नाहीं. याच्या करण्याच्या रीती चांगल्या आहेत परंतु धर्माची जात नाहीं.

१ मोरोबा इत्यादिक ठेऊन आपणच कारभार करितात. त्यांजकडे दोष काय ठेविले आणि हे निर्दोष कशावरून ?

१ सारांश, दैव हेच खरे. जिऊबाई चापेकर यांची कन्या नासिकास आली होती, ती येथे आली.

—
३

छ ११ जिल्हेज. सौ भागिर्थीबाई[१] पुण्याहून आली. पाच घटका रात्रीस वाड्यांत आली. त्यांची आजी व चुलते ऐसे वाड्यांत आहेत. कलम १

छ १३ जिल्हेज.

१ सायंकाली बाई व सावित्रीबाई[२] बागांत गेली होती. नंतर केसो माहादेव यांचे बागांत गेली होती.

१ कपिला शष्टीसारखी पर्वे मोठी आहेत. गोशते व्हावी. पूर्वी लाहान

छ ६ जिल्हेज.

१ भागिर्थीबाई यांचे येण्यांचा खोलंबा नवता आणि आम्ही बलावणे पाठविले तेव्हा न येत; आणि आता येतात. तेथेंच माहेरी राहावे हेंच चांगलें.

१ आनंदवलीस बेलाची झाडें चांगली आहेत. तेथेंच राहावें असें करारांत होतें. परंतु थोरले बाईने येऊ दिल्हे नाही. यांत त्यांचे हातास काय आले तें कलेना.

—
२

छ ९ जिल्हेज.

१ भाऊसाहेबास हिंदुस्थानांत जावयास कारण व सर्व बराबर व्हावयास कारण थोरली बाई.

१ भाऊसाहेबाची गर्दी जाल्यावर नानासाहिबांची अमर्यादा फारच केली. पुढें तरी हेंच जाले. दुईच्या गोष्टी निघों लागल्या. आम्हास कैद केलें. नंतर हटासच पेटले. सारांश दैवानें केलें हेच खरें.

—
२

छ १२ जिल्हेज.

१ माहादजी सिंद्याची बातमीची गोष्ट निघाली, आणि तिकडील वर्तमान सांगूं लागली. तिकडील

---

१ बाजीरावाची बायको.

२ अमृतरावाची बायको.

पर्वणी पडत परंतु धर्म बहुत होत असे. आतां परस्वाधीनता हेंच खरें.
२

छ १४ जिल्हेज. चाकरीची माणसे कालानरूप आहेत. त्यासच धाक असला म्हणजे हेच चांगले होतील. कलम १

छ १६ जिल्हेज. उपाध्ये यांस नानाचा निरोप होत नाहीं म्हणोन लौकर येत नाहीं. त्यास ही गोष्ट उगीच म्हणावयाची. हेच येत नाही हें खरें. कामें काजें करून लौकर येणार आहेत. त्यास आसीं आमचीं कामें किती ? त्यांस खर्चाची गोष्ट जड पडते म्हणोनच कपिलाशष्टीकरितां आधिक मागों नये असेंच पूर्वीच लिहिलें होतें. नाहीतर, त्यास दोन चौक्या अधिक ठेवावयाचें स्मरण होते, आणिक कपिलाशष्टीचें स्मरण राहाणार नाहीं असें किमर्थ होईल ? कलम १

वाड्यांत पक्ष जाला १
२

छ १९ जिल्हेज.

१ कपिलाशष्टीनि।। सर्व खाशांकडे गोप्रदानें जाली व व्रतें जाली.

१ रात्रौ जागर केला. बाई व सावित्रीबाई वगैरे बायका वाड्यातील होत्या.
२

पालेगर मिळाले होते ते बदलले. त्यांतीलच खंडेराव म्हणून ममतेचा होता, त्याणे संभाळून निराले काढिलें. वरकड सर्व लूट जाली. जातीने मात्र संभाळिलें. आतां चिंता नाहीं *

१ जिऊबाई बोलिली की, यात्रेविसी उपाध्यास लिहिलें त्याचें उतर आले नाही. त्याजवर बाईचे बोलणे.

१ आर्घ्यप्रधानाविसी लिहिले होते.

१ यात्रेविसी.
२

दोन कलमाचे उतर आले नाही. तस्मांत नानाजवळ आमची कामे बोलतात की कसे हे कलेना.

१ पूर्वी साहेब व आमृतराव समुद्रामध्ये आठ दिवस होते आशा विपत्ती भोगिल्या.
३

छ १७ जिल्हेज. कालाचे दिवस व्यर्थ जातात. सर्व दानधर्म स्वसत्तेसिवाय यथास्थित घडत नाही. आमचे मर्जीनरूप धर्मव्यवस्ता घडत नाही. उगेच संशय धरितात. काय करावे ? आम्ही किमपि वांकडी गोष्ट सहसा करित नाहीं, असे बाई व आमृतराव बोलत होतें. कलम १

*This passage requires being clearly explained.

छ २१ जिल्हेज.

१ पूर्वी साहेबानी प्रायश्चित केले ते समयीच मला बलाविले नाहीं. किमर्थ, असे विसाजीपंताजवल पुशिले. ते बोलिले कीं, तुम्हाकडे काहींच नाहीं. सारांश, फितुरामध्यें नव्हतें ही खातरजमा आहे; परंतु उगेच हाल करितात. *

१ पूर्वी गोविंद सिवराम याणे चेंड[१] केले आणि साहेबाजवल शफत केली. नंतर महिन्यानें मृत्यु पावला. ज्यांणीं शफता केल्या ते कोणीच वाचले नाहीं. नाना व हरिपंत मात्र चांगले आहेत. यास उतर आपाजी राम यांणीं केलें, नारायणराव यांचे गर्दीमध्यें नव्हते म्हणोन हे दोघे यथास्थित आहेत; व आपणहि बारा वर्षे फिरत होतां, येके जागे राहणें न जालें. नंतर बाई बोलिली कीं, ते व आम्हीं कायमच होतों यांत विशेष काय ?

१ या स्थलापेक्षां इंग्रजांकडे सुखांत होतो. दैवेंकरून असें जालें. देसीं येऊन दुखच आहे. दैवयोग !

१ माझी ममता विशेष म्हणोन नारायणरायाची गर्दीचा मार मला सांगत नव्हते. यांणीं चौकसी किमर्थ केली नाहीं ? यादीचीं अक्षरें "ध" चा "मा" कोणीं केला याची चौकसी किमर्थ न केली ? माझा दस्ताणेवज किंवा निरोप कांहीं

छ १८ जिल्हेज. कपिलाशष्टीची धर्माची नेमणूक करते समई बोलणे : पुण्यात तीन हजार रूपये धर्मास नेमलें म्हणोन ऐकिले. त्यापक्षीं आम्हास काय देतील ? मोठे पर्व असता असे केले; तस्मांत धर्मबुद्धि नाही. कलम १

छ २२ जिल्हेज. बाजीराव तृतीय प्रहरी कोकमठाणास स्वारी गेली होती. कलम १

छ २३ जिलेज. त्रितीय प्रहरीं वाड्यांत घोडीं फेरित होते. कलम १

छ २४ जिल्हेज.

१ दादासाहेब बहुत शाहाणे होते. परंतु सुरतेंहून निघतेसमई पुढें आसा परिणाम होईल हे चितांत आले नाही. ते म्हणत कीं, बाजीराव याजवर लोभ फार आहे व तुम्हीहि त्यांचे ममतेची. त्यापक्षीं मीं मात्र निराला आहे. माझेहि वृध्धत्व जाले. त्यापक्षी देसी जावें हें चांगलें. परंतु हे कृतघ्न आहेत हे कलले नाही. दैवानुसार जालें.

---

१ मुताटकी.

तरी निवडावयाचें होतें. काहीच न करितां उगेच पेचांत ठेविलें. दैवास उपाय नाहीं.

१ अमृतराव याजवर लोभ फार आहे. स्नानसंध्या भक्तिपुरस्कर करितात. पूर्वी साहेबास संतान न व्हावें असे योग जाले, म्हणोन दत्तक घेतले. परंतु चाल चांगली आहे. असे आसोन यासी दावा करितात. त्यास, जी गोष्ट होणे ती पूर्वीच जाली आतां फिरत नाही. त्यापक्षीं धनी तर खरें; नानाची फडणीसी मागत नाहीं, मग इतकें प्रयोजन काय ?

—

५

१ त्रितीय प्रहरानंतर बाजीराव याची स्वारी मौजे हिंगणी येथे देवदर्शनास गेले होते. दोन घटका रात्रीस आले.

—

२

१ साहेब मृत्य पावले त्या स्थानी देवालय बांधिले होते, तें गंगेच्या पुरानें पडलें.

छ २९ जिल्हेज. सोमवार नि॥ बाजीराव अमृतराव कचेश्वरास देवदर्शनास गेले होते. कलम १

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*This diary of Anandibai's utterances, extending over about a month, contains many useful and interesting bits of information, reported from the lady's quarters to Nana Fadnis at Poona.*

---

*No. 74]* *[2-10-1788*

## श्री २

पु॥ सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक सिरसां नमस्कार विज्ञापना.

छ १ मोहरम.

याप्रा निरोप सांगून निघाली. प्रातःकाली दर्शनास नेली ती प्रहर रात्रपर्यंत वाड्यात होती. नंतर निघाली.

छ ३ मोहरम.

१ त्रितीय प्रहरी बाजीराव व आमृतराव याची स्वारी कचेस्वरास व कोकमठाणास देवदर्शनास सोमवारनिमित्य गेली होती.

१ सौ भागीर्थीबाईस किंचित समाधान नाही, ज्वरांश होतों.

—

२

सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Report sent to Nana Fadnis of Anandibai's doings at Kopargaon.*

पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद

५

# बारभाईंचें राजकारण




[किंमत — १ रुपया किंवा १ शिलिंग ८ पेन्स]

गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेस, मुंबई
१९३०

## *THE LEAGUE OF THE BARBHAIS*

The two tragic events of transcendental importance in Maratha history that hastened the national fall are rightly considered to be the untimely death (18th November 1772) of the great Peshwa Madhavrao I, and the cruel murder of his brother Narayanrao on the following 30th August 1773, perpetrated by his famous—or rather infamous—uncle Raghoba, whose rulership the nation was determined to reject at any cost. But Raghoba was so brave and powerful and circumspect that few could have imagined at the beginning that he would be successfully resisted. Thereupon a grand plot came to be gradually formed at Poona which is known in history as the "League of the Barbhais." While a few details of this league and the measures it took to oust Raghoba from what he considered his rightful possession, are very well known, a student of history is at present ignorant as to its most pertinent features which could reveal the authorship and the methods of that great undertaking,—perhaps the only one in which so many soldiers and statesmen of all shades of opinion whole-heartedly joined. The following papers, which have been discovered in the Peshwa Daftar, clear most of the outstanding doubts with reference to the organization and working of this league, and supply for the first time valuable circumstantial evidence enabling the student to pass correct judgments on the character and capacity of the various individuals that composed it.

Two characters, Sakharam Bapu and Trimbakrao Pethe, appear in these papers to be the first to launch the scheme, which, it is evident, would not have succeeded if the former had not taken the lead at great personal hazard. He was a very old and experienced statesman, having taken part in the development of the Peshwas' rule right from its very beginning. Trimbakrao Pethe was an equally old and experienced soldier, who had worked under Bajirao and Chimaji Appa, helped Nanasaheb in many a critical situation, and knew his craft thoroughly. Indeed it is this Trimbakrao's letters, nearly all in his own hand, discussing the pros and cons of the step that was being taken, which form the most important part of the correspondence which is being published in this section. Trimbakrao and Raghoba had in December 1773 started from Poona on an expedition into the Carnatic, when suddenly Sakharam Bapu returned to Poona on a pretence of illness and there consulted Nana and Moroba Fadnis, converted them to his views, and persuaded Trimbakrao, by means of secret agents, boldly to support the cause of Gangabai, then a few months advanced in pregnancy, and declare an open fight against Raghoba. Trimbakrao managed to enlist for the scheme the sympathy and services of the Bhonsles of Nagpur and the Nizam of Hyderabad, interviewed them personally, and skilfully managed the military preparations, upon which after all depended the success or otherwise of the risk they had undertaken.

Nana Fadnis played only a secondary part and Moroba was vacillating and half-hearted, intent rather upon selfish end than the success of the national cause, a trait of his character which entirely ruined his career later on. Sakharam Bapu contrived to send the two ladies Gangabai and Parvatibai to the fort of Purandar for safety, visited Satara to prevent the Chhatrapati falling into Raghoba's hands, sent urgent emissaries to Scindia and Holkar, supplied funds and ammunition to Trimbakrao in the field, and started the normal civil administration, and above all, with his vigilant eye moving in every direction, enthused all workers with a sense of duty and sacrifice, rare indeed in those decadent days of Maratha rule. Trimbakrao Pethe mentions Sakharam Bapu as the Dictator invested with all emergency powers.

The second batch of letters, equally important with those of Trimbakrao, refer to the affairs of the Bhonsles of Nagpur and are from the pen of Baburao Vaidya, who was specially despatched from Poona to the court of Nagpur to enlist their help for the cause of the Barbhais. It was unfortunate that an accident at the very outset put an end to Trimbakrao's life, thereby giving Raghoba an opportunity to escape to the north and eventually to seek the protection of the British at Surat, so that the whole affair which could have been easily concluded in a couple of months lingered on for nine long years, putting the mettle of the nation and its leaders to the severest test. The ultimate success is only a melancholy solace when one knows that Sakharam Bapu, the real author of the grand undertaking, had to end his life in a miserable confinement at the fort of Raigad at the hands of those very persons who owed their rise to his own initiative.



No. 1] [10-6-1773

पो छ १८ रावल सन आर्बा.

**श्रीसीताकांत.**

**राजश्री सखारापंत बापू**

**गोसावी यासि,**

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये श्रो मुधोजी भोसले सेनाधुरंधर दंडवत विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीयकुशललेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपणाजवलोन राजश्री महिपतराव दिनकर व व्येंकटराव कासी निघोन आलियानंतर भेट जाली. तेच दिवसीं निघणे होऊन पत्र पाठविलें, त्याजवरून सविस्तर कललेच असल. प्रस्तुत आम्ही आलजपुरास येऊन भाई नवाब इसमायेलखान बाहादर याची भेट घेतली. याउपरी आपणाकडील पत्रांचीं उतरें येतील त्याप्रमाणे पुढें वर्तणूक घडोन येईल. आम्ही सर्व प्रकारें आपले वचनावर भार ठेऊन निघालों. आपणास कोण्ही समजावितील व ध्यानातहि आले असल जे, दिवसगत लागली म्हणोन. त्यास तेथोन समर्पक उतरास आभाव हाहि विचार, आपले पूर्व ममतेवर चितात न ठेवितां निघावे, तरी न पुसतां निघणे स्वरूपास उचित नाही. व निघतांच तेथील जथ विस्कलीत होये असेंहि जाले पाहिजे. या साधनास दिवसगत लागली व घरचा जमाव थोडका जवल होता म्हणोन वराडातील पाचसाहा हजार फौज आपलेकडील आणऊन बऱ्हाणपुराहून आपणाकडील समुदायास इतला[१] करून तेथे निरोप घेऊन निघालों. याउपरी वडीलपणास उचित त्या रीतीने परामर्ष करावा. सविस्तर मजकूर इकडील श्रवण व्हावया यास्तव राजश्री व्येंकटराव कासी यास येका दो रोजा आपणाकडे रवाना करितो. पावलीयानंतर सर्व ध्यानास येईल. आम्ही येथून आपले लिहिल्याप्रमाणें चंद्रपुरास जावें, त्यास कनिष्ठाकडील[२] फौज च्यार पांच हजार चंद्रपुराभोवते कुल परगणे लुटून वराडांतहि दंगा आरंभिला आहे. मुलूक तमाम उद्वस केला. ऐसी वर्तणूक पाहून त्यासहि निशेधाची पत्रें पाठविलीं आहेत. न ऐकिल्यास पारपत्य करावें लागल. हाहि इतला आपणास असावा म्हणोन सूचना लिहिली आहे. वरकड आमचा घरचा विचार सर्व आपणास

१ तजवीज, जबाबदारी. २ साबाजी भोसले.

आवगत आहे. आज दोन वर्षे घरकलह लागला, याजमुळें सिबंदीचे पेचात दौलत आली. फौजेचे देणे चढते. ते द्यावयास जागा नाही. तेव्हा लोकांचा




उलगडा होऊन त्यापासून सुटका न होये. दिवसेदिवस आधिकच पेच. हातावर कोठ-पर्यंत चालवावे? अडचण कोठपर्यंत सोसावी? इतकेहि घडोन पूर्व दिवसच दिसोन येत आहे. या संकटापासोन सोडविणार आपणाविना दुसरे कोण आहे? यास्तव लोकाचे हातून दिवस कसे काढावे, वागावे कोणे रीतीने, हे वरचेवर वडीलपणे सूचना करून सांभाल केला पाहिजे. मोठमोठी संकटें निवारण करून हे दिवस आपण दाखविले. तैसेच पुढेहि निर्वाह करणे आपणाकडेच आहे. तेथे आम्ही विस्तर ल्याहावा ऐसे नाही. रा छ १ रबिलोवल. मागें मोठे मोठे संकटातून आपण बहुता रीतीनें वागविलें, त्यामुळें हे दिवस पाहिले. सांप्रत तों श्रीनें सर्वाध्यक्षता आप-णासच केलें. यामुळें आमचे मनोदये सर्व जे अस्तील ते सिधिस जातील, ही निशा पूर्तीच जाणतों. आपले उतराची प्रतीक्षा करीत असों. कारण मिळून, आपले मागील उपकारांचे स्मरण चिताचे ठाई पुर्ते आहे. वरकड सविस्तर, मारनिले येतील, त्याचे जबानीवरून श्रुत होईल. बहुत काये लिहीणे, लोभ असों दील्हा पाहिजे, हे विनंती.




¶*Mudhoji Bhonsle, who disputed with Sabaji the right of guardianship of (Raghuji Bhonsle) the young prince of Nagpur, requests Sakharam Bapu, the Peshwa's Karbhari at Poona, to act as a mediator and settle once for all his differences with his brother Sabaji. He refers to his intention of coming over to Poona to get the affair settled in a personal interview. Mudhoji writes that fortunately for him Sakharam Bapu, his well-wisher, is at the head of affairs at this time.*

---

*No. 2]* *[4-9-1773*

## श्री

### श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी,

आज्ञाधारक सुमेरसिंग सुभेदार साष्टांग नमस्कार विज्ञापना येसीजे. रा बालाजी वामन दामले यांस सरकारातून कैद केले होते. त्यास साहेबाजवल

सेवकानी अर्ज करून मारनिल्हेस सोडविले आहे. याउपरी याजपासून कोणे येके गोष्टीचे अंतर पडल्यास व बालाजी वामन आज्ञासिवाय हरयेक जागा गेलियास आपण खुद निसबत जामीन आहे. हे लिहून दिल्हे, सही. छ १६ जमादिलाखर भाद्रपद वद्य त्रितीया सुक्रवार सुा आर्बा सबैन मया व अलफ. हे+ वीनंती.

¶*Sumersing to Raghunathrao, saying that he stands surety for Balaji Vaman Damle who has been released from confinement.*

---

*No. 3*] [*12-11-1773*

**श्री**

**राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ**

**स्वामी गोसावी यांसी,**

विनंती. उपरी, राजश्री रावरंभाजी जयेवंत निंबालकर व माहाराव जसवंत निंबालकर याचा माहल पाो आवसे येथे गावगना तुम्ही रोखे करून पैका घेतला, पाटील कुलकर्णी ओलीस ठेविले, म्हणून कलले. त्यास पाो मजकुरी पैका घेतला असेल तो माघारा देऊन, ओली ठेविल्या असतील त्या सोडून देणे. पुढे यांचे माहाल वरवाल व लातूर वगैरे लागेल; त्यास उपद्रव न करणे. जाणिजे छ २६ साबान सुा आर्बा सबैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Trimbak Vishvanath Pethe is ordered to pay back whatever money he had exacted from the Mahals belonging to the Nimbalkars and not to harass them any more.*

---

*No. 4*] [*November 1773*

**श्री**

**राजश्री त्रिंबकपंत स्वामीस.**

नमस्कार विनंती. उपरी, तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. मोगलांकडे आपले फौजेची नेमणूक जाली आहे. चार महिने लागतील. तुमची वाट फार पाहिली परंतु आले नाहींत. आम्ही तर शुक्रवारी श्रीमंताची आज्ञा घेतली. रविवारीं येथून जाऊं. तातडीनें गेले पाहिजे. तुम्हांस खर्चास तीस हजार नक्त व

---

+ हा मजकूर बालबोधींत आहे.

कापड आठ हजार आख, रामचंद्र नाईक परांचपे यांजवळ ठेविले आहे ते घेणें. तजविजीनें खर्च करणें. कदाचित् शनिवारी आलेस तरी गांठ पडेल. आम्ही बरोबर स्वार न्यावयाचे ते तपशीलवार नेमणूक करून पाठवितो. रवाना शुक्रवार दोन प्रहर. + हे विनंती.

*¶Sakharam Bapu to Trimbakrao Pethe that his forces have been ordered to march against the Nizam. The letter must have been written in November when Bapu returned to Poona to confer with other leaders in the matter of taking steps against Raghunathrao who had usurped the Peshwaship.*

---

*No. 5]* *[2-12-1773*

पौ छ २२ रमजान सन आर्बा सबैन
सायंकाल.

**श्रीशंकर.**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**
**नारोपंत नानां[1] स्वामीचे शेवेसीं,**

पोष्य त्र्यंबकराव विश्वनाथे[2] कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. राजश्री साबाजी भोसले फौजसुधां सरकारच्या मुलकांत सिरोन दंगा करून मन माने तैसा पैका घेत आहेत, त्याचे पारपत्याकरितां श्रीमंतानीं फौजसुधां आम्हांस रवाना केलें. आज छ १७ रमजानी आमचा मुकाम सेवगांवनजीक जाला. उदेक सब्या फौजा करून भोसल्यास आडवे होतों. आगोधर साम प्रकारें लिहिणें बोलणें. तोहि आर्थ, त्याचें पत्र आम्हांस आलें होतें, त्यावरून रा मल्हार चिंतामण वाघ यांजबो बहुताप्रकारें समाधानाचें विवेकाचे शब्द लेहून, सेनासाहेब सुभ्याचे साम्यतेचे पद सरंजाम मानवरीप्रमाणें द्यावयाचें जाब सुचविलें; परंतु त्यानी त्याच पदाचा आग्रह धरून मरणपर्यंत संकल्प केला. जेथवर हात पोहोंचेल तेथवर प्रजेस उपसर्ग देऊन पैका घेईन, कोणी आडवे येतील त्यासी युध करून मरोन बरें म्हणवीन, असीं प्रतिज्ञेचीं उतरें वकिलाजवळ बोलतात, आणि उपद्रव अधिकच करितात, याजकरितां पारपत्यच करणें प्राप्त. आमचे फौजेपेक्षां त्याची फौज फार आहे. येकायेकीं जुमेस[3] खाणार नाहींत. परंतु आम्हीं आडवे आलों असतां नासिक पुणे इकडे जाणें घडणार नाहीं. तथापि न कले. पुणें तर दूर. नासिक मात्र

---

+ सर्व पत्र सखाराम बापूचे हातचें. अक्षर कांपरें आहे.

१ तुळसीबागवाले. २ पेठे, ३ भीति, माघार.

जवळ आहे. ईश्वरी सत्ता प्रमाण. जसा प्रसंग नजरेस येईल तसतसी पूर्व सूचना तुम्हांस लिहून पाठऊं. तुम्हीहि आपलेकडील नवल विशेष लिहून कळवीत जाणे. घरीं मुलें मनुशें आहेत, त्यांस प्रसंगोचित् साहित्य लागल्यास करून देऊन सर्व प्रकारें परामर्श करणे. रवाना छ १७ रमजान. बहुत काय लिहिणें, लोभ असों देणें, हे विनंती. येकदांच तुमचे नांवची दोन पत्रें बेदरचे मुकामाहून श्रीमंतीं आजच पाा दिल्ही तीहि पाा असेत. हे विनंती.

¶*Disappointed when his claims to the dignity of Sena-Saheb Subha of Nagpur were overlooked in favour of his nephew Raghuji, Sabaji Bhonsle collected a strong force and laid waste Nagpur territory. Absence of a strong opposition emboldened Sabaji to extend his raiding activities into the Peshwa's provinces. All attempts to arrive at a compromise having failed, Trimbakrao Pethe was despatched by Raghunathrao to punish the miscreant. Trimbak Rao in this letter informs Raghoba that his small force would not be able to hold against Sabaji.*

---

*No. 6*] [*16-1-1774*

पौ छ १० जिलकाद
सन आर्बा सबैन.

**श्री.**

सेवेसी त्र्यंबक हरि वर्तक कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा छ ३ जिलकाद मु।। दुधनातीर पाा परबाणी येथास्थित असे विशेष. कृपा करून पत्रे पाठविली ती पावली. श्रीमंत राजश्री त्रिंबकरावमामास पत्र प्रविष्ट केले. आपल्या लिहिल्यावरून राजश्री जनार्दन राम याजबाो पांचसे स्वार देऊन साष्टीकडे परभारी रवानगी केली. इकडील मजकूर साबाजी भोसले फौजसुधां याजबाो श्रीमंतांकडे जात आहेत. रघोजी भोसले व दर्याबाई श्रीमंतांची आज्ञा घेऊन निघाली आहेत. मार्गी भेट होईल. हेहि मजल दरमजल जाणार. जासूद आा ६ पाठविले आहेत म्हणून लिाा; पैकी दोन आले, ते जाब देऊन माघारे पाठविले आहेत. चौघे आलेच नाहीत. याउपरी नवीन मजकूर आढळल्यास सेवेसी लेहून पाठवीत जाईन. घरी पत्र लिहिले आहे. लाखोटा प्रविष्ट होऊन उतर आले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विनंती. राजश्री जनार्दनपंतदादास सां नमस्कार विनंती. सदैव पत्रीं तोषवीत आसावे, हे विनंती.

¶*Letter addressed probably to Sakharam Bapu giving news about the movements of Sabaji, Mudhoji and Daryabai.*

*No. 7]* *[29-1-1774*

**श्री**

**अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री**

**नारो आपाजी गोसावी यासी,**

सेवक रघुनाथ बाजीराव प्रधान नमस्कार. सुरू अर्बा सबैन मया व अलफ. खासा स्वारीचा मुकाम पेडगावी भीमातीरी होता. तेथे पेशवाइची वस्त्रें घेतली. त्या स्थळावर आषाढमासी महिनाभर राहावयाचें आहे. सबब तेथे वाडा बांधावयाचा असे. त्यास तुम्ही आनंदवलीचे वाड्याचे नकशाप्रों डौल धरून दाहा हजार रुपयांवर व पंधरा हजारांचे खाली, इतक्या यैवजांत छपरबंदीसारिखे काम करणे. बलकी[१] छपरबंदीहि केली तरी कार्यास येईल. आनंदवलीचे वाड्याची मेरामत[२] अंताजी राम यास लेहून पाचसातशें रुपयांत करवणे. वाडा बांधिल्यास दिवसगत लागेल. तूर्त होणार नाही. छपरबंदी करावी तरी तेहि मर्जीस येणार नाही. यास्तव बहुत [क] डेऱ्यातच महिनाभर राहाणे होईल. यास्तव जमीन मात्र मुरूम घाळून निबर असावी व छपरे शेदीढसे चांगली असावी. आइते वेळेस जसे बनेल तसे केले जाईल. वेळूचे कुडीचे साहित्य असावे. डेऱ्याच्या मेखा असाव्या. यास्तव दाहापाच हजार रुपये लागतील ते देणे. स्वारी आलियावरी साहित्य मात्र असावे. लाकूडकडब्याविसी अलाहिदा पत्र पाठविलेच आहे. छ १६ जिलकाद.

लेखना
वधि:

¶*Raghunathrao to Naro Appaji, informing him that when he was at Pedgaon on the Bhima he received the robes of the office of the Peshwa. He further communicates to him his wish to build a house there quite similar to the one at Anandvalli.*

---

*No. 8]* *[5-2-1774*

**+श्रीसांब: सपुत्रो विजयते.**

**राजश्री सखाराम भगवंत यास,**

विनंती. उपरी, बहुत दिवस तुम्हाकडून पत्र न आले. वर्तमान कळले नाही. तरी ऐसे न करणे. आपले शरीराचे व मनसुब्याचे प्रकार आढ[ळ]तील

---

१ किंबहुना. २ डागडुजी.

+ सबंध पत्र राघोबादादांच्या हातचें आहे.

सुचतील ते लिहित जावे. सांप्रत बहुत दिवस घरी आहां; औषध उपाय करून आरोग्य जाहालाच आसाल. यास्तव लौकर दिवस चागला पाहून येणे. तुम्ही मातब्र शाहाणे जवल आसावे हे आमचे मानस; व तुम्हासहि उ (चित) तरी लौकर यावे. सविस्तर अर्थ येवि(सी) चे रा विष्णु नरहर याचे जबानी कलतील. जाणिजे. छ २४ जिलकाद. बहुत काये लिहिणे, हे विनंती.

¶*Raghunathrao makes enquiries about the health of Sakharam Bapu and expresses a hope that he would soon join him for consultation.*

---

*No. 9]* [6-2-1774

पौ छ ३० जिलकाद

आर्बा फाल्गुन.

**श्री.**

**श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे शेवेसी,**

विनंती शेवक धोंडो माहादेव सां नमस्कार विज्ञापना. ताा छ २४ जिलकाद-पावेतो स्वामीचे कृपावलोकनेकरून वर्तमान येथास्थित असे. यानंतर छ १९ जिलकादचे आज्ञापत्र सादर जाहालें. तेथे आज्ञा की, श्रीमंत मातुश्री पार्वतीबाई व गंगाबाई यांस घेऊन आम्ही व राजश्री सखारामपंत माघ वाा त्रितीयेस पुणियाहून निघोंन किले पुरंधरास आलों. तुम्ही बहुत खबरदारीने राहावें. राजश्री सुभेदारासहि कलवावें, कान्हुरात[1] राहू नये व माधवराव याणी नगरचा बंदोबस्त करून राहावे, म्हणोन आज्ञा. त्यास, आज्ञेप्रो सर्व बंदोबस्त येथास्थित आहे. स्वामीचे पत्र तीर्थस्वरूप राजश्री सुभेदारानी व चिरंजीव राजश्री माधव[2]राव याणी पाहून आम्हाकडें आलें. चिरंजीव माधवराव किले नगरचा बंदोबस्त करून किल्यातच आहेत. सुभेदार कान्हुरी आहेत. तेहि आज्ञेप्रमाणे किल्यांस जातील. बंदोबस्ताविसी काही चिंता नाही. वर्तमान मात्र वरचेवर तीर्थस्वरूप राजश्री सुभेदाराकडे ल्याहावयाची आज्ञा करावी. ते वरचेवर येथे लिहीत जातील. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Dhondo Mahadeo acknowledges the receipt of a letter which stated that Nana Fadnis and Sakharam Bapu, together with Parvatibai and Gangabai, have moved to the fort of Purandar and writes further that proper arrangements will be made for the defence of Ahmednagar fort.*

---

१ ता. पारनेर, जि. नगर. २ नगरकर ?

No. 10] [7-2-1774

पा छ २ जिल्हेज.

श्री

श्रीमंत् राजश्री बापू स्वामीचे शेवेसी.

पोष्य नारो शंकर कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ २९ जिलकादपर्यंत स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. कृपा करून पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन दर्शनातुल्य संतोष जाहाला. पत्रीं वर्तमान लेखन केले. त्यास, जो आपण विचार केला तो प्राणसंकष्टाचा प्रकार जाणौन पोख्तच केला. ज्याच्या संग्रही पूर्वापर त्याच्या पायासी निष्ठा धरिलियां सर्व आपले आज्ञेतच आहेत. आमची शरीरआवस्था परस्परे विदितच आहे. आशक्त शरीराचा केवल प्रकार, याजमुले निरोपाय. आम्हांकडील फौजसुध्धां चिरंजीव लस्करांत राजश्री त्रिंबकराऊ यांजपासी आहे. ते त्यांचे आज्ञेतच आहेत. आपलें पत्र आलियां आम्हींहि त्यांजकडे येथून पत्रे पाठविलीं आहेत. आंम्ही सर्व प्रकारे आपले आज्ञेत असों. विस्तारें काये लिहावे ? बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Naro Shanker to Sakharam Bapu assuring him of his full support in his new undertaking. The writer further informs him that his son accompanied by his contingent has joined Trimbakrao.*

---

No. 11] [7-2-1774

पौा छ ३ जिल्हेज.

श्रीशंकर प्रसंन्न

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
सखारामपंत बापू स्वामीचे सेवेसी.

पो आनंदराव भिकोजी[1] कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता छ २९ जिलकाद मुा नजीक नांदेड गंगातीर जाणौन स्वकीये कुशललेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपण छ १७ जिलकादचे पत्रे राजश्री मामास व आम्हास पाठविली ती पावली. उभयेतानी आक्षरशा वाचून पाहिली. सविस्तर मजकूर कलला. ईस्वरइछा होती त्याप्रा योज्यना होऊन घडोन आलें. मुल्यत्वे मोगल जरूर अनकूल असावा. तो बदोबस्त अगोधरच आपण केला

---

१ याच अर्थाचें नाना फडणविसास पत्र आहे. २ रास्ते.

आहे म्हणून निरोप पाठविला होता, परंतु राजश्री त्रिंबकराव मामा यासी ये गोष्टीचे दाखले पडोन, त्याजकडून येकवाक्यता नजरेस यावी म्हणजे मग फारसा पेच पडावयाचा नाहीं. येथे तरी आजपर्यंत मामानी मसलत केली ती बरीच जाली. पुढे प्रसंगानरूप करणे प्राप्त. त्यापक्षी या प्रसंगी ज्यासी जसे बोलणे, कबूल करणे, प्राप्त होईल तसे करतील. इकडील कोण्हीयेक सरदारास वगैरे याउपरी लिहिणे ते परभारे न ल्याहावे. जे लिहिणे ते मामासच लिहून पाठवावे. हे समजोन करणे तसे करतील, बोलणे तसे बोलतील. त्यामुळे याचे लगामी सर्व राहून जथ बरा पडेल. इतके दिवस ज्यास जसे लिहिणे तसे लिहून लगाम राखिले ते उतम. परंतु पुढे याप्राो व्हावे. पैका तर जरूर या मसलतीस मबलग लागेल, त्याविसीचा पुस्तपन्हा पुर्ता जाला पाहिजे. हे गोष्ट आपण डोईवर घेतली त्यास येसमई आपणं[१]च बाहेर येऊन आम्हास सर्वास बुधिप्रकार मनसबा सांगोन मामा आपण येक होऊन करणे तसे करावे. मग कोणे गोष्टीची फिकीर आपण करावीसी नाहीं. आम्ही सर्व आनकूल आहो. बहूत काये लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

¶*Anandrao Bhikaji Raste advises Sakharam Bapu to carry communications with other Sardars through Trimbakrao Mama only. It is this step that will secure unity of command. The writer further requests the addressee to supply money for the undertaking and to come out himself.*

---

*No. 12]* *[8-2-1774*

## श्रीशंकर

### राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
### सखारामपंत बापू स्वामीचे शेवेसी.

पोष्ये त्रिबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनती उपरी. येथील कुशल तागाईत छ २६ जिलकाद पावेतो मु॥ गंगातीर नांदेडासंनिध असो विशेष. छ १७ जिलकादची पत्रे तुम्ही पाठविली तीं छ २९ माहे मजकुरी संध्याकाली मु॥ मजकुरी पावली. पत्री लि॥ कीं, वांकडे घडोन पुढें कैलासवासी नानाचे वंशास ठिकाण नाहीसे भावी दिसो लागलें ; त्यामुले श्रीकृपेने राज्याचाहि बंदोबस्त व्हावा आणि चांगलेहि दिसावे, याकरिता आम्ही व राजश्री नाना फडणीस व राजश्री मोरोबा दादा फडणीस व हरीपंत फडके येकत्र होऊन उभयता मातुश्री

---

१ याठिकाणीं नानाच्या पत्रांत 'बापूनी' हा शब्द आहे.

थोरले बाईचे अनुमते युक्तीने काढून किले पुरंधरास घेऊन गेलो. पुण्यातील बंदोबस्तास मोरोबा दादा ठेविले. वरकड कितेक साधनाचे प्रकार पूर्वी सागोन पाठविलेच आहेत, त्यांत मुख्यत्वेकरून मातबर साधन यवनाचे, त्याविसीची चिंता न करावी यैसे निरोपात सागून पाठविलेच होते. रा सिदे होलकर याजाविसीहि साधन केलें. राजश्री फतेसिंग गायकवाड आपलाच आहे. तुम्हाजवल सर्व मंडली राजश्री आनदराव रास्ते सुधा आहे ती आपलीच आहे. राजश्री साबाजी भोसल्यासी बोलण्याचा सिलेसिला होताच. त्यांचीहि अनकूलता तुम्ही करून घेतलीच आहे. फौजेचा जथ तुम्हाजवल आहे. पैक्याची कालजी न करणे. जो पैका लागेल त्याची पुरवणी होईल. आम्ही चांगले लौकिकांत दिसावें, चांगलें व्हावें याकरितां समजोन केलें. तुमचा सर्व प्रकारे भरवसा, यास्तव पुढील कर्तव्य ते सुचेल त्या प्रकारे आम्हीहि लिहून पाठऊ आणि तुम्हीहि लिहून पाठऊन करणे तसे करावे. त्यास "श्रीमंताचे जालें ते जाले, परंतु पुढें वंशास उचीत, सर्वांचे संरक्षण होऊन राज्यभार मार्गें करून चालविते, तर इतके करणेहि प्रयोज्यन नवते. परंतु उचीत प्रकारच दिसेनासा जाणोन करणेहि सर्वांस प्राप्त. इत्यादिक प्रकारें तुम्ही व राजश्री नाना फडणिसानी लि॥ ते कलले. प्राप्त जाला प्रकार केलाच पाहिजे. आम्हास इतके दिवस साबाजी भोसल्यास आधार कोठेच नाही, ठिकाण बलकट नाही, खर्चास पैसा पदरी नाही, पद होते तेहि नाही पुढे श्रीमताचे कृपेचा भरवसा नाही. दाहा हजार फौजेचा सरदार, फारच सरल, इमान शाबूद, मर्दहि व येशस्वी यांचे संरक्षण होऊन उपयोगी पडावे याकरितां मातुश्री दर्याबाई वराडांत राजश्री राघोजी भोसले सेनासाहेबसुभे यांस घेऊन जात होती, त्यांस युक्तीप्रयुक्तीने लिहून कुडलवाडीपलीकडे गेली असतां मु॥ मजकुरास कालच आली. त्याची आमची भेट जाली, तों तुमची पत्रे आली. आतां तर त्यास व त्यांस येक केले पाहिजे. तूर्त मुलाचा टिकाहि राखावा, सर्व किले जागेचा (लावाला ?) बाईचें हातीं, तिजला मायेत सिरोन मायेत घ्यावी म्हणजे साबाजी भोसल्याची चिंता जाऊन उपयोगी पडतील, यामुले या प्रांती गुंतलों. ईश्वरे योगहि तसाच घडविला. पुढे समजोन लि॥ प्रकारे करूं येक दुसरा मु॥ पडेल. ' मग कूच करून घाट चढोन दर्याबाईसुद्धां येऊं. यवनाकडील आम्हास काही समजण्यात आले नाही. ते येऊन त्याजकडून आमची खातरनिशा व आम्हाकडून त्याची यैसे व्हावे. या गोष्टीचे साधन सत्वर केले असेल तसे निदर्शनास यावे. बातमी श्रीमंताकडील वर्तमान कलल्यावर कसा डौल धरिला ते कलवावी. येका दोघास पुणे व किल्ले यांचे आटोपास

---

१ संबंध.

ठेऊन तुम्ही फौजेत जरूर यावे. शरीर अशक्त असेल तरी श्रीहरी कृपा करील; अथवा आमचे पाठीवर असावे. आम्ही तुम्ही सागाल त्या प्रकारे करू. परतु तुम्ही अनमान न करितां जरूर आले पाहिजे. किले सर्व न गलबलावे याकारितां त्यांचा बदोबस्त नानानीं व तेथे आणखी राहातील त्याणी करावा. रा नारोपंत केसकर अद्यापि आम्हाजवल आले नाहीत. तोफखाना जरूर हाती लागावा. वरकड हुजरात पागा निबालकर गावडे वगैरे मडली निघोन यावी. राजश्री वामनराव तर त्रिवर्ग निघालेच आसतील. या प्रकारे सर्व जथ पडिल्यावर श्रीकृपेने योजिले सिधीस जाईल. येक हैदर नाईक राहिला तर त्याची फिकीर नाही. परंतु वरकड लिाप्रा जथोन यावे. पैका तूर्त नालबदीपैकी निमे व पोटास लागेल तो, यावेगले अर्जमारूज[१] प्रसंगाकरिता आईकणे प्राप्त, यास्तव पांचा लक्षाचा भरणा आम्हाकडे यावा. पैका आणावयास फौज काही पाठवावी की काये ते लौकर ल्याहावे. साबाजी भोसल्याचे पोट तूर्त काही चालविले पा. त्यास दिल्हे काय तेहि कलवावे. बहूत काये लिहिणे, लोभ असो देणे, हे विनंती.

*¶Trimbakrao Vishvanath to Sakharam Bapu: acknowledges the receipt of the letter informing him of the first conception of the Barbhai Scheme by Nana, Bapu, Tatya and Moroba Dada and the removal of Gangabai to Purandhar. The writer further reports how he has tried to win over Sabaji Bhosle and proposes therefore that Sabaji be given some financial succour and then only he (Sabaji) would be of some use in the campaign.*

---

*No. 13*}

श्री

विनंती उपरी रामचंद्र नाईक येथे आले. बोलिलो. तुम्हाकडे पाठविले आहेत. परंतु ते म्हणतात स्वारीत खटपट करणे ते क * तथापि थोडी बहूत करितो म्हणतात. त्या आपल्या खेरीज तूर्त काही होत नाहीं. मन घालून करावे. विसाजी नारायणाकडील नारोपंत कांहीं तजवीज करीन म्हणतो. त्यासहि न्यावे. आजचे दिवसांत करावें हे विनंती.

*¶The letter is all in Sakharam Bapu's hand. He writes (probably to Nana Fadnis) about Ramchandra Naik Paranjpe, on the question of funds being obtained.*

---

१ अर्जमारूज = कोणाची अर्ज विनंती वगैरे असल्यास.

*No. 14*] [*8-2-1774*

पौा छ २७ जिलकाद
आर्बा माघ.

**श्री.**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नाना**
**स्वामीचे सेवेसी.**

पौष्यें गणपतराव भिकाजी रास्ते कृतानेक नमस्कार विनंती. उपरी: येथील क्षेम तागाईत माघ वद्य द्वादसी भोमवार पावेतों वर्तमान येथाथित असे विशेष श्रीमंत राजश्री दादासाहेबांची आज्ञा घेऊन लस्करांतून निघालों ते माघ वद्य येकादसी सोमवारी वाईस आलो. आपणास कळावें. बहुत काये लिहिणे? कृपा लोभ आसो द्यावा, हे विनंती.

¶*Ganpatrao Raste informs Nana Fadnis of his arrival at Wai from the camp of Dadasaheb.*

---

*No. 15*] [*9-2-1774*

**श्रीशंकर.**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**
**सखारामपंत बापू स्वामीचे सेवेसी.**

पोा त्रिंबकराव विश्वनाथ कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ २७ जिलकाद जाणून स्वकीये लेखन करित जाणे विशेष. श्रीमंताचे लस्करांतून राजश्री बाबूजी नाईक व रो कृष्णराव काले वगैरे ग्रहस्त आले म्हणून वर्तमान ऐकिले. त्यास ते कोणते आशयाने आले हे समजले नाहीं. दुसरें त्यानी आपणासहि येऊन भेटावे आसेहि ऐकिले. त्यास आपणास येऊन भेटतील. निकडील राजकारण आपणासी काही बोलतील ते आपण ऐकून करणे ते करतील. कदाचित आमृतराव याचे राजकारण आणले आसले तरी कबूल करून त्याजला आपल्यात मेळऊन घ्यावे. पुढे आसल निर्माण जाहालियास नकलेस कोण विचारितो? याजकरिता सूचला मजकूर लिहिला आसे. आपणास चांगले दिसले तसे आपणहि समजोनच करतील. आल्या ग्रहस्तास खटे न करावे. तूर्त सामिलातसि उपयोग पाहून घ्यावा. हे येके प्रकारे प्रसंगानुसार तूर्त उपयोगास पडेसे आसल्यास मेळऊन घ्यावे. मुख्य करण्यास अनायासे उपाये योजून आल्यास तूर्त टाकू नये; परंतु खरे लटके या गोष्टी ताडून समजोन करणे तसे करावे.

बहुत काये लिहिणे हे विनंती. बागलकोटी तोफ सरकारच्या गावाबाहेर चांगल्या धड आणि मातबर गाड्यावर तयार आहेत. आम्ही येथें राजश्री आनदराव भिकाजी रास्ते यांस सांगितले आहे. तथापि तुम्ही मुजरद कारकून रा। करून तोफास बैल वगैरे सरजाम होऊन लस्करांत आम्हाकडे येत ऐसे जरूर जाले पाहिजे. उपयोगास पडतील. मातबर भारी आहेत. कदाचित साहित्य बनोन न येत तर किल्यांत तरी न्याव्या. नच बने त्या पक्षी तसे तरी व्हावे, याकरिता लि॥ असे. हे विनंती.

¶*Trimbakrao Vishvanath to Sakharam Bapu inquiring as to why Babuji Naik and Krishnarao Kale had gone to the addressee from Dadasaheb. "If the intention of their visit be the proposal regarding Amritarao," the writer says, "you would readily consent to it. A copy is not valued when the original comes forth" (meaning that if a rightful claimant is born, this spurious one Amritrao will have no value). The writer also requests to make arrangements for removing the Bagalkoti guns.*

---

*No. 16*] [*9-2-1774*

पौ छ २ जिल्हेज सुा
आर्बा सबैन फाल्गुन.

**श्री.**

शेवेसी भास्कर बलाल जोशी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम ताा छ २७ जिलकाद पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री पांडुरंगपंत गडबोले गंगापुरास आले. आनंदवलीचा बंदोबस्त केला. अंताजीपंत सावरकर कारभारी होते, त्यांस समागमे गंगापुरास नेले. आनंदवलीस पैका सिलकेस नाहीं. याजकरितां लक्षभोजन व अनुष्ठाने सहजच राहिली. मजला सांगितले कीं, आनंदवलीची देखरेख करणे आणि पुण्यास लेहून आज्ञा येईल त्याप्रो करणे. त्याजवरून कुटुंब गंगापुरास ठेऊन त्याणीं सांगितल्याप्रो देखरेख पाहातो. राजश्री नारो आपाजी नाना याणीं पेसजी मावअखेरपावेतो खर्चाचे भरतीचा ऐवज गोविंदराव कृष्ण परांजपे याजकडून अंताजी राम यांचे तसलमातीस लेहून नासिकास देविला होता. तो ऐवज त्याणीं दिल्हा नाहीं. उठोन पुण्यास गेले. याजमुळे ऐवजाची वोढ जाहाली. झाल्या अनुष्ठानाची दक्षणा ब्राम्हणास द्यावयासी पैका नाहीं. यामुळे सारे ब्राम्हण वाड्यांत भोजन करून उगेच बसले आहेत व आश्रित वगैरे यांचा येक महिना रोजमरा देणे आहे व सेव्याचे उचापतीब॥ दोन हजार ऐवज देणे आहे. येकून पाच हजार

ऐवज असल्यास माघअखेरपावेतों ब्राम्हणांचे दक्षणा सुधा फडशा होतो. येविसी आज्ञा होऊन पुढे फाल्गुन मासापासून आनंदवलींचे खर्चाची नेमणूक करून द्यावयाची आज्ञा जाहाली पाहिजे. पांडुरंगपंत याणी सांगितले त्याजवरून मी आनंदवलींचे कामकाज पाहातो. परंतु स्वामींचे आज्ञापत्र येईल त्याजप्रो वर्तणूक करीन. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Bhaskar Ballal Joshi asks for money for the expenses at Anandwalli, evidently for the establishment and concerns of Raghunathrao.*

---

*No. 17*] [*9-2-1774*

**श्री**

शेवेसी रंगो गोपाळ विज्ञापना ताा छ २७ जिलकाद प्राथ:काळ. रा मोरोबा दादा काल कूच करून मुकाम मोसीचा[१] केला. नारो आपाजी व आपाजीपंत गेले होते. त्याचे याचे खलबत फार वाडखू (वाढूळ). ज़ाले. तेथून नारो आपाजी घरास गेले. उदास होते. आज वाड्यात आले नाही. आपाजीपंत आतकोस पोहचावीत गेले. तेहि निरोप घेऊन वाड्यात आले. नारो आपाजी परवाचे दिवसी दादाकडे गेले. त्याचे याचे बोलणे जाले. मोराबाची उदासीपण पाहिले. जावयाचा मजकूर काढिला कीं, येथे राहात नाही. सिवनेरीस जातो. सर्वांणी येद्यतार्थ केला तो उतमच केला. त्यात नानाची मर्जी रक्षावी, क्रियेस गुंतलो. सर्वाबरोबर मरणे खरें; यैसे उदासपण दाखविले. येविसी नारो आपाजींनी आपणास लिहिलेच आसेल. गावात लोक बोलतात जे, दादास निराळे टाकले हे वाईट केले. हे उगेच राहाणार नाही. जैसे बापू नाना येक जाले त्याप्रो मसलतीस यास घ्यावे. हे न केले. याप्रो बोलतात कालचा मुकाम मोसीचा, आज खेडास राहाणार, उदईक सिवणेनेरीस जाणार. त्याचे मर्जीचा भाव काही समजत नाही. काये करील हे न कले. दादाची बायको परवाचे दिवसी रात्री आली, त्यासमेत गेले. समागमे राऊत दीढसेपर्यंत होते. साराऔश सर्वाचे मते दादासी विपरोध दाखऊ नये. आपले पत्र बहुधा दादास आले आसेल यास्तव गेले आस्तील. आथवा आपणास लिहिलेच आसेल. आपाजीपंतास निरोप सागितला. ते आज आपले भेटीस येणार. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer Rango Gopal discusses the propriety of the question of keeping Morobadada outside the confederacy of the Barbhais and finally says that he should have been persuaded to stick to the plan. The writer also mentions the indifference of Morobadada and his departure for Shivner.*

---

१ पुण्याचे उत्तरेस १२ मैल आळंदीजवळ.

No. 18] [10-2-1774

पौ छ ६ जिल्हेज.

## श्रीनकल.

### राजश्री नागोजी सिंदे गोसांवी यासी.

श्नो रघुनाथ बाजीराव प्रधान आसीर्वाद. सुा आर्बा सबैन मया व अलफ. पुण्यातील वगैरे कितेकानीं फितूर करून बदराहा वर्तणूक करू लागले, हें जाणोन राजश्री त्याचे हातीं न चढावे, या आर्थे तुम्ही सातारियाचे किल्यावरी राजश्रीस नेऊन ठेविले. बंदोबस्त येथील मर्जीस येईसारिखा केलात म्हणून ऐकिल्यांत आले, तेण्हेकरून तुम्हावर मर्जी बहुतच संतोष जाहाली असे. फार उतम केलें. हरामखोर आपले ढंगास प्रवर्तले तशा समयांत दूरंदेसी मनांत आणून खावंद चाकरीवर द्रुष्ट देऊन मनसुब्याची गोष्ट केलीत. शाबास, तुमची तारीफ पत्रीं काये ल्याहावी ? याउपरीहि बहुत सावध राहाणे, तुम्हाकडे ते पेगाम तऱ्हेतऱ्हेने लावितील. ते तुम्ही चितात आणणार नाहीं हे खातरजमाच आहे. तथापि सूचना लिहिली आहे. तरी राजश्रीस किल्यावरच ठेऊन, फितवेखोराचे हातीं न लागत ते गोष्ट करणे. खासा स्वारीहि मावारी फिरली. दरमजल येऊन पोहचत आहे, तोपावेतों तुम्ही सावधगिरीने राहून, बहुत बंदोबस्त करणे, येविसींचे बंदोबस्तास हुजुरून रा रामचंद्र नारायेणहि पूर्वीच रवाना केले आहेत. ते पावलेच असतील. ते व तुम्ही येकविचारे बंदोबस्त करणे. जाणिजे छ २८ जिलकाद आज्ञा प्रमाण.

¶*Raghunathrao to Nagoji Shinde of Satara complimenting him for having removed the king to the fort quite away from the machinations of the Barbhais of Poona whom the writer condemns for their treachery.*

---

No. 19] [11-2-1774

## श्रीशंकर.

### राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री सखाराम भगवंत बापू स्वामीचे सेवेसी.

पो त्रिंबकराव विस्वनाथ सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. प्रथम प्रकार जाला, त्या कालीं विस्तरपूर्वक आपण पत्र पा ते पावले. त्या उपरी पुढील उद्योगाप्रा योज्यना सज कोणेविसी कसकसा केला, श्रीमंताजवळ नामी सरदार व पागा, त्याचे कसे जाले, तोफ-

खान्याचे कसे जाले, इत्यादिक समजले पा (पाहिजे). स्वतंत्र मोगलाचेहि समजले पा. तोफखानाहि तिकडे, गाडदीहि तिकडे, पागाफौजहि तिकडे, केवळ ब्राम्हण मंडळी इकडे. येसे जाल्यास कसे सोईस पडेल ? यास्तव या गोष्टीचा विचार तुम्ही केलाच असेल. आम्हासहि कलावा. आम्हाजवळ फौज हुजरातची ती शेर याची पागा मात्र दोन तीन तेवढा यैवज. त्यास व वरकड आहेत त्यास नालबंदी पैा गोड वाटेसे द्यावे. रो (रोजमरा?) वरचेवर द्यावा. उमेदीचे बोलणे बोलावे, ते पुढे प्रमाणात यावे, नाहीं तर कर्नाटकात तीन वर्षे जिवाभ्य श्रम लोकानी केले. ज्यास चाकरी घेणे पडते त्यास हुकूम जरब राखोन, त्याची उमेद खुशालीहि राखावी लागते. त्या गोष्टी परिणामास न गेल्या म्हणजे पत खोटी येकदा जाली म्हणजे पुढे फिरोन सचोटी पडणे संकट पडते. असो. इत्यादिक गोष्टी घडल्या. परंतु या प्रसंगी तो प्रकार ल्याहावयाचे कारण या प्रसंगी उपयोगी नव्हे. तथापि पुढे पेच पडतील या करिता उगेच लिहून सुचविले. नवी फौज कांहीं भरवशाची आसामी (आसामी) नजरेस आल्यास तूर्त पडिला प्रसंगाकरिता ठेवावीहि लागेल. मबलग खर्च एसे हे कर्म दिसते. इतकेहि आपणास ठाऊकच आहे. सर्व आगी शेकलेले आहे. असो. तूर्त चौघे मातबर येथे जमा जाले व होणार. त्यापक्षी सर्वांचा उचित प्रकारे जवाहीर, हती, पोशाख, कितेकास लौकिकास आणे वाढविणे, पदारूढ करणे, हेहि प्रसंग पडतील. तेहि प्राप्त जालेपक्षी समर्पक केले तरच चांगले दिसेल. नाहीं तर मिठाचे उणेपणानें लवणशाकच वाईट होईल. असो. सर्व गोष्टी सुचऊन पहिल्याच घ्याव्या. तितके समजोन प्रवृत्त जालेयास चिंता नाहीं. करावयाचे ते ते त्या प्रसंगी केलेच पा. येथे बा (बंदोबस्त) कांहींच नाहीं. कापड येक सनंग नवते. तेव्हा पैठणचे वगैरे पंधरावींसा हजारांचे खा (खरेदी) केले. आणखीहि करावे लागेल. जवाहीर दागिने बा समयोचित असावे. आणि द्यावयाची कुले बा (बरोबर) आहेत. दुसरी प्रसंगानरूप भेटतील तेव्हा पा. याची योज्यना तरतूद अगोदरच असावी. तर दागिने येणे प्रा व कापड पा. बिता.

दागिने किमतीचे अजमासे सुमार

१३ मोत्याचे चौकडे वगैरे

५ हजारा पा (पासून) तीन हजारा आलिकडे दर किमत या प्रा चौकडे सुमार.

५ मध्यम चौकडे पाचाशा पा हजाराबाराशा पावेतो

३ कंठ्या दोन तीन, दोन हजार पा च्यार हजार पावेतो.

५ जेगे तीशा पा सातशेपर्यंत सुमार
५ सीरपेच चौशावर हजार बाराशे.
दीड हजारपर्यंत येक दुसरा.
५ पदके हलकी दोन तीन, उंच दोन यो
१ मोत्याचा तुरा असला तर येक दुसरा.
२ कडी जडावाची जोड, उंच १ व मा १

---

३१

सनगे अजमासे सुमार.

१० मोगलाचे उपयोगी पोशाख चिरेगोस पेरात्र पटके मोहमुद्या बुटेदार याप्रमाणें.

५ उंच चांगले
५ मा

---

१० दहा पोशाख.



१५ धुत्रट मोहमुद्या व पागोटी सनगे सुमार

५ मंदले पैठणी उंच व मा
२ उंच
३ मा

---

५

१० किमखाप जरूर पा
उंच मा मिळोन सुमार

१०० मश्रू सुमार

---

१४०

येणे प्रो सरंजाम असावा तर प्रसंगी पेच पडणार नाहीं. सिलकेस राहील. जरूर लागेल तितकाच खर्चेहि होईल. रा छ २९ जिलकाद हे विनंती.

¶*Trimbakrao Vishvanath to Sakharam Bapu offering very prudential considerations on the situation in general created by the Barbhai's opposition to Raghoba. He finally requests the addressee to make the necessary monetary payments and presents to keep the soldiers pleased and make them exert with zest.*

No. 20] [11-2-1774

पैा छ १२ जिल्हेज.

**श्रीशंकर**

राजश्रियाविराजित राजमान्य. राजश्री

नारोपंत नाना स्वामीचे सेवेसी.

पो। त्रिंबकराव विश्वनाथ सां। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. आम्हासमागमे फौज आहे. त्यास खर्चास यैवज पाहिजे. त्याविसी राजश्री सखाराम भगवंत बापू यास पत्र रुपये ३००००० तीन लक्ष रुपये राजश्री राघोपंत आईतोळे पथकसुधा पाठविले आहेत याजबरोबर पाठऊन द्यावे म्हणोन आलाहिदा पत्र लिहून पाठविले आहे. हे पत्र राजश्री सखारामपंत बापू व राजश्री नाना फडणीस व राजश्री दादा आसतील तेथे त्याजकडे पा।. त्याची परवानगी आणून येक दिवस उशीर न लाविता सत्वर रा। सोलापुरचे सुमारे आमचे लस्करास येऊन पोहचतसे करणे. आणखी दोन तीन लक्षाची तरतूद जरूर पा।. तर लौकर करून ठेविली पा।. रा। छ २९ जिलकाद बहुत काये लिहीणे, लोभ असो देणे, हे विनती.

¶*Trimbakrao Vishvanath to Naropant Nana requesting him to see Nana, Bapu and Dada and to arrange to send three lacs of rupees for the expenses of the army at once.*

---

No. 21] [13-2-1774

**श्री**

राजश्रियाविराजित राजमान्य

राजश्री हरिपंत तात्या स्वामीचे शेवेसी.

पोष्य भवानी सिवराम कृतानेक सां। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल फाग शुध त्रितीया रविवार मु॥ नजीक नांदेड जाणून स्वकीये कुशल लिहित जावें विशेष. रा। तात्याचे पत्र खर्डे याजपासोन आले. त्याजवरून संतोष जाहला. त्याचा तपसील काय ल्याहावा ? तात्याकडे श्वार पा। आहेत. आज अगर उदईक येतील; येथील तपसीलवार वर्तमान राजश्री नाना व बाबुरावजीस आलाहिदा पत्री लि॥ आहे, त्याजवरून निवेदन होईल. पहिले उभयतानी अवगत केलेच आहे. आणि स्थाईभाव आपले लोभाची चटक किती लागली आहे

हे आपले ध्यानांत आहेच. मनोमय साक्ष आसे. तात्या, इश्वर कृत्यास कोणाचा ईलाज नाहीं. ज्या काळी जो योग घडावयाचा तो घडतो; परंतु जगदात्मा सर्वज्ञ आहे. जैसा ज्याचा मनोभाव तैसाच अनुकुल करितो. त्यांत सूक्तअसूक्त आचरण तदनसार फल देतच आहे. आमचा मुरबी मरावा आणि आम्ही वाचावे, उत्तीर्णता न घडावी, तस्मात आत्महत्याहि श्रेयस्कर! आपण संनिध असतां बंदोबस्तास उणे पडलें, हा दुरारोप जनचर्चेस उचित पडावा, आणि आमचा त्राता प्राण जावा, आम्ही दीन व्हावें यातील अर्थद्रष्टे वोलखीच जाणतील. हे भाव पत्री कोठवर ल्याहावें? विस्तार आहे. असो श्रीजीसें[1] करणे रा। मामाहि वष्य जाहले, पडदा राहिला नाहीं. येथील समुचय भारी जाहला. मातुश्रीहि यासी गुंतली याउपरी उतम उतम दिसते. देव उतम करील, पत्रामागेंच येऊन पोहोचलों, कळावें, बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनंती.

¶*Sabaji Bhosle's Diwan Bhavani Shivram to Haripant Tatya expressing his regret for his inability to rise to the occasion. The writer further informs the addressee of the amicable settlement of the internal affairs of the Bhonsles by Trimbakrao Mama.*

---

*No. 22*] [*14-2-1774*

श्री

### श्रीमंत राजश्री हरीपंत तात्या स्वामीचे शेवेसी.

पोष्य केसो महादेव[2] कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ २ जिल्हेज पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. बहुत दिवस स्वामीकडून पत्र येऊन माझा सांभाळ होत नाही तेणे करून चित्त उदास आहे. निरंतर पत्र पाठऊन सांभाळ केला पाहिजे. हलीं परस्परें ऐकितों कीं, पूर्वप्रमाणे सुदिन जाला. आपण श्रीमंत मातुश्री बाई साहेबाबरोबर पुरंधरास गेला म्हणून ऐकिलें. ऐशास ईश्वराजवळ ईच्छा करीत होतों तेच देवानें दिले. त्याजवरून फार संतोष जाहला. तो लिहितां येत नाहीं. वडिलांचे पाठीमागें स्वामी मजला वडील आहेत. कोणे गोष्टीविसीं मी काळजी करावी ऐसे नाहीं. बेफिकीर असे. आमचे रोजगाराविषई अकार नामक यांणीं श्रीमंत राजश्री नाना याचे मनांत कांहीं विकृती येई ऐसें सांगितले असेल; त्यास श्रीमंताचे मनांतील विकृति

---

१ श्रीसत्ता करील तें खरें. २ हा पुढें आनंदीबाईजवळ नानाचे तर्फे कारकून आहे.

निघोन ममता करीत ऐसे करणार आपले खेरीज कोणी नाहीं. दरबारांत आमचा बग वसिला आपले खेरीज दुसरा कोणी नाहीं. हें सर्व स्वामीस विदितच आहे. येविसी राजश्री आनंदरावजीनी पत्र लिहिलें आहे त्यावरून सविस्तर कळेल. पत्रोत्तर पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. पत्र वाचून फाडून टाकावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Keso Mahadeo to Haripant Tatya, soliciting his patronage and requesting him to remove the misgivings in the mind of Nana about the writer.*

---

*No. 23*] [*14-2-1774*

पौ। छ १३ जिल्हेज सन आर्बा.

**श्री.**

**श्रीमंत राजश्री बापू स्वामीचे सेवेसी.**

पोष्य येशवंतराव गंगाधर विज्ञापना. येथील वर्तमान फाल्गुन शुध चर्तुदशी पर्यंत निंबगावीं असो विशेष. तीर्थरूप तात्यांचे शरीरीं आकस्मात ज्वर होऊन तीन च्यार दिवस समाधान नवते. शुध ११ येकादसीस दिवंगत जाले. आम्हांस दुखार्णवांत सोडून परलोकास गेले ! आतां त्यांचे ठिकाणीं सर्व प्रकारें वडील आपण आहेत. तीर्थरूपांमागें त्यांचे स्वरूपाप्रमाणें आमचा प्रतिपाल करणार वडील तुंही आहां. दिवस जालियावर दर्शनास येऊं. बहुत काय लिहिणें. कृपालोभाची वृद्धी करावी. हे विज्ञापना.

¶*Yeshvant Gangadhar to Sakharam Bapu informing him of his father's demise.*

---

*No. 24*] [*14-2-1774*

पौ। छ १६ जिल्हेज

**श्रीशंकर**

**राजश्रियाविराजित[१] राजमान्य राजश्री**
**सखारामपंत बापू स्वामीचे सेवेसी.**

पोष्ये त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ २ जिल्हेज मु॥ नजीक नांदेड वर्तमान यथास्थित असे विशेष.

---

१ सबंद पत्र मामांच्या हातचें असून पैवस्ती नाना फडणविसांचे हातची आहे.

आपण पत्रें पाठविलीं ती प्रथम व दुसरी व तिसरी रा। नारो आनंदराव याजबा। पाठविलीं तीं पावलीं. प्रथम पत्रें येतांच येथील येकवाक्यता करून, प्रत्योतरे खिजमतगार आले होते त्यांबा।च पा।. ती पावलीच आसतील. त्यावरून विस्तरे सर्वहि मजकूर कलेल. दुसरे पत्र सालू सुपेकर बोथाटीबारदार याजबा। पा। तेहि नवे दिवसी पावले. तों मागाहून नारोपंतहि आले. दोन्ही पत्राचे रागीचा मजकूर कलला. मुख्य गोष्ट थोरले बाईचे अनुमते सौ पार्वतीबाईचे विचारे श्रीमत मातुश्री गंगाबाईचे सरक्षण गर्भसहवर्तमान व्हावे. सर्वतोमुखी अनुचित भावी जाणोन उभयतास किले पुरंधरास आणिली. किले सातारा आदिकरून किल्यांचा बंदोबस्त केला. मोगल निक्षूण आपला करून ठेविला. सर्व मंडली पकेपणे येथे येक जाली. तुम्ही तेथे येक होऊन लौकर कूच करून यावे. खर्चाविसी चिंता करू नये. स्वार आले म्हणजे यैवज पा। देतो. आपले हाते लि॥ कीं, 'तुमचे भरवशावर आम्ही केले.' त्यास सर्व जनास असह्य जो प्रकार बायकांस बंद करून ठेवणें, स्त्रियांचे चित अधैर्य त्याणी आक्रोश करणे प्राप्त, तेव्हा त्यांचे पदरचे अन्न भक्षिलेले सर्व असतां उपेक्षा करणे हेहि अनुचित यास्तव प्राप्त जाले करणे तसे केले. दौलतेचा वारसा आम्ही कोणी श्रीमंतासी करीत नाहीं. स्त्रियांचे परिपालन, गर्भसंरक्षण, पोषकज्यनसमुदायेष्वभयदान न दिसोन करणे अगत्य जाले, त्यापक्षी दुसरा विचार आहे यैसे नाहीं. सर्व प्रकारे खातरजमा असो द्यावी. थोरली मसलत आहे. या प्रसंगी आपण फौजेत येऊन फार श्रम न होत तर आपले मसलतीने आम्हीं व आणखी सरदार मेहनतीस अंतर करणार नाहीत. येकास दोन म्हणजे दुपट बल. तोंडावर आपण आम्हीं असतां मागे फारसी चिंता पडणार नाहीं. राजश्री नाना फडणीस व हरिपंत फडके मागे असल्यास चिंता नाहीं. राजश्री मोरोबादादा येक काम स्वतंत्र आटोपतील. चौघानी च्यारी तनवा धरल्यावर सिबीरं[१] उभे राहाते. तुम्हांस सर्व कलत असत आम्ही वारंवार ल्याहावे काये? आम्ही चुकलो तरी फल सर्वास. यासाठीं आवघ्यानीं साहित्य पुरऊन बाजी[२] सेवटास न्यावी. तोफखाना तर तेथील निघणे कठीण. त्यापक्षी पुणे व मुतकवीच्या[३] तोफा सडे स्वारीच्या उपयोगी दाहा बारा बेश त्यात लंबीछडा[४] दोन तीन या प्रकारे गोलंदाज वगैरे साहित्य सुबक चांगले लौकर होऊन तयारी होयेसे करावे. यास्तव नारोपतास निरोप दिल्हा असे. पुढील सुचले प्रकारे निभावणुकेचे मजकूर व प्रस्तुत करण्याचे व पैक्याचे तरतुदेचे व

---

१ राहुटी; तंबू. २ मसलत.

३ कर्नाटकांत गांव आहे. ४ तोफेचा एक प्रकार.

मोगल लौकर आम्हास अनकूल पकेपणे व्हावयाचे विसींचे बोलणे बोलून जलद पोहचावे म्हणून सांगून पाा आसेत. यास लिहिले प्रकारे सांगोन तोफखान्याची तरतूद उत्तम प्रकारे लौकर करवावी. वरकडहि लिहिल्या अन्वये व सागोन पाा प्राा पोख्ती तरतूद व्हावी. येथील वर्तमान राजश्री सेनासाहेबसुभे रघोजी भोसले श्रीमंती केले त्यांस मातुश्री दर्याबाईसुधा आपले लगामी क्रिया शपतपूर्वक लाऊन घेऊन फौजसुधा बाा घेतले. राजश्री साबाजी भोसले नानाहि खातजमेने बाा घेतले. दोन्ही सरदार वागवणे कठीण. तथापि लौकीकें[१] दोघाची समजावीस वारवार भेटी करून गोडी केली. सेनासाहेबसुभ्याविसी साबाजी भोसले याणीहि मसलत सेवटास जाये तो अक्षर बोलू नये. पुढेहि आमचे विचारे होईल तसी सोई करून देऊं. परंतु दाहा हजार फौजेचे सरदारीत उणे न व्हावे. मग कोणेविसी आग्रह नाहीं. मातुश्री दर्याबाईने सर्व दौलतेचा यख्तियार आम्हावरच ठेविला. त्यापक्षी सेनासाहेबसुभाहि घरीच आला. परंतु दोन्ही सरदारीत पैक्याचे नाव नाही. पोटास दिल्हे तर लोक बंदोबस्त उपयोगी पडे यैसे पके करितां येईल. या करिता या मसलतीस पैका फार लागेल यैसे वारंवार लिहिणे लागते. विना साहस उदारता प्रसंगासारखी केल्याखेरीज आपली बाजी सेर होणार नाहीं. वारंवार आपणहि विस्तारे लिहितात म्हणून या पत्री विस्तारे लिा। असे. हुजरातचे फौजेस पैसा पावला नाहीं. तिची नालबदी दिल्ही पाा. हालीमार्जांचे[२] दिवसात सर्वांचे मनोधारण करणे प्राप्त, तेव्हा देणेहि सढळ दिल्हाखेरीज येकवाक्यता सर्वांची होणार नाही. आपण अवलंबिले तसे साहित्य पुरऊन सेवटास न्यावे तरच केल्याचे सार्थक. याउपर दरमजल पंढरपूरचे सुमारे येत असो. लिहिल्याप्रकारे रात्रदिवस तरतूद करून साहित्य होय. जडाव पडेसे करावे. कितेक मुखवचने नारो आनदराव सांगतां कलो येईल. बहुत काये लिहिणे. लोभ असो दिल्हा पाहिजे. हे विनंती.

*¶Trimbakrao Vishvanath to Sakharam Bapu acknowledging the receipt of a detailed letter informing him of the progress of events at Purandhar, the removal of Gangabai and Parwatibai with the consent of Gopikabai, and with the intention of protecting her, not of claiming the Peshwaship against Raghoba. The writer further describes the monetary difficulties of the Bhonsles and requests the addressee to secure them in their cause by offering some monetary assistance to them.*

---

१ लौकिकांत.

२ क्रान्ति, बखेडा, धामधूम.

*No. 25*] [*4-2-1774*

पैाा १६ जिल्हेज

श्रीशंकर

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
मोरोबादादा स्वामीचे सेवेसी.

पोष्य त्र्यंबकराव विश्वनाथ कृतानेक सा. नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ २ जिल्हेज मु॥ नजिक नांदेड गंगादक्षणतीर जाणून स्वकीय कुशल लिहित असावें विशेष. राजश्री सखारामपंतबापूनी व राजश्री नाना फडनीस यानी किले पुरंधरचे मुकामीहून पत्रें पाठविलीं व राजश्री नारो आनंदराव याजबरोबर कितेक प्रकारें मसलतीचा मजकूर सांगोन पाठविला तो सविस्तर ममारलेचे सांगितल्यावरून व पत्रावरून कलला. पहिली उभयतांची व आपली पत्रें आलीं होतीं. त्यांची उत्तरें तेव्हांच पाठविलीं. त्यावरून कललेंच आसेल. ही मसलत विलग कोणेकेविसीं पडल्यास कठीण. पैक्याची अनुकुळता पोख्ती. पैकीं भोसल्याचे फौजेस खर्चास आम्हांसच द्यावें लागतें. दुसरी तोड नाहीं. राजश्री रघुजी भोसले सेनासाहिबसुभे व मातुश्री दर्याबाईहि युक्तीनें आणून राजश्री साबाजी भोसले नाना त्याची याची भेट परस्परें रहस्यें करून करून जाहिरान्यांत गोड केलें. पैक्यामुळें फौज बेदील. तिजला पोटास आम्ही देऊं लागलों म्हणजे ती सर्व आपले लगामी लाऊन घेतां येईल. मग वसवसहि[1] धरावा नलगे. तों पर्यंत दरणीपारणी, कुच्यास खोलंबा ऐसे टंटे[2] पडतात. यास्तव तूर्त मसलत तों पोटास द्यावें. पुढें समजोन घेतां येईल. आम्हां जवळ सर्व संतोषें आमचे विचारें असतां जे या उपर लिहिणे तें आम्हांसच लिहून सुचवावें. देणे ते आमचे हातून पावल्यानें आला[3] राहिल. नाहींतर निरनिरालीं बंडें होतील. हाहि प्रकार आपले ध्यानांत असेलच; सुचविलाहि असे. कितेक मुखवचनें नारो आनंदराव सांगता कळूं येईल. बहुत काय लिहिणें, लोभ असों दिल्हा पाा, हे विनंती.

¶*Trimbakrao Vishvanath to Morobadada informing him that the writer has to advance money to the Bhonsles for the upkeep of their forces because the Bhonsles have been short of money. The writer further says that he has tried to bring together the discordant elements in the Bhonsle household.*

---

१ संशय, भीति. २ तंटे, तट, अडथळे. ३ आळा.

No. 26] [14-2-1774

पौ छ १६ जिल्हेज.

## श्रीशंकर

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री हरीपंत

तात्या स्वामीचे सेवेसी.

पोष्य त्र्यंबकराव विश्वनाथ कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ २ जिल्हेज मु॥ नजीक नांदेड गंगा दक्षणतीर जाणून स्वकीय कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. राजश्री बापू व राजश्री नानानी पत्रीं मसलतीचा मजकूर सविस्तर लिहिला, त्यावरून व राजश्री नारो आनंदराव यांच्या सांगितल्यावरून तपसीलवार कलला. पहिली बापूंची व नानांची व मोरोबादादाची पत्रे आली होती. व तुम्ही लिहिले होते त्यावरून आम्ही येथील सर्व मंडळीची येकवाक्यता करून सिध जालो. इतक्यात दर्याबाई फौजसुधा परभारी वराडात दुरून चालली. हे ऐकोन राजश्री साबाजी भोसले विचारात पडले. याजकरितां इकडेच मुकाम करून बाईस आणून खातरजमा करून भेटी करून समागमे घेतली. तुम्ही मनसब्याची शर्कल[१] बांधोन सर्वांची येकवाक्यता केली. याची मेहनत तुम्हास फार पडली. खावंदांचे कार्याकरितां येकनिष्टेस्तव जो कोणी उद्योग केला तर त्याचा साहाय ईश्वर होऊन तो अर्थ सिधीस जातो. श्रीकृपेने सर्वास येश येते. चिंता नाहीं. कितेक प्रकारे लिहिल्याअन्वये राजश्री बापूचे येणे व तुमचे येणे लस्करात व्हावे. राजेश्री मोरोबादादानी येक काम स्वतंत्र आटोपावे. राजश्री नानानी सर्व संभालावे; याप्रकारे जाल्यास फार उतम. रा छ २ जिल्हेज बहुत काये लिहिणे. लोभ असो दिल्हा पा. हे विनंती.

सेवेसी त्र्यंबक हरी वर्तक कृतानेक सां नमस्कार विनंती. मी श्रीमत राजश्री मामाजवल आज्ञेप्रो वर्तणूक करून आहे. कृपा करितात. कलावे लोभ असावा. श्रीमंत राजश्री बापूस व श्रीमंत नानास नमस्कार सांगावे, हे विनंती.

¶*Trimbakrao Vishvanath to Haripant explaining how he effected a reconciliation between Daryabai and Sabaji Bhosle and secured their help. The writer compliments the ministers at Poona for the unity which they have shown in their difficult undertaking against Raghunathrao.*

---

\+ पैवस्ती नानाफडणिसाच्या हातची. १ कारस्थान.

No. 27] [15-2-1774

पो छ १० जिल्हेज.

श्री

श्रीमंत राजश्री सखारामपंत बापू स्वामीचे शेवेसी.

पोष्य भवानी सिवराम कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल फाल्गुन शुध पंचमी भोमवासर मुकाम नजीक नांदेड जाणून स्वकीये कुशललेखनाज्ञा जाहाली पाहिजे विशेष. आपण राजश्री कृष्णरावतात्यासी पाठविले ते काल इंदुवारी रात्रौ येऊन दाखल जाहले. आपली पत्रे येजमानास आहेत त्याजवरून व मारानिलेच्या मुखोद्गत सविस्तर कलो आले. अविलंबे पढंरपूरच्या सुमारें यावें म्हणोन लि॥. त्यास येथील उत्कंठता राजश्री नाना जोसी याणी निवेदन केलीच आहे. पत्र येण्याविसी मात्र प्रतिक्षा होती ते जाहाली. याउपरी किमपि गुंता नाहीं. उदईक कूच करून दरमजलीने येत असों. पहिलेपासोन लक्ष येकच आहे. हे सरदारी आपले हाते घडली आहे; याचा उपयोग दुसरा होणार नाहीं. आणि आपण इकडील उणाव पाहाणार नाहीत. मी सेवक आपला स्थापित आहे. येकनिष्टपणे चाकरी घडेल. वरकड येथील विसंचाचा संच करणे हे अर्थ येथून ल्याहावे यैसे नाही. सर्व चिंता आपणास आहे. बहुत काये लिहिणे, लोभ कीजे हे विनंती.

¶*Bhavani Shivram to Sakharam Bapu, assuring him that his master would proceed to Pandharpur as desired by the addressee.*

---

No. 28] [15-2-1774

पो छ १३ जिल्हेज

फाल्गुन सन आर्बा.

श्री

श्रीमंत राजश्री बापु स्वामीचे शेवेसी.

विनंती शेवक बालाजी गणेश तालुके देवदुर्ग कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ ३ माहे जिल्हेज पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीचे पत्र छ २ जिल्हेजी आले. तेथे आज्ञा की "छ १८ जिल्कांदी श्रीमंत सौ. मातुश्री पार्वतीबाई व मातुश्री गंगाबाई यांसी पुण्याहून राजश्री नाना फडणीस व आम्ही येकत्र होऊन किले पुरंदरे येथे वेऊन आलो. हाली तमाम सरदारांस पत्रे पाठविली आहेत. फौजेनिसीं लौकरच जमा होतील. तुम्ही आपल्या

तालुक्यांचा बदोबस्त राखोन हुशार राहाणे, आणि वरचेवर लिहित जाणे " म्हणोन आज्ञा, त्यास स्वामींचे आज्ञेप्रमाणे तालुके मजकुरचे किल्याकोटाचा बंदोबस्त करून, चौकीपहारा अलंगनोबत दुरुस्त राखोन हुशार आहो. स्वामींचे आज्ञापत्र या अगोधरच बातमी येथे आली की, खांसास्वांरी बाहीर निघोन दिव्याचे घाटाने सासवंडास दाखल जाहाली. हे वर्तमान येथे येतांच कोटकिल्याचा बंदोबस्त करून विनंतीपत्रे हुजुर व आपणास पाठविली ते प्रविष्ट जाहांलीच असतील. त्यांवरून सर्व निवेदन जाहालेच असेल. कृपा निरंतर असावी हे विज्ञापना.

¶*Balaji Ganesh to Sakharam Bapu, informing him of his having acted up to the orders received from the addressee.*

---

*No. 29*] [*15-2-1774*

पो छ १० जिल्हेज.

**श्री**

**राजश्री सखारामपंत बापू गोसावी यांसी.**

ℰ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री साबाजी भोसले सेनासाहेब-सुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित असावे विशेष. राजश्री कृष्णराव नारायण आपणापासोन आले ते काल छ ३ जिल्हेज इंदुवारी दाखल जाहाले. आपली पत्रे व मुखोद्गत वर्तमान कललें. संतोष जा(ह)ला. मातुश्री गंगाबाई सगर्भ आहेत, याचें रक्षण जाहालें पाहिजे. मातुश्री पुण्यात होती. चौकीपाहारे याविसी नीट नाही. थैसे जाणोन उभयता मातुश्री मुधां कि(ले) पुरंधरास आलो. तुमचे अनुसंधान (राज)श्री बालाजीपंत नाना याजवल होते. खातरज(मेचीं) पत्रें पाहिली. त्यास पढरपूर(च्या) सुमारे लौकर




येऊन पोहोचावे. या घरासी वडिली जोड केली आहे त्याचे सार्थक हेंच आहे म्हणौन विस्तारे लेखन केले. यैसीयांसि कायावाचा-मनसात्रिपुटी संकेत निश्चय याचा हाच की, आपणाकडे सिधांत यैसाच व्हावा, आणि आम्ही आपणाजवळ येऊन उभे राहावे. कुडी येथे आणि प्राण आपणाजवळ आहेत. राजश्री त्रिंबकराव मामा याच्या आमच्या भेटी जाहाल्या, परंतु लक्ष तेथेंच होतें. साप्रत आपणाकडूनहि मामासी हे गोष्ट

परिस्फुट जाहाली तेहि हमदेर[१] या कामावर आहेत. मातुश्री दर्याबाईकडील पायबंद होता तोहि * दस्तीच देवाने आणिला. याउपरी गुंता नाही. उदईक कूच करून दर मजल येत आसो. कळावे; साराश, दरमजल पत्रामागेच येत असो. बहूत काये लिहिणे लोभ करावा हे विनंती.




¶*Sabaji Bhonsle assures Sakharam Bapu of his full support in the new undertaking.*

---

*No. 30*] [*19-2-1774*

[ पहिला पाव बंद गहाळ ]

धोंडोरामपंत व जिवाजी रघुनाथ यास अगोधर भेटोन त्यासह रुकनुदौला बाहांदर याची भेटी घेऊन सविस्तर अर्थ कलविला. त्याणी सर्व प्रकारे खातरजमा आपली व नबाबसुधा अकृत्रिमपणे केली. कोणेविसी संशय नाही, व निरालीहि भेट घेतली. पूर्व संधानाप्रो पुनरपि आणभाश जाहाली. कृष्णा उतरोन पलीकडे जावे यैसा मनसबा त्याचा होता, तो महकूब[२] करून कूच माघारे आजच मंदवारी करविले. दरमजल तुळजापुरच्या रोखे यावे यैसे करारांत आणिले आहे. इतक्यात मामाचे येण्याचा रोख असेल त्या सुमारे विसा पंचाविसा कोसाचे अंतरे असावे यैसे निश्चयांत आणून ठेविले आहे. वरकड यैवजाचा मार आद्याप बोलण्यात आणिला नाही. कार्याचा अर्थ जसा द्रिष्टीस पडेल तसें बोलतां येईल. श्रीमंताकडून पत्रे नवाबास व धोंडोपंतास आली. त्यांतील अर्थ जे तुमचा आमचा घरोबा शपतपूर्वक जाहालाच आहे. प्रस्तुत कारभारी याणी राज्यांत फितूर केला आहे. त्याचे बंदोबस्तास जावयाकरिता माघारे फिरलों. रुन्कंदौला याणी फौजसह आम्हासमागमे जावयास सिध्ध असावे. मागाहून कोणी मातबर माणूसहि पाठवितों, " यैसी पत्रें आली होतीं. त्याची उत्तरें येथून गेली की 'साल मारी आमच्या प्रातांत तुमचे स्वारीमुळे व भोसले वगैरे फौजेचे पाईमलीने प्रांत बुडाला. हाली राजश्री मामा व भोसले याणी आमचे मुलकात बीड प्राते फारच गडबड केली आहे; यास्तव त्याचे बदोबस्तास आम्ही माघारे जातो.' याप्रा लेहून पाठविले आहे. आबाजी माहादेवहि येक दोहो दिवसात येथे येणार. बातमीस दाहा जोड्या

---

१ हरदम; प्रतिक्षणीं. * ताब्यांत; स्वाधीन. २ तहकूब.

जासूद नेहमी येथे ठेविले आहेत. कळावे. मातुलाकडीलहि ग्रहस्त येथे आला होता. त्याजवल दिवाणजीही याप्रो खातरजमा करून कालच रवानगी केली. सारांश राजश्री कृष्णरावजी या जाबसालात आहेत, त्यापक्षी किमपि दिकत इकडून पडतच नाही. त्याची यार्ची बोलणी खातरजम्याची पूर्वीच जाहाली आहेत. त्याचा प्रकार याच्या बोलण्यात आला. त्यांत खतरा काही राहिला नाही. वरकड साविस्तर नरसिंगराव येक दोहो दिवसी येत आहेत. आल्यानंतर निवेदन होईल. छ ३० जिलकादची पत्रे आली ते आजच पावली. त्याचे जाब घेऊन मागाहून रवाना करितो. फार काय लिहू ? श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This appears to be a letter from the Nizam's court. The first portion of it is lost. The writer gives the purport of the letters received from and sent to Dadasaheb by the Nizam. Dadasaheb requested the Nizam to help him against the Barbhais while the Nizam regretted his inability on account of his province being overrun by Dadasaheb, Bhonsle and Trimbakrao Mama.*

---

*No. 31*] [*21-2-1774*

पो छ १४ जिल्हेज.

**श्रीशंकर**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**हरीपत तात्या स्वामीचे शेवेसी.**

पोष्ये त्रिबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टाग नमस्कार विनती उपरी. येथील कुशल तागा छ ९ जिल्हेज वर्तमान यथास्थित असे विशेष. तुम्ही पत्रे आपले स्वदस्तुरे सर्वांचे नावे वारंवार लिहून पा ती पावोन सर्व अर्थ कलून तुमचे लिहील्याअन्वयेच उद्योगास सादर आहो. रा अताजी रघुनाथ फणसे तुम्हास भेटून आले, त्याणी कितेक विस्तरे सागितले तेहि कलले. त्यास जिवाभ्य श्रम करून तुम्ही सर्वांची जोड घालून येकवाक्यतेस आणिले. उतम केले. याचे सार्थक तेच कीं चौघे येकचित. येकाचे केसास ढका लागला तर सर्वांस सोसू नये, निर्लोभपणे सर्वांनी वोझे येकादिलीने घेऊन, जो जसा ज्याचा जसी योग्यता त्याप्रा दौलतेतील माणूस जाणोन सर्वांस आपले करून गाडा चालविला तर यश कीर्ति सारेच उतम. नाहींतर मागे जाले ते सर्वांस अवगतच आहे. पुढे तसेच होऊ लागल्यास कलतच आहे. हे पके चौघाचे मत येक जाले तर केले श्रमाचे सार्थक. न जाले तर श्रम मात्र फल. सर्व विषई सुचले प्रकारे पैक्याविसी वगैरे लिहितो,

त्याची बेगमी तरतूद वरचेवर होऊन योजिले सिधीस गेल्यानेच आबरू; नाहीतर कठीणच आहे. याकरिता मोगलाचे ठीक असावे. सिंदे होलकर यावे. लिहिल्या-अन्वये येकवाक्यता असावी. कोणी कोणाचे उणे कवीहि पडू देऊच नये. यापेक्षा विस्तारे काय ल्याहावे? बहूत काये लिहिणे. लोभ असो दिल्हा पाहिजे हे विनती. श्रीमंती आम्हावर यख्तियार देऊन स्वारीस पाठविले. निशाण सिके कटार आम्हावा दिल्ही असतां आम्ही काही येक प्रकार मनसब्याचे प्रकारे समजोन केला असतां त्याचा सेवट खावदानी लावावा, ही मर्यादा परंपरा चालत आहे. श्रीमंताचे केले मोडावे, परंतु सेवक लोकाचे श्रीमंती सेवटास न्यावे, हेच शेवा करण्याचे मुख्य फल. त्यास येविसी आम्हास दुसरे प्रकारे करण्यास सवड असावी आणि आमचे दुसरे प्रकारचे करणे सर्वातहि-चागले. आणि ईश्वरासहि मानलें पा. त्यास अलीकडे दो चौ पत्री त्यांजकडून लिहिलेयात येत गेले कीं, तुम्ही करिता ते मर्जीस येणार नाही. साबाजी भोसल्याचे स्वरूपाविषई लिहिता तर मर्जीस येईल ते करू. फार बोढतात. तुम्ही तसेच आईकता, तर त्याचे पार[प]त्य करू, इत्यादिक नाखुसीचे शब्द लिहून पा, त्याच सवडीवर आम्ही श्रीमंतास उतर पा. त्याची नकल करून पा आहे त्यावरून कलेल. राजश्री बापूस व नानास दाखवावी. छ मार हे विनती.

¶*The letter shows how sincerely Trimbakrao Vishvanath wishes success for the new undertaking of the Barbhais and how ardently he advocates the unity of purpose in all the workers. The writer further on asks for more money to meet the expenses of his campaign.*

---

*No. 32*] [*February 1774*

श्री

नकल.

सिका.

तहनामा श्रीमंत राजश्री रघुनाथ बाजीराव प्रधान यांचा व नवाब निजामुदौले बाहादर आसफज्याहा यांचा जे. तर्फैनची दोस्ती जफरूदौले बाहादर यांचे मारफर्तीने ठरली. नवाब आसफज्याहानी, हालीचा बखेडा सखाराम भगवंत व बालाजी जनार्दन याणी मुलाचे नाव करून केला आहे, त्यांचा पक्ष सोडावा. जे सरकारचे दुशमन लाहानमोठे ते नवाबानी आपले मोजून[1] त्यांचे पारपत्यास सर्व

१ आपले असें समजून.

प्रकारे अनकूल असावे. मागील जाहाला प्रकार ते दोहोकडेहि मनात नसावे. आणि आता हा तह दोस्तीचा ठरला तो सेवटपर्यंत निभवावा. या कामसंमंधे नवाब आसफज्याहा यास नफा येणेप्रमाणे :

सखाराम भगवंत व बालाजी जनार्दन याणी मुलाचे

प्रथम कलम लिहिले आहे त्याखेरीज अणी

[ अपूर्ण. ]

¶*Treaty between Raghunathrao and Nawab Nizam-ud-dowla.*

---

*No. 33*] [*21-2-1774*

पैा छ १४ जिल्हेज.

## श्रीशंकर

### पु॥ राजश्री नाना फडणीस स्वामीचे शेवेसी.

विनंती उपरी. ताा छ ९ जिल्हेज वर्तमान यथास्थित आसे विशेष. आपण व राजश्री बापू व राजश्री मोरोबादादा व हरीपंत फडके येक विचार करून मनसबा केला. त्यास येविसी वारंवार फार ममतेने पत्रेहि आपण आम्हास पाठविली. त्यास पूर्वीच आपणाकडे राा अताजी रघुनाथ आम्ही पाठविले होते ते पावोन सर्व मजकूर आपणास विदित केला. त्यास आजपर्यंत या दौलतेत सर्व मंडळी आप्तविषई सोयरेधायरे आसोन कोणे प्रकारे चाल जाली तो प्रकार सर्वास विदितच आहे. त्यामुळे कोणासच कोणे गोष्टीचा स॑वर बसून दौलतीचे वझे घेऊन यश आलेच नाहीं. पुढे तर येक खावंद शास्ता पोख्ता कर्ता असावा तोहि नाही. सर्वहि मानी. कोणाचे कोणी न आयकावे असे न व्हावे. सर्वांनी येकावर भार द्यावा. त्याची योग्यता. असत्या पदार्थी, राजश्री बापू सर्वास वडील केलेले पुरुष त्यार्णाच आवघे डोईवर घेऊन करावे, आम्ही तुंम्ही सर्व त्यास आनकूल व्हावे. दोहीकडील सरदार मंडलीस त्याणी ममता शासन भयपूर्वक उचित उपयोगी जो जसा आसेल त्याचे तसे समाधान रक्षून वागवावे. हाच विचार पका येकमतेचा केला तर परिणाम; नाहीतर जे मागे घडत आले, त्या वेलेस तर खावदाचा दबाव करणार. त्यास आश्रय होता. ऐसे असतां नीट न जाले. आतां तर विचार कलतच आहे इत्यादिक विस्तारे सागोनहि पाा होते, आणि सर्वाचे आनुभवासहि आलेच आहेत. यैसे असता पुढे समजोन न

---

+ पत्र त्र्यंबकराव मामाचें असून तें सर्व त्यांच्या हातचें आहे. १ जोर, बळकटी.

घडले तर परिणाम लागणे कलतच आहे. माझा स्वभाव साफ सरल, आत येक बाहेर येक असा इतके दिवसहि नवता, व पुढेहि नाहीच नाहीं. शरीरे करूनहि वृधापकाल, फार मेहनत केली; फार धावले तर फल बरोबरच. इतकी हौसहि करण्याची नाहीं. तर्तू प्रसंग प्राप्त जाला. तुम्ही बापू व दादा व हरिपंत याणी येकवाक्यतेकरून लिा, व अताजी रघुनाथ बाा कितेक प्रकारे सागोन पाा, त्यास प्रतिकूल होणे, उदासपणे लिहिणे थोरपणास उचित नाहीं. जे होणे ते सर्वांचे दैवेकरून मातुश्रीबाईचे पुण्याने होईल. यासमईहि वेल समय जाणोन होईल तेथवर करण्यात अंतर होणार नाहीं. वोझे थोर. या मनसब्यास चौवे मातबर जिवप्राण येक करून डोई देतील तर च्यार कामे चौघानी निर्लोभपणे आटोपिली तर हलके जाईल. ही मिजास सर्वांची कायम राहून येकाचे उणे ते सर्वांचे उणे हे सर्वदा करण्यात प्रत्ययास परस्परे येऊन वडल्यास आवघड कार्य आहे. श्रीहरी उतमच करील. बहूत काये लिहिणे हे विनती.

¶*The writer, who is evidently Trimbakrao Vishvanath from the handwriting, gives a plain and straight talk and requests all to unite for the common cause of conducting the administration and opposing Raghoba. He further suggests that Sakharam Bapu, who is superior to all both in age and experience, should be placed at the head and should be invested with all authority. He should chastise or favour the Sardars as the case might be and that all should obey him.*

---

*No. 34*] [*23-2-1774*

पैाा छ २० जिल्हेज.

**श्रीशंकर**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**

**सखारामपंत बापू स्वामींचे सेवेसी.**

पोा त्रिंबकराव विस्वनाथ साां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे. विशेष. फौजेस नालबंदीचा यैवज व कापड दिल्हे पाहिजे, त्याविसी वगैरे सरजामाविसी पूर्वी सूचना लिहिली होती, त्याप्रो सरंजाम व कापड पाठऊन द्यावे म्हणौन दुसरेयाने खिजमतगाराबाा छ ११ जिल्हेजी लिहून पाठविले आहे व हाली कापड वगैरे सरजाम आणावयासी येथून राा सुलतानजी व सटवोजी धायभर व मानाजी फिर्गोजी काले पथकसुधा रवाना केले आहेत. तरी पेशजीच्या लिहिल्याप्रो कापड वगैरे सरजाम याजबाो लौकर

पाठवावा. यास रो छ १६ जिल्हेजचा येक आठवडा देविला. ती याद खिजमतगाराचे पत्राबा पूर्वीच पा आहे, त्याप्रो आठवडा देवऊन रा लौकर करावी. रा छ ११ जिल्हेज बहुत काये लिहीणे हे विनंती.

*¶Trimbakrao Vishvanath to Sakharam Bapu, sending him an indent of cloth and presents for distribution to his army.*

---

*No. 35*] [*24-2-1774*

पो छ १६ जिल्हेज.

**श्रीशंकर**

**राजश्री सखारामपंत बापू व नाना**
**फडणीस स्वामीचे शेवेसी**

पोष्ये त्रिंबकराव विस्वनाथ नमस्कार विनती उपरी. आम्ही येथून कारकून रुकनुदौलाकडे काडनूर संगमास शोधाकरितां रा धोंडोराम यांस चिठी लिहून देऊन पा होते. ते जाऊन भेटून आले. रुबुरू या मसलतीस आम्ही तुम्हास अनकूल ऐसे सागोन पा, आणि आपले साडिणस्वाराबा सर्व मजकूर तुम्ही त्यांजकडे व कृष्णराव बलाल याणी लिहून पा तो आम्ही कबूल केला. आम्हासच ही गोष्ट करणे जरूर चितापासून होती, तसाच योग घडोन आला. आम्ही सर्व प्रकार तुम्हास अनकूल. दर मजल आवशाचे मैदानात वांजरा नदीवर नवाब बमय फौजसहवर्तमान येतो. तुम्ही त्याच मैदानात रा साबाजी भोसलेमुधा येणे. तुमच्या आमच्या भेटी होऊन दोन्ही लस्करे पधरा विसा कोसाचे अंतरे असोन, योजिले तुम्ही आम्ही मिळून सिधीस न्यावे, याप्रो साफ सरलपकेपणे मोहरेनिसी खत आम्हास व राजश्री साबाजी भोसले नाना यास भवानी सिवराम यास व देवाजीपंत यांस यैसी च्यार पत्रे पकेपणे पा ती पावोन पकी निशा आमची जाली. याउपर ते दौ चौ दिवसांत या मैदानात येतील. आम्ही तर वाजरा नदीवर येऊन मुा केलाच आहे. मुलाजमत परस्परे होणार. यास्तव मुख्यत्वे या कामात राजश्री कृष्णराव आहेत, त्यास पत्र पावताच आम्हाकडे पाठवावे. आम्ही नवे, आमची त्याची भेट कधी जालीच नाहीं. त्यांस पा द्यावे हे आम्हास प्रशस्त याकरितां लि॥ आसे. जवाहीर त्यास द्यावयाजोगे व आणखी बाचे उमरावास उचित प्रकारे दिल्हे पा, यास्तव व पोशाख दाहा पांच अधीक आगले वगैरे कितेक जिनस उगेच द्यावयाजोग जरूर

---

+ सबंध पत्र मामांच्या हातचें असून पैवस्ती मात्र हरीपंताच्या हातची. १ पत्र.

जरूर लौकर पाठऊन द्यावे. याउपर आम्ही ते भेटून आपली काबू लौकरच हासील (?) करूं. आपण चिंता काडीमात्र न करावी. पैका लौकर यावा. पांच रुो आम्हाजवळ नाहीत. लोकास दिल्हे पाा, व भोसले यास व दर्याबाईचे फौजेस दिल्हे पाा. नालबंदी सर्वास वाटली पाा हे जरूर; यास्तव पैका कापड लौकर पाा. तोफा तयार जाल्या असतील तितक्याच लौकर पाा. दारू गोळे वगैरे सरजाम पूर्वी लिहून पाा प्रो सत्वर पाा द्यावा. हे पत्र दाहा पत्राचे जागा मानून तरतूद करून लौकर लिाा प्राा येऊन पोहचेसे करावे. यावेगळे येथील प्रसंगास उपयोगी आठवल्यास तेहि पाा. आम्ही वारंवार ल्याहावेसे नाहीं. उतमपक्ष आपण राा नानास तेथे ठेऊन बाा हरिपतास घेऊन यावे, हे उतम. राजश्री मोरोबा दा [दा] हि आले आसले तर आणावे. सातारियास कोणी शाहाणा जावा. तेथील शोभा करून तोच तोरा कल्पून तेथून सर्वास पत्रे यावी. याप्रकारे जाल्यास फारच उपयोगी पडेल. राा छ १२ जिल्हेज संध्याकालचा च्यार घटका दिवस गुरुवार बहुत काये लिहिणे हे विनंती.

*¶Trimbakrao Vishvanath to Sakharam Bapu and Nana Fadnis, suggesting to them to write letters to the Nizam and Bhonsle and their Ministers to prepare their forces and to arrive in time at Awsa. The writer as usual asks for more money for the expenses of his army.*

---

*No. 36]* *[25-2-1774*

पोा छ १९ जिल्हेज.

## श्रीशंकर

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**सखारामपंत बापु स्वामीचे सेवेसी.**

पोष्य त्रिंबकराव विश्वनाथ कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ १३ जिल्हेज मुाा वाजरा नदी आवसे पश्चमेस पांचसात कोस येथे येऊन मुाा करून राहिलों होतो. कारण कीं जाबितजंगाची दोन चार पत्रें आलीं होतीं, तेव्हां आम्ही घाटाखालीच होतों. ते भेटीस येणार त्या करितां घाटाखाली राहणे नेर्के[1] नव्हे. ऐसे जाणोन त्यास घेऊन यावे याकरितां राजश्री दिवाकर पुरुषोत्तम यास त्यांकडे राा केलें, आणि आम्ही घाटावर आलो. मुाा मजकुरी भेटीकरितां एक दुसरा मुाा करावा ऐसा विचार होता; परंतु रुकनुदौलाची पके-

---

१ योग्य, युक्त.

पणाची पत्रें आलीं. त्याणीं लिा कीं आम्ही काडनूर[1] संगमाहून दरकूच बाजरा-नदीवर आवशापासीं येत आहों; तुम्हीं तेथें येणे. त्यास या मु॥ आम्ही आल्याची खबर नव्हती. परंतु मोंगलाचे लस्करांतून आमचे कारकून आले. रा धोंडोराम व जिवाजी रघुनाथ यांचे पत्री भाव लिहून आला कीं, श्रीमंत ही बल्हारीचे आसपास होते; त्यास घालमेल जालियाचे वर्तमान कळोन त्याणी रा आबोजी[2] महादेव मोगलाकडे बोलावयास रा केले. ते आज उद्यां दाखल होतील. तर तुम्हीच लौकर मोंगलाचे लस्करासमीप येऊन परस्परें भेटी व्हाव्या म्हणजे त्याचे बोलणे कदाचित श्रीमंताचे यांचे आश्रयास येणे सहजेच राहील. याकरितां आम्हांस लांब लांब मजलीनी कूच करून भीमातीरानजीक मोंगला-जवळ जाऊन भेटणे जरूर याकरितां आज आम्ही कूच करून दर मजल यांजकडे गेलों. श्रीकृपेने त्याची आमची गाठ पडोन भेटी होतील. श्रीमंतहि संनिधच आले असतील. याउपर लढाऊ नूर राहिला नाहीं. पैका आम्हा-जवळ पांच रुा नाहीत. खर्च तूर्त रा साबाजी भोसल्यास एक महिना चालतो याचेच एक लक्ष रुा तुम्ही करार करून पा बाा दिल्हे पा. तसेच राजश्री सेना-साहेबसुभे मातुश्री दर्याबाईसह पांच सात हजार फौजसुधा याच मोहिमेस अनुकूल होऊन बाा आली आहेत. संदेहाचे पात्र खरे, परंतु आणशफतपूर्वक बोलून आपले दुख आम्हाजवळ एकांती सांगोन आली असतां त्यांचाहि प्रकार उत्पन्नभक्षी, तथापि समेटून घेऊन, त्याजविसी संशयहि जाणोन, सावध राहोन प्राप्त संपादिलें पा. त्यास खर्चास पना[स] हजार निदानी पाऊण लक्ष रुा दरमहा पाच माहन्याचे दिले पाहिजेत. पावणे दोन लक्ष तर याचेच. या वेगळे आमचे फौजेस पोटास व नालबंदी व कापड वगैरे खर्च व काही सिलक ऐसे मिळून साता लक्षाचा भरणा, खेरीज कापड पा वा याभावें वारंवार लिहून पाठ-विलें आहेच. ऐवज लवकर न आल्यास प्रसंग प्राप्त तेव्हां संकट पडेल. समय राखावा, हे करण्याचे फळ. याकरितां फार जलदीने यैवज मार्गाचा सावधपणें पुढें आम्हांस बातमी पोहचाऊन यावा. त्या प्राच तोफा तयार असतील त्या व दारू गोळा जवाहीर कापड वगैरे लढाईचे उपयोगी चिलखतें पेट्या टोप भाले काठ्या इत्यादि सरंजाम लौकर येऊन पोहोचल्यास उपयोगीच पडेल. फार मसलत चिघळली तर लांबणीवर पडोन भारी पडेल. यास्तव जलदी होऊन निकड बसवावी तरच जरब बसली तर बसेल. ते बमैये[3] तोफखाना गाडदी फौज

---

१ कडलूरसंगम भीमा कृष्णा ह्यांचा संगम.

२ राघोबाचा मसलतगार.

३ सह, बरोबर.

सुधां असतां आम्हांस आपला तोफखाना जलदीचे उपयोगा जोगा असावा म्हणजे सोईस पडून घडेल ते खरे. याकरितां पूर्वीहि लिा व हलीहि लिहिलें असे. रा नारोपंत केसकर याची जलद तयारी जाली असेल तितका कारखाना घेऊन येऊन पोहचावे या करितां लिा असे. हिंदुस्थानांतून सिंदे व होळकर यांच्यां फौजाचे सरदार देशी येतात. पांच सात हजार फौज गंगातीरास आल्याची खबर आइकती, तेहि मागाहून येतात असेंहि कळलें, त्यावरून आम्ही त्यांस लौकर येण्याविसी पत्रे पाा आहेत. आपलीहि परभारी जावी. आतां अवकाश काहीं राहिलाच नाहीं. सातारियाकडील मजकूर लिहून सुचविलाच होता. तो प्रकार जाल्यास फार उत्तम. आपण व रा मोरोबादादा व हरीपंत फडके लस्करांत येऊन सामील जाल्यास एकास एकाची सोबत होऊन काम जलदीने उरकण्यांत येईल. याविसी अनमान न करितां येणे उचित असे. बहुत काय लिहिणे लोभ असो दिल्हा पाा हे विनंती.

¶*Trimbakrao Pethe writes to Sakharam Bapu about his movements and visits with the Bhosles and the Nizam.*

---

*No. 37*] [*26-2-1774*

**श्री**

**श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे शेवेसी.**

विनंती शेवक चिमणाजी निळकंठ कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना ताा छ १४ जिल्हेजपर्यंत शेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीचा बेलभंडार व चिठी नवाब व रुकनुदोला बहादर यास देऊन उत्तर स्वदस्तूरचे घेऊन पाठविले आहे. वरकड सर्व अर्थ निवेदन केला. इकडील विचार आपले आज्ञे-सिवाय किमपि नाहीं. राजश्री मामा व भोसलेहि वांजिरा तीरी येथून तीस कोसावर आले. जाबीतजंग धौसा निर्मळेहून फौज तोफखाना सुधां निघोन दरमजल आवसे तुळजापूरच्या रोखे जलद येत आहेत. त्याची याची मामा व भोसले याची समीपता सत्वरच होईल. कळावे फार काय लिहू ? श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Chimnaji Nilakanth, Nana Fadnis' clerk, informs him of his having delivered oaths to the Nizam and received back his replies in confirmation.*

No. 38] [28-2-1774

पो छ १७ जिल्हेज.

श्री

विनती उपरी. आपला निरोप घेऊन स्वार जालों, ते आजी इंदुवारी मोरेश्वरी येऊन मुकाम केला, तों लस्करचें दुसरे पत्र जासूदजोडीबराबर बारामतीस आलें तेथोन सांडणीस्वाराबरोबर रवाना जालें. ते आम्हाजवळ पावले. पाहून आपणाकडे पाहावयासी पाठविलें आहे. जासूद केचनगुड तुंगभद्रा तीरचे मुकामीहून आलो ऐसे सागतात. पत्र पाहून माघारे पाठवावे. त्याचा जाब द्यावयाचा विचार कळलाच आहे, त्याप्रमाणें देऊं. राजश्री त्रिंबकराव व साबाजी भोसले लांब पडले; याजकरतां सांडणीस्वार जलद त्यांजकडे रवाना करून आडवें लौकर येतसे करावे. समीपता पडत चालली. आपणहि तेथोन निघोन सतरुषीस यावयाचे करावे. लस्करची पत्रे या आठा दिवसांत दोन वेळ आलीं आणखी वरचेवर येत जातील. त्यात अर्थ यावें. याजकरितां त्यास उत्तर कसे देत जावें हाहि विचार लिहावा. कदाचित तिकडे जावयाचा विचार जाला तर आपली भेट व्हावी. त्यास सतरुषीस आपले येणे जाले तर तेथें भेट घेऊन आपले विचारे जाण्याचा विचार होणे तो होऊन येईल, छ १६ जिल्हेज हे विनंती.

¶*Sakharam Bapu writes to Haripant, inviting the latter to proceed to Satara at once and meet the writer there.*

---

No. 39] [28-2-1774

पो छ १६ जिल्हेज.

श्रीशंकर

पुा राजश्री नाना फडणीस स्वामींचे शेवेसी.

विनंती उपरी राजश्री साबाजी भोसले यांजकडील ग्रहस्त आपलेकडे आला. त्यासी बोलणे होऊन त्यांचे खर्चाची बेगमी परभारीच करून नाना जोसी यांचे पुत्र तात्यो[2] याजबो मनसब्यास आनकूल होण्याविसीं खातरजमेचे मजकुराची पत्रें पाठविली ते छ १ जिल्हेजीं मारनिलेकडे येऊन पावले. या काळी येकहाती येकहुकमी येकविचारे सोये गैरसोय जाल्याने आम (आब ?) राहून मजाहि पडते. आपणास सर्व तोडमोडी कळतच आहेत. तथापि लिहून सुचविले असे. रा छ २ जिल्हेज बहुत काये लिहिणे हे विनती.

¶*Trimbakrao Mama informs Nana Fadnis of the writer's correspondence with Sabaji Bhosle of Nagpur.*

---

१ पत्र सखाराम बापूचें. पैवस्ती हरिपंताच्या हातची. + पत्र त्र्यंबकराव मामांचें. २ कृष्णराव.

No. 40] [2-2-1774

श्री

उभयेतांचे सेवेसी. कृष्णराव बल्लाळ सा नमस्कार विनंती उपरी. आमचा जासूद श्रीमंताचे लशकरातून माघ वद्य शष्टी बुधवार तेरा दिवसानी आला. त्याणें सांगितले की वामनरावनी आपले बुनगे गजेंद्रगडाकडे लाऊन देऊन आपण सडेच होते, त्यास पेशजी भवानराव यांजवर दगा होऊन त्यांची फौज दूर करून पांचसे राऊत ठेवले, आणि दोन लक्ष त्यास दिल्हे, याचें कारण की भवानराव फितुरी आहेत ऐसे चौघानी समजाविले होते त्यावरून हे केले. तत्रापि संशये न जाये, तेव्हा हुजरातची पथकें होते त्यांस आज्ञा जाहली होती कीं तुम्ही भवानरायांस नजरेत असो देणे. ऐसे करीता येक दिवस श्रीमंत सायंकाली खासे हला करावयासी चालोन गेले. तेव्हा भवानरायाचे कुमकस परशराम रामचंद्र मदतीस शामिल जाहले. तेव्हा हेहि नरम पडले. इतक्यांत सेनापति दरमियान पडोन समाधान केले, म्हणोन वर्तमान सांगितले. इकडील वर्तमान जासूद निघाले तेव्हा गेले नव्हते. जासूद कृष्णेवर आला तेव्हां वर्तमान कललें. सुजावदौला आणि फिरंगी ऐसे कासीत होते. फिरंगीयानी सुजावदौला सांगितले की कासी दरोबस्त आम्हाकडे द्यावी. सुजावदौल्याने उत्तर केले कीं कासी देत नाहीं. त्याजवरून सुजावदौलाची व फिरंगियाची लढाई जाहली. च्यारसे फिरंगी मारला आणि लुटून पस्त केला हे विनंती.

¶*Krishnarao Ballal Kale informs both Sakharam Bapu and Nana Fadnis of the scuffle that ensued between Raghoba and the Pratinidhi in the Carnatic.*

---

No. 41] [9-3-1774

पौ छ २९ जिल्हेज, फाल्गुणमास.

श्री

**श्रीमंत राजश्री त्रिंबकराव मामा स्वामीचे सेवेसी.**

पो गंगाधर शंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ता छ १९ जिल्हेज मुा पुणे येथे पागेसह वर्तमान सुखरूप असो. आपल्या बाो हुजुर-पागेकडील घोडी आहेत. त्याजसमागमे रा हरिपंत भिडे याचे निाचे कारकून होते ते पुरंधरास पावले. सांप्रत तेथे आमच्या निाचे कोणी नाही. याजकरिता चिरंजीव रा सिदोपंत व रा गोपालपंत ऐसे पाठविले आहेत. याच्याहातून पागेचे निा सेवा घ्यावी. चिरंजिवाचा रोजमरियाचा बंदोबस्त करून द्यावा व सर्व

प्रकारे आम्हास आपण वडील आहेत व धणी आहेत. दुसरा अर्थ नाही. पुरंधरी तीर्थस्वरूप रा रत्नाकरपंत व चिरंजीव लक्षुमण पागे बा आहे. थोरले लस्करात दोन मुले आहेत. मी पुण्यात आहे. ठाण्यात घोडी होती त्यापैकी सिंगरे पसात[1] तिनसे घोडे काढून सामान करून लोक ठेऊन पुरंधरची रवानगी केली. वरकड वर्तमान चिरंजीव सविस्तर विनंती करतील, त्यावरून कलेल. बहुत काये लिहणे, विज्ञापना.

¶*Gangadhar Shankar Purandare to Trimbakrao Pethe, communicating supply of horsemen to Purandar.*

---

*No. 42*] [*1-4-1774*

श्री

शेवेसी बालकृष्ण महादेव कृतानेक सां। नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम ता। छ १९ मोहरम भ्रगुवासर येथास्थित जाणोन स्वकीयें कुशललेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. स्वामीनीं आज्ञापत्र पाठविलें तें पावले. वो राजश्री गोविंद दीक्षित यांस येवजाविसी सरकारचे पत्र पाठविले आहे हें तुम्हीं त्याजकडे घेऊन जाणे आणि त्यासी बोलोन भावगर्भ लिहून पाठविणे म्हाणोन आज्ञा. त्यावरून बुधवारी दीक्षिताकडे सातारियांस[2] जाऊन त्यांची भेट घेतली. उपरांत ते शहरास जाऊन अस्तमानी माघारे आले. तदोतर भाषण जाले कीं आज-पावेतो कधी श्रीमंतासी आपण देवघेव केला नाहीं. उभयेपक्षींहि कांहीं प्रयोजन पडले नाहीं. तशांत आमचा प्रकार आहे तो पूर्वीपासून विदितच आहे. सांप्रत काली ऐवजाविसी राजश्री सखारामपंत बापू व नाना फडणीस यानीहि या पत्रापूर्वी लिहिले होते. रा। भगवंत भैरव थते व बापूजी नाईक मन्हाठे व दीक्षित असे त्रिवर्ग मिळोन तीन लक्षाचा भरणा करावा असें लिहिले. त्याचे उतर थते व मन्हाठे यांनीं लिहून पाठवावयाचे ते पाठविले. त्यावर मागती पत्रे आलीं कीं दोन लक्ष दोन हजार रूपयाच्या चिठ्या सरकारातून पाठविल्या आहेत. तर तुम्ही त्रिवर्ग मिळोन आठ्याणव हजार रूपये देऊन तीन लाखाची भरती करणे. त्यास तेहि प्रकार घडला नाहीं. असे असता हली सरकारचे पत्र आले. आमचा तर कधीं सरकारांत देणे घेण्याचा पंथ नाहीं. तशात आमची नड काय आहे नांहीं हे सर्वत्रास कललीच आहे. येंदाच्या प्रसंगांत दुसरा सावकारहि कोणी रूपया देत नाहीं. त्यांस अशाहि प्रकारांत निदानी वीस पंचवीस हजार

---

१ पसा घोड्यांपैकीं. पसा घोड्या म्हणजे पैदासीसाठीं राखून ठेवलेल्या.

२ औरंगाबादजवळचें सातारा.

रूपयेपर्यंत देऊ. याहून विशेष कांहीं नाहीं याप्रमाणें दीक्षिताचे बोलणें आम्हासी जाले. त्यानी सरकारचे पत्राचे उत्तर मोघम दिल्हे ते जासुदापासी आहे. त्यावरून ध्यानास येईल. आम्ही काल गुरूवारी सातारियाहून माघारे नेवाशास आलो. कलावें सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Balkrishna Mahadev informs Sakharam Bapu of the inability of the Dikshits of Satara near Aurangabad to help the Poona Government with a loan of three lacs as requested.*

---

*No. 43*] [*3-4-1774*

पौ छ २३ मोहरम मंगलवार
चार घटका आवसीची रात्र.

**श्री**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**नारोपंत नाना स्वामीचे सेवेसी.**

पोष्य हरि बल्लाल फडके कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. उपरी: येथील कुशल ताा छ २१ मोहरम मुाा नजीक मांडे[1] निंबालकराचे जाणून स्वकीय कुशल लिहित आसिल पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले, लडाईचे वर्तमान कलले, परंतु आपले पत्र आले नाहीं; तरी साद्यंत पत्रीं लेहून पो. पुढेहि वरचेवर नवीन होईल तसे कलत असावे म्हणून लिहिले ते सविस्तर कलले. त्यास श्रीमंतांचा रोख कृष्णेचे पाण्याने सातारियाकडे जावयाचा होता. तेव्हां राजश्री त्रिंबकराव मामा मोगल भोसलेसुधा लांब लांब मजली करून वेरलेच्या पाण्यावर जैरामस्वामीचे वडगाव पावेतो पोहोचले. आम्ही सातारियाचे बंदोबस्ताकरितां गेलो होतो. तेथील बंदोबस्त करून येऊन लस्करात दाखल जालो. इकडील जमेत भारी समीप येऊन पोहोचल्याचे वर्तमान ऐकोन श्रीमंतांचा मोहरा माघारा फिरोन श्रीमंत पंढरीचे रोखे चालले, आसी बातमी येतांच मामानी सडी स्वारी करून, पाठिलाग केला. राजश्री साबाजी भोसले व धौशा बमे फौज तोफा मागाहून येत होते. आम्ही लांब मजल करून कासेगावानजीक मेलविले. श्रीमंतांचे कूच होऊन फौजा तयार जाल्या होत्या. इकडील फौज येऊन पोहोचल्याची बातमी कलतांच बुनगे माघारे आणऊन उभे राहिले इकडील फौजा चालोन आल्या होत्या. लढाईचे तोंड लागावे इतक्यात राजश्री

---

१ सोलापूर जिल्ह्यांतील.

कृष्णराव माधव दारोगे तोफखाना यांची चिठी आली. मागाहून राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर याची चिठी आली. त्यांत मजकूर, लढाई करू नये, मागे सरोन मुकाम करावा, इकडील बोलणार यावयाचे आहेत या अन्वये लिहिले होते. त्यावरून फौजेस ताकीद होऊन चिठीचा जाब लिहित मामा बसले होते, तो आकस्मात फौज व तोफखाना गाडदी समी(प) येऊन पोहोचले. गोले मारू लागले. ते समई निघणे प्राप्त जाले. इशारा होतेक्षणी फौजा निघाल्या. खाशा निशाणापासी मामा व आम्ही होतो तेहि फिरलो. मागांहून हुजरातचे लोकानी दाटी केली. सा दाहावीस खाशानसी मामा फिरले. त्याजवर कोणाची दृष्टि राहिली नाही. थोडक होते. जखमी होऊन पाडाव गेले. आम्ही मागे आठ कोसावर साबाजी भोसले होते तेथे येऊन फौज व बुनगे तोफासुधा पोहोचलो. नवाबहि तेच वेलेस मुकामास आले. आम्ही सर्व सरदार येकत्र करून सर्वास उमेदवार करून नवाबाकडे गेलो.

## श्री २

### पुा राजश्री नारोपंत नाना स्वामीस.

विनंती उपरी. नवाबरुकनुतदौले यांजपासी साद्यंत जाला मजकूर सांगितला. पुढल सर्वाचे उमेदीचा भाव दर्शविला. त्यानीहि फारच हिमतीची गोष्ट सांगोन सर्वास विशेष उमेदवार केले आणि मिसलबंदीकरून दुसरे दिवसी कूच करून सांगोल्यानजीक माणेवर मुकाम केला. श्रीमंतांस आम्हास सात आठ कोसाचे अंतर होते. लढाईचा दिवस खेरीज करून दोन मुकाम श्रीमंती पंढरपुराजवल केले. हावभरी व्हावयाच्या लागात होते, परंतु इकडील नेट ऐकोन कूच करून तुलजापुरचे रोखे चालले. आसी बातमी येताच आम्ही लांब लांब मजली करीत येथपावेतो मोगलसुधा आलो. राजश्री भगवानराव प्रतिनधी वगैरे तिकडून निघोन आले. श्रीमंतांस आम्हास पंधरा कोसांचे आंतर आहे. आम्ही तमाम फौजा सज्या करून मोगल व बुनगे च्यार पांच कोसाचे आंतरे पाठीमागे ठेऊन गाठ घालितो. ईश्वरीकृपेने उतमच होईल. मोगलाचा भारी सरंजाम आहे तो परंड्यास ठेऊन नवाबसुधां सडे होऊन जात असो. आज रविवारी परंड्याजवल मुकाम होईल. तेथून सडे होऊन पुढे जात असों. नवाब चहू कोशाचे अंतरे मागाहून येतील. श्रीमत पुढे जातात. आम्ही मागाहून पायबंद दिला असतां पैका कोठे मेलवितात, खातात काय, लोक कसे राहतात? राजश्री भगवानराव आजच लस्करांत येणार आहेत. हुजरातची पथके राजश्री मलबा व भवानजी वाघ व येसाजी देवकाते व लेले मंडली इतके येथे आले. वरकडाचा सिलसिला

चाललाच आहे. आम्ही समीप गेलो असतां येतील. न आल्यांस त्यांचे भरोशावर जात नाहीं. नवाब आम्ही भोसले येकदील असतां कोणे गोष्टीची चिंता नाहीं. राजश्री मामा दगाबाजीने पाडाव गेले इतकाच प्रकार जाला. आम्ही व सर्व सरदार मागे राहिलो. आम्हा सर्वाची हिमत चाकरी करून दाखवावयाची आहे. कैलासवासी श्रीमंताचे पुण्यप्रतापेंकडून व आपले आसीर्वादेकरून कार्यसिधि करितो. चिंता न करावी. ते जिकडे जातील त्याचा पिछा सोडीत नाहीं. जे दिवसी अटकलेत येईल ते दिवसी नवाबसुधा गाठ घालितो. पैक्याची मात्र तर्तूद असावी. त्यास आपणासारखे तर्तूद करणारे असतां आमचे उणे पडू कसे देतील? येविसी मात्र आमची कालजी असावी. वरकड मसलतीविसी कालजी करू नये. बहुत काय लिहिणे, कृपा केली पाहिजे हे विनंती.

राजश्री आपाजीपंत स्वामीस नमस्कार. लिा परिसिजे; कृपा करावी हे विनंती.

¶*In these two letters addressed to Naropant Tulsibagwale, Hari Ballal Phadke describes the fight between Raghoba's forces and those of Trimbakrao Mama Pethe. Pethe was assisted by Sabaji Bhonsle and the Nizam. The writer remarks that Trimbakrao acted rather in haste and was treacherously caught. He should have, he says, waited for succour from him (Phadke). The writer however assures the addressee that all precautions have been taken and that everything would go on quite favourably by the grace of god and the blessings of the Peshwa in his undertaking against Raghoba.*

---

*No. 44]* *[6-4-1774*

पौ छ २६ मोहरम
सु॥ आर्बा चैत्र.

**श्री.**

राजश्री नारोपंत नाना स्वामीचे शेवेसी विनंती. उपरी : श्रीमंत नागर्तल्या[1]कडे जाणार होते ते नगराकडे आले ऐसे आइकिण्यात आहे. त्यास तुम्ही राउतांची व जासुदांची बातमी नगराचे रोखे डाकेची बसवावी. जलदीने बातमी आणवीत जावी. नगराकडून पुण्याचाच रोख धरिल्यास तुम्ही शहराची बंदोबस्ती उतम प्रकारे करून बातमी राखून वीसपंचवीस कोशी आल्यानंतर तुम्ही निघोन जावे. तेथे न राहावें. डाक चांगली बसवावी. घाटोघाटहि राऊत बसवावें. याप्रों करावें. कदाचित श्रीमंत दुसरेकडे गेल्यास उतम. परंतु

---

१ एका घाटाचें नांव.

बातमी राखोन सावध राहावें. सदासिव रामचंद्र याची माणसे पुण्यात आहेत, ती पत्र पावताच त्यास राजगडास रा करावी. पुण्यात न ठेवावी. र॒॥ छ २४ मोहरम. हे विनंती.

¶*Nana Fadnis to Naropant Tulsibagwale, asking precautions being taken at once against any sudden attack from Raghoba.*

---

*No. 45]* *[21-4-1774*

**श्री.**

सेवेसी धोंडो माहादेव सां नमस्कार विनंती. ता॥ छ ९ सफर गुरुवार दोन प्रहर पावेतो वर्तमान यथास्थित आसे. यानंतर पुरंधरचे पत्र येचक्षणी आले. श्रीमंत मातुश्री गंगाबाई यास आधिक शु॥ ७ इंदुवारी प्रसूत जाली; पुत्ररत्न जाले, आपणास कलावे. राजश्री बाजीपंत आंणा यांनी पत्र लिहिले त्याचे उतर आले तेच पा॥ आहे, त्यावरून कलेल हे विनंती.

राजश्री बाजीपंत आंणास सां नमस्कार. आपले पत्राचे उतर पुरंधराहून आला ते पा॥ आहे. पावेल हे विनंती.

¶*The birth of Sawai Madhaorao on 18th April 1774 is communicated in this letter.*

---

*No. 46]* *[3-5-1774*

पौ छ १८ रौवल.

**श्री**

**राजश्री बालाजीपंत नाना**

**गोसावी यासी,**

ℰ अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य श्नो तुकोजी होलकर दंडवत विनंती. उपरी: येथील कुशल जाणून स्वकीय लिहित आसावे विशेष. आपण पत्र पा॥ ते पावोन लेखनार्थ आवगत जाला. या पूर्वीहि पाच सात पत्रे पा॥, परंतु उतर येकाचेहि न आले म्हाणौन लि॥. यैसीयासी येविसीचा प्रकार तरी राजश्री माहादजी सिंदे यांचे व आमचे चिताची सफाई नवती. त्याची दुरुस्ताई अलीकडे होऊन स्वामीसेवा येकरूपपणे करावी या आर्थे निखालसता जाली. त्याच प्रसंगी

---

+ येथून पुढील अक्षर नाना फडणिसाच्या हातचें.

४३

राजश्री माहादाजीपंत गुरुजी आले. त्यानी आपल्याकडील मजकूर सर्व सांगितला. त्याची उत्तरे उभयताकडून येकवाक्यतेने जाली तो आर्थ[१] त्यानी आपल्यास साद्यंत लिा आसेल. मधी राजश्री बहेरजी ताकपीर देसी गेले. आपल्यापासी येऊन भेटावे आसे आसता मार्गी श्रीमंताची गांठ आचानक पडली. निरोपाय जाणून ते त्यास भेटले. तेव्हा त्यांजला स्वारीसमागमे राहाणे प्राप्त जाले. पुढे श्रीमंताची स्वारी इकडे येणार येविसी आपल्या चितांत विपर्यास आला आसेल. त्यास येथील विचार आपल्याखेरीज नाहीं. प्रस्तुत राजश्री हरिपंत समीप आले, आणि श्रीमंतहि नेटी येऊन पोंहचले. तथापि आमचे लक्ष आन्यत्र नाही. जे कर्तव्य ते आपल्या लक्षानेच होईल. रा छ २१ सफर. बहुत काये लिहिणे, लोभ आसो दीजे हे विनंती.[२]




¶*Tukoji Holkar to Sakharam Bapu and Nana Fadnis, assuring them of his full support in the undertaking of the Barbhais.*

---

*No. 47*] [*12-5-1774*

पौ छ २२ रोवल
सन आर्बा.

**श्री**

**श्रीमंत मातुश्री बाईसाहेब**
**साहेबाचे सेवेसी.**

विनंती. सेवक माहदजी सिंदे कृतानेक विज्ञापना. ताा छ ३० सफर मुाा इंदुर साहेबाचे कृपावलोकने सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. विशेष. कृपा करून पत्र पाठविले ते पावले. तीर्थरूप दादासाहेब अजंठ्याचा घाट उतरून खांदेशात गेले. कदाचित पलत पलत तुम्हाकडें आल्यास हस्तगत करावें म्हणौन आज्ञा. यैसियासीं श्रीमंत येथे आले. आल्यापासुन बोलण्याचा संदर्भ लाविला आहे. येक गोष्ट तहावर आल्यावर सेवेसी लिहिलें जाईल. वरकड राजश्री माहादाजीपंत गुरूजी लिहितील त्यावरून विदित होईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Mahadji Scindia to Gangabai, communicating his negotiations with Raghoba.*

---

१ येथें शिक्का आहे. २ याच अर्थाचें सखाराम बापूच्याहि नांवचें एक पत्र आहे.

No. 48] [13-5-1774

पौ छ १८ रोवल

सन आर्बा.

**श्रीसीताकांत.**

**राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यासीं.**

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये श्नो मुधोजी भोसले सेना धुरंधर दंडवत विनंती. उपरी : येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखन करीत जावें विशेष. आम्ही निघालियानंतर चिठी आपणाकडे पाठविलीच आहे. सांप्रतहि सविस्तर आर्थ राजश्री सखारामपंतबापू यांचे पत्रीं लिहिले आहेत त्याजवरून ध्यानास येईल. मागाहून येका दों रोजात राजश्री व्येंकटराव कांसी यांचीहि रवानगी करितो. आतां सर्व भरवसा आपला आहे. रा छ १ रबिलोवल. बहुत काये लिहिणें, लोभ असों दीजे हे विनंती.

(मोर्तब सुद.)

¶*Mudhoji Bhosle to Nana Fadnis, informing him of his intention of dispatching Vyankatrao Kasi for a personal interview.*

---

No. 49] [14-5-1774

**श्री.**

वेदशास्त्रसंपन्न राजश्री शास्त्रीबावा स्वामींचे शेवेसी, विद्यार्थी सखाराम भगवंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा वैशाख शुा॥ चतुर्थी-पर्यंत यथास्थित असे विशेष. आम्ही पुरंदरीहून निघोन सातारियास आलो. श्रीमंत माहाराज राजश्रींची भेटी जाहाली. उदईक पंचमीस रविवारी पेशवाईची वस्त्रे श्रीमंतास होतील. त्याउपरी येथून पुरंदरी जाऊ. त्यास आपण निघोन पुरंदरी यावे. येथून आपणाकडे माहादाजी रामचंद्र पाठविले आहेत हे सांगतील ते ध्यानांत आणून आपण पुरंदरास यावें.

अगत्य यावे. बहुत काय लिहिणे. लोभ आसो दीजे हे विनंति.

¶*Sakharam Bapu informs Ramshastri that the young Peshwa would receive the robes of his office on the Panchmi.*

---

१ पत्राच्या मागील बाजूस मुधोजीचा शिक्का आहे. २ येथून अक्षर लेखकाचे.

No. 50] [19-5-1774

पो छ १७ रावल आर्बा

श्री

श्रीमंत मातुश्री बाई
साहेबांचे शेवेसी.

विनंती सेवक तुकोजी होलकर कृतानेक विज्ञापना. येथील कुशल वैशाख शुध्ध आष्टमी मु।। इंदूर साहेबाचे कृपादिृष्टीकरून येथास्थित आसो विशेष. छ २ सफरचे पत्र पाठविले ते छ २९ माहे मिनहूस पावले. तेथ आज्ञा कीं तीर्थरूप राजश्री दादासाहेब गंगातीरास गेले. त्यांजकडून राजश्री भवानराऊ प्रतिनिधी उठोन आले व नरसिंगराव धायेगुडे व राणोजी नाईक निंबाळकर व दोन च्यार पागा आल्या. आणखी लोक नित्य उठोन येतच आहेत. आपल्या फौजा नवाब भोसले आदिकरून त्यांचे पाठीमागे आहेत. तुम्हांस लौकर येण्याविशी पत्रें पाठविली आहेत. सर्व कामे ठेऊन तुम्ही पत्रदर्शणी स्वार होऊन येणे, म्हणूंन पत्री आज्ञां. यैसियास येथील कामेकाजे सर्व येकीकडे ठेऊन साहेबाचे लिहिल्याप्रमाणें लक्ष राखून डेरे दाखल जालो. कूच करावें तो श्रीमंताची स्वारी ब्ऱ्हाणपुरीहून निघोन येकायेकीच इंदुरासमीप आली. तेव्हां भेटीस जावयाचा विचार प्राप्त जाला. भेटी घेतली. इंदुरी येऊन मुकाम केले. त्यांजकडील विचार आपणास विदितच आहे. त्यास प्रस्तुत राजश्री हरिपंत याजकडून रो नागो राम व मोरो गिरमाजी व निळो गोपाळ यसे येथ येऊन पोहचले. त्यांचे बोलण्याचे भाव कलल्याउपरी, जे ठरल्यात येईल ते सेवेसी लेहून पाठऊं. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञाप्ति.

¶*Tukoji Holkar to Gangabai, promising his adhesion to the cause of the Barbhais and informing her of the negotiations going on with Raghoba.*

---

No. 51] [19-5-1774

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
हरिपंत तात्या स्वामीचे शेवेसी.

पों कृष्णराव बलाल सां नमस्कार विनंती उपरी : येथील कुशल ता छ ७ सफर सोमवार प्राथकाल मुा नगर जाणून स्वकीये कुशल लिहित जावे. विशेष. आम्ही छ २ सफर भ्रगुवारी पुरंधराहून लस्करास यावयाकरिता निघालों ते काल मंगलवारी नगरास आलो. आजी येथून कूच करून दरमजल तुम्हाकडें शहरच्या

सुमारें येत असों. त्यास तुमच्या मुकामाची बातमी शहरानजीक आहे म्हणोन यैकतों. राजश्री नारो बाबाजी याजकडे दौलताबादेची पत्रे आली; त्यानी सांगितलें याजवरोन तुम्हांस पत्र लिा आहे. श्रीमंताची फौज जगजीवन पवार वगैरे दोन हजार पावेतों नासिक प्रांती फुटून गेली आहे. त्याणी कटोरियांस तसदी करून लाख दीड लाख पावेतो यैवज घेऊन वणीवर आहेत यैसी वार्ता यैकतों. यास्तव आम्ही गुंजाल्याचा घाट उतरोन गलनिंबावर गंगातीरास येतो, तेथे तुमच्या लस्करचा शोध लागेल तसें पुढें येऊ. परंतु तुमचे लस्कर लांबले आहे याजमुळें मार्गाची धामधूम. त्याजकडील फौज फुटून थोडी बहुत चोरींने फिरत असलें तरी तुम्ही हजार स्वार आम्हाकडें सामोरें जरूर पाठऊन देणे. त्याची गांठ पडून समागमी घेऊन लौकर येऊन पोहचूं. हिवऱ्यावरून वालनेचे रोखे येत असों. बहुत काये लिहिणे; लोभ असों दीजे हे विनंती.

¶*Krishnarao Kale informs Haripant Tatya of his having started from Purandar to meet him.*

---

*No. 52*] *[15-6-1774*

पौा छ १० जाावल सु॥ खमस
आशाढ.

**श्री**

**श्रीमंत सौभाग्यवती वज्रचूडेमंडित मातुश्री**
**पार्वतीबाई साहेबाचे शेवेसी.**

विनंती सेवक रघुनाथ हरि साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा जेष्ट शुध्द शष्टी पावेतों आपले कृपावलोकनेकरून वर्तमान येथास्थित असे विशेष. कृपा करून पत्र पाठविलें ते पावलें. श्रीमंत मातुश्री गंगाबाई यांसी आधीक वैशाख शुध्द सप्तमी इंदुवारी पुत्र जाहाला. संतोषाचे वृत कलावे म्हणोन लि॥ त्यावरून बहुत संतोष जाहाला. ईश्वरें परिक्षितीसारिखे केले. येणेकरून सर्वांचा भाग्योदय जाहाला. आज्ञेप्रो खुशाली केली. सेवेसी श्रुत व्हावे या आर्थे लिहले आहें. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञाप्ति

¶*Raghunath Hari (Subhedar of Zansi) to Parvatibai expressing his delight at the news of Gangabai giving birth to a son.*

No. 53] [21-6-1774

पौ छ २२ राखर सु॥
खमस सबैन.

श्री

श्रीमत् राजश्री पंतप्रधान
साहेबाचें सेवेसी.

अज्ञाधारक उदाजी नाा माडे व कारकून नामजाद जंजिरे विजयदुर्ग चरणावरी मस्तक ठेऊन सिर साष्टांग दंडवत व नमस्कार विनंती विज्ञापना. ताा छ ११ राखर पावेतों सेवकांचे व जंजिरे मजकुरचें वर्तमान यथास्तित असे विशेष. छ २१ रोवलचे आज्ञापत्र सादर जाहालें, तेथें आज्ञा कीं श्रीमत माहाराज राजश्री छत्रपती स्वामी याणी पेशव्याईचीं वस्त्रें दिलीं ती छ १६ रोवल वैशाख वद्य चतुर्थीस वीस घटका रात्रीस सुमुहूर्तें करून घेतली, म्हणोन हर्शाचे वर्तमान सेवकांस आज्ञापिले, कलोन सेवकास आनंद बहुत जाहाला. यानंतर जंजिरे मजकुरीं अलंगनौबत चौकीपाहारा करून हुशार असों. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञाप्ति.

¶*Udaji Naik Made, Killedar of Vijaydurg, congratulates the new baby Peshwa on his having received robes of his office.*

---

No. 54] [4-7-1774

जावल सु॥ खमस सब्बैन.

श्री

राजश्री नारो आपाजी स्वामीगोसावी यास.

विनंती उपरी. वेदशास्त्रसंपन्न राजश्री राम शास्त्री पुण्यांत आले आहेत. त्याजकडे न्यायाधिशीचा अधिकार पहिल्यापासून चालत होता, त्याप्रमाणें चालता करून, त्याजकडे माणसे वगैरे पूर्ववतप्रमाणें नेमून देऊन, तुम्हापासीं मनसुबीचें कामकाज पडेल ते दरोबस्त यांचे हाते घेत जाणे. पहिल्याप्रमाणें घेणे. जाणिजे छ २४ सु॥ सन खमस सब्बैन मया व अलफ[1] बहुत[2] काय लिहिणे, हे[3] विनंती.

¶*The Barbhais ask Naro Appaji to reinstate Ramshastri in the office of Nyayadhisha and to supply him his full establishment as before.*

---

१ येथून 'अलफ' पर्यंतचा मजकूर नाना फडणविसाचे हातचा.

२ येथून कोणाच्या हातचा हें नीट लक्षांत येत नाहीं. मोरोबादादाचे हातचा असेल.

३ 'हे विनंती' हे शब्द सखाराम बापूच्या हातचे.

No. 55] [20-7-1774

श्री

राजश्री सखारामपंत बापू गोसावियांसी.

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो माहादजी सिंदे दंडवत विनंती उपरी : येथील कुशल जाणौन स्वकीयें कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. श्रीमंतास येथे पुस्तकाचें अगत्य आहे, याजकरितां खंडो व्यंकटेश व सदासिव राम शागीर्द पाठविले असेत. तरी पुस्तकाची यादी पाठविली आहे, त्याप्रो पुस्तके व दयारामभट वैद्य याजकरवीं औषधें केली आहेत ती, व हरणे पुण्यातील व टोक्याहून नेली तीं, उभयेताबाार सत्वर पाठऊन द्यावी. पुस्तकाचे व औषधाचे अगत्य जरूर आहे. पत्र पावताच सदरहु प्रो पाठवावी. रा छ १० जावल. बहुत काये लिहिणे. लोभ कीजे हे विनंती.




¶*Mahadji Scindia orders books for Raghoba.*

---

No. 56] [30-8-1774

पैा छ २० जावल आषाढ
मास.

श्री

राजश्री सखारामपंत बापू गोसावी यासी,

ॐ सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो तुकोजी होलकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित असावे विशेष. तूर्त आपल्याकडून काही पत्र येत नाही, तरी सर्वदा लिहित जावे. इकडील मजकूर तरी श्रीमंत इंगरेजासह मही उतरून भडोचचे सुमारे गेले. आम्ही त्यांचे मागे रेवातीरास आलो. आठ च्यार मुकाम केले. त्याचा छावणीचा इरादा दिसोन आला. मग आम्ही व राजश्री हरिपंत बावापिन्याच्या घाटे नर्मदातीरी भडोच बारा कोस इल्क्या तफावताने आलो पुढे रेवा उतरून पार

छावणी वगैरे मसलत करावी हे ठरले तेव्हा सरकारच्या फौजाचा उतारा लाविला. बुनगे व फौज फार करून उतरून पार जाली. दाहा बारा हजार फौज व तोफखाना सरदार लोक राहिले, इत्क्यात नर्मदेस पाणीहि आले. आशा संधीत श्रीमंतानी घाटाचे सुमारे कूच करून आचानक घाटावर आले. आम्ही प्रहर दीड प्रहर तेथे दम खाऊन तो तल सोडोन पलीकडे च्यांडोस करनालींच्या घाटास गेलो. तेथेहि पाणी फार. इकडे छ्यावणीस राहावे तरी काही फौज पार; काही वर. याजकरिता वर्ते आकबरपूर महेस्वर बढवे या घाटे उतरून पार जाऊन त्या फौजेस मिलवे हे मसलत करून राजश्री हरिपंत आम्ही दरमजल आलीमोहनचे मार्गे आकबरपूरचे घाटे उतरून पारच्या फौजेस सामील होतील. सविस्तरें राजश्री हरीपंतानी आपणास लिहिले आसेल त्यावरून कलेल. आम्हीं महेस्वरास राहू. तेथे लोकाचे वगैरे कामकाज आहे; याजमुले राजश्री नारो गणेश यासी बोलाविले आहे. तरी आपणहि त्यास निरोप देऊन त्याची रवानगी करावी. रा छ २१ राखर. बहुत काये लिहिणे, लोभ असो दीजे हे विनंती.







¶*Tukoji Holkar to Sakharam Bapu, giving details of Raghoba's movements and affairs.*

---

*No. 57*]    [*26-9-1774*

श्रीमंत बापू स्वामीच्या पत्राची नकल.

**श्री**

**वेदशास्त्रसंपन्न राजश्री शास्त्रीबावा**
**स्वामीचे सेवेसी.**

विनंती उपरी : सांप्रत मनसुब्या होतात ; यांत आपणास चौघाचा उपरोध पडतो याजमुळे शेवटास जात नाहीं. ऐशास आम्ही आपले तर्फेने शफतपूर्वक हे पत्र आपणास लिहिले आहे. येविसी संशय न धरितां आपणहि शफतपूर्वक

ईश्वर स्मरोन आमची अगर दरबारात च्यार मातबर आहेत त्याची भीड न धरितां न्याय करून विल्हेस लावित जावे. याउपर आलस करू नये. रा छ १९ रजब लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*An important undertaking given on solemn oath to Ramshastri by Sakharam Bapu that he would never interfere with the course of justice.*

---

*No. 58*] [*26-9-1774*

**श्रीमंत नाना स्वामींचे पत्राची नकल.**

**श्री**

**वेदशास्त्रसंपन्न राजश्री शास्त्रीबावा स्वामींचे सेवेसी.**

विनंती. सांप्रत मनसुब्या होतात ; यात आपणास चौघाचा उपरोध पडतो याजमुळे शेवटास जात नाही. ऐशास आम्ही आपले तर्फेने शफतपूर्वक हे पत्र आपणास लिहिले आहे व राजश्री बापुचे पत्रहि आपणास असेच आहे. येविसी संशय न धरितां आपणहि शफतपूर्वक ईश्वर स्मरोन आमची अगर दरबारात च्यार मातबर आहेत याची भीड न धरितां, न्याय करून विल्हेस लावीत जावें. रा छ १९ रजब. लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*An important undertaking given on solemn oath to Ramshastri by Nana Fadnis that he would never interfere with the course of justice.*

---

*No. 59*] [*9-11-1774*

**श्री**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**बाबूरावजी स्वामीचे सेवेसीं.**

सेवक बाबूराव विस्वनाथ वैद्य कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरि; येथील कुशल तागायत छ २७ रमजान मुकाम नागपूर जाणौन स्वकीय कुशललेखन केलें पाहिजे विशेष. आपण येक दोन पत्रें पाठविलीं तीं पावलीं. लिहिलें वर्तमान कललें. संतोष जाहाला. पत्राचीं उत्तरे पाठविलीं आहेत. त्यावरून सविस्तर कललेच आसेल. राजश्री सेनाधुरंधर व महमंद इसफ गारदी फौजेचा जथ धरून नागपुरावर चालोन आले. राजश्री सेनासाहेबसुभाहि बाहेर निघाले.

विसा कोशाचा तफावत राहिला. लढाई रुबेकार[1] आहे. येशदाता जगदात्मा आहे. सविस्तर वर्तमान येजमानाच्या पत्रावरून कलेल. पत्राचीं उत्तरें जलदीनें द्यावीं. सविस्तर वृत्त ल्याहावें. या समई आम्हीं तेथें आसावें ते गोस्ट नाहीं. आपण आहेत तेथें मीच आहें. तेथील कालजी मी कांहींच करीत नाहीं. कारण कीं आपण आहेत तेव्हां मी कशास करावी ? आपण फार सावध असावें. बहुत काय लिहिणें, कृपा लोभ करावा हे विनंती.

*¶Baburao Vishvanath Vaidya gives news from Nagpur about the impending struggle of the Bhosle brothers. The addressee may be Baburao Keshav Thakur.*

---

*No. 60]* *[5-12-1774*

पैवस्ती छ २० सवाल मार्गसीर्ष

खमस.

**श्री**

**श्रीमंत राजश्री नाना**

**स्वामीचे सेवेसीं.**

सेवक बाबूराव विस्वनाथ वैद्य कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ शवाल मुकाम नागपूर स्वामींचे कृपेकडून वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीनी पत्र छ १३ रमजानचें सांडणीस्वाराबरोबर पाठविलें तें छ २६ मिनहूस पावलें. तेथें आज्ञा कीं "श्रीमंत कासारबारीच्या सुमारे आले. उभयेता सरदाराच्या विद्यमानें ठराव जाहाला आहे; परंतु त्यांतील जावसालास दिकती पडतील. त्या येथून उगवावयास लांबण पडत्ये. दिसगतीवर पडतें. याजकरितां आम्ही उभयेतां कार्तिक वद्य पंचमीस येथून निघोन टोकेयाच्या सुमारे येतों. राजश्री सेनासाहेबसुभा यास घेऊन आपले फौजेंत येणें" म्हणोन लिहिलें तें कळलें. इकडील वर्तमान तरी राजश्री विठल बलाल सुभेदार वगैरे सरदार बालापूरचे सुमारें राजश्री हरिपंत तात्या याचे आज्ञेप्रमाणें होते; त्यांत त्याणी येऊन येकत्र होऊन मलकापुरच्या सुमारें असावें. जैसी मसलत पडेल तैसें करावयास येईल. हे योजनेत होतें. येथील फौजेची समजावीस नाहीं. पैकेयास जागा नाहीं. काम सुस्तीखालें पडलें या अर्थी येजमान व कारभारी याचा विक्षेप. त्यांतहि कारस्थानी करणे ते करून उपयोगी पडावें यैसे विच्यारणेत असतां, राजश्री सेनाधुरंधर व इस्माईलखान व महंमद इसफ व ज्ञामसिंग यानी फौजेची समजोती करून श्रीमंताकडे जावें यैसें योजिलें. दरम्यान फौजा

---

[1] सन्मुख, निश्चित.

निभाव न होई किंवा उभयेतां सरदाराच्या करारांत गोष्ट नाहीं ते जाहालियानें उघड पडेल, याअर्थी तिकडील रोख टाकून नागपुरची चाल धरिली. येथील विसंच. फौजेचा गलाटा. पैका टका कारभार ठीक नाहीं हे बातमी त्यास दिनचर्येची होतीच. या समई गाठावें या मनसबेयावर राजश्री सेनाधुरंधर व गारदी मजलदरमजल किले आमनेरास आले. तेथील किलेदार भेटले. तेथें बुनगें टाकून येतात हे बातमी आली. तेव्हां छ १० रमजानी राजश्री सेनासाहेब-सुभा डेरेदाखल जाहाले. राजश्री विठलपंत यास निकडीचीं पत्रें व हातचिठ्या गेल्या कीं रात्रीचा दिवस करून समयास येऊन पोहचावें. त्यावरून ते आडवे आले. यानी येथून कूच करून पुढें जावें, तरी विनापैका कैसें घडतें? पेकयास तर ठिकाण नाहीं. संकटांत पडले. आपण व कारभारी यानी सावकाराच्या घरास जावें, परंतु ताल न पटे. दिक जाहाले. मोठ्या संकटें यजमानानी व दिवाकरपंत व उभयेतां भवानीपंत व सर्व मुतसदी मिलोन दाहा लक्षाचा यैवज ठराविला. आम्ही व राजश्री नाना नित्य जात होतों. पुढें हिसेब पाहोन लोकांस पैका द्यावा आणि निघोन विठलपंत व आपण येक होऊन गाठ घालावी, त्यास दोन वर्षाचे हिसेब व लोकाचे देणे महबालग. यैवज थोडका. वरचेवर कैसे उरकतें? परंतु चालीवर घेऊन करीत आहेत. तो विठलपंत व सटवोजी भोसले काटबलावर आले. दोन तीन हजार थोडकेच आहेत यैसी बातमी त्यास कळली. त्यानी कूच करून छ २२ रमजानी गाठ घातली. लडाई जाहाली. सुभेदारास भालेयाची जखम लागली व रात्रहि जाहाली. हे थोडके, ते फार. हे उधलले, त्यानी तेथेंच मुकाम केला. दुसरे दिवशीं सुभेदार वगैरे सरदार कलंबेस्वरचे मुकामी येकत्र होऊन जमाव केला. येथें बातमी आली, तेव्हां काम विलग पडेल यैसें जाणोन सर्व सरदार व लोक मुछदी येकत्र होऊन आला. लोक पुढें जावें तरी समजाविस नाहीं. पैका दिल्हाखेरीज कूच कैसें होतें? याजकरितां सुभेदार वगैरे सरदार यांस आलीकडे बोलाविले. राजश्री मानसिंगराव मोहिते व आपलाजी नारायण मागें होते तेहि आले. च्यार पांच हजार जथले. तेलंग खेडीवर याजपासून तीन कोशावर पुढें आहेत. हे येथेंच आहेत. फौजेची समजोती करीत आहेत. सेनाधुरंधर यानी विच्यार केला जे, नागपुरास जाऊन फलादेश नाहीं. लोक नामी आहेत. तोफा व गारद सरंजाम आहे. आपण हार येणार नाहीं. याचे फौजेची समजावीस नाहीं तोंपर्यंत याच्यानें आपणांवर येवत नाहीं. तावत्काल मुलकांत पैका घ्यावा. फौजेचा जथ पाडावा. चंद्र-पुराहून कांहीं तोफा आणाव्या. ये मसलतीवर आजीवर गेले. मुलकांत पैका घेतात. नागपूर चंद्रपूर आलजपूर तिनी रोख धरून वीस पंचवीस कोशाचे

तफावतीनें आहेत. पुढें कोणीकडे जातील पाहावें. हे तर आद्यापि समजाविसीच्याच घोरांत आहेत. किमानपक्षीं आणखी आठ दाहा दिवस लागतील. हा शह वारेल तेव्हां याचें येणें मलकापुराकडे होईल. प्रस्तुत यास हे मसलतच भारी आहे. ईश्वरकृपेनें व श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे प्रतापें, व आपले ममतेच्या योगें, सेनाधुरंधर याचें पारपत्य करून, भेटीस यावें हें इच्छितात. याची चित्तवृत्ति सर्व आपणांकडे आहे. परंतु आवघडोन कुपेचीं पडले आहेत. याचा पेंच वारणें आगत्य स्वामीस आहे. आम्ही यावत बुध चालते तेथपरियंत श्रम करीत आहों. मेहनत करावयास आलस करीत नाहीं. कलावें बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विनंती.

¶*Baburao Vaidya to Nana Fadnis, communicates details of the fierce antagonism of the two brothers Mudhoji and Sabaji.*

---

*No. 61*] [*2-12-1774*

पो। १४ सवाल
मार्गशीर्ष खमस

**श्रीशंकर**

श्रीमंत राजश्री नाना साहेब
स्वामीचे सेवेसीं

विनंती सेवक बाबुराव विस्वनाथ वैद्य कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत कार्तिक वद्य १४ शुक्रवार पावेतों मुकाम नागपूर येथें स्वामीचे कृपेंकरून वर्तमान येथास्थित असे. विशेष:—स्वामीकडून बहुत दिवस कृपापत्र येऊन सांभाल होत नवता. त्यास हलीं स्वदस्तुरचें पत्र छ ३० साबानचें पाठविलें तें छ २४ रमजानी पावलें. लिहिला मजकूर सविस्तर कलला. आणि फार आनंद जाहाला. यैसेच निरंतर पत्रीं सांभाल व्हावा. पत्रीं आज्ञा जे, "राजश्री साबाजी भोसले सेनासाहेबसुभा यास घेऊन लौकर राजश्री हरीपंताजवळ पोहचावें. श्रीमंत दादासाहेबास उभयतां सरदार * * आणीत आहेत. परंतु श्रीमंताची बुद्धि (शास्व) त नाहीं. मुलकांत दंगा करितात व राजकारणेहि धड (?) करीत आहेत. त्यास उभयतां सरदाराचें लक्ष पुर्तें आपणांकडे आहे. चिंता नाहीं. परंतु आपण सावध असावें. तरतूद पोक्त असावी. जैसा प्रसंग बनेल तैसें करावयास येईल. याकरितां सेनासाहेबसुभे यास घेऊन जलद हरीपंतापासी यावें." असी आज्ञा. त्यास येथील प्रकार तर सविस्तर वरचेवरी च्यार पांच

पत्रीं लिहित गेलों. स्वामीस पत्रें पावलीं न पावली याचा अंदेशा आहे. असो. येथील प्रकार तर येथें येऊन दोन मास होत आले व माझे पूर्वी सेनासाहेबसुभे यांस महिना जाहाला. येकून तीन मास होत आले. अद्याप कामकाजाचा प्रथम दिवस आहे! फौजेचें देणें मबलग. यैवजास ठिकाण नाहीं. वराड प्रांतांत दोन वर्षे दंगा, याकरितां तिकडील रुपया येक जमा नाहीं. देवगड प्रांतीचा मजकूर तर इकडेहि सिबंदी होती त्यामुळें इकडील यैवजास तपसील लागला. रुपयास ठिकाण नाहीं. नित्य धरणेयासी समध. राजश्री सेनाधुरंधर व इस्मालखान व झामसिंग याणी यैवजाची तोड लाऊन फौजेची समजावीष केली. कांहीं नवी फौज ठेविली. महमद इस(ब) त्यास मिलाला. याप्रमाणें जथ करून श्रीमंताकडे जावें, त्यास मध्यंतरी राजश्री तात्या होते व सेनासाहेबसुभे याचीही फौज होती. याकरितां तिकडे जावयाची सोय न बनली. तेव्हां सेनासाहेबसुभा याचा गळाटा पाहून इकडे चाल धरली. मजल दरमजल आमनेरास दाखल जाहाले. आमनेरचे ठाणें हस्तगत केलें. नागपुरास आमनेरास तिसा कोशाचा तफावत तेव्हां येथें गलबल फार जाहली. सेनासाहेबसुभे यास संकट पडलें. तेव्हां डेरे दाखल जाहले. वराडांत फौज होती ती बलाविली. त्यास पत्रें निकडीने गेलीं. तेही मजल दरमजल त्याचे पिछावर आले. येथील कामाचा बंदोबस्त करून कूच करून पुढें त्याचे तोंडावर जावें, त्यास अद्याप फौजेची समजावीष जाहाली नाहीं. कबजे आकारीत आहेत. त्याचे निकडीचें वर्तमान आलें कीं, आमनेरास दाखल जाहाले. तेव्हां सर्व मुछदी व सावकार मिलोन मोठ्या आग्रहें करून दाहा लक्ष रुपये * * केला. त्यास याउपर फौजेचे कबजे होऊन रुपये वाटावयास आठ रोज लागतील. काम चालतें जाहालें. आठा दिवसांत समजोती पडेल यैसें दिसतें. लवकरच पडेल. राजश्री विठलपंत सुभेदार वगैरे फौज व सरदार त्याचे पिछावर आले होते. त्यास त्याकडील लुटारे मुलकांत दंगा करितात याकरितां विठलपंत सुभेदार व सटवाजी भोसले यैसे सडे दोन हजार फौजेनिशीं त्याचे तोंडावर आले. त्यास त्याणी बातमी ठेऊन खासा गारदीसुधा याजवर चालोन आले. याची बातमी होती. परंतु बातमी व ते बराबरच आले! तेव्हां गाठ पडली लडाई जाहाली. हे थोडे ते फार. व संध्याकाल जाहला. याकरितां हे निघाले. लडाई चांगली जाहाली. विठलपंत सुभेदार यास जखम भाल्याची आहे. याप्रमाणे जाहालें. मागती फौजेचा आला पडला. त्याचे तोंडावर जमून आहेत. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विज्ञापना.

¶*Baburao Vaidya from Nagpur, communicates to Nana Fadnis details of the antagonism between the two Bhosle brothers.*

554

No. 62] [4-12-1774

श्री

**राजश्री सखारामपंत बापू गोसावी यासी**

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री साबाजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत आसावें विशेष, आपण छ १४ रामजानींचे पत्र पाठविले ते छ २९ मिनहूस प्रविष्ट होऊन लेखनाभिप्राय कलला. उभयता सरदार मध्यस्त यानी राजश्री रघुनाथरावदादा यासी कासारबारीने घेऊन आले. दाहा लक्ष रुा जाहागीर व दोन किले द्यावे यैसा निश्चय जाला. ते घ्यावे. मग जर श्वस्त करारप्रा न राहातील, तरी दाबून सांगो, यैसी पत्रें त्याची आली. मातबर सरदार त्याजवर विश्वास ठेविला. तेव्हा त्याणी वचन केले ते पार पाडिले पा. त्याजवरून करारप्रा द्यावयाचे त्यांस लेहून पा. आपणाकडील गुंता उरकिला. परंतु इतक्यानेच आईकतील यैसा तो भरवसा नाहीं. नाना प्रकारे हिस्के देतील. लाबण पडते. मनसबा लौकर सेवटास जात नाहीं, असे जाणून, आपण व राजश्री बालाजीपंत नाना कार्तीक वद्य पंचमीस पुर (धरा) हून निघोन टोक्याचे सुमारे पुढें येत आसों. नवाब छ १९ रमजानी डेरे दाखल होणार तेहि जवल पडतील. सरदार जाबस्वालास म्हणून निरोप घेऊन येतील. सदरहू जथ पाहून नरमहि पडतील. सर्वांच्या विचारे सागो तसे आईकतील. न आईकिल्यास जसे पाहू तसे करू, राजश्री हरिपंत व धौसे त्याजवल राहातील. सरदारांचे लक्ष इकडे आहे. दादाचे करणे अनान्वित, आपण जाणतात. त्यास नागपुराहून कूच केलेच आसेल. लौकर आपले फौजेत मिलोन मलकापूरच्या सुमारे यावे. येथून लेहून पाठऊ तसे करावें. रा हरिपंत जवल आहेत ते लिहितील तसें करावे म्हणून लिहिले. अन्वय अक्षरशा कललें. यैसियासी फार उचित आहे. हे मसलतीस संवत्छर पुरले, आद्याप कडेस लागावीच आहे. सरदारी खर्चाखाले आली. मुल्लक पायमालीत आला. बंदोबस्त विस्कलीत. या आर्थी कडेस लौकर लागावी हेच नीट आहे. त्याच मसलतीच्या पोटांतील आम्हांकडील मसलत दोन वर्षे लांबली. पैशार्ची आडचण, लोकाचे मनोधारण ठेविले पाहिजे. ज्याणे जैस म्हटले तसेच आईकणे लागेल. घरातील कल (मे) *(कि) तेक प्रकारची, वेध (?) फंद, वराड प्रांत इस्माईलखान त्यास मिलाला याजमुले येक रु॥ आम्हाकडे येऊ नये. प्रांत खवारीत आला. देवगड प्रांतांत दोन च्यार ठाणी माहाल तिकडील फितुरांत पडले. (वर)



कड पैसा येथील सिबंदीखाले गेला. मातुश्री दर्याबाई याचा ठहराव राजश्री हरिपंतानी करून दिल्हा. त्यापैकी आणुमात्र करार उतरला नाहीं आकोलियाचे मुकामी केवल गोष्ट विथर पैक्यामुले जाहाली. त्यांत फंदरंद दिसले. त्या प्रकरणी समय गांठावा वेल टालावी याजकरितां नागपुरास मसलत सेवटास गेली नाही. जाऊ नयें हे तरी पारिछिन्न गोष्ट आसतां चुकी समजोन आलों. लोकाचे देण्याचे तोदे, येथे पैक्यास ठिकाण नाहीं. आनेक प्रकारें तोडजोड करून सात आठ लक्ष रुा जागा करून कोण्याप्रकारे येथून निघोन, तात्याजवळ जावें हा सिधांत. त्यांत येथील आडचण विसंच पाहोन, सेनाधुरंधर व इस्माईलखान व श्यामसिंग याणी आठ दाहा लक्ष रुा रोकड लोकास वाटून आमनेरास आले, लगट करून येथे यावे दगा करावा. त्यास नाईक, पाटणकर घाटगे, माने, यादव, घोरफडे, उमदे कुलीण लोक व पठाण मंडली प्रसंगांस घालणार नाहीत. लोकाचा जथ सजला पाहोन आमनेरी थबकले. राजश्री विठल बलाल सुभेदार, वगैरे यास हे वर्तमान कलतांच चिरंजीव ( सटवो ) जी भोसले व ते आडवे दोन हजारासी काटवलावर आठ कोशाच्या तफावतीने उभे राहिले. याजवर चालोन आले. छ २१ रमजानी जुज जाहाले. दुतर्फा कायम राहिले. विठलपंतास भाल्याची जखम लागली. दोहींकडील से पनास माणूस जखमी व दाहा पंचवीस कामासहि आले, तेथेहि अजमास कलला. त्यानंतर मुलकाची खराबी स(त्यना)स करीत येथून वसि कोसी फिरतात. त्याचे पारपत्य करावें. त्यास लोकाची समजावीस जाहालियाविना कूच होत नाहीं. येथें प्रसंगास लोक अंतर देत नाहीं. याप्रकारे आवघडोन प्रस्थानी आसों, आमचे व या दौलतीचे आभिमानी आपण. आमचे लक्ष येकरूप आहे. बारीक मोठे कचे वर्तमान आपणास कलावे हाच मनोभाव जाणून येथंभूत लिा आहे. लोकाची समजावीस करून यावे. आम्ही येथें परंतु प्राण मसलतीच्याच प्रकर्णी आहे. रा छ २९ माहे रमजान बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

मोर्तब
सुद.

¶*Sabaji Bhosle to Sakharam Bapu, writes frankly of his domestic troubles.*

---

*No. 63]* *[5-12-1774*

**श्री**

**श्रीमंत राजश्री तात्यासाहेब स्वामींचे सेवेसी.**

विनंती सेवक सदासिव रघुनाथ सां नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम ताा छ १ सवाल मुकाम मौजे भोंडगांव येथें सुखरूप आसो. विशेष:—आपण आज्ञा

केली कीं बोरघाटचा बंदोबस्त करणे त्यावरून आम्ही मौजे मजकुरी येऊन बोरघाटचा शोध केला. परंतु बोरघाट दहिवली कसब्याखाली नाहीं. येविसीं पत्र राजश्री भिकाजीपंत याचे कारकून राजश्री नारोपंत यांणीं लिहिलें ते सेवेसी पेशजी जासुदासमागमे पाठविले व बोरघाटचा शोध येथे केला परंतु ठिकाण लागत नाहीं. खारशापासीं एक घाट सादडवी बारीचा मात्र आहे. तेथें जावे तर आपली आज्ञा नाहीं, व तेथील कमाविसदार यास आपले पत्र नाहीं याजकरितां तेथें गेलो नाहीं. जासूद पाठऊन तेथील वर्तमान आणविले त्यास खरसेगांव येथील कमाविसदार उखाजी गडदे, चिमणाजी देशमुख याचे दहशतीमुळे पळोन गेले. गावहि उज्याड जाला आहे. घाट चालत नाहीं. याप्रमाणें तेथलि वर्तमान. आम्ही येथे मौजे मजकुरीं बसलों आहोत. तरी आपण जी आज्ञा करितील त्याप्रमाणें वर्तणूक करूं. खारशास जावयाची आज्ञा जाहल्यास जाऊं. परंतु आणखी जासूद व गाडदी मिळोन पन्नास पाऊणसें पाठविल्यास तेथलि बंदोबस्त होईल. नाहीतर आपल्यापासीं यावयास आज्ञा जाली तर येऊं. श्रीमंत राजश्री दादासाहेब लाडोद्यावर आहेत. समागमे इंग्रज दोन तीन हजार आहेत. वरकड इंग्रेज सुरतेस लग्नास गेले आहेत. श्रीमंताचे मुकाम लाडोद्यावर तिनि चार आहेत. इंग्रज आल्यावर सोनगडास येणार असे वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Sadashiv Raghunath to Haripant, proposing to him the arrangement for the defence of Borghat. The halt of Dadasaheb accompanied by 2000—3000 English troops is communicated in the letter.*

---

*No. 64*] [*5-12-1774*

पौ छ २० सवाल मार्गसीर्ष

खमस.

**श्री.**

**श्रीमंत राजश्री सखारामपंत बापू**

**स्वामींचे शेवेसी.**

पोष्य भवानी सिवराम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथलि कुशल मार्गसीर्ष शुध द्वितीया इंदुवासर मुकाम नागपूर जाणून स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. छ १४ रमजानीचे पत्र आपणाकडून आले ते छ २६ मिनहूस प्रविष्ट जाहले. टोक्याचे सुमारे येत असों. राजश्री सेनासाहेब सुभे यांणी * * सुधां मलकापूरच्या रोखे यावे. पुढे येथून लेंहू

तसे करावे, या अन्वई सविस्तर अन्वय कळला. त्यास येथील लक्ष दुसरे नाही. दोन वर्षे घरकलह पुरवला. मुलुक खराबीत आला. पैशावाचून फौज कशी राहाते ? मातबर सरदारी, लोकहि कुलीण, तत्रापि सिबंदीचे काम, तलबा चढल्या देण्याचे तोदे भारी जाहले. त्यांत मुदयेगिरी घरांतील अनेक प्रकारे. कितेक फंद फितूर. कल राखतां कोठवर सांभाळावे, हे अर्थ वारंवार आपणास लिहित आहो. राजश्री हरिपंत तात्या यासहि इतला आहे तेहि लिहित असतील. श्रीमंत राजश्री सेना साहेबसुभा यांचा भावार्थ एकरूपच आहे की, आपले व या दौलती-सुधां वालीपणा आपणाकडे लाविला. तेव्हां तिकडील बंदोबस्तात आणि कल्याणातच आपले कल्याण. सेवक तरी स्थापित आपला. प्राप्त प्रकार एकच, त्यांत लोकांनी अवघडविले. एका पैक्यामुळें परश्वाधीनता जाहली. कितेक संच्यार गृहछिद्रें. त्यांचे कल खालीं हातावर तोडजोडी राखाव्या आणि उप * * पाडावा हेच लक्ष आहे. सविस्तर कचे वर्तमान यजमानसाहेबी व राजश्री नानाजी कृष्ण व बाबुरावजी याच्या पत्रावरून कळो येईल. काही समजाता लोकांचा जाहला; राहिला तो करूनं बाहीर निघावे. छ ११ रमजानी प्रस्थाने डेरे-दाखल येजमान आहेत. सेना-धुरंधर व महंमदइसफ यांणी वेसंद पाहिली आणि रुबकार[१] जाहले. याचा बंदोबस्त जाहाला पा।. तो करून येत आहेत. जीवप्राण दौलतीचे ठाई आपणाजवळ आहे. कळावें बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

¶*Bhavani Shivram writes to Sakharam Bapu details of Mudhoji Bhosle's plans and movements.*

---

*No. 65*] [*7-12-1774*

## श्रीशंकर

### पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामाचे सेवेसी.

साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ ३ शवाल पावेतों मुकाम नागपूर येथें स्वामीचे कृपेकरून सुखरूप असो विशेष. स्वामीकडून पत्रें वरचेवरी येतात जे "सेनासाहेब सुभेयास घेऊन लौकर फौजेस (ह) मलकापुरावर यावें. येथून पत्रें पाठऊं, त्या प्रमाणें वर्तणूक करावी." यैसी पत्रांत आज्ञा. याप्रमाणेंच राजश्री हरिपंत तात्याचीं पत्रें येतात. परंतु उपाय नाहीं. येथील सविस्तर मजकूर पेशजी स्वामींस लिहिला आहे, त्यावरून ध्यानास येईल. राजश्री सेनासाहेबसुभे आपलीं पत्रें येतात तेव्हां विव्हळ होतात कीं, या समई आम्ही त्याजपासी असावें; त्यास आम्ही दैवहीन, पत्राप्रमाणे वर्तणूक आम्हापासून होऊ नये! आम्ही आपलेंच

---

१ युद्धाला सन्मुख; एकत्र. नमूद.

रडगाणे नित्य आपणांस ल्याहावें! दैवास उपाय नाहीं! यैसे कितेक प्रकारें भाषण उदासीनतेने करितात. परंतु उपाय नाहीं. अवघडोन आहेत. आतील पेच; उपाय नाहीं. काम सुस्तीवर. यैसे कित्येक प्रकार बिलग आहेत. आम्ही यावत बुध चालत्ये तितकी मेहनत करीत आहों. परंतु मोहरा विलग पडला. यास उपाय नाहीं. कोणे समई काय घडेल हा भरवसा येत नाहीं. याच संकटांत आहों. स्वामीचें पुण्य समर्थ आहे तरी इतकेंही पार पडेल. आंतून यजमानसह संधानास चुकत नाहीं. सारांश क्षेत्र शुध आहे. याविशईंची खातर-जमा जाहली व स्वामीची असावी. कोणेविसी संदेश नाहीं. सेनाधुरंधर याचे सल्याचा मजकूर स्वामीनी पेशजींचे पत्रीं लिहिला होता, त्यास येथें त्यांतील अर्थ कांहीच नाहीं. याचे प्राणावर ते आहेत तेव्हां कसें घडेल? आणि आपल्या खेरीज कसें घडेल? कदापि घडणार नाहीं. स्वामीचे आज्ञेसिवाय येथें दुसरें कांहीच नाहीं. कलावें. कांहीं तोफा[1] जिनस मिळवावा व बंगाली सणगें उंच मिलवावीं यैसी आज्ञा. त्यास बंगाली सणगें उंच कांहीं मेलविलीं आहेत. तोफा जिनसाचे शोधांत आहों. कोठें शोध लागल्यास आंतर होणार नाहीं. रामटेकी पानें पेशजीं पाठविलीं आहेत; पावलीं असतील. आणखीहि रवाना करीत आसों. मार्गाचा सुभता[2] नाहीं. याकरितां विलग आहे. नाहींतर हमेशा पाठवितों. कलावें स्वामीचे चरणाचा वियोग साहावत नाहीं. याउपर लवकर आज्ञा होईल तर स्वामीचरणाजवल येऊन, भेटीनंतर सर्व निवेदन करीन. सर्व प्रकारें सांभाल करणार स्वाम समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा लोभास पात्र असे हे विज्ञापना.

*¶Baburao Vaidya (as it appears from the handwriting) writes to Nana Fadnis from Nagpur movements and plans of the Bhosle brothers.*

---

*No. 66]* *[21-12-1774*

पौ छ २४ सवाल.

खमस सबैन मार्गेश्वर.

**श्री**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**

**नारोपंत[3] नाना स्वामींचे सेवेसी.**

पो सिवाजी विठल सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ १७ शवाल पावेतो मु॥ बेटावद प्रांत खानदेशे येथे येथास्थित आसो विशेष आपण

१ उत्कृष्ट, फर्मास. २ मार्ग चालत नाहीं, सुपथ नाहीं. ३ नारो अनंदराव केसकर.

तिकडे गेलिया ताा काही पत्र येऊन वर्तमान कलत नाही. तरी आपण कोठ-पर्येत गेला पुढे मनसबा काये निश्चये केला ? हे ल्याहावे. दुसरे जातेसमई पाा उरपाडेविसीई समक्ष सांगितलें होते, त्यांसी श्रीमंत राजश्री दादासाहेबी नरोतमदास सुरतकर यांसी लिहून पाो मजकूरचे ठाणे उठऊन आमल त्यानें बसविला. आपणच जबरदस्तीने उठऊन दिल्हे, यैसे परिछिन्न, माहाली राजश्री बाळाजी लक्षुमण यांचे लिहिले आले. येथून उपराला करावा तरी येंदाचा प्रकार बहुत विलक्षण जाला. आधीच वोढगस्त. त्याजमधे सरंजामी माहाल. दरोबस्त धुले, सोनगीर दोन्ही माहाल, येक महिनाभर दादासाहिबी मुाा करून लुटून पस्त केले. गाव खेडी घरे राहिली होती, सांप्रत्य उभयेता कारभारी व नबाब याणी मोकले केले ! रसदा मामलेदाराच्या घेतले, त्याजपौ पांच रुपये वसूल जाले नाहींत. मालव्यांतील माहाल पेढारी घालून उभयेता सरदारानी लुटले. उरपाड भारी सरंजामाची बेरीज, येथील अवस्ता आपणच पाहावी. उरपाडचा उपराला येथून व्होणेच शक्य नाहीं. येक आपला मात्र भरवसा आहे. प्रसंगास आपण सुरतेस गेलेत म्हणून ऐकिले. त्याजवरून अजूरदार जासूद करून पाठविला आहे. तरी उरपाडचा मामलेदार येऊन आपल्यास माहीत करील, त्याप्राो बंदोबस्त करून द्यावा. नाना ! सालमजकुरी आमची बहूत खराबी झाली. तो विस्तार पत्री लिहिता येत साहीं. सारांश चितावरी घेऊन उरपाडचा बंदोबस्त करून द्यावा. आमचे ठिकाणी आपण तेथे आहेत. नरोतमदासापासी काहीं सरंजाम मातबर नाही. आणि श्रीमंत राजश्री दादासाहेब उभयेता सरदारास सोडून धुल्यापासोन वीस कोस मजल करून, दरकूच मालव्यांत गेले. सरदार माघे येका मजलीने आहेत. त्याजमाघे राजश्री हरिपंत धऊसासुधा आहेत. त्याजमाघे तीन मजलीचे तफाव-ताने कारभारी व मोगलसुधा आहेत. रास्ते, वामनराऊ हरिपंतास सामील जाले. दादा पुढे दीढ दोन हजारानसी निघून मालव्यांत गेले. वदंता सुज्यायेतदौल्याकडे जाणार. यैसे वर्तमान आहे. रेवातीरास कारभारी नवाब जाऊन, दम धरून काही उभयता सरदारांचे विचारे जाले तरी काही तहात आले तरी येईल. सिंदे होलकरानी आशेस गोऊन किल्यावरून उभयेतास काढून, दादासी बिघाड मसलत लांबऊन, खर्चाखाली आणले. दादास काढून दिल्हे. पुढे काये होईल ते पाहावे. उरपाडचे कामाचा बंदोबस्त करून द्यावा. येथील प्रसंग यैसा जाला आहे. येणेकडून नरोतमदासहि दबेल. गायेकवाडहि दबल. तिकडील वर्तमान ल्याहावे. उरपाडचे काम करून पुढे जावे. येथून किरकोल सामान पाठवावे तर येथून तूर्त धाडता न ये. तैसा प्रकार तेथील. आपणच तेथील बंदोबस्त करून पुढे जावे. येवसी पूर्वी सरकारचे पत्र पाठविले होते. पत्रावर मजकूर काये ?

आपणच बंदोबस्त करतील. परंतु आज्ञा आसावी म्हणोन माघेच पाठविले. आधी उरपाडचा आमल बसऊन द्यावा आणि किरकोल कामे तेथील मामलेदार सागतील ती करून द्यावी. येथील मजकूर येथास्थित आहे. चिंता नाही. परभार रा। भिवराव आबा लिहीत आसतीलच. आपण पत्र लिहीत जावे. तेणे करून संतोष आहे. विशेष काय लिहीणे लोभ कीजे हे विनती.

¶*Shivaji Vithal Vinchurkar to Naro Anand Keskar, the Peshwa's officer in Khandesh : details of the movements of the Scindia and Holkar and their forces.*

---

*No. 67*] [*12-12-1774*

श्री

राजश्री नारो आपाजी स्वामी गोसावी यासी विनंती उपरी. तीर्थस्वरूपाचा पलोन जावयाचा मनसुबा आहे. त्याजब(राबर) * * * (रा)मचंद्र याचा वगैरे जावयाचा मजकूर आहे. सदासिव रामचंद्र याची व हरिपंत भिडे वगैरे याची मुले माणसे पुण्यात आहेत; ती हे पलाल्यावर दुसरे जागा पाठवावी लागतील. त्यास मुला माणसाची बंदोबस्ती चांगली राखणे. मागाहून आज्ञा होईल त्याजप्रा। रवानगी करणे. जाणिजे. छ ८ सवाल सुा। खमस सबैन मया व अलफ * हे विनंती.

¶*Sakharam Bapu to Naro Appaji, warning him against Sadashiv Ramchandra's family running away from Poona.*

---

*No. 68*] [*15-12-1774*

पौ छ २० सवाल

मु।। कातळेसावळे (?)

श्री

**तीर्थस्वरूप राजश्री मामा वडिलाचे सेवेसी.**

आपत्ये जैवंतरायाने सास्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षम ता। छ ११ सवाल मुकाम जाबी प्रा। सोनगीर खानदेश येथास्थित असे. विशेष. वडिलाकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नाही; सविस्तर ल्याहावे. इकडील वर्तमान तर, श्रीमंतास उभयता सरदार घेऊन आले होते; परंतु फिरोन श्रीमंताचे बुधीस काये विपर्यास काये जाला हे न कले. श्रीमंत पलोन गेले. नरमदेपलीकडे गेले. आम्हास साठी कोसाचे अंतर आहे. दरमजल बारा कोसाची मजल

---

* Last two words in Sakharam Bapu's hand.

करीतच आहोंत. सिंदे होळकर आम्हापासून तिसा कोसाचे अंतऱ्याने पुढे आहेत. सडी फौजहि दाहापंधरा हजार भरणा आहे. श्रीमंत बापू नाना आवरंगाबादेनजीक आहेत. नवाबाच्या त्याच्या भेटी होणार. आम्हाबराबर धोस्या आहे. आम्हास हरिपंततात्याजवळ येऊन चार पांच रोज जाले. तीर्थस्वरूप आबा व चिरंजीव रावजी आपा राज्याबाबा आन्याबा ऐसे बापूसमागमे आहेत. सात तोफा आम्ही बराबर आणिल्या आहेत. वरकड मागे आहेत. घरची सर्व सुखरूप आहेत. सदैव पत्र पा। आज्ञा करावी. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*Jaivantrao informs some Mama that Raghunathrao has crossed the Nurbudda and that he is separated from the writer by a distance of 60 kosas. News about Bapu and Nana, who were near Aurangabad, and also about Haripant is given by the writer.*

---

*No. 69*] [*16-12-1774*

पो। छ १३ सवाल
सु॥ खमस

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी.

पोष्य रामराव नारायण देशमुख कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागाईत छ १२ सवालपर्यंत यथास्थित असे विशेष. ठाणे साष्टी येथील बेटांत इंग्रेज व फिरंगी दोन हजार फौजेनिसी दारुगोल्याचे सरजामसुधां येऊन दाखल जाला आहे म्हणोन वर्तमान कळले. त्यावरून शेवेसी लिहिले आहे. पकी बातमी आणावयास माणसे रवाना केली आहेत. तथ्य वर्तमान कळल्यावर शेवेसी लेहून पाठऊं. दोहो तिहीकडील बातम्या आल्यावरून तो। किले राजमाची येथील किल्याचा बंदोबस्त राखून कुमकेस लोक रवाना केले. इंग्रजाचे लोक टापूत फार उतरल्याची बातमी आहे. यास्तव मातबर कुमक असावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Ramrao Narayan Deshmukh informs the Peshwa of the arrival of British forces against the fort of Thana.*

No. 70] [16-12-1774

पौ छ १९ सवाल सन खमस
सबैन मार्गसीरष सा घटका रात्र.

श्री

राजश्री नारो आपाजी स्वामीचे ( सेवेसी ).

विनंती उपरी. पत्र पाठविले प्रविष्ट जाले. तामस माष्टिन यास सुरतेचे जनराली सांगावयाबदल मुंबईचे जनरालानी बोलाऊन नेले. स्वारीतून जाबसाल आणवितो मग जाणे असें यास म्हणत असतां लौकर गेले पाहिजे म्हणून म्हणाले आणि गेले. येविसीचा मजकूर विस्तारे लिहि * * त्याणी आपला माचालेन (?) (भाचा लेन ?) पुणियात ठेविला. तो येक दोन मजला त्यास पोह्चवावयास गेला होता. तों फिरून माघारें आला की काये ते लिहिणें. सुरतेस सरकारचा अंमल आहे. त्यास नरोतम किशोरदास याणी तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब याजकडून पत्रे आणून दिकत केली आहे; येविसी तामस माष्टिन यास व राजश्री नारो आनंदराव केसकर यास पत्रें पाठविलीं आहेत. तीं नारो आनंदराव याजकडे रवाना करणें. ते तामस माष्टिन (सुर) तेस आल्यावरी त्याचें पत्र त्याजकडे पाठवितील. जाणिजे छ १२ सवाल सु॥ खमस सबैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे. नरोतमदास सुरतेस गेला असिलियास, तामस माष्टिन यास तेथून लेहून पाठ(वणे). (नरो) तम किशोरदासास धरून सरकारात पाठ * त ते करणें. जाणिजे * विनंती.

¶*Sakharam Bapu asks Naro Appaji to forward letters to Naro Anandrao Keskar for Thomas Mostyn.*

---

No. 71] [1774-75

श्री

यादी तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब याचे समागमे मंडली गेली आहे. त्यांची मुलेमाणसे किलेहाय येथे अटकेत ठेवावयासी पाठविली. सुरु खमस सबैन मया व अलफ

१ सदाशिव रामचंद्र याची स्त्री व पुत्र किले तोरण्यांवर राजश्री पंतसचीव याजकडे.

१ हरी रघुनाथ भिडे यांची स्त्री व सासू व कन्या व मेहुणा आबाजी आपाजी किले पाल उर्फ सरसगड येथे.

१ किले सिहीगडावर.

१ रामचंद्र विठल नि।। चिटणीस याची माणसे.
१ सखाराम हरी याची आई बायका मारनिलेच्या पूर्वीच
पलोन मुंबईस गेल्या. आई आहे ती किले मारी ठेविली.
१ मल्हार येसवंतराव याची बाइको व मुले.
१ लक्ष्मण आपाजी नातू याचा पुत्र.
४

---

१ बच्यार्जा बलाल काणे यास किले चंदन नि।। शामराव जगजीवन येथे.
१ प्रताप चोपदार याची बाइको व बाप व आई मिळोंन तीन आसामी
किले घनगडावर:
५
४ तालुकदारास सनदा, मुले माणसे अटकेत ठेवावयाविसी लिहिल्या.
१ तालुके रत्नागिरी नि।। महिपतराव कृष्ण.
१ गणेश विठल त्रिवर्ग बंधु याची माणसे.
१ आपा व गोपाल व भास्कर लिमया यांच्या बाइका.
१ बालकृष्ण व माहादेव व कृष्णा करमरकर याच्या बाइका.
१ बाबू भागवत.
१ भिकू गोडबाला.
१ अंताजी नारायण पराजपे.
१ रावोबा बेहरा.
७

---

१ माहादेव केशव गोगाटा यांची * * * * * (पुढें फाटलें)

[बंदाची दुसरी बाजू]

किले मिरगडावर

१ बाबूराव बलाल काणे याची माणसे चिमाजी माणकर प्रांत राजपूर
याजकडे.
१ तालुके त्रिंबक नि।। नारो माहादेव
१ रामचंद्र नरसी तुलपुला
१ जगजीवन पवार
२

---

४

पेसजी किल्यांवर ठेविली त्याप्रोच अटकेत आहेत ते.

१ खरगासिंग याची बाइको सिवनेरीवरी.
१ तुळाजी पवार याची माणसे कोरीगडावर.
१ रामकृष्ण कासीद याची बाइको चाकणेस
१ छट्टू फरास याची बाइको चाकणेस
१ आबाजी माहादेव याची धाकटी बाइको दौलताबादेवर
१ राजाराम गोविंद याची माणसे नगरास आहेत.
१ सिदोजी नरसिंगराव याची बाइको व राख लोहगडावर
१ मल्हारी गांत (?) याची रायगडाव(र)

८

सदरहू आसामीची किल्यावर माणसे आहेत सा। दखलबद

१ सिदोजी नरसिंगराव याचा लेक व बाइको येथे आहेत तेहि किल्यावर पाठवितो.

१०

¶*The paper mentions some of the accomplices of Raghoba and the punishment which they met. The forts on which they were kept in confinement are also mentioned.*

---

*No. 72*] [*5-1-1775*

**श्री**

**राजश्री नारो आपाजी स्वामी गो।**

विनंती उपरी. इकडील वर्तमान तर राजश्री हरी बलाल व उभयता सरदाराची भेटी उजनीपलीकडे दोन मजलीवर जाहली. तीर्थरूप उजनी पलिकडे जाऊन गुजराथ प्रांत बडोद्याकडे जावयाचा रोख धरला आहे. त्याचे पाठीवर हरी बलाल सरदारसुधा आहेत. पाठलाग करावयास चुकत नाही. मागाहून होईल वर्तमान लेहून पाठविले जाईल. आम्ही व नवाब येका दो दिवसी बराणपुरानजीक जाऊ. तेथे गेल्यावर नवाब आपले कार्यास जातील. आम्हीहि देसी लौकरच येऊ. आल्यानंतर आम्हाबराबरची फौज साष्टीचे मसलतीस रवाना होईल. जाणिजे छ २ जिलकाद सु॥ (खमस) सबैन मया व अलफ. फौज लौकरच रवाना होईल. बहुत काये लिहिणें हे विनंती.

¶*Sakharam Bapu to Naro Appaji, giving news of Dadasaheb's movements and himself offering to return soon from Burhanpur.*

*No. 73]* *[7-1-1775*

**श्री**

**राजश्री रामचंद्रराव नारायेण व आपाजी रामचद्र गो.**

सुा खमस सबैन मया व अलफ तुम्हास जाऊन च्यार पाच रोज जाले. तेथे पोहोचून बोलण्याचा प्रकार जालाच असेल. त्यास सविस्तर अर्थ समक्ष तुम्हास आज्ञापिले आहेत. तंरी कोणे गोष्टीचा ळडा पडो न देतां तयारींच करऊन सरंजाम बाहेर काढवणे. मसलतीस आवधी राहिलीच नाही. फितुरियाची फौज या रोखे येत आहे येसी बातमी आली. राजश्री गोविंदराव गायेकवाड याची फौज भारी आहे व सरकारची (अशा) दोन फौजा येकत्र जाल्या. आथःपर फितुरियाचा मुजाका नाही. ळढावयाचीच मसलत. दुसरा अर्थ नाही. यास्तव वख्तसीर इंग्रजाकडी[ल] सरंजाम पोहोचावा हे उचित आहे. अथःपर येक घडीचा विलंब नसावा. बोलण्याचे प्रकार काही बाकी ठेविले नाहीत. जाबसाल न्यावयाचा अर्थ राहिला नाही. ऐवजाचे संकट, तो अर्थ तुम्हास समजोन सांगितलाच आहे. त्याप्रो करोन जमेत घेऊनच येणे. जाणिजे छ ४ जिलकाद आज्ञाप्रमाण. शंभर खंडी दारू व दाहा खंडी सिसे याचे प्रयोजन आहे. त्यास भडोचेस मिळेसें असिल्यास सुरतकर इंग्रजास सांगोन, त्याचे पत्र भडोचकरासी सदरहूप्रो दारू सिसे विकत देणे म्हणोन घेऊन पाठवणे. भडोचेस सोय नसलियास सुरतेसच ठीक करोन लेहून पाठवणे, म्हणजे खरेदी करून आणविलें जाईल. छ मजकुरी ऐवजाची वोढ घेणार नाहीत. कदाचित ओढ घेतली तरी ऐवजाची तरतूद सुरतचे अमलाचे ऐवजी आथवा हरयेक ऐवजी स्रो लाऊन देणे. त्याप्रो वराता पाठऊ. तूर्त दारू व सिसे पोहचे ऐसे करणे छ. मजकूर

लेखना वधि

¶*From here is the hand of Raghoba, who writes this letter to his agents at Surat to procure gunpowder through the British.*

---

*No. 74]* *[13-1-1775*

पो छ १३ जिलकाद.

खमस.

**श्री**

सेवेसी साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे. पेसजी खुसर्कीचे मार्गी कल्याणास च्यार पत्रे पाठविली व दादोपत यांचे सोबतीचे माणसाबराबर एक पत्र रवाना

केले. ती पावली न पावली हे कळले नाहीं. हली तीन लाखोटे त्रिंबक नाईक व खुशाल उदमी नि॥ पांडु लकडे याचे स्वाधीन केले. मारनिले गुंत्यामुळें न गेले म्हणोन आज हे चौथे पत्र त्याचेच समागमे सादर केले असे की, इंग्रेज काल साष्टीस जातेसमइ बोलले ऐसीजे "श्रीमंत राजश्री दादासाहेब धनी नव्हत; तरी आज एकवर्ष पावेतो कारभारी याही दरब्यांचा व मुलकांचा नाश करून फौज बाळगून पाठीमाघारे लागले. केले काय? धरून बंदीस का न ठेविले? सारंष तेथे ईश्वरी तेज आहे म्हणूनच काहीच ह * * * नाही. ऐशास ते धनी व हे चाकर तेव्हा याचा हात त्याजवर कसा चालतो? सांप्रत सावकारी बातमी आहे की, श्रीमंत तीनसे स्वारानसी वाडोद्रास दाखल जाले. मागाहून सा हजार फौजानसी राजश्री गोपाळराव बरवे त्यास सामील येतात. हे वर्तमान खंबाईताहून सुरतेस आले. तेथून मुंबईस प्रविष्ट जाले. वसई मागेपुढे आमचीच आहे. निमित्य कीं, घोडबंदर व धारावी मजबूत केल्याने वसईचा किला कसा दुसरेयाचे हाती राहतो? वसईहून एक दोन तोफाचे गोळे धारावीवर मारले ते लागू जाले नाहीं. धारावीहून एकच गोळा मारला तो जाऊन किल्यात पडला" याप्रमाणे बोलत होते. इतुके लस्कर आले आहे व येत जाते म्हणोन लोक अफवा, तरी "सारी पेशव्याई उलटून पडेना का साष्टी व उरण आमचे हातातून जाणार नाही. साष्टी व उरण सोडून दुसरे जागांचा सलुक करितील त्यास आम्ही सिध आहो," ऐसेहि बोलले. त्यांस आम्ही जाबसाल घटे तसा करावा, तरी समई नाही. पेचात आहो. सर्वास आश्चिर्य वाटले आहे की, संपदा काहींच नसता इतुका दाब धरितात व मगरुबीच्या गोष्टी सांगतात हे काय? ऐशांत च्यार पांचा हजार माणूस साष्टीस उतरून पडल्यास धारावी घोडबंदर वानरें कुरले चेदणीचे बंदर बंद केल्यास अगदी सापडून जातील. वारंवार किती लिहावे! राजश्री अनंद राव सुभेदार व हवालदार यांची काडीमात्र चिंता न करावी. जरी हला केला तरी चिंता नाही. जनराल व टेलर व एक दोन साबतीचे इग्रेज काल साष्टीस गेले आहेत. सा सात रोजीं फिरुन येणार. इतक्यांत जाले त जाले. मागां च्यारसे माणूस टोपीकर साष्टी * * * * होते. पैकीं शंभर माणूस आरमारावर चढविले व दोनसे माणूस फिरून साष्टीस गेले. कळावे आम्हाविसी काय आज्ञा ती करावी. निधानी मुबईहून हर कोठे निघोन जाईन. रवाना छ १० माहे जिलकाद, सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*News-letter from Bombay, giving an account of the movements of the British.*

No. 75] [22-1-1775

पौ छ २४ जिलकाद सन
खमस सबैन पौष मास.

श्री

शेवेसी त्रिंबक विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल ताा छ १९ जिलकाद येक प्रहर दिवस प्रात:कालचा मुाा अंतुरली पाा येदलाबाद तापी दक्षणतीर यथास्थित आसे विशेष. काल बराणपुराहून कूच होऊन सात कोश या मुकामी आले. आज येथून कूच होऊन येदलाबादे पुढे दोन कोश मुाा आहे. कासारबारीचे रोखे चालले. शुक्रवार छ १७ जिलकादी नवाब निजाअली-खान सरकारचे डेरियास आले, भोजने जाहाली. प्रहर सा घटकापर्यंत बोलणे बहुत समारंभे जाहाले. दुसरे दिवसी धवशे खासे डेरियास आले. नवाब, धवशे अलजपूरचे सुमारे जाणार. श्रीमंत बडोद्यास आहेत. राजश्री हरिपंत तात्या फौज-सुधा व सिंदे होलकर ऐसे चांपानेरावर बडोद्याहून सतरा आठरा कोशाचे अंतरे आहे. या उपरी पाहावे. डांकेचे कागद पुण्यास येथून जातात त्यास फार दिवस लागतात म्हणोन तीर्थस्वरूप राजश्री बाळाजीपंत तात्याही लिाा. यैशास लस्कराचा रोख येकच नाही. थालनेरपर्यंत नीट आले. तेथून तोरखेडे-याकडे चाळीस कोश पश्चमेकडे गेले; तिकडून बराणपुराकडे आले. तेव्हा डाकेस बहुत हेलपडे पडत चालले. ज्या रोखे चालिले त्या रोखे डाक बसवीत आणावी तो दुसरा रोख होतो. तेव्हा फिरऊन दुसरे रोखे बसवावी असी घालमेल कासार-बारीचे घाटापासून होऊ लागली यामुळे कागदास दिवसगत लागते. ये विसी श्रीमंतासहि येथे विनंती केली. परंतु स्वारीचे डोला पाो चालावे लागले. येणे करून पत्रास हेलपटे फार पडले. आलीकडे अजंठ्याकडून डाक बसविल्यापासून पुण्याची पत्रे साडे च्यार दिवसी येत होती. त्याजवर आता कूच जाहाले या-मुळे डाकेस फेर पडत जाईल. आतां कासारबारीनेच डाक पहिली आहे तीच चालती करावी लागते आसे आहे. याजमुळे दीसगत लागते. कळावे बहुत काये लिहिणे लोभ करीत असावे हे विनंती.

¶*Trimbak Vishvanath, a clerk, sends news to Poona about the movements of the Karbharis and those of Raghoba.*

No. 76] [26-4-1775

मेस्तर शाहाबाफियेत बाशद रफअत पन्हा खसूसियेत व मवालात (?) दस्तगाहा मजकुर आंकी सरकारचे मुत्छदी फौज बुनगेसुधा व गोविंदराव गायेकवाड सेनाखासखेल समसेरबाहादर पालणपुरचे तालुकियात होते. त्यास हुजुर यावयास राहाचा खतरा फितुरीयाचे फौजेमुळे होता. परंतु सरकारचे मुत्छदियानी निकडीने साठ कोसाची दौड करून फौज व बुणगेसुधा छ १७ सफरी हुजूर येऊन पोहचले. सेनाखासखेलहि येक दोन रोजानी मागाहून आले. त्याउपरी खंबाइताहून दोन कुचे करोन साबरमतीचे पाण्यावरी आलो. फितुरियांस तीन कोसाची तफावत राहिली होती, त्यास फितुरी सात आठ कोस माघारे सरोन गेले. या उपरी त्याचे पिछावरी जात आसो. पुढे अमलात येईल ते लिहून पाठविले जाईल. रा छ २९ सफर. ज्यादा काय लिहिणे.

¶*News-letter from Surat about the movements of Govindrao Gaikwad.*

---

No. 77] [30-4-1775

श्री

श्रीमंत राजश्री बापू
स्वामीचे सेवेसीं

विनंती सेवक नारो गणेश कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना. येथील कुशल तागायत छ २९ माहे सफर मुकाम ठाणें आंकलेस्वर येथास्थित असो विशेष. स्वामीकडून मी आलियातागायत कांहीं सेवकाचा सांभाल न जाहला. यैसें नसावें. सदैव पत्रीं परामर्ष सेवकाचा करीत जावा. यानंतर इकडील वर्तमान तर, राजश्री हरिपंत तात्याकडील छ मजकुरीं बातमी आली जे, राजश्री गोविंदराव गायकवाड व मानाजी फाकडा व खंडेराव गायकवाड हे श्रीमंत दादा साहेब यांस जाऊन मिळाले व तात्यानीहि आपली फौज सडी करून बुनगें सारें आमदाबादेकडे लाऊन दिल्हे. याप्रमाणें बातमी आली आहे, ती सेवेसीं लिहिली आहे, त्याजवरून कळेल. . दुसरें आपण राजश्री नारो अनंदराव याजकडे वरात परगणे अंकलेस्वर व परगणे हेसोट येथील पाठविली कीं, इंग्रजाचा यैवज न देणें. नारोपंताकडे देणें. म्हणून पत्री आज्ञा व सनद यैसी पाठविली. त्यास इंग्रजानी साल मजकूरचा वसूल जमाबंदीचे वेळेसच वसूल करून घेतला. बाकी पो मारकडे कांहीं राहिली नाहीं. इग्रजांची बाकी दिल्ही म्हणून दोन्ही परगणेचा बचाव जाहाला. नाहींतर उरफड व आमाद व जंबुसर

येथें जैसे इंग्रजानें बेचिराख तिन्ही परगणे जाहाले तैसेहि ह्या परगण्याची गत होती. आजपर्यंत तात्याचे उपद्रव न जाहला. पुढें काये होईल तें पहावें. आज पावेतो सरकारांत व राजश्री आनंदराव गोपाळ व राजश्री नारो अनंदराव यास रुपये हजार येकून पावणे दोन लाख रुपये दिल्हे. इंग्रजाचे मोंगलाचे भडोज-कराचे अठावीस हजार तीस हजार महाल मजकूर वगैरे सनदी धामधुमीमुळें खर्च माजी आमलदारसुधां जाहाला साहजार......इजाफांचे पडेल. परगणेयांत बाकी राहूं दिली नाहीं, लस्करचा उपद्रव लिहितां पुरवत नाहीं. इंग्रज समीप. इतके असून सारेयासी सल्लख राखून परगणे याचे लावणीचें काम चालविलें. जर करितां लस्करानें लुटलें तर लावणी कलतच आहे. त्यास राजश्री नारो आनंदराव व राजश्री गंगाधरराव रास्ते यास पत्र पाठवावें कीं, दोनी परगणेयास उपद्रव लागों न देणें. इंग्रज उपद्रव करील तर पारपत्य करणें म्हणोन पत्रें पाठवणार स्वामी समर्थ आहेत. दोनी परगणे रस्त्यावर पडिले आहे. सेवेसीं विनंती पत्रें पाठविती, परंतु कृपापत्राची आज्ञा होत नाहीं. शेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Naro Ganesh to Sakharam Bapu, giving news from Ankleswar of the movements of Tukoji Holkar.*

---

*No. 78*] [*7-5-1775*

श्री

राजश्री जनार्दन आपाजी गोसावी यांसी.

सुरु खमस सबैन मया व अलफ, जिवाजी रघुनाथ याचीं पत्रें आलीं. त्यांत रा। मुधोजी भोंसले यांचा संदर्भ लागला होता याकरता जाबीतजंग पुढें भोसल्या-कडे गेले. रुकनुतदौला यांस छ २६ सफरी दगा होऊन मारले गेले; या प्रो। लिहिले आहे, व नबाबाचीहि पत्रें आलीं. त्यांत रुकनुतदौला मारले गेले, परंतु परस्परे इमान प्रमाण करार आहेत तेच काईम आहेत. दुसरा अर्थ नाहीं. हें वर्तमान तुम्हास कलावें म्हणोन लिहिलें आहे. जाणिजे छ ६ राावल.

लेखनसीमा.

¶*Nana Fadnis—all in his hand—to Janardan Appaji, communicating news of Rukn-ud-dowla having been killed.*

No. 79] [28-5-1775

श्रीगजानन

पुा श्रीमंत राजश्री तात्या
स्वामीचे सेवेसी.

विज्ञापना. श्रीमंताचे लस्करातील वर्तमान काल च्यार घटका रात्रीस माणूस आले त्याणे सांगितले की मुकाम प्रो कोइली बडोदियानजिक च्यार कोस इंग्रजाने हरिपंत भिडां यांजवर लटकेच निमित्य ठेऊन ठार केला. दोहा कुसीत बरचीची फले बदुकीचे तोंडावर (बा) दली असता ते दोहींकडे च्यार फली क(रू)न मारिले. श्रीमंतानी इंग्रेजास मना करून लागले तो इंग्रज बहुतच बेकैदी बोलो लागला. दक्षेणी फौज गायेकवाड व फाडके (फाडके?) यार्ची खर्चाची बहुतच आबल. राजश्री गोविंदराव गायेकवाड सांप्रत आठ पांच दिवसांत बहुतच दिलगीर आहेत. आपल्याकडे यावयाचा मार्ग आपसमधे म्हणतात. श्रीमंत इंग्रेजाचे वर्तणुकीचा विचार दिवसे दिवस पाहून बहुतच पस्तायांत आहेत. इंग्रजाने दक्षणी लोकास सांगितले की तुम्ही आम्ही भडोजस जाहून तुम्हास राहावयाची सोय न पडे, तरी रेवा पार करून देईन किंवा राहिल्यास आहा यांप्रो आसावे. सारोश टोपी-कराचा मतलब श्रीमंतास घेऊन भडोज नजीक करावी. याप्रो सविस्तर वर्तमान त्याचे लस्करातील त्याजकडील बारगीर रुसकत होऊन आला त्याणे सविस्तर सांगितले. सारोश गुजराथी सिबंदी व दक्षणी लोक आठ पाच दिवसात तारातीर आपले आपण होतात; आणि परवाचे लढाईने बहुत धासियेत त्याणे खादली असे. काल खंबायेतेस तोफा जाल्या. येक इंग्रेजे नामी माणुस खड्याचे लढाईने जखमी जाहाला होता, तो कांल मृत्यं पावला. त्याजकडे दस्तुर का लौकिकाचा माणु(स) त्याचे जातीचा मृत्य पावल्यास पाच सात तोफाची सरबती करावी याप्रो वर्तमान आल आसे. स्वामीस कलावे म्हणोन आइकिले वर्तमान लिहिले असे; हे विज्ञापि.

¶*The writer (Vamanrao Patwardhan?) to Haripant, giving details of the movements and plans of the British.*

---

No. 80] [13-6-1775

श्रीमल्हार

राजश्री गणेशपंत नाना व रामचंद्र दाजीस साा नमस्कार पावणे.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री त्रिंबकपंत आबा स्वामीचे सेवेसी. सेवक सिवराम गोपाल कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरि. येथील कुशल

ताा जेष्ट शु १९ मंगलवार मुकाम भडोच जाणून स्वकीये कुशल लेखन करावें विशेष. सांप्रत आपल्याकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तर तपसीलवार ल्याहावे. यानंतर आम्हाकडील वर्तमान तर श्रीमंतांचा मुकाम येथेच होता व कारभारी याजकडील फौज बावाप्यारीयाचे घाटे उतरावयास गेली. त्यास श्रीमंतांनी येथून कूच करून बावाप्यारियास गेले. तेव्हां कारभारी याजकडील फौज रेवेस पार नाहीं सबब तापे करून उतरत होती. दाहापाच हजार फौज व बुणगे येसी उतरत होती तो श्रीमंताचा मुकाम गेला. पाणियांत उतरत होती तिजवर तोफा डागल्यां. त्या दशतीनें घोडी व माणसे दोन तीनसे वाहून गेली. राजश्री हरीपंत वगैरे फौज जमावनसी उभी होती. चार घटिका वाट पाहून डभईकडे गेली. श्रीमंतानी शु १४ कूच करून त्याजवर गेले येसे वर्तमान असे. चिरंजीव भाऊ लग्नाकरितां नंदुरेबारेस गेला आहे. त्यास येथपरियेत सुरक्षित आला पाहिजे. सबब राजश्री गोविंदपंत आनासहि पत्रे लिहिले आहे व आपणहि त्यांस सागून सुरक्षित पावेतो आर्थ करावा. आम्हीं श्नानसंध्या करून श्रीमंत आपले येजमानाचे अभिष्टचिंतन करून आसों. कलले पाहिजे. रिकामे दिवस कादितो. संकटात कर्जाच्या व पोटाच्या आहो. ईश्वर इच्छाप्रमाण. लोभ न टाकणे. हे विनंती.

सो त्रिबक जगन्नाथ व खंडो महिपत सा नमस्कार विनंती. लिहिले परिसोन लोभ कीजे हे विनंती.

¶*News-letter from Gujarat giving details of the movements of the forces of Haripant returning for cantonment.*

---

*No. 81*] [*8-7-1775*

पो छ १२ जौवल.

**श्री**

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री नारोपंत स्वामीचे शेवेसी पो मल्हार जगजीवन सां नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल ताा छ ९ जौवल मुा मौजे ठाणगाव नजीक पाटोदे वर्तमान यथास्थित जाणून स्वकीयें लिहीत असावें विशेष. राजश्री हरिपंततात्या नर्मदा उतरोन आलीकडे आले. तेथून खजिना न्यावयाकरिता दोन हजार स्वार रवाना केले ते तापी उतरून आलीकडे आले आहेत. ते खजिना घेऊन जाणार म्हणौन वर्तमान यैकिलें. त्यास आम्हीं गंगा उतरून प्रवरेवर गेलों. तेथें पुरंधराहून पत्र आले कीं हरिपंत नर्मदेवर आले आहेत, तुम्ही माघारे फिरोन खजिना घेऊन हरिपंताकडे जाणे म्हणौन पत्र आले.

त्यावरून आम्ही माघारे फिरोन, गंगा उतरून आलीकडे आलों. उदईक कूच करून गिर्नारबारीनजीक मुकाम करू. दरमजल टोंगोडे डावे टाकून तुमचे सुमारें येतों. तुम्ही खजिना पुढे लाऊन द्याल तरी न लावणे. आम्ही नजीक आल्यावर तुम्हास लिहून पाठऊ त्याप्रो खजिना आम्हाकडे पाठवणे. आम्ही तात्याकडे घेऊन जाऊ. कदाचित त्यास खजिन्याची निकड आहे याजकरिता रवाना कराल, तरी त्यापैकीं पंनास साठ हजार रुा आम्हाबरोबरील लोकास खर्चास घेणे म्हणौन पुरंधरची आज्ञा आली आहे. याजकरितां तितका ऐवज ठेऊन बाकी ऐवज रवाना करावा. इतक्यांत आम्ही तेथें येऊन पोहचतों. तात्या कोणत्या सुमारे तापी उतरणार हे लेहून पाठवावे. बहुत काये लिहिणें हे विनंती.

हो पत्री सदासिव अनंत करमरकर सां नमस्कार विनंति. राजश्री मलबा बापूनी लिा आहे त्याप्रो तिकडील बातमी आणून लौकर लेहून पो हे विनंति.

¶*Malharrao Panse to Naropant, giving news of the Peshwa's forces and their movements.*

---

*No. 82]* *[25-11-1775*

पो छ ८ सवाल.

श्री

श्रीमंत राजश्री तात्या स्वामींचे सेवेसी.

विनंती. सेवक नारो बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तां छ १ माहे सवाल पावेतो स्वामीचे कृपावलोकने करून मुा खांडवे वर्तमान येथास्तित असे. यानंतर मी शहरीहून निघालो ते खांडवियास आलो. येथे पाहता येंदा पाणीयाणे कमी केली ती स्वामीस विदित आहे. आणि मी तो सरकारांत यैवज बहुत दिल्हा आहे. परंतु मजला तो स्वामीसेवा करावी लागते. यास्तव जैसे पाहतो त्याप्रमाणे गावाची जमाबंदी करितो. येंदा सख्ती करून रयेतीपासून यैवज घेतलाच पाहिजे. यैसियास जेथवर सेवकाच्याने यैवज साधता साधेल तेथवर साधितो. विशेष इकडील वर्तमान तो राजश्री आबाजी माहादेव धारेस येऊन सिंदे यासी भेटलें व होळकर इंदुरास गेले आहेत यासहि भेटीस आले आहेत. परंतु सरदार याण्हीं काही आश्रा दिल्हा नाही. मग अंतस्त शर्[1]कटभेट असेल तर न कळे. बाह्यात्कार तो दिसत नाही, यैसे

---

[1] ऐक्याचा भेद.

आहे. राजाराम गोविंदहि घोडेयावरून पडिला. पायास जरब बहुत आली आहे. तेहि फिरोन धारेस गेले. याप्रमाणे इकडील वर्तमान असे. महमद इसब यास राजश्री केशोपंत घेऊन स्वामीपासी आले आहेत. त्यास त्याचे मुखअवलोकन करू नये आणि त्याजविसी कोण्ही विनंती करील तरी स्वामीनी मान्य न करावी. हा केवळ परिछिन स्वर्प आहे. जातीचा मुसलमान; याचा विश्वास अथःपर किमपि न करावा. स्वामीने यास येथेच विल्हेस लावावे. हा स्वामद्रोही आहे. यासी जीवाचे शाशन द्यावे. पुणेयास न पाठवावे. हा परम दुष्ट आहे. कदाचित पुणेयास पाठवावयाचा मनसबा जाला तर येक हात येक पाय येथे दूर करून मग पुढे पाठवावयाचे जाले तरी पाठवावा. स्वाम सूज्ञ आहेत. सेवकानी ल्याहावे यैसे नाही. स्वामी म्हणतील कीं, तुम्हास या गोष्टीचे काये म्हणोन आपण बोलतील. तरी, हा परम हरामखोर. याण्हे येक येक वचन सेवकाचे कारकुनाजवळ बोलला आहे ते कोठवर ल्याहावें. बोलीस कारकून नेले होते त्याजपासी नानाप्रकारें उणे शब्द बोलला ते पत्री लिहिता येत नाही. परंतु हा केवळ काळरूपी जाणोन सेवेसी विनंती लिहिली आहे. पुढे स्वामीचे मर्जीस येईल ते खरे. उतम विचार असेल तो सेवकानी खावंदास विनंती ल्याहावी. यास्तव सेवेसी विनंती लिहिली असे. वरकड श्रीमंत दादा-साहेब याजकडील काही वर्तमान आले असेल ते सेवकास ल्याहावयाची आज्ञा केली पाहिजे. मी सेवक स्वामीचे पदरीचा असे. + बहुत काये लिहिणे, हे विज्ञापना.

*¶Naro Ballal Bhuskute to Haripant Tatya, asking him to deal severely with Mahmad Isaf and not to spare him in any way. The arrival of Abaji Mahadeo at Dhar and the fall of Rajaram Govind from his horse are also communicated.*

---

*No. 83]* *[3-1-1776*

पो छ २१ जिल्काद

**श्रीविठलप्रा.**

**श्रीमंत राजश्री तात्यासाहेब साहेबाचे सेवेसी.**

अज्ञाधारक गंगाजी अव्हाड हुजरे कृतानेक सा। दंडवत. विज्ञापना येथील कुशल ता। पौश शु॥ १३ जाणोन स्वकीये कुशळलेखन आज्ञा केली पो. विशेष.

आपणाकडून छ २६ सवालची पत्रे आली ती पावली. श्रीमंत पाटालबावास व राजश्री नारो सिवदेव वगैरे यासी होती ती ज्याची त्यासी पावती केली. सरकारच्या पत्राचे उतर घेऊन पाठवितो. राजश्री गोपालपंत याणी ईकडील कचे वर्तमान लि॥ आहे त्यावरून कळो येईल. पाटील बावास देशी यावया-करिता बहुत प्रकारे ताकीद करीत अहो. होलकर व हे उभयेता येके मोहर्ते समागमे येणार. पौश वद्य १३ त्रयोदसीचे मोहर्त पाहिले आहे, कलावे. राजश्री गोपाल विस्वनाथ हे कोठे राहातात, पूर्वी कोणते कामावर होते, कोणाचे निसबतीचे येसे पतेवार लिहिणे म्हणोन आज्ञा; त्यासी राजश्री माहदाजी सिवजी गजरे, बाजीपंत परवतीवाले याचे मावस भाऊ, राजश्री विष्णु माहादेव, बाबा गजरे याचे चुलत भाऊ, यार्णी बाबाकडोन मामलती या प्रांतीं केल्या त्या बरोबर यासी रोजगार होता. उदेपूर मेवाडचे येथे पाटीलबावानी मोर्चे लाविले त्या समयी बाबानी माहादाजी सिवजीपासी राणाजीच्या मामलत फर्ड[१]च्याकरिता पाठविलें त्याच्या तोडजोडीस समागमे हे होते. आलिकडे माहादाजी सिवजीचा काल जाल्यावर त्याचे पुतणे आपाजी कृष्ण या जवल होते. हली गुदस्ता ते देसी गेले. श्रीमंत राजश्री गुरुजीबावा देसीहून पाटीलबावाकडे आले त्या समयी त्याचा यांचा पूर्वश्नेह व हली त्याजपासी आलिकडे कामकाजात व बातमी कितेक प्रकारची त्याचे खातरेदास्ती प्रमाणे कसोटीस उतरल्या उपरी प्रगणे नवलाई येथे पूर्वीची असामी गुरुजी बावाची आहे त्या कामाचा बंदोबस्त याजकडे सांगोन देसी गेले. हली साली ते आसामी पाटीलबावानी बंद केली. सबब हे येथे आले. रिकामेच आहेत. बारीक मोठी यासी बातमी लागती. हे केवल आपले दरबारलक्षाचेंच आहेत. यात तिलमात्र अंतर नाहीं. आमची पुर्ती खातरजमा आहे. कोणे गोष्टीविशी चिंता नाही. आपल्या कार्याचे आहेत. या नंतर राजश्री गोविंदराम यांचा पता लि॥ म्हणोन लि॥ त्यासी हे कदीम औरंगाबादकर अलीकडे पाच सात वर्षे सिद्याचे दरबारी चाकरी केलेली आहे : हली बेकार आहेत. कुटुंबसुधां येथे राहातात. पत्र लि॥ ते विचारून त्यासी लिहावी. सूचना मात्र लि॥ आहे. या उपरी आपली मर्जी. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

हेच राजश्री दिनकरराऊजी दादासाहेबाचे सेवेसी सा। दंडवत हमेशा पत्री सभाल करावा.

*¶Gangaji Avad (Nana Fadnis' hujrya with Mahadji) to Haripant Tatya, informing him of the intention of Scinde and Holkar to come to the Deccan.*

---

१ मामलतीचा फडशा करण्यासाठीं.

No. 84] [31-7-1776

पौ छ २३ जाखर श्रावण मास.

श्री

राजश्री सखारामपंत बापू गोसावी यासी.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो माहादजी सिंदे दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत आसिले पाहिजे विशेष. रा खंडेराव त्रिंबक पैठणकर यासी आवंतीहून बहिरजी ताकपीर याजकडे मेवाडांत रा केले होते. त्यास बहिरजी ताकपीर यानी बदनजर धरल्यावर मारनिलेनी उठोन यावे ते न आले. इकडून फौज व राजश्री सदासिव मल्हार मेवाडात पाठविल्यावर येऊन त्यास भेटून त्याजसमागमेच आले ते हाली समागमे आले आहेत. यास मारनिलेच्या घरावर चौक्या बसविल्या आसतील त्यास उठऊन मुलामनुष्यास कोणेविसी उपसर्ग न लागे ते करावे. रा छ १४ जाखर. + बहूत काये लिहिणे ! लोभ कीजे हे विनती.







¶*Mahadji Scinde to Sakharam Bapu, requesting release of Khanderao Trimbak.*

---

[2-1-1777

श्री

यादी राजश्री बालाजी जनार्दन फडनीस सु॥ सबासबैन मया व अलफ फौजेस संरजाम फौज बोली स्वार १५०० दर राऊती ३०९ रु. प्रो बेरीज ४५०००० रु. साडे चार लक्षाचे माहाल पेस्तर सालापासून लाऊन घ्यावे. माहालच्या बेरजा राजश्री सखाराम भगवंत याचे माहालाप्रो व माहालत्याप्रो लाऊन द्याव्या. सनदा माहालाच्या सालमजकुरी देवाव्या.

छ २१ जिलकाद सन सबा सबैन मार्गसीर्ष.

¶*The troops in the service of Balaji Janardan, their remuneration and the saranjam for their maintenance are given in this paper.*

*No. 85*] [*1-2-1777*

पा छ २८ जिल्हेज.

श्री

विज्ञापना छ २२ जिल्हेजी पाटीलबावा प्रा बीड येथे गुरूचे तकियापासी बसले होते. रात्रीं येक प्रहर रात्र जाली तेव्हां याचे वकिलांची किवा कोणाचीं पत्रें आली. मनुशें बीडचे वगैरे तमासबीन हजार दोन हजार मिळालें होतें. नाच सुरू जाला ते समयी पत्रें आली, ते आबा चिटणीस यानी व बाळारायानी वाचून दाखविली. तेच समयी रागा बहूत भरले. पत्रांत लिहिलें होतें की पसतीस लक्षे व्होळकराकडे वाजबी निघाले; तात्यानी नवा लक्षावर फैसला केला. दुसरें, विसाजी कृष्ण हिंदुस्थानांत बिदा करावे हें मानस बहुत करून तात्याचें व श्रीमंत बापूसाहेबाचे. हे यैकून बहूत रागें भरले की चिंता काये आहे ? विसाजीपंताचे व्होळकरसुधां डोकें कापून गडास पाठवीन तरच राणोजी सिंद्याचा बीजाकार. रेवापार जाऊ देईन तर सेत गुरुची. नाना प्रकारच्या सिव्या देऊ लागले. मग राणेखानाने मनुशे मजकडे पाठविले की तुम्ही राहुटीस जावें. आम्ही बिन्हाडास आलों. प्राथःकालीं बाळारायाकडे गेलो. बाळाराव म्हणाले की धोंडोपंत तात्यानी कंबर पुरती आम्हावर बांधली. पांच सात पत्रें आमची आलीं. आम्ही सत्ये मानले नाही. रात्रीं तिघा चवघाची त्याजपासीं खलबतांत बसनार त्यांची वगैरे आलीं, तेव्हां सत्ये भासलें. हे उमेद आम्हास तात्याची नवती. व्होळकरानी केले काये ? पळोन आले म्हणुन नक्षे केला की काये ? धोंडोपंत ! राज्ये बुडालें हें सत्य जणावें. माहादजीसारका सरदार हतचा गमावला. यानी मसलत केली. उभैतास येकत्र करून म्हणावें होतें की जैसा तोतयाचें पारपत्य केले तैसें हैदर नाईकाचें पारपत्ये करून मग जावें, हे कबूल करतेच. हिंदुस्थानचें मुतालकीचे सिके श्रीमंत मोठे रावसाहेबापासून आमचे. मधें श्रीमंत रावसाहेबीं च्यार महिने दिल्हे नवते तर आमची समाधानी व समाधानीची पत्रें पाठविलीं की तुमची तुम्हासच देऊ. विनंती केली की तात्याचा तुम्हांसी दुसरा विचार नाही. विसाजी कृष्णनी आपल्या कह्यांत असावें. मतलब प्रिथवीमधें आपण असावें नक्षे आपला. अर्जव सर्वत्रानी करावें. विशेष काये लिहूं ? बखाडा जाला यांची सला जे करणें ते करावी. स्वामीपासीं फौज आहे तिकडें यांचें सूत्र खिजमतगार कारकून कोणास न कळतां गेले. तेथील बंदोबस्त पका आसों द्यावा. हे म्हणतात की श्रीमंत नानासाहेब म्हणाले की पाटीलबावा तो मी आहें. त्यांचे फ * स्त * * * ये बरें ज्यांचे कुडे त्या * * * वर म्हणतात ह कितेक विस्तार काये लिहूं ? निळकंठ नाईक भावे छ २९ जिल्हेजी पुढे बिदा

केले. पांचवे दिवसीं पोहचावें. बाळाराव छ २६ रोजीं बिदा जाले. आबा चिटणीस उभैता परंतु आघाडीस पाव कोस राहतात. नागतळ्यापासुन बाळाराव गडास येतील. पाटीलबावा जांबगावाकडें जातील. जांबगावीहून बाहीरबुनगें वगैरे झाडून बिदा करावे सडी फौज मात्र असावी. पुढें बनेल तें करावें. छ २७ रोजीं खोंकरमोह गुरुचा गांव तेथे आले. प्रा बीड पूर्वेस नव कोस राहिलें. येथें गढीमधें तोफा आणिक ठेविल्या. तीनसें माणसें नेहेमीं असावीं हा बंदोबस्त केला. गढी बहुत चांगली मजबूत आहे. गढीमधें कांही वस्तभाव होती व आपणाजवळ त्यांतील * * स्त * (भा) व उजेनीस छ २८ जिल्हेजी (आपणा) समागमें पागा सिगजी नामे म्हणून पागेवाले तो समागमें दिल्हा. समागमे सावकार मंडळी त्यास ताकीद जाली की वस्तभाव उजेनीस पाठवावी. कार्याकारण जांबगावपावेतों आसों द्यावी. तेथून जें सांगणें ते सांगू. छ २७ जिल्हेजी कारकून सौवती मातुश्री बाईसाहेबाकडे गेला की मुलास घेऊन यावें. आम्ही चाकर आहों. बाजीरायाचा वौंश त्याजला घेऊन जें करणें तें करावें हा हि मनसुबा! त्रनकारनामकास नच द्यावा. यांचें त्यांचें येकचित्त हें खरें. कार्याकारण जे बोलणें ते बोलावें. हें वर्तमान आसल्यें नाही. इतकियावर मर्जी. हे बहुता कार्याच्या डौलांत आहेत. श्रीमंत नानासाहेब येकवचेनी. हे बटेबाज! श्रीमंत बापूसाहेबाकडें गोस्टी मात्र बोलतात, परंतु भये ठेवितात, कोणे समयीं काये करतील. यैकीलें वर्तमान सेवेसी ल्याहवें. विसाजीपंताची आवई हिंदुस्थानात पाठवावयाची यैकतो उतमच आहे. व्होळकर पुरते मायेंत घ्यावें. याजकडून ग्रहस्त येका दों दिवसां व्होळकराकडे बिदा होणार. यैकिलें वर्तमान ल्याहवें हे सला उतम आहे. परंतु विसाजीपंताचा परिनाम हे शुध्ध होऊ देणार नाहीत. चिंता काये. होळकर ते येके विचारे असले मग काये करतील ? तो मजकूर ठरलाच तर त्याचा तपसील पुढें लेहूं. सेवेसी श्रृत होये हे विज्ञप्ति.

¶*Naro Shivdeo to Haripant Phadke from the camp of Mahadji Scindia, who is described as having been extremely irritated on account of the alleged favours shewn to Tukoji Holkar. The letter is important as it illustrates the character of Mahadji.*

---

*No. 86*] [*5-2-1777*

**श्री.**

विज्ञापना छ २६ जिल्हेजी पाटीलबावा बिडीहुन कूच करून दोन कोस आले. खोंकरमोहो यांचे गुरूचा गांव आहे, तेथे एक दिवस राहून दुसरे दिवसीं जांब-

गांवास जावे. बाळाराव छ मजकुरी बिदां[1] जाले. हळु हळु सेवेसी येऊन पोहचतील. पाटीलबावा जोतलिंगाकडें जावयाचा मजकूर प्रस्तुत राहिला. सबब की वामनरायाची फौज बुडविली बाजीपंत आणा मावारें फिरले. आपण त्या प्रांती जांवे. येसाजी सिंदे वगैरे कोणाची गांठ पडली; मग मार्गे कैसें यावें; या करितां तिकडे जावयाचा मजकूर राहिला. नवाब बंदगान अलीकडें कारकून बिदा जाला. धौंसा वगैरे बखाडा करावा हे सला ठरली. खूळ मातबर दिसतें. इतकियावर पाहावें. धौंसाकडें कारकून एकनाथपंत वस्त्रें गेलीं की तुम्ही आम्ही एकत्र होऊन यांचें पारपत्ये करूं. भोसल्याकडें पत्रें गेलीं की मुसदी केवळ लबाडी करूं लागले. तुम्ही आम्ही यांचें पारपत्य करूं. राज्ये तुमचें आहेच. देवाजीपंत स्वामीकडे येणार. तिकडें निराळा कारकून गेला. जांबगावीहून बुनगे वगैरे उज्जेनीस बिदा करून आपण सडे व्हावे, फौज जमा करावी हे ठरलें इतकियावर पाहवें. ग्वालेरचे मोरचे उठले. गोहद्वाला आपले स्थळास गेला. मतलब हिंदुस्थानात नजफखाना-सिवाये मातबर आहे कोण ? पातशाहचे नजेफखानाचें चित शुद्ध नाहीं. श्रीमंताकडील वर्तमान कसकसें आहे हें कळत नाहीं. येथे नानाप्रकारच्या गोस्टी बोलतात. प्रस्तुत यांजला मोठे दुख झालें की मुतालकीचे सिके घ्यावे. असेरचा किला घ्यावा. बऱ्हाणपुर घ्यावे हे मानस दुसरे व्होळकर आपल्या बरोबरीनें असावे. मुसदिया [ पुढील बंद गहाळ ]

¶*Naro Shivdeo from Mahadji's camp to Nana Fadnis, communicates the irritation of Mahadji with the Barbhais. The letter is incomplete.*

---

*No. 87*] [*12-5-1777*

**श्री.**

राजश्री नाना स्वामीचे सेवेसी विनंती, उपरी. आपली निक्षूण अज्ञा व राजश्री बापूनी बहुत सांगितले व सरकारी काम यैसे जाणून फरासिसाकडील काम कबूल केले. छ ४ रोज सोमवारी फरासिसाचे डेरियास गेलो. काहींसे बोलणे जाले. दोन रोज पाऊस फार पडला. चिखल फार जाला. जाग्याची सोय नाही. माणसे दोनच्यार दुखण्या पडली. याजमुळे त्याची मर्जी बहुतच दिक. यापुढे त्यास बोलणे देखील सुचत नाही. आरबुज जात. किमपिहि इकडील जास्त समजत नाही. डेऱ्यात सर्व पाणी. मोठी फजिती जाली. आशाने आम्ही मरू, यैसे बोलू लागला. पुण्यास येण्याची जलदी केली. मग आम्ही

---

१ रवाना झाले.

त्याची खातरजमा केली की, हे दिवस केवल पाऊस नित्य लागावा यैसे नव्हत. पंधरा दिवस येथे राहावे. जाबसाल होऊन तुमचे बातशाहाचे पत्राची उतरे गेली म्हणजे तुम्हास पुण्यास नेऊ, यैसे सांगून खातरजमा केली. याप्रमाणे राजश्री बापूसहि सांगितले. उतम म्हणोन बोलिले. त्यास सुमेरसिंग आगर महमद इसफ दोहीतून येक हावेली यांस राहावयास नेमून असावी. सूचनार्थ विनंती असे. येथे किरकोली साहित्य लागले ते देविले. हाली आणखी जरूर पाहिजे. त्याची कलमबंदी अलाहिदा लिहिली त्याप्रा दो (चौ रोजात) साहित्य जरूर यावे, हे विनंती.

¶*The writer describes to Nana Fadnis the great hardships which the French envoy had to suffer on account of sudden downpour of rain. He was however prevailed upon by the writer to stay on for a fortnight. The residence of Mohmmad Isaf or Sumersing is suggested to be given for his stay. This Frenchman must be St. Lubin.*

---

*[19-7-1777*

पौा छ २७ जाखर.

**श्री.**

राजश्री हरी बलाल स्वामी गोसावी यासीं विनंती उपरी. तुम्हाकडे फौज मालमाकरीं चाकरीस आहे. त्यास कोणाचे राऊत किती आहेत हें समजले पाहिजे, याकरितां पेसजी तुम्ही गणती घेतली असेल; त्यापैकी हालीं तुम्हाजवल किती आहेत व देसीं किती आले व सरंजामी इतलाखी सिलेदार व पागेचे बारगीर तुम्हाजवल आसोन त्यांचे सरदार तेथें नाहीत कोण, व लोकांसुधा सरदार उठोन आले असतील व सरदार मात्र तेथे राहून लोक देसी आले, त्याची तपसीलवार याद हुजुर आणविली असे. तरी पत्र पावतांच सदरहु लिहिल्या प्रो नावनिसींवार याद लेहून सत्वर पाठवून देणे. जाणिजे छ १३ जमादिलाखर मुा समान सबैन मयां व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Sakharam Bapu to Haripant, asking detailed information about the army serving under him.*

580

No. 88] [11-1-1778

**श्री.**

**राजश्री हरीपंत स्वामीचे शेवेसी.**

विनंती उपर. नरसिंगराव धायगुडे सदासिव रामचंद्र यांचे घरी गेले होते, ते तुम्ही पाठविले होते की तेच होऊन गेले हे लिहून पाठवावे ; व तुम्ही करणार होतां त्याचें काये जालें व बिंबाजी भोसल्याकडील मजकूर विस्तारें लिहिलात त्याप्रमाणें मुधोजी भोसल्यास पत्रें पाठऊ. परंतु येसवंतराव नाईक निंबाळकर हे वणगोजी नाइकांचे बंधु, तेव्हा यास वर्तमान त्यांणी कळविलेंच असेल. तुम्ही वणगोजी नाईकास पुसावे व ह्या गोष्टी उगेच फौज ठेऊन जावें हे ठीक नाहीं असेहि भाव समजेसे बोलावें. मोरोबा बहुलाहून पुण्यास येणार. सावध असावे. येशवंतराव नाईकास नवाबानी चाकर ठेविले नाहीं; व इनामतनामा आला नाहीं. हे असते तर जिवाजीपंत लिहिते यांत गुंता नाहीं रा छ ११ (२१ ?) जिल्हेज हे विनंती.

¶*Nana Fadnis to Haripant (wholly autograph), asking the latter to be very cautious as Moroba was returning from Bahul to Poona.*

---

No. 89] [February 1778 ?

**श्री**

विज्ञापना होलकर काल येणार होते, त्यास विष्णुपंत आले नाही, या मुले न आले. मी काल सायंकाळी होलकराचे डेऱ्यास गेलो होतो. चार घटका बसलो. भाषण इकडील तिकडील फार जाले. त्यात हासील बोलणे की आमचे हिसेबचा फडशा लौकर करावा. आम्ही बोलिलो की फडशा होईल, परंतु किल्यावर बलाविले आहे, जावें. कितेक मसलतीच्या गोष्टी होणार. तेव्हा बोलिले कीं आम्हांस मसलत कशास पाहिजे ! जी मसलत कराल त्यांत आम्ही आहो. तेव्हां मीं म्हटले कीं सरदार मसलतगार तुम्ही आणि अशा गोष्टी का सांगतां ? त्याजवर उगेच राहिले. विष्णुपंत आज येणार आहेत. आले म्हणजे होलकरसह किल्यावर येतील. होलकरांचे मनातील भाव कीं दोन महिने जाहले. येक दिवस आम्हास सलामसलत पुसली नाही. बापू अगर नाना आमचे डेऱ्यास आले नाहीं. आमचा मान रक्षावा असे प्रकार मनांत आहेत. स्वामीची गांठ पडल्यावर बोलण्यांत साऱ्या गोष्टी येतील. येक चिठी होलकरास पाठवावी कीं

विष्णुपंत आलेच असतील आज तिसरे प्रहरी येणें. असी चिठी पाठवावी. जिवा-जीपंतासी पत्रें पाठविली ती पाहून पाठविली आहेत. भोजनोतर मी सेवेस येतो मग उतराची आज्ञा करावी हे विज्ञापना.

¶*Haripant Phadke (wholly autograph letter) to Nana Fadnis, explaining the attitude of Holkar who is said to have taken offence.*

---

*No. 90*] [*February 1778*]

श्री

राजश्री हरीपंत स्वामींचे सेवेसी.

विनंती उपर पुण्यांत राजकारणे घाटत होतीं त्याचेच बूट अलीकडे अधीक ऐकण्यांत येतात. राजकारणें होत आहेत यांत संदेह धरू नयें. नाइकासि चिट्ठी आली आहे कीं तुम्ही बहुळास येणें; ती मला त्याणी दाखविली. तेव्हां जवळहि आले आहेत. तुम्ही सावध फार राहावें. ग्रहणाचे दिवशीं सावधता फार असावी. फांकड्याचे गोटांत बातमी राखावी. होळकराचे गोटास जातां वाटे फार सावध असावें, फांकड्यास जपावें. रवाना मंदवार अवशीची सा (हा) घटका रात्र हें विनंती.

¶*Nana to Haripant (all in the writer's hand), asking him to be very cautious as some political affairs are developing at Poona. This must be the development of intrigues started by Morobadada against Nana Fadnis.*

---

*No. 91*] [*13-2-1778*]

श्री

राजश्री हरीपंत स्वामींचे सेवेसी.

विनंती उपरी. होळकराकडील ऐवजाविसीं बहुत प्रकारे लिहिले. ऐशास हें माझे मनांत येऊन अगोधरच होळकराकडे लिहिलें आहे. त्याचे घरचा कारभार सुस्त यास काय करावें. काम संधीचे. याच दिवसात नानाचे जाणे तिकडे जाले. बाळाराव आले; मार्गप्रतिक्षा करीत बसले आहेत. तुमच्या तर कंठीं प्राण आला; ईलाज नाहीं. होळकरास व नारोपंतास चिठ्या पाठविल्या आहेत. जल्द रवाना कराव्या, दादोपंत मैसाळकर आणवावे म्हणून लि॥. ते जेजूरीस आहेत. आज येथे आले. मुले माणसे घेऊन जेजुरीस आले. सध्या देव ब्राह्मण करून

परवाचे दिवसीं पुरंधरास येतो, म्हणोन गेले ते निश्चयरूप येतात. माणूस बरोबर दिल्हे आहे. तूर्त पुण्याहून निघाले या उपरी येथें येतील. फौजेत गलबल रुपयासाठीं फार जाली आहे. ईलाज नाहीं. रा छ १४ मोहरम हे विनंती.

¶*Sakharam Bapu (wholly autograph) to Haripant Phadke, explaining the critical position of affairs owing to Holkar's dilatoriness and Nana's absence from Poona.*

---

*No. 92*] [*15-2-1778*

**श्री**

राजश्री हरिपंत स्वामींचे सेवेसी विनंती. उपर, तुम्ही पत्रें छ १४ मोहरमचीं सांडणी स्वाराबराबर पाठविली ती पावली. होलकराकडील पैका न देणे असी सूचना वृधांचीं जाली म्हणोन तुम्हाजवळ शफतपूर्वक सांगितलेयाचा विस्तारे मजकूर लिहिला तो कलला. त्यास, चिंचवडाहून कूच करून इकडे येऊ लागलो तेव्हा बापूस पत्र पाठविले की, होलकरांचे डेऱ्यास गेलो, पैक्याची लौकर तरतूद करून देऊन हरिपंतांचे कूच करावें वगैरे थोरपणाच्या गोष्टी बोलिलों. आपणहि होलकरांस लिहून ऐवजाचा फडशा करवावा म्हणजे हरिपंत जातील. त्याचें उतर त्याणी बंदभर पाठपोठ लिहिले आहे. त्यांत येके ठिकाणी लिहिलें आहे कीं, हरिपंताची चव काही राहिली नाहीं. याउपर विचार करणे प्राप्त आहे. केवल नासलें आहे. आपण लौकर यावें, असें लिहिलें. तेव्हा, तुम्ही लिहिलेंत हे प्रमाण दिसते. दुसरे, बापूनी बालारायाचे बोलणे चालणें लिहिलें. त्यांत शेवटीं सारांश बालारायानी उतर केले कीं, नाना आलियावर काय बोलणें ते बोलू. बालारायाचेहि पत्र माहुलीस आलें कीं, काहीं दिवस लागत असेल तर मी येईन. त्याचे उत्तर पाठविले कीं, मीच लौकर येतो. दुसरे पत्र बापूचें फारच लांब आले. त्यांतील सारांश: होलकर जेजूरीस आले. कारभारी पुण्यात आहेत. ऐवजाची निशा व्हावी तें दिसत नाहीं. दादोपंत वाघोलकर मोरोबाचे घरी नाईकाचे मारफत गेले होते, असें हरिपंतानी लिहिले. चौहूकडून गलबल आहे. आपण परभारे पुरंधरास येतील किंवा पुण्यास जाल? कोल्हापूरचे बलावले. कृष्णराव पुण्यात आहेत, तेथेच आपणास भेटतील म्हणोन विस्तारें लिहिले. यांतहि पाहाता तुमचेच लिहिण्यास मिलते. असो. मीं पुण्याचवल आल्यावर पत्रेंच पाहावयांस पाहिजे तर पाठवीन. लिहितां लांब पडतें. शनवारी रात्रौ पुण्यांत ग्रहप्रवेशास मुहूर्तानें येणार. मग पुरंधरास जावयाचे. तुमची चव गेली. विचार करणें प्राप्त. तो काय विचार ते तेथें गेलियावर समजेल. तुम्ही

लिहिलें की, होलकरास व नारो गणेशास ऐवजाविसी चिठ्या पुढे पाठवाव्या. आपण लौकर यावें म्हणजे दबावाने पैका देतील. त्यास, तुमचें लिहिल्यावरून चिठ्या पाठविल्या आहेत. परंतु आंतून येवढा मातबर आश्रा न देण्याविसीं सांपडला; तेव्हा जरूर देतील! असों. खटपट करावी मीहि लौकरच येतो. वृधाचे मनात स्थाईभाव काय घोलतात ते मी पुरते जाणतो! असों. ईश्वरी इच्छा प्रमाण. कोल्हापुरकर भारी जाले. प्रतिनिधि कोठे नमुदांत येत नाही म्हणोन लिहिलें. त्यास, तुमचे विसाजीपंतांची पत्रें तर यावीं; तीं कां नाहींत? विसाजीपंत, प्रतिनिधि रामचंद्र गणेश, बाजीपंत येक जालियावर त्यांस संभालतीलसें दिसतें. परंतु तुमचें जाणे होते तर सहजांत काम होते. लिहून फल काय? पैक्यामुळे दौलतच गारत होते असें दिसतें. ईश्वरी इच्छा प्रमाण. कार्यसिध्धि जालियाचें पत्र तुम्हास मुजरत पाठविलें आहे ते पावलेंच असेल. रा। छ १६ मोहरम हे विनंती. तुमचें करणेंहि विचित्र आहे. कांही कोठे बोलता येत नाहीं. मूकत्व धरावें. होईल ते पाहावें. प्राप्त होईल ते भोगावे हा निश्चय आहे, हे विनंती. तुमचे पत्र बापूंचे पाहून माघारें पाठविलें आहे, हे विनंती. होल्करास व नारोपंतास चिठ्या पाठविल्या आहेत. पाहून बऱ्या असल्या तर परभारे लाखोटे करून पाठवाव्या अथवा खुल्या देणे तर द्याव्या, हे विनंती.

¶*The whole letter is in Nana Fadnis' hand and is addressed to Haripant Phadke, containing important reflections on the attitude of Sakharam Bapu and Mahadji and others. How the amity between Nana and Bapu was spoiled can be inferred from this account.*

---

*No. 93*] [*16-2-1778 ?*

श्री

राजश्री हरिपंत स्वामीचे सेवेसी विनंती. उपर, तुम्ही छ १७ मोहरमचे पत्र पाठविले ते पावलें. होलकराचे ऐवजाकरता राजश्री बापूस चिठ्या पाठविल्या व होल्करास पाठविल्या त्याचा उतरें आली ती पाठविली ती पाहिली. सा लक्ष घ्यावें, कूच करून जावें, तों हिसका पडला. यामुळें पत गेली, इलाज नाही. आपलें येणे लौकर व्हावें, त्याखेरीज परिणाम लागत नाही म्हणोन विस्तारें लिहिलें ते कल्लें. त्यास, चिठ्याची उतरें प्रतिउतरें पाहिली. यांत तर बरेंच लिहिलें आहे. परंतु होल्करांचे माध्यस्त तुम्ही. त्याचा विश्वासहि तुम्हावर. असें असता यावेस गेले. याचा इतला तुम्हास दिल्हा की नाही? नारोपंतास बोलाऊन निकाल पाडवावा. माझे येण्याचा गुंता या कामास काही दिसत नाही. उगेच

थोरपणाकरतां लिहितां; बरेंच आहे. तुमचें गोत्रघटित होळकरासी नारोपंतासी नसतें तर हे लिहिणें उचित होतें. असो. राजश्री सिवाजीपंत मिरजकर बापूकडे गेले होते. तेथील खुलासा त्यांस काय आढला याचें बारकाईने पुसोन लिहून पाठवावें. पत्रें सारी माघारी पाठविली आहेत. रा छ १८ मोहरम मु॥ कुसुर घाटावर येक पत्र जासूदजोडीबराबर पूर्वी मी तुम्हास पाठविलें ते पावलें की नाही? उतर आले नाही. त्यावर तुमचा सांडणीस्वार आला त्याचेंहि उतर गेले. बापूचे चिठ्यांत, याच समयांत नानाचे जाणें जालें त्यामुळे हिसका, असें भाव आहेत. ते थोरच आहेत. आम्ही कार्यास आल्यानें पाठीमागें अधिक कामें होत असावी, तटऊ नये असें असावें. याची परीक्षा बापूनी महिना पंधरा दिवस कोठे जाणें तर जावें. मागें काही तर पडू देतीं की काये? परंतु यांच्या कवाइतीच येक प्रकारच्या आहेत! बरेंच आहे. केले कर्म [भो]गावें! हे विनंती.

¶*Nana Fadnis to Haripant (wholly autograph), saying that he (the addressee) should himself have settled the affairs with Holker. The writer asks him to find out secretly as to what had come out of the interview between Bapu and Shiwajipant Mirajker. "Bapu should not have said that it was due to Nana's absence that you were put to great trouble," says the writer. Nana blames Bapu for such quibbling of words.*

---

*No. 94*] [*17-2-1778*

पौ छ १८ मोहरम
समान सबैन माघ.

**श्री**

सेवेसी विज्ञापना. स्वामीनीं पत्र पा तेथें आज्ञा कीं लस्करांत फितुऱ्याचे पारपत्य केलें. तेथील जड मोडली. करवीरचा आश्रा धरला होता; त्यास करवीरचे बंदोबस्तास सिंदे गेले आहेत. फौज भारी जमा जाली वडगांव वगैरे ठाणी घेतली. कोलापुरास लागले आहेत. येसाजी सिंद्यास दहशत मोठी बसली. बंदोबस्त लौकरच होईल. मालवणाकडील संधान फिके पडेल. कोणी या संधानांत आहेत ते ठिकाणीच राहतील. याउपरी लौकर उलटावयाचें व्हावें म्हणजे लोकांच्या गपा मोडतील, म्हणून आज्ञा केली. त्यास कोलापूरकरांचे पारपत्य जाले म्हणजे फार करून राजकारणे मोडतील हे खरे आहे, परंतु श्रीमंत दादासाहेब राजकारणे करितात ती हैदरखानाचे बळावर. दुसरे नाहीं. त्यास हैदरखानाचें पारपत्य जाल्याखेरीज कोणताही राजकारणाचा बंदोबस्त होत नाहीं. पैकेकरी आहे. लाख होन एकदांच एकाध्याकडे पाठवितो, त्यानें खुले

माजतात. यास्तव हैदरखानाचे पारपत्याची तरतूद करावी. सिंदे मोकळे जाल्यावर इकडे पाठवावे. लवकर उलटावयाची आज्ञा त्यास असेच घडावे म्हणून जाबीतजंगास निकड करीत गेलों ते कृष्णातीराहून कनकगिरीस यावयास एक महिना लागला असा प्रकार आहे. त्यांत होईल तें करीतच आहों. सेवे.ते श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Haripant to Nana Fadnis (wholly autograph), admitting that everything will be quiet when Kolhapurker is subjugated, but further suggests that it is with the support of Hyder that Dadasaheb was playing mischief. Haider has a big purse and advances huge amounts and creates trouble.*

---

*No. 95*] [*21-3-1778*

पौ छ २१ सफर

समान सबैन फाल्गून

**श्री**

सेवेसी जनार्दन आपाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना श्रीमंत मातुश्री काकूबाईस तुम्ही जाऊन विनंती करावी कीं पुरंधरास चलावे म्हणोन पत्री आज्ञा. आज्ञेप्रा विनंती केली. श्रीमंत मातुश्री काकूबाईनी पुरंधरास यावयाविषी साहित्याची आज्ञा केली.

किता

२५ उंट नफर, पांचसे स्वार विसाजी कृष्ण समागमे

२५ घोडी, आसावे.

२५ कामाठी,

मदारहूप्रा साहित्य व स्वार पाहिजेत. येविषींचे साहित्य उदईक पुण्यास यावेसी आज्ञा जाली पाहिजे. म्हणजे श्रीमंत मातुश्री काकूबाईचे यणे होते. उंट व स्वार घोडी कामाठी पाठवावयासी आज्ञा करावी सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Janardan Apaji asks for camels, horses, labourers and 500 horsemen to accompany Parvatibai to Purandhar.*

No. 96]  [24-6-1778

श्री

राजश्री कृष्णाजी रणदिवे
यांसी

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री रघुनाथ बाजिराव प्रधान आसिर्वाद सु॥ तिसा सबैन मया व अलफ. राजश्री तुकोजी होळकर व मोरो बाबूराव याणी सरकारतर्फेकडून मसलत केली. उपरांत राजश्री सखाराम भगवंत याचे बुध्धीस लागोन मेलविले येश गमाविलें होतें. हाली सरकारचे मर्जीप्रो वर्तणूक करावयाची चाल धरिली आहे. त्यास याउपरी होळकर याची फौज हजूर येईल व राजश्री माहादजी सिंदे याचीहि येणार आहे. त्यास अगोधर ज्याची फौज येईल त्यासमागमे तुम्ही आपले सरंजामसुध्धा हजूर येऊन पोहचणे. जाणिजे; छ २८ जमादिलोवल. बहुत काये लिहीणे.







¶*Raghunath Bajirao to Krishnaji Randive, asking him to join Holker and Scinde with his forces.*

---

No. 97] [21-1-1779

पुरवणी तीर्थस्वरूप राा दादा.

(इंग्रजा)चे घरास राज्य जाईल या अर्थी त्याजपासोन निघोन माहदजी शिंदे व होळकर याजकडे आलो, आणि निश्चये कीं आपण स्नानसंध्या करून राहूं. अतः-

१ याच अर्थाचें व याच मितीचें आपाजी मोरे याचे नांवाचें पत्र आहे.

पर राज्याचा लोभ धरणार नाहीं. आमचे खाजगी खर्चास तुम्ही बारा लक्षांचा मुलुख दिल्हा तो घेऊन झासींत राहूं. श्रीमंत सवाई माधरावयानीं आपले धणेपण करावे. आपला पुत्र सवाई बाजीराव यानी कारभार मुतालकी करोन असावे. मुलें थोर होय तोंपर्यंत पुरंधरावर उभयेतानी असावें. श्रीमंत सवाई माधवराव व सवाई बाजीराव हे आपले राज्याधिकारी होये तो पावेतो रा॥ नानाफडणीस व सकारामबापू यानी कारभार कुलयेत्बार करून राज्य संभाळावें. आम्ही इतक्यावर फंदफितुरी करूं तर श्री सांबाची शफत आस व श्रीकुलदेवताची आण आस. या वितरिक्त कासींत मात्रागमनाचे पातक आसे. पुन्हा या राज्याचा लोभ धरणार नाहीं. येविसींची पत्रें नानास व सकरामबापूस पाठविलीं. येणेप्रमाणे दादासाहेबाचे पत्राचा मजकूर. उपरांतिक रा॥ माहदाजी सिंदे व तुकोजी होळकर यानीहि पत्रें या अन्वयाप्रमाणच लेहून आण प्रमाण करून नानास दिली आणि सभेंत गर्जोन बोलले कीं पुन्हा श्रीनानासाहेब कैलासवासी याचे राज्यास फंदफितुर वाईट चिंतील त्यास कासींत मात्रागमनाचें पातक घडेल. ह्या राज्यासीं सामील आसोन श्रीमंत सवाई माधवराव यासी अभिष्ट चिंतोन साहित्ये करीत असावे. याजप्रमाणे बोलल्यावर रा॥ नानाफडणीस यासी विनंती केली कीं आपण या राज्यांतील कुलकारभारी आहां तर माघे लहाणथोर कारभारी व स(र)दार आम्ही लोक याचा अन्याये जाहला आसल ते चित्तांत काहीं न आणावे. येथील लहाणापासून थोर येक कडेचा माहार देखील यकरूप असोन राज्याचा बंदोबस्त करावा. याजउपरी राजश्री दादासाहेबीं तमाम राज्यांतील जे अधिकार आहेत त्यास पत्रें दिलीं कीं आपण या राज्याचा लोभ सोडून बारा लक्षा(चा) मुलुख घेऊन झासींत श्नानसंध्या करून राहतो. राजश्री सवाई माधवराव व सवाई बाजीराव याचे आज्ञेंत वर्तणूक करीत जाणे. ज्याप्रमाणें नानासोांचें आज्ञेप्रमाणें वर्तत आला, त्याजप्रा॥ आताही वर्तावें म्हणून निज्या(म)अली व हैदरअली व रा॥ मुधोजी भोसले अवंतर(जे) आहेत त्यास पत्रें देऊन येविसी सिंदे होळकर व नानास पत्रें पाठविलीं आणि गौरव केला कीं या राज्यास अपाये बहुत चिंतीत होते परंतु तुह्मीं नेकजाद मादबर सरदार साहे होऊन राज्य संभाळिले. असें म्हणोन हिंदुस्थानांत जावयासी माघ सुध दसमीस रात्रौ मुहुर्त कूच करून देहूचे मुकाम केले. तेथें एकदोन मुक्काम करून मजल दरमजल निघोन जाणार. तेच दिवशीं सिंदे होळकर यानी हिंदुस्थानांत जाण्याविसी अगाडीची पिछाडी केली. द्वादसीस डेरे खाशाचे व नानाचे पुरंधरास जावयासी मुहुर्त बाहेर दिल्हे.—या दो चौ रोजांत नाना आपली फौज घेऊन पुरंधरास जाणार. समागमें सिंदे होळकर सडे मात्र येणार. तेथ गेलियावर सवाई माधवराव यासी किल्याखालीं उतरोन सिंदे होळकर

यासी रवानगी वस्त्रें देऊन त्यास हिंदुस्थानांत रवाणा करावें. तमाम मानपुरीशे सरदार यासी वस्त्रें द्यावीं. यंदा वरकड फौज निरोप दोन महिन घरास देऊन सडे सरदार ठेऊन घ्यावे.

¶*A graphic account of the abdication of Raghoba after his defeat at Talegaon is contained in this incomplete letter addressed to one Dada by his son, both of whom appear to be north-Indian residents, as they write* घासी *for* झासी, *etc.*

---

*No. 98*] [*4-7-1779*

पौ छ १६ जिल्हेज

तिसा सबैन. पौष.

श्री

राजश्री भिवराव स्वामीचे शेवेसी

विनंती उपरी. तुम्ही छ १५ जिल्हेजची पत्रें पाठविली ती पावलीं. कारल्या जवळ आले. लढाई जाहल्याचा मजकूर लिहिला तो कळला. त्यास कालचे लढाईत बाणदारांनी कामकाज चांगलें केले. वेसून राखिले. बरे केले. आज त्याणी कूच केले नकळे. लिहून पाठवावें. काल तोफ रवाना केली. पावलीच असेल. फौजहि रवाना करितों. तुम्ही मेहनत चांगली करतां म्हणोनच काम होते. वरचेवर वर्तमान लिहून पाठवीत जावें. रा॥ छ १६ जिल्हेज हे विनंती.

¶*Nana Fadnis to Bhivrao Panshe (wholly autograph) congratulating him on the success he attained in a fight near Karla. Nana is much pleased with the good work done by rocketmen.*


THE LEAGUE OF THE BARBHAIS
RAGHOBA'S ROUTE TO KASEGAON AND AFTER.(IN RED.) X KASEGAON.
SCALE
0 40 MILES.
72
74
76
22
20
18
16
Narmada R.
Broach
BURHANPUR
Jalgaon
Songir
Dhulia
Ajanta
Nasik
Godavari R.
Daulatabad
Aurangabad
Oke
Kaigaon
Paithan
Ahmednagar
Sina R.
Bhir
Bombay
Shrigonda.
POONA
Karmala
Barsi
OSMANABAD
Paronda
Bhor
Nira R.
Bhima R.
Tuljapur
Naldurg
Phaltan
Satara
Koregaon
Sholapur
Pandharpur
Aundh
Kasegaon
Akalkot
Vadgaon
Karad
Khanapur
Miraj
Bijapur
Kolhapur
Kistna R.
SAVANTVADI
GOA
DHARWAR
Savanur
G.P.Z.O. Poona.1930.

पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद

# ६



# छत्रपति रामराजाचें प्रकरण

[किंमत—२ रुपये २ आणे किंवा ४ शिलिंग]

गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेस, मुंबई

१९३१

*Government do not share any responsibility for the comments and views expressed by the editor.*

## RAMRAJA'S STRUGGLE FOR POWER, 1750-53.

### 1. *Shahu's death and Ramraja's accession.*

King Shahu was undoubtedly a great personality, for though he did not personally figure in any operations, he could control the divergent elements in the Maratha State and make them all work for a common national purpose. His death on 14th December 1749 without leaving any heir started a series of dangerous intrigues and struggles for the succession, which would have ruined the leaderless kingdom, had not the Peshwa seized the helm and crushed all anti-national ambitions and attempts at succession. His preservation of the integrity and strength of the Maratha State by this bold personal assumption of responsibility and initiative, however, laid him open to the charge of usurpation commonly brought against the Peshwas by later historians as well as by his defeated rivals.

Absolute monarchy is successful only so long as there is a capable heir to succeed a deceased ruler. Otherwise, the needs of the situation inevitably bring to the surface the strongest man available. Ramraja, a youth of 23, was Shahu's nephew, brought up secretly in exile by his grandmother Tarabai. Shahu did not legally adopt him or bring him to Satara in his life-time for fear that he would come to some harm at the hands of Sakwarbai but on his deathbed signed a will naming him as his successor, under the regency of the Peshwa. A fortnight after the death of Shahu, Ramraja was ushered into Satara and placed on the *masnad*, when most of the prominent dignitaries were present. Ramraja is commonly supposed to have been an idiot, incapable of any sensible action and unfit to direct the serious concerns of an expanding empire.

### 2. *Transfer of the Government to Poona.*

But the papers here presented show for the first time that the young King was not given a real chance of learning his administrative duties or showing capabalities. The Peshwa after a bitter experience of the intrigues and factions at the capital, had made up his mind long before the late King's death to assume all power into his own hands. Ramchandra Baba and the Purandares were his chief advisers in working out this policy. He first secured the cordial support of that powerful chief, Raghuji Bhosle, and gradually removed all the offices of government to Poona, thus throwing Satara into the background and indirectly compelling both Ramraja and Tarabai to submit to his wishes both as regards their own personal needs and any details of the administration. Ramraja was crowned on 4th January 1750, and the Peshwa himself left Satara for Poona in the middle of the following April, using the interval for completing the arrangements at Poona.

### 3. *Tarabai's policy.*

Tarabai on the other hand had her own game to play. She coveted power, but when she found that neither Ramraja nor the Peshwa would

allow her a free hand, she went to Sinhgad about 20th March on the pretext of performing her dead husband's anniversary, but really with the intention of raising the standard of revolt there. The Peshwa tried to win her over by persuasion and inviting her to Poona entertained her with much deference and in a most ceremonious manner. But after prolonged discussion, she left for Satara entirely dissatisfied with the policy the Peshwa was pursuing. He, however, won over Raghuji Bhonsle, who had come to Satara for the coronation, and followed the Peshwa to Poona to settle with him his future plans. Thus Ramraja was left at Satara in isolation and impotence, with no influential supporter except his sister Daryabai Nimbalkar. His situation soon growing desperate for want of funds, he had to accept an invitation from the Peshwa to visit Poona and settle matters with him as best as he could. He had already fallen out with his grand-mother Tarabai, who, finding him incorrigible, managed to keep him under arrest in Satara fort after his return from Poona, a position to which he had quietly to submit for the rest of his life. Thus, it will be obvious from the papers printed here that the Peshwa made no effort to form an administration and face the situation at Satara itself, in consultation with the various responsible members of the Maratha constitution who still looked upon the Chhatrapati as their legitimate master. This gave rise to endless trouble.

### 4. *What Ramraja thinks and says.*

There are not many incidents in this section. Most of the papers are news-letters sent from Satara to the Peshwa at Poona by his agent Purandare. They relate to the intrigues and doings of the various individuals at Satara and elsewhere. They reflect copious light on the character of Ramraja. Purandare thus writes on 6th June 1750: "The king does not care to secure the good graces of Tarabai. He has asked the Sachiv not to hand over to you the fort of Sinhgad. He is not straight and fair in his dealings. He tries to upset all your measures, and looks upon all your friends as his enemies." Another report runs thus: "The king asked Yeshvantrao Potnis to end the deadlock and pay off the salaries of the servants. 'If you can, do this at once,' said he, 'otherwise I can make my own arrangements. I am not afraid of anybody. I want to see what these Brahmins can do!'" Yeshvantrao tried to remonstrate with the king, but in vain. Purandare again writes to the Peshwa: "No reliance can be placed on Ramraja; he changes his mind every moment. He feels a bitter hatred for you. If you send Tarabai alone here, he is sure to keep her confined. You must therefore take strong measures at once. Otherwise there will be chaos. Ramraja is bent upon mischief. He has already plundered Shahu's daughters, Santubai, Gajrabai and others. Babuji Naik and Raghuji Bhonsle are both annoyed. He will doubtless assert his independence, if you don't take strong measures at once." In another place Ramraja is reported as saying, "This Peshwa now comes and begs these forts of me. I know that well. I am in no way under any obligations to the Peshwa. I don't owe him a farthing. I won't give him a single fort. I would rather go and make friends with Yamajipant. He is a good Brahman. He will

look after my affairs. I won't be afraid of any of you. I won't go and beg any favour of my grandmother. She is the root of all the mischief. If she comes to Satara I will keep her closely confined. Govindrao Chitnis has crossed me very much. I will depose him and give his office to another man." Sentiments like these which are copiously displayed in the papers show the spirit of the young king.

5. *Damaji Gaikwad's attack on Satara.*

Tarabai did not remain quiet for long. She soon realized how the Peshwa had succeeded in his design of silencing every opponent and she contrived to intrigue from Satara with Dabhade, Damaji Gaikwad and the Nizam, with the result that when in the early months of 1751 the Peshwa was away in the Karnatak, Damaji Gaikwad came from Gujarat plundering and devastating the country with a view to put down the power of the Peshwa. Several letters give a vivid description of these events. Janoji Nimbalkar's letters to the Peshwa in this connection will be found full of interest. It will thus be seen that the Peshwa rose to the occasion, and mainly by means of his superior tactics soon got the better of all those who stood in his way so as thereafter to pursue the usual Maratha policy of expansion, unhampered by internal troubles.

Although the period covered by these incidents is very short, the whole situation, which was till now very obscure, can be clearly elucidated by means of the numerous papers here presented. We realize how the best man won and how his personal victory also saved the State.

No. 1] [11-12-1748

श्री

राजमान्य राजश्री माहादाजी अंबाजी यासी श्रीमंत सकल सौभाग्यादिसंपन्न मातुश्री जिजाबाई साहेब यांणी आज्ञा केली यैसी जे. सुा तिसा अर्बैन मया अल्फ. पूर्वसंदर्भाच्या विचाराकरितां वारंवार येक संवछर वेदशास्त्रसंपन्न राजश्री दादंभट श्रौत्री यांस रवाना केले. तो सकलार्थ भावगर्भ तुम्हास संभवलाच आहे. यैसी गोस्ट असतां . योजिला मनसबा साहेबांच्या निदर्शनास अद्यापवर न ये. तेव्हां तुम्हांसारखे कार्येकर्ते लोक प्रसंगी असोन लौकिक कोणे प्रकारीचा दिसोंन येतो हा अन्वयें याजउपरी तुंम्ही चितांत आणून राजश्री बालाजी बाजीराव पंडित प्रधान यासी सागावें. हुजूर त्यांची मध्यस्ती साहेबीं केली आहे ती यथायोग्य दिसोंन मारनिले येशास पात्र होऊन कार्येसिधी सत्वर होये तो पदार्थ करणें. यविसीचें पंडित मारनिले यांसी सविस्तर आज्ञापत्री लिहिले आहे व वेदशास्त्र-संपन्न राजश्री श्रौत्री सांगतां कलेल. साहेबाकडील मध्यस्तीचा सकलार्थ कलावा यास्तव राजश्री बावाजी भुजंग यांस आज्ञा करून पाठविले आहेत. त्वरेने योजिले कार्ये सीघ्रतेने घडे ते गोस्ट करणे. जाणिजे रा छ १ मोहरम. बहुत काय लिहिणे. बार.

(अस्पष्ट शिक्का.)

¶*Letter of Jijabai of Kolhapur to Mahadaji Purandare, written a year before the death of Shahu, evidently referring to the succession to the Satara Gadi, in most vague terms. Messengers were sent to communicate particulars personally.*

---

No. 2] [11-12-1748

श्री

**राजश्री बाळाजी बाजीराव पंडित प्रधान यांसी,**

श्रीमंत सकलसौभाग्यादिसंपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब. उपरी, पूर्वसंदर्भाच्या अन्वयानरूप तुम्हाकडे वेदशास्त्रसंपन्न राजश्री दादंभट श्रोत्री यांजबराबर आज्ञापत्रें सादर करून कितेक बोलीचालीचा प्रारंभ सदृढतेच्या प्रसंगाची आज्ञा सांगोन पाठविली, त्याप्रमाणें चित्तीं संभवून पूर्वसंकल्प सिद्धीस नेऊन, प्रामाणिक वचन

निदर्शनास साहेबाच्या यावें; तदोत्तर हुजूर संतुष्टता प्राप्त होऊन साहेबीं मध्यस्थी केली. त्या गोष्टीचा फलादेश घडावा, या विचाराकरितां विनंतीपत्राचा मार्ग लक्षिला. अविलंबें कार्यसिद्धि दृष्टीस पडावी, लौकिक उत्तम दिसोन येशास पात्र तुम्ही व्हावें, साहेबीं सर्वांविशीं येक्तयारी टाकावी, ऐसें कितेक मनोदये साहेबीं कल्पून गतवर्षापासून वेदशास्त्रसंपन्न राजश्री भटजीस लागोपाठ रवाना केले. ऐसें असतां साहेबांच्या प्रत्य(या)स गोष्ट न ये. तेव्हां साहेब मध्यस्थ होऊन हुजूर वचन गुंतविलें, त्याचा लौकिक कोणेप्रकारीचा होणार हा अर्थ चित्तांत पाहाणें. तदनुरूप याजउपरी तऱ्ही पूर्वसंदर्भाच्या विचारांनुरूप अंगेजे[१] करून स्वराज्य कर्तव्यार्थ पहिली बोली केली आहे, व करारदाज यादी लेहून दिल्या आहेत, त्याप्रमाणें निदर्शनास साहेबांचें यावें. हुजूर विनंती केली ती सत्यता होऊन राज्यउपयोगीं मनसबा घडे तें करावें. या गोष्टीचे तुम्हास अगाध कोणतें? येविशीचा कितेक भावगर्भ वेदशास्त्रसंपन्न राजश्री श्रोत्रियाजवळ आज्ञा सांगोन पाठविली आहे. साद्यंत आज्ञेप्रमाणें सांगतील. तुम्हाकडील मध्यस्ती साहेबांकडे तुमची निष्ठा दृढतर हा साहेबास संपूर्ण भरवसा. तदनुरूप तुम्हास कर्तव्याचें अगाध काय? हे गोष्ट साहेबीं चित्तांत आणून हुजूर विनंती करून तिनीं संस्थानचीं ताकीदपत्रें घेऊन पाठविलीं आहेत. साहेबांचा व तुमचा करारदाज कोणे प्रकारचा आहे? स्वराज्यविषयीं तुमचे मांडीचें उसें केलें आहे, हाहि अर्थ तुमचे ध्यानांत आहे. मुख (ख्य) गोष्ट पूर्वसंदर्भाप्रमाणें हुजूर निदर्शनास साहेबीं आणून यावें आणि येशास पात्र तुम्ही व्हावें हा अर्थ चित्तांत आणावा, सकलार्थ तुमचें चित्तीं संभवावा, येदंनिमित्य राजश्री बावाजी भुजंग यांसी आज्ञा करून साहेबीं पाठविले आहेत. साहेबांकडील मध्यस्थीचा अर्थ सांगतां कळेल. बहुत लिहिणें तरी तुम्ही मूज्ञ आहां. बार.

¶*Jijabai to Nanasaheb Peshwa, asking him to carry out the promises and pledges given by him to King Sambhaji. It seems, that before Ramraja was fixed upon as a successor to Shahu, the Peshwa had agreed to secure the throne of Satara for Sambhaji of Kolhapur. Jijabai is vaguely alluding to these promises and asking the Peshwa to act up to them. Why Sambhaji was abandoned in favour of Ramraja, is a question which requires solution. Possibly the Maratha Kingdom would have benefited by the union of the Satara and Kolhapur Gadis.*

---

१ अंगीकार.

*No. 3*]

पोा छ १० रजब

हरकारे याचे पत्र

श्री

सेवेसी विज्ञापना. ताा. छ २७ रबिलाखर पावेतो साहिबाचे कृपाद्रिस्टी-कडोनी सेवकाचे वर्तमान येथास्थित आस. राजेश्री प्रतिनिधीपंतानी आज्ञा केली कीं साहेबास जावोनी विनती करण कीं राजेश्री प्रधानपताची बोली सागितली ते सेवेसी लिहली आहे. सा(हे)बाच्या पायावेगळ आपणास काही दुसर दैवत काही नाही. साहेबाच्या पायासी येकनिस्ट सेवा करीतां कीं नाही हे साहेबास विदित आसल. त्यास राजेश्री प्रधानपतानी श्रीमंत जिजाबाईची भेट घेऊनी श्रीमंत राजेश्री संभाजी महाराजाची भेट घ्यावयाची केली होती तेहि आपणास कळल तैसे, परिहार करावयाच तैसे केल. पुढ त्याच मनोगत घेतल कीं साहेबाच्या पायावेगल काही दुसर नाही. त्यास साहेबी आज्ञा केलेवरी साहेबाच्या पायापासी याव. पुढ साहेब हुकूम करितील त्याप्रोा वर्तणू(क) करावयाची ते करो, हे त्याच्या मनामधे आहे. कोणे गोस्टीचा काही महालमुलूख काही मागावयाचा नाही. त्यास राजेश्री महादाजी नाईक येतात म्हणोनी मार्ग पाहतात. आजवर जो मनसबा करावयाचा तो केला जाईल. याजप्रमाणे राजेश्री प्रतिनिधी-पंतानी आज्ञा केली त्याजप्रमाणे सेवेसी विनती लिहिले आहे हे विज्ञापना.

¶*This letter seems to throw light on the Peshwa's intrigues with Sambhaji of Kolhapur, probably towards the end of Shahu's reign. It unfortunately bears no date.*

---

*No. 4*]

श्रीवरद

राजश्री पंतप्रधान

गोसावी यास.

श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहंकित गोपाळराव पांढरे, शेरीफनमुलुक, दंडवत विनंती उपरि, येथील कुशल जाणोन राउलीं आपले कुशळलेखन आज्ञा केली पाहिजे. यानंतर बहुत दिवस जाहाले. गोसावि(या)चें पत्र येऊन कुशळवृत्त कलत नाहीं, त्याजवरून चित सापेक्षित आहे. तरी येणारासमवेत साकल्य वृत लिहून परामृश करीत असावें. तेणें करून संतोषावाप्ती होईल. तदनंतरे महाराज छेत्रपतीस देवाज्ञा जाली; समागमें

सौ. राणीसाहेब अग्निप्रवेश जाली म्हणून यैकिलें. त्याजवरून चित्ताचे ठायीं बहुतसे क्लेश जाहले ते पत्रीं लिहितां पुरवत नाहीं. बरें, ईस्वराच्या मर्जीसच आलें, येथें इलाज काये आहे? पूर्वी राजश्री सेखोपंत (शेषोपंत?) दिवाण सेवेसीं पाठविले होते, तत्समई कितेक आमचा साभिमान धरून राउलीं आज्ञापत्रें प्रेरिलीं होतीं. येसियासी सांप्रत सेखजी (शेषजी?) सेवमधें आहेत. कितेक आर्थ मुखोद्गते निवेदन करतील, ते ध्यानास आणून पूर्वीपासून जैसा अभिमान धरिला आहे तैसें चित्तावरी घेऊन आमचें ऊर्जित करून पदरीं घेतलें पाहिजे. गोसावी* * * जात नाहीं. सर्वाभिमान गोसावियास असिला पाहिजे. जेणेप्रमाणें आपले आज्ञापत्र येईल त्याजप्रमाणें वर्तणूक केली जाईल. आज्ञापत्र आलेनंतर आपण सेवेसीं येऊन पोहोंचतों. कलावें म्हणून लिहिलें आसे. बहुत काय लिहिणें, कृपा असों दीजे, हे विनंती.

¶*Gopalrao Pandhre to the Peshwa, offering condolences on Shahu's death and his services when occasion would require.*

---

*No. 5*] [*1749?*

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.

विज्ञापना. स्वामीनी आज्ञापत्र पाठविले तेथें आज्ञा जे. 'नूतन राजपुत्र पानगांवास आहे, या गोष्टीची चर्चा कसी आहे ते लेहून पाठविणे' म्हणोन आज्ञा. यैशास आज्ञेप्रमाणें गुप्तरूपे शोध केला. त्यास, स्वामीनी लिहिला मजकूर तोच प्रमाण. याप्रमाणें येथें बहुताजणास ठाऊक आहे. दरबारी या गोष्टीच्या शोधास चौहींकडे बातमी आहे. ये गोष्टीचे परम कठीण जाहाले आहे. परंतु वर्तमान तो खरेच. बाह्यात्कारी लटीक म्हणोन दर्शवितात. आंतरयामी परम चिंता प्राप्त जाहाली आहे. हे वर्तमान उपस्थित जाहाल्यापासून चौकसी फार जाहाली आहे. तीन चार कोसावर चौक्या ठेवून झाडाझुड्याची फारसी चौकशी केली आहे. हे वर्तमान तो खरेच म्हणोन सर्वत्र जाहाले आहे. याची पूर्वीच्या खुणा आहेत त्याचेहि वर्तमान मागाहून सेवेसी लि॥ पाठवितो. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Purandare to the Peshwa, writing to say that the succession of Ramraja is a topic of common talk at Satara and that strict enquiries are being instituted for all entering into and departing from that place.*

No. 6] [19-12-1749

श्री

सेवेसी केशवराव लक्षुमण पानसी विज्ञापना. येथील कुशल छ १९ मोहरम पावेतो मुा कोा पानगाव जाणून सवकाचे वर्तमान येथाछित आसे विशेष. येथील मजकूर तर श्रीमंत राजश्री नानासाहेबाची पत्रे आली की, 'राजश्री स्वामी कैलासवासी जाले. तर राजपुत्रास सत्वर घेऊन येणे.' त्यावरून राजश्री माहादाजी नाईक यानी सतरुसीस न्यावयाचा फार प्रयत्न केला, परंतु त्याच्या ध्यानास येत नाही. त्यांनी अड घातली कीं 'मातुश्री ताराबाई याजकडील खूण मुद्रा बिताा

१ मोत्याच्या पाटल्या; १ निशाणाचा हत्ती; १ ताराबाईची पालखी; येणे-प्रमाणे व श्रीमंत राजश्री नानासाहेबी यावे अथवा आपण यावें. त्यासिवाय एकंदर जात नाहीत' म्हणून त्यांनीं साफ सांगितलें. राजश्री इंद्रोजी कदम काल सोमवारी येथें दाखल जाले. बहुत काय लिहिणे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति. या प्रमाणे वर्तमान श्रीमंताकडे साताऱ्यास साडणी स्वाराबरोबर पत्रे गेली हे विज्ञाप्ति.

¶*Refers to Ramraja's accession on the death of Shahu.*

---

No. 7] [20-12-1749

श्रीराम

**श्रीमंत माहाराज राजश्री भाऊ साहेबाचे सेवेसी.**

श्रीमंत प्रोढप्रतापदिनकर ऐश्वर्यसंपन्न श्रहंकित रंभाजीराव पांढरे साा दंडवत विनंती उपर, येथील कुशल ताा छ २० मोहरम आपले कृपेस्तव जाणोन स्वभ्योदयाभिवृधिलेखनाज्ञा केली पाहिजे विषेष. इकडील कितेक वृत्त पूर्वी सेवेसी पत्र पाठविले. असे यावरून श्रुत होईल. सांप्रत सतरुषीहून श्रीमंतांची पत्रे आली जे. 'येथील राजपुत्रास घेऊन यावे' व रासहि पत्र आले त्यावरून आजी छ २० बुधावारी डेरे दाखल होऊन गुरुवारी कूच होणार. वरकड कितेक वृत रा माहादाजी नाईक व रा चिंतोपंत व धोंडोपंतानी लिहिले असेल त्यावरून अवगत होईल. रा अंताजी सिवदे (व) सांगोले मंगलवेड्यात आहेत म्हणोन वर्तमान असे. आपण आपले जमावसुधा व रा बावाजीआपा ढोणे व रा बाजीराव ढोणे स्वामीचे आज्ञे-प्रमाणे असूं. विषेष लिहिणे शक्ती नव्हे. हे विनंती.

¶*Rambhaji Pandhare to Bhausaheb, informing him of his departure for Satara with Prince Ramraja.*

No. 8] [23-12-1749 ?

श्री

सेवेसी विनंती. राजश्री गणेशपंत व मी मातुश्री दर्याबाईच्या गोटांत मुकामास आलों. स्वारी अद्यापि आली नाही. आल्यानंतर आपलेकडे बातमी पाठऊ ते क्षणी निघोन यावे. चार गोष्टी बोलावयाच्या रीतीने बोलोन दिवस असता फिरोन जावे. आज यावयास अनमान करू नये. येतो असें उत्तर पाठवावें. ऐवज रुपये वीस हजार, निमे नख्त निमे होन अगर दोन हिसे होन एक हिसा नख्त याप्रमाणे आज देवावे. उत्तर येतांच आणावयास पाठवितो. श्रुत होय हे विनंती.

¶*News-letter to the Peshwa from Ramraja's Camp, when on his way to Satara.*

---

No. 9] [31-12-1749

श्रीम्हाळसाईश.

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक हरी नारायण कृतानेक सां नमस्कार येथील कुशल तागाईत पौश शुद्ध ३ रविवार मुकाम वाफगाव जाणून स्वकीये लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विशेष. पूर्वी वर्तमान साकल्य लिहिले आहे त्याजवरून विदित जाले आसल. तूर्त रा बाबूजी नाईक पौश शुध्र प्रतिपदेस दिडा प्रहरा भेटी जाली. त्या तागाईत खिलबत होत होते. ते च्यार घटिका दिवस राहे तो परियेत होते. कितेक मजकूर मातुश्रीकडील केला. परंतु याचे भाषण याप्रकारे यासी जाले की "तुम्ही बिनबोलाविल्यावाचून येथे कशास आलेत? आम्ही घरात रुसो अथवा काही करू. परंतु लोकानी आम्हास फितवावे यैसे नाही. आम्ही तुमच्याने काही फितावत नाही. आम्ही आपल्या घरात रुसो अथवा काही करू; परंतु सातारा येथील गोस्टी काही आमचे कान यैकत नाहीत. आम्ही त्याचे घरचे खानाजाद आहो. तुम्ही काय समजोन ह्या गोस्टी सागायास आलेत." यैसे कितेक धिकारून शब्द बोलिला. आणि भेटीचे समई जोवर घरात ब्रिछयाने परियेंत येत तोवर सामोरे गेले नाही. यैसे कितेक गोस्टीचा अनादर देखोन बहुत श्रेमी जाले. वस्त्रे देत होते परंतु घेतली नाहीत. यैसे वर्तमान यैकिले. ते सेवेसी लिहिले आहे. हे खिलबतचे वर्तमान यैसे

आहे. याजसिवाय केवल आंतस्त जिवाचे वर्तमान श्री ईस्वर जाणे. परंतु दृष्टीगोचर भाव काही आणखी दिसोन आला नाहीं. यासी बाबूजी नाईक तैसेच कूच करून खटे होऊन प्राथकाली शणवारी द्वितीयेस गेले. श्रुत होये. आणिखी मुजफरखान गाडदी याजकडील हिराचंद कायेत येथे आला आहे. त्यासी वीस हजार रुपये दिल्हे. हुंडी पुणियाचे सावकारावर दिल्ही. तेथून हुंडी मुजफरखान जेथे आसल तेथे करून द्यावी आणि त्याजपासून गाडदी फिरंगी दोनसे आणवावे. यैसे वर्तमान आहे. हिराचंद कायेत येथेच आहे. दिलीकडील वर्तमान तरी वजिराची पत्रे आली होती की तुम्ही सत्वर येणे. तिकडून अटकपार अहमदखान पठाण मातबर फौज घेऊन येणार. थोडीसी फौज अटके अलीकडे उतरली आहे. मागून आपणहि येणार यैसे वर्तमान आहे. दिलीकडे पठाणाचे फौजेची आवाई पडली आहे. यैसे वर्तमान आहे. त्याचा जामदार खाना व तोफा वगैरे जिनस यैसा तयार जाला आहे. पुढें वाटे लावणार आणि मागून आपणहि सत्वर जायाची तजवीज आहे. जरी आपली पत्रे समाधानाचीं वरचेवर येऊन पोहोचली तरी टिकाव जाला तर होईल. नाहींतर हे येथून जाईल. यैसे वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होये. बहूत काये लिहिणे. कृपा वृ*धी कीजे हे विज्ञाप्ति.

¶*Hari Narayan writes to the Peshwa from Vafgaon to inform him that Babuji Naik has tried to take advantage of the disaffection of Malharrao Holker against the Peshwa, by winning him over to the side of Tarabai. Malharrao, however, proved obdurate. The writer further informs him of the money advanced to Mujfar Khan in return for the service of 200 Gadadis and finally asks the Peshwa to prepare for an imminent attack on the part of Abdali in the north.*

---

*No. 10*] [*Prior to 1750*

श्री

राजश्री सिदोजी राऊत गोसांवी यांस

ॐ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित बऱ्हानजी मोहिते रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे. विशेष श्रीमंत माहराज मातुश्रीचे व राजश्री स्वामीची पत्रें आम्हास हुजुर येणे म्हणोन आली आहेत. येथे हुजुरे येऊन बैसले आहेत त्यास हुजुरच्या पत्राच्या नकला व आम्हीं आपलें पत्र श्रीमंतास पाठविले आहे हें देऊन सालजाब घेऊन पाठविला पाहिजे. सातारेकडील मजकूर पाहतां उभयेताची चित सुध आहे ऐसा अर्थ दिसोन येत नाही. त्यास श्रीमंतास पत्र लिहिले. आज्ञा करतील तेणे

प्रमाणे वर्तणूक करूं. यानंतर आपल्या श्नेहाचा अर्थ कित्येक राजश्री . वेंकाजी-पंती सांगितला आहे तर आपल्या व आमच्या श्नेहास दुसरा अर्थ नाहीं. पेशजी श्नेहाचा संकेत आपण कित्येक बोलिले आहेत तेणे प्रो चितांत आणावा. आम्ही आपल्या श्नाहासिवाय आहों यैसा मजकूर नाहीं. राजश्री त्रिंबकजी भोसले यानी श्रीमंतास पत्रे पाठविलीं आहेत म्हणोन वर्तमान ऐकितो. त्यांत राजश्री रघोजीबावा भोसले याजकडील संकेत कित्येक अर्थ लिहिला आहे त्याचा शोध ध्यानांत आणोन सविस्तर लिहिले पाहिजे. आपण ते प्रसंगी असता आम्ही कोणी कोष्टीचा अर्थ ध्यानात आणावा यैसा मजकूर नाहीं हे द्रढोतर ध्यानांत आणोन हे पत्र आपलेस लिहिले आहे. सर्व भरवसा तुमचाच आहे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

*¶Burhanji Mohite to Sidoji Rawoot, asking him to get orders from the Peshwa whether he should accept the invitation from the King and Tarabai to go to Satara. The writer, however, complains that the King and Tarabai are not on good terms. The addressee is assured of the writer's friendship and is asked to supply information regarding Trimbakji and Raghuji Bhonsle.*

---

*No. 11]* *[Prior to April 1750*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री भाऊ साहेब**
**स्वामी राजाचे सेवेसी.**

आज्ञाधारक व्यकटराऊ मोरेश्वर चरणावर मस्तक ठेऊन सा नमस्कार विनंती जे. माहाराजानी कृपा करून राजश्री रघोजी भोसले यांजकड पाठविले. त्यासी आपण आज्ञेवरून येथे आलो; तों नबाब नासरजंग याचे वकील येऊन बसले आहेत. दुसरे सैद शरीफखान आलजपूरचा सुभा याजकडून बालापूरचा फौजदार हाहि आला आहे. नवाबानी सरंजामानसी बलावले आहे. त्यासी हेहि नव-रात्रामधे डेरे बाहीर दिल्हे; त्यास मोहर्त पाहून बाहेर आले; तो वाटेस येता जरिपटका निशानाचा होता, तो तुटोन पडला आणि आस्तमानी डेरियासी मोहाल लागले. मग तमाम डेरे पाडून गावात नेले. यांजपासी फौज पाच हजाराची वदंता आहे व याचे पुत्र रा साबाजी भोसले आहेत ते मकसुदाबादेकडे गेले, त्यासमागमे साता हाजाराची आवाई आहे. ते त्या प्रांतास गेलियावर यांची ठाणी पूर्वी आलाविर्दी होते याणी घेतली होती; तेथे कित्येक लोक मारले. [ पुढील बंद गाहाल ] मी जे वर्तमान होईल ते लिहून पाठऊ. व यथे राजश्री

रघोजी भोसले यासी कर्जदारानी बहूत आडविले आहे. गोसावी बहुत हैरान करितात. पैका तो कोठे नाही. यैसे आहे. हिदायेत मोहिदीखान याकडील तों कोन्ही वकील आला नाही. इतकियावर जे होईल ते लिहून पाठविले आहे. भास्करपंताच्या बायेकोच्या चितांत आहे कीं, पैठणापासून घासदाणे घेत घेत नादेडापुढे जावे, यैसे यैकतो. सत्य मिथ्या ईश्वर जाणे. बहुत काये लिहिणे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ती.

¶*Vyankatrao Moreshwar to Bhausaheb, forwarding news from Raghuji Bhonsle, says that ambassadors from Nasarjung and Sayd Sharifkhan have approached Raghuji for help. The writer also gives the approximate strength of Raghuji's army. 'Raghuji,' he says, 'is much harassed by his creditors.'*

---

*No. 12*] [*1750 ?*

**श्री.**

पुा सेवेसी विज्ञापना. राजश्री प्रतिनिधी व फत्तेसिग बावा व आणीकहि कोण्हाकोण्हाचे सूत्र करवीराकडेच आहे. त्यास मुख्य गोष्ट कीं, पर्वताचे अनुसंधान कसे आहे आणि काय आहे हे कांही कळत नाहीं. एखादे समई संदर्भ याचा कोण्हाचे हाते असिलियास बरी गोष्ट नव्हे. प्रतिनिधि तो सूत्र करावयास चुकत नाहींतच. यास्तव स्वामीनीहि पर्वताचे कारभारी यांस वरचेवरी रवेसीने[१] आज्ञा करीत जावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This letter, sent from Satara to the Peshwa at Poona after the death of Shahu in the end of 1749, mentions the activities of Tarabai, and advises keeping a proper watch at the fort.*

---

*No. 13*] [*27-3-1750 ?*

**श्री.**

सेवेसी गणेश महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. काल सिरगांवकर यांचे पत्र आले कीं, श्रीमंत महाराज करवीरकर वर्षप्रतिपदेस डेरेदाखल जाहाले. श्रीमंत महाराज सातारकर याजकडे फौज सुद्धा जावे यैसी वदंता आहे. व सातारियाहून राजश्रीची पत्रे गेली कीं, किल्ला[२] आमचे स्वाधीन आहे व फौजहि

---

१ रीतसर. २ सातारा.

कांहीं लगामी आहे; आपण यावे म्हणोन पत्र सातारियाहून गेले. सबब बाहेर डेरे दिल्हे यैसी बातमी आली. जाणोन सेवेसी निवेदन व्हावे यदर्थ विनंती सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶News sent from Satara to Poona that Sambhaji of Kolhapur had started for Satara to help Ramraja.*

---

*No. 14*] [*March 1750?*

श्री

**पुरवणी तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी.**

विनंती. प्रतिनिधी व येमाजीपंत रुसून किन्हेस गेले होते. त्यास थोरली मातुश्री फतेसिंगबावास निरोप द्यावयासी कोरेगांवास गेली होती. राजश्रीसहि नेले होते. देवराव, येशवंतराव व रघोजी भोसले हेहि होते. सांप्रत प्रतिनिधीचा व फत्तेसिंगाचा एखलास[१] आहे. याजकरितां फत्तेसिंगबावानीं बाईपासीं मध्यस्ती करून प्रतिनिधीस पायावर घालावे, यैसा करार करून राजश्रीच्या कानावर घालून फत्तेसिंगबावा व सिवाजी हरि, येशवंतराऊ देवराऊ किन्हेस प्रतिनिधीकडे जाऊन प्रतिनिधीस घेऊन कोरेगांवास आले. बाईच्या पायावर नेऊन घातले. बाईनीं चादर अंगावर प्रतिनिधीच्या घातली. समजावीस जाली. (त) दोतर बाईनीं प्रतिनिधीस समागमे घेऊन सातारियास आली. कलले पाहिजे हे विज्ञापना.

*¶Purandare to Bhausaheb, communicating the movements of the Pratinidhi, Yemaji Shivdeo and others.*

---

*No. 15*] [*6-4-1750*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री बाबास्वामीराजाचे सेवेसी.**

आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा॥ नमस्कार विनंती जे. येथील वर्तमान ता॥ चैत्र सुध येकादशी मुकाम येरलवाडी नजीक कातरखटाव स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्तित आसे विषश. स्वामीची आज्ञा घेऊन स्वार जालो ते * * * * आलो. तेथे तीन च्यार मुकाम जाले. राजश्री बाबूराव आलियाउपरी तेथून कूच करून मौजे मजकुरास आलो. त्यास राजश्री

---

१ मैत्री.

रघोजी बाबा भोसले याची जोडी * * * * राजश्री त्रिंबकजी भोसले व राजश्री बुऱ्हानजी मोहिते यासी पत्रे घेऊन आले. त्याणी पंढरपुरापलीकडे बेगमपुरियावर आले. आज येकादसीस पंढरपुरावर येणार म्हणून पत्रे आली त्याजवरून राजश्री त्रिंबकजी भोसले याणी व राजश्री बुऱ्हानजी मोहिते याणी उदईक पंढरपुरास जावयाचा निश्चय केला आहे. व त्यांचा हेत कीं फौजेसुधा सतरुसीस यावयाचा आहे. मग तेथे आलियावर स्वामीच्या विचारे फौज वाटे लावयाची ते वाटे लावावी आणि श्रीमंत आज्ञा घेऊन जातील त्याणी लागली आज्ञा आपणास द्यावी आणि त्याजसमागमे पुणियासी जावे. तेथे लग्नें जालियावर कृपा संपादून द्यावी यैसा विचार आहे. स्वामीस श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar to Baba Purandare warning him that Trimbakji Bhonsle, Burhanji Mohite along with Raghuji will march towards Satara with their armies. He adds they are anxious to secure the Peshwa's favour.*

---

*No. 16*] [*9-4-1750*

## श्रीशंकर.

### श्रीमंत राजश्री भाऊ साहेब स्वामी राजाचे सेवेसी.

आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती जे. चैत्र सुध १४ चतुर्दसी सोमवारी प्राथकाली प्रहरा दिवसाचे वर्तमान कीं, सडी फौज च्यार पाच हजारानसी यावे. राजश्री जाणोजी भोसले याचे लग्न करणे आहे, याजसाठी त्यासी समागमे घेऊन यावे लागते. आणि दुसरे राजश्री कासी भास्कर यासी राजश्री विसाजी वैद याची कन्येचा मजकूर आहे, त्यासी लग्नास यावयाचे जरूर आहे. त्याजसाठी हे सांगाते घेतले पाहिजेत. त्यासी राजश्री रघोजीबावा बोलले कीं, आपण तेथे येऊ. तेव्हा * * * * जमावनसी तेथे येऊ. आम्ही काही श्रीमंताच्या जिल्ह्यास उपसर्ग देणार नाही आणि आम्ही तेथे आलिया * * * * * * * * * सत्वर काहाडून द्याव आणि आम्हास लवकर वाटे लावावे. त्याजवरून राजश्री बुऱ्हानजी मोहिते त्यानी सांगितले कीं श्रीमंत तुमचे कार्यास आंतर करणार नाहीत यैसे वर्तमान यैकिण्यात आले आहे. पुढे जे होईल ते सेवेसी लिहित जाईन * * सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar to Bhau Saheb informing him that Raghuji is celebrating his son's marriage. The army accompanying him will in no way molest the country.*

No. 17] [April 1750

ग राजश्री रघोजीबावास सातारियासी घेऊन आले. सडेमात्र आले. आज जितीचा हातरोखा लिहून दिल्हा. बाकी दोन कामे (राहि)ली आहेत, तेहि करून देतो, येसे राजश्री बोलले. व आता राजश्री बोलतात कीं, आऊ-साहेबास आणावयाची तजवीज केली पाहिजे. आणि मजला नेऊन आईचे चरणावर घालून, त्यासी येथे घेऊन यावे. आणि पेशव्याणी मजवर कां राग करितात ? माझे मायेबाप गणगोत जे आहेत ते तेच आहेत. त्यांजखेरीज आणिक कोन्ही नाही. आता बहूतसे * लीणतेत आले आहेत. आणिक बोलतात कीं, म्या त्यांच्या आज्ञाखेरीज * * * ते फजीत पावलो. पुढे काही आज्ञासिवाये करण * * * * * म्हणतात की, पाचा स्वारान(सी) * * * पासी येतो. आणि मजला घेऊन जा * न मातुश्रीस व पेशवियासी घेऊन यावे. यै(से) (म्ह)णतात व आणिक बाजार आफत्रा येथे बहूत (अपूर्ण)

¶*A fragmentary letter illustrating the submissive attitude of Ramraja towards the Peshwa.*

---

No. 18] [April 1750

श्रीशंकर

श्रीमंत राजश्री नाना साहेब श्वामीचे सेवेसी.

आज्ञाधारक व्यंकटराव मोरेश्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येसीजे. साहेबांची आज्ञा घेऊन श्वार जालो ते का खटावास आलो. तेथें राजश्री गोविंदराव चिटणीस याचे भाऊ राजश्री बाबूराव येणार होणे म्हणून च्यार मुकाम जाले. ते काल तेथे आलियावर येकादसीस कूच करून येरलवाडीनजीक कातर खटाव येथे * * थे राजश्री रघोजी बावाकडून पत्रे राजश्री त्रिंबकजी भोसले व राजश्री बुऱ्हानजी मोहिते यासी आली त्या पत्री लिहिले कीं मुकाम बेगमपुरानजीक पंढरपूर येथे आलो तर तुम्ही मंडलीसहवर्तमान सत्वर येणे. आपण उदईक पंढरपुरावर येतो. त्याजवरून राजश्री त्रिंबकजी भोसले व राजश्री बुऱ्हाणजी मोहिते याणी उदईक द्वादसीस पंढरपुरास जावे हा निश्चये केला आहे व जासूद जबानीने सांगत होते कीं आज येकादसीस पंढरपुरास येणार येसे आहे व त्यांचा हेत कीं फौजेसुधा सतरुसीज यावे. तेथे श्रीमंत आज्ञा करतील त्याजप्रा फौज

रवाना करावयाची ते करू आणि ठेवणे ते ठेऊ व श्रीमंताच्या हाते आज्ञा घेऊन पुणियासी लग्ना * * तेथे (शु)भकार्ये संपादून स्वामीची आज्ञा घेऊन जावे. ज्याप्रमाणे आज्ञा करतील त्याजप्राा वर्तनूक करावी, यैसा अर्थ दिसोन येतो. सेवेसी श्रुत होये हे विज्ञप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar to the Peshwa to the effect that Trimbakji Bhonsle and Burhanji Mohite are encamped near Pandharpur where Raghuji Bhonsle will join them. The trio will match towards Satara after receiving orders from the addressee.*

---

*No. 19*] [*20-4-1750*

## श्रीशंकर.

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना यैसीजे. येथील वर्त[1] चैत्र वद्य १० दसमी शुक्रवारपावेतो येथास्तित आसों. यैसियासी राजेश्री राघोजीबावा यांच्या घरास बाबूराव उपाध्ये वाडियांतील याणी येऊन येकांती सांगितले. तेथे त्रिंबकजी भोसले व * * राव चिटनिवीस रा गोविंदराव यांचे भाऊ व विसाजी गोविंद व आपण यैसे होतो. तेथे बाबूराव उपाधे याणी सांगितले कीं, दर्याबाई यांच्या घरी राजश्री व फतेसिंगबावा व दर्याबाईचे कारकून व आणीकहि विप्र मंडलीचेहि कोन्ही होते, त्यांची नावे पुरती ध्यानास, आली नाहीत आणि त्यांनीहि सांगितले नाही, परंतु कुफिया[2] वर्तमान सांगितले कीं, आम्हा रघोजी भोसले यांचा फारसा भरवसा होता कीं, येथे पेशवियांणी बाम्हनीं राज्य करू म्हणतात; रघोजी भोसले यासी आणावे आणि राज्याचा बंदोबस्त करावा. त्यासी रघोजी भोसले आले तों तेहि त्यांसच मिलाले. याजसाठी नवा मनसुबा ठरावला आहे की, जो फतेसिंगबावाचा सरंजाम आहे तों त्याचा त्यांस द्यावा आणि त्यापैकी पाच लाख रुपयांचा सरंजाम दर्याबाईच्या पुत्रास द्यावा आणि दाहा हजार फौज दर्याबाईकडून ठेवावी व दाहा हजार फौज फत्तेसिंगबावानी ठेवावी व मुऱ्हाजी घोरपड्यासी आणावे, त्याला सरंजाम करनाटक द्यावे वगैरे देशां * * काही सरंजाम द्यावा, यैसा मजकूर करार वाकई[3] त्याणी सांगितला कीं हा निश्चये जाला. आणीकहि विचार यैकिला कीं मल्हारबा व येशवंतराव पोवार यैसे उभयेतां पेशवियाकडील फोडावे, आपल्याजवल ठेवावे, म्हणून बोलले. तेव्हा तेथे कोन्ही प्रहस्त

---

१ वृत्त. २ कुफिया – गुप्तपणें; अन्तस्थ. ३ वाकई = योग्य.

होता त्याने जाबसाल केला कीं, ज्याचे नाव मल्हारजी होलकर त्यांला पंचवीस लाख रुपयांची जागा सरंजाम पावत आसता तुम्हाकडे येऊन काये प्राप्त होणार आहे व येशवंतराव पोवार आपले घरी रुसून बसला आहे, तरी तीन लाख रुपयांचा मुल्लूक त्याजकडे आहे, यैसे आसोन रुसून बसला; परंतु यांजप्रा चालवणे, आणि काय जरूर आहे? त्यासी हे वर्तमान रा रघोजीबावानी यैकोन बहुत खटे जाले कीं, आम्हावर हा प्रयोग आरंभला आहे तर काये चिंता आहे? उदईक नबाव नासरजंगहि येतो, त्यासी कोन कोन त्याजपुढे टिकतात हेहि पाहतों. आणि ज्याणी आज येव्हडे राज्य भोपले (भोगले) त्यांच्या ह्या गती आहेत. आणखी त्यांची काये गत होईल हे कलत नाही. तर आपण उदईक लस्करात जाऊन राहूं. येथे वाडियांत राहणार नाही. तेव्हा राजश्री बऱ्हानजी मोहिते याणी सांगितले कीं, उतावली करावयाचे काही काम नाही. कैसे होते ते पाहिले कां नाही? उदईक कूच करून लस्कर आलीकडे वेणातीरास येणार व रा बावानी सांगितले कीं, श्रीमंत रा भाऊसाहेबांचें लग्नाचें कोणत्या तिथीस आहे हे तहकिकात वर्तमान आनवणे; त्याजसारखी तजवीज केली जाईल. येथे राजश्री जानोजी भोसले याची तीथ पंचमीची नेमस्त करणार आहेत. व रा गोविंदराव चिटनिवीस यासी राजेश्रीनी किला दिल्हा होता त्याचे हातरोखे दिल्हे होते ते फिरले; किलेदारानें मानले नाहीत. त्यासी रा बापूजीबावा बहुत दरबारीहून खटे होऊन आले आणि राजश्रीनी ते हातरोखे होते ते त्यांज देखताच फाडून टाकले, यैसे वर्तमान यैकिल्यात आले ते माहाराजांचे सेवेत लिहिले आहे. पुढे जे यैकिल्यात येईल तें वरचेवर पाठवितों. आणि जासूदजोडी हानाखाले नाहीत. इतकियावर माहाराज खावंद आहेत. बहुत काये लिहिणे हे विज्ञापि.

*¶Vyankatrao Moreshwar informs the Peshwa of the attempts that were made on behalf of Ramraja to alienate some of the Sardars from the Peshwa's side by granting them inams and saranjams.*

---

*No. 20*] [*Before 21-4-1750*

## श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराव मोरेश्वर कृतानेक सा नमस्कार विज्ञापना येसीजे. स्वामी स्वार होऊन गेलियावर मागे राजश्रीनी रघोजीबावास चोबदार बोलाऊ पाठविले होते. त्यासी याणी त्यासी सांगितले कीं येथे लोकांचे गवगव्यामधे आहेत. तिसरियाप्रहरी सेवेत येतो. त्यासी याणी तेथे बातमी ठेविली

होती आणि राजश्रीनी राजश्री गोविंदराव चिटनिसासी बोलाऊन नेले कीं आपल्या * * * (घे)ऊन येणे. त्यासी व सेखमिरा * * * * * तनीस यासि बोलाऊन सांगितले कीं तुम्ही पेशवियाकड जाऊन त्यांसी सांगावे की आम्हास न पुसत जावे हे योग्य नव्हे. त्या(सी) आपण कृष्णातीरी मुकाम करावा, आपण तेथे येतो येसे म्हणून वाटे लावले. आणि मागे चौ घटकांत बोलले कीं, राजश्री गोविंदराव यासी त्यांचे आगत्यच आहे; त्यास जाणे जरूर आहे येसे बोलणे बोलले. हे वर्तमान रा रघोजीबावास कलले. याणीहि आपल्यात आपण बोलले कीं ज्या श्रीमंतानी करोडा रुपये खर्चिले. (अपूर्ण)

¶*Vyankatrao Moreshwar reports to the Peshwa that Ramraja has sent for Raghuji Bhonsle and expressed his displeasure that the Peshwa should have gone without taking his leave.*

---

*No. 21]* *[23-4-1750*

**श्रीशंकर**

सेवेसी आज्ञाधारक व्यकंटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती. विज्ञापना यैसीजे येथील वर्तमान चैत्र वद्य १२ द्वादसी सोमवार साहेबांचे कृपेकरून येथास्थित आसो. यैसियासी राजश्री गोविंदराव चिटनिवीस आलियावर येक प्रहर राजश्री व हे यैसे येकांती बसले होते. त्यासी त्यांचीहि पन बनली. रागेसे उठोन आले. मग तेथून राजश्री रघोजीबावाकड आले. तों तेथे राजश्री येशवंतराव पोतनीस आले होते. मग ते त्रिवर्ग यैसे खलबतांत बसले होते. मग येशवंतराव यांला बावानीं वस्त्रे दिल्ही. परंतु त्रिवर्गाचें कार्य बोलणे जाले हे बाहेर फुटले नाही. व राजश्री रामाजी नाईक भिड व बालाजी नाईक भिड याणी येक दिवस कर्जासाठी धरणे देऊन बसले होते. त्यासी परिश्चिन सांगितलें कीं आज आपणास रुपया मलत नाही. बाहेर जाईन तेव्हां जे देणे ते देईन. भिड्यानीहि बहूतसी सख्ती केली. याणी साफ सांगितले कीं येथे रुपया मिलत नाही. मग दोन प्रहर रात्री घरास गेले यैसे आहे. व रा। बावानी तमाम फौजेची रवानगी करितात. पतके बोलाऊन जे सांगणे ते सांगतात. दो चौ दिवसा कूच करून लस्कर बारामतीवरुन राक्षेसभुवन याच्या रोखे वाटे लावणार. पुढे जालनापुरावरुन वराड प्रांते जावयाची नेमनूक केली आहे. व रा। बावाची व रा। कोनेरपंताची समजाविसी होत आहे. आज दोन रोज सिदभटजी रा। बुन्हानजी मोहिते व सिवाजी मोहिते यैसे समजाविसीचे कारभारात पडले आहेत. आज गलॅश्यकंटश होत आहे. साहेबास कलावे म्हणून लिहिले.

---

१ दाट स्नेह.

दरबारचे वर्तमान जे कलत जाईल ते वरचेवर माहाराजाचे सेवेत लिहित जाऊ व साहेबी आम्हास सा व च्यार जोड्या देविल्या त्या पैकी ४ जोडी आम्हापासी आहेत. त्या येथे राहू ना म्हणतात सबब कीं आबाजी नाईक हे सदंतर येथे आहेत, मग दुसऱ्या नाईकीचे आम्ही राहणार नाहीत, यैस म्हणतात. त्यासी साहेब काये आज्ञा करतील त्याजप्रा॥ वर्तनूक केली जाईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar reports that Raghuji is sending away his army to Berar. As for the news about the King there was a meeting within closed doors and nothing has so far leaked out as to what happened there.*

---

*No. 22*] [*25-4-1750*

## श्रीशंकर.

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा॥ नमस्कार विनंती विज्ञापना यैसीजे. येथील वर्तमान ता॥ चैत्र वद्य ३० आमावशा पावेतो माहाराजांचे कृपे करून येथास्थित आसो. यैसियासी राजश्री गोविंदराव चिटनीस व राजश्री रामाजीपंत आपा या उभयेतानी राजश्री रघोजी भोसले याजकडील कागद साहेबी नेमनूक करून दिल्हे होते कीं याजवर राजश्रीचे 'देणे' करुन देणे. त्यासी चतुर्दसी सोमवारी अस्तमानी कागदावर 'देणे' करुन आनून राजश्री बावांचे श्वाधीन केले. त्याजवरुन बहुतसे खुशाल जाले कीं श्रीमंतानी आमचा आंगीकार बराच केला. आम्ही आकृत्रिम त्यांसी चालू; कधीहि अंतर करणार नाही. यैसे बोलले व राजश्री जानोजी भोसले यांचे लग्न वैशाख सुद ७ सप्तमीस नेमस्त केले आहे. साहेबा कलावे म्हणून लिहिले आहे. बहुत काये लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*The writer informs the Peshwa of the grant of money given by the King to Raghujibowa.*

---

*No. 23*] [*27-4-1750*

## श्री.

राजश्री बालाजी पंडित प्रधान
गोसावी यांसी.

ॐ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रो राघोजी भोसले सेनासाहिब सुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपण राजश्री लंबोधर धुंडिराज यांसमागमे राजश्री स्वामींचा हातरोखा पाठविला तो राजश्री गोविंदराव व राजश्री रामाजी

माणकेश्वर यांचे विद्यमाने पोहचला ; व मारनिलेनी आपणाकडील कार्याच्या व ममतेच्या गोष्टी सांगितल्या, त्यावरून सविस्तर अर्थ कळो आला. ऐसियांसी आम्ही आपणावितरिक्त किमपि नाहीं. आपली ममता श्नेहाची वृधि दिन प्रतिदिनी व्हावी हेच इछितों. दुसरा विचार जाणत नाहीं. येतद्विशईचा सविस्तर आर्थ मारनिलेपासी बोलिलों आहों, हे सविस्तर आपणास निवेदन करितील. त्यावरून कळों येईल. रा छ ३० (जमा) दिलोवल सूज्ञाप्रती (वि) शेस काये लिहिणे? लोभ असू दिला पाहिजे हे विनंती.

मोर्तब सुद.

¶*Raghuji Bhonsle assures the Peshwa of his hearty co-operation.*

---

*No. 24*] [*27-4-1750*

*श्री.

राजश्री माहादाजीपंत गोसांवी यांसी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो रघोजी भोसले सेनासाहेब सुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. आपण राजश्री लंबोदर धुंडिराज यांसमागमे राजश्री स्वामींचा हातरोखा पाठविला ते राजश्री गोविंदराव व राजश्री रामाजी माणकेश्वर यांचे विद्यमानें पोहचला व मारनिलेनी आपणाकडील कितेक कार्याच्या व श्नेहाच्या गोष्टी सांगितल्या, त्यावरून सविस्तर अर्थ कळों आला. ऐसियासी आम्ही आपणावितरिक्त किमपि नाहीं. येतद्विशईचा कितेक अर्थ मारनिलेपासी बोलिलो आहो. हे आपणास सांगतील त्यावरून कळों येईल. रा छ ३० जमादिलौवल. + बहुत काये लिहिणे, लोभ आसू देणे, हे विनंती.

मोर्तब सुद.

¶*Raghuji Bhonsle in writing to Mahadaji Pant acknowledges the receipt of the letter from the King. He further promises his help.*

---

१ या ठिकाणं रघोजीचा अष्टकोनी शिक्का.

* नं. २३ व २४ हीं पत्रें एका मजकुराचीं आहेत; परंतु एक पेशव्यांना व दुसरें पुरंदऱ्यांना लिहिलें आहे.

+ जंत्रींत या वर्षी ३० जमादिलावल ही तारीख वर्तविलेली नाहीं.

No. 25] [27-4-1750

## श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना येसीजे. येथील क्षेम ता। वैशाख सुद त्रितीया प्रहर रात्री पर्येत येथास्थी(त) आसो विशष. येथील वर्तमान राजश्री रघोजी भोसले याणी तमाम माहालचा येवज घासदाणियाचा राजश्री येशवंतराव पोतनीस यांचे जावई महिपतराव खासनीस याजकड हावाले होते. त्याजपैकी बनसीपुरी महंत याजला तीन लाख रुपये देविले होते. वरकड लोकास नालबंदी व रोजमरे दिल्हे. त्यासी हे रुपये बनसीपुरीबावास देऊन त्याजपासून आणिक लाख रुपये घ्यावे येसे नेमस्त केले होते. त्याणीहि कबूल केले. त्यासी महिपतराव याणी येवज रोकडा असोन बनसीपुरीस साह महिनियाचा वाईदा करावयासी लागले. तेव्हां गोसावियाणी परिछिन सांगितले कीं मागील रुपये हिसेब करून देणे; मग देयाचे आसल तर देऊं. याजवरून रा। बावानी महिपतराव याजवर बहुत रागास आले की आधीच लग्नाची गोष्ट करू नये. च्यार दिवस लग्न राहिले आसता माझा विश्वासघात केला. त्यासी हे पहिलेच सांगावे होते कीं बनसीपुरीची निशा माझ्यानें होत नाहीं. तुमच्या चितास येईल ते कीजे यैसे सागावे होते. मग श्रीमंतास विनंती करून त्याजपासून लाख दोन लाख रुपये घेतो, आणि आपले लग्नाचे कार्ये करतो. यैसा तोडघसी पडल्याचा विचार जाला आहे. लोकात हसे जालेसे दिसते. त्यासी यासमई आपल्या हवेलीतून उठोन लस्करात गेला. उदई (क) लस्करची रवानगी करून पचमीस स्वार होऊन पुणियासी येतात. तमाम कारभारी जे आहेत त्याजवरहि रागे भरले. उदईक बनसीपुरीची धरणी येशवंतराव याचे घरी बसणार आहेत येसे वर्तमान याजकडल आहे. व रा। फतेसिंगबावाकडील वर्तमान तर रा। त्रिंबक हरीस बोलाऊन नेले की ज्याप्रमाणे तुम्ही पूर्ववत प्रमाणे कारभार करीत होता त्याजप्रमाणे कारभार करणे. त्यासी याणी सांगितले की आता आपल्याच्याने कारभार होत नाहीं. श्रीमंतानी राजश्री पांडबा दिल्हे आहेत त्याच्या हाते कामकाज घ्यावे. त्याजवरून रा। फतेसिंगबावा बहुतसे खटे जाले. याजकडील सिलेदार जितके होते तितके आडून बसले आहेत की आज तागाईत चाकरी केली; आम्हास नालबंदी नाही ना रोजमरा नाही; तर आज आमची नालबंदी व समजाविसी चुकऊन देणे. त्यासी बहुतसे आडून

बसले आहेत. त्याची समजाविसी जाली नाही यैसे वर्तमान येकिल्यात आले आहे. साहेबास कलावे म्हणोन लिहिले आहे. सेवेसी श्रुत होय, बहुत काये लिहिणे, हे विज्ञाप्ति.

*¶Vyankatrao Moreshwar reports that Raghuji was severely displeased with Yeshwantrao's son-in-law for the latter's negligence to provide credit to the formers' creditor which would have enabled him to draw from him to meet the expenditure of his son's marriage.*

---

*No. 26]* *[28-4-1750*

## श्रीशंकर

सेवसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक साष्टाग नमस्कार विनंती विज्ञापना येसजि. येथील वर्तमान ताा वैशाख सुद ४ चतुर्थी शनवार चतुर्थ प्रहर येथास्थित आसो. येसियासी राजदरबारचे वर्तमान तों आज राजश्री माहादाजी नाईक निंबालकर व पिराजी नाईक निंबालकर यार्णी प्राथकालपासी तीन च्यारसे मानसे घेऊन सदरेस बसले आहेत. राजश्रीनी हा कालपरियेंत भोजन केले नाहीं. त्यासी राजश्री सिधंभटजीस व राजश्री बुरानजी बावास बोलाऊन सांगितले कीं राजश्री रघोजीबावास जाऊन सांगणें कीं या उभयेतास ताकीद करून उठऊन देणे. त्यासी बुरानजीबावानी आपला कारकून राा बावाकड पाठविला. त्यासी बावानी साफ जाब दिला कीं आपल्या (ला) खोल्या पाणियांत सिरणे नाही आणि ते आमच्यानी उठनार नाही. आपण त्याला समजावयासी गेलो आणि ते समजले तर उतम आहे. नाहीतर हकनाहक इरेस पडावे यांत जीव नाहीं. व रानी सेखमिराकडील व आणिक पठान लोक आणून देव्हडीवर बसविले आहेत व येशवंतराव पोतनीस तमाम मावले लोक व आणिक कितेक जमाव गोला करितात, वरचेवर देव्हडीकड पाठऊन देतात. आजकाल पंच्यायेत्नामधे येशवंतराव बहुतसे पेश आहेत व काल राजश्रीनी राजश्री गोविंदराव चिटनिवीस यांजकडे साहेबी किले देविले होते. त्या किल्यांची हकीकत पहिलेहि विनतीपत्र सेवसी लिहिले होते कीं हातरोखे फाडून टाकले आणि काल येसे केले कीं पहिले ज्याचे किले होते त्याला राजश्रीनी बोलाऊन च्यार हजार रुपये नजर घेऊन फिरून त्यांच्या हवाला केले. त्यासी राजश्री गोविंदरावजी बहुतसे श्रमी होऊन दरबारीहून आले आणि दरबारासहि बहुतसे जात नाहींत, येसे वर्तमान आहे. व राजश्री बाबूजी नाईक आज प्राथकालीकडे येथून कोट जवल आहे तेथे गेले आहेत व राजश्री रघोजीबावानी राजश्री गोविंदराव यासी व राजश्री

रामाजीपंत आपास बोलाऊ पाठविले कीं तुमचे शहरात येसा जारा (राजा ?) नाचतो तर आम्हास सत्वर आज्ञा देवणे. त्यासी रा प्रतिनि(धि) व रा येशवंतराव व दरयाबाईकडील कारकून येसे येकत्र जाले होते ते बोलले कीं श्रीमंत राजश्री पंतप्रधानेया राजश्री रघोजी भोसले यांचे काम काले पांढरे करून दिल्हे, हे काही जया जात (?) नाही आणि हे रघोजी बावाहि काये त्या कामावर भुलले आहेत. त्या गोष्ट याणी यैकिल्या. त्याजवर जाब दिल्हा कीं, त्यानी काले पांढरे जें करून दिल्हे तेच आम्हास प्रमाण आहे, आम्ही दुसरा विचार करीत नाहीं. मग कोन्हाच्या चितास काये येईल तो सुखरूप यो. त्या गोष्टीवरून तर निरोपाचे आधिकच छंद धरला आहे की आम्हास निरोप द्यावा. येथील वर्तमान याप्रकारचे आहे. जे सेवकास कलले ते विनती सेवेसी लिहिले आहे. व राजश्री जाणोजी भोसले यांच्या लग्नाचे राहिलेसे सहश्रप्रकारे दिसते; आणि होईल याह प्रकारे ज्यानी रुपये द्यावे त्यानी परिश्रिन घालून बसले. त्यासी बनसीपुरी मंहत याणी रा बावास सांगून पाठविले कीं तुझ्या पुत्राचे लग्न राहू न देणे. लग्नाकारणे जो पैसा व सामोग्री जे लागले ते घेऊन जाणे आणि लग्न करणे. हाहि येक विचार जाला आहे. मग पाहावे. जैसे होईल तैसे वरचेवर लिहून पाठऊन देऊ. बहुत काये लिहिणे सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar to Peshwa from Satara, reporting the conversations and plans of Ramraja, Raghuji Bhosle, Pratinidhi and others.*

---

*No. 27]* *[29-4-1750*

**श्री**

**राजश्री बालाजी पंडित प्रधान गोसावी यांसी**

ॐ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रीा रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशललेखन करीत आसिलें पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले प्रविष्ट होउन लिहिला अभिप्राय कळों आला लिहिले की सातारियाहून निघालों ते लोणदास आलो. तेथून

(शिक्का.)

मोरेश्वरावरून श्री जेजुरीहून पुणियास दाखल जाहलो म्हणोन लिहिले व चिरंजीव राजश्री जानोजी भोसले यांचे लग्नाची योजणा कधी आहे ते लिहावी म्हणोन लिहिले यैसियासी लग्ननिश्चय वैशाख शुध अष्टमीस केला आहे. आपणास

कळावें म्हणोन लिहिलें असें वरकड वर्तमान राजश्री वेंकटराव मोरेश्वर लिहितील त्यावरून कळों येईल रा छ ३ जमादिलाखर सुज्ञाप्रति विशेस काये लिहिणें लोभ असू देणे हे विनंती.




¶*Raghuji Bhonsle to the Peshwa giving the actual day on which Janoji's marriage was fixed.*

---

*No. 28*] [*29-4-1750*

## श्रीशंकर.

सेवेसी आज्ञाधारक व्यकंटराऊ मोरेश्वर कुतानेक सा नमस्कार. विनंती विज्ञापना यैसी जे. येथील वर्तमान ता. वैशाख सुद ५ पचमी रविवार त्रितीये प्रहर साहेबाचे कृपाअवलोकनेकरुन येथास्थित असे. विशष येथील वर्तमान तर राजश्रीनी पुण्यासी यावयासी डेरे दांडे लाऊन आज पुढे सिरालास पुढे वाटे लावले. उदईक सोमवारी प्राथकाली श्वार होऊन सिरालास जाणार यैसे वर्तमान आहे. तमाम कारखाने लादालाद जाले आहेत. साहेबास कळावे म्हणून लिहिले आहें. व राजश्री रघोजी भोसले यांचे पुत्रास आज हळदी लागली. अष्टमीचे लग्न आहें. सविस्तर वृत जासुदा बराबर विनंतीपत्रे सेवेसी लिहून पाठवितो. त्याजवरून साहेबास विदित होईल. बहुत काये लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar informs the Peshwa that the King has made all preparations to proceed to Poona. He further writes that the marriage of Raghuji's son is coming off on the Ashtami (Vaishakh 2-5-1750.)*

---

*No. 29*] [*29-4-1750*

## श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा नमस्कार विनंती प्रार्थना यैसीजे येथील वर्तमान ता वैशाख सुद ५ पचमी दीड प्रहर रात्र परियेत साहेबाचे कृपेंकरू येथास्तीत असो. येसियासी राजश्रीनी आपणासमागमे उदाजी चव्हान व पिराजी नाईक निंबालकर व संभुसिंग जाधवराव वगैरे समागमे घेऊन व रा बाबुजी नाईक यासीहि सांगून पाठविले आहे की तुम्ही पुणियासी येणे.

त्यासी यांच्या जाण्याची गडबड ज्या समई जाली त्या समई राजश्री रघोजी बावानी आपणास बोलाऊन सांगितलें कीं राजश्री पुणियासी जातात तर तुम्ही रा रामाजी पंतास व रा गोविंदराव यासी जाऊन सांगून आमच्या रवानगीची तजवीज करणे. त्यासी आम्ही व राजश्री सिदभटजी यैसे उभयेतां त्याजकडे जाऊन त्यांला वर्तमान सांगून त्याणी सांगितले कीं आज तुम्हास वस्त्रे देवितो. तुम्ही तयार असणें. मग बावांस येऊन वर्तमान सांगितलें. मग आऊसाहेब बावाच्या हवेलीस आली होती. मग राजश्री जाणोजी भोसले यासी हलद लागली. मग बावानीं आऊसाहेबास व आहेल्याबाईस वस्त्रे दिल्ही व येक हती आऊसोहबास नजर केला व त्यांजकडील जितकी विप्र मंडली होती त्यासी वस्त्रे दिल्ही. मग आऊसाहेब आपल्या माहालास गेली आणि राजश्रीनी रघोजी बावांस बोलाऊ पाठविले कीं तुम्ही सत्वर येणे. त्यासी हे तयार होऊन समागमें पुत्र बिंबाजी भोसले व रघोजी कराडे व त्रिंबकजी भोसले व माहादाजी भोसले व महमदखान रोहीला व कासीराव भास्कर व गिरमाजी खंडेराव वगैरे कारकून मंडली कोनेरपंत व विसाजी गोविंद व विसाजी वैद्य व सिदभटजी वगैरे तीसेक असामी वस्त्रे घ्यावयासी गेली. मग राजश्रीनी रघोजी बावास व याच्या पुत्रास व त्रिंबकजी भोसले यासी व बुऱ्हानजी मोहिते यांसी चवघाजनास बादली पोशाख दिल्हा; व वरकडास सेले तिवटे यैसी दिल्ही; व येक हती द्यावयासी आनला आहे व येक घोडा यैसे करार जाला. हती व घोडा प्राथकाली घ्यावा यैसे वर्तमान आहे व राजश्री येशवतराव रघोजी बावासी बरी धर्ज[1] लाविली आहे कीं याणी येंदा आम्हाखेरीज कामकाज केले तर काये चिता आहे हे याणी हा घाट घाटला आहे. हा सेवटास कैसा जातो हे पाहतों यैसे बोलला. त्यासी बावानी त्यांस जाब दिल्हा कीं आम्हास आपलें जे उत्तम दिसले ते आम्ही केले. आम्ही काही कोन्हाच्या भरवसियावर नाहीं. पुढें जे बरे दिसेल तेंच करून. त्याजवरून बहुतसे जड गेले आहे आणि येथे जे कोन्हे ग्रहस्त आहेत तितके रघोजी बावास सुबुध्य सांगावयासी आसल (आलस ?) करित नाहींत. परंतु हच त्याला सागतो की ह्या गोष्टी पुण्हा मागतेणे न सांगणे कीं पहिले आम्ही ज्याचे बले त्यासी वाईट होत होतो तो आमचा मेढा गेला. आता माहाराजाचे जागा श्रीमंत आहे. आम्हास काहीं दुसरा विचार नाही यैसे सर्व सांगतात. त्याजवरून खटे होऊन उगेच बसतात. साहेबी रा बावांस व त्रिंबकजी भोसले व बुऱ्हानजी बावास लग्नपत्रिका पाठविल्या. त्यासी येथून रा सिदभटजीस साहेबाकडे रवाना समागमे आहेर देऊन पाठवितात. आम्हास

---

१ नेट.

म्हणतात कीं तुम्ही आहेराबाार समागमे जाणे आणि मागतीन भटजीबाार फिरोन येणे. त्यास साहेबांची आज्ञा होईल तर आहेराबाा येऊं. नाही तर आपण काही येणार नाही. ज्या प्रमाणे आज्ञा करावयाची असिली ते कृपा करून डाकेबाार आज्ञा पाठविली पाहिजे. त्याजप्राा वर्तनुक करु. आम्ही तर त्याला सांगितले कीं आम्हास खावंदाची आज्ञा नाही. तेथू (न) आज्ञा आलियावर मग जावयाचे आसल तर जाऊ व राा रघोजी बावाहि येथून कूच करून दसमी इतके येथून कूच करणार आहेत. साहेबास कलावे म्हणून लिहिले आसे व राजश्रीनी तीन मुकाम नेमले आहेत कीं तिसरे दिवशी बुधवारी पुणियासी जावे. उदईक वेलदाचा मुकाम आहे. मगलवारी मधे राहावे; आणि बुधवारी पुणियासी यावे. व आऊसाहेबाचा व राजश्रीचा कजिया बहूत जाला कीं राजश्री म्हणत मी जातो आणि आऊसाहेब म्हणतात की आम्ही जातो; यैसे एक प्रहरभर बोली होत होती. मग राजश्री म्हणाले की आपण जातोत; मग चितास येईल ते करणे. यैसे वर्तमान आहे. साहेबास कलावें म्हणून लिहिले आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar writes to Poona of news from Satara. He says Ramraja is preparing to leave for Poona. A farewell ceremony was held between him and Raghuji Bhonsle. Every attempt is made to incite him against the Peshwa. But R. is in no mood to oppose the Peshwa's claims and has acquiesced in the situation.*

---

*No. 30]* *[29-4-1750*

## श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यकंटराऊ मोरेश्वर कृतानेक साा नमस्कार विनंती प्रार्थना यैसी जे येथील वर्तमान ताा वैशाख सुद ५ पचमी रविवार प्रथम प्रहर पावतो साहेबांचे कृपा अवलोकने करुन येथास्थित आसो. यैसियासी आज राजश्रीनी गोविंदराव चिटनीस व रामाजीपंत व येशवंतराव व पायेदल माणसे दोनेकसे घेऊन सतरुसी परवतावर श्रीमंगलाईच्या दरशनास गेले. त्यास गडकरी याणी राजश्री व आणिक वीस आसामी वरती घेतली. बाकी जितके लोक गेले होते तितके बाहेर राहिले. व गडकरी यासी द्यावयासी राजश्रीनी तिवटे ५० व सेले ऐसे नेले आहेत. राजश्री गडावर आलियावर गडकरी याणी तोफा सोडल्या. आगोधर दरवाजियाच्या वरलाकडल्या बुरुजावरील तोफ व त्याज आलिकडल यैस्या दोन तोफा इकडील व श्रीमंगलाईच्या बुरजाकडील तोफ यैस्या तीन तोफा सोडल्या आहेत. अद्याप खाले उतरले नाहीत.

व कालचे वर्तमान जें आडलले ते वरचेवर बातमी जासुदाबराबर पाठविली आहे. ते साहेबास कागद पावते होतील. त्याजमधे साकल्य लिहिले आहे, व काल आस्तमानी पिराजी नाईक निंबालकर याणी राजश्रीला आडविले होते. त्यासी त्यांला गोविंदराव व रामाजी पंत व येशवंतराव या त्रिवर्गानी समजाविले कीं आज आपण जावे. उदईक तुमची समजाविसी करु; तर कोन्हे गोष्टीची चिंता नाही. तुम्ही उठोन जाणे. मग पिराजी नाईक निंबालकर समस्त मंडली घेऊन आपल्या डेरियासी गेला व उदाजी चव्हानंहि कूच करुन जात होता, यैसे वर्तमान आहे. हे पत्र संकलित लिहिले आहे. सेवेसी श्रुत होये. हा कागद डाकने जलदीने पावल म्हणून हे वर्तमान लिहिले आहे. बहुत काये लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar writes that the King has entered the fort of Satara. The King was obstructed by Piraji Naik Nimbalker who was afterwards pacified by the intercession of Govindrao, Ramajipant and Yeshwantrao.*

---

*No. 31*] [*30-4-1750*

## श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती प्रार्थना यैसी जे, येथील वर्तमान ताा. वैशाख सुध ६ शष्टी प्रहर दिवसपरीयेंत येथास्थित आसो. यैसियासी येथील वर्तमान तर राजश्रीनी प्रातिनिधीच्या घरी चौकी बसविली. से दिडसे माणूस बसविले आहे की बार पुसल्याखेरीज हे किन्हीस गेले आहेत. अद्यापि तेथून आले नाहीत; व येमाजीपंताची माणसे जे येथे होते तें किल्यावर घातली. बहुत रागांत आहेत व रा। रघोजीबावास सिरपाव रात्री दिल्हा. वरकड सिरपावाचा तपसील पहिले विनंतीपत्र लिहिले आहे, त्याहून विशष पदक १ व जडावाची कलगी यैसी दोन अधिक सनगे दिल्ही; व अडीच प्रहर रात्री आपल्या घरास आले, आणि यासीहि राजश्रीनी सांगितले कीं तुम्हीहि पुणियासी येणे. काये बोलणे चालणे ते तेथे बोलू व रात्री रघोजीबावा व येशवंतराव व गोविंदराव व रामाजीपंत यैसे येकांती खलबत बात करी(त) होते. मग काये जाले हे न कले. जें वर्तमान ऐकिल्यांत येईल ते वरचेवर विनंतीपत्र सेवेसी लिहित जाऊ. बहुत काय लिहिणे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

---

१ परवानगी.

राजश्री आज भोजनउतर कूच करणार. तमाम लोक बाहेर येऊन तयार होऊन उभे राहिले आहेत. दो चौ घटकात कूच होईल. सेवेसी विदित होये हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar reports to the Peshwa that guards are being kept over Pratinidhi's residence and robes of honour have been bestowed on Raghuji by the King.*

---

*No. 32*] [*After 21-4-1750*

श्री

पुा सेवेसी विज्ञापना. किले सातारियाचा विचार तर रा गोपाळबा नित्य आम्हाकडे येतच आहेत. स्वामीनी ऊर्जिताचें अभये दिल्यान रूपरांत अद्यापि काही होऊन येत नाहीं यास्तव मात्र श्रमी होतात. वरकड अंतरंग पाहातां स्वामीच्या पायांसी आरंभापासून जे निष्ठा आहे तीच आहे. त्यांत अंतर किमपि नाहीं. ये गोष्टीचे निदर्शन राजश्री नाना येथे असतां पर्वतावर येक ग्रहस्त आपला विस्वासू पाठऊन शोध आणिलाच होता. पोटासाठी मात्र हाका मारितात. त्यांस आंम्ही जाबसाल करितच आहों. 'तुम्हीं काहीं चिंता न करणे. श्रीमंतास तुमचें अगत्य सर्वांपेक्षां बहूत आहे. वरकड बंदोबस्त होतां. आधीं तुमचा कारभार करून देतील. बेफिकीर असणे' असें बोलतच आहों. राजश्री स्वामीची स्वारी तेथें आली तर गडकरीहि सेवेसी येतीलच. मुख्यार्थ स्वामीच्या पायासी दुसरा अर्थ नाहीं. विदित जालें पाहिजे सेवसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The writer intimates to the Peshwa from Satara that Ramraja was fully in accord with the Peshwa's policy. Gopalrao is the agent of the Pratinidhi.*

---

*No. 33*] [*May 1750*

श्री

पुा सेवेसी विज्ञापना. राजश्री गोविंदराव, येशवंतराव येथे आले नव्हते तेव्हा लोक पोटापाण्याचा अर्ज करीत. तेव्हा लोकास राजश्री जाबसाल करीत कीं गोविंदराव, येशवंतराव आलियावरी पोटास देविती. त्याउपरी उभयेता येथे आलियानंतर लोक अर्ज करू लागले. त्यास आणखी उतर करू लागले की श्रीमंत राजश्री पंतप्रधान व देवराव आलियावरी तुमची खर्चावेचाची बेगमी करून देविती. यैसे जे कोण्ही अर्ज करितात त्यास बतावणी याप्रमाणे बोलतात. खरें दुसरेच. म्हणून श्रीमंत मातुश्रीचे भेटीस सिवापुरास आले आहेत. ते इकडे

सत्वरीच येतील आणि तुमचा निकाल करून देविती यैसे धातुपोषणार्थ लोकांसी जाबसाल करितात. दुसरी गोष्ट काल राजश्री येशवंतराव याजपासी बोलले कीं, राजश्री पंतप्रधान यांजकडील दरमाहाचा यैवज राहिला आहे, येत नाही, म्हणून बोलतां. तरी श्रीमंताकडील यैवज उचापत मोघम सवा लक्ष दीड लक्ष खर्चे उगवला असतां यैवज दरमाहाचा दिल्हा नाही यैसे काये नि(मि)त्य म्हणत होतां म्हणून येशवतरायासी भाषण केलें. रा चितामण थोरात याजला राजश्री बोलले कीं तुंम्ही पंचविसा हजाराचा सरंजाम खाता, यैवज काये करितां? तरी सदरहू पंचवीस हजार रुपये सरकारात देणें. तुम्हास जातीने येक हजार रुपये खर्चास देत जाऊ. बाकी काही देणार नाही, याप्रमाणे बोलले. + सेवेसी श्रु[त] होय हे विज्ञापना. [हस्ताक्षर रामाजीपंत].

¶*Ramraja tries to obtain money.*

---

*No. 34]* *[13-5-1750*

श्री

राजश्री सदासिवपंत गोसावी यांसी.

(रघोजीचा शिक्का.)

॥ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशललेखन करीत असिले पाहिजे विशेष. राजश्री पंत प्रधान यांणी लग्नाचा अहेर वस्त्रे राजश्री नरसिंगराव विठल यांसमागमे पाठविली ते पातलियाउपरी आम्ही कराराप्रमाणें सत्वरीच येतो. आपणास कलावे म्हणोन लिहिले असें. रा छ १७ माहे जमादिलाखर आम्हीहि सत्वरीच येतो. विशेस काये लिहिणे? लोभ असू दिजे हे विनंती.

(मोर्तब सुद.)

¶*Raghuji Bhonsle to Sadashivrao acknowledging the receipt of the wedding dress sent to him by the Peshwa.*

No. 35] [June 1750

श्रीशंकर

श्रीमंत राजश्री भाऊ साहेबाचे

सेवेसी.

आज्ञाधारक व्यंकटराव मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनापना येसी जे. आपणास राजश्री रघोजी भोसले यांजकडे रवाना केले तेव्हा पाच जोडी जासुदाच्या समागमे साहेबी दिल्हे. त्यासी चऊ जोडी याणी वरचेवर * मीस येत गेले. त्यासा रोजमरा पावता केला आणि आम्ही आपणाजवल त्रिंबकजी लांघ्या व जानजी येसे दोघेजन ठेऊन घेतले होते. त्रिंबकजी लांघ्या बहूत शाहणे माणूस म्हणून आपणाजवल ठेवला होता. त्यासी या दोघाजनास रोजमरा पावला नाही. जाते समई च्यार रोजमरे साहेबी दिल्हे तेच पावले. पुढे काही पावले नाही. तर त्रिंबकजी व जानजी याच्या रोजमरियाची आज्ञा द्यावयाची केली पाहिजे. आपण कर्ज याला काहडून दिल्हे आहे तर यांच्या रोजमरियाची आज्ञा केली पाहिजे. बहुत काय लिहिणे हे विनाति.

ताजा कलम रा। येमाजीपंत यांची आनावयाची बहुतसी आवई आहे. सेवेसी श्रुत होये हे विनाति.

¶*Vyankatrao Moreshwar requests Bhausaheb to pay two messengers their wages.*

---

No. 36] [June 1750

नकल.

श्री

राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यासी आज्ञा केली यैशीजे. किले सिहगड तुम्हास द्यावयाचा करार स्वामींनी केला आणि सनदहि सादर जाहाली आहे. त्यास अलिकडे किला स्वाधीन व्हावयांसी दिवसगत लागली याजमुले तुमचे चितात अन्यभाव भासला म्हणून विदित जाहाले. यैसियासी स्वामींनी तुम्हासी करार केल्यावरी दुसरा आहे की काये. हे गोस्ट सहसा घडणार नाही. किला तुमचे स्वाधीन करणे म्हणून राजश्री चिमणाजी पंडित सचिव यास किले मजकूरकरास आज्ञापत्र सादर केली आहेत. किला आपले स्वाधीन करून घेणे. स्वामीची सर्व इमारत तुम्हावरी आहे. तुम्ही दुसरा विचार चिंती न आणणे. आपले समाधान असो देणे. मातुश्री आईसाहेब यास जाऊन बहुत दिवस जाहाले त्यास विनंती करून सत्वर येत ते गोस्ट करणे. सूज्ञ असां.

¶*Ramraja to Peshwa Balajirao, agreeing to hand over Sinhgad to the addressee.*

*No. 37]* *[June 1750?*

**श्री.**

पुा सेवेसी विज्ञापना. राजश्री बोलिले कीं राजश्री संभाजी माहाराज याजकडे पनाला आहे तो आपणास पाहिजे ऐसे पत्र राजश्री संभाजी माहाराजास लिहिणार. आपणास फार जाचणूक केली आहे ती बोलता न ये. राजश्री रघुनाथपंत दादा व राजश्री नाना व राजश्री गोविंदराऊ व राजश्री येसवंतराव हे अद्याप येत नाहीं म्हणऊन नित्य स्मरण करीत असतात. राजश्रींनी आज्ञा केली कीं वाघाची गाडी अद्याप का येत नाहीं ? रथाच्या घोडियास रतीब काये आहे व रथाचे चाकरास रोजमुरा दरमाहे काये आहें व कुचाचे दिवसीं रतीब काये व मुकामीचा रतीब काये आहें व चंदी घोडेची काये आहें ती लिहून पाठवणार स्वामी समर्थ आहेत. सेवसी श्रृत होये हे विज्ञापना.

¶*Purandare's clerk to Peshwa, informing the latter that Ramraja has asked Sambhaji of Kolhapur to hand over the fort of Panhala to him.*

---

*No. 38]* *[June 1750*

**श्रीशंकर**

सेवेसी आज्ञाधारक व्यकंटराऊ मोरेश्वर कृतानेक साा नमस्कार विनंती विज्ञापना यैसीजे. माहाराजानी राा रघोजीबावास पत्र पाठविले ते त्यांजला प्रविष्ट केले. त्याणी सांगीतले कीं राजश्री त्रिंबकजी बावा भोसले गेले आहेत, त्याचे उत्तर आलियावर ज्याप्रमाणे पत्र येईल त्याजप्राा भेटीस जावयाचे केले जाईल. व रा. बावास कोन्हे ग्रहस्तानी तीन पत्रे रात्री पाठविली कीं श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांची स्वारी तुम्हावर छयापा घालावयासी येतात; तर पत्रदरशनी तुम्ही फौज तयार करून बंदोबस्तीत राहणे. यैसी तीन पत्रे आली. येक दोन प्रहर रात्री व येक अडीच प्रहर रात्री व येक तिसरा प्रहर यैसे तीन पत्रे आली. ते बजिनस आम्हास दाखविली. वरकड वर्तमान रा. माधवराऊजीनी सेवेसी लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. बहुत काय लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar informs the Peshwa that secret warnings have been received by Raghuji Bhonsle to prepare himself against a sudden attack from the addressee.*

No. 39] [3-6-1750

श्री

तीर्थरूप राजश्री नाना तथा राजश्री
भाऊ स्वामीचे सेवेसी.

आपल्ये त्रिंबक सदसिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान तागायेत छ ९ रजब पावतो स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशस. दरमाहाच्या खर्चास यैवज स्वामीनी तसि हजार रुपये पाठविले, त्याचा खर्च जाहला. पुढे जेष्ठ मासचे नेमणुकेस तूर्त यैवज पाहिजे. तिसा हजारापैकी पोतास यैवज राहिला नाही. वरचेवर स्वामीची सिलेदाराच्या वरोताची[1] व मातुश्री आईसाहेब वगैरे देणे याची रवासुदगी[2] होती व दरमाहाचा खर्चास यैवज नाही. तरी तूर्त यैवज रवाना करावयासी स्वामी खावंद असेत. मागाहून जेष्ठमासची नेमणूक लेहून सेवेसी पाठवितो. इमारतीस व स्वारी मजकूरच्या खर्च व आईसाहेबाची बाकी राहिली त्यास यैवज द्यावयासी नाही. पोतास तो हजार दोन हजार रुपये राहिले. तरी तूर्त रवानगी यैवजाची करावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Trimbak Sadashiv Purandare asks the Peshwa from Satara for funds to meet the expenses of Ramraja.*

---

No. 40] [4-6-1750

पो. छ १२ रजब.

श्री

तीर्थरूप राजश्री नाना व राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी. अपल्यें त्रिंबक सदासिव कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ १० रजब मंगलवार मध्यरात्र जाणून स्वकीय कुशललेखन करीत गेले पाहिजे विशेष. दरबारचे मजकुराचे अर्थ आलाहिदा पुरवण्या वरून विदित होतील. अतःपर येथें काही बाकी राहिली नाही. स्वामीनी याची पैरवी[3] करणे असेल तसी करावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Trimbak Sadashiv Purandare communicates to the Peshwa that matters have come to a head at Satara.*

---

१ वरात – हुण्डी. २ रवासुदगी = पावती ;

३ व्यवस्था; विचार.

*No. 41]* *[6-6-1750*

श्री

+तीर्थरूप राजश्री दादा स्वामीचे सेवेसी.

आपलें त्रिंबक सदासिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ता. छ १२ रजब पावेतो स्वामीच्या कृपे करून येथास्थित असे विशेष. स्वामींनी आज्ञापत्र पाठविले ते पावोन बहुत संतोष जाहला. याच प्रकारे निरंतर पत्र पाठऊन सांभाल करणार स्वाम समर्थ आहेत. मल्हारबास अणावयासी सुभेदार पाठविले होतें. मल्हारबानी जयापाची आट धरली. जयापा तर येतच नाहीत. ताराबाईचा गुंता उरकलियावर तिकडे जावयाचा विचार आहे. बाबाचे मनात जावयाचे नाही म्हणून लिहिले. यैश्यास जयापा मल्हारबा आपली काबू[१] केल्या खेरीज काही यैकत नाहीत. त्यानी पुर्ते वजन घातले आहे. कसे होईल ते हो. येथील मजकूर तर राजश्री, ताराबाईस अणावयासी येत नाहीत. समजाविसी करीत नाहीत. सिंहीगड न द्यावा म्हणून राजे सचिवास व सिंहीगडकऱ्यास वरच्यावर लिहित असतात. राजश्रींची बुधी सुधी नाहीं. सर्व तीर्थरूपानी केला कारभार मोडतात. ज्याचे आगत्य तीर्थरूपास तितके दुसमान राजश्री जाणतात. याप्रो मार आहे. येमाजीपंताची मुले मनुष्ये सातारियावर आहेत. तूर्त काही उपद्रव नाही. येमाजीपंतानी मिरज प्रांती धामधुम मांडली आहें. गुरे वळून नेतात. बाबदेभट येथे आणले आहेत. अत:पर काये होईल ते पाहावे. बाबदेभट बाहेर घातले होते ते पुन्हा आणले आहेत, उदाजी चव्हाणास निरोपाची वस्त्रे जाहाली. एका दो रोजा जातील. रघोजीबावाही दो चौ रोजानी निरोप घेणार. होईल वर्तमान वरच्यावर लिहीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶A letter disclosing Ramraja's intrigues with Yamaji Shivdev against the Peshwa. Malhar Rao Holkar and Jayappa Shinde were displeased with him.*

---

*No. 42]* *[6-6-1750*

श्री

पुा तीर्थरूप राजश्री नाना ता

राजश्री भाऊ स्वामींचे सेवेसी.

विनंती उपरी. आजी भृगुवारी राजश्री उदाजी चव्हाण यांस राजश्रींची आज्ञा देवावयास्तव राजश्री गोविंदराव व रामाजीपंत[२] यांस दरबारास पाठविले.

---

+ नाना पुरंदऱ्याचें रघुनाथरावास पत्र. १ संधि साधणें, डाव साधणें.

२ पोतनीस, पुरंदऱ्यांचे पोतनिसीचा कारभार करणारा. याचा मुलगा व्यंकाजीराम, देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण, रा. वडगांव, सं. भोर.

उदबास तरवार व अंगावरील सेला देवऊन निरोप दिल्हा. तदनंतर राजश्री स्वामी उभयेतांस बोलिले कीं, नानास उदईक दरबारास घेऊन या आणि राजश्री संभूसिंग व पिराजी नाईक व पानगांवकर व जिवराव सिंदे वगैरे यांस राजश्री प्रधानपंतानी ज्याप्रो सरंजामाच्या यादी पहिलें करार केल्या आहेत त्याप्रो हातरोखे घेऊन कारभार विल्हे लावा. वरकडहि कारभारविषई तुम्हांखेरीज आपण नाहीं. तुम्ही कराल त्यांत मी आहे. दरबारास येऊन सर्व कारभार करीत जावा. दर्याबाई व बाबाजी जाधव आदिकरून पुण्यास यादी करार जाल्याप्रो हातरोखे घेऊन ज्यांचे त्यांस देणे. आम्हाकडे अत:पर गुंता नाहीं असें बहूत बहूत नरम येऊन बोलले. मग उभयेता उठोन येऊं लागले; तो राजश्री संभूसिंग जाधवराव, यांस पायेऱ्याजवळ भेटले. उभयेतानी संभूसिंगास सांगून आले. तुम्ही राजश्रीच्या मुजरियास जातां. तुम्हांसी राजश्री प्रसंगानसार बोलेले तर समर्पक जाबसाल करावें, म्हणून बोलून आले. त्याजवरी जाधवराव यांचे राजश्रीचे दर्शन जालियावर राजश्रींनी त्याजवळ कारभाराचे मजकुराचे उल्हाणे[१] दिल्हें कीं, कारभार करा म्हणत असतां कोणी रुसतांत, कोणी घरीं बसतात. राजश्री नानानी केल्या करारप्रो कारभार करून विल्हे लावा म्हणत असतां येत नाहींत. मीं तर नावाकीफ, यैसे बोलिले. त्याजवरी जाधवराव बोलले आम्ही येक दर्याबाईच्या मजकुरास मात्र वाकीफ आहों, वरकड दुसरे कारभारास वाकीफ नाहीं जे, तुम्हांसी जाबसाल करावा. वाकीफ जालियावर उतर प्रत्योतर करूं. त्याजवरी राजश्री बोलिले आतां रात्र जाली प्रात:काली यावे. दोन गोष्टी बोलणे आहेत म्हणून बोलून डेरियास जावयास निरोप दिल्हा. राजश्रीचा भाव सांप्रत या येका दों दिवसांत दिसोन येतो कीं, स्वामीचे लक्ष धरून सर्व कारभार करावा असे आहे. परंतु शास्वतबुधी नाही. क्षणभंगूर विचार आहे. कारभारास बोलावितात. जावे न जावें, स्वामीचे लक्ष धरून कारभार करूं लागल्यास करावा न करावा, ती काये आज्ञा ते लिहिली पाहिजे. सारांष[+] दर्याबाईला नवा सरंजाम द्यावयाचा आहे तो आधी द्यावा म्हणजे जाहाले. हा मतलब आहे. याचा पुर्ता विचार करून ल्याहावे, त्याप्रमाणे करू. संभूसिंग दोनदा आमच्या घरास आले होते. बोलावयाचे रीतीने आम्ही व राऊ[२] मारनिलेसी बोलोन निरोप दिल्हा. कळले पाहिजे हे विज्ञापना.

¶*Ramraja accepts the policy dictated by the Peshwa. But Purandare writes that he cannot be relied upon on account of his unsteady temperament.*

---

१ तक्रार सांगणें. + पत्र नाना पुरंदऱ्याचें. २ गोविंदराव चिटणीस ?

*No. 43]* *[June 1750*

श्री

पुा सेवेसी विज्ञापना. काल राजश्री फतेसिंग बावाकडील मजकूर लिहिला. त्यास रा शामरायानी सागितला त्यावरून लिहिला. परंतु भगवंत नाईक पुरंदरे राजश्री गोविंदराव व रा येसवंतराव याचे घरास जाऊन खलबत करितात. त्यास मातुश्री दर्याबाई फतेसिंग बावाचे घरास गेली होती. तेव्हां भाषण जाले कीं राजश्री कांहीं नजर द्यावी व दर्याबाईसहि आशा दाखविली. त्यावरून दर्याबाईनी उतर केले की राजश्री पंतप्रधान यानी केले आहे ते काही मोडवत नाही. परंतु राजश्रीस पुसोन पाहातों, त्यासारिखे तुम्हांसी बोलोन उतर करूं. व येशवंत रायानीहि फतेसिगबावाचे कारभाराविसी कान पाडिले आहेत. राजश्रीची मर्जीचा प्रसंग असा आहे कीं स्वामीनी जो कारभार केला आहे, त्यामध्ये आपले कार्यायोग्य उतम आहे तो करारच कार्याचाच आहे. जो कार्यायोग्य राजश्रीचे मर्जीचा नाहीं तो काही ध्या(ना)स येत नाही. त्याची घडमोड करावी ऐसे दिसोन येत आहे. सांप्रत स्वामीनी केल्या कारभारांत राजश्री घनबा मंत्री यांची दोन खेडी खरांडे व सेनगाव दूर करून खासगीस ठेविली. याजमुले मंत्री खटे जाले आहेत व राजश्री महिपंतराव सुमंत याचे कारभाराविसीं त्याजकडील लिहिणाराचे कानूकायदे राखितात आणि डोलहि राजश्रीचा मुनसीकडेच आहे. सुमंताकडे कांहीं ममता दिसत नाहीं व भा(व)गर्भ ऐसा दिसोन आला कीं मुनसीनी व गोपाळ नारायेण यानी राजश्रीस नजरेचा आशये दाखऊन बोलले असतील कीं आम्हीं साहेबांचे गरीब चाकर, येकनिष्ट सेवक, आणि ते आहेत ते राजश्री पंतप्रधान याचे मायेममतेचे आहेत. त्यास श्रीमताचा आश्रये आहे. आम्ही निखालसपणे स्वामीसेवा करितो. येणेप्रमाणे राजश्रीपासी येकांती नारोजीचे विद्यमाने बोलत असतात व काही नजरेचा विचार त्यानी नारोजीचेच विद्यमाने करणे तो करितात. व राजश्री विष्णुपंताकडील कारभार रा माहादजी सालोखी यानी राजश्रीस सात हजार रुपये नजर करार केले होते. त्यापैकी तीन हजार तूर्त रोख घेतले. त्यास शामराव बोलले कीं राजश्रीस अर्ज केला कीं राजश्री पंतप्रधान यानीं केले आहे त्याप्रमाणें विष्णुपंताचा कारभार चालवावा. त्यास राजश्रीनी उतर केले कीं दिवाणजीने माहादजी सालोखी व संतु खेडकर याचे अनुमते करणे ते करावे. यांजखेरीज तिलतुल्य कारभार करू नये व सिवाजी हरी यास काये पावत होते व गावखेडे काये आहेत त्याची यादी लेहून देणे म्हणून राजश्री बोलले. त्यावरून रा रामाजीपंतानी सिवाजीपंताचा आवेर्जा[१]

---

१ हिशेबी वही.

आणून दाखविला. येणेप्रमाणे मौजे चिंचणी निमे व बेदरी निमे पुनवडी १ येक व जमीन काडोली पैकी बिघे ८२२ व आपासिंगेपैकी पावचावर येणेप्रमाणे याद दाखविली. यावरी राजश्री यादिवरी करार करून दिल्ही व सोनई सिवाजीपंताकडे होती ते खासगीकडे ठेविली. याजकरितां शामराव व रामाजीपंत राजश्रीस अर्ज करितात कीं सोनई गाव आपला पूर्वीचा आहे तो पूर्ववतप्रमाणे द्यावे व वतनी गाव तांबवे आहे तेहि करार करून द्यावे; याखेरीज पांच हजार रूपये तैनात व पालखीचे बेगमीचे नवसे रुपये येसे करार करून द्यावे, येसी मर्जी दिसत आहे. येविसीं राजश्रीस नजर काही दाहा हजार पर्यंत रामाजीपंती कबूल केली आहे, येसी वदंता आहे. व वरचेवरी किल्याचे मजकुराविसीं सचिवपंतास सांगोन पाठवितात कीं, श्रीमंत राजश्री पंतप्रधान यास किला येकंदर न देणे व लोक बोलतात की मातुश्री आईसाहेबास गडकरी किल्यावरी घेत नाहींत. त्यावरून राजश्री बोलतात कीं आम्ही पुणियास जाते समई गडावरी जाणार होतों तेव्हा आम्हासहि गडावरी न घेऊ येसे गडकरी बोलत होते. गडकरी हरामजादे आहेत येसे बोलले व येशवंतराव बोलले कीं मातुश्री आईसाहेबास खासा येका पालखीनसी मात्र गडावरी घेणे जालेच तरी बहूतसें प्रयासें घेऊ. दुसरे येक माणूस घेणार नाहीं, येसे वर्तमान आहे म्हणून येशवतराव बोलले. त्यावरून राजश्रीची मर्जी गडकरियावरी खूष आहेत. गडकरियास सचिवपंत खर्चाविचास काही देत नाहीत. तरी गडकरियास खर्चाविचास देऊन त्याची बेगमी करावी येसे बोलतात. रा विसोबा वैद्यापासीं येकांती बोलतात कीं गडकरी यास तूर्त दोन तीन हजार रुपये खर्चास देणे. पुढेहि लागेल ते देऊ व हुजरातीस किरकोळी पैका जमा होतो तो नारोजीकडे जमा करवितात. येशवतरायाकडे काही पोता जमा हिसेब नाहीं. परभारेच येवज येईल तो नारोजीकडे ठेवितात व खर्चाच्या लोकांच्या देणियाच्या यादी आहेत त्यामध्यें करारदाद येसे करितात, त्यावरून लोक खासगीचे राजश्रीस आर्ज करितात की जे कार्ये करणे ते साहेबी करावे व घेणे तेहि साहेबी घ्यावे. आम्हापासोन नजरहि घ्यावी परंतु आमचे सुदामतप्रमाणे करावे व प्रतिनिधी कांहीं आपले कारभारांत नाहींत. गोपालराव मात्र दरबारास येऊन राजश्रीचे मर्जीमाफक कारभार करणे ते करितात. राजश्रीने जे बोलावे ते यानी होये म्हणावे. याप्रमाणे गोपालराव कारभार करितात. त्या कारभारास काही जीवसा दिसत नाहीं. हुजराती लोक व सिलेदार बारगीर अर्ज करितात कीं आम्हास पोटास रोजमुरा देत जावा. जे मागील राहिले असेल त्याचाहि हिसेब पाहोन आमचे देणे निघेल ते द्यावे. राजश्री बोलले पेसजीचे आपणास कांहीं ठावके नाही. ते आम्ही जाणत नाही. हाली मृगसालापासोन तुम्ही चाकर

आमचे. जे आम्ही करार करून द्यावे तें तुम्ही घ्यावे ह्याप्रमाणे ज्यास पुरवेल त्याणे राहावे. ज्यास न पुरवे त्याणे जावे. सेवेसी श्रुत हाये हे विज्ञापना.+

¶*The writer Purandare gives a true picture of the conditions prevailing at Satara, especially the troubles that had arisen in the administration of Ramraja owing to the interference of many people.*

---

*No. 44*] [पो *7-6-1750*

छ १३ रजब

**श्री**

पुा तीर्थरुप राजश्री नाना व ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती. राजश्री घनःश्या मंत्री यानी राा शामरायांसी[१] अनुसंधान करून दर्याबाईचे घरास जाऊन राजश्री स्वामी व शामराव व आपण मिळोन आपले कारभाराविसी बोली केली कीं आपलीं गावखेडी सरंजाम जो आहे तो पूर्ववतप्रमाणे चालवावा. आपले कारभारांत किमपि तफावत करू नये. जे करार करावें ते सेवटास न्यावे. यैसे बोलोन दर्याबाईकडून शपतप्रमाण करून घेऊन राजश्रीस व दर्याबाईस नजर नजराणा कबूल करून शामरायास काही देऊन आपला कारभार गावखेडी [व]गैरे जे होते ते करून घेतले. जाला कारभार वर्तमान सेवेसी लिहिले असे. इमान प्रमाण चांगले जाहले. हे विज्ञापना.

¶*Ramraja and his sister Daryabai Nimbalkar work in league with Ghanashyam Mantri.*

---

*No. 45*] [*9-6-1750*

**श्रीशंकर.**

आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सां नमस्कार विनंती प्रार्थना यैसीजे. येथील क्षेम ताा छ १९ माहे रजब रविवारपावेतों साहेबांचे कृपाआवलोकनेकरून येथास्थित आसो विशेष. येथील वर्तमान तों राजश्रीनी सिंहगडाकडे दोनसे माणूस रवाना केले आणि आठ हजार रुपये व पनास जिजाला यैसे रवाना केले आहेत. आणि गडकरी यासी हातरोखा लिहिला कीं, तुम्हास

---

+ पत्र पुरंदऱ्याचें.

१ शामराय दर्याबाईचे तर्फेनें उद्योग करणारा एक गृहस्थ.

खर्चास वरचेवर आणिक पाठवितींत, परंतु गड त्यांचे हाती न लागे तें करणें. नाहीतर तमाम येकून येकाच्या गर्दना मारू. वकील यैसे बोलले. या कामात नारूकाका बहुतसे पडले आहेत. आणि राजश्री आवघ्या गोष्टी प्राक्तनावर घातल्या आहेत. आणि ज्याजवर त्यांजवर तोंड टाकितात. आणि भलत्यास भलतें बोलतात. मागे पुढे काही विचारीत नाहीत की, कोन मनुश कोण्या पधतीचे आहे, यासि काये बोलावे ? परवा राजश्री रघोजीबावा, येशवंतराव यांच्या घरास गेले होते. त्यासी येशवंतराव बोलले कीं, बहुत दिवस दरबारास गेले नाहीत तर आज येतां कीं काये ? तेव्हा हेहि दरबारास गेले. त्याणी रघोजीबावास म्हणाले कीं आज येथेच भोजन करणे. त्यासी भोजनास रघोजीबावा व त्रिंबकजी-बावा व बुर्‍हानबावा यैसे तिवेजन राहिले. भोजन जालियाउपरी सत्वरच आले. परंतु दर्याबाई तर बहुत याजवर कुंट[1] आहेत. मग सुक्रवारी राजश्री नानांकडे रा बावा गेले होते, त्यास श्वामीनी राजश्री नानांस पत्र लिहिलें होते. ते पत्र बजिनस रघोजीबावास दाखविले. त्यास बावानी हस्तअक्षर विनंतीपत्र लिहिले आहे आणि रा नानास वचन आनभाश दिल्ही कीं, श्रीमंत ज्याप्रो आज्ञा करितील त्याजप्रो आपण राजश्रीसी जाबसाल करू. आणि रा रघोजीबावानी परिश्चिन सांगितले कीं ज्या काही फितव्या फांदोड्या मधे आहेत त्यांजला शहर-बाहेर करून द्यावे. नाहीतर आम्हास आज्ञा करावी, आपण हे काम करितो. त्यास राजश्री बापूजीबावास काल शनवारी रात्री सिव्याका(गा)ळी केली. त्यासी ते घरी बसले होते. मग आज प्राथकाली राजश्री श्वारीचे मिसे बाहेर निघाले ते पालीकडे गेले. थोरातावर जातेत. तमाम लोक मागून बोलावले आहेत. त्यासी मागे राजश्री नानानी रघोजीबावास व गोविंदराव व उदाजी चव्हान व येशवंतराव यासी बोलाऊन मसलत केली. त्यासी राजश्री नाना बोलले कीं यास काये तजवीज आहे ? तेव्हा समस्त मिळून मसलत ठराविली कीं समस्तानी जाऊन त्याजला पुढे घालून घेऊन यावे. त्यासी राजश्री नाना बोलले कीं आम्हास आज्ञा नाही. मग उदाजी चव्हान व गोविंदराव बोलले कीं, तुम्हा-वेगळे ते काही परतून येणार नाहींत. त्यासी मग जरूरीस जाणे लागेल. त्यासी तेथे गेलियावर काये वर्तमान होईल तें विनंतीपत्र सेवेसी लिहिले जाईल. व उदाजी चव्हान यांचे भाऊ रतोजी चव्हान व येसाजी सिंदा मातबर माणूस आणिक येक तिवेजने सरदारासी व येमाजी सिवदेव याच्या पुतण्या त्रिंबकराऊ यासी लढाई जाली. सिंदा कामास आला आणि मातबर माणसे मेली,

---

१ कूड —Evil-minded.

यैसे वर्तमान आहे. यामुले उदाजी चव्हान बहुत आजुर्दा[1] आहेत. उदईक आज्ञा घेऊन जाणार आहेत. येविसी उदाजी चव्हान याणीहि पत्र लिहिले आहे. सेवेसी श्रुत होये, बहुत काये लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar informs the Peshwa of the despatch of a contingent to Sinhagad by Ramraja with precise orders to the Killedar that the fort should not be handed over to the Peshwa. The king's departure to Pali and a skirmish between Chavan and Mutalik are other items in the letter.*

---

*No. 46*] [*10-6-1750*

## श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती. प्रार्थना यैसीजे ता। जेष्ट वद दितिया घडी साह रात्र जाणून साहेबकृपेकरून येथास्थित आसो. विशष येथील वर्तमान समस्त मंडलीनी राजश्रीकड जावेसा निश्चये केला. त्यासी राजश्री परतले म्हणून बातमी आली. त्यासी रा। रघोजीबानी राजश्री नानांस सागून पाठविले कीं राजे आले, आपण न येणें. त्याजवरून गोविंदराऊ व येशवतराव हेहि राहिले. मग रा. रघोजीबावा उरमोडीच्या वाटेने जाऊन माथ्यावर बसला. तो राजश्रीची स्वारी आली. तों राजश्री बुऱ्हानजीबावा पुढें येत होते. बावांची व त्यांची भेटी जाली. मग त्यांणी साकल्य वर्तमान सांगितले कीं राजे जे समयी सिकारीस गेले ते समयी रा. गोविंदराव याचे देवि जन कानडे प्यादे जलदीने येत होते. त्यांजला पुसले कीं तुम्हीं कोठून आलेत ? त्याणी सांगितले कीं आम्ही गोविंदराव चिटनिवीस याचे चाकर आहों. किला घ्यावयासी गेलो होतो. त्यास किला घेतला. मग राजे बहुत ताई भरले. आणी सिव्यागाली करूं लागले. तेव्हां बापुजीबावा समागमीच होते त्यासीहि सिव्या दिल्हा. तेव्हां परस्परेहि सिव्याचे गौरव जाले, ते कोठवर ल्याहावे. तेव्हां बापुजीबावा पेट कटारी करून घेत होते. मग खडराव जाधव व बुऱ्हानजी मोहिते या उभयेतानी सांगितले कीं हे काये करितात. तेव्हां हातची कटारी हिराऊन घेतली आणि राजश्रीच्या पाया पडता पडता समजावले कीं जे आपण आज्ञा करतील त्याजप्रो। वर्तनूक करतील. तेव्हां राज म्हणाले जे माझा किला याणी द्यावा. तेव्हां बापुजीबावा बोलले कीं तर आम्हास विडे द्यावे ; आपण काही राहणार नाही. उदईक दिवस उगवतो आणि किल्यावर नेऊन घालतो. त्यासी त्या

---

[1] अजुर्दा — दुःखी ; कष्टी.

किल्याचे जामीन खंडेराव जाधव व बुऱ्हानजी मोहिते हे दरमियान आहेत कीं उदईक किला सरकारात देवितो. स्वामीकडील बहुतसे मुख आले आहे कीं ब्राह्मण आणि परभु येक जाले आहेत. आणि तिसरा मराठे यासीहि आपल्यात सामील केले. आणि माझ्या राज्याचा खेलच केला आहे. जर मी शाहू राज्याचा लेक होईन तर यांजला तमाशा दाखऊ (अपूर्ण).

¶*The high words that passed between Ramraja and Bapuji Bawa are reported to the Peshwa by Vyankatrao Moreshwar.*

---

*No. 47*] [*12-6-1750*

छ २० रजब.

जाबसुा.

**श्रीशंकर**

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा नमस्कार विनंती प्रार्थना यैसी जे, येथील वर्तमान ता जेष्ट वद्य ४ चतुर्थी मंगलवार दोन प्रहरपावेतों साहेबांचे कृपे करून येथास्तित असो. विशेष राजश्री गोविंदराव व बापूजीबावा यैसे घरी बसले आहेत आणि चिटनिसींचे वडिलकीचे धणी जें मुले आहेत ते राज्याकड पाठऊन दिल्ही. त्याणी मुले माघारी वाटे लावली कीं आम्ही ज्यास सांगो तोच कार्य करील आणि गालीप्रधानास तर कमी नाही आणि बापूजीबावाहि काही चुकत नाहीत. उतरास प्रतिउतर चांगले देतात आणि राजश्री सिदभटजी राजश्री बावाचे कारभारी आज तीन च्यार दिवस राजश्रीच्या आणि यांच्या मध्यस्तीत आहेत आणि आमचे दरबारचे इतबारी आहेत आणि रा रघोजीबावास म्हणतात कीं, राजा बहुत शाहणा आहे. ज्याणे काही पेशवियांचे पाये भोईस लागू दिल्हे नाहीत कीं ज्याणी या पदवीस बसविले तैसेच चिटनिसास बाहेर काहडून द्यावे हा विचार केला आहे. त्यासी त्यांच्या विचारांत आपण असावे आणि राज्याभाराचे कामकाज मनावर धरून आपण राजश्रीस मिलून करावें. त्यासी हे गोष्टी त्यांच्या तोंडातून यैकताच परिश्चिन त्रिंबकजी भोसले हेहि बसले होते याज देखतांच बोलले. त्यासी याणी जाब दिल्हा कीं ह्या गोष्टी तुम्ही बोलता इतकियावर ह्या गोष्टी मुखावाटे काहडू नका आणि आम्ही यैकणार नाही आणि याणे तुमचीहि प्रतिष्टा राहणार नाही कीं ज्या पेशवियांच्या मुळें आम्ही या पदवीस आलो आणि त्यांणी आमची आमचा सर्वेश्वर

आंगिकार केला असता त्यांची आमची क्रियाप्रमाण जाली आणि आगोदर त्याचा आमचा विरूध्य वाहडला. आता कधीहि मित्रत्व तुटत नाही मग काही हे आमचा प्राण जावो अथवा दौलत जावो परंतु आम्ही त्यांच्या पांयासी आंतर करणार नाही. तेव्हा उभेच राहिले आणि त्रिंबकजी भोसले याणी जाब दिल्हा की जें इष्टत्वे मिलवावयासी श्रम लागले ते आम्हास ठाऊक आहेत यैसे आसोन आपण मधे विश कालवावे यैसे नाही. तेव्हढे रात्री आम्हा बोलाऊन सांगितले कीं या प्रकारे वर्तमान आहे आणि आज प्राथकाली या कार्यासाठी येशवंतराव याणी बोलाऊन नेले होते. तेथे त्रिंबकजी भोसले व भटजी उभयेता गेले होते. त्याणी ह्याच गोष्टी सांगितल्या. त्रिंबकजी भोसले याणी जाब दिल्हा कीं आमची येकच गोष्ट आहे कीं पेशवे जितके पाणी पाजतील तितकें आपण पिऊ आणि ज्याप्रो श्रीमंत आज्ञा करतील त्याजप्रो आपण वर्तनूक करून; आणि दुसरियाचे आम्ही यैकनार नाही यैसे पष्ट सांगितले. त्यासी ते म्हणाले कीं आम्ही इतके दिवस आपली वस्तभा लांबविली नवती परंतु आता लांबवणे लागली. मग राजश्री रघोजीबावाजवळ हे वर्तमान आम्हा देखता सांगितले. त्यासी आम्ही रघोजीबावास परिश्चिन सांगितले कीं भटजी दुतरफा नाहनायाचे धणी परंतु आपल तुमचे ढुंगी आहे. पोहा पोहा. (?) जाल तेच म्हणल परंतु पलिकडे नेणे कठीण आहे. त्यासी आम्हास व त्रिंबकजी भोसले यासी येकीकडने सांगितले कीं आपण श्रीमंतासी वचन दिल्हे आहे त्यासी अंतर करून तर आपणास शपत आहे आणि जे शपत वाहू ने ते वाहिली. आणि बोलले कीं आमचा प्राणहि जावे परंतु अंतर करणार नाही. यांची निष्टा स्वामीचे ठिकानी बहुतसी आहे आणि उघड उघड यांला अनुर्गह करितात परंतु यैकत नाही हे वर्तमान आहे. हा कागद कोन्हास न दाखवणे आणि आमर्यादा करुन बेआदाई करून लिहिले आहे. माहाराजानी रागास न यावे. आम्ही लेकरे आहोत. आपराध क्षेमा करीत जाणे आणि रा। रघोजीबावास व त्रिंबकजी भोसले यासी व सिदभट यासी त्रिवर्गास तीन कागद लिहिणें कीं वृती ठिकानी असोन देणे. बहकल्याने उतम नाही, यैसे उगच लिहून पाठविले पाहिजे. इतकियावर माहाराज धणी मायेबाप आहेत. बहुत काय लिहिणे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति. येथे जे वर्त होते ते वरचेवर रोज जाऊन राजश्री नानाचे सेवेसी जाऊन नित्य दोन वख्त जाऊन विनंती करितो ते सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*The letter gives the result of an interview between Ramraja and Sidhbhat on behalf of Raghoji. Ramraja was reluctant to oppose the wishes of the Peshwa.*

628

*No. 48]* *[After 13-6-1750*

**श्री**

पुा सेवेसी विज्ञापना. राजश्री उदाजी चव्हाण यांजकडील सांप्रत वर्तमान तर सिदोजी थोरात यानी उदबास मेजमानी करून याचे त्याचे बोलणे चालणे खलबत काये जाले ते काही कोठे प्रगट अद्यापि जाले नाही. उदबा आष्टियावरी आहेत. याउपरी वारणा उतरोन जाणार आहेत. तदनंतर काये मनसबा होईल ते पाहवे. हे वर्तमान राजश्री आपा चिटनीस याजकडे तिकडोन आले त्यावरून सेवेसी लिहिले असे. राजश्री प्रतिनिधीची पत्रे अंताजी सिवदेव यांजकडे जातात की, जमावसुधा सतरुसीस येक वेल येणे म्हणून बोली आहेच. तेहि जमाव आणखी धरितच आहेत. प्रतिनिधीनी येथोन दोनसेपर्यंत स्वार व प्यादे मिलोन कोले[१]यास रवाना केले असेत. +सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

¶*News-letter from Satara to Poona about the development of situation against the Peshwa.*

---

*No. 49]* *[13-6-1750*

**श्री**

**+तीर्थरूप राजश्री नाना व ताा**

**राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी,**

आपत्ये त्रिंबक सदासिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा छ १९ रजब बुधवार दीड प्रहर दिवसपरियेंत येथास्तित असें विशेष. स्वामीनी पत्रे पाठविली ती पावली. उतरे पुर्वण्यावरून विदित होतील. सिदोजी थोरातानी अष्टे घेतले. कालच त्याचे पत्र आम्हास आले. येसाजीच्या मुलकांत धामधूम करीत जावी याप्रो केले आहे, होतच आहे. स्वामीनी पत्राची उतरें येकच विचार करून लौकर पाठवावी. राऊत आधी दोन च्यारशे सत्वरं पाठविले पाहिजेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Purandare asks for military help from Poona.*

---

१ मौजे कोळे, जिा सातारा. + रामाजी माणकेश्वर, पुरंदऱ्याचा कारकून, याचें पत्र असावें.

No 50] [14-6-1750

## श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यकंटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती प्रार्थना यैसीजे. येथील क्षेम ता। छ २० माहे रजबु गुरुवार प्रहर रात्र जाणून साहेबांचे कृपे करुन येथास्तित आसों विशेष. राजश्री रघोजी भोसले यांकडे बाबू भट उपाध्य पाठविले. त्यां समागमे राजश्रीनी सांगून पाठविले कीं तुम्ही वडील आहात. आमचा परामृश करीत नाहीत. आणि वाडियांत येत नाहीत. येथे ब्राम्हणानी बहूतसा राडा केला आहे. तमाम माझ्या राज्यामधे खेल केला आहे. हे तुम्हास बरे दिसतें कीं काये ? यावे आमच्या मिलनीत मिळावें, आणि या गोंष्टीचे पारपत्य करावे यैसे आहे. त्यासी तुम्ही नाही येत हे गोष्टी काहीं उतम नाही. त्यासी याणी जाब दिल्हा कीं तुम्ही कोणते आमचे म्हटले ऐकणार. ज्या पेशवियाणी तुम्हास या पधतीस आनले त्यांचा विचार या प्रकारचा केला. मातुश्रीचा विचार त्याप्रकारें जाला. चिटनिसाचा खेल जाला. आता आम्ही चवथे राहिलो आहोत. त्यासी पेशवियाणी आमच्या गोष्टी तुमचे कानावरून घातल्या कीं जिंतीचे हातरोखे व कडीवलीतची देशमुखी व वायेदेशी गाव व श्वदेशी माहाल येसे द्या. ते आऊसाहेबानी मान्य करून व तुम्हीहि मान्य केले व पेशवियानीहि मान्य करून आमच्या कामाकाजाचा निकाल करुन दिल्हा. त्यासी आम्ही येथे असताच कडवलीतची देशमुखी बहिरोपंतास दिल्ही व जिंतीस हातरोखे व हुजरे पाठविले. गावांस आणि परगणियासी वावच नाहीं. येक्या गोष्टीचे शाश्वत नाही. आणि आपण काही तुम्हाकड येणार नाही. जे पेशवियानी केले ते मोडे. तेव्हा आणिक राहिले काये ? आम्हास सुखरुप निरोप देत असला तर उतम आहे; नाहीतर पेशवियाची रजा घेऊन जाऊ, यैसे परिश्चिन सांगितले. मग बाबुभट उपाध्ये राजश्रीकड गेले. मग त्याचे उतर पुण्हा आले नाही. मग तिसरे प्रहरा राजश्री फतेसिंगबावा रा। रघोजी बावाचे घरास आले. त्यासी खलबतास जाऊन बसले. तेथे उभयेतां मुख्य व बुऱ्हानजीबावा व सिदभट आणि पाच साह जन होते. तेथ आपणहि होतों. त्यासी फतेसिह बोलले कीं आपण रविवारी श्वार होऊन जातात. येथे तर खूल माजले आहे. आमची काये गत्य करून जातात ? त्यासी तुम्ही पुणियासी जातांत; आज्ञा होईल तर समागमे आपणहि येऊ अगर ज्याप्रा। सांगाल त्याज प्रा। वर्तनू करू. तेव्हां बाबानी सांगितले कीं आपण पुणियासी जातांत. तेथे तुमचे वर्तमान पेशावियांचे कानावरुन घालून त्यांच्या विचारे जे आज्ञा करतील त्याजप्रा। वर्तनूक करणे. तेव्हां समागमे रा। त्रिंबक

हरी व रामाजी नाईक पुरंधरे हे उभयेतांस मागे देणार यैसा निश्चये करून ठेवला आहे. मग रा। रघोजी बावानी त्यांसी वस्त्रे दिल्ही. मंदील पैठणी १ व दुपटा पैठणी व किमखाप व महमदी झग्यास दिल्ही. यैसी वस्त्रे दिल्ही. मग उठून गेले; व येमाजी सिवदेव यांसी आनावयाची तजवीज केली. येथून गुप्त-रुपे मल्हारपंत पानगावकर गेला आहे व आताजी सिवदेव खानापुरावर आला आहे. फौज दीड हजार आहे. उदाजी चव्हानावर येतो आणि प्रतिनिधींनी आपल्या हवेलीमधे मोठी खबरदारी मांडली आहे. तमाम जिजाला पसरल्या आहेत आणि लोक बसविले आहेत. वावगे माणूस जाऊ सकत नाही. आता दोन वख्ता दरबारास जातात. फारसा जायायावयाचा विचारहि आहे. त्यासी चव्हानाजवळ तों पावणेकसे श्वार आहेत. त्यास भये निर्मान जाले आहे. अताजी सिवद्यांची फौजहि जवळ आहे. कोणे समयी काये होईल ते पाहावे. त्यासी राजश्री नानांकड चव्हानाने विनंतीपत्र पाठविले होते कीं फौज तुमचे सरकारची आहे. तसि आज्ञा करून आम्हापासी येऊन उतरेत तो अर्थ करणे. त्याजवरून राजश्री रघोजी भोसले यासी सांगून पाठविले कीं तुम्ही आपली फौजेस आज्ञा करणे कीं उदबाजवळ जाऊन उतरेत ते करणे त्याज वरुन याणी मकाजी पांढरे वगैरे फौजेस आज्ञा करून ते क्षणी पाठविली. त्याजवरून उदबाचा कारभार श्वस्त जाला. त्यासी रघोजी बावाचा येथून जावयाचा निश्चये आदितवारी प्रहरा रात्री जाला आहे. तमाम सरंजाम बाहेर काहडला आहे. लोकास रोजमरे दिल्हेत; व राजश्रींनी गावामधे धामधूम मांडिली आहे. जाणोजी सेवाले याचे हवेलीजवळ येक बसवी राहत होती. तिचे घर लुटुन आनले. तमाम याददास्त धरली. सुमार सतावीस हजारांचा जाला. यैसे लालची कारभार पडला आहे. पुढे पाहावे कोणे प्रकारे वर्तनूक होईल ते न कले. काल आस्तमानी राजश्रींनी बुन्हानजी मोहिते व सिदभट व खंडेराव जाधव यासी बोलाऊन नेऊन गोविंदराव यांजकडील जामीनगतीच्या जाबसालासाठी नेले होते तों जाबसाल आज कलल. कोने प्रकारे जाला ते श्वामीस विनंतीपत्र लिहून पाठवितों. जे वर्तमान आढलेल ते वरचेवर विनंती सेवेसी पाठवितों. सत्य मिथ्या ईश्वर जाणे की माहाराजाचें पाये जाणत असतील. बहूत काय लिहिणे ? लोभ आसो देणे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*The writer Vyankatrao Moreshwar informs the Peshwa how Ramraja tried to persuade Raghuji and win him over to his side and how Raghuji frankly placed before him the real state of things there, especially the absence of unity in the administration. The scuffle between Chavan and Mutalik is also reported by the writer.*

No. 51] [16-6-1750

**श्री.**

राजश्रिया विराजित राजश्री जिवाजीपंत आणा स्वामी गोसांवी यासी सेवक त्रिंबक सदासिव कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील वर्तमान छ २२ रजब मंदवार दोन प्रहर जाणून स्वकी [य] लिहित आसिले पाहिजे विशेष. माहाराजांची सिधता होत आहे. क्षणेक पुणें म्हणतात, क्षणेक तुळजापूर म्हणतात, परंतु कोणेकडे जाणार हे न कळे. तुम्ही आपलें ठाई खबरदारीने राहोन लोकांस सर्वांस खबरदार करणे. उदैक स्वार होऊ म्हणतात. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Purandare to Jivaji Pant Khasgiwale, intimating the intended departure of Ramraja from Satara.*

---

No. 52] [16-6-1750

छ २४ रजब.

**श्रीशंकर.**

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सां नमस्कार विनंती प्रार्थना यैसीजे. येथील वर्तमान ताा जेष्ठ वद्य नवमी मंदवासर प्रहर रात्रपावेतों येथास्तित आसो विशष. येथे आज दोन प्रहरा दिवसांत राजश्री बनसीपुरीच्या घरास गेले होते. त्यांसी म्हणो लागले कीं, आम्हास दहा सहश्र रुपये कर्ज देणे. त्यासी ते पुसू लागले कीं, तुम्हास रूपया कोने गोष्टीस पाहिजे? त्यासी जाब दिल्हा कीं, सिंहगडच्या बंदोबस्तीसाठी पाहिजे. तर हे गोष्टी बेहसाब[1] आहे. पेशवियांसी सिंहगड द्या. आधीच देऊ नये आणि हातरोखा दिल्हा तर आंतर करू नये. तर त्याणी माझी बुध्य चोरली कीं, गुराखी खेळायाचा किला आहे, काही मातबर नाही, यैसे म्हणून हातरोखा घेतला. तर मी काही सिंहगड देणार नाही. याजमुळे जे होईल ते हो. त्यासी रूपयाविसी गोसावीबावानी जाब दिल्हा कीं, माझे रूपये रघोजीबावाकडे वगैर तुझ्याच राज्यांत आहेत. आता मजपासी येक रुपया नाही. यैसे परिछिन सांगितले. ते क्षेणी उठोन माघारे माहालास आले. उदई(क) बाहेर निघतात. दोन वदंता आहेत कीं, सिंहगडाची बंदोबस्ती करावयासी जातो म्हणून वदंता बहुत आहे; दुसरी बोलतात की, पुणियासी आऊसाहेबांस आणावयासी जातात म्हणून हे येक आहे. परंतु

---

१ बे-हिसाब – अयोग्य.

सिंहगडास जावे हे फारसे आहे. व आणी येक वर्तमान आहे कीं, आज रा रघोजी भोसले हे त्रितीये प्रहरी आज श्रीयेवतेश्वरास दरशनास गेले होते, तेथे श्रीनारायेणबावा श्वामीचे दरशन जाले. तेथून येतेसमई बनसीपुरीच्या घरास गेले, तों रघोजीबावा पश्चमेच्या दरवाजियाने वाडियांत गेले व उतरेच्या दरवाजियाने राजश्री प्रतिनिधि आले. त्यासी, प्रतिनिधि काही बनसीपुरीकडे गेले नाहीत; तेथे दुसरा महंत राहात आहे त्याजकडे गेले होते, तों जैसे यांजला देखले तैसे माघारे जावयास लागले, तों च्यार नजरा जाल्या. मग बावानी रामराम केला. मग पालखीतून उतरून खाले बावास घेऊन वेगले बसले. आपणहि तेथेच होतों. त्याणी गोष्टी काहाडल्या कीं, कां, बावा, आम्हास धरितात आणि मारू म्हणतात? आम्ही तुमचे काये घेतले आहे? आम्ही घरी बसून राहिलो आहोत, आता कां आमची पाठ पुरविली, यैसे बोलू लागले. तेव्हा बावा म्हणाले कीं, आम्ही सिपाई; आम्हास तुमच्या कारभारियांच्या गोष्टी काये ठाऊक? आणि आम्ही या कारभारात येत नाहीत. मग दुसरे बोलले कीं, तुम्ही पेशवियांच्या घरास जातांत आणि आमचे घरास यावयासी गाठ पडत नाही की काये? येक दिवस तरी यावे होते. तेव्हा हे म्हणाले कीं, आपण तेथेहि जात नाही आणि कोठे गेलो नाही. आणि आम्हासी मनसुब्यात पडने नाही. येखाद्या ठिकानी चाकरी पाठवावे तेथे जावे. दुसरे काही उमजत नाही. मग त्यासी गुह्यार्थाची गोष्टी काहाडली कीं, ज्या समई तुम्ही बाहेर होता तेव्हा आम्हास भरवसा होता कीं, आमच्या मिलनीत आहेत. आणि येथे आलियावर फुकाचे भेटीस गेलेत. त्यासी राजश्रीचा हेत फारसा आहे कीं, तुम्ही आम्ही येकचिते आसो, येक विचार करावा. त्यासी राजश्रींचे व आमचे व फतेसिंगबावा या तिघाजनांचे येकचित आहे. आणभाश क्रियाप्रमाण गोत्रर जोधले जाले आहेत. त्यासी तुम्ही या मिलनीत मिलावे हें उतम आहे. त्यासी याणी जाब दिल्हा कीं, आपणास येखाद्या मोगलावर पाठवा आगर लांबसे येखादे ठिकानी सिपायेगिरीच्या कामावर पाठवावे, तेथे जाऊ. परंतु ह्या गचगचीत आम्हास न घालणे. आपण उदईक आदितवारी श्वार होऊन जातों, येथे काही राहात नाही. ज्याने येथे राहावे त्याने मनसुब्यात पडावे. याजवाचून काये गरज आहे? तेव्हा सुन्न होऊन गेले. पुन्हा बोलले नाहीत. तैसे पालखीत बसून गेले. त्यासी मग हे बनसीबावाचे मठी च्यार घडी होते. तेथून घरास आले. त्यासी उदईक डेरा दाखल होणार आहेत. व दुसरे वर्तमान यैकतोत कीं रतोजी चव्हान याणे खानापूरपावतो येऊन येमाजीपंतांची पनास घोडी नेली व उंटे नेली व मानसेहि मारली म्हणून वदंता आहे. व प्रतिनिधींचे वाडियांत बहुतसी

खबरदारी करितात. तमाम जिजाला ठाई ठाई लावल्या आहेत. बंदोबस्ती फारसी करितात की, उदाची चव्हान घरावर चडाई करून येतात म्हणून खबरदारी करितात ऐसे आहे. आणि उदाजी चव्हान याच्या खबरदारीस चौकीपाहरियासी आपल्या सरकारचेहि श्वार जातात आणि रघोजीबावाकडीलहि जातात ऐसे आहे. यैकिले वर्तमान तें माहाराजांचे सेवसी लिहिले आहे. सत्यमिथ्या ईश्वर जाणे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar to the Peshwa, informing him of a loan which Ramraja wanted to take from Banasipuri for the equipment of Sinhagad. Further on the conversation between Raghuji and the Pratinidhi is reported.*

---

*No. 53*] [*16-6-1750*

नकल.

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

श्रीपतराव बापूजी स्वामी गोसावी यांसी.

पो त्रिंबक सदासिव नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता छ २२ रजब जाणून स्वकीय लिहिणे विशेष. राजश्री स्वामींनी अजी कूच करावयाचा विचार केला. क्षणभर पुणियास जातो म्हणतात, क्षणभर सिंहीगडास जातो म्हणतात, क्षणभर तुळजापुरास जातो ऐसे बोलतात. त्यास तुम्हास वर्तमान कलावें यास्तव पत्र लिहिले अहे ; तरी तुम्हीं सिरवलाजवली पिंपरियाजवल माणसें चौकीस ठेवणें आणि बातमी राखीत जाणें. गडावरी राजश्री येशवंतराव लक्ष्मण सबनीस अहेत त्यासहि खबर करून खबरदार राहात ते करणे. श्रीमंताचे राजश्रींचे चित्त शुध्र नाही. आमचाहि रुसवा अहे. येथे खेल मांडिला अहे. तरी खबरदार असणें. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Shripatrao Bapuji to the Peshwa: writes news of Ramraja's movements.*

---

*No. 54*] [*17-6-1750*

श्री

पुा सेवेसी विज्ञापना. राजश्री स्वामी उदईक इंदुवारी प्रस्थान ठेऊन भोमवारी येथून पुणियास यावयास्तव कूच करणार तें वृत पूर्वपत्रीं सेवेसी लिहिलेंच आहे. आम्हास आज्ञा करितात कीं येथे माहाल आहेत त्यांचे रखवालीस व

शहरचे रखवालीस तुमची फौज ठेवणे यासिवाय सेखमिरा व रा अंबाजी सिवदेव व आणीक किरकोल हुजरातचीं पथके ठेवितों असी आज्ञा केली. त्यास आम्ही विनंती करीतच आहो कीं श्रीमंतास ल्याहावे. तेथून जाबसाल येईल तदनरूप करणे तो विचार करावा असे बोलतच आहो. परंतु ध्यानात भरत नाहीं. चैन पडत नाहीं. परवांचे दिवसीं फार करून कूच करितीलसे दिसतें. त्यात पाहावे. उदईक कसा मजकूर होईल तो न कले. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Purandare to Peshwa, communicating to him Ramraja's intention to start from Satara on the following day.*

---

*No 55*] [*18-6-1750*

छ २९ रजब.

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री
भाऊ स्वामिचे शेवेसी.

विनंती उपरी. काली माहराज राजश्री स्वामीनी राजश्री विष्णुपंताकडे परवानग्या भोयांच्या रोजमुरियाविसी व कुणबिणीची मोइनी लुगडी वगैरे परवानग्या जाहाल्या. त्याउपरी येजमानाचे बलावणे मानुलेस आले. सदरेस[2] गेले. मग याणी आर्ज केला की, मजकडे कारभाराचा गुंता काये? सात महिने आम्ही आपल्या घरी बैसलो. जे कारभार करीत आसतील त्याणी परवानग्या कबूल कराव्या. आपण कोणाचा कारभार विचार किमपि जाणत नाही. हिसेब पहिला समजाविला. पुढे आपल्या चितात काये आहे ते आज्ञा करावी म्हणून बोलिले. त्याजवरी येजमानाही आज्ञा केली की, तुम्ही आपला कारभार करणे. त्याजवरी विष्णुपंत बोलिले की, तुम्हाजवल पाजी माणसाचा व गुलामाचा च्याहा. पाच रुपये नजर मान्य केली म्हणजे कानी लागून गोष्टी सांगता. दरबार या रितीचा जाहाला. त्यांत आम्हा लोकाचे कैसे विकते? आणि शाहाणपणास कोण पुसतो? यैसे बहुता प्रकारे येंजमानास छडून[3] काईल केले ते सेवेसी पत्री कोठवर ल्याहावे? येजमान हासत राहिले. मग त्यास आज्ञा केली की, तमाम गावगनाचे हिसेब आणावयास सांगितले. त्याजवरून हिसेब घेऊन आलियावर येजमानास विष्णुपंती आर्ज केला की, हिसेब तयार आहे. येकीकडे आपले कारभारी व

---

१ विठ्ठल शिवदेवाचा भाऊ. २ राजसभामण्डप.

३ छळणे.

आणखी इतेबारी स्वामीकडील ग्रहस्त असतील ते बलाऊन स्वामीनी स्वस्त चिते चितास येईल तैसा हिसेब समजोन आपणाजवल ठेवावा, म्हणून त्याणी अर्जे केलियावरी येजमान उठोन येकांती गेले. जात्येसमई माहादजी सालोखी यासी कानी सांगितले की तू येजें. हे विष्णुपंताने यैकिले. येजमान व राजश्री शामराव व रा बाबुराव यासी खलबतात बलाविले. माहादजी सालोखी व माहादजी पाटिलाचा पुत्र संताजी व राजश्री नागोरावजी यैसे हिसेब पाहावयास बैसले. तेथे विष्णुपंत बोलिले की, माहाराजाचे कारभारी आहेत त्याणी व स्वामीचे आणखी विस्वासू[1] ग्रहस्त आसतील ते आसावे. वरकडास येथे बसावयासी गरज काये म्हणून साफ विष्णुपंती सांगितलियावर माहादजी सालोखी ढई देऊन बैसला. मग विष्णुपंत बोलिले की, माहादजी सालोखी यासी बसावयासी येथे प्रयोजन काये ? कैलासवासी माहाराज राजश्री स्वामीनी बाईसाहेबाच्या माघारे कारभार आपल्या स्वाधीन केला. तेव्हां इतलो[2] दुसरीयाचा नाही. हिसेब ज्या रितीने समजावयाचा त्या रितीनें खरा करून कारभाऱ्यांच्या विद्यमाने समजोन आपल्याजवल ठेवावा. मग चितास येईल त्याप्रमाणे पुरसीस[3] करून घ्यावी म्हणून साफ भाषणे केली. यावरी माहादाजी सालोखी यास विष्णुपंत बोलिले की कैलासवासी स्वामीनी गांडीवर काठ्या देऊन बाहीर घालविले त्याची काही याद आहे किंवा नाही ? त्याजवरी बोली बहुत वाढणार होती. मग येजमानाही माहादजी सालोखी यासी व संताजी माहादजी पाटलाच्या पुत्रास यैसे दोघा जणास उठऊन बाहीर बैसविले. मग विष्णुपंती येजमानाच्या मर्जीप्रमाणे गाववनाचा हिसेब जैसा पाहिजे तैसा व खिलारे बैल म्हसी वगैरे दरोबस्त समजाविला.. यजमान बहुत संतोषी जाहाले. हिसेब वाचून माघारे विष्णुपंताजवल देत होते; परंतु त्याणी आपणाजवल घेतला नाही. माहाराजास अर्जे केला की याउपरी हिसेब आवघा स्वामीनी पाहिला तितका स्वामीनी आपणाजवल ठेऊन चौकसी करावी. यैसे बोलोन हिसेब समजाऊन विष्णुपंती माहाराजाजवल दिल्हा. विष्णुपंत निरोप घेऊन आपल्या घरास आले. तदनंतर माहादजी सालोखी यासी बलाऊन आणून कार्य कारण त्याकडे पाच गाव देतो म्हणून बोलिले. कमाविसीने पाच गाव करावे, खेडी मिरज प्रांतीची आहेत, तितकी कमावीस करून मजवल यैवज देणे, मी विष्णुपंतास ऐवज देईन. तेव्हा महादजी व संताजी बोलिले आम्हांकडे व त्याकडे मिलोन कारभार होता. त्यास राजे बोलिले सर्वावरी विष्णुपंतास वरिष्ट माहाराजानी केले आहे. त्याप्रो हालींहि कारभार करितील. विष्णुपंतासहि फार मायेचे बोलणे बोलिले. त्यावरी विष्णुपंती विनंती

१ विश्वासू. २ संबंध, वार्ता. ३ विचारणा; विचारपूस.

केली की, मी निराले वाटेने विनंती करीन येसें बोलून टाला देऊन आले. इतके मार काली छ २३ रजबी रविवारी जाले. त्यावरी आजी आंम्ही दरबारीहून आलियावरी रा गोविंदराव बसले होते त्याजवल राजश्री बोलिले कीं, विष्णुपंताचा हिसेब कुली[1] पाहिला. त्याचा कारभार त्याजकडे करार करून किल्यादेखील त्याकडे देविल्या. ऐसें बहूत ममता लाऊन बोलिले, रा विष्णुपंताचे विचारे, मान्य पुरुषपणे आंसावें[2], सिलकी धंद्यात पडू नये, राजश्रींचे वचनांत वचन नाहीं, माहादजी व संताजी हेहि जडले आहेत. अंतर्भाव व बाहेरभाव यांचा अंत लागत नाही. राजश्री बेजीद[3] फार आहेत. तूर्त याच्या मनोगता-प्रमाणें आवघे दूर केले, ऐसेंहि म्हणतील, परंतु याचे चित प्रशस्त होत नाही. आम्ही भरोसा देऊन धंदा करा म्हणावें तरी आम्हासहि थाक[4] पुरत नाहीं. मर्जी स्वामीस आद्यंत विदीत आहे. सारांष गोष्टी वडिलाची आज्ञा प्रमाण. जैसी आज्ञा होईल त्याप्रमाणें विष्णुपंतास सला देऊ. विष्णुपंताचा भार मनोवाचाकाया स्वामीच्या पायांपासी आहे. तरी ये गोष्टीची काये आज्ञा कर्तव्य ते करावी, त्याप्रां यांस सांगू. याचे चित धंदा करावयाचा नाही. स्वामीचे पत्र यास येईल त्याप्रा हे वर्तणूक करितील. सारांष मारनिलेचा कारभार उजल होता त्याप्रमाणे स्वामीचे कृपे करून हिसेब वारून दिल्हा. आत:पर मारनिलेनी याजवल चाकरी करावी ऐसे नाही. सर्व प्रकारे स्वामीच्या पदरचे आहेत. स्वामीची आज्ञा यास शिरसा आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Nana Purandare to the Bhau, commenting on the vacillating disposition of Ramraja as regards the management of private lands. One Vishnupant, who appears to be in charge of this work with the late Rani Sakwarbai, has an altercation with Ramraja and refuses to go on unless he is fully trusted.*

---

*No. 56]* *[18-6-1750*

छ २९ रजब

**श्री**

तीर्थरूप राजश्री बाबा[5] स्वामी वडिलांचे सेवेसी आपल्यें त्रिंबक सदाशिव कृतानेक नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ २४ रजबपर्येंत स्वामीचे कृपेकरून

---

१ सर्व; एकंदर.

२ विष्णुपंताचा विचार असा कीं आपण आपला मान राखून कारभार करावा.

३ बजीद = आग्रही; दीन; श्रमी; रुष्ट.

४ भरंवसा.

+ पत्र नाना पुरंदऱ्याचें.

५ महादोबा पुरंदरे.

यथास्थित असे विशेष. स्वामीनी पत्र पाठविले ते काल संध्याकाली पावले. लेखनार्थ अवगत जाला. तेथील कारभार नासला. राजश्रीनी येमाजीपंतास बोलावणे पाठविले. सिंहिगडाकरिता राजश्री पंतप्रधान यासी विरूध तरी सचिवाचे हातून किला आलियास काही कलेना. परंतु याचे हातून येता दिसत नाही. जबरदस्तीने घेतील.अथवा राजश्री देतील, हेहि थोर आणि तेहि थोर समजतीलच. तुम्ही हावेभरी[1] होऊन कोणते भरवसियावर आहा कलत नाही. बऱ्या वाईट गोष्टी भलत्याजवल बोलता त्याचा विश्वास काय ? तुम्ही गोविंदराव मात्र वाईट व्हाल. तरी हे गोष्टीत सहसा न पडणे. याउपरी गोविंदराव याणी मुले माणसे तेथे ठेवावी असे नाही. तिकडे थार(?) होत असेल तरी ठेवावी नाही तर पुण्यास पाठवावी उचित आहे म्हणोन कितेक विस्तारे लिहिले ते कलले. ऐशी-यास उचित अर्थ सुजला तो लिहिला. येथेहि बहुतासी बोलोन नासले नाही. भलती गोष्ट तेथील विचारावर तोच नाही, मग आम्हास वृथा धावत कां ? याउपरी स्वामीचे आज्ञेप्रमाणेच वर्तणूक होईल. राजश्री गोविंदराव मुले माणसे पुण्यासच रवाना करीत आहेत. ¶दुसरा विचार कोठे तरी चाकरी केली पाहिजे. ज्या खावंदापासी राहावे त्याची मर्जी मिलवावी हा साधकपणाचा विचार आहे. त्यास राजश्रीच्या मर्जीत राहावे, अर्जव करावे, फारसे मान महत्व पाहू नये, च्यारदा जावे यावे, रंगात मिलावे, मोठ्या कारभारांत फारसे पडू नये, ऐसे करावे, असी आज्ञा असली तर या गोष्टीस अंतर करीत नाही. आठा दिवसात मर्जी राजश्रीची मिलऊन घेतो. मर्जी मिलऊन इतके करून घेतो कीं हे भले माणूस कोणाच्या कजियात नाहीत, बऱ्यात नाहीत, असेहि होईल. मग आपले वजन, शाहणपण, सरूप[2] याची इछा करयास धरावी ? असो. भलती येखादी उमदी गोष्ट येका खावंदाच्या नेटावर करणे तर चाकर लोकानी आपले हिमतीने बुधीने करावी; नाहीं तर करून नफा काय ? सर्व व्यर्थ. असो. स्वामीनी आज्ञा केली आहे त्याप्रमाणे वर्तणूक करीन. बुबाजी येथे आज्ञेप्रो ठेविला. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Trimbak Purandare to Mahadoba : asks how he should behave in order to gain the favour of Ramraja.*

---

१ हांवभरी होणे = To be lost in wild wandering, be greatly confused and bewildered.

२ सरूप=नक्ष, अब्रू.

No. 57] [19-6-1750

नकल.

श्री

श्रीमत्सकल तीर्थस्वरूप मातुश्री आईसाहेब वडिलांचे सेवसी अपत्ये रामराजे कृतानेक साष्टांग दंडवत प्रा विनंती. अत्रत्य कुशल जेष्ठ वद्य येकादसी इंदुवार जाणून वडिलांच्या असीरवाद वर्तमान येथास्तित असे. यानंतर किले सिंहगड राजश्री पंतप्रधान यास द्यावयाचा करार पेसजी जाला आहे त्यास दिवसगत लागली याजमुळ त्याच्या चितात शवसये निर्माण जाला. यैसियास वडील तेथ असता त्याच्य चिती दुसरा विचार यावा यैस नाही. वडिलांच्या आज्ञेसिवाये अन्न विचार कोणतां आहे. वडिलांच्य चितास आले म्हणजे आमच्यहि आले. किला पंडित मोरनिलेच्ये हवाला करणे म्हणोन राजश्री पंतसचिव यासी व किल्येकरास पत्रे सादर केली आहेत. किला पंडित मोनिल्येच्या स्वाधीन करून वडिली सत्वर आले पाहिजे. वडिलांच्य दर्शनाचा निजध्यस रात्रीदिवस लागला आहे. अथःपर दिवसगत लागो न देता अति सत्वर आल पो हे विनंती.

¶*Ramraja to Tarabai, giving written orders to Sachiv and others to hand over the fort of Sinhgad to the Peshwa.*

---

No. 58] [19-6-1750

श्रीशंकर.

सेवसी आज्ञाधारक व्यंकटराव मोरेश्वर कृतानेक सा नमस्कार विनंती प्रार्थना यैसीजे. येथील वर्तमान ता छ २९ माहे रजब बुधवार अस्तमानपावेतो साहेबाचे कृपेकरून येथास्तित आसो विशेष. येथे आज राजश्रीकडे राजश्रीनाना व राजश्री गोविंदराऊजी व राजश्री येशवंतराव व राा रघोजीबावा व रा बऱ्हानजी-बावा व रा सिदभट यैसे गेले होते. त्यासी राजश्रीस रघोजीबावाकडील मजकूर हटकिला. त्यासी मतलब कीं जिंतीचा हतरोखा व गाव कोणता नेमून देतात तों व येशवंतराव याजकडील हिसेब व रवानगीचे विचारले, तेव्हा तीन कलमाचा जाब दिल्हा. जिंतीविषई तों गला पुढे करितात. हा गला आणि जिंती लागली आहे. ज्याने गला कापावा त्याने जिंतीची पाटिलकी करावी. गावाविसी तों जाब दिल्हा नाही. आणि येशवंतरायांविसी येशवंतरायांस सांगितले कीं हिसोर्ने करून कागद करून घेणें. त्यासी जिंतीसाठी आड पडली आहे. काहीसा

---

१ हिसेब.

रुसवा रा। रघोजीबावाहि करून आले आहेत. दरबारीहून येऊन सरकारच्या वाडियांत राजश्री नाना व समस्त मंडली व रघोजीबावा यैसे येऊन बसून येशवंतराव याजकडील हिसोब केला. आणि बाकी निघाली त्याचा रोखा लिहून दिल्हा. आणि पहिले रोखे जितके आहे ते वेतले. हकनी * * * आता दोन राहिली. जिंती व गाव त्यासी बावा म्हणतात कीं गावाविशी आम्ही फिकीर करित नाही. जिंतीचाच मात्र कोने प्रकार भेटी उतरेल तें पाहावे. प्रतिनिधींहि फौज ठेवितात म्हणून वदंता आहे. व नवाब नासरजंगास रा। रघोजीबावानी वस्त्रे पाठविलीं. समागमे देवराव विठल वकील पाठविले आहेत. वस्त्रे बितपसील पोशाखा तीन.

| सब्जेज पोषाख | सफेद. |
|---|---|
| १ चीरा बुटेदारी | १ चीरा बुटेदारी |
| १ जामेवार बुटेदारी | १ जामेवार बुटेदारी |
| १ पटका बुटेदारी | १ पटका बुटेदारी |
| १ किनखाप | १ किनखाप |
| १ दुपटा | १ दुपटा |
| ५ | ५ |

| पश्मी पोशाख | सिवाये महमुदी सुमार दिलीची सफेद |
|---|---|
| १ मदीलजरी | ४ |
| १ जामेवार | |
| १ पटका अमदाबाद | |
| १ किनखाप | |
| १ पश्मी दुपटा | |
| ५ | |

१९

येणे प्रमाणे सनगे पाठविली आहेत. साहेबास कलावे म्हणून लिहिले आहे. व येथून रा। रघोजी बावाचें मोहर्त आशाड सुध द्वितीयेचे आहे. आता काही राहात नाहीत. जरूरीसाठी राहिले यैसे आहे. सेवेसी श्रुत होये. बहुत काये लिहिणे हे विज्ञप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar explains to the Peshwa how the affairs of Jinti village proved a very knotty point to certain people at Satara. Ramraja was very strong on it. He would suffer his head to be cut off rather than sign the deed of grant of the village. Just towards the end of the letter a list of the robes of honour sent by Raghuji to Nasirjung is given.*

२ हिरवा.

*No. 59*] [*19-6-1750*

## श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंती प्रार्थना यैसीजे. येथील वर्तमान ताा जेष्ट वद्य १२ द्वादसी मंगलवार आरुणोदये पावेतो साहेबांचे कृपे करून येथास्तित असो विशेष. काल सोमवारी राजश्री रघोजीबावा राजश्री नानांकड जाऊन राजश्री गोविंदराव यासी बोलावले. त्रिवर्ग बसून मनसुबी ठरावली कीं बुऱ्हनजीबावास व सिधभट यासी राजश्रीकडे पाठवावे आणि त्यास परिश्चिन पुसांवे कीं रघोजीबावा तुम्हाकडे दोन गोष्टी विचारावयाच्या येणार आहेत. त्यासी जर काही त्यांच्या गोष्टी यैकने असतील तर त्यांसी घेऊन येऊन दोन गोष्टी विवेकाच्या व राज्यभाराच्या सांगतील. तुम्ही यैकिल्या तर बरे. न यैकिल्या तर मुजरा करून उठोन जातील. तुम्हीं कस्याचे आणि ते चाकर कस्याचे? तेव्हा राजश्री म्हणाले कीं आम्ही पाच सात वेल बोलावले तेव्हा आले नाहीत ; आता ते आम्हाकडे कशास येतील? मग बोलले कीं कां येतात? तेव्हा उभयेता म्हणाले कीं तुमचा व पेशवियाचा व चिटनिवीसांचा व आऊसाहेबांचा मनोभंग जाला आहे आणि तुम्ही भलत्याच्या बोले भलतें करितात आणि सिंहगड देतांत कीं नाही व दातेगड देतात कीं नाही अगोदर हातरोखे कां दिल्हे. आगोदर द्यावयाचे नवते यैसे(अ)सोन देऊन मग दुसरियाच्या बोले हा खेल आपल्या राज्यांत करावा हा काही योग्य नाही. तेव्हा राजे म्हणाले कीं पेशवियानी व चिटनिसानी माझी आजी फोडली आणि मला धरावयासी जपतात. मारू म्हणतात. दुसरा राजा उभा करू म्हणतात आणि जें काही थोरले आबासाहेब होतें त्याणी दिल्हे नाही ते आम्हापासी मागतात. ते काही मीं देणार नाही. जे आबा-साहेबी दिल्हे आहे ते तुम्ही घ्यावे. त्यासी काही मीं उजूर करीन तर मग वरी म्हणावे कीं हा बेयेमान आहे. आधीक म्हणतांत तर मीं काही देणार नाही. मग याजमुले माझा प्राणहि गेला तर जावे परंतु देणार नाही. यैसे परिश्चिन बोलले. मग बुऱ्हानजीबावा व सिधभट याणी येऊन येथें सांगितले कीं या या प्रमाणे राजे बोलतात. तेव्हा अवघियानी मसलत केली की रघोजीबावानी येकदां जावे आणि च्यार गोष्टी बऱ्या उमजोन सांगाव्या कीं आसे करता आसे आहे. जर यैकिले तर उतम आहे. नाहीं तर त्याजसारखीं तजवीज केली जाईल. तेव्हा राा रघोजीबावा व सिधभट व बुऱ्हानजीबावा यैसे तिघेजन गेले. तिसरा प्रहर-परियेंत तेथे होते. यांसी त्यांसी बहुतसी हुबरीतुबरी जाली. कजिया जाला आणि याणि परिश्चिन सांगितले कीं चवघेजन ज्या गोष्टी सांगू तुजलाच व्हावतात आणि तुझ्या राज्यांत खेल करितात आणि म्हणसील कीं आम्ही तुमच्या कार्यास

येणार नाही. आमचा भरवसा न धरणे. ज्याप्रो पेशवियांणी करार मदार करून दिल्हा आहे त्याजप्रा तुम्ही निकाल करून देऊन चालवावे. नाही तर तुमचे कोन्ही नाही. खिजमतगारहि तुम्हाजवल राहणार नाही आणि धुलीचे दिवे खात जाल. यैस्या रगडून दोन गोष्टी सांगितल्या. तेव्हा समजोन हातरोखा सिंहगड व दांतेगडचा दिल्हा आणि हुजरें दिल्हे कीं पेशवियासी किला खाले करून देणे आणि राजे बोलले कीं माझे चालीस हजार रुपये किल्यास गेले आहेत ते द्यावे. ते कबूल केले आहेत कीं देऊ. मग राजश्री नाना व रा गोविंदराव यासी दरबारास नेऊन उभयेतांची गोडी करून दिल्ही. मग च्यार घडी दिवस असता रघोजीबावा जेवण्यासी आले यैसे वर्तमान आहे. जाले वर्तमान तें महाराजांचे सेवेसी विनंती पत्र लिहून पाठविले आहे. सेवेसी श्रुत होये. बहुत काय लिहिणे हे विज्ञापि.

¶*Vyankatrao Moreshwar informs the Peshwa of Ramraja's obstinacy to the intercessions of some men at Satara, how he was brought round by a severe reprimand from Raghuji Bawa and how he was finally forced to hand over the fort of Sinhagad to the Peshwa.*

---

*No. 60*] [पेो *19-6-1750*

छ २९ रजब

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसी.

विनंती उपरी. राजश्री रघोजीबावास गेलियापासून स्वामीनी येकही पत्र पाठविले नाही. तरी येक पत्र बहुत समाधानाचे पाठवावें. बावा बहुत बहुत स्वामीच्या विचारात आहेत. दुसरे जाणतच नाही. येथून निरोप घेऊन येतील तेव्हा पुण्यास येतील. राजश्री उदाजी चव्हाण यांचे येसाजी शिंदे मृत्य पावले. परंतु स्वामीनी त्यास फुकाचे येक पत्र लिहिले नाहीं हे उचित की काये? तरी त्यास समाधानपत्र ममतापुर्वक लेहून पाठवावया आज्ञा करावी. +दोन पत्रे उदबास दो प्रकारची पाठवावी. हे विज्ञापना.

¶*Purandare requests Bhau to send two letters, one to Raghuji Bawa and another to Udaji Chavan, expressing condolence for the death of Yesaji Scindia.*

---

+ पत्र पुरंदऱ्याचें.

*No.61*] [पा *19-6-1750*

छ २९ रजब.

**श्री.**

पुा तीर्थरूप राजश्री नाना व ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती. दिनचर्येचे वर्तमान : प्रनिनिधीकडून काही कापड येमाजी सिवदेव याजकडे जात होते. बराबर तीन च्यारसें राऊत होते. त्याची पालत राा रताजी चव्हाण यांजकडून होती. त्यास खानापुराजवल गेले तों रताजी चव्हाण पनास पाऊणशानसीं जाऊन राऊतास गाठले. यांचा त्यांचा युध्यप्रसंग तेथे जाला. त्यांजकडील दाहापांच जखमी होऊन दोन च्यार ठार पडिले आणि त्यांजकडील चव्हाणानी तीस चालीस घोडी आणून पाडांव केलीं व खानापुरचे जमीदार धरून आणून गावची काही वस्तभाव लुटिली. कापड त्याजकडे रवाना केलें ते काही हाती लागले नाही. ते त्याजकडेस गेले. हे विनंती.

¶*Purandare to Bhausaheb reports an encounter between Rataji Chavan and Pratinidhi's men.*

---

*No. 62*] [पो *19-6-1750*

छ २९ रजब.

**श्री**

पुरवणी तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती उपरी. राजश्रीनी राा बऱ्हानजी मोहिते व सिदभट याजवल दाहावीस वेल मजकूर केला की, राजश्री रघोजीबावाजवल आपणास बोलणे आहे. त्यास बोलाऊन आणा म्हणतों, परंतु ते का येत नाही? व तुम्ही का आणित नाही? हे जाबसाल[1] करीतच होते निदान या चहूं दिवसात नेट फारच लावलें व काहीसें विरूधहि बोलो लागले की, प्रधानपंताचे मिलताऊ[2]; ते का येतील? सारेच तुम्ही येक होऊन मजला मारता तरी मारा म्हणोन बोलो लागलें. हे वर्तमान आम्हास पुसिले. आम्ही, रघोजीबावानी तर न जावे, उभयतानी जाऊन राजश्रीजवल बऱ्या पैरनिष्ठ[3] गोष्टी बोलाव्या म्हणून सांगितलें. त्याजवरून उभयता काल रात्रीचे दरबारास गेलें. प्रहरपर्यंत खलबत जालें. सिदभट बोलणार चांगले. राजश्रीनी जितके आडेवेडे घेतले तितक्याची निराकरणे केली. भयहि दाखविले. निदान तुम्ही वेडेपणाच करू लागला तरी आम्ही करू देणार नाही. राज्य आम्हावर आहे.

---

१ प्रश्नोत्तर; संभाषण.

२ मिळताऊ—One that readily accommodates himself to another's views.

3 Rigidly impartial or just.

तुम्ही नाश पावाल. दर्याबाईस बदलाम[1] केलेत, तिचे घर बुडविलेत. आई-साहेब रुसून जातील आणि दर्याबाई तुम्ही येथे बसून कारभार कराल हे कसे घडेल? रघोजीबावा बऱ्याचा सोबती आहे. तुम्हाजवळ येऊन काय करावें? ऐकाल तरी यावे, नाहीतर प्रयोजन काये? जो वाईट वर्तणूक करील त्यास नीट चाला असे म्हणावयास माणूस तोच आहे, म्हणून बहुत बहुत बोलले. निदान काहीसे नरम पडिले; आणि माझा पका गेला याची गत काये म्हणून बोलले. याणी जाबसाल केला की, रुपये तुमचे असतील ते देतील. खर्च जाले असतील ते ज्याणी घेतले असतील त्याजवरून देवितील, म्हणोन बोलले. यावर काहीसा आशय यास सापडला. बरे, उदैक रघोजी बावास बोलाऊन आणा, काये बोलणें ते बोलों, म्हणोन सांगितलें. त्याजवरून आज प्रात:काली राजश्री रघोजीबावा व बऱ्हानजी मोहिते व सिदभट आले. रात्रीचे वर्तमान सांगितले. त्याउपरी आम्हीं सला दिल्ही कीं, जावें. जरी होईल तरी उरकावें. त्यांजवरून त्रिवर्ग दरबारास गेले. आईसाहेबाचे कोठडीत प्रहर दीडप्रहर पर्यंत मागती रात्रीप्रो ऊहूं[2] जाले. बोलणे फारच जाले. निदान[3] राजश्रीनी कबूल केले. राजश्री गोविंदराव यांजविशीहि मध्ये मध्यें जेथे मजकूर निघें तेथे बोलोन दातेगड द्यावासा करार करून घेतला आणि हातरोखे करून घेतले. राजश्रींनीं या या प्रमाणें करावें म्हणोन मजकूर सांगितले, तो तपसील आलाहिदा पुरवणीत लिहिला आहे त्याजवरून कलेलें.+

¶*Purandare reports to Bhausaheb, Ramraja's plans and conversations with leaders at Satara, Burhanji Mohite, Sidbhat, and Raghuji Bhosle.*

---

*No. 63*] [पो *19-6-1750*

छ २९ रजब

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामीचे

सेवेसी

विनंती. उपरी, राजश्री रघोजीबावा दरबारास जाऊन बोलीचाली जालियाचा सविस्तर अर्थ अलाहिदा पुरवणीत लिहिला आहे त्याजवरून विदित होईल. त्याउपरी राजश्रीनी येणेप्रमाणे करार करून पत्रे दिल्ही:

सिहिगडकरी व हवालदार याचे वाईट न करावें. पूर्ववतप्रों चालवावें. हुजरून पैका गेला आहे त्यांस जो तेथे असेल तो द्यावा. ये गोष्टीस

१ बदलामी—Blame, censure (esp. undeserved). २ ऊहू—A scheme, plan; खलबत.

३ शेवटीं. + पुढें कागद मोकळा असून पत्र अपुरें कां ठेविलें?

तुंग तिकोना दोही किल्यावर येथून लोक पाठवितों, ते किल्यावर चढवावें. आधी हे लोक चढवावे मग सिंहिगडावर चढवावें.

मातुश्री आईसाहेबाची आपली समजावीस करून द्यावी. आण आईसाहिबास येथे पाठवावे. आपण येत नाहीत. सचिवपंतास हुजूर पाठऊन द्यावें.

मध्यस्त बऱ्हानजी मोहितें यांणी स्वामीपासून सदरहूप्रों करून द्यावे. चालीस हजार रुपये हुजरून गेले आहेत ते द्यावे.

हुजरून लोक सिंहिगडावर गेले आहेत, त्याचे वाटे न जाता हत्यारे सुधा उतरून हुजूर पाठऊन द्यावें.

याप्रकारे बोललें आणि हातरोखे करून दिल्हें.

१ मातोश्री आईसाहिब.
१ राजश्री पंतसचिव.
१ सिंहिगडचे हवालदारास.
१ स्वामीचे नावें.
—
४

च्यार हातरोखे करून दिल्हे, त्याच्या नकला करून पाठविल्या आहेत. हातरोखे आम्ही बऱ्हानजी मोहिते याचे घरीच ठेविले आहेत. स्वामीचे उतर येइल त्याजप्रमाणें घेऊन पाठविले जातील. दातेगडचाहि हातरोखा दिल्हा. त्याचीहि नकल पाठविली आहे, त्याजवरून विदित होईल. सदरहू कलमाप्रमाणे स्वामीनी मान्य केले तर हातरोखे घेऊन उतर सत्वर पाठवावे. त्याप्रा वर्तणूक करूं, हे विज्ञापना.

¶*Purandare to Bhausaheb referring to the written undertakings given by Ramraja regarding the forts of Sinhgad, Tung, Tikona, etc.*

---

*No. 64*] [पो 19-6-1750

छ २९ रजब.

**श्री.**

पुरवणी तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती. उपरी, राजश्रीनी सिंहीगडचे हातरोखे[1] करून दिल्हें हे भीडेने. व सारा कारभार तटला; जिकडून

१ निकडीचा हुकूम.

तिकडून दबा बसला; रघोजीबावा राजश्रीचे कारभारात मिळेनात; स्वामीकडील फौज घाटापर्यंत आली, येथेहि जमा होत चालली, याजमुळे दिल्हे आहेतसे वाटते. चितशुधीने मनापासून नाहीत. असो. हरकसे हातरोखे आलें ते कार्यावर पडतील की नाही? आज आम्ही गेलों. उद्यापासून कारभारास बोलावणे येईलच. जावेच लागेल. कारभार चालता करा म्हणतील. करावा की न करावा, पुढील विचार कसकसा, याची सविस्तर मनन करून आज्ञा करावी. त्याजप्रमाणे वर्तणूक केली जाईल, हे विज्ञापना.

¶*Purandare to Bhau, says that Ramraja gave a written undertaking to hand over Sinhgad, only under compulsion : he is not doing it willingly.*

---

*No. 65*] [पा *19-6-1750*

छ २९ रजब.

**श्री**

पुरवणी तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती. उपरी, राजश्री फतेसिंगबावाकडील मजकूर स्वामींनी लिहिला की, त्याजकडील कोण्ही विश्वासू पाठऊन देणे. त्यासी बोलोन त्यांस समाधान पत्र पाठविले जाईल म्हणून. तरी राजश्री बाबूजी नाईक याजवळ तीर्थरूप राजश्री नाना स्वामींनी आज्ञा केली की, तीन लक्षाचा सरंजाम आमचे लगतें आम्हास द्यावा व तीन लक्षाचा सरंजाम आम्ही देवऊ त्यांस द्यावा. आमचे विचारात चालावें. त्याप्रमाणे नाईक जाऊन त्यास सांगितले. आम्हास बोलाऊन नेले. नाईकानी सांगितल्याप्रमाणें राजश्री बावा मान्य होऊन करार केला, शफत केली, सर्वश्रें सरदारीचा बंदोबस्त देखील करून द्यावा. फतेसिंगबावास सांगावे ते त्यांणी ऐकावे याप्रमाणे करार जाला असता मग त्याजकडील मातबर विश्वासू माणूस येऊन कार्ये बोलावे आहे? फतेसिंगबावाकडील निभावणी जसी पाहिजे तसी करून घ्यावी. नाईक मध्यस्त जाले आहेत. मग गुंता काये आहे? * आम्हासी बोलून चालून करारमदार जाहला. स्वामींचे आज्ञेसिवाय नाहीत. येक समाधानपत्र मात्र बावास निशा होईसे पाठवावे म्हणजे जाहाले. आपले लगामी लागतो. गरीब आहे. यास का हातचे सोडावे? पत्र पाठवावे, अनमान करूं नये, हे विज्ञापना.

¶*Purandare writes to Bhausaheb that affairs regarding Fatesingbowa have already been settled through the intercession of Babuji Naik and that it is no use displeasing him again ; and further assures that Fatesing is completely agreeable to the Peshwa.*

श्री

पुा तीर्थरूप राजश्री नाना व
ता राजश्री भाऊ स्वामींचे सेवेसी.

विनंती. राजश्रीनी सिंहिगडचे हात रोखे दिल्हे म्हणून सर्व कारभार आपल्याकडील जाहाला व अत:पर करू तसा होईल; राजश्री निकालस जाहाले; ऐसे स्वामीच्या चितात येईल तर असा भाव काही नाहीं. हातरोखे दिल्हे, परंतु मागे आपण चितास येईल तसे बोलतात. हातरोखे दिल्हे; परंतु तुंग तिकोना माणिकगड हातास येईल, रुपये घेईन, आईसाहेबास येथे आणून घालवितील, तेव्हा सिंहीगड येईल. नाही तर कसा येतो? असे मोठ्या फुंदाने बोलत असतात. येमाजीपंताकडील सूत्रे खेलतच आहेत. विसो मोरोकडे सूत्र आहेच. लोकांचे इमानप्रमाण घेतच आहेत. प्रतिनिधीला फौज ठेवा म्हणतच आहेत. खासबारदार ठेवितच आहेत. ऐसे नाना प्रकारें खेल खेलतच आहेत. सारांष याचा इतबार तिलमात्र नाहीं. क्षणात येक गोष्ट, क्षणात येक गोष्ट, या प्रकारचा स्वभाव आहे. स्वामींचे ठाई द्वेशुबुधी आहे, तीस अंतर होत नाहीं. सारांष आईसाहेब जर येकली याजपासी स्वाम पाठऊ म्हणतील, तर हे राजश्री काराग्रह आईसाहेबास करतील. यास्तव जो मनसबा करणे तो चांगला थोर करावा. येतद्विशईचे पर्याये हमेश लिहित गेलो, त्याप्रमाणे जाहाले तरच च्यार दिवस स्वस्त होऊन, राज्यभार चालेल; सातारा शहरहि नांदेल; नाही तर शहरांत कोणी राहत नाही. सर्वास भय निर्माण आबरूचे व लुटणाचे जाहाले आहे. राजश्री तो लुटावे, निमित्य * * ठेऊन पैका मिलवावा; याप्राा करीत आहेत. पाचा साता * * प्रमाणे जाहालें. कलावें. संतूबाई, गजराबाई, याजविसी पूर्वी लिहिलेच होते. उतर आले नाहीं. त्यास संतूबाईस उलगडावे; जवाहीर नगवेज[1] घ्यावे; हा विचार त्याचा आहे. परंतु थोडेसे स्वामीच्या भयाने दबले आहेत. परंतु लोभी आहेत. येके दिवसी काम करतील. मग स्वामींचे काहीं चालणार नाही. यासाठीं या मुलीला तिकडे नेऊन, येके जागा च्यार दिवस ठेवावी. पुढे लग्न करून दिल्हे म्हणजे स्वामींचे इमान थोरल्या माहाराजासी दिल्हे होते, ते उगवले. या गोष्टीची उपेक्षा केली तर या पोरीची गत सुधी नाही. यांत स्वामीची मर्जीस येईल ते स्वाम करतील.

---

1 A comprehensive term for jewels and ornaments.

असलेले वर्तमान लिहिले असे. बाबूजी नाईकास काही वस्त्रे देत नाहीत. पैका मागतात. याचाहि भाव कीं, स्वामींनी केले ते मोडावे हा प्रकार. तसेच त्रिंबकजी भोसल्याचे जितीचेहि कागद देत नाहीत. रघोजीबावा खटे होतात. निरोप राजश्रीनी न दिल्हा तर ज्याप्रमाणें स्वाम उठान गेले याप्रा उठोन जातील. फतेसिंगबावाचे मजकुराविसी दोन पत्रें पाठविली. त्याचे उतर समर्पक फतेसिंगबावास खामाखा पाठविले पाहिजे. यांस हातचे न सोडावे. स्वामींचे म्हणतात. गरीब आहेत. यांसी अंतर न द्यावें. स्वामीच्या आज्ञेप्रमाणें वर्तणूक करावयासी तयार आहेत. अंतर नाहीं. येश्यास येक पत्र समाधानाचे पाठवावे. येथे स्वामींनी लोक पाठविले, त्यांची याद आलाहिदा पाठविली आहे त्याजवरून कलेल. या पत्राचे उतर पाठविले पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Purandare advises the Peshwa not to trust Ramraja and to befriend Fatesing Bhosle.*

---

*No. 67*] [*13-6-1750*

## श्रीशंकर

आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा. नमस्कार विनंती. प्रार्थना ऐसी जे विशष. येथील वर्तमान ताा छ १९ माहे रजब्र बुधवार साहेबाचे कृपे करून येथास्तित असे. यैसियासी राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा काल तिसरे प्रहरी यासी घेऊन राजश्री नानांकड गेलो होतो. त्यासी तेथे राजश्री गोविंदरावाकडील आनले. त्यासी साहेबीं कृपापत्र राजश्री नानांस पाठविले होतें, ते पत्र वाचून त्याचे मुनसिफीसाठी त्रिवर्ग वेगले वाटेन बसले होतें. त्यासी मग खंडेराव जाधव व बुन्हानजी मोहिते व त्रिंबकजी भोसले व सिदभट यैसे आले व रा बापूजीबावाहि आले. त्यासी सिधांत ठरला कीं ज्याप्रा श्रीमंतानी व आऊसाहेबानी तह करून दिल्हा आहे त्याचप्रा राज्यानी चालावे आणि आम्ही आववियानी चालावे आणि कदांचित गड मागत असले तर आम्हास विड द्यावे. जितके शाहू माहाराजांचे चाकर असतील त्याणी आमचे सोबती व्हावे. नाही तर कोण राहतो हेहि पाहतों. यैसी बोली जाली. तितक्यात राजश्रीनी

हे बसले आहेत तोच येकावर येक तीन च्यार चोबदार गोविंदरायांकड पाठविले कीं तुम्हास बोलावले आहे. याणी सांगून पाठविले कीं आम्ही लक्ष प्रकारे येऊ. परतु चितापासून आम्ही नसावे यैसे आहे; मग कैसियासी बोलावणे वेर्थ आहे. त्याजवर राजश्रीनी विष्णुपंत व दवलतराव पाठविले की रा नानास व गोविदराव यांस उभयेतांस म्हणावे की दरबारास आज तुम्ही येणे. उदईक न येणे. यैसे सांगून पाठविले. त्यासी ते समयी रामाजीपंत दरबारी होते. त्याणी ततक्षणी सांगून पाठविले. ते बसले आहेत तोच कीं तुम्ही न येणे येशवंतराव व नागोराव आले म्हणजे त्याजसारखी तजवीज ध्यानास आनून यावयाचे असले तर येणे यैसे सागून पाठवले मग विष्णुपंत व दौलतराव तैसेच माघारे गेले. मग येशवंतराव वगैरे घेऊन परंतु न आले त्यासी रा. रघोजी-बावानी साफ सांगितले कीं श्रीमंतास हे वर्तमान त्याहावे ते आज्ञा करतील की उगेच दरबारास जाणे तर जावे नाही तर न जावे. त्या समयी राजश्री प्रतिनिधीस बोलाऊन नेऊन सांगितले कीं येमाजीपंतानी हे धामधूम मांडिली हें काये आहें? त्यासी प्रतिनिधी बोलले कीं हे धामधूम काही येमाजीपंत करित नाहीं. हे धामधूम दादोबा प्रतिनिधी करितो इतकियावर साहेबी काये करणें ते करावे. नाही तर पूर्वेवत प्रा माझी ठाणीठुनी माहाल गड जे आहेत ते द्या. नाहीतर मी हजर आहे. माझ्याहि पायामधे बेडी घालून टाकावे यैसे बोलले. मग फतेसिंग-बावांस बोलाऊन आनले. आणि त्याला पुसले कीं या बाम्हणानी राज्यामधे माझ्या खेल केला आहे यासी काये करावे. दादा, सांगाना कां हो? त्यासी ते म्हणाले कीं आपणास जें उतम दिसल ते करावे. याविसी आम्ही काये सांगावे. ज्या गोष्टी राज्यभार चाले तो अर्थ करावा. त्यांसी राजे बोलले कीं तुम्ही वडील; आम्हास कितेक विचार आचार आम्हास सांगावा. तुम्ही मागे वर्तीत पाहिला आहे. त्यासी आता वडील तुम्ही आहांत, जे तुम्ही आज्ञा कराल त्याजप्रा आम्ही चालू. यैसे बोलणे. जो फतेसिंगबावाणी जाब दिल्हा कीं अस्या गोष्टी साहेब आम्हास पुसतात त्यासी आम्ही काये सांगावे. आम्हास यैसियामधें दोन दिवस देवास जावयासी आज्ञा दिल्ही पाहिजे. मग राजे उगेच राहिले. उदाजी चव्हानास राजे म्हणाले की माहाराजांची पागा घेऊन जाणे आणि त्या बाम्हणास धरुन आनने. दाहा घोडे पागेचे देतो. तुम्ही फौज ठेऊन त्याजला मारुन काहडने. यैसे बोलले. आज तर काही या गोष्टीचा जाबसाल आढलला नाही. उदईक जें वर्तमान ध्यानास येईल तें माहाराजाचे सेवेसी विनंती लिहिली जाईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापि.

¶*The letter gives a glimpse into the complicated situation at Satara and tells how harassed the King felt at his helpless position.*

No. 68] [20-6-1750

श्रीशंकर.

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सां नमस्कार विनंती प्रार्थना यैसीजे. येथील वर्तमान ताा छ २६ रजब्र गुरूवार साहेबांचे कृपेकरून येथास्तित आसों. यैसियासी राजश्रीनी आज गंगाजी म्हणून संतूबाईकडील आहे, त्यासी आनून खूब्र मार दिल्हा आणि बोलतात कीं, तुजपासी काये काये वस्तभा (व) आहे ते सांगणे आणि त्याचे घरची वस्तभाव संतूबाईची कुल आनली. आणि आणीकहि मागतो. त्याजविसी राजश्री नानानी व रा रघोजीबावानी व रा गोविंदराव याणी रा रामाजीपंत व नागोराव व दौलतराव यैसे तिघेजन पाठविले कीं, हे गोष्टी बेहसाब[1] आहे. आणि यैसी धामधूम करणे उचित नाही. शाहू माहाराजानी केले नाही ते तुम्ही करू म्हणता हे बर नाही. त्यासी त्याणी सांगून पाठविले कीं, आमचे चितास येईल ते करू. आपण या कामात न बोलावे. यैसे म्हणून संतूबाईस आनून वाडियात बसिवले आहे. आणि राजे बोलले कीं, जो कोणी येईल त्याने माझी गरदन कापील तेव्हा इला नेईल. यैसे जाले आहे. याजवरून राजश्री नानाहि बहुत खटे जाले आणि रा बावाहि बहुत खटे जाले. तितकियांत रा रायाजी भोसले आले, त्यांजकडे सामोरे गेले. करंज्याच्या आलीकडेच भेटी जाल्या. मग सवच माहालास आले. समस्त मंडलीचा हेत कीं, जितके गरीबगुरीब शाहू माहाराजांच्या हातचे आहेत तितके उदईक आशाड सुध १ प्रतिपदेस पुढे घालून रा नानानी व रघोजीबावानी काहाडन घेऊन जावे. नाहीनर तमाम लोकांची घरे लुटील. नजर बदनजर आहे. यैसे आहे. जाले यैकिले ते सेवेसी लिहून पाठऊन दिल्हे आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar reports to the Peshwas the repressive measures adopted by Ramraja against Santubai. Gangaji, her attendant, was put to torture. Purandare and Raghujibowa interceded to no purpose. He placed Santubai in confinement in his own palace.*

---

No. 69] [पौ 23-6-1750

छ २९ रजब.

श्री

पु॥ तीर्थरूप राजश्री नाना व ताा
राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी.

विनंती. संतूबाई गजराबाई यांची स्थित हे राजश्री राहू देत नाहीत. यास पुण्यास न्यावे म्हणोन सविस्तर पूर्वी सेवेसी लिहिले होते. स्वामीनी उतर न

---

१ बे-हिसाब – अयोग्य.

पाठविले, उपेक्षाच केली. यैश्यास गंगाजी संतूबाईचा याने आम्हापासी येऊन सागितले की, वस्तभाव मुलीची राजे नेतात, चौकी बसवितात याची तजवीज करावी. नाहीतर मला जसी आज्ञा कराल तसे वर्तेन. त्याजवरून आम्ही गंगाजीस सांगोन मुलीच्या वस्ता आणून आपल्या सरकारच्या जामदारखान्यांत ठेविल्या. त्यास येक दिवस जाहाला. आजी प्रात:काली राज्यानी संतूबाईवर चौकी बसविली. हे वर्तमान आम्हास कललियावर रामाजीपंताबाा राजश्रीस अर्ज सांगोन पाठविले की, या मुलीस माहाराजानी आमचे हाती दिल्ही आहे. इचे पालणपोषण आम्हास केले पाहिजे. इला पुण्यास पाठवितो. साहेबी कृपा करावी. चौकी उठवावी. अशा गोष्टी केल्या न पाहिजेत म्हणून बहुत गरिबीने अर्ज रामाजीपंत व राजश्री नागोराव याजबाा सांगून पाठविले. त्यावरून राजश्री बहुतच क्रोधे होऊन गंगाजीस मार दिल्हा आणि बशविला. मुलीला पहिले जागाहून येक बटकीसुधा उचलोन मुतपखांत बटकींत ठेविली. वस्तभाव सर्व मुलीची, तिजवर चौकी ठेऊन बंद केली. याप्राा संतूबाईची गत जाहाली. स्वामीनी शाहू माहाराजाचे इमान उतम प्रकारे राखले. असो. होईल वर्तमान ते ल्याहावे लागते. अद्यापि तरी डोले उघडावे, बदोबस्त करावा, उचित आहे. गजराबाई, लक्ष्मीबाई, गुणवंता यांची हेच गत. बटकी करीन म्हणतात. थोड्याच शाहू राज्याच्या पोटाच्या आहेत? अशा वल्गना करतात. मुलींचे हाल मांडले आहेत. स्वामीस पत्रे लिहितो, त्याची उतरेहि न पाठविली. कलले पाहिजे. केसरकराची मजमू स्वामीकडील; यास्तव मजमू काढली पाहिजे. मी मजमू देणार नाही, राजे म्हणतात; केसरकरासच दूर करतो, ऐसे बोलतात. काल भवानजी केसरकरास रुबरू आणून आद्वातदवा भाषण त्याला केले. त्याचा हती घेतला. सारांष मजमूकरिता त्याची सरदेशमुखी काढावी, मजमू काढावी, ऐसे आहे. आज उद्या त्याचे दारी चौकी बसविणार आहेत. कसे काय करावे हे ल्याहावे. आईसाहेबास पाठऊन हा बंदोबस्त केला तरच उतम आहे. काल संध्याकाली राजे बोलले कीं, म्या सिंहिगडचे हातरोखे दिल्हे तर काय? माझा गड अझूण जुजतो की नाही? असे बोलून मिशावर ताव दिल्हा! दुसरे साताऱ्यात दाहा पाच ठाई उग्याच चौक्या बशविल्या आहेत. च्यार पाच लुटली. दोघा सोनारानी गलफास देऊन जीव दिल्हा. याप्रो साताऱ्यांत धूम मांडली आहे. केसरकर आम्हास नित्य येऊन वर्तमान सांगतात. त्यास ही मजमू थोरल्या नानानी राज्याजवलून कोणे प्रकारे घेतली होती, हे स्वामीस विदित आहे. म्या काय ल्याहावें? संतूबाईची आप्रतिष्टा केली. लोक आम्हास

मात्र सर्व म्हणतात कीं, भले इमानास जागलेत. फतेसिंगबावानी चिठी पाठविली तीच सेवेसी पाठविली आहे. कलेल, हे विज्ञापना.+

¶*Nana Purandare to Nana and Bhau at Poona : writes about the high-handedness of Ramraja and the consequent hardships that many have to suffer, especially Shahu's daughters Santubai and Gajarabai.*

---

*No. 70]* *[June 1750*

**श्री.**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री भाऊ**

**स्वामीचे सेवेसी,**

विनंती उपरी. राजश्री बाबूजी नाईक यांनी सांगोन पाठविले कीं, इंदुवारी आपणास मुहूर्त आहे. त्याजवरून आम्ही राजश्री नागोजीराव व दौलतराव याजसमागमे राजश्रीस सांगोन पाठविले. याणी मजकूर केला. राजश्रीनी भाशण केले कीं, 'लक्ष रुपये नजर, येक हाती, दोन घोडे व पदक याजप्रमाणे आपणास द्यावें आणि वस्त्रें घ्यावी.' याणी विनंती केली कीं, 'प्रधानपंतासी तुम्ही बोलला काय, नाईकास बोलाविले काय आणि हे म्हणता काय?' तेव्हा राजश्री बोलले, 'प्रधानपंताची व बाबाची माझी बोली या प्रमाणेच आहे.' याणी उतर केले की, 'असी बोली कधी नसेल. असते तरी सांगते, लेहून देते. अशा गोष्टी बोलो नयेत.' तेव्हा राजश्रीनी ते सोडले. बाबूजी नाईकाची बोली निराळी मजकडे आली होती. मध्यस्ताचा तुमचा मुकाबला करून देतो. पनास हजारपर्यंत परभारे बोलत होते. मी लाख रुपये, एक हाती, घोडे दोन व पदक घेतल्याखेरीज कधी वस्त्रे देत नाही. पेशवेयाचे गांडीखाली सिरोन मामला करीन म्हणतो. याप्रमाणे जो देईल त्यास मी मामला सांगेन म्हणोन धमकावणीने बोलले. याणी उदंड जाबसाल सांगितला परंतु न मानले. याप्रकारचा मजकूर जाला. पुढे होईल तो लेहून पाठविला जाईल. सारांश हेच कीं, स्वामीची निसबत अथवा ज्याची सिपारस स्वामीनी केली असेल त्यास फिरोन गोष्ट सांगावी. स्वामीनी केले करू नये, हा सिधांत विदित व्हावा म्हणून वारंवार लिहितो. +सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Purandare to Bhau : describes how Ramraja is bent upon defeating policy of the Peshwa.*

---

+ पत्र नाना पुरंदऱ्याचें. + पत्र पुरंदऱ्याचें.

*No. 71*]                                                                                    [*23-6-1750*

## श्रीशंकर.

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती. प्रार्थना यैसी जे. येथील वर्तमान ता। छ २९ माहे रजबू जाणून येथास्तित आसो विशाष. राजश्रीनी काल राजश्री नानास सागून पाठविले कीं संतूबाईस सोडून देतो. ज्याप्रा। पूर्वी सेर देत आला त्याजप्रा। आताहि देणे. त्यासी याणी सांगून पाठविले कीं तुम्ही खावंद आहात. ज्याप्रा। चितास येईल ते करणे. आणि सांगून पाठविले कीं दरबारास येणे. याणी जाब सागून पाठविला कीं, आम्ही विनंती करावी आणि तुम्ही मान्य न करावी. याजसाठी चितास येईल तैसा तुमचे तुम्ही कारभार करणे, यैसे सागून पाठविले. याउपर काल आस्तमा(नी) जिंतीच्या मजकुरासाठी बुऱ्हानजीबावा व सिदभटजी यैसे गेले होते. त्यासी यैकत नाही. साम दामहि जे सांगावयाचें तें जाले. पुढे खावदाची आज्ञा ज्याप्रा। येईल तेणे प्रा। वर्तनूक करतील. आज रा। रघोजीबावा जाऊन बसनार आहेत. समागमे रा। नानास व रा। गोविंदराव यासी व रा। येशवंतराव यासी घेऊन जाऊन तीन च्यार गोष्टीचा निर्गम करून घेऊन उठावे हा येत्यर्थ केला आहे. येक जिंतीचा हातरोखा व कडवलीतची देशमुखीचा हातरोखा व रा। बाबूजी ना। यांची वस्त्रे व आपले रुकसतीचा प्रसंग आज करून घ्यावासा निश्चये समस्तानी केला आहे. जर ह्या गोष्टी राजश्रीनी यैकून केल्या तर उतम आहे; नाहीतर समस्तानी मंडलीसुधा उठोन साहेबापासी यावे, हा मजकूर आडलतो आणि उदईक रघोजीबाबा येथून कूच करावयाची तजवीज आहे; मग रुणानबंद. शहरामधे तमाम जितकें राजश्री कैलासवासी त्यांच्या बटकी चाकर नफर व गरीब गुरुब जे आहे ते नित्य उठोन, राजश्री नानाकड व राजश्री रघोजीबावा याजकड येऊन गवगवा करितात की आमची काये गत्य करितात? आणि रघोजीबावास म्हणत आहेत की तुमचे कूच ज्या समई होईल तेव्हा आम्हास समागमे घेऊन जाणे, नाहीतर आपल्या हाते मारून जाणे, यैस्या बटकी बोलतात. प्रतिनिधी नित्य दरबारास जातात व प्रतिनिधीकडले गोपालराव यासी वालीत पडले. घरामधे प्रत्यक्ष माहारीन निघाली यैसे वर्तमान आहे! माहाराजास कलावे म्हणून विनंती पत्र लिहिले आहे. सेवेसी श्रुत होये, हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar describes to the Peshwa the disordered state of things at Satara consequent upon the regime of Ramraja. The attendants of the late King Shahu—both male and female—approached Raghuji Bawa with a request to settle their affair of maintenance. Ramraja has expressed his willingness to Nana Purandare to release Santubai.*

No. 72] [26-6-1750

श्री

आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती प्रार्थना यै(सीजे). छ २ रोज मगलवार दीड प्रहररात्र * * * *. (य)थास्तित आसो विशष. ये(थील) सेवेसी राजश्री बाबूरावजी पाठविले आहेत. ते भोयेंजवर येऊन उतरले आहेत. त्यासी समस्त पचायेत्न मिलाले व रघोजीबावाहि होते. त्यासी चवघाचे मते यैसे ठरले कीं श्रीमंतास कागद ल्याहावे. त्यांचे उतर आलियावर ज्याप्रा। आज्ञा करतील त्याजप्रा। वर्तनूक करावी. त्यासी रा। बाबूरावजीकड कागद लिहून पाठविला कीं तुम्ही भोयेजवरच दोन दिवस आसणे; आणि राजश्रीनी येका दोघाजणास * * * रावजी व रामाजीपंतास येकांती नेऊन बहुत * * * * केला कीं नानास जाऊन * * * * * * * ·वी यासी पत्र लिहून पाठ * * * * * (आ) ईसाहेब व तुम्ही ज्याप्रा। आज्ञा (क)राल त्याप्रा। वर्तनूक करून म्हणून सांगितले आहे व राजश्री गोविंद [पुढील एक बंद गहाळ] त उडाली आहे की पेशवियाणी संभाजी राजे यांचा पुत्र नेला म्हणून बहुत हुलड उडाली आहे. हे वर्तमान राजश्री * * * * * ले आहे त्याजवरून बहुत * * * * * वर्तमान यैकतो या * * * * * * हेत म्हणून वदंता आहे. यैकिले वर्तमान ते महाराजांचे सेवेसी विनंती पत्र लिहीले आहे. सत्यमिथ्या ईश्वर जाणे व राजश्री रघोजीबावास आज्ञा देत नाहीत. म्हणतात कीं आईसाहेबास आणलियाउपरी मग तुम्हास निरोप देऊ. त्यासी रा। रघोजीबावाची ता.........................आहें येथे राहावयासी हैराण आहेत आणि बाहेर त्या..........................आहे चादे येथील राजा..............................याची जलदी आहे आणि खर्चा..... .......................आहे यैसे वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहीणे. हे विनंती.

¶*A fragmentary letter describing the disturbed state of things at Satara.*

---

No. 73] [पाौ 27-6-1750

छ ३ शाबान.

श्री

पुा। तिर्थरूप राजश्री नाना ता। राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसी.

विनंती. उपरी, राजश्री बाबूजीनाईक यांस काल वस्त्रें दिल्हीं. आजी मागती येऊन बसोन कारभार करावा, राजश्री संभुसिंग जाधवराव व पानगांवकर व

बाबाजी जाधव व दर्याबाई वगैरे ज्यांस स्वामीनी सरंजाम जो नेमला आहे त्या यादीप्रमाणे तमाम हातरोखे करून द्यावे व राजपत्रांची परवानगी द्यावी, वरकडहि बारीक मोठा सर्व कारभार करावा, पांच सात महिने बखेडियाखालीं गेले, याउपरी दिवसगतीवर न नेतां निकडीने कारभार करावा, वरचेवरी येक येक मजकूर उरकीत जावा, ऐसे राजश्रीचें मानस. आजी दोनतीन बोलावणीं आम्हांस पाठविलीं. राजश्री गोविंदराव व राजश्री रामाजीपंत यांसच पाठऊन दिल्हे. यां उभयेतांजवल सदरहू मजकूर बोलिले. दुसरा मजकूर बोलले कीं, दर्याबाई रुदंती करीत येऊन बसली आहेत. बिडाहून त्यांचे मामलेदाराचा कागद आला कीं, अमल बंद केला म्हणून. त्याजवरून श्रमी होत आहेत. तर त्याची वाट कसी काये करणे असेल तसी करा. बयाचा नवा सरंजाम आधी करून द्या. देत नसाल तर तसेच सांगा. आपण बयासमेत तुलजापुराकडे उठोन जाऊ, असें केवल त्रासयुक्त भाषण केलें. सारांष, दर्याबाईचा सरंजामाचा आग्रह फार फार आहे. याचे उतर स्वामीनी पाठवावे त्याप्रो करूं. स्वामीनीं याद पाठविली ती अद्यापि राजश्रीस श्रृत नाही केली व पत्रहि गुजरानले नाहीं. अत:पर आज्ञा जाहाली तर यादीचा मजकूर बोलू. बेरंग होईलसे दिसते. कलले पाहिजे हे विज्ञापना.

¶*The letter narrates the state of things at Satara. The King has given the robes of honour to Babuji Naik. He also wants to pass orders regarding the grants of inams to Jadhav, Pangaonker and Daryabai. The King is very particular about the grant of inam to Daryabai. If it is not passed by the Peshwa, he says he will go back to Tuljapur along with his sister.*

---

*No. 74*] [पैा *27-6-1750*

छ ३ शाबान.

श्री

पुा तीर्थरूप राजश्री नाना
ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसीं.

विनंती. उपरी, राजश्री येमाजीपंताचे मुले माणसांचे मुक्ततेचा अर्ज राजश्रीस करावयास राजश्री रामाजीपंतास पाठविले. यानी जाऊन अर्ज केला कीं, श्रीमंता पत्र रात्रीं आले कीं, माहाराजांस अर्ज करून येमाजीपंताचीं मुलेंमाणसे खालीं उतरीत तें करणे, म्हणून बोलिले. त्याजवरी बोलिले, श्रावणमास या गोष्टीचा जाबसाल करीत नाही. उपरांतिक काये तो जाबसाल सांगू. इतके बोलून दर्याबाईच्याच सरंजामाचे बोलू लागले. तो मजकूर अलाहिदा लिहिलाच आहे.

त्याजवरी मागती रामाजीपंतानी अर्ज केला की, त्याचे मुलामाणसास बरे वाटत नाहीं, खालतीं उतरावीं. त्याजवरी बोलिले, मुलकांत धामधूम केली; लट नागावा नेला; ठाणी द्यावीं तीं देत नाही; याची वाट काये? त्याजवरी यांनी जाबसाल केला कीं, सर्व गोष्टींस आम्हीं खावंद आहोच. त्याची चिंता काये आहे? मुलास बरे वाटत नाहीं, त्यांची उतरावयाची तजवीज करावी. त्याजवरी राजश्री बापूजीबावा व गोविंदराव हे उभयेता जवल होते, हेहि बोलले, त्यांची मुलेंमाणसे उतरावयाचा हुकूम द्यावा. नाहीतर आम्हांवर अपेश येत आहे. त्याजवरी राजश्री बोलिले, तुम्हावर अपेश काये? तुम्ही त्याचे काये केले? त्याणे तुमचे काये केले आहे? आम्ही गडावर गेलो होतो, ते दिवसी त्याची आमची गांठ पडलीच होती. त्याणे आम्हास पुसिले, खालीं आम्हांस उतरावे. त्यास आम्ही जाबसाल केला कीं, तुम्ही खालते असिलेस तर सारखेच, वरते असिलेस तरी सारखेच, असे बोललो. तो आजारी नाही. बरा आहे. इतका मजकूर जाला. राजश्रीची मर्जी! दर्याबाईचा जुना नवा सरंजाम व पानगांवकरांचा सरंजाम आधी करून द्यावा. तरीच संतोष. नाही तर सर्व कारभार व्यर्थ आहे. तर दर्याबाई व पानगावकर व वरकडांची करारी आपण केल्याप्रा उरकावयाची आज्ञा दढोतर विचार करून ल्याहावी. यास आपण कदाचित सरंजामाचेविषीं परियाये लिहितील तर राजश्री आइकणार नाहीत. दर्याबाईस व पानगांवकरांस हातरांखे करून देतील, असा भाव दिसतो. कलले पाहिजे, हे+ विज्ञापना. येमाजीपंताची माणसें सोडीत नाहीत. कदाचित दर्याबाई व पानगावकर यास सरंजाम करून दिल्हा तरी आमचे हवाला माणसे करतील तर न कले. कलावे हे विनंती.

¶*Ramraja refuses to set free Yamaji Shivdev's family from the fort of Satara.*

---

*No. 75*] [*After 22nd June 1750*

श्री

पुा तीर्थरूप राजश्री नाना ता
राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती. उपरी, राजश्रीचे कर्ज वारावयाचा यैवज स्वामीनी मान्य केला. त्या यैवजी कैलासवासी राजश्रींनी राजश्री सुकानंद यांस सात हजारांची वरात

+ पत्र नाना पुंरंदरे याचें.

आपणाकडे दिल्ही, ती आपण येथें असतां घेऊन मुदतीप्रो पैका द्यावयाचा सावकारचा हवाला घेतला आहे. त्यास सदरहूपैकी चहू हजारांची मुदत जेष्ठ अखेर होऊन गेली. ज्याचा सावकाराचा हवाला घेतला तो नित्य मागावयास येतो. ढालढकल करून येक महिना रेटला. याउपरी सदरहू यैवज द्यावयाची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. विदित जाले पाहिजे.

¶*Purandare urges Nana to pay off the instalments of the debts of Ramraja.*

---

*No. 76*] [*June 1750*

श्री

पु॥ सेवेसी विज्ञापना. दिनचर्येचे वर्तमान: राजश्री स्वामी आजी त्रितीये प्रहरी राजश्री रघोजी भोसले यांचे घरास गेले. त्यानी राजश्रीस पोशाक व पदक व सिरपेच व हती नजर केला. येणेप्रमाणे देऊन बहुमान केला. तेथोन बनसी-पुरीस समाधान नव्हते म्हणून समाचारास त्याचे घरास गेले. तेथोन रूपपुरी गोसावी पुसेसावलीकर याचे मठास गेले. त्यानी राजश्रीस घोडा नजर केला. विदित जाले पाहिजे. सेवेसी+ श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*Ramraja pays a visit to Raghuji Bhosle at Satara and befriends him.*

---

*No. 77*] [*June 1750*

श्री

पु॥ सेवेसी विज्ञापना. राजश्री भुइंजेस आईसाहेबाकडे गेले होते, तेव्हा रा। गोपाळराव यांचे दंगियामध्ये रा। भवानीशंकर याजकडील शामजीपंत तेहि त्यामध्ये सामील जाले, तेहि दंग्यामध्ये सापडले. यास्तव मारनिले रुसोन घरास आले. यास्तव राजश्री रघोजी भोसले याचे घरास जातेसमई मारनिलेचे घरास राजश्री गेले होते. त्यानी राजश्रीस चोवीस मोहरा व घोडी येक व पोशाक यैसा नजर केला. विदित जाले पाहिजे. राजश्री फतेसिगबावाचे घरास समाचारास गेले होते. बावास बहुतसें बरे वाटत नाही. आजी पनास ढाळ जाले. सेवेसी+ श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*Ramraja goes to Raghuji's quarters and receives Nazar from him. Fatesing Bawa is ill.*

---

+ पत्र नाना पुरंदरे.

No. 78] [June 1750 ?

श्री

पुा तीर्थरूप राजश्री नाना ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती. उपरी, राजश्री गोविंदराव यानी वर्तमान सांगीतलें कीं, राजश्रीनी येकांती हातरोखा राजश्री येमाजीपंतास पाठविला कीं, लाख दोन लाख रुपये कर्ज जालें तर चिंता न करणे, हिमत न सोडणे, तुमचे अवश्येक आहे, तुम्ही खामखा झुंझणें, म्हणून. राजश्री प्रतिनिधीनी अर्ज करून हातरोखा घेऊन पाठवून दिल्हा व प्रतिनिधीनी येमाजीपंतास सांगोन पाठविलें कीं, तुम्हाकरिता हती घोडी सर्वस्व दौलत भरीस घालून तुमचे साह्य करूं. तुम्ही काहीं चिंता न करणे, हिमत न सोडणे, असेंहि सांगोन पाठविलें म्हणून आइकलें. हे विज्ञापना.

¶*Purandare to Nana and Bhau at Poona, communicating Ramraja's encouragement to Yamaji Shivdeo to fight (the Peshwa ?)*

---

No. 79] [June 1750

[पहिला बंद मिळाला नाहीं.]

२

—अन्वयें काही उदास नरम गरम रामाजीपंताहाती बोलविलें. याजवरहि राजश्रीनी पाठीमागें भाषण केले ते कोठवर काय ल्याहावें ? सारांष राजश्री परिछिन्न चिताचा खोटा कपटी. स्वामींच्या लक्षावर न चालावे हेच चिताची वासना हे पुर्ते कलो येते. नवे प्यादे आरब ठेवितात; ठेवले (त्यांस) आपल्या जवलून पैका देतात. 'जुने माझे येक कामाचा नाहीं. चट दूर करीन. माझ्या खातरेस येईल त्यास ठेवीन' असे बोलतात. वरकड जितके शाहूमाहाराजाचे आहेत त्यास म्हणतात की 'तुम्हीं बांम्हणाचे मंडलीत मिलला. माझे कामाचे नाहीत. माझे असला तर क्रिया द्या;' असे लाहानापासून थोरास चौकीदारासदेखील म्हणतात. कोणी कोणी इमानप्रमाण राजश्रीस देतात. नवे लोक ठेवतात त्याजवलूनहि इमाने घेतात. वाड्याभोवत्या चौक्या वाटून देतात. बंदोबस्त करतात. काल आम्हास राजश्रीनी सिदभट व शामराऊ व चिंतोपत याजबो सांगून पाठविले की माझा बंदोबस्त करणे तर करा; नाहीतर मी पुण्यास जातो. नाना मी येकच आहें. मी आपला कारभार करून घेईन. दर्याबाईचा सरंजामाच्या यादी करार करून देणे तर द्या, नाहीतर काय ते सांगा, यैसे सांगून

पाठविले. आम्ही उतर मारनिलेसी केले कीं जसी खावंदाची मर्जी असेल तसें करावें. आम्ही चाकरलोक आहो. वारंवार असे करा तसे करा म्हणावे, हर्दम[1] खावदासी जीत[2] करावी, माहाराजास आम्ही सांगतो बोलतो हे वाईट यैसें भासतें; तेव्हा कोणे प्रकारें अर्ज करावा ? जसी मर्जी असेल त्याप्रमाणे करावे असे बोलला. आणिक काय बोलावे ? बोलून काय होतें ? साफ कपटविषय; तेथें आम्ही चांगले बोलली तर कोठे मानते ? मानत नाहीं. याप्रकारचा विचार आहे. राजे दर्याबाईस घेऊन पुण्यास येणार आहेत; कलले पाहिजें. फतेसिंगबावा सर्व प्रकारे स्वामीचे म्हणवितात. दुसरा अर्थ किमपि नाहीं. दो चो दिवसा पुण्यास येणार. येतील. जसी स्वाम आज्ञा करतील तसी वर्तणूक करावयासी राजी आहेत. स्वामीनी सर्व प्रकारे कृपा करावी; उचित आहे. हे विज्ञापना.

¶*Purandare to the Peshwa: says that Ramraja is playing false and is self-willed; that he intends visiting Poona with Daryabai and upsetting the plans of the Brahmins.*

---

*No. 80*] [*June 1750*

**श्री**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना**
**व राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी,**

विनंती. उपरी, स्वामीनी लिहिले की पेशजी आम्ही व राजश्री बाबांनी[3] हावभरी[4] न होणे म्हणौन लिहिले होते, त्याजवरून तुंम्ही मलमलीत भाव धरला आहे, तरी ती गोष्ट कामाची नाही. तेणेकरून बहुत लक्षात अंतर पडते; यास्तव ठासाची सूत्रे राखून ठेवणे म्हणौन आज्ञा. ऐशियास उभयेतांचे आज्ञेवरून मलमलीत भाव धरला होता. परंतु राजश्रीनी कारभार तुमचे विचारें करतों, बसोन कसे करणे तसे * * * याप्राो बोलले. तो अर्थ स्वामीस लिहिला की, राजश्री नरम येऊन बोलतात. हाच विचार करणे असेल तरी राजश्रीसी कसे बोलावे, सलूक कसे करावे, ते ल्याहावे. त्याप्राो बोलोन करू. हे करणे नसेल तरी तैसेच ल्याहावें. राजश्रीच्या मुली व बाईका घेऊन येऊ. त्याचे उतर स्वामीनी लिहिलें की, असेच राजश्री बहुत वेल बोलले आण शफत केली ते प्रमाण कोठे जाली जे[5] आता होणार ? जर राजश्रीनी आमचे विचारें कारभार करणे तरी दर्याबाईस लाऊन द्यावी, पानगावकर कुल काढावे

---

१ प्रतिक्षणी. २ आग्रह.
३ महादोबा पुरंदरे. ४ महत्वाकांक्षी. ५ जे = ते.

तरीच प्रमाण, नाहीतर प्रमाण नाही. त्याजवरून राजश्री गोविंदराव व रामाजीपंत याजसमागमे याप्रो सांगोन पाठविले. त्याउपरी राजश्री बोलले. पुण्यास जावयास निघाले. रघोजी भोसले याजवर मध्यस्ती येऊन त्याणी आपला निकाल काढला, हेहि लिहिलेच आहे. सांप्रतचे पत्रात तरी मलमलीत प्रकार कामाचा नाही म्हणोन साफच स्वामीनी लिहीले. तरी उतम आहे. राजश्रीस आधीच बुधीचा प्रकाश नाही! त्याजमध्ये क्षुल्लकाची प्रेरकता!! आज सात महिने राजश्री लॅंग[१] धरून करू लागले लागले. येक दुसरा दिवस चालले. काही कारभार केला. मागती तिसरे दिवसी फिरला. याजप्रमाणें आज सात महिने होत आले. पुढे निरंतर तोच भाव. यात स्वामीचे मात्र स्वरूपास हान की, येवढे मातबर व सर्व गुणें पूर्ण आणि बंदोबस्त न होय. दुसरे ज्या ज्यासी करार बोलणे जालें ते येऊन काय म्हणून पुसतात. त्याजवल खाली पाहावें, इतकाच अर्थ जाला. राजश्रीस, मी होतो कोठे, आणून कोण्ह्या पदावर बसविलें, हे भानच नाही. जी अवस्था पूर्वाश्रमची, तेच अद्यापि कल्पितात. लजेचा त्याग असता, तरी शरम येती ते गोष्टच नाही. ऐशियास आम्ही मलमलीत भाव बोललो. राजश्रींनी बोलले ते लेहून स्वामीस पाठविलें. परंतु सूत्रे राखून ठेविलीच होती व उतम प्रकारे आहेत. आणि स्वामीनी करणे तरी उतम प्रकारे करावेच करावें. कृष्णेवर आले त्या दिवसापासून जाले असते तरी बहुत उपयोगात पडते. तेव्हा सेणाचे होते, आता मेणाचे आहे; पुढे लोखंडाचे होईल! हे[+] विनंती.

¶*Purandare to Nana. Being asked to deal firmly with Ramraja, Purandare says that the latter is fickle and vacillating : that he must be quickly restrained or he may grow more troublesome soon.*

---

*No. 81*] [*June (?) 1750*

**श्री**

पु॥ सेवेसी विज्ञापना. सांप्रत पुणियास स्वारी होत आहे. या निमित्यें-करून राजश्री स्वामी राजश्री येशवंतराव व राजश्री गोविंदराव व राजश्री नागोराव यांचे व आमचे गला पडोन, खर्चास मागतात. आम्हांजवल दाहा हजार रुपये मागन होते. आम्हीं साफ उतर केले, श्रीमंताचे आज्ञेविना आंम्ही कोठून द्यावे ? आम्हाजवळ येक रुपया नाहीं. येशवंतरायांस लाख पनास हजार द्या म्हणतात. त्यानी जाबसाल केला, लाख पनास हजार कोठून द्यावे ? तेव्हां राजश्री बोलिले,

---

१ कोणत्याहि पक्षाचा संबंध. + पत्र नाना पुरंदऱ्याचें.

कर्ज घेऊन द्या. काम चालवा. त्याजवरी यशवंतरायानी पागा, पीलखाना व गीर्दीच्या[1] लोकाचा रोजमरा, माहाराज पुणियाहून येत तोंपर्यंत चालवितों, आणिक कांहीं नाहीं, असे कबूल केले. गोविंदराव बोलले आम्हाजवळ यैवज कोठील ? आम्ही कोठून द्यावा ? तसेच नागोरायाकडील[2] जाबसाल, वरात चिठी पाहिजे. ज्यास देवाल त्यास वरात करून देऊ. रोख रुपयाचा मजकूर आम्हांकडे नाहीं. वरात द्यावी घ्यावी तर रुपया येणें हे विदितच आहे. त्याचाहि जाबसाल याप्रो शुष्कच उरकला. येशवंतरायाचा गला धरितच आहेत. पंचवीस पनास हजार कर्ज मेलऊन द्या म्हणतच आहेत. कसे होईल तें पाहावें. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Ramraja at Satara being in great straits for want of funds to pay his establishment and current expenses, presses several prominent persons at court to lend him money.*

---

*No. 82*| *[June (?) 1750*

श्री

पु॥ सेवेसी विज्ञापना. आजी दोनच्यार घटका रात्र जालियावर आम्हांस व त्रिवर्ग कारभारियांस राजश्रीनी बोलाऊन नेऊन घेऊन बसोन खर्चावेचाच मजकूर बोलिले. राजश्री येशवंतराव व राजश्री नागोराव यांजवल बहुतच गलां पडिले. कर्जवाम यावर तजवीज करून पैका मेलऊन द्या म्हणून बोलिले. तेव्हां येशवंतरायाजवल राजश्रीचाच काहीं यैवज होता तोच वीस हजार रुपये कर्ज द्यावयास कबूल जाले. तसेच नागोरायाजवल इंदापूरपैकीं पांच हजार रुपये यैवज जमा होता ते व विठोबा नाईक वांकडेपैकीं पांच हजार व किरकोल लोकांकडील नजरेच्या यैवजी असे मिलोन बारा पंधरा हजारपर्यंत नागोबानी द्यावेसे केले. त्यापैकीं येक हजार रुपये केसरकराकडील नजरेचे, ते तुम्ही द्या म्हणून आम्हांस म्हणो लागले. आम्ही साफ सांगितले, आम्हास येक रुपया म्हटले तर मिळत नाहीं! इतका मजकूर जाला. विदित जाले पाहिजे. सेवेसी+ श्रुत होये, हे विज्ञापना.

*¶Ramraja presses several persons to pay him funds.*

---

१ चौकीच्या.

२ नागोराम लपाटे देशमुख, याचा भाऊ देवराव मेघश्याम–कुंगावकर—दे. क. ग्रा. नागोराम भागवत हा इसम वेगळा. तो वामोरीकर व कोंकणस्थ.

+ रामाजीपंतांचें हस्ताक्षर.

No. 83] [June 1750

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसी,

विनंती. उपरी, सिहीगडकरी हवालदार व सेदीडसें माणूस खेरीज करून वरकड सर्व सलुखात आले. शामजीपंत वगैरे गडावरून आले. सरनोबत व नाईकवाडी येणार. मातुश्री आईसाहेबानी जावें, राजश्रीकडील लोक उतरावें, आपले चढवावें, याप्रा अनुसंधान आले. यास्तव तीर्थरूप राजश्री नाना चांभारगोंदेयांस गेलें. आम्ही व राजश्री बाबा याच मुकदम्याकरिता राहिलों आहों, म्हणोन लिहिले होते. त्याजउपरी काहीच वर्तमान लिहिले नाही. तेच राजकारण बलावले किंवा फिरले हे सविस्तर ल्याहावयास आज्ञा करावी. तीर्थरूप तिकडून कितीका दिवसांत येणार ? सरदाराचे समजाविसीचा विचार कसा जाला हे ल्याहावे. येथील विचाराची उपेक्षा न करावी. रघोजीबावास आज रविवारी मुहूर्त उतम म्हणोन निरोप घेऊन बाहेर खेडाजवल जाऊन राहू म्हणत होतें. आम्ही आमवाश्येपर्यंत राहाविलें. शहराबाहेरून तुमचे आज्ञेखेरीज पुढे जात नाही, परंतु घरातून वोढ पाडू द्या म्हणतात. आम्ही तरी राहाविलेच आहेत. +स्वामीनी जर या मनसब्यास हाताचे पायावर घातले तरी मग येथे आम्ही तरी उगेच सारे वोढून उगेच सेवटी फिके पडावे ! ऐसे आसेल तर साफ ल्याहावे. उगेच राहू. हे विज्ञापना.

¶*Purandare inquires whether the settlement of Sinhagad has stood or failed,—Ramraja evacuating and Tarabai occupying it. He also asks whether he should allow Raghuji to proceed to Poona.*

---

No. 84] [30-6-1750

श्रीशंकर

श्रीमंत राजश्री नानासाहेब व ता राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा नमस्कार विनंती. प्रार्थना येसीजे. येथील क्षेम ता आशाड सुद अष्टमी शनवार प्राथकाल जाणून श्वामी-कृपेकरून यथास्तित आसो विशष. येथील वर्तमान राजश्री बाबूराव फडनीस येथे जे समयी ते समयी मोठी शहरात आवई जाली कीं आता शहर लुटले

---

+ पत्र नाना पुरंदऱ्याचें.

जाईल. आणि राज्यास धरावयासी आले म्हणून वदंता. जितेके तितके[१] पुसावयासी येत कीं कैसे करावे ? तेव्हां राजश्री नानानी अवघियाची दिलदारी केली कीं तुम्ही काही चिंता न करणे. अद्यापि तरी राजेश्रीस दहसत आहे. व तमाम लोकास रोजमरे आपल्या रोबरो देतात. आणि हजिरी गैरहजिरी आपले रोबरो पाहतात यैसे वर्तमान आहे व रा रघोजीबावा श्वदेसी व ये देशात गाव राहवयासी पाहिजे यास्तव दरबारास गेले होते. त्यासी याणी बावधान अगर वाघोली दोहींतून एक देणे. त्यासी राजे बोलले कीं विचारून गाव देतो. रघोजीबावा उठोन घरास आले. त्यासी याचे कबिले लस्करात आले होते तेहि जेउरास गेले. जातीनसी येक्या पालखीनसी येक घोडा यैसे हवेलींत आहेत. आज्ञेसाठीं बहुत हैराण आहेत. येथून आज्ञा कधी होईल ते पाहावे यैसे आहे. राजेश्री रायाजी भोसले जे आले आहेत ते उपवासी मरतात. हैराण आहेत. याजला खर्चास नित्य उठोन मागतात. [+] व श्वारी न आल्यावर उदाजी चव्हानासी बोलले कीं उदईक आपण तुम्हासांगाते संरजाम देतो आणि येमाजीपंताच्या पुतण्यास मारुन काहाडणे. नाही तर आपण येतो. त्यास उदबानी जाब दिल्हा की आपणास काही संरजाम लागत नाही. साहेबी येथे राहावे आणि तमाशा पाहावा व येथे कितेक प्रकारे खूल माजले आहे आणि बुधीस भ्रौश रकारपूर्वकाच्या करितात. परंतु म्हराटा होऊन हा काल परियेत वावगी गोष्ट बोलवत नाही. त्या कुचिध्यांत[२] पडत नाही. जर आज्ञा होईल तर मागाहून त्याचे नाव लिहून पाठऊन देऊ. त्रिंबकजी भोसले बावांस टुमा देतात कीं वचनचलन होऊ द्या व त्यांला बावानी जाब दिल्हा कीं ते कागदी लिहिता न ये. सतरा जने सतरा गोष्टी सांगितल्या त्या काहीं मला ऐकने नाही. थोरले कैलासवासी राजश्री होते त्यांच्या जागे श्रीमंत आहेत यैसे बोलतात. आज आदितवारचे मोहर्त होते, परंतु काही आडतला पडला याजमुले मोहर्त टलले. पुढले रविवारी पाहिले आहे. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणे हे विज्ञापि.

¶*Vyankatrao Moreshwar reports to the Peshwa the news from Satara, the principal items of which are, that there was some possibility of trouble arising from the arrival of Baburao Fadnis, but it was averted by Nana Purandare who put courage into the people ; that Raghuji demanded a village as a place of residence on this side, which was subsequently promised to him.*

---

१ जितके तितके = सर्व, सगळेजण, जो तो, + निराळा बंद.

२ गैरगोष्टींत, भानगडीत, वाईट मसलतींत.

*No. 85]* *[June-July 1750*

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना

व तथा राजश्री भाऊ स्वामींचे सेवेसी,

विनंती. उपरी, दर्याबाईकडील बातमीचे वर्तमान: राजश्रीचा व आपला जिवास जीव संकल्प आहे. पुण्यास राजश्रीस जावयाची सलाह त्यांणीच दिल्ही होती की रुबरू बोलावे म्हणजे पहिलील गोष्टी काढाव्या. यास्तव राजश्रीनीहि निघावयाचा सिधांत केलाच होता. मग ती गोष्ट राहून राजश्री रघोजीबावास मध्यस्तीस पाठवावयाचा विचार जाला हे वर्तमान पूर्वी लिहिलेच आहे * * * * * (सांप्रत ?) फारच ठास बसाविला, तन्मुळे शामरायाचे भाशण की, आम्हीं कधी जात नाही. आहों येवढियानसीच मरून बरें म्हणऊ. असेहि असोन आज बळ त्याचे आहे. लाऊनच देतील तरी, आम्ही निंबाळकर आहो, जाधव आमचे सोइरे आहेत, सरलस्करावर दाहा हजार फौज ठेवितों. या राज्याचे जिवासाठी पंचवीस हजार फौज जथों. पेशवे काये आहेत ? श्रीमंताचे मनात हे काही नाही. करतात ते बाबा व गोविंदराव करतात. बरें, कसे करितों ते पाहा. अखेर श्रीमंत आम्हाप्रमाणेच करितील. याचे मात्र पारपत्य श्रीकृपें उतम प्रकारे करू. चिंता काये आहे ? येमाजीपंत हजार दीड हजार फौजेनसी आहे. उद्या त्यांसच आणितों म्हणोन वल्गना करीत आहेत. त्याचे चितात मुप्रयुक्त किमपि नाहीं. सातारियावरील हवालदार आमचा मामा आमचे विचारास लागला म्हणोन सारे गडकरी व हकीम याणी त्यासी सतत लाविली आहे. अश्या समयात राज्यास घेऊन गडावर जाऊ लागलो तरी घेणार नाहीतसे दिसतें. असे सारे खेळ याचेच आहेत, म्हणोन बोलले. याहिपेक्षा नाना प्रकारच्या गोष्टी बोलतात. दोनतीनसे राऊत आणिले होतें ते दोन तीन मजलीवर आलें आहेत. मारून कडे[1] वेघवितो. (त्यानी) काये करणे आहे, म्हणोन लाहाने तोंडे थोर घास घेऊ लागले आहेत. काहि लिहिता गाठ पडत नाही. हे[+] विज्ञापना.

¶*Ramraja's obstinate measures against the Peshwa are reported to Poona by Purandare. Some men upon whose support Ramraja relied are mentioned.*

---

१ 'कडे वघवितो' अशीं अक्षरें दिसतात. + पत्र नाना पुरंदऱ्याचें.

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व

तथा राजश्री भाऊ स्वामींचे सेवेसी

विनंती. उपरी, राजश्री काल बोलता बोलत की, डेरे बाहेर देतो. प्रतिनिधी! तू भिऊ नको. माझे डेरेयाबराबर डेरे दे. याचा भाव रात्रौ बातमीने निघाला. डेरे बाहेर द्यावे, प्रतिनिधींनी फौज मेळवावी असे कबूल केले होते, त्याजवरून म्हणत होते. त्यास प्रतिनिधींचा निरोप राजश्रीस गेला की, असी फौज आपणास जमा होत नाही. आपणास निरोप द्यावा. खटाव प्रांती जाऊ. तिकडे फौज जमा करून इकडील बंदोबस्त करू. सिहीगडाकडे आपणास नेऊ नका म्हणोन, त्याजवरून राजश्री रागे भरले सिव्यागाळी दिल्ह्या. राजश्रीचा भाव तोंडी मात्र पुण्यास जावयाचा. परंतु सिहीगडास जावे हा सिधांत. मातुश्री आईसाहेबास आणावयास दिनानाथपंत पेशजी पाठविलेच आहेत. हाली काल बाजीराव यादव याची रवानगी केली की, गोपाळराव याजवर हात टाकला म्हणोन तुम्ही वाईट मानू नका. तुमचे ऊर्जित करीन. मातुश्रीस ह र ता ने(हरतरेने?) सांगा. इमान प्रमाण देऊन सिरवळ अथवा सिवापुरास घेऊन या. तुमचे पत्राची वाट पाहातो. आपण तेथपर्यंत येतो, पुण्यास येत नाहीं. याणी जाबसाल उदंड केले की, माझे व गोपाळरायाचे म्हटल्याने कसी येतात? परंतु उकालच घेतला. सेवट आम्हास येऊन बाजीरावानी पुसिले. आम्ही सांगितले की, जावयाचे कबूल करा. येतील तर घेऊन येईन; न येत तरी जाबसाल पाठवीन म्हणोन बोला. त्याजवरून बाजीराव सदरहूप्रो बोलले. त्याजवरून याची रवानगी जाली असें. आज स्वार होऊन येतात. रायाजीपंतास दोनसे प्यादा चाकर ठेवा म्हण [ त ] होते. ज्या त्यास फौज ठेवा म्हणतात. याप्रो येथील विचार आहे. कुलकुला[1] नारोजी व माणकोपंत मिरवत आहेत. आज तरी जावयाची गरमी दिसत नाही. राजश्री गोपाळराव माहादेव याणी सांगोन पाठविले होते की, आठ रोज राहिले. तहकीक होईल ते मागाहून लेहून पाठऊ. काल रात्री येशवंतराव व नागोजीराव उदंड बोलले. परंतु काही अनुमात्र पश्चाताप नाही. साबाजी नाईक निंबालकर घरास आले म्हणोन कोण्ही वर्तमान सांगितले. त्याजवरून त्यास यावयाविसी पत्र लिहिले आहे. आज प्रात:काली मुदबखाचा बोभाट आला, त्याजवरून रायाजीपंताकडून दोन खंडी दाणे देविले.

---

१ सर्वाधिकारी.

दौलतराव यासी बोलले, तुम्ही कारभार तटा, किती दिवस तटता तो पाहातों. दगडास पान्हव येईल परंतु मजला येणार नाही. राजश्रीचे मते, सिंहीगडावर आपले लोक चढले आहेत. किल्यानी बल धरले आहे. आपण पाच सात हजार फौजेनसी जावे. वीसपंचविसाचे नाव घेतात. फतेसिंगबावास म्हणतात की वीस हजार ठेवा. प्रतिनिधी दाहा. (असें) तोंडे माप आरंभिले आहे.. आपणाकडील सरदाराकडेहि अंतस्ते माणसे पाठविली आहेत. ते हिंग लाऊन पुसणार नाहीत. परंतु स्वामीसी बंद बाधावयाच्या युक्ति मात्र करीत आहेत. केलले पाहिजे हे विज्ञापना.

¶*Purandare to the Peshwa: says Ramraja is struggling to gather an army; that he is issuing orders to several of his Sardars to collect their forces ; and is trying to prevail upon the Peshwa's Sardars also to join him with their men.*

---

*No. 87*] [*June-July 1750*

**श्री**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना**
**व राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी,**

विनंती. उपरी, कैलासवासी राजश्रीच्या बाइका व मुली काढून लाऊन द्यावयाची आज्ञा. त्यास येथे सर्वांचे विचारें की, थोरला कारभार करणे, तरी यासच न्यावेसे काये आहे ? यास्तव आजपर्यंत काढल्या नाहीत. पुढे जसी आज्ञा होईल तसी वर्तणूक करून. दुसरे येके पत्री स्वामीनी लिहिले कीं, दर्याबाईस त्यांचे जाहागिरीचे माहाल आहेत ते घेऊन त्याणी जावें. अथवा सरलस्कर सोमवंसी यावावत सरंजाम घेऊन सुखरूप सरलस्कर करावें. तरी दर्याबाईनी सातारियास हवालदारासी नाते लाऊन राजकारण केले. हजार दोनतीन सरलस्करची फौजहि जमा करितील. ते, राजश्रीची इतबारी फौज, राजश्री धणी इतक्यानसी सर्वावर आ[1]क्रमसा दाखऊन राज्यभार करितील. परंतु स्वामीचे हातचा लगाम जाईल. जरी स्वामी समूल वृक्ष काढतील तरीच ह्या राज्याचा लगाम स्वामीचे हाती राहातों. नाहीतर राहात नाही. हे बरे चितात आणावे. हे[2] विज्ञापना.

¶*Purandare writes that Ramraja tries to collect armed forces and conduct his administration on his own responsibility. The Peshwa is asked to take strong measures against him.*

---

+ पत्र नाना पुरंदऱ्याचें.

१ जोर, धाक, जिंकण्याची इच्छा.

२ पत्र नाना पुरंदऱ्याचें.

No. 88] [June-July 1750

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व
तथा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी,

विनंती. उपरी, राजश्रीनी पिराजी नाईक यांस बोलाऊन आणिलें होते. आमचे मरणाचे सोबती आहा की नाही म्हणून पुसिले. त्यासी पिराजी नाईक यांणी जाबसाल उतम प्रकारें केलें. परंतु राजश्रीचे संभाशणाचा मजकूर, सिहीगडचे मजकुराप्रमाणें, मारावे मरावें, हाच भाव जाला. यास धाकटेबाईचे वाडियात येऊन राहावयास सांगितले. हे बोलले उगेच येऊन राहू. परंतु मरणाचे सोबती आम्ही नाही, ऐसे म्हणोन उठोन आले. आमचे घरास येऊन वर्तमान सांगितले. बसापाचे घराकडे व पुढें व थोरले देवडीकडे डेरे उभे करून तमाम लोकास चौकीस येऊन राहा म्हणून सांगतात. कोण्ही कोण्ही जाऊनहि राहातात. याप्रो करीत आहेत. डेरेयात व जवल जाऊन लोक राहिले तऱ्ही स्वामीचे लक्षात आहेत. परंतु स्वामीनी मात्र येक निश्चय केला पाहिजे. याउपरी बाकी काही राहिली नाही. काये तो विचार करून उतर ल्याहावें. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*Purandare to Nana. Describes how Ramraja was struggling to assert himself.*

---

No. 89] [June-July 1750

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व
राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. पेशजीचे पत्री स्वामीनी लिहीले की, राजश्री बोलतात ते प्रमाण होणे कलतच आहे. अविस्वासी कारभारात, कैलासवासी राजश्रीनी ज्याची निरवणूक करून दिल्ही त्या मुली व माणसें तेथे ठेवावी हे उतम नाही. यास्तव त्यास लाऊन देणें म्हणोन. त्यावरून फौज भुईंजेवरी होती ते सातारा काल रविवारी आणिली. तों दुसरी पत्रें संध्याकाली येऊन पावली. त्यात

---

+ पत्र नाना पुरंदऱ्याचें.

ठासाचाच भाव लेहून आला. राजश्रीस तरी नित्य कारभार करण्याची त्वरा. दोन च्यार बोलावणी पाठऊन रामाजीपंतास बोलाऊन नेऊन कारभार करावयास लावावे. करीत बसावें, तरी स्वामीची आज्ञा या प्रकारची. न करावे तेव्हा ठा[१]स बसवावाच बसवावा याप्रो करणे प्राप्त जाले. त्यास आज प्रात:कालीच राजश्री बापुजीबावा व रामाजीपंत या समागमे राजश्रीस विनंती करावयास पाठविलें. याणी पष्ट भाव राजश्रीस सांगितला की, माहाराज कारभार करावयास सांगतात; करावा तरी तेथील आज्ञा नाही. न करावा तरी साहेब करीत नाही म्हणतात. ऐशियांस जर दर्याबाई व नारोजी वगैरे काढाल तरी कारभार चालेल, नाहीतर चालणार नाही. आमचा रुसवा असोन कोण तुम्हाजवळ बसतो ? कारभार साहेब आणि ते कसा करतो पाहू म्हणून बहुत बोलोन, उठा, कोण्ही बसू नका, ऐसें बोलोन जवळ होते ते सारे उठविले. त्रिवर्ग कारभार बापुजीबावा दौलतराव आदिकरून सर्व आणिले. कोण्ही जाऊ दिल्हे नाही. गोपाळराव महादेव याणी दाणा बंद तरी केलाच होता. वराडचे यैवजी काही रुपये देऊन रोजमरा राजश्री वाटणार होतें, ते देखील बंद करविले. परंतु अनुमात्र क्षित नाही. देवढीपुढे डेरे उभे करून तेथे चौकीस लोक बसवणार. रात्रीच्या चौकी पाहाऱ्याची बंदोबस्ती करावयांस लागले आहेत. फौज येऊन जवळ उतरली. ठास दोन तीन वेळ बोलला. याजउपरी काही बाकी राहिली नाही. याउपरी च्यारी सूत्रे लागू करून जिकडील तिकडे ठास बसऊन करता उत्तम. नाहीतर दोघी बाईका व दोघी मुली व येक दोघे कारभारी व जे येतील ते आम्हाबराबर घेऊन आम्ही उठोन यावे इतकेच होईल. स्वामी म्हणतील की येवढे काय थोडे ? तरी हे काहीच नाही. दरमाहा बंद केला आहे. चरितार्थ कसा चालेल ? तरी आम्ही उठोन आलो, येथे राहणार ते राहिले, त्यांस राजश्रीची मर्जी रक्षणेच लागेल. येक स्वामीचा दरमाहा खेरीजकरोन जो असेल येवज तेवढियातच संपादून राजश्री घेतील. सातारियाचे राजे होऊन बसले तऱ्ही यास क्षित नाही. परंतु स्वामीचा लौकिक काये राहिला तो स्वामीनीच पाहावा. हे[+] विज्ञापना.

¶*Purandare is asked by the Peshwa to be very firm with Ramraja. Purandare has given Ramraja definitely to understand that he will manage his affairs and pay attention to his administration provided he (Ramraja) sends Daryabai and Naroji away from his court.*

---

१ धाक. + पत्र पुरंदऱ्याचें.

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना
व राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. दर्याबाईस काढावयास पिराजी नाईक व जानराव व तुकाराम नाईक मुतेवजे[1] आहेत. म्हणतात की, तुंम्ही पाठीवर असा. बोलोन अथवा हाती धरून त्यांस आम्ही लाऊन देतों. नारोजी वगैरे काढावयाचा मजकूर तरी हुजरातीपैकी मोगलिये अन्नास अजीर्जे[2] जालें आहेत. पोटासाठी गलाच पडणार. त्यास लाऊन दिल्हे तरी आज हाती धरून बाहेर काढतों. मागील बाकी आम्हास द्यावी. राज्यास दरकार नाहीच. हर कोठे पोट भरू. त्यास आश्वासन दिल्हास आज करतात. राजश्रीचे मायेचे सेखमिरा व त्रिंबकराऊ त्यांस दरबारचे वर्तमान कळल्याउपरी आम्हाकडे आले होते. आम्ही वर्तमान सांगितल्यास, या कामात काये चिंता आहे? आम्ही करतों, असे म्हणतात. वरकड पेशजी लिहिल्याप्रो। उदाजी चव्हाण वगैरे सिध आहेतच. याप्रकारें हे सिधता करून ठेविली आहे. आपले विचारास आलियास पत्राची याददास्त लिहिली आहे, त्याजप्रमाणे पत्रे लेहून पाठवावी. करणे असेल तरी करावें. नाहीतर साफ लेहून पाठवावें. आम्हास यावयाविसी ल्याहावें. आम्हीं जे आपले मायेचे असतील त्यास घेऊन येतो. त्याचा सर्व भार आजवर स्वामीवर आहेच. कैलासवासी माहाराजानी चालविले त्याजप्रमाणें स्वामींनी त्याचे चालवावें. सुखरूप असतील. दर्याबाइचे सरंजामाची जफ्ती स्वामीने करविली आहेच. त्याच प्रकारावर देहावर येऊन स्वामीची गरज आहे असे कल्पून स्वामीसी बोलावयास येणे तेव्हा येऊन बोलतील. स्वामी व राजश्री येक होतील, हे[+] विज्ञापना.

¶*Purandare submits to Bhausaheb for his approval, his plan for removing Daryabai from the affairs of Satara. Piraji Naik, Janrao and Tukaram Naik have, he says, undertaken to do this. Shaikh Mira and Trimbakrao have also joined. If the plan is not approved, the writer is prepared to go back to Poona with his men.*

---

१ उद्युक्त. २ दीन ; लीन.

+ पत्र पुरंदऱ्याचें.

No. 91] [June-July 1750

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना

व राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. सूत्रें आम्हाजवल आहेत तीं उतम प्रकारची आहेत. राखून ठेवावयाचा विचार तरी, (सूत्रें) राखून ठेवणें हे फौज आली नव्हती तोंपर्यंत होती. फौज आली. स्वामीनी राजश्रीजवल बोलावयांस सागितल्याप्रमाणें बोललों. कर्तव्यभाव जघन्य जाला. याउपरी त्वरेनें करता उतम. नाहीतर सूत्रे कसी राहातील ? गोष्टीची फायशे[1] जाली, काही बाकी राहिली नाही. आपणाकडील विचार कलल्यावरून तिकडील विचाराचे आपलाले विचार पाहू लागलें आहेत. तेव्हा अर्थातच गोष्ट करणे प्राप्त जाली. नाहीतर बाजी हातची जातें. राजश्री आपले विचारें करू(न) चालो म्हणतात, परंतु परिणाम नाही. आईसाहेबानी पुराणिक व अहिल्याबाई काढावी, आपण दर्याबाई व पानगावकर काढतों म्हणतात. हे सर्व मृशा आहे. प्रलापावर घालावें. कां की, आजपर्यंत आसेच होत आलें. आम्हीं कावा करावा त्याणी पड घ्यावी. मागती हे राजश्री, यांस काय करावें, याचे प्राक्तनी असेल तसें होईल, आपण च्यार कामें थोक थोकें[2] करून निकाल पाडावा या लक्षे स्वामी करीत गेलें, तेंच त्यांस पाप वाटलें आहे. येणेकडून ते शाहाणे जालें. आपलाच कारभार निराला पडला तोच भाव यांचा आहें. स्वामीनी पुर्ते नेट धरून करावयाचा विचार लिहिला हा युक्त आहे. परंतु अद्यापिहि तेणेप्रमाणें जर जाला तरी उतम, नाहीतर काही नाही. हा राजा परिछिन्न स्वामीचे विचारें चालत नाही. किंचित बल जालियास स्वामीस स्वतंत्र असे जाणतों. स्वामीकडील सिलेदारापैकी बरें मर्द माणूस धनाजी थोरात, मुले[3], दुसरे तिसरे जे कोण्ही येतील ते फोडावे, आणावे, चाकर करून ठेवावें ही वासना आहे. हे विज्ञापना.[+]

¶*Nana Purandare advises Peshwa to take strong measures against Ramraja: otherwise he says, he will soon assert his independence.*

---

No. 92] [2-7-1750

श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक साा नमस्कार विनंती. प्रार्थना यैसीजे येथील क्षेम ताा. आशाड सुद ९ नवमी रविवार अरुणोदयें

---

१ फायश = प्रसिद्धि, जाहिराणा. २ थोक = मोठीं ? निश्चित, पूर्ण ?

३ मुले ? आडनांव असावे. + पत्र नाना पुरंदरे याचें.

पावेतो येथास्थित असो विशष. येथील दरबारचा मजकूर तों राजश्री काल दोन प्रहरा राजश्री नानांकडे आले होते. त्यासी म्हणो लागले कीं आपण पुणियासी जातों व तुम्ही शकरची रदवळी (?) करणे आणि आम्हाखेरीज काही आऊसाहेब येत नाही. आम्हीं जाऊन आउसाहेबी पायावर डोई ठेऊन आणि राजश्री पेशवियासी येकूच गोष्ट सांगणे आहे ते सांगू आणि आईसाहेबास घेऊन येऊ. त्याजवरून राजश्री नानानी जाब दिल्हा कीं आपण जावे यैसे काये आहे. आम्ही असोन काये करावे. आम्ही व गोविंदराव समस्त मिळून मसलत करून आपणास विनंती करून; मग त्याजप्राा साहेबी करणे ते केले पाहिजे. जलदी न करावी. तेव्हा बोलले कीं मीं तर जाईन. मग हे म्हणाले कीं तुम्ही जाल, परतु वाटेत आईसाहेबानीं फौज बसविली आहे आणि हूकूम केला कीं कोन्हास येऊ न देणे आणि आपण जातील. परतु साहेबासमागमे जे कोन्ही आबरूचे माणूस जातील त्याच्या जीवास घात कराल यैसे सांगितले. मग राजे म्हणाले कीं मी दाहा माणसासी जातों मग कोन्हास मारतील. तेव्हा याणी जाब दिल्हा कीं आपण माहालास जावे. आपण रा रघोजीबावास बोलाऊन आनून व गोविंदराव यैसे बसतो आणि साहेबास विनंती करतों ते मान्य केली पाहिजे. तेव्हा राजे माहालास गेले. मग समस्त मंडली मिळून मसलत केली कीं रा रघोजीबावांस आज्ञा देववावी आणि राजश्री गोविंदराव व राजश्री नानानी व रा नागोराव याणी त्याचे समागमे जावे. श्रीमंत राजश्री पेशवियासी व आऊसाहेबास विनंती करावी. ते ज्या प्रो आज्ञा करतील त्याज प्रो राजश्रीस विनंती करून पाठऊन मग राजश्री बोलावयाचें असल तर बोलऊ; यैसा निश्चये केला मग दोन प्रहर रात्री मंडलीनें मिळून रा रघोजीबावांस रुकसत केले, येक दुपटा निंबोली पाघरविला. साहेबास कलावे म्हणऊन लिहिले आहे. मंगलवारचे मोहर्त आहे. माहाराजास कलावे म्हणून लिहिले आहे. सेवेसी श्रुत होय + बहुत काय लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*Vyankatrao Moreshwar describes to the Peshwa how Ramraja was prevailed upon to cancel his plan of going to Poona with Tarabai. The writer further reports the departure of Raghujibowa from Satara.*

---

*No. 93]* *[3-7-1750*

## श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. प्रार्थना येसिजे. येथील क्षेम ताा छ ९ माहे शाबान मंगलवार त्रितियेप्रहर पावेतों साहेबांचे कृपेकरून येथास्तित आसो विशष. दरबारचा मजकूर तो

कालपासून राजेश्रींनी दर्याबाईस वाडियात घेऊन आले आहेत आणि तमाम जितकी हुजरात होती तितकियासी ताकीद करून तमाम वाडियाभोंवती चौकी देवविली * * * * * * * * येक डेरा तो राज * * * दरवाजियाचे पुढे चबुतरे आहेत, त्या चबुतऱ्यावर दिल्हा आहे व दुसरा डेरा जेथे काला वाघ जेथे होता ते ठिकानी दिल्हा आहे. माणसे पटाईत व बरकंदाज वगैरे कैक बसविले आहेत आणि रात्री आपण च्यार्‍ही प्रहर रात्र जागतात. बरे वाटत नाही आणि जागतात. हाका आणि आरोल्या मारितात. बहुतसी खबरदारी करीतात आणि दर्याबाई(स) म्हणूं लागले कीं तुम्ही काही चिंता न करणे, माझा प्राण जेव्हा जाईल तेव्हा तुझ्या कोन्ही वाटे जाईल यैसे म्हणू लागले. आणि दर्याबाई म्हणती कीं पेशवियाणी माझी इकडे याप्रकारची गत्य जाली आणि मोगलाईत तो जागिरीपासून चेवलो यैसे दुतरफाहि बुडालो यैसे.

¶*Vyankatrao Moreshwar writing from Satara says that the King has brought his sister Daryabai into the palace and has taken precautions to post guards all round. Ramraja assures her that no one will harm her while he is alive.*

---

*No. 94*] [पो *5-7-1750*

छ ११ शाबान.

श्री[१]

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व तथा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती उपरी. आजचे दरबारचे वर्तमान तरी कालपासून ठास उतम रीतीनें बसला. त्याजवरून मल्हारपंत बाहेर राहात होता तो वाडियातच जाऊन राहिला. कालपासून हुजरातचे जमातदार सेखमिरा वगैरे व बाबाजी जाधव, पिराजी नाईक आदिकरून बोलाऊन नेऊन राजश्रींनी पुसिलें. सर्वांनी येकवाक्यताच जाबसाल केला की, तुम्ही उतम रीतीने चालल्यास तुमचे सोबती. पानगावकर व दर्याबाईस रवाना करा, याप्रों बोलले. तेव्हा राजश्री फारच नरम पडलें. लाहानसानाचे तोंडची गोष्ट की, जर हे लौकर जातात तरी उतम; नाहीतर मारले जातात. दर्याबाईस हाती धरून लाऊन देतात. पिराजी नाईक तर हात घालून पालखीत बसवावयांस सिध आहेतच. असें चहुकडून काऊर उठलें. तन्मुळें दर्याबाईनी निघावयाचा निश्चय केला. शामराऊ बाबूराव यास मरणप्राय जालें. उभयेता पुढे येऊन किंचित राजश्रीजवल येकांत व निरोपाचा मजकूर केला, तों दर्याबाईहि वाडियात आली. मग हे उभयेता पडद्याबाहेर निघालें. मग बहीण-

---

१ ही पुढील नं. ८५ चें पत्राची पुरवणी आहे.

भाऊ येकमेकाचे गळा हात घालून बहुत रडली. त्यामध्यें दर्याबाईनी बहुत ग्लान व कारभारियास सिव्या व स्वामीस दिल्ह्या. 'आपणास दौलत नव्हतीसी नाही. राज्या, तुझे बरे व्हावे, तुजला सिकवावें, म्हणोन मी आलों. सेवट माझीतुझी तूट पाडली,' म्हणोन बोलली. दोघी राण्याहि आल्या. असी चौघेजणें मागती रडली. असी घटका येकदोनपर्यंत अवस्था जाली, तो नारोजी आला. तोहि त्यातच मिळाला. त्याचेहि रडे पाहून मागती सारीच रडू लागली. नारोजीचा जस की, मी घरदार वर्ज करून तुजवळ बसलों तुझे बरे व्हावे म्हणून. ते गोष्ट राहिली. याउपरी तुझी काय गत होईल कळत नाही. राजश्रीनी उतर दिल्हे की, माझी काही तऱ्ही गत हों. परंतु तुम्ही सारे जा. मजवळ राहू नका. येक बया मात्र मज[व]ळ असो द्या. बया तुजला निरोप देत नाही म्हणून. त्याजवरून दर्याबाई बोलली की, याउपरी मजला राहाणे व तुजला ठेवणें उचित नाही. जर ठेविसील तरी तूहि जिवानसी जासील व मजलाहि गाढवावर बसोन फिरवितील म्हणून बोलोन उठली. पडदेयात गेलियावर शामराव व बाबूराऊ पड्याबाहेर बैसोन रडत होतें तेहि राजश्रीजवळ गेलें. मागती बोललें की, आता निरोप द्यावा, ठेऊ नये. राजश्री बोलले, तुम्ही सर्व जा. बयास निरोप (न) देत नाही. याणी उतर केलें की, तुम्हीहि ठेऊ नये आणि त्याणीहि राहू नये. त्याजउपरी राजश्रीनी सर्वास निरोप वस्त्रे देऊन रवानगीचा प्रारंभ केला. दर्याबाई व त्याकडील बाईका वगैरे यास वस्त्रें दिल्ही व नारोजी वगैरे यांसहि दिल्ही. दर्याबाईस येक हती दिल्हा. मागती राजश्री रात्रीचे दर्याबाईचे घरास गेले होतें. तेथेहि येकमेकें रडली. उदैक दर्याबाई निघोन जाणार. बुधास जाऊन च्यार दिवस राहावें असे केले आहे. स्वामीकडें भोजावा नाईक म्हणून त्याचा पोतदार आहे. त्याजबराबर पत्रें पाठविली आहेत. काय लिहिले असेल न कळें. त्याचे उतराचा मार्ग पाहावासी त्यांची वासना आहे. मग येथं पाहातील किंवा बुधास जाऊन पाहातील न कळें. जाले वर्तमान लिहिले आहे. पुढे होईल ते लिहिले जाईल. या कामास ठास बसलियास कसे होईलसे स्वामी चितात आणित होतें, ते स्वामीचे पुण्येंकडून अल्पायासेच घडोन आले आहे. याउपरी स्वामी पां के[१] लू क चितात आणून विचार करितील तरी आमचा इलाज नाही. स्वामी तर थोर आहेत. परंतु येथे बहुतांची घरे बुडतील; यास्तव भोजावा नाईक याजवळहि जाबसाल उतम रीतीने करावा. +सेवेसी श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*A pathetic farewell-scene between Daryabai and her brother Ramraja is described in this letter. The King was helpless before the peremptory measures of the Peshwa and his agents.*

---

१ द्यार्द्रता(?)

+ पत्र पुरंदऱ्याचें.

No. 95] [पो 5-7-1750
छ ११ शाबान.

श्री.

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना
व तथा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. दर्याबाई व राजश्री व इत्यादिकांचे रुदनप्रसंग व निरोपाचा अर्थ जाला तो तपसील अलाहिदा पुरवणीत लिहिला आहे त्याजवरून कलेल. त्याचमध्यें दर्याबाई राजश्रीजवल बोलली की, माझें सरलस्कराची काये वाट? राजश्रीनी उतर केले की, तुझे सरलस्कर कोण काढीसा आहें पाहातो. सरलस्कर माझें असू दें; म्हणजे मी तेथे तू येथें वरचेवरी खबर वर्तमान कलत जाईलच पुढे तुझें सर्वा कारभारियांचे विचारे होईल तरी मीहि येईन, याप्रों बोलली. याचा भाव, सरलस्कर आपणास आहेच तरी पाचसात हजार फौज जथोन मागती येथें यावें. प्रधानपंत काही घरी राहाणार नाहीत. हरकोठे मनसुब्यावरी जातील. मग आम्हास अडवा कोण येतो? राजश्री आम्ही तर येक आहोच. सातारियातील सर्वांची पारपत्ये करू, राज्यभार आटोपू, असा दिसतों. राजश्रीनी निरोपाचे समई राजश्रीनी यास सात वेल म्हटले की बया, तू जाऊ नको, तुजला कोण काय करतों ते पाहीन. तुझी मान खालती माझी वरती आहे म्हणोन बोलले. परंतु दर्याबाईनीच निकाल काढला. येथून हे माया सोडून जातील तेव्हा खरें. परंतु जातील. याउपरी राहात नाहीसे दिसतें. रायाजीपंत याणी चहू घटिका रात्रीस त्रिंबकजी भोसले यास बोलाऊन आपले घरास नेले होतें आणि बोलला की, राजश्री परम दिलगीर आहेत. मऱ्हाठे अगदी मेले. रघोजीबावाचा भरवसा मजला फार होता, परंतु तेहि ब्राम्हणाचे गांडीखाली सिरलें म्हणोन राजश्री म्हणतात. तरी तुम्ही व बावानी या समई येक करावे की, प्रातःकाली दरबारास यावें आणि राजश्रीस विनंती करावी, दर्याबाईस निरोप देऊन रवाना करू नका; राहावा. आम्ही पुण्यास जातों. मातुश्री आईसाहेब व प्रधानपंत यांजवल बोलतो आणि दर्याबाई राहात ते करितो असे बोला आणि दर्याबाईस राहवा म्हणजे बावावर राजश्री बहुत संतोशी होतात व तुमचाहि जिंतीचो[१] पेच चुकतो म्हणोन बोललें. त्रिंबकजी भोसले याणी जाबसाल केला की, दाहाबारा वर्षाचा वैरसंमध यासमई चुकोन येकात्मता रघोजी बावाची व प्रधानपंताची जाली आहे. ज्या मनसुब्यात ते तिकडें हे आणि या समई

---

१ भोसल्यांचें वतनी गांव.

रघोजीबावा अश्या कर्मात पडिले तरी जी या सर्वांची गत तेच रघोजीबावाची होईल, म्हणोन त्रिंबकजी भोसलें याणी जाबसाल केला. तेथें शामरावहि आले होते. रायाजीपंतहि त्याच कुटातील. लाहानसान कजियाचा उत्पात पहिले-पासून त्यास आहेच. शामराऊ याचे मंत्री रायाजीपंत होतें. यास्तव रायाजीपंतासहि हे राजकारण जरूर आहे. सेवेसी+ श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*At last Ramraja's sister Daryabai was compelled to leave Satara. Purandare describes the scene that took place when Daryabai departed. The King was actually in tears. He said he would defy the Peshwa and compel her to remain. His advisers Trimbakji Bhosle and Rayaji wondered Raghuji Bhosle, the constant opponent of the Peshwa, suffered this without a word of protest.*

---

*No. 96*] [*6-7-1750*

छ १४ साबान.

श्री

तीर्थरूप राजश्री नाना व ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी. अपत्ये त्रिंबक सदासिव कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ १२ माहे साबानपर्यंत येथास्तित असे विशेष. दिनचर्येच्या वर्तमानाच्या पुरवण्या आला-हिदा लिहिल्या आहेत त्याजवरून सेवेसी श्रुत होईल. येमाजीपंताच्या पोथ्याचा मजकूर तरी येमाजीपंत गेले ते समई सर्व पोथ्या आपलियाबरोबर घेऊन गेले. येथे कोठे ठेविल्या नाहीत याचा आम्ही पुर्ता शोध केला. अंताजीपंतास बोलाऊन आणून त्यास पुसिले. त्याणीहि शोध केला. परंतु कोठे ठिकाण नाही. जे समई गेले तेव्हाच बरोबर घेऊन गेले. सेवेसी कळावे. येमाजीपंत कडेगावास गेले ते समई पोथ्या बरोबर घेऊन गेले. तेथून सांगवलियास गेले तेव्हा बरोबर नेल्या. येथें कांही नाहीत. ×जुन्यानव्या पोथ्या अणानी नेल्या. वरकड कोठे कोणी पोथ्या नेल्या नाहीत. ठीक शोध लावला असे. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*Trimbak Sadashiv to the Peshwa, reports that Yemajipant has taken away with him all the manuscripts (pothis). They could not be traced at Satara.*

---

+ पत्र पुरंदऱ्याचें. × येथून पुढील अक्षर त्रिंबक सदाशिवाचें.

No. 97] [6-7-1750

पो छ १४ साबान.

श्री

पुरवणी तीर्थरूप राजेश्री नाना व तथा राजेश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती उपरी. आज सुक्रवारी तिसरे प्रहरी रा इंद्राजी कदम व सुभानजी बोरगे फौजेनसी येऊन थोरले वाडियापुढें दर्याबाईचे घराकडे जावयाचे गलीपर्यंत उभे राहिले. मकुंदपंत व हरबा संतूबाईपर्यंत जाऊन मुलीस कडे घेऊन बाहेर आलें. घोडियावर घेऊन मागती बाजारातून गोटात गेले. हे फौज तयार होऊन येऊ लागली. तेव्हा तमाम शहरात माड्यावरून लोक तमासा पाहावयास उभे राहिले होते. तसेच किल्यावरही लोक उभे राहून पाहात राहिले. राजश्रीचे चितात, आपणावर येतात, दर्याबाईस काढतात, असे जाणून तमाम पायचे लोकास दारू वाटली, जमा केले. तैसेच हुजरातचे जमातदारहि जमा जालें. आपले घरातील माणसे काढून नेली. याउपरी बाकी काय राहिली म्हणोन राजश्रीनी बहुत पात्रा केला. मारावे जुझावे म्हणालें. सेखमिरा, खंडेराव जाधव, बन्हानजी मोहिते, गोपालराव माहादेव, यांची त्यांची बोली फार जाली. अविवेके म्हणाल तरी आम्ही कोण्हीहि तुमचे नव्हें. विचारे वर्ताल आणि राजश्री प्रधानपंत गैरवाजवी म्हणतील करतील तरी आम्ही तुम्हापुढे मरू. तुमचे शरीक[१] आहों, अन्यथा नाही. ते काही तुम्हास दगा करीत नाही. कैलासवासी राजश्रीनी त्याचे हाती दिल्ही माणसें ते घेऊन जातात, तुम्ही का वाईट मानता, म्हणोन च्यार साहा घटका भाशण जालें. राजश्री राहून राहून फारच फुंद आणीत. मागती हे सारें याचप्रकारे बोलोन राहावीत. असें करून च्यार घटका रात्रपर्यंत बसले होते. निदानी सर्वांनी वाडियात भोजनास म्हणोन उठऊन वाडियात लाऊन देऊन सारे आपले घरोघर गेले. गोपालराव व खंडेराव जाधव आमचे घरास येऊन वर्तमान सांगितलें. राजश्रीनी यास सांगितले होते की नानास जाऊन पुसा, असीच जबरदस्ती आणखी काही तुम्हास करणे आहे की काय ? याणी उतर केले की याउपर कशास ते सोखी करितील ? तुम्ही मात्र विचारे करून चालावें. आम्ही जाऊन त्यास सांगोन घरास जातों. याप्रो वर्तमान जालें. गुणवंताबाईचे घरास पालखी पाठऊन चिमणाजी बापूजीचे राऊत पाठविताच निघाली. लक्ष्मीबाई व गजराबाई यानी वोढून आणिले होते की, आम्हास च्यार दिवस लागतील. मग त्यांचे कारकुनास ताकिदीनं सांगून तीहि काढली.

---

१ शरीक—साथीदार; दोस्त.

याउपरी यांस बराबर राऊत देऊन वाटेचे साहित्यानसी पुण्यास रवाना करितों. या धुमेत राजश्री गडावर जाऊ म्हणत होते. परंतु जवळचे लोकानी वर्जिले. +वेलगना फारच दरबारी राज्यानी केल्या. कळले पाहिजे, हे विज्ञापना.

¶*Purandare writes to the Peshwa how Santubai, Gunavantabai, Laxmibai and Gajrabai were removed from the custody of Ramaraja, who did his best to prevent it, but was helpless as his own men flatly refused to obey his orders.*

---

*No. 98*] [पो॥ *8-7-1750*

छ १४ साबान.

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती उपरी. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा आज प्रातःकालापासून दोन प्रहरपर्यंत आमचे घरी येऊन बसले होते. राजश्रीचा निरोप घेऊन स्वार होऊन जावयाचा मजकूर केला. आम्ही उतम म्हणोन निरोप दिल्हाउपरांतिक राजश्रीकडे जाऊन, पुण्यास जातों, मातुश्री सा (आ ?)ईसाहेबासी व राजश्री प्रधानपंतासी बोलोन जाबसाल पाठवितों, म्हणोन निरोप घेऊन दोन प्रहरानंतर सदरेहून परभारेच माहुलीस गेले. आज [मा]हुलीस राहातील अथवा जेऊरास जातील. आमचे घरी बसले असतां विष्णुपंत व नागोजीराव यांची देण्याघेण्यामुळे कलागत होऊन येकमेकाचे आंगावर चालोन जाऊन हस्तव्यापार जाला. शब्दाषब्दी तर काही बाकीच राहिली नाही. देवराव याचा यैवज रघोजीबावाकडे येणे त्याचे खत देवराव यानी विष्णुपंताचे नावे करून देऊन विष्णुपंताजवळून ते खत विकोन पैका घेतला होता. रघोजीबावापासून निकाल न पडे. आम्ही देवराऊ यासच रुपये देऊ म्हणताच खत नागोबाजवळ माघारे दिल्हें. पैका खरा करून द्या, नाहीतर तुम्ही निकाल करा म्हणतां कलागतीस येऊन याप्रकारे मजकूर जाला. विष्णुपंत बहुत दुखी. बहुता रीतीने आम्ही समाधान केले. ×सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*Purandare informs the Peshwa of Raghuji's departure for Poona and also of an altercation that had arisen between Vishnupant and Nagojirao over some money affair.*

---

+ पत्र पुरंदऱ्याचें. × येथून अक्षर निराळ्या वळणाचें.

*No. 99*] [गो*10-7-1750*

छ १६ शाबान.

**श्री**

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी विनंती. संतूबाई, लक्ष्मीबाई व गजराबाई व गुणवंताबाई गेलियावर दर्याबाईस भये उत्पन्न होऊन त्या दहशतीने दर्याबाईने आम्हाकडे आजी शामराव व बाबूराव व चिंतोपंत पाठविले की, तुम्ही सांगाल त्याप्रमाणें आपण ऐकतो. पानगावकर जितके आहेत त्या सर्वांस बाहेर घालिवितो. कोण्हा येकास राहो देत नाही. त्या सर्वांस मिलोन मांडव परगणा फतेसिंगबावाचा आहे तो द्यावा. तान्हजी सावतांस येका किल्याची हावलदारी सांगावी. नारूकाकास पालखी द्यावी. तो पानगांवास जाईल. आमचे सरलस्कर काईम राखावे. आम्हावरी सर्व प्रकारे कृपा करावी. सरंजाम पुणियांत देऊ केला आहे तो आमचा आम्हास द्यावा आणि पांच हजार रुपये पानगांवकराचे रवानगीस द्यावे. खर्चास देऊन त्याची रवानगी करावी म्हणजे राजश्री तुमचे ऐकतील, तुमच्या विचारांत राहतील, यैसे बोलिले. त्यावरी आम्ही त्यांसी उतर केले की, पानगांवकर सर्व आवघे लाऊन द्यावे आणि तुम्हास जोपर्यंत आम्ही राहा म्हणू तोपर्यंत तुम्ही राहावे. कारभारांत एकंदर मन घालू नये. जैसे चौघे सरदार राहतील त्याप्रमाणें राहावें. सर्व शाहू माहाराजांचे वेळेची मंडली आहे त्याणी कारभार करावा. त्याही मधे आमचे विचारे ठेवावयाचे असतील त्यास ठेवावे. निरोप द्यावयाचा असेल त्यास निरोप द्यावा, आणि आम्हासी सरलतेने चालावे. चाकरी घ्यावी, उमेद वाढवावी. कोणेविषी प्रतर्णा करु नये. कारभार येकमते करावा. दुसरी पोती करू नये. ज्याचा कारभार त्याचे हाते घ्यावा. फावडे करू नये. यैसे आम्ही व गोविंदराऊ व येशवंतराऊ त्रिवर्ग मिलोन बोलिलो. त्यावरून शामराव बोलिला जे, आम्ही कांही कारभारांत पडणार नाही. पानगांवकर आवघे तुम्ही बाहेर काढणे. दर्याबाईस डेरा देऊन लस्करांत राहातील अगर तुमचे हवेलीस येऊन राहातील. तुम्ही दरबारास जाऊन पानगांवकराची रवानगी करून कारभार करावा. कोण्ही फितवा आमचे निसबतीने करणार नाही. राज्याचा बंदोबस्त सर्व करणे म्हणोन बोलिले आणि आम्हीहि त्यासी फारच बोलिलो. आम्हासारिखे चाकर धण्यास; खावंदानी तख्तावर बसोन आम्हास बोलाऊन आणून जो कारभार लाहानथोर करणे तो आमचे विचारें करावा जे लागेल ते आम्हा जवल मागावे. कोण्हास नतिजा पोहचवणे तो आम्हास.

पुसोन करावा. आम्हा खेरीज कांही येक कारभार करु नये. मधे कोण्ही येका लुच्याचे ऐकों नये. लागेल ते मागावे, आम्ही द्यावे. त्यावरी शामराव बोलिला जे राजश्री बोलिले की, दोही देवळ्याचे कारकून नानानी (अपूर्ण.)

¶*Purandare describes the departure of Shahu's daughters from Satara and the consequent uneasiness caused to Daryabai. The definite terms that were offered to Daryabai by Purandare on the Peshwa's behalf for the continuance of her stay at Satara are given. The letter is incomplete.*

---

*No. 100]* *[21-7-1750*

**श्री**

**पुा तीर्थरूप राजश्री नाना**
**ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी**

विनंती उपरी. राजश्री उदाजी चव्हाण व राजश्री चिमणाजी बापूजी रहिमतपुरानजीक मुकाम करून राहिले आहेत. त्यास राजश्री अंताजी सिवदेव फौजसुधां मायेणीनजीक मुकाम करून राहिले आहेत, यांस त्यास दाहा कोसाचे अंतर म्हणून चिमणाजीबावाची चिठी आजी मंदवारी आली. उदबा त्यास तांतड घाट चढून पुढे जावयाची करितात. यांजवल भांडवल आहे ते विदितच आहे. आम्ही चिमणोबास लेहून पाठवितच आहों कीं, जमाव जाल्याविना पुढें न जाणे, असे लिहितच आहों व येथें आम्हांजवळ से दोनसे लोक आहेत त्यांस चिमणोबाकडे जाणे म्हणून सांगत असतां जात नाहींत. माने, पाष्टे खाशा निशाणाबराबर चाकरी करावयाचे लोक ते ताबीनोती[1] चाकरीस जाऊ ना म्हणतात. तर चिमणाजीबावानी काये तजवीस, कसी वर्तणूक करावी? उदबाची नेटणी जबरदस्त कीं, पुढें जाऊन गांठ घालावीच घालावी असी आहे. परंतु चाकर लोकांचे पदरी धण्याचें नाव आहे. जावयास विचार केला पाहिजे. लोक तर अद्यापि जमा जाले नाहींत, पर्ज्यन्यकालचे दिवस; लोक सीघ्र बाहेर पडत नाहींत. हें+ विज्ञापना. राा महिपतराव धायेगुडे व खंडोजी सेलके हे उभयेता मात्र आठदिवसांचे बोले जावयास रजावंद केले आहेत. आठ दिवस भरले म्हणजे माघारे येऊ असा उभयेतानी करार केला. तेव्हां जाणार ते

---

१ हुक्मी. + पत्र नाना पुरंदऱ्याचें.

उदईक अमावाशा होऊन परवां जाणार. वरकड बोधे, बरगे, सुलतानराव जाधव व साल्पेकर हे कोणी जाऊ ना म्हणतात, तर काये ती आज्ञा ल्याहावी. परकोलेहि[1] जाइनात, हे विज्ञापना.

¶*Purandare solicits orders from the Peshwa as to what he should do and how he should collect forces when men like Mane, Pashte, Jadhao and Salpekar showed their unwillingness to proceed.*

---

*No. 101*] [*24-7-1750*

सुाा ईहीदे.

## राजमंडल

**साा राजश्री पंतप्रधान**
**माहे रमजान श्रावण मास.**
तेरीख २ रोज शुध त्रितीया
भोमवासर मुाा शाहूनगर

$\frac{१}{२}$

फेरीस्त खास दस्तके

राजमान्य राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यासी कीं तुंम्ही स्वामी कारणे नजर बदुखा ४ च्यार व ढाल गेंड्याची १ येक येकून पांच दागिनें पाठविले ते पावले. वरकड तुम्हाकडील कितेक अर्थ राजश्री सदासिव दीक्षित व त्रिंबकजी भोसले यानी विदीत केला. आज्ञा करणे ते उभयेतास केली आहे. स्वामीच्या आज्ञेप्रोा तुम्हास सागतील त्यावरून कलेल. जाणिजे छ २ रमजान सु॥ ईहिदे खमसैन खाा सुज्ञ असा.

१

राा माहादजी सालोखी यास कीं तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जालें. लिहिलें विदित जाले. राा येमाजीपंताचे शहा करितां येतां न ये म्हणून तर त्याजवरी चव्हाणाची फौज रवाना जाली. तुम्हास तसदी लागणार नाहीं. तुंम्ही देखत पत्र हुजूर येणे. उजूर न करणे जाणिजे छ २ रमजान सुाा. ईहीदे खमसैन खाा बहूत काय लिहीणे.

ताा माहादजी गायेकवाड.

¶*Ramraja's letters from Shahu-Nagar to Raghoji Bhosle and Mahadaji Salonkhi.*

---

१ परकाळें हें आडनांव.

No. 102] [25-7-1750

सुा ईहीदे

## राजमंडल

सा राजश्री पंतप्रधान
माहे रमजान श्रावणमास
मुा शाहूनगर
तेरीख २ रोज खा दस्तके

[किरकोळ दोन दस्तकानंतर]

राजमान्य राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यास की तुम्ही विनंती पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित जाला, कितेक वृत राजश्री सिवाजी मोहिते यानी विदीत केले. कितेक आज्ञा करणे ते मशारनिलेस करून पाा आहेत त्यावरून कलेल. मातुश्रीस विनती करून जाबसाल सागोन माा रवानगी करणे * * सुज्ञ असा.

ताा धोंडजी सिदा निाा सिवाजी मोहिते.

राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यांसी आज्ञा कीं तुम्ही विनंती पत्र पत प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदीत जाला. कितेक वृत सिवाजी मोहिते यानी विदित केले. कितेक आज्ञा करणे ते माारनिलेस करून पाठविले आहेत सांगतील.

१ साा सुज्ञ असा.

१ येणे प्राा मातुश्री आईसाहेब माार-निलेस आज्ञा करणे ते सत्वर करून माघारा पाठवणे.

ताा धोंडजी सिदा.

इहिदे खमसैन मया व आलफ श्रावणमास, रमजान तेरीख ६ रोज सुध सप्तमी रविवार मुा शाहूनगर.

[हा मुकाम छत्रपति रामराजाचा आहे].

¶*Ramraja's letters to Raghuji Bhosle and the Peshwa.*

*No. 103*] [*30-7-1750*

सुा ईहीदे [खमसैन मया व आलफ]

## राजमंडल

**सा राजश्री पंतप्रधान**

माहे रमजान छ ७ रोा

मुा शाहूनगर खाा

[रामराजाचे ताराबाईस पत्र]

यानंतर वडिलानी आसीर्वाद पाठविले ते पावोन श्रवणे सुधादृष्टीतुल्य भास जाहाला. ऐसेच निरंतर पत्र पाठऊन साभालास आविस्मर आसावे. वडिलाचे शरिरास समाधान वाटत नव्हते हे काहीच लिहिले नाही; यास्तव गोष्ट आपूर्व दिसोन अली. येक पत्र पाठवावयास अनकूल पडले नाही. बरे जे वडिलास उचित दिसे ते करितात. वडिलाची भेट व्हावी हा हेत विसेशात्कारे आहे. जरी वडिलाची आज्ञा जाली तरी भेटीस येईन तीर्थरूप बया तेथे आली आहेत आपण सर्व प्रकारे वडील तेथे आहेत. विस्तारे लिहिल्यानी उपराध दिसोन येतो. तीर्थस्वरूप राजश्री काका साहेब[1]हि या प्रांती येणार यैस वर्तमान आहे. वडिलास विदित व्हावे यास्तव लिहिले असे साा हे विनती.

¶[*Ramraja's letter to Tarabai offering to visit her, if permitted to come. He adds that Sambhaji of Kolhapur was arriving at Satara.*

---

*No. 104*] [*July 1750*

## श्री

**पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना**

**व ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी.**

विनंती उपरी. अंताजी सिवदेव पुसेसावलीस आले. चिमणाजी बापूजी व उदवा रहिमतपुरावर आहेत. त्यास यास सा कोसाचे अंतर. फौज याजपासी थोडकी. लोक आद्याप येऊन जमा जाहाले नाहीत. अंताजीपंतानी प्रतिनिधीस लेहून पाठविलें की, आपण जमावसुधा पुसेसावलीस आलो म्हणून लेहून पाठविले.

---

१ कोल्हापूरकर संभाजी.

त्यावर प्रतिनिधीनी लेहून पाठविले की, खामाखाय रातीचा छपा घालून मोडणे आम्हीहि येथून कुमक करितो. यैसे प्रतिनिधींना लेहून पाठविले. त्यास चिमणाजी बापूजी याचे सामान थोडके. राऊत जमा जाहाले नाहीत. स्वामीनी पथके आम्हाकडे पाठविली त्यास चिमणाजी बावाकडे पाठवितो. ती साफ जात नाहीत. फौजेखेरीज कामकाज होणे कलतच आहे. चिमणाजी बापूजीस लेहून पाठविले की, तुमची फौज जमा जाहाल्याखेरीज त्याजवर न जाणे. मागारे चौ कोसावर येऊन राहाणे. अगदी फौज जमा होईल, मग जायाचा विचार करणे म्हणून लेहून पाठविले आहे. अंताजीपंताच्या मनात खामाखाय येऊन पडावे, हा विचार बलकट आहे. उदबानी तो धसी नेऊन घातले. चिमणाजी बापूजीची फौज थोडकी. लोक आद्यापि जमा जाहाले नाहीत. येथून लोक पाठवावे तर ते माने, पाष्टे आमचे कांही ऐकत नाहीत. स्वामी जे लोक पाठवितात त्यास आम्ही येथून माघारे स्वामीकडे पाठवितो. चिमणाजी बापूजीची पत्रे आली आहेत ती बजिनस सेवेसी पाठविली आहेत. त्याजवरून श्रुत होईल हे+ विज्ञापना.

¶*Purandare's clerk Ramaji Mankeshwar writes to the Peshwa about the warlike preparations of the Pratinidhi.*

---

*No. 105*] [*July 1750*

**श्री.**

पुाा सेवेसी विज्ञापना. राजश्री रघोजी बावानी काल मजला बोलाऊन नेऊन सांगितलें कीं, श्रीमंताजवल राजश्री रामाजी माणकेस्वर यानी सांगितलें कीं, येमाजीपंताबाबत ठाणी रघोजीबावा राजश्रीजवळ व मातुश्रीजवल मागतांत. त्यासाठीं हातरोखा करून घेतला आहे म्हणून सांगितल्याचें वर्तमान आइकले. तर सदरहू ठाणी घेऊन हुजूर द्यावीं म्हणून राजश्रीनी बलात्कारे हातरोखा आम्हांजवल द्यावयास लिहिला, परंतु आम्ही कांही घेतला नाहीं. तुम्हाजवळच आहे. कदाचित श्रीमंताचे चितांत याविषीं विकल्प येईल यास्तव हा मजकूर श्रीमंतास तुम्ही लेहून पाठवणे. श्रीमंताचे मनोगतासिवाये आम्हांस तिलप्राये वर्तणूक करणे नाहीं. अवघ्या फौजेस आम्ही निरोप दिल्हा. आजपर्यंत तीन लक्ष रुपये फौजेस बसले. सांप्रत निरोप दिल्हा. दीड दोन हजार फौज राखून ठेविली आहे. आठां चहूं दिवसानीं येथून निघोन पुणियास जाऊ. श्रीमंताची भेटी घेऊन

+ पत्र रामाजी माणकेश्वराचें?

आज्ञेप्रों त्यांचा निरोप घेऊन जाऊन वर्तणूक करूं. अत:पर आपण दुसरे दैवत जाणत नाहीं असे बोलिले. बऱ्हानजी मोहिते व सिद्‌भट व कोनेरपंत इतके ते समई होते. विदित जाले पाहिजे, सेवेसी श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*A letter from Satara to the Peshwa reporting Ramraja's intention of visiting the Peshwa at Poona.*

---

*No. 106*] [*5-8-1750*

सुा ईहीदे

**राजमंडल**

**सा राजश्री पंतप्रधान**

माहे रमजान छ १३ रोज

खास दस्तके

राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यासी की स्वामीची स्वारी पुण्यास होणार. ऐसियास मागे वाडे आहेत व शाहर आहें त्याची रखवाली जाली पाहिजे; ऐसीयास तुमची फौज येथ आहे ती ठेविली पाहिजे; यास्तव हे पत्र सादर केले असे तरी आपणाकडील लोकास लेहून पाठऊन येथे राहून रखवाली करीत ते करणे. स्वामी माघारे आलियावर त्यास निरोप देतील टाकोटाक उतर पाठवणे. खामखा त्यास लेहून पाठवणे खा सुज्ञ असा.

१

¶*Ramraja writes to the Peshwa advising him to post military guards for the protection of Satara during the writer's absence at Poona, whither he was proceeding.*

---

*No. 107*] [*7-8-1750*

सुा ईहीदे

**राजमंडल**

**सा राजश्री पंत प्रा**

माहे रमजान छ १५ रोज फेरीस्त

खास दस्की पत्रे.

राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रा यांसी आज्ञा कीं मौजे फुरसंगी ताा हवली प्राा पुणें येथील पाटीलकीविसी आमथे व हरफले या दोघांचा पेसजी कजिया

लागला होता ते समई कैलासवांसी माहाराज राजश्री आबासाहेब यांणी हरदूजणांस व पांढरीस हुजूर आणोन गोतमुखे इनसाफ मनास आणून श्रीकृष्णेचे दिव्य दिल्हे. दिव्यमुळे व गोतमुखे हरफले खोटे जाहले. कामथे वडील खरे जाहले. यै(से) होऊन कागदपत्र जाहले आसतां हली हरफले तुम्हाकड जाऊन फिर्याद होऊन मौजे मारची पाटीलकी आमानत केली म्हणौन हुजूर विदित जाहले. यैसियास पूर्वी कैलासवासी माहाराज राजश्री आबासाहेबी इनसाफ गैरवाजबी केला नाहीं आणि हली यैसे जाहलिया त्याच्या मनसुब्री शब्द लागतों या गोष्टी तुम्हासहि उचित नाहींत. इनसाफ जाहलियावरी मागती त्याच्या बोले पाटीलकी आमानत करावीसीं नाहीं. सुदामत निवडिले आहे त्याप्रो कामथे यांस पाटीलकीचे दुमालपत्र करून चालवणे छ १५

रमजान सु॥ ईहींदे खमसैन मया आल्फ खाा सूञ आसा.

¶*Ramraja deprecates the Peshwa's interference in the dispute between Amthe and Harpale which had been finally decided by Raja Shahu.*

---

*No. 108]* *[8-8-1750*

श्री

विनंती. सेवक रामाजी माणकेस्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ १६ रमजान सौम्यवासरपर्यंत स्वामीचे कृपावलोकने करून येथास्थित असे विशेष. पत्राचीं उतरें व दरबारचें वर्तमान अलाहिदा पुरवणियांवरून विदित होईल. राा रायाजीपंतानी आजी रात्रीं येऊन अर्ज केला कीं, पद्धस अंताजी सिवदेव यानी मारून ताराज केले. अंताजीपंताची दोघेचौघे माणसें पडलीं, जखमी जालीं, असें सागितलें. प्यादे[१]जेवादे पाठवावे असे बोलिले. विदित जाले पाहिजे. आजी राजश्री राणोजी भोसले यांचे घरास गेले होते. त्यानी येक घोडी व मंदील व मंदिलाचे जामेवार व किमखाप व पदक जेगा, जसे अनकूल होते तसे, नजर केले. त्याजवरी तेथून येऊन राा गोपालराव नीलकंठ खानवीलकर यांचे घरी जन्माष्टमीचा उत्छव आहे. त्यांचे घरास गेले. त्यानी येक पोशास(ख) शक्तीनरूप नजर केला. तेथून आपल्या माहालांत आले. विदित जाले पाहिजे सेवसी श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*Ramaji Manakeshwar to the Peshwa, describing the activities of Antaji Shivdeo.*

---

१ प्यादे शिपाई.

No. 109] [11-8-1750

सुा ईहीदे

**राजमंडल**

**सा राजश्री पंतप्रधान**

माहे रमजान छ १९ रोज वद्य

सप्तमी मुा पाडली खा पत्रे.

तीर्थस्वरूप मातुश्री दर्याबाई यासी पत्र की तुम्ही पत्र पो ते आज सणवारी रेवडीवर आसता पावले लेखनार्थ आवगत जाहला. आपण यावयाचे केले हे उतम आहे. येथे यावे, मातुश्री आईसाहेबाचे समाधान करवावे, राजश्री प्रधानपंत याचेहि लक्ष मलवावे म्हणजे सर्वहि गोष्टी उतम आहेत म्हणोन लिा ऐशीयास आपण पत्रापूर्वीच सकलहि आर्थ ध्यानात आणून श्वार जाहलो आहो. आज पाडलीस घाट उतरोन आलो. उदैक निरापार रविवारी होऊन मजल दर मजल तेथ येण होईल. वरचेवर आपणास पत्रे लिहित असता न पावली म्हणोन न येत याजवरून अपूर्व वाटत. रात्रदिवस निजध्यास आपला लागला आहे. भेटीहि लौकरीच होईल कलावयास्तव लिहिल असे म्हणून खा हे विनंती.

१

ता बाबुराव

¶*Ramraja's letter to his sister Daryabai Nimbalkar giving her a programme of his tour to Poona, and accepting her advice in his dealings with Tarabai and the Peshwa.*

---

No. 110] [11-8-1750

सुा ईहीदे

**राजमडल**

**सा राजश्री पंतप्रधान** १/२

माहे रमजान श्रावण मास

तेरीख १९ रोज वद्य सप्तमी मदवार

मुा पाडली.

फेरीस्त खास दस्तकी पत्रें.

राजश्री मुधोजी नाईक निंबालकर यांस की दोन च्यार पत्रे पाठविली असता न आला व तुमचे सरदहून दोन वेल

राजमान्य राजश्री भवानी शंकर पडित राजाज्ञा यासी की साताराहून आले यांपासून वर्तमान कलत नाही

स्वारी गेली तरी इदवर आला नाही. उदैक निबूतचे मु॥ भेटीस येणे. खा बहुत काय लिहिणे १

ता आपाजी रघुनाथ खेरोजी पाटील को कोरेगाव यांसी आज्ञा केली ऐसीजे राजश्री हैबतराव भवानी शंकर सुभेदार प्रां मजकूर यांची साल-गुा दस्ताचा यैवज व पहिली बाकी द्यावी. त्यापैकी व रा भगवतजी तरी पत्रे जातील येतील. खबर वाडियात पावती करीत असणे व उदाजी चव्हाण व अताजी सिवदेव कोठ आहेत ते लिहिणे खा सूज्ञ असां. १

ता आपाजी रघुनाथ.

¶*Ramraja's letters to Mudhoji Naik Nimbalkar and Bhavani Shankar Rajadna from Padli.*

---

*No. 111*] [*13-8-1750*

सुा इहींदे

## राजमडल

### सा राजश्री पतप्रधान

(रु. नं. १७२६) माहे रमजान छ २१ रोज
वद्य अष्टमी सोमवार
मुा जेजूरी खा.

१ रामचेद्र मल्हार सेणवी पाटील निमे मोकदम मोहरपे[१] व राणोजी जगदले पाटील निमे मोकदम माघांडे[२] मौजे दौड ता पाटस प्रा पुण यांसी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री येकोजी बीन येसाजी भोसले सेडगावकर याचे बाप बावाजी भोसले याणी घोड्याचे चोरीचे तुफान मौजे मजकुरावर ठेऊन निमे पाटीलकीचा वाद सांगितला त्यावरून मौजे मजकूचे मोकदम कैलासवासी माहाराज राजश्री शाहाजी माहाराज यापासी फिर्याद गेले. त्याणी इनसाफ पाहाता बावाजी भोंसले खोटे जाहालें, तेव्हा तुम्हास पत्र करून दिल्हे; त्याउपरी फिरोन कैलासवासी माहाराज राजश्री थोरले माहाराज राजश्री सन्निध फिर्याद गेले. त्याणी मौजे मजकूरचे मोक-दमास आणून ते पत्रे पाहून बावाजी भोसले यास ताकिदी दिल्ह्या. त्याउपर कैलासवासी माहाराज राजश्री आबासाहेब याच्या कारकीर्दीत जगदले मोकदम

---

१ पुढला, वडील. २ मागचा, कनिष्ठ.

याणी निमे मोकदमी वडीलपण पाटीलकी मोहरप रामचेंद्र मल्हार सेणवी यांस विकिली. त्याची बजिनसे राजपत्र व येसाजी भोसले सेडिंगावकर याणी फारिखतें दिल्हे की च्यार ढया (डोया?) घोड्याचा वाद सांगितला तो लटिक जाहला. याउपरी पाटीलकीसी कजिया नाही म्हणून पत्र दिल्हे, ते मनास आणिता त्याचा कह्या मौजे मजकुराकड काही नाही. तुम्ही आपले वतन अनभऊन सुखरूप राहाण. छ ६ रमजान सुाा ईहिदे खमसैन मया अलफ खाा वतन अनभवणे.

¶*Ramraja's letter to Ramchandra Malhar about the Patilki-vatan of Dound.*

---

*No. 112]* *[13-8-1750*

सु॥ इहींदे

**राजमंडळ**

**साां राजश्री पंत प्रधान**

माहे रमजान श्रावण मास १/५.

बीताा

तेरीख २१ राज वद्य अस्टमी सोमवार मु॥
जेजुरी फेरिस्त खास दस्तके
रवाना पुणे.

मातुश्री आईसाहेब यास की वडिलाचे दर्शनास बहूत दिवस जाहाले. पुढें कितेक राज्याभाराचा विचार कर्तव्या; यास्तव निघोन साताराहून अज छ २१ रमजानी जेजूरीस आलो. उदैक वडिलाचे पाये पाहावयासी मुहर्त आहे यास्तव येत असो. खास दस्तके हे विनती

१

अज सोमवारी जेजूरीस दाखल जाले. उदैक पुणियास स्वामी येतात तुम्हास कलाव म्हणून लिहिले असे म्हणोन

१ राजश्री प्रंतप्रधान यासी की रामाजीपंत लिहितील त्याजवरून कलल.
१ मातुश्री बया
१ राजश्री माहादाजी आंबाजी
१ राजश्री विष्णु विश्वनाथ
१ राजश्री शामराव नागनाथ
---
५

---

६

ताा सताजी दलवी दि॥ मुरजेनसी

रवाना सातारा

राजश्री विस्टल (विठल?) राव बकसी यासी स्वामीचा मुकाम आजी इदुवारी जेजूरी जाला. उदेक पुढ होईल. स्वामीच अगमन होई तोपर्यंत शहरची वगैरे रखवाली उतम रितीन कर्णा. वरकड वर्तमान लिहित जाणे. वाडियांत वर्तमान प्रविस्ट कर्ण म्हणोन पत्रे

१ ..........................
१ राजश्री भवानीपंत
१ राजश्री चितामणराव
१ सेखमिरा
१ राजश्री प्रतिनिधी
१ राजश्री आंबाजी अनंत
१ राजश्री खडेराव बापोजी
१ राजश्री मोरोपंत बकसी
—
८

ता। विस्टलराव बकसी

¶*Ramraja writes from Jejuri to Tarabai intimating his desire to meet her the next day. Similar letters are addressed to others.*

---

*No. 113*] [*18-8-1750*

सु॥ इहिदे

**राजमंडल**

**सा। राजश्री पंत प्रधान**

माहे रमजान उर्फ श्रावणमास
तेरीख २६ रोज वद्य त्रयोदसी
मंदवासर मु॥ को। पुणे.

फेरिस्ते खास दस्तकी पत्रे :—

रवानगी सातारा

५ तुम्ही विनंतीपत्रें पाठविलीं तीं पावलीं लिहीला मा।र विदित जाला. वाडियाचा चौकी पाहारा करून बहुत खबरदारीने राहाणे. पुणे दाखल जालियाचें वर्तमान पेसजी लिहिलेच आहे. येथील गुते उरकोन सत्वरीच येणे होईल. जाणिजे म्हणून पत्रे

१ अजम सेखमिरा खा। बहूत काये लिहिणे
१ चिंतामण सिवदेव खा। बहूत काये लिहिणे
१ खंडेराव बापूजी खा। बहूत काये लिहिणे
१ भगवंतराव सांळोखी खा। बहूत काये लिहिणे
१ भवानीशंकर राजाज्ञा खा। सुज्ञ असा.
—
५

[या पुढे इतर किरकोळ दस्तके बार.]

¶ *Ramraja's letters to Shekhmira and others at Satara from Poona.*

No. 114] [18-8-1750

## राजमडळ

सा॥ राजश्री पंत प्रधान

माहे रमजान छ २६
रोज वद्य त्रयोदसी मदवार.

(मु॥ पुणे फेरिस्त खा॥)

राजश्री मुधोजी नाईक निंबालकर * * अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रती उपरी तुम्ही पत्र पा॥ ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहाला दर्शनास यावयाविसी लिहिले ऐशिया उजूर काही नाही परतु आवरोध आला आहे म्हणोन लिहीले ते कळले. ऐशियास आवरोधहि दूर जाहालाच आसेल. श्वामी पुण्याहून कूच केलिया उपरी मागती त्याच मार्गे यणार. तुम्ही आपले जमावानसी निरावरी दर्शनास येणे खा॥ बहूत काय लिहिणे
१

राजश्री माधवराव कदम यासी तुम्ही श्वामीचा निरोप घेऊन गेला त्यास आद्यापवरी श्वामी दर्शनास न आला. याउपर हे गोष्ट अपूर्व दिसोन अली तर हे आज्ञापत्र सादर केले असे तरी आपले जमावासुधा पत्र दर्शनी पुण्याचे मुकामी येणे. खा॥ बहुत काये लिहिणे
१

राजमान्य राजश्री फतेसिग भोसले यासी तुमचेविसी कितेक विनंती करणे ते राजश्री प्रधानपंत याणी केली ते श्वामीनी ध्यानात आणून सातारा पावले तुमचेविसी दुसरा आर्थ श्वामीच्या ध्यानात नाही तुम्ही कोण्हे-विसी संशय न धरणे. दर्शनोतर श्वामी उतम करितील. येविसी विस्तारे राजश्री प्रधानपंत लिहीतील त्याजवरून कलल त्याप्रो॥ वर्तणूक करणे. खा॥ सुज्ञ असा
१

राजमान्य राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधी यासी माहादजी पाटील मौजे बवलेकर हा सरकारात हुजूर चाकरी करीत अस्ता तुम्हाकडील कमावीसदारानी त्याच्या लेकास धरून कोलीयाचे ठाणेयात नेऊन आटकाव केला म्हणोन हुजूर विदित जाहाले तरी पाटील माराच्या लेकास आटकावयास प्रयोजन काय याउपर पाटील माराच्या लेकास सोडावयाची आज्ञा करून हे

राजश्री रघूजी कदमराव यास तुम्ही अद्यापि श्वामीच्या दर्शनास आला नाही हे गोष्ट उतम न केलीत. याउपर आपल्या जमावासुधा पुण्याच्या मुकामी हुजूर सत्वरे येणे. बहुत काये लिहिणें.

आज्ञापत्र सादर तुम्हास केले आसे. तरी ठाणे मजकुराहून आणून हुजूर रवाना करणे. येविसी फिरोन बोभाट येऊ न देण. खाा सुज्ञ असा.

¶*[Ramraja's letters from Poona to Mudhoji Naik Nimbalkar, Fatesing Bhosle, Jagjiwan Pratinidhi and Madhaorao Kadam.*

---

*No. 115*] [*13-9-1750*

**श्री.**

**राजश्री बालाजी पंडित प्रधान गोसांवियांसी.**

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्नों फतेसिंग भोंसले रामराम विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित असिलें पाहिजे विशेष. अपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला. राजश्री रामचंद्र बावाजी आपणापासून आले. यांनी कितेक अपली वचनें श्नेहाचीं सांगितलीं त्यावरून श्रवण होऊन परम संतोष जाला. यैसियासी आपल्या श्नेहाची जोडी करावी हा आमचा दृढनिश्चय आहे. यांत कांहीं संशय नाही. हे दौलत व आम्हीं आपले आहों हा भरवसा आपणास असों द्यावा. राजश्री चा मुकाम त्रिपुटीवरी(१) जाला आहे. हे कूच करून सातारियासी गेलियावरी आम्ही सत्वरीच येतों. परस्पर भेटीचा योग होईल तो सुदिन आहे. वरकड राजश्री रामचंद्रबावाजी लिहितील त्यावरून कलेल. राा छ २२ सवाल. राजश्री सदासिवपंत यांचा मुकाम त्रिपुटीवरी जाला आहे. राजश्री बाबूराव सामराज त्यांकडे पाठविले आहेत. राजश्रीचा मुकाम अमच्या मार्गावरी, याकरितां दोन दिवस गुंता पडिला. त्यास तेथील विचारहि अपणास कललाच असेल. यास्तव जे लिहिणें तें आम्हांस ल्याहावे; त्यासारिखा विचार केला जाईल. कललें पाहिजे. +आमचा हेत फार आहे, आपले भेटीनंतर जेसे सांगाल तेसे वर्तावे. यात जे आपले विचारास येईल ते लिहावे. बहुत काये लिहिणे, लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*(+Fatesing Bhosle's own hand from here.) He writes to the Peshwa offering complete submission to the latter's wishes and dependence upon his judgment. This letter proves how cleverly the Peshwa and Sadashivrao managed to detach Fatesing Bhosle from Ramraja.*

---

(1) 8 miles east of Satara.

No. 116] [23-9-1750

श्री

राजश्री बाळाजी पंडित प्रधान गोसांवियांसी.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्मों फतेसिंग भोंसले रामराम विनंती. उपरी: येथील कुशल जाणून स्वकीय लिहित असिलें पाहिजे विशेष. आपल्यापासीं करार जाला त्याप्रमाणें आम्ही स्वार होऊन पुणियास येत होतों. त्यास राजश्रीचा मुकाम त्रिपुटीवर जाला. तेथून कूच होऊन पुसेंसावेंळी[1] नजीक येऊन उतरले. हें वर्तमान आपणास लिहिलेंच होतें. त्यावरून आपलीं पत्रें राजश्री भाऊस आलीं. येथूनहि राजश्री बाबूराव व आपणाकडील राजश्री रामचंद्र बावाजी यांस लस्करांत पाठविलें होतें. तेथें बोलीचाली होऊन राजश्री भाऊ कुरलियासें[2] आले. त्यांची भेटी होऊन त्यास घरास नेलें. तदोत्तर ते अम्हीं मिलोन राजश्रीचे भेटीस गेलों. आपल्या लिहिल्याप्रमाणें मुख्यांची भेटी जाली. मग लस्करातच राहिलों. पुण्यात करार जाला त्याप्रमाणें विल्हे लाविनों म्हणून बोलिले आहेत. आमचा सर्वस्व भारआभार आपणास आहे. वारंवार ल्याहावें ऐसें नाही. येविसींचें वर्तमान राजश्री भाऊनी आपणास लिहिलेंच असेल. पुढे आमचा कार्यभाग विल्हे लागोन सर्वप्रकारें आमचें साहित्य होये तीं गोष्टी केली पाहिजे. वरकड राजश्री रामचंद्र बावाजी लिहितील त्यावरून कळों येईल. रा। छ २ जिलकाद. सर्वे प्रकारे अमचे अगत्ये आपनास आहे. जे आपनास उतम दिसेल ते राजेश्री भाऊस लिहावे. बहुत काये लिहिणे, लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*Fatesing Bhosle informs the Peshwa of his interview with Ramraja and of his readiness to fall in completely with the Peshwa's plans.*

---

No. 117] [29-10-1750 ?

श्री

राजश्री पंतप्रधान गोसांवी यांसी,

श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये श्मौ खंडोजी जाधवराऊ दंडवत विनंती. उपरी, येथील कुशल ता। छ ९ जिल्हेज जाणऊन गोसांवी यानीं आपुलें निजानंदलेखन लेखयास आज्ञा केली पाहिजे विषेश. आपलें पत्र पूर्वी आले कीं, जमावसुधा भेटीस येणें; त्याजवरून तमाम लोकांस बोलाऊन ममजावीश नालबंदी देऊन तयारी करून भेटीस यावें या विचारांत होतों. त्यास

---

१ औंधनजिक. २ पुसेसावळीनजिक.

प्रस्तुत श्रीमंत मातुश्री आईसाहेब गडावरून खालतीं उतरली. तमाम सरदारांस पत्रें पाठविलीं आहेंत कीं, भेटीस येणें. त्यास हा कालपावतों आपणास तों पत्र आलें नाहीं; परंतु येणार म्हणऊन वर्तमान यैकिलें. त्यास त्यांच्या चितांत आमचें सर्व प्रकारें वैश्यम्यच आहे. गोसांवियासींहि विदित आहे. आणि आमचा कायाव्राचामनें कृतनिश्चये आहे कीं, जें कर्तव्ये तें आज्ञेप्रमाणें करावें. याजकरितां सेवेसी विनंती लिहिली जाते कीं, तिकडील बोलाऊं आलें तर जावें कीं किंवा कैसी वर्तणूक करावी हें आज्ञा होईल त्याजप्रा वर्तणूक करून. तिकडील धणीपणाचा विचार आहे. याजमधें जैसी आज्ञा होईल त्याजप्रा वर्तणूक करून. यानंतर गांडापूरच्या बाबतींचे स्पष्ट विषेशात्कारें त्यानी लाविलें आहे. आम्ही येथून कारकून पाठविला. यैवज रा येशवंतरायानी परभारें पागेस वगैरे देवविला यैसें कितेक प्रकारें सांगितलें, परंतु तें यैकेत नाहींत. फारसा आतिशयेच आहे, याजकरिता विनंती लिहिली जाते कीं, गोसांवियानीं येक आज्ञापत्र रा दिनकरपंत व रा माहादाजी नाईक यांजला जासुदासमागमें परस्परें पाठवावें कीं, च्यार गोस्टी सांगोन गोसांवियांची त्यांची भेट होये तोंपावतों तकूफ करीत यैसें केलें पाहिजे. स्वामीची त्यांची भेट जालियावर मग जे आज्ञा होईल त्याजप्रा वर्तणूक केली जाईल. तर जासु—(अपूर्ण).

¶*Khandoji Jadhao informs the Peshwa how Tarabai was troubling him and seeks his protection.*

---

*No. 118]* *[12-11-1750*

## राजमंडल

सुा ईहिदे

२ सा राजश्री पंत.

प्रधान माहे जिल्हेज कार्तिक
मास २३ रोज इंदुवार
मु॥ बलंवाडी का नाझरे

फेरीस्त खास दस्तके पत्र.

राजश्री बऱ्हानजी मोहिते यास की, जवलक्याचे ठाणियात हुजू * * * * ठेवि.........तुम्ही...... ...तेथ ठेऊन...........केला हुजूर पा * * * देणे, सांगोल्याचे ठाणि-

राजश्री येकोजी भोसले यास की तुम्ही सांगोलियात राहिला ते अद्याप आला नाही. याउपरी पत्रदर्शनी स्वार (हो)ऊन येणे. खा बहुत काये लिहिणे १

याचा बदोबस्त उतम प्रकारे करणें. दा * * * * गला दारुगोली सामान ठाणियात करणे * * * फी सातारियास जा * * * त तोवर याव * * * * * * सानारियास.........लेहून पाठवितील ते * * ......पाहून उस्तवारी करणे खा बहुत काये लिहिणें. १

ता कुसलसिंग चोपदार.

राजश्री विठोजी मोहिते यांस की तुंम्ही सांगोलियात राहिल ते अद्याप आला नाहीं, याकरिता हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुंम्ही हुजूर येणे. खा बहुत काये लिहिणें.

१

राजश्री सदासिव चिमणाजी यांस की आष्टयाचे ठाणे थोरातास ताकीद करून देवणे म्हणून स्वामीनी रुबरू सांगितलच होत. त्यास आगोटीपर्यंत ठाणे थोराताचे असो द्यावे यैसे म्हणतान म्हणोन विदीत जा * * * * गम............तेव्हा रा बालाजी पंडित व राजश्री (माहादाजी) आंबाजी याजवळ स्वामीनी भाषण केले जे, येसाजी भोसले कु * * (भो)सले उभयेता * * मामल्याचा बंदोबस्त स्वामीनी करण त (स) करितील याच्या मा * * * * गोष्ट कोणी * * * रा गोविंद...........

............................

स्वामीचा करार * * * * असता ठाणे द्यावयाचा अनमान दिसोन आला.



ता कुसलसिंग चोपदार मालजीराव मामूणकर मुा जवल यास की, मौजे मजकूरचे ठाणे राजश्री बऱ्हानजी मोहिते याचे स्वाधीन करणे(चे) आहे. तरी तुंम्ही मारनि(ले)(याचे) स्वाधीन ठाणे करून * ज घेऊन तुंम्ही लोकशुधा हुजूर येणे. सा येणे छ * छ *

ता कुसलसिंग चोपदार

राजश्री गोविंद खंडेराव यासी की आष्टयाचे ठाणियाचा मजकूर आगोटीपर्यंत न द्यावा यैसा विचार तेथ जाहाला आहे. पुण्यामध्ये राजश्री बालाजी पंडित व राजश्री माहादाजी आंबाजी याजवळहि स्वामीनी भाषण केले, अष्टयाचे ठाणे स्वामीस परिछिन देवावे म्हणून आरंभापासून स्वामी बोलत असता आष्टयाचा मारास गईगुदर होऊ लागली. तेव्हा तुंम्ही काही रा सदासिवपंत यासी न * यावरून स्वामी(ची)(म)र्जी राहात नाही. (स्वामी) सातारियास जात नाहीत. आष्टयाकड जाणे जरूर जाहालें. तुंम्ही लोक कारभारी; स्वामीनी ऐकाव आणि आष्टयाची गोष्ट आगोधर सोडविली असता न ऐकावी. थोराताचे तुम्हास अगत्य प(हि)लेपासून आहे. य * * * * सली या उभतास सरजाम अगदी थोरातास देवावा म्हणजे सर्व सिधीस गेले. मग स्वामीचे मर्जीचे

तेव्हा स्वामी सातारियास जावयास प्रयोजन काये? सर्व गोष्टी तुमच्या ऐकाव्या आणि आष्टयाची गोष्ट आरंभी सोडविली असे. स्वा सुज्ञ असा प्रयोजन तुम्हास काये आहे? स्वा बहुत काये लिहिणे.

१

¶*Ramraja's letters to Baranji Mohite with reference to the settlement arrived at Sangola and the question about the post of Asta.*

---

*No. 119*] [*26-11-1750*

छ ९ मोहरम

**श्री**

**पुा तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेसी,**

विनंती. उपरी, राजश्रीचा वृत्तांत दिनचर्येचा वरचेवरी लिहिलाच आहे. आज इंदुवारचे वर्तमान तर कालचें प्रमाणेच आहे. आम्ही सर्वाचा म्हणोन निरोप दापपर्याये[१] आईसाहेबास सांगोन फरीदखान व चिंतो विनायक गडावर पाठविले होते. मेटापर्यंत गेले. वरते सांगोन पाठविले. वरून हाक मारून येकानी सांगितले की मातुश्री व राजश्री निजेले आहेत तुम्ही माघारे जा म्हणताच उतरून खाली आले. वरते घेतले देखील नाही. वरील गडकरी याचीहि चाळणा करून पाहिली, परंतु ये घटकेपर्यंत विचारात नाहीत. खालून जागजागा नाकेबंदी करावी असा मजकूर केला होता. तान्हाजी सावंत याचे लोक वाडियात आहेत, त्यांस बाहेर घालवावे, वाडियाची बंदोबस्ती करावी, यास्तव काल रात्री लोक व लक्षुमणपंत व दौलतराव यास पाठविले असतां दरवाजे दिल्हे. प्रात:काली निघतो बोलले. रात्रीचा विशये म्हणोन आम्ही बाहेर चौक्या ठेविल्या. प्रात:काळी आम्ही सारे जण देवढीस गेलो. त्याणी दरवाजे न उघडले. जबरदस्ती करावी तर लौकिक फटकळ, यास्तव उगेच राहिलो. तान्हाजीकडील कारकून वरता जाऊन त्यानी नानाप्रकारें मातुश्रीजवळ गिला केला. राजश्रीनी एकाबराबर सांगोन पाठविले कीं तुम्ही चौकी उठवा, एकाबराबर आला की नका उठऊं. खंडोजी पोस्ती वगैरे गीर्दीचे लोकहि त्यांचाच पक्ष करितात. संध्याकालपर्यंत कोंडावे म्हणून आम्ही करीत असतां न जाले. राजश्री तर वरते जाऊन फसले. खालील माणसांची गत याप्रकारची. चौक्या बसवाव्याच तरी दुराग्रहाचे डाई पडते. न ठेविल्या तर वरते साहित्य जाते.

---

१ दाप=दाब.

ऐसियास स्वामींचा विचार येविसीचा कसा आहे, येथे आम्ही कसे करावे ते परिछिन्न आम्हास कलेल त्यासारखे येथे करणे ते करावे म्हणोन आम्ही उगेच आहो. जसी आज्ञा होईल तसी वर्तणूक करून उत्तरे सत्वर पाठवावी. राजश्रींनी आम्हास व त्रिवर्ग कारभाऱ्यास किल्यावरून बहुत चोरून भवानी मर्धा याजबराबर विडे व दालिंबे पाठविलीं. मला खालते उतरोन न्यावयाची तजवीज करा ऐसे ग्लानतेने सांगसांगु पाठवितात. याचा विचार काय करावा? दुसरें वर्तमान गडकरी तमाम आपलाली मुलेमाणसे किल्यावर नेत चालले आहे. सबब आमचा वचक धरून नेऊं म्हणोन मानितात. आम्ही येथे शहराचा व दोहीं वाड्याच्या सदरेच्या बाहेरील बंदोबस्त करावाच; चौक्या ठेवाव्या, गडावर माणूस जाऊयेऊ देऊ नयेत येसे करावे किंवा इतक्या खटपटीत पडू नये? आपण मात्र आपले जागा खबरदार बंदोबस्त असावे. कसकसे होते ते पाहावे. हे दोन्ही विचार उचित अनुचित कोणता कसा करावा येविसी ल्याहावे. दोन्ही गोष्टीस फौजेचे बल आमचे पुर्ते असिले पाहिजे. याची तजवीज करणार स्वाम समर्थ आहेत. येथे खर्चास यैवज अगदीं नाही. जो यैवज जमाव कर्ज मिलते तो यैवज लस्करात रवाना होतो. येथे कर्जहि मिलत नाहीत. कदाचित दाहापाच कोठे मिलताते दुव्होत्रा दिढोत्रावाचून मिलत नाहीत. याप्रकारचे वर्तमान शहरात जाहाले आहे. वरकड कोणेविसी येथे कोणाही येकाचा इतबार वाटतो येसे नाहीं. हे गारूड किल्याचे वगैरे काय आहे हे ईश्वर जाणे. आईसाहेब केवल कैलासावर गेली आहेत. राजश्रीजवळ दोनच्यार पोरगे इतके मात्र आहेत. चंचुप्रवेश दुसऱ्या माणसाचा होऊ देत नाहीत. आईसाहेबाची राजकारणे चौकडे आहेत. कागदपत्र येतात जातात. राजश्रीची बुध्दि येका नेटाचीच पुर्ती असल ती तर काहीबाही करतो. राजा काही तिखट काही पोचट, क्षणभर विश्वास क्षणभर अविश्वास. किल्यावरून येक निरोप राजे सांगून पाठवितात की माझ्या वाड्याचा बंदोबस्त तुम्ही करा. येक निरोप मागतीं सांगून पाठवितात लोकाच्या सांगितल्यावरून की चौकी नका ठेऊ. आहे तसेच असूं द्या, ऐसेहि सांगून पाठवितात. सारांष विश्वास कोणता धरावा. आम्ही सांगत होतों की तुम्ही किल्यावर जाऊ नका. न यैकले. वर्ते गेले ते फसले. सारांष येका धोर्वटे[1] सरल विश्वास ठेऊन कारभार करते करून घेते तर सर्व चांगले होते. करून दाखविणार दाखवितें. असो; येविसीचे किती

---

१ धोरण.

ल्याहावे. असो; तूर्त राजे अडकले आहेत. ग्लान भाकितात. खालते कसे तरी येऊत. खावंद आहेत. हे तो केले पाहिजे. ही गोष्ट स्वामींनी केलीच पाहिजे. उतर पाठवावे हे विनंती.

*¶Purandare, Peshwa's agent at Satara, informs the Peshwa that Ramraja has been lured into the fort and kept in confinement by Tarabai. All the doors are strongly guarded and none is allowed to enter. The King is vacillating and does not know his own mind. Orders are solicited from the Peshwa as regards the steps to be taken to meet the emergency.*

---

*No. 120*] [*23-11-1750*

**श्री**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना**
**व ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी.**

विनंती. उपरी, स्वामीनी लिहिले की, राजश्री गडावर गेले ते कसे गेले म्हणून लिहिणे. त्यास पालखीत बसोन दाहा पांच माणसानिसी गेले. वरी जामदारखाना थोरले बाईचा होता तो उघडून त्यातील कडदोरा, सेरपेच, दोन कंठ्या, पैसे काढून आणिले. श्रीचे दर्शन घेऊन खाले उतरले. राजश्रीची+ माणसे गडकऱ्यानी फार येऊ दिल्ही नाहीत. हे विनंती.

*¶Purandare reports to the Peshwa how Ramraja actually got into the fort and what articles he took away with him from the Jamdarkhana of the senior queen.*

---

*No. 121*] [*Nov. 1750 ?*

**श्री**

**राजश्री पंतप्रधान गोसांवि यांसी.**

श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नौ खंडोजी जाधवराऊ दंडवत विनंती. उपरी, येथील कुशल जाणऊन गोसांवियानीं आपुलें निजानंदलेखन लेखयास आज्ञा केली पाहिजे विषेश. आपलें पत्र आलें की, सरंजामसुधां भेटीस येणें. त्याजवरून तमाम आम्हांकडील लोकांस बोलाऊं पाठविलीं आहेंत. कोणी आले, कोणी येणार. ते आलियावर त्यांची समजावीशनालबंदीचा निकाल करून येथील बंदोबस्ती करून दीपवाली जालियानंतर

+ पत्र नाना पुरंदऱ्यांचें.

सेवेसी येऊन पोहचतों. यानंतर चिरंजीव हैबतराऊ यांजला पत्र गोसांवियांचें आले आणि तिकडून राजश्री फतेसिंगबावांचीहि पत्रें आलीं कीं, सत्वर स्वार होऊन येणें. यैसियास आमचा विचार गोसांवियांचे कुटुंबीचा जें कर्तव्य ते आज्ञेप्रमाणें करावें. याजनिमित्ये चिरंजिवास सेवेसी पाठविलें आहे. विनंती करणें ते रूबरू करितील. यैसियास यानीं तिकडे जावें येसीच आज्ञा जाली तरी यांजला रवाणा सत्वरीच करावें कीं लौकर येऊन पोहचतील आणि त्यांची रवाणगी करून आपण सामानसुधां सेवेसी येऊं. अगर स्वामींस यांजला आपले सेवेसी ठेवावयाचें असिलें तरी तैसीच आज्ञा करून रवाणगी करावी कीं ते आलियावर त्यांचें सामान आपलें सामान येथास्थित करून सरंजामसुधा सेवेसी येऊं. वरकड कितेक अर्थ चिरंजीव सेवेसी निवेदन करिता विदित होईल. विषेश कायें लिहिणें, लोभ असों देणें, हे विनंती

मोर्तब
सुद.

¶*Khandoji Jadhao to the Peshwa, offering to join him with his forces.*

---

*No. 122*] [*1-12-1750*

छ १९ मोहरम. नकल.

**श्री**

**पु॥ तीर्थरूप राजश्री भाऊ**
**स्वामीचे सेवेसी.**

विनंती. उपर, राजश्री संभाजी राजे याजकडील मजकूर आजी छ १२ मोहरमीं प्रातःकालीं दरवारीं जाला, तो आलाहिदा पुरवणीत लिहिलाच आहे. यैशास ठाणियाचा व त्याचे मुलकात पैका घेतला असेल त्याचा व फौज लुटली, या तिही मुद्याचा मजकूर तीर्थरूप राजश्री नाना आगमन होये तोंवर न करावा. इतुकेच आर्जीचे प्रसंगीं घडलें. राजश्री व्यंकटराऊ व मानाजी पायेगुडे याचे आगमनाचा वेध दूर जाला नाहीं. त्यास आणावेच आणावे. यैसे आर्जीचे प्रसंगी जाहाले आहे. परंतु घडले न घडले गोस्टींचे शास्वत मानावे असा विचार नाही. क्षणभंगूर विचार आहे, तो स्वामीस विदितच आहे. दरबारी जे समई जे वर्तेल ते स्वामीस लिहून पाठवावेच लागले, यास्तव लिहिले आहे. विदित जाहाले पाहिजे. शास्व(व)त नाही. दरबारी जेसमई वर्तमान होते तेच आम्ही लिहिलो. कळले पाहिजे. सेवसी श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*A news-letter of the affairs at Satara and the unsteady way of Ramraja.*

No. 123] [11-12-1750?

रा छ २१ मोहरम

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब
साहेबांचे शेवेसी.

विनंती. सेवेसी सेवक गोपाल कृष्ण कृतानेक प्रार्थना विज्ञापना. ता छ २१ माहे मोहरमपावेतों साहेबांचे कृपाद्रिष्टीकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित आसे. हकीकत: बावडा सोडल्यावरी दरबारीहून कशाला जाहालों.[1] त्यावरी वण पा। सिरपूर प्रांत चांदे येथे कुटुंबसहवर्तमान आहों. या प्रांती येऊन जीवमात्र आपला वाचविला. रोजगारामुळें कर्जदार बहुत जालो. आजपर्यंत राजश्री रघोजीबावा भोसले यांचे सरकारी चाकर होतों. अवंदां बेरोजगार घरीं आहों. कर्जदाराचे धरणीपारणी आहेत. सेवकाचा वगवसिला कोण्ही नाहीं. स्मरण चरणाजवळ व्हावें; या पदार्थे विनंती सेवेसी लिहिली आहे. हेत येक वेळ चरण पाहावे; परंतु येथून येणे होत नाहीं. याजकरिता रा। रघोजीबावास आज्ञापत्र सादर जालियाने येणे होईल. सर्व वर्तमान श्रुत केलियावरी जे आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक सेवक करील. बहुत दिवस आस्था माहाराजाची धरिली ते ईस्वरे सार्थक केली. याउपरी आज्ञा करणार साहेब धणी आहेत. सेवेसी श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*The writer requests Tarabai to order Raghuji Bhosle to restore him to his former possessions.*

---

No. 124] [पौ। *20-12-1750*

छ १ सफर.

श्री.

पु॥ तीर्थरूप राजश्री नाना ता। राजश्री
भाऊ स्वामीचे सेवेसी.

विनंती. उपरी. सांगोल्याचे मुकामी आपण केला कारभार त्याच बंदावर हा कालपर्यंत कारभारियांस सामील घेऊन कारभार करीत आहो. राजश्री गडावर आहेत, परंतु कारभार कांही तटला नाहीं. कां कीं, राजश्रीचे लक्ष आपलेकडे आहे तेच आहे, त्यांत कांही खतेरा[2] नाहीं. यास्तव हुजरातचा कारभार बारीक-

---

१ दरबारांतून आमचेवर गहजब झाला असा भाव. २ संशय.

मोठा जसा जे समई प्राप्त होतो तसा करावा लागतो. हुजरातीस दुसरा रोजमरा द्यावयास आरंभ करून कांही वाटणी जाली, कांही होणे आहे, तेहि देऊ. वाटणीस यैवज आपण लोकांकडे करून बंद बांधून दिल्हा आहे तोच लोकांकडून यैवज वसूल करून आणून वाटणी केली. परंतु आपलेकडे यैवज हुजरातचा राजश्री फतेसिंगबावाबाबत पनास हजार पाऊण लाख रुपये तूर्त द्यावे; त्यापैकीं पनास हजार मार्गसीर्षीत द्यावयाचे आपण लस्करांत नेमिले आहेत. त्यासिवाये दर माहेचा यैवज देणे आहे, त्यांत आम्ही कांही दिल्हे नाहीं. किरकोल सेंपनासाची चिठी आली तर देत असतों. मातबर यैवज कांही दिल्हा नाहीं. कारभारी यैवजासाठीं आमचे रूबरू कांही म्हणत नाहीं. परंतु मागे पुढें आम्हाकडे यैवज थारला[१] असतां आम्ही देत नाहीं; खावंदगिरी करून लोकांकडील मात्र यैवज वसूल करून आणितों, हे बोलावयास जागा होतो. तेंहि असो; परंतु राजश्रीचें लक्ष आपलेकडे निक्षूण असतां त्याचा पैका त्याचे राज्यभारास न द्यावा यैसें काये आहे ? तर येतद्विषईंची काये आज्ञा ती लिहिली पाहिजे. पै+का कांही दिलाच पाहिजे. आम्ही सारा कारभार करितो आणि आम्ही पैका न द्यावा हे उत्तम नव्हे. जर कर्ता राजश्रीचे लक्ष आमचे जागाचे सुटते, तर मग पैका का द्यावा, सहजेच होते. यास्तव खावंदगिरी आपल्याकडे, कारभारहि आपल्याकडे, यास्तव चालविलेच पाहिजे. स्वामीची आज्ञाहि पैका द्यावयाची मला होती, परंतु पैकाहि नवता व अताहि नाहींच, यास्तव इकडे तिकडे करून वोढून चालविले. आता पैका दिल्हा पाहिजे. थोडाबहुत दिल्हाने काम चालणार नाही. उतर पाठवावे, हे विनंती.

¶*Purandare asks funds from the Peshwa to pay the current expenses of the King.*

---

*No. 125*] [*16-12-1750*

छ २ सफर.

**श्री**

पु॥ तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेसी विनंती. उपरी, आजी छ २७ मोहरमी राजश्री स्वामी प्रात:कालीच पालखींत बसोन खालते यावयाचे उद्येषे चालिले तों गडकरी जमा जाले. राजश्रीची पालखी दरवाज्याआसपास आली. गडकरी आडवे जाले. कोठें जातां म्हणून राजश्रीस बोलिले. राजश्री बोलिले खालतें जातों. गडकरी बोलिले आईसाहेबांचा हुकूम नाहीं, आम्ही जाऊ देणार

---

१ राहिला. + येथून पुढील अक्षर नाना पुरंदरे यांचे.

नाहीं. यैसे बोलून बलात्कारें राजश्रीची पालखी माघारी फिरऊन नेली. इतकें वर्तमान आजी जालें. ×राजे उर्मटपण करून येत होते, परंतु गडकऱ्यानी दबाऊन माघारे नेले. हे विज्ञापना.

¶*Nana Purandare reports how Tarabai prevented Ramraja going back from the fort of Satara to the town below.*

---

*No. 126*] [*18-12-1750*

छ २ सफर.

श्री

तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेसी अपत्यें त्रिंबक सदासिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल ता। छ २९ मोहरमपर्यंत स्वामीच्या आसीर्वादेंकरून येथास्थित असे विशेष. केसरकराकडून सरदेशमुखीचा इजारा सिरवल वगैरे मावलें येथील राजश्री पंतसचिव यांजकडे आहे. त्यास सदरहू मामलियापैकीं ता। कर्यात मावल आपणाकडे आलें. तेथील सरदेशमुखीचा मजकूर पंतासी कसा काये पुणियांत बोलीचालीत आला तें न कले. हुजराती यैवजाच्या चिठ्या केसरकराकडे जाल्या. त्यानी पंतावर चिठ्या केल्या. पंती कर्यात मावलचे सरदेशमुखीचा गुंता धरला आहे. मल्तियांत मजुरा द्यावी अगर आपले सरकारांतून यैवज देऊन आमची निकड वारावी म्हणतात. तर पंताचा आपला तह कर्यात मावल घेतलें तेव्हां कसा काये सरदेशमुखीच्या मजकुराचा जाला असेल तो लेहून पाठवावा. तदनरूप जाबसाल करूं. दिनच्यर्येचें वर्तमान अलाहिदा पुरवणियांवरून विदित होईल. +सेवेसी श्रृत होये, हे विज्ञापना.

¶*Purandare enquires as to what the actual terms of settlement were between the Sachiv and the Peshwa regarding the rights of Maval.*

---

*No. 127*] [*21-12-1750*

छ २ सफर.

श्री

पु॥ तीर्थरूप राजश्री नाना
स्वामीचे सेवेसी

विनंती. उपरी, दाभाडियांचे आपले रहस्य जाले. दुसरी गोष्टी, घोरपडियास वगैरे लोकांस मातुश्रींची पत्रें गेलीं होतीं त्याची उतरें आलीं. त्यांचा आगमनाचा

---

× पत्र नाना पुरंदऱ्याचें. + येथून पुढील अक्षर त्रिंबक सदाशिवाच्या हातचें.

विचार बनत नाहीं. येणेकडून मातुश्रीचा मनसबा हमवार जालासा दिसतो. गडावर गडकरी किलबिललेसे दिसतांत; मातुश्रीस म्हणतांत कीं, तुमचा व राजश्रीचा येकविचार जाला तर आम्ही तुमच्या आज्ञेत आहों. राजश्रीचा तुमचा येकविचार न होये तर आमची घरे नाहाक कां बुडवितां ? आम्हांस काये ती आज्ञा करा. देखली बुधी करूं यैसे म्हणत आहेत. त्याजवरून मातुश्रीनी राजश्रीकडे येकचित करून घ्यावयास्तव मध्यस्त रीतीनें बोलून पाहिलें. राजश्रीचा विचार कांही दिलखुलासा हातास न येसा जाणोन बोलीची सांड केली; परंतु वरचेवरी सांगावयास सिकवावयास, माया ममता कांही भयेप्रदर्श व कांही हितशत्रुत्व सांगतच आहेत. चालेल तितक्या प्रेत्नास आलस होत नाहीं. राजश्रीजवल मातुश्रीचे विश्वासू नारूकाका व सुभानजी तात्या, हे दोघे निरंतर आहेत. खालील बातमी राजश्रीजवळ कोणाची कांही येईल जाईल त्याची खबरदारी राखतच आहेत. फाटे लाकूड वगैरे सामान गडावर नित्य जातच आहे. +सेवेसी श्रुत, होये हे विज्ञापना.

¶*Tarabai fails to gain the confidence of Ramraja.*

---

*No. 128*] [*Date of receipt 21-12-1750*

छ २ सफर.

**श्री**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना**
**स्वामीचे सेवेसी**

विनंती. उपरी, राजश्री गोपालराव माहादेव यांचा कारकून गडावर गेला होता. त्याजवल मातुश्री व मातुश्रीचे कारभारी बोलिलें कीं, गोपालराव म्हणजे प्रतिनिधींचे मुतालीक. त्यांजकडे आमचा घराऊ कारभार पिठामिठाचा. त्याणी आमच्या लगामी असावें; तें न करितां पेशव्यांचे घरास व गोविंदरायांचे घरास कारभारास जातांत हें काये ? परसरामपंतानी राज्यांत श्रमसाहास केले, त्यास प्रतिनिधी प्राप्त जाली. त्याजमागें श्रीपतराव जाले. त्याजवरी त्याचे भाऊ दादोबा प्रतिनिधी होते. त्यांची काढून त्यांचे भावाचे मूल[1] आणून त्यास प्रतिनिधी दिली हा कोण विचार केला ? दादोबाचा उछेद कां केला ? दादोबास आणून प्रतिनिधी द्यावी लागते असे राजश्रीस जाऊन पुसोन येणे, म्हणून मातुश्रीनी आपले कारभारी राजश्रीकडे पुसावयास पाठविले. त्यांनी

+ येथून अक्षर नाना पुरंदरे याचें.

[1] भवानराव.

राजश्रीस पुसिलें. राजश्री बोलिले, दादोबा मजला मारावयास जपत होता म्हणून पेशवियांनी त्यास धरिलें. प्रतिनिधी त्याची काढून मुलास दिल्ही इतकें जाणतों. या उपरी आपण येथें आहे. तुम्ही वडील आहां; खातरेस येईल तसें करा. मुलाचा करार राखायी[1] दादोबास आणून प्रतिनिधी द्या. मजला काये पुसतां, असें बोलिले. +यां प्रकारचे खेळ होत आहेत. सेवेसी श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*Wranglings between Ramraja and Tarabai. The former feels he is quite helpless.*

---

*No. 129*] [पौा *21-12-1750*

छ २ सफर.

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना
स्वामीचे सेवेसी

विनंती. उपरी, पुराणीक व भिवजी कांसुरडे वगैरे मातुश्रीचे कारभारी याणी विचार करून गडच्या हवलदाराकडे जाऊन, पांच सातसें लोक घेऊन खाली उतरावें; आम्हांवर व गोविंदराव वगैरे कारभारी यांजवर दंगा करावा; गडावर घेऊन जावें, असा मनसबा केला होता. त्यास हवलदारानें हिरमोड केले कीं, हे गोष्टी कामाची नाहीं. ते तुम्हास आटोपणार नाहींत. तुमचे हातीं लागणार नाहींत. विनाकार्ये खपीप[2] व्हाल आणि रिकामा दंगा शहरांत होईल. हे गोष्टी कामाची नाहीं, असें बोलून त्यांचा मनसबा मोडून वारापाणी केले. विदित जाले पाहिजे. ×मागती खाली येऊन दंगा करावाच हे मसलत घडत आहे. सिधि जाहलियावर कसे होते पाहूं, हे विनंती.

¶*Purandare reports to Nana how Tarabai tried to capture Purandare but failed.*

---

१ 'मुलाचा करार राखाया' ह्याचा अर्थ, बरोबर लागत नाहीं. + येथून अक्षर नाना पुरंदऱ्याचें.
२ खपीप = फजीत. × येथून अक्षर नाना पुरंदरे याचें.

No. 130] [पौ॥ 21-12-1750

छ २ सफर.

श्री.

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व तथा राजश्री

भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती. उपरी, राजश्री चिमणाजी बापूजी व म्हालोजी मुठे गेंडेयाचे पश्चमेकडे बनसीपुरीचे मह्ल्याचे[१] उतरेस राहिले आहेत. त्यास चिमणोबानी आज येऊन वर्तमान सांगितलें कीं, स्वामीचे घराकडे रातबिरात येणे पडलियास, मार्गी सेरताटीतून लोक चौकीदाखल बसले आहेत. दुसरे, गेंडेयाजवळ एक चौकी व म्हारदरेयात एक चौकी गोटानजीक आहे. ऐशियास जर याप्रमाणे असलियास असे दिसते कीं, इकडे आम्हावर दंगा करावा, त्या समई आमची फौज आम्हाजवळ पोहचो न यावें, यास्तव बसविलीं आहेत माणसेंसे वाटतें. त्यास आम्ही तर निमे लोक गोटांत व निमे वाडेयात चौकीस याप्रो ठेऊन खबरदार आहोच. परंतु खामखा याप्रमाणें ठीकठाक असिल्यास त्याचा मुलाहिजा काय आहे? यास्तव त्याचे चौकसीस राजश्री रामाजी माणकेश्वर व चिंतो विनायक रात्रीचे चिमणाजी बापुजीचे गोटात पाठविले आहेत. जर गोटास चौक्यादाखल पायचे लोक असल्यास अनयासेच त्यांचे पारपत्य होईल. विदित व्हावे यास्तव लिहिले असे. बांधारीचे लोक मावळे आईसाहेबानी ठेविले आहेत; त्यास, राजश्री गोपाळराऊ याजकडील कारकून, स्वार, व लोक देऊन जाऊली व्याघ्रगड सुभ्यात रवाना करविले. त्याणी आम्हाकडील कारकून मागितला तोहि दिल्हा आहे. हे जाऊन तमाम मुकासी लोक यास जमा करतील. जो न ये आणि आईसाहेबाकडे जमाव करून आला असेल, अथवा येईल अगर त्याचे सनदेनी गांव खेडी बंद करून राहील, त्याचे पारपत्य करतील. वर्धनगडकरियानी चिमणगाव, पुसेगाव, खातगूण, इसापूर वगैरे गावच्या सनदा आईसाहेबांच्या नेऊन गावकरी धरून नेले. यास्तव राजश्री गोपाळराऊ याणी त्याजवर राऊत पाठविले आहेत. तेथेहि कटकट होईल. हे वर्तमान कळावे यास्तव लिहिले असे. स्वामीनीहि याचा विचार मनन करून काये ते आज्ञा केली पाहिजे. +आमच्या घरावर्ती थोरली वाघघोंड आहे. तेथे चौकी आज पंचविसा माणसाची आईसाहेबाकडील बसली आहे. दिवसे दिवस चौक्या पुढे आणतात, हे विनंती.

¶ *Tarabai prepares to fight with the Peshwa.*

---

१ महल्ला, A division of a town. + येथून अक्षर नाना पुरंदरे याचें,

*No. 131*] [पोा *21-12-1750 ?*

श्री

पुा तीर्थरूप राजश्री नाना
स्वामीचे सेवेसी

विनंती. उपरी, बांधारीचे मावळे लोक मातुश्री आईसाहेबानी येथें आणवि-ल्यावरून प्रस्तुत जे जे आले त्याची यादी अलाहिदा पाठविली आहे, त्याजवरून विदित होईल. +सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*Purandare sends a list of the Mawle fighters collected by Tarabai.*

---

*No. 132*] [पोा *21-12-1750*

छ २ सफर.

श्री

पुा. तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेसी विनंती. उपरी, सेखमिरा व फरीदखान यांचा खिजमतगार अजमत याचा राबता गडावर आहे. सेखजीचा मजुरा उभयेताकडे सांगावयास जात असतो. त्याजवरून राजश्री बापूजीबावानी फरीदखानासी संदर्भ केला कीं, अजमत बराबर आईसाहेबांस सिपाई सरदारांचे नांवे अर्ज सांगोन पाठवावा कीं, कारभारी यांस कारभारसंमंधे गडचा दरवाजा मना केला आहे. असो. सरदार, सिपाई लोक, साहेबांचे चाकर; यांस खावंदांचा मजुरा दो चौ दिवसां येकवेळ तऱ्ही व्हावा. दोघे चौघे आजी दोवे चौघे उद्यां, असें करून कोणी आजी कोणी उद्यां, येसे येऊन मजुरा करून खालीं यावयास प्रत्यवाये काये आहे ? येसा विचार करून अजमतीस गडावर मातुश्रीकडे पाठऊन दिल्हा. त्याणे जाऊन सदरहूप्रो अर्ज केला. तेव्हां मातुश्री प्रथम बोलिली, बरे; सिपाई सरदार लोक थोडथोडे मजुरियास आलियास चिंता काय आहे ? कां न येत ? असे बोलिलीं; मागती बोलिलीं, आपल्या कारभारियांस पुसोन सांगतो, म्हणून बोलून पुराणीक व भिवबा व उपाध्ये बोलाविले. त्यास पुसिले. ते बोलिलें, हे काय काम करितां ? त्यांस कां येऊ देतां ? कोणाचें कांही काम नाहीं. कोणाचे मजुरियाचा कांही तट पडला नाहीं. कोणास येऊं देऊं नये. असे त्याणी संमत दिल्हावर मातुश्रीनी अजमतीस

---

+ पत्र नाना पुरंदऱ्याचें.

सांगितलें कीं, त्यांचे काये काम? आम्हास ठावके आहां, अरधे इकडे, अरधे तिकडे, असे बोलिलीं. याप्राो मजकूर जाला सेवेसी निवेदन व्हावे यास्तव लिहिलें आहे. +सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Tarabai's intrigues against the Peshwa.*

---

*No. 133*] [*1750?*

**श्रीभवानी प्रसन्न**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**
**त्रिंबकपंत नाना स्वामी गोसावी यांसी.**

सेवक येमाजी सिवदेऊ कृतानेक नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन केले पाहिजे विशेष. राजश्री दादोबा[1] कैलासवासी याचा आमचा स्नेह कोणे रीतीचा होता, ते लोभ ममता करित होते, तेहि तुम्हास दखल आहे. त्याप्रमाणें राजश्री महादजीपंत बाबाहि ममता लोभ करित आले. यैस असतां कालगतीमुले कोणाच्या सांगणीवरून त्याच्या मनात विप्रयास येऊन आमच्या ठाई अवकृपा धरली. तेणेकरून आमचे अववे आनहित होऊन आमच्या सवसाराचा आवघा नाश होऊन आम्हास देशांतर प्राप्त जाहाले. आम्हापासून काही आपराध जाहला नाही. यैस असता आम्हावरी निष्टुरता धरावी हे थोर लोकास उचित नव्हे. याजउपरि त्याणीं आम्हांवरी दया करावी हे त्यास विहित आहे. आम्ही ब्राम्हण, आमचा नाश करावा यैस नाही. तुम्हींहि त्यास लेहून, त्याचे चित सदये होऊन आम्हांवरी दया करीत तो विचार आपण केला पाहिजे. तुम्हींहि दरबारी होता. आम्हापासून काये अंतर पडले हे तुमचे चित तुम्हास साक्ष असल. दुसरी गोष्टी राजश्री बाबानी[2] तुमचा आमचा हात येक करून दिल्हा. राजश्री माहादोवानी आम्हांवरी आवकृपा करून निराआपराध लोकाचे सांगितल्यावरून करून आमची गत यैसी करावी हे त्यास युक्त नव्हे. ज्यानी अवकृपा केली त्यार्णीच दया करून आमचे बरे कराव, हे त्यास उचित आहे. प्राणापावेतों गोष्टी आली. हे ईस्वरास मानणार नाहीं. याजउपरि आपण त्यास लेहून त्याचे चित्त सदये होऊन आम्हावरी कृपा करून आमची बरी गोष्टी होय तो विचार आपण केला पाहिजे. लोभ असों दीजे हे विनंती.

¶*Yamaji Shivdeo writes to Nana Purandare, requesting him to have him reconciled to Mahadoba Purandare.*

---

+पत्र पुरंदऱ्याचें. १ मल्हार तुकदेव. २ (?)

No. 134] [1750 ?

नकल

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
चिमणाजीबावा स्वामी गोसांवी यांसी

सेवक येमाजी शिवदेऊ नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करविले पाहिजे विशेष. श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांनी राजश्री उदाजी चवाण हिंमतबाहादर याच्या साहित्यास फौजेसहवर्तमान आपल्यास देऊन आमचे पारपत्याची आज्ञा केली आहे म्हणऊन वर्तमान ऐकिले; तरी आमचें पारपत्य व्हावयासी बाकी राहिली आहे यैसे नाहीं. प्राण रक्षण करून येथे श्रीमंताचे चिंतन करून आहों. येथे राहाणें आमचे हातीं आहे यैसे नाहीं. श्रीमंतहि दया करून राहो दिल्हे आहे म्हणऊन आहों. काही पारपत्य करावयाचे अवशिस्ट असेल तर आम्ही ब्राम्हण ; श्रीमंतांचे इच्छेनें पारपत्यहि आमचें होईल. आणि ऊर्जितहि होईल. यैसे असतां चव्हाणास आमच्या पारपत्याची आज्ञा करून साहित्य करावे यैसे काये आहे? या प्रसंगात तुम्ही थोर लोक येऊन पडिलां आहां, यामुळें आम्ही बहुत समाधानरूप आहो; तरी श्रीमंतास येविसीं लेहून श्रीमंतांची छाया आम्हावर होऊन तुम्हास येश ये ते केले पाहिजे. येविसीं बहुत काय लिहावे? तरी तुम्ही थोर विवेकी आहा. बहुत काय लिहिणे, लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*Yamaji Shivdeo to Chimnaji Bapuji, a Sardar of the Peshwa, asking him to use his influence with the Peshwa on his behalf.*

---

No. 135] [26-12-1750 ?

श्री.

विनंती. उपरी, येथील कुशल ताा पौष शुध्द १० बुधवार मोकाम नजीक जरंडा सुखरूप असो विशेष. आम्हास येऊन पावणा महिना जाहाला, येकहि पत्र न आलें. आम्ही दोन चार पत्रें पाठविलीं ती पावलींच असतील. तरी तिकडील सविस्तर वर्तमान लिहून पाठवित जाणें. इकडील वर्तमान तरी श्रीमंतांचे आज्ञेप्रमाणें चौकडील चौक्या व आंतील राजकारण कार्याकारण रक्षूण राहिलो आहों. येकादसीस श्रीकृष्णेच्या पाण्यावरी मुकामास गेलों. ससरुसीस जमा जाहले आहेत ते तैसेच जात आहेत. आम्ही आल्यापासून स्वारी-

सिकारी बंद आहे. पायेउतारा कांहीं राऊत चोरीनें कुडाल खोरे वगैरे येकदोन पाठीमागे जात आहेत. तेथे मात्र उपसर्ग जाहला. त्याखेरीज कोठें बाहेर निघत नाहींत. यापुढें होईल तें पाहावें. सतरुसीतील ग्रहस्त आसीर्वादवचनें बहूत देतात. परंतु निदर्शनास कोणतीहि गोष्ट येत नाहीं. ईश्वरसत्तेनें घडणें ते घडो. चालणेस अंतर किमपि नाहीं. फलदाता इश्वर आहे. राजश्री श्रीपतराव शामजी यास वाताचा उपसर्ग जाहला होता; याकरितां च्यार दिवस राहिले होते. हली येथें आलें. श्रीमंताकडे येणार. त्यास येथें कार्य होते या * * * ठेवून घेतले आहेत. वर्तमान श्रीमंतास विदित करून त्यांचे आज्ञापत्र पाठऊन द्यावे. तुम्ही दरबारचा कार्यभाग उरकून घेऊन यावयाचे करणें. दिवसगत न लावणें. बहुत काय लिहिणें, लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*This letter gives an account of the disorder which had broken out at Satara owing to the despatch of forces to that place to restore order.*

---

*No. 136*] [*Dec. 1750?*

श्री

सेवेसी विज्ञापना. करवीरवासी यांस आणावयास विठल बयाजी गेले होते. यावयाचा सिधांत जाहला होता, परंतु स्वामीचे अश्वसनाखेरीज आलियानें परिणाम नाहीं याकरितां परभोरी पत्रें स्वामीकडे गेली, हे वर्तमान सतरुसीस आलें. त्यावरून उभयेताचे चितास न आलें; ही येक गोष्टी. दुसरी गोष्टी सांगोन पाठविलें जे दोनसें माणूस गडावरी आपलें घ्यावें; दोनसे माणूस राजश्रीच्या चौकीस. याप्रमाणें ठिकाणास येऊन ठिकाणी बसल्याउपरी निघोन येतों. त्याप्रमाणें एकिल्यावरी गोष्टी विलंबावरी पडली. फौजाहि येऊन दाखल जाहाल्या. पौष मासहि प्राप्त जाहाला. त्यामुलें येणें राहिले. गेले ग्रहस्त माघारे आलें. स्वामीच्या फौजेचा दबाव बसला. स्वारीसिकारी बंध जाहाली. नित्य शाहारांत गलबला होतो, आतां येतात उद्यां येतात. चहूंकडील मार्ग राहिले. दाणागला जात नाहीं; याप्रमाणें जाहालें आहे. त्याजवरून बावाजी जाधव याणीं सांगोन पाठविलें जे याप्रमाणें जाहालिया राजश्रीस व मातुश्रीस मारून आपण मरतो; अपकीर्तीस कारण होतां हे गोष्टी न व्हावी. मागें पाच सात वर्षें दादोपंत वागत होते; त्याणीं दोहींकडील चित रक्षून राहिले होते. आतां नवीन प्रसंग न व्हावा. या विचारें सांगोन पाठविलें त्यांचे उतरहि पाठविले आहे.

नवीन प्रसंग होणे तो तुम्हांकडूनच जाहाला. याकरितां हे गोष्टी घडणें जाहली. समर्पक गोष्टी जाहलिया श्रीमंतांस लेहून आज्ञा होईल तेणेंप्रमाणें वर्तणूक होईल म्हणऊन सांगोन पाठविले आहे. उतर आलियावरी सेवेसी श्रुत होईल हे विनंती.

¶*This letter describes the condition of things at Satara as regards Chhatrapati Ramraja and Tarabai. Sambhaji of Kolhapur was expected to come to Satara but he did not arrive.*

---

*No. 137*] [*29-12-1750*

**श्रीलक्ष्मीकांत**

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी**

विनंती. आज्ञांकित गंगाजी गोपाळ कृतानंत सां। नमस्कार विज्ञाति. येथील कुशल पौष शुद त्रयोदसीपर्यंत स्वामीच्या कृपाकटाक्षेकरून चंद्रपुरी येथास्थित असो विशेष. येथील वृत कित्येक राजश्री वेंकाजी मोरेश्वर यानी सेवेसी लिहिलें आहे त्याजवरून कळों येइल. कितेक विचार लेखनात येत नाहीत. निमित्य राजश्री येजमानानी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे शेवेसी राजश्री मैराळ नारायेण पाठविले आहेत ते स्वामींचपाहि शेवेसी येऊन साद्यंत निवेदन करतील त्याजवरून ध्यानास येईल. विशेष काये लिहिणे. सर्वकाळ आज्ञापत्रीं सांभाळ-करावयासी स्वामी समर्थ आहेत. चंद्रपूरचे वर्तमान, दो चौं दिवसात निर्गम होऊन सैन्यसहवर्तमान येजमान गंगातिरास सत्वरच येतील. स्वामीच्या प्रत्यो-त्तराची मार्ग प्रतिक्षा करीतात. प्रत्योत्तर येईल तदनुसार वर्तावे हा येजमानाचा पुर्ण निश्चये आहे हे विज्ञाति.

¶*Gangaji Gopal to Bhausaheb, saying that Mairal Narayan has already been deputed to the Peshwa by Raghuji and that Raghuji himself would soon be reaching the Godavari after having first settled the affairs at Chanda (Chandrapur).*

---

*No. 138*]

**श्री**

पुरवणी विज्ञाप्त जे. राजेश्री अंताजी सिवदेव याणें येथून मुख्यास नेणेस जागा जागा राऊत माणसे नेमून ठेविली आहेत. मुख्य व सौ बाई उभयेता नित्य सिकारास नदी व बागबागषाईस रोज उनामधें बाहेर निघणेस राबिता केला आहे. हमेषा माषे व हरणें याची सिकार खेळतात. श्रीशंकरभारती स्वामी

चिकाडीस गेले. त्यास मुदाम दोघे हुजरे देऊन जलदीने बोलाविलें. किनिमित्य तर मातुश्री ताराबाईकडोन याच्या पायावर हात ठेऊन क्रिया घेणार. याकरीता स्वामीसहि समरसीस पाठवावे. अथवा षफतपूर्वक यांचे नावचे पत्र मातुश्री पावे यैसा विचार. रा धाकटे नाना कडोन राघोपंत नामे कारकून ताराबाईकडील हुजरे बा। घेऊन आला आहे. त्यास पुरसीस केलिया म्हणतों की नानानी राज्या-कडील जोड्या मागून घेऊन आपणा समागमें देऊन बातनीस येथें पाठविलें आहे. हेच बजिनस ताराबाईकर्डालसें पुरतें अढलले. गोविंदरायाकडीलहि संदर्भ येथें ऐकीला जातों. परंतु निकड मातुश्रीची जबरदस्त दिसती. मुख्य व बाई उभये-तांहि जाणार हेहि ऐकतों. कोणते वेळेस जातात न कले. मनसब्रा बाहेर निघत नाही. घरामधे दम खाऊन पोख्त होतों. याचा विश्वास येकंदर नाही. सेवेसी श्रुत होये हे विज्ञात.

¶*The letter gives information regarding the arrangements made for taking Sambhaji to Satara. Men are also deputed to bring the Shankaracharya.*

---

*No. 139*] [*30-12-1750*

श्री

आज्ञाधारक आनंदराव गिरिधर त्रिकाली सास्टांग नमस्कार विज्ञापना. छ ११ सफर मोकाम करविरी खावंदाचे पुण्यप्रतापें सेवक क्षेमरूप असे विशेष. इकडील वर्तमान रा विसाजीपंतासमागमें फौज व हातरोखे मुख्यानी देऊन सामानगडास ठाणें बसवावयास काल येथून रवाना केलें. मानाजी पायेगोडा फौजमुधा त्याच रोखेस उतरले असेत. सामानगड ठाणे हातास आल्यावर आणखी भुदरगड वलभगड देणार म्हणोन मुख्यानी आज्ञा केली, तो दरबारचा सविस्तरपूर्वक व्रतांत अगदी दखलगिरीने रा केशवरायानी सेवेस लिहिला आहे. दुसरें वर्तमान उडतें यैकतो जे, मातुश्री ताराबाईकडोन हुजरे कागद घेऊन आले होते. त्याचा मजकूर पूर्वी रा रामराजे तीर्थरूपास कैद केलेसमई तुम्हासच राजी स्थापिलें होतें. सांप्रत तोच प्रसंग घडला आहे. सत्वर आले पाहिजे. तुम्हाखेरीज अधिकारी नाही. अगत्यरूप येणें, आपले राज्य करणें. असे कागद पाहून मुख्यानी त्या गोस्टीस डोल दिल्हा असतां सौभाग्यादिसंपन्न बाईनी सांगितले जे, मातुश्रीस पूर्वीपासून तुम्ही बहुतसा प्रत्योपकार केला, तो ध्यानांत आणून हा मनसबा करणें. रामराजा सारखें तुम्हासहि समरसीमधें उभयतांस कोंडून दावा उगवितील. दोनी राज्यें जिवंत असिजेपावतों करतील. दूरवर द्रिष्टी देऊन हरयेक मनसबा करणें म्हणोन सांगून मनसबा मोडला यैसं यैकतों. येथें बहुताच्या

मुखें वलगना या मजकुराची आहे. सिवाजी थोराताची फौज मालजी सिंदा हे अगदी लस्करास सामानगडास गेले. मुरारराव घोरपडा सोंडूरावर आहेची खबर आहे. नवाब नासरजंग व पठाणामधें कजी होऊन फितूर होऊन पठाण व फिरंगी येकत्र होऊन लडाई जाली. अबदूल मजीदखानाचे लेक अबदूल करीम याचे हातचे तीर दोन नवाबास लागले. बाहदूरखानाचे हातची बंदुखेचा गोला येक लागून (न) वाब लडाईत ठार जाले. इदायेत मोजदीनखानास हैदराबादेच्या सनदा पूर्वी आल्या होत्याच. सनदास फर्मानबाडी करून सनदां घेऊन कुल दक्षणचा सुभा हिदायेत मोजदीनखानास पठाणानी ठराविला. याचप्रमाणे अबदूल मजिदखानाने पत्र लेहून मुख्यास पाठविले आहे. कर्नाटकामधें फितूर जाला यासाठी मुरारराव घोरपडा मागारा कर्नाटकांत जाणार हेहि खबर आहे. येथून मुख्य व सौा बाई यांची स्वारी तोरगलास होणार म्हणोन आवाई आहे. यैकले वर्तमान सेवेस लिहिले आहे. श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Anandrao Giridhar writes to the Peshwa how on the offer of Tarabai Sambhaji consented to proceed to Satara and how Jijabai prevailed upon him to cancel his plan by bringing home to him the intriguing nature of Tarabai who would imprison him and conduct the administration both at Satara and at Kolhapur.*

---

*No. 140]* *[4-1-1751*

**श्री**

**श्रीमत तीर्थरूप राजमान्ययाविराजित**
**राजश्री स्वामी राजश्री स्वामी वडिलांचे**
**सेवेसी.**

आपत्ये अंताजी विश्वंभर करद्वये जोडून चरणावर मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विनंती. विनवावया प्रार्थना कीं पौष्य वद्य चतुर्थी प्रात:कालपर्यंत प्रसंगीचे वर्तमान तर शेनापति इंडीस आहेत. आरब व हरजी घारे व सिदीचें सामान आववें पायदळ माणूस मिळोन पंधराशेंपर्यंत फौज व घरपागा व सिदी व कांही कांही सिलेदार मिलोन उतम मध्यम मिलोन पांचशेपर्यंत. परंतु गायेकवाडाची वार्ता आयेकोन समाधान दिसते. परंतु चितापासून हर्षामर्ष करावा हा हेत दिसत नाहीं. उभयेतां मिलोन येकांती विचार कीं हर्षामर्षात कांहीं उतम नाहीं, परंतु इतका लौकिक करावा हे नवते. लौकिक त्यांचा जाला की थोरास थोर समयास रक्षितात. कांहीं न्यूनपूर्ण तर कीं कांहीं कोन्हाचे फितव्यात आसो; तर हा प्रसंगपावेतों तो विचार तर आम्हांपासून जाला नाहीं. ताकपीर

साहित्य होते ते आले. शैन्यास येथे कांहीं फौज फार नाहीं. लौकिक वार्ता तर गाईकवाडासमागमे तोफगाडी पांचसाहा आहेत व बानाचे उंट बावीस आहेत. दारूगाडिया पंधरावीसपावेतों आहेत व बारा हजारपावेतों फौज व पायेदल दोन हजारपर्यंत आहे. लोकवार्ता आहे, परंतु दरबारची वार्ता तर याप्रमानें नाहीं. दारूगोली सामान व पायेदल व फौज सरंजाम चांगला आहे; हे वर्तमान दरबारी आहे. मातुश्रीकिडील वर्तमान काये येते त्याप्रमाने वर्तणूक करावी, हा विचार याचा आहे. रोजमुरा वडिलांनीं पाठविला व शेला व पागोटे पाठविले ते पावले. घोडीस तट्टास बेगमीस काही नाही. हिशेबहि वडिलांचे चरणापासी पाठविला आहे. दाणियास बेगमी नाही. पोटाची बेगमी जाली आहे. हिशेब वडिलानी पाहोन आज्ञा केली पाहिजे. वसिला तर चरण आपले आहेत. इतर कोन्ही नाही. याविषई विनंती मान्य केली पाहिजे. उधार देत नाहीत. मागील भरणा जाला. अनमान करितात. परंतु वडिलाचे आसिर्वादे करून. बहुत काये लिहिणे हे विज्ञापना. पुढेहि प्रसंगी वर्तमान होईल ते शेवेसी, हिशेब शेवेसीं पाठविला. उतर पाहिजे, हे विज्ञापना.

¶*Antaji Vishvambhar gives details of Senapati Yashvantrao Dabhade's movements.*

---

*No. 141*] [पो *9-1-1751*

छ २१ सफर.

श्री

**पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व राजश्री**
**भाऊ स्वामींचे सेवेसी,**

विनंती. उपरी, येथील वर्तमान वरचेवरी लिहितच आहो. गडकरी बोलो लागले आहेत. मातुश्रीची व राजश्रीची मध्यस्ती करीत आहेत की, उभयेतानी येक व्हावें आणि आपला राज्यभार चालवावा. नाहीतर आम्हास काये ते सांगावें. त्यास मातुश्री म्हणतात की, आपले विचारे जे कर्तव्य ते करावें. राजश्री म्हणतात की, आपण जे कर्तव्य ते राजश्री प्रधानपंताचे विचारें आपला कारभार करून मातुश्रीस सांगत जाऊ. परंतु पुराणीक वगैरे पाचसात असामी आहेत ते दूर करावें, याप्रों मजकूर आजदोन रोज होत आहे. दुसरे गडकरी बोलतात की, राजश्री नानाकडील रामाजीपंत वगैरे दोघांतिघे वरते द्यावें. त्याचे हातून बोलवावें ऐसेहि आहे. होईल ते लेहून पाठविले जाईल. काल चिमणाजी

बापूजी याणी लस्कराजवळ चौक्या बसल्या आहेत म्हणोन सांगितले होते. त्याची चौकसी करून पारपत्य करावें म्हणोन रामाजीपंत व चिंतो विनायक पाठविले होते. याणी जाऊन चौकसी केली. परतु कोठे काही ठिकाण नाही. सारे वारापाणी जाले. मग माघारे आलें. राजश्री गोपालराऊ. याजकडील लोक व राऊत मेढेखोरियात पाठविलें. त्याणीं तमाम तिकडील चौकसी पाहून पारपत्य करावे. त्यास कासुर्डे व पारटे हे मेढेखोरयातील; यास्तव भिवजीस मुंगला लागोन त्याणी येथे माणूस ठेविले होते त्यापैकी दोन चारसे माणूस तिकडे रवाना केले. असे कललियावर गोपालराऊ याणी आम्हाकडील (राऊत) मागितलें. त्याजवरून सेंभर राऊत आम्हींहि दिल्हें. जरी भलते गोष्टीस त्याणी उरमडून गोष्ट सांगितली तर पारपत्य करितील. ऐशियास आम्हा सर्वांचे मते याउपरी असेच जागजागा करावे. आईसाहेबांचे पत्रास मान नाही असे जालें म्हणजे सर्वहि हतवीर्य होईल. गुंज मोडेल. साराच मनसबा सिधीस जाईल असे जाले. त्याजवरून याप्रमाणे करीत आहों. जो मातुश्रीचा कागद घेऊन गेला असेल त्याचे पारपत्य करतो. आम्ही येथेंहि खबरदार आहों. काही चिंता नाहीं. स्वामीचे पुण्य समर्थ आहे. येथे आम्हाजवळ सामानहि थोडे बहुत आहे. उगेच टुकडे मोडून आम्ही बसावे यात जीव काय आहे? गडकरी, आईसाहेब नरम येत असे व्हावयास अगाध नाहीं. जेथे जेथे गडकरी उतरल, ज्या गावावर रोखेपत्र येतील ते माघारे लावले, चालू दिल्हे नाहीत, म्हणजे सहजच नरम होतील. राजश्रीचे लक्ष सर्वप्रकारे स्वामीचे ठाई. आईसाहेबांचे कारभारी पुराणीक, भिवजी, नारोजी, राजश्रीला म्हणतात की, आईसाहेबाचे विचारे कारभार करा. राजे परिछिन म्हणतात की, माझे कारभारी नाना खालते आहेत. त्यासिवाय मी कांहीं करीत नाही. याप्राो साफ नेटाने बोलतो व आम्हास प्रत्यह सांगून पाठवितो की, माझी गत अत:पर काय करता? खालता बंदोबस्त केला तर येथे नरम पडतील येसे सांगून पाठवितो. राजा आपले लगामासिवाय नाहीं. स्वामीची मात्र आज्ञा परिछिन्न यावी, म्हणजे इतक्याच सामानाने बाहेर बंदोबस्त करितो. गडकरियाकडेहि सुत्रे आहेतच. जसजसे पडेल तसतसे करतो. परंतु काही गडकरियास हमवार केले पाहिजे. मग जसजसे पडेल तसे करू. उगेच येथे मलमलित बसून काय? राजश्रीला सांगून पाठवितो की, चिंता करू नका. साहेबाचेच यावयाचे तलासांत आहो. त्याजवर सुखी राहतो. परंतु मागती काही होईनासे जाले म्हणजे घाबरा होतो. कसेहि असो, परंतु राजश्री आपला बरा. पुराणिकाचे, भिवजीचे पाया पडून कारभारात मिलावे. आईसाहेबाची मर्जी संपादावी. राजा हलका (पा) डवा हे तो सहसा करू नये. मग

काही तरी * * हे पुर्ते स्वामीनी मनन करून ल्याहावे. आम्ही तो येथे अत:पर थोडा थोडा बंदोबस्त करतो. मग काये होईल ते होऊ. असे करता गडकरी कसे हजारा दो हजारानसी चालून आले तर जुजतो. अधी तो गडकऱ्याच्याने येवतच नाही. पुरता दबाव स्वामीचा आहे. स्वाम का उपेक्षा करतात ? राजा स्वामीचे ठाई लक्ष धरतो. मी त्याचा याप्रो साफ आईसाहेबाजवल बोलतो. आणि त्याचा खालता यावयाचा विचार कसा न करावा ? याचे उतर पाठवावे, हे विनंती.

¶*Purandare writes that he is dealing firmly with Tarabai's armed resistance.*

---

*No. 142*] [*16-1-1751*

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबाचे सेवेसी विनंती. आज्ञाधारक महिपतराऊ कवडे दंडवत विनंती. येथील क्षेम तागाईत छ २८ सफर मुकाम नजीक रणाईचे परगणे डांगरी साहेबांच्या कृपावलोकनेकरून सेवक लोकांचे वर्तमान यथास्थित असे विशेष. दमाजी गायकवाड यानी केवळच शुध सांडिली. बहुता प्रकारे वलगना करून मुल्क लुटीत चालिला. साहेबांच्या प्रतापे पुढे यावयाचा संशय धरून माघारां चालिला होता; परंतु मागती काये मसलत केली न कले. फिरोन धुले कसबियाचा शिवार चारून नाश केला आणि तापी तीरी थालनेर परगणियात गेला. आता रोख चोपडे ब-हाणपुरावरी जावयाचा आहे. केवल फौजेच्या बलें त्याने अनीत आरंभिली. आम्हापाशी खासगत फौज व साहेबाची पथके मिलोन आडीच तीन हजार जमा जाले. परंतु ते फौज भारी, दाहा पंधरा हजार आहे व वरचेवरी देशीहून लोक येतात. वदंता लस्करात की राजश्री रघोजी भोसले व हे येक होऊन गंगातीरे येऊन पुढे देशास यावे यैसे वर्तमान हें बोलतात. साहेबांच्या प्रतापे आम्ही पिछ्यावर आहो. आणखी पाच हजार फौज सरस साहेब पाठवितात नामी तर हा फंद याच प्रांतीं विल्हेस लागतां. याजकरिता सविस्तर सेवेसी लिहिले असे. केवल सलुख जैसा राजश्री सेनापतीनी केला त्याप्रमाणे येथे वर्तणूक नाही. पुढे मनसवा बोलीत बहुतसा बोलतात त्या गोष्टी लिहिता पुरवत नाहींत. सूचनार्थ सेवेसी विज्ञापना लिहिली असे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Mahipatrao Kavde reports to the Peshwa the boastful movements of Damaji Gaikwad.*

No. 143] [18-1-1751

श्रीमंत तीर्थरुप राजमान्ये याविराजित
राजश्री स्वामी वडिलांचे शेवेसी.

राजश्री स्वामी वडिलांचे शेवेसी, अपत्यें चरणरज अंताजी विश्वंभर करद्वये जोडून चरणांवर मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार विनंती. विनवावया प्रार्थना कीं, तागायत माघ शुद्ध द्वितीयापावेतों मुक्काम तळेगांव कुशल असो. यानंतर प्रसंगींचें वर्तमान विक्रमसिंग हजारी पागा संगमनेरीहून संभर उत्तम घेऊन आला. शेनापतीचें सामान घर साहित्य हजारपावेतों जालें व लक्ष्मण जाधव सतरुसीस गेला आहे; वार्ता कीं, कांहीं द्रव्य आणावें कलले. पाहिजे. बाहेरुनहि कांहीं जमाव येणार हेहि वार्ता आहें. बाहेर निघणार हे सत्य आहे. आपणांपासी साहित्य एक चबकडा राहिला आहे. जासूद कांहीं मागें परतोन येत नाहींत. येथें मिलकत नाहीं यामुलें अनमान करितात. आपणहि पौर्णिमा जालियावर दिवस आठ जालिया-वर येणार. येथें देणेदार यानें श्रमी केले आहे. पौर्णिमा जालियावर वायेदा केला आहे. दिवसा उठोन यावे तर येऊं देणार नाहीं. यास्तव रात्रौ यावे लागेल. चरणांपासीं विनंती करून. त्यांचे त्यास पावतें करावें. रात्रौ शेनापति निघाला तर जासूद चार सात जोडिया होत्या; त्या पैकीं दोन जोडे राहिले आहे. एक जोडी खेडतळावरून कूच जालें तेव्हां एक पाठविल्या. बाकी चिखलीच्या तलावरून आले नाहींत. राहिले. उत्तम जीवदार चवकस मानूस राहत. आजी रोगी म्हातारे येतें ते हि राहिलीं. कलले पाहिजे. याप्रमाणें प्रसंगीं वर्तमान आहे. परंतु बाहेर निघोन कोठे जाणार हें कलत नाहीं. कितेक दिवस लागतील हे न कले. परंतु बाहेर निघतो हे तहकीक आहे. दुर्गाबाई लग्नास चिरंजीवांस घेऊन जाणार. उत्तम घोडे, उत्तम मानूस मागत होती. दिधले नाहीं. जीन, खोगीर, साहित्य गुप्त रुपें होत आहे. बारगीरहि एकांती मिलाले आहेत. निदानच्या समयास अजुरदार करून पाठवावे, तर तूर्त कांहीं अजुरा मागेल तर कोठून द्यावा? हिशोबहि चरणांपासी पाठविला. उत्तर कांहीं न आले. श्रीमंतांनीं (अपुरें).

¶*Antaji Vishvambhar gives news from Talegaon of Dabhade's movements and preparations.*

No. 144] [January 1751

श्री

राजश्री बालाजीपंत गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये श्नो महिपतराऊ कवडे दंडवत विनंती. उपरी, येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत असिले पाहिजे. यानंतरी तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान कलो आले. त्यास आम्ही खानदेस प्रांते जप्तीचे कामाकरिता गेलो होतो त्यास तिकडे गाईकवाड आला. राजश्री बापूजी बार्जाराऊ फौजसुधा तिकडे आले आणि गाईकवाडाचे आमचे युद्ध-प्रसंग जाहाला. तो सातारेयाकडे तलेगावपावेतो आला आहे. त्याजमागे फौजसुधा आलो आहो. देसी धामधूम बहुत मांडिली आहे ऐसे वर्तमान आहे. तुम्ही लिहिले कीं आम्हास काये ते उत्तर पाठवणे. ऐसियासी हे चाकरीपुढे आम्हास काही सुचत नाही. तुम्हास जैसे कलेल ते करणे. आम्ही स्वामी कार्यावरी गुंतलो. हे चाकरी धणियाची आधी करणे लागते. खानदेशचे काम टाकून खावंदाच्या आज्ञेवरून याजसमागमे आहो. निरोप देत नाहीत. सर्व मामलती तैश्याच राहिल्या. बहुत काये लिहिणे, लोभ असो दिजे हे विनंती.

सेवक अंबाजी देवाजी सां नमस्कार. लिा परिसीजे हे विनंती.

¶*Mahipatrao Kavade writes about his pursuit of Damaji Gaikwad.*

---

No. 145] [26-1-1751

श्रीशंकर

श्रीमंत माहाराज राजश्री नानासाहेब
साहेबाचे सेवेसी.

ॐ अज्ञाधारक भिकाजी नाईक वांकडे दरजागा कमलालये कुर्निशात विनंती. उपरी, येथील कुशल ताा छ ९ रबिलावल जाणून महाराजाचे कृपेकडोन येथास्थित असे विशेश. आज्ञाप्रमाणे बातमीचे वर्तमान तरी नवाबाचे जासूद भागानगरीहून राजश्री माहाराव जसवंत निंबाळकर यासी इनायेतनामे छ २७ सफरी कमलालयासी घेऊन आले. त्यास छ १ रबिलावलीं प्रतिउतर देऊन रवाणा केले. इनायेतनामे राााचे नांवें व राा माहादाजीबाबा व पुत्राचे नांवे व डौलामियाचे लेकाचे नांव पत्रें आलीं. माार जे आपण डेरे दाखल जालों. तुम्हीआपले बफौजनसी येऊन दाखल होणे. छ २७ सफरीं राा राजे विठलदास यांची सून सासूबाई व त्यांचे नातु दादोराव व पुतन्या संगमनेरीहून शाहर हैदराबादेस जावयासी आले. त्यां-

समागमे पंचवीस स्वार व गाडदी पंनास वगैरे उंट कारखानियाचे चालीस होते. तेथे ·रोानी दोन रोज ठेऊन त्याची मेजवानी वस्त्रेंपांघुरणे करून समागमें आपले स्वार ५० देऊन वाटे लाविले. छ १ रबिलावलीं मंगळवारी स्वार होऊन गेली. त्यानंतर छ ९ रबिलोवलीं राा समुदायेयुक्त श्रीदेवीचे उछवाकरितां देवीपासी डेरे देऊन राहिले. चर्चा की उछाव जाल्यानंतर येवनाकडे जावयाची वार्ता आहे. यावरी पाहावें. सेवेसी माहाराजांचे श्रुत व्हावे. विशेष काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*Bhikaji Naik Vakade informs the Peshwa that the Nizam has issued instructions to Nimbalker and other Sardars asking them to join forces with him in his march towards the Peshwa.*

---

*No. 146*] [*1-2-1751*

छ २० रालौवल.

**श्री**

**पुा तीर्थरूप राजश्री नाना व राजश्री**
**भाऊ स्वामीचे शेवेसी**

विनंती. उपरी, काल छ १६ रात्रलीं किल्यावरून तोफा गोले घालून आमच्या, गोविंदरायांच्या व गोपालरायांच्या वाडियावर लागू केल्या. दाहापांच मारल्या. येक गोला गोविंदरायांच्या वाडियावर पडला. येक हैबती सोनाराच्या घरावरी पडला. येक गोला गोविंदरायाजीच्या वाडियावरी पडला. आमच्या वाडियावरी चालीपंनास धोंडे ढकलले, परंतु वाडियावर लागू जाहालें नाहींत. आज येवतेश्वरास हजार हशमीं लोक आले. सेवेसी श्रुत होये, हे विज्ञाप्ति.

¶*Letter from Satara to Poona, announcing that the guns of the fort have opened fire upon some houses in the town.*

---

*No. 147*] [*3-2-1751*

पौ छ २० रबिलोवल.

**श्री.**

**तीर्थरूप राजश्री नाना व ताा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी.**

अपत्यें त्रिंबक सदाशिव कृतानेंक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा छ १७ रबिलोवल रविवार प्रात:कालपावतो यथास्तित असे विशेष. दादोबा येथें मंगलवारी वर्ते आले. त्या दिवसापासून येथील दिनचर्येचे वर्तमान

रोजचे रोजचे सुतरस्वाराबाो व डांकेबाो व रिकिबदाराबेाा सारे लेहून पाठविले आहे त्याजवरून सर्व अर्थ ध्यानांत येऊन उतरे पाठवावयाची आज्ञा करावी; परंतु अतःपर येथें काही बाकी राहिली नाहीं. मग उगेच सुचले ते सेवेसी लिहितो—

येक प्रकार असा आहे कीं आईसाहेब खावंद. राज्य त्यांचे. आपण चाकर लोक. खावंदासी अभिमान कुरा कश्यास करावा ? खातरेस मानेल त्यास मोडूत व खातरेस मानेल त्यास उभे करोत. दादोबा उभा करोत. हा प्रतिनिधी गोपाळराऊ योजूनात कां ? जी आईसाहेब करतील त्यास अनुमोदन द्यावे, दिल्हे ते खावे, सुखरूप असावे, अभिमान धरू नये. मग तीं कांहीतरी करोत. आपण इतके खोलींत पडू नये. हाहि येक प्रकार पडमरूपणाचा थोडासा आहे.

दुसरा प्रकार, हे राजश्री आईसाहेबानी दाखविले ख़रे. परंतु त्याचे लक्ष स्वामीचे ठाई. मग कसा तरी वेडा वाकडा असो. आईसाहेबी दादोबाचे पारपत्य गतवर्षीपासून करावे हे सांगत होती. ती * * * संभाजी राज्यास आणून हे (राजश्री) हे दादो * * * * * साहेब काय काय * * * ती ते अगदीं विसरून दादोबा अ * * करून स्वामीसी विरूध वाढविले. दादोबाला शत्रु येक स्वाम व दादोबाहि शत्रु स्वामीचा. तेव्हा आईसाहेबाची इमानाची शीमा जाहाली. आता राजा तुमचा तुमचा म्हणतो यास्तव दोन महिने लागोत चार महिने लागोत. आटा बंद करून चौक्या बसवाव्याच. जोर पोहचाऊन राजा खालीं आणावाच. आईस हमवार करावी. दादोबा मागती ठीक ठेवावे. हाच तह करावा. दुसरे करू नयेच. हा येक प्रकार कुरूपाचा व केले सेवटास न्यावयाचा व आपले करावयाचा आहे. त्यात कोणता उत्तम ?

तिसरा प्रकार असा आहे कीं मातुश्री काय करतील ते करोत, आपण आपले मुलकात राहावे, जबरदस्त

चवथा प्रकार असा आहे कीं, शाहू माहाराज मरतेवेलेस काय काय बोलले होते ? सखवारबाई बोलली कीं या राज्याचा खावंद संभाजी राजा. हे नव उभे केले आहे हे खूळ आहे. संभाजी राज्याचा चाकर म्हणवील तो इमानी. त्याचे बरे होईल. या खुळाला हाती धरून बसवील, ही गादी ह्या धन्याची त्यास देईल, त्यास बरें होणार नाहीं, हे साफ सती निघतेवेलेस बोलली. स्वामीसहि स्मरण असेलच. त्यास सखवारबाई राजा शाहू ईश्वररूप व स्वामीचे ठाई दुसरा भाव त्यांचा कदापि नवता.

परंतु ते वेलेस स्वामीला चौघानी भर देऊन त्याचे यैकू नये असे करून हे खूल उभे केले. बरे इतकेहि करून स्वामीनी जे जे केले त्याचे फल या झाडास येरंड्याचे फळें आली. म्हाता-रीने इमान सोडून पाठी लागली. बाकी ठेविली नाही. राजाहि होय न होय ह्या गोष्टी फुटल्या. अत:पर बाकी कोणती. अता जे असेल ते असो. संभाजी राजा आणावा. शाहू माहाराजाचे गादीवर बसवावा. सारे खुशालहि होतील डागहि * * * * नाही. मग आईसाहेब वर्ती काय करतील ते पाहतो. यात फार गोष्टी आहेत. संभाजी राजे आणले तर मग कुणाच्याने काही होत नाहीं. सुखरूप खालीं असावे. मग कोण-कोण आईसाहेबाचे समंतात मिळतील ते कलतच आहे. सखवारबाई जीतसती आपली खावंद आई. तिने सांगितले ते केले. काही बेमानी नाही. बरेच होईल. म्हातारी बेमान. अवक्रिया केली तिचे फल तीस जाहाले. व स्वामीनेहि हे कर्म सखवारबाई राजा याचे न यैकले. ते वेळेच्या गोष्टीचे स्मरण स्वामीस असेल; कसकसे लोकानी चढ दिल्हा त्याचे फल हे स्वामीस जाहाले. कसे तर इतके स्वामीनी केले. त्याचा सेवट हा जाहाला. आपले आपल्या-संच प्रतिबंधक जाहले. तेव्हा असे जाणावे की आपल्या खावंदाचे आज्ञेप्रा असावे, याचे यैकू नये दरमाहा देऊ नये. तुलाजी आंगऱ्यासारख चाकर व्हावे. आपण घाटाखाली याचे माणूस येऊ देऊ नये. आपण वर्ते येऊ नये. उगेच नावास चाकर मात्र म्हणा(वे) मगहि इकडे * * (पाहिजे) ते करोत. मग जर यानी जोर करून बलावत चालली तर वर्षामहिन्या संकट पडेल. याचे प्रकार फार आहेत. स्वामीचे ध्यानांत येतीलच. परंतु आपण जबरदस्तीने आपले मुलकांत असावे. हमेश सावधच असावे. हाहि प्रकार येक तुंदपणाचा आहे.

येथें जबरदस्तीने करावे असे असेल तर इतके प्रकार केले पाहिजेत. पुन्हा येमाजीस धरावे. मोठ्या गडावर ठेवावे. कासेगाव नाझरे येथे हजार फौज ठेवावी. नाझऱ्याचा काशे-गावचा मुलूख लुटावा. गमाजी जागचे जागाच ठेवावे. बाहेर खुले पोल यास उदाजी करून हमवार करवावे. येथे दोन हजार हशम व हजार फौज आणखी पाठवावी म्हणजे इतक्याच सामानावर मावल्याची खबर घेऊन येथे चौग * * * * बसऊन महिन्या पंधरा दिवसात बोलावितो. दादोबाचे तिकडील बल मोडत चालले. मग येथे निर्माल्यच जाणावा. गडक-ऱ्यांची मुलेमाणसे धरावी. जबर-दस्तीने राहावे. मग होणे ते होईल. परंतु दादोबाची गुंज सारी तिकडील

न येकले, ते वेलेस आणखी बुध्य धरली, त्याचेच हें फल येते हे पुर्ते समजावे. आता बाकी कोणती राहिली. मातुश्रीने इमान कोणता धरला? जोवर त्याचे इमान तोवर आपलाहि दुसरा विचार नवता. आता त्यानीच इमान सोडून आपले पाठी लागली. दुसरा मनसबाच त्याचा नाही. मग आपले इमान काय ठेऊन? आपल्याकडे काही नाही.

मोडली पाहिजे. जिकडे मावले जमा जाहाले आहेत तिकडे हजार पाचशे बरकंदाज मावले आपल्या कडील घालावे. रोज उठवण्या आणावे म्हणजे या मावल्याचे उडाण फुटेल. संशय नाही. मग हा किला व आईसाहेब आम्ही पाहून घेतोच आहों. हा प्रकार लौकर केला तरीच उतम. मुरारजीस-हि लिहिणे ते ल्याहावे. बातमी ठेवावी.

आणखी येक प्रकार. म्हातारी पुरी कपटी. संभाजी राजाकडे सूत्रे खेलतच आहे. पाहील, पाहील आणि ह्या राजश्रीस ठिकाणी पुर्ती ठेवील. संभाजी राज्यास आणील. मग ही आपल्यास जड जाईल. एविसीचे धरबंदास अलस असला न पाहिजे. मग हेंहि गमावले, तेहि गेले. दादोबा मातोश्री येक, संभाजी राजे दादोबा येकच आहेत. किल्यावर संभाजी राजे आले, मग सारी येक, आपणच निराळे असे होईल. त्यास आपलें सूत्र आपण करून करावे. हा येक प्रकार आहे. परंतु इतकेहि केले पाहिजे.

जे सुचले ते लिहिले आह. या पर्यायाखेरीज दुसरा प्रकार नाहींसाच वाटतो. स्वामीनी कोणता प्रकार उचित तो ल्याहावा त्या प्रमाणे करू. वरकड येथील मराठे सोयरेधायरे व किरकोल याचे द्वामुघान सारीच आहेत. ज * * * वानी आणखी जाहाली तर येथे करावयाचे अगाध नाहीं. कासेगावा-कडे गमाजी बलावत चालले. येथे आणिक सामान येईनासे जाहाले, तर मग येथे जड पडेल. आणखी येक मनसबा आहे, कसा कीं, स्वाम मातबर शहास गुंतले तोच मनसबा करावा. येथें इतक्या खटपटीत तूर्त न पडावे असे असले

तर मग आमचे राहणे येथे कामाचे नाही. तिकडे बोलवावे. येथे च्यार माणसे मात्र ठेवावी. मग काही तरी होऊ. उत्तर लौकर पाठवा हे विनंती.

¶*This important document will be very helpful in determining the situation that developed at Satara on the death of Shahu, owing to the intrigues of the Peshwa on the one hand and of Tarabai on the other. The struggle for succession between the various parties and the subsequent stability of the situation are points which have not yet been clearly set down in history owing to lack of sufficient information. This document summarises the main points and discusses the various pros and cons which will clear the situation to a great extent. Gopalrao mentioned in the first paragraph appears to be Khandekar who was for long managing the affairs of the Pratinidhi.*

---

*No. 148*] [*7-2-1751*

## श्रीशंकर

सेवेसी विनंती. आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती प्रार्थना येसिजे. येथील क्षेम ता। छ १९ माहे रबिलोवल मुकाम कारंजे लाडाचे जाणून साहेबांचे कृपाआवलोकनेकरून येथास्थित आसो विशेष. राजश्री रघोजीबावास पत्र कासिदाबा।र पत्र पाठविले. त्या पत्री लिहिले कीं पुढे महत्कार्ये योजून आले आहे त्या अविलंबेकरून सत्वर यावे आणि मागाहून रा। लंबोदर धुंडिराज तेहि रवाना केले आहित तेहि तेथे येतील. ते पत्र पावलियानंतर या प्रांतीची कितेक कामे होती ती. जे महकुफ करावयाची ते केली आणि सध्य करावयाची तें त्वरेणे करून कूचदरकूच वराडातून नांदेडच्या रोखे येतात आणि साहेबी लिहिले होते कीं आपण शाहगडाच्या रोखे येतो तुम्ही त्वरेणे येणे. त्यासी हे येथून सोलापूरपावेतो जातात. तेथे कुल माहालोमाहालचे जमीदार व मोगलाकडील आमील येणार आहे. हा लातूरकर भुरामिया व आकोलेकर तमाम येणार आहेत. त्याचा बंदोबस्त करून राजश्री कृष्णाजी गोविंद वराडचे सुभेदार त्यास सोपून वासिमावरून नांदेडाकड येतात. त्यासी राजश्री लंबोधरपंत आज आस्तमानी येऊन दाखल जाले. त्यासी साहेबाची पत्रे राजश्री बावास होती ती दाखविली आणि बोलले कीं आपण सिध आहेत. आम्ही चाकर लोक आम्हास काही उजूर नाही. या चौपांचा दिवसात इकडील कार्यभाग संपादून सत्वरच चालतो. त्यासी काल छ १८ आठरावे रोजी मातुश्री आईसाहेबाकडील हतरोखा व हुजरे दोघेजन आले. त्यापत्री परिश्चिन लिहिले कीं आपण तुम्हास दोनच्यार पत्रे लिहिले त्यास तुम्ही हा कालपरियेंत नाही तर पत्रदरशनी फौजेसहवर्तमान सत्वर येणे. त्यासी ते पत्र आम्हास दाविले आणि बोललें कीं आपला प्राणहि गेला तर

आपण तिकड जात नाही. जेव्हां पेशवियांची आज्ञा होईल ते समई जाऊ. नाहीतर आपण काही दुसरे जाणत नाही. मग यामुळे आपले वाईट व्हो अथवा बरे हो. आणि साहेबांची पत्रे वरचेवर येतात. त्याजवरून बहुतसे उतावलीने कामकाज करीतात कीं जलदीने जावे व रा लंबोदरपंतास राजश्री बावानी पुसले कीं आम्ही तर ज्याप्रो राजश्रीची पूर्वी नि:कपट चाकरी केली त्याप्रो रा पेशवियांची करूं. मग आम्हास जेवायासी देत अथवा न देत. ज्याप्रो मोगलापासून आपल्या मुलुकाचा बंदोबस्त करून घेतील त्याप्रो आमचा करावा आणि पेशवियानी बसून तमाशा पाहवा.

*¶Vyankatrao Moreshwar assures the Peshwa of the support of Raghuji Bhonsle. Bhonsle he adds, though repeatedly solicited by Tarabai to hurry up to her assistance, has turned a deaf ear to her entreaties and will stand by the Peshwa through thick and thin.*

---

*No. 149]* *[10-2-1751*

श्री

आज्ञाधारक आनंदराव गिरिधर त्रिकाली साष्टांग नमस्कार विज्ञापना. छ २४ रबिलावलपावेतो खावंदाचे कृपाकटाक्षें करविरीं सेवक क्षेमरूप असे विशेष. इकडील वर्तमान मुख्य करविरी मोकामी आहेत. रा विसाजीपंत व केशवराव या उभयतांची रवानगी मुद्याप्रमाणें करारमदार करोन उभयेतां येथून गेल्यावर मुख्य खुषवख्त आहेत. येथून तह जालाचे सविस्तर विसाजीपंत व केशवरायांनी सेवेस निवेदन केला असेल. राजश्री नारायेणराव घोरपडे व मानाजी पायगुडे वाडीहून मागारे येऊन चिकोडीकरावर शाह देऊन अठा कोसाच्या मफासल्याने राहिले होते. यमाजीपंताने लस्करास येऊन बहिरववाडी घोरपड्यांचा पुरातन गांव यास देऊन रिफाकतेस पांचसे प्यादा व दोनसे राऊत बराबर विरपंणा व अंबंणास देऊन लस्कर दडीपलीकडे आपल्या सरहदेपार करून बेळगांवानजीक दोन कोस लस्कराचा मोकाम करविला आहे. कितूर व सोधें व सवणूर वगैरे प्रांतात जाणार. कोपळचा किलाचे सनदा जाल्या आहेत. जोरतलबी[1] जागा. तैसेच त्या प्रांतासहि जाणारसे ऐकितों. राा मुरारराव घोरपडा सोंध्यास येणार आहेसी खबर आहे. राजश्री नारायणरायांसही कागद लिहिले होते की उभयेतां सामील होऊन सोंधे बिदनूरची खंडणी घ्यावी यैसा मतलब लिहिला आहे. परंतु चिकोडीकर सामील आहेत याकरितां मुराररायास तिरस्कार देसकाचा आहे. चिकोडीकरास तंबी द्यावी याकरितां मनसवा. नारायणरावजीच्या सामना न व्हावें ऐसेही येथें

---

१ जोरतलबी = मग्रूर; पुण्ड.

वर्तमान आहे. आजऱ्याचा जिल्यांतील खेडे महाकाव म्हणून ठाणे घेतले. बेळगावचा किल्याचे अनुसंधान ठाणे घ्यावयाचे लस्करास आले आहे याकरितां गेले म्हणूनहि येथें वर्तमान आहे. किला बेवारीस सिबंधी खाले किलेदार बेजार जाला आहे कांही द्रव्य घेऊन किला द्यावा हे तहकीक आहे. परंतु चिकोडीकराचा फितवा आहे. किला जबरदस्तास लागल्यानें आपणांस उपसर्ग होईल म्हणून येमाजीपंत किलेदारास सांगू पाठवितो कीं लागेल ते द्रव्य आम्ही पुरवितों तुम्ही किला न देणे, वेढा दिल्यानें झुजणे ऐसे फितूर करतों. किलेदार हुकेरीच्या ठाणे करिता चिकोडीची निसबत किलेदारास जरूर लागली आहे. या प्रसंगी महिना पंधरा दिवस मोर्चे चालविल्यानें किला येईल. दुसरे वर्तमान मातुश्री ताराबाई-कडील च्यार जोड्या जासूद व राघोपंत नामें कारकून येथें गुप्तरूपें बातनीस राहिले आहेत. कारकूनास पुरसीस केल्यानें म्हणतो कीं रा। धाकटे नानानीं येथे पाठविलें आहे. जासूदाचा षोध केला जे सरकारचे नाईकीतले नव्हेत. जासूद म्हणताहेत की आम्ही ताराबाईकडील; धाकटे नानानी च्यार जोड्या मागून घेऊन बातनीस येथें पाठविलें आहे. कारकूनहि याचप्रमाणे बोलताहेत. मतलब कांही कळत नांही. याखेरीज ताराबाईकडील; हुजरे कागदपत्र घेऊन वरच्यावर मुल्यास पोहोचाऊन जाब घेऊन जात असतात. रा। दादोबा व अंताजी सिवदेव याकडील संदर्भहि लागला आहे म्हणोन वर्तमान आहे. ताराबाईनीं लिहिलें आहे कीं राजेश्रीस कैद करोन ठेविले आहे; तुम्ही येणे. सरश्रें तुम्हांस जुपून(?) आपण निखालस राहूं तुमचे राज्य तुम्ही पाहून घेणे, ऐसे निश्चयरूप पत्रे आली आहेत. यास मात्र धीर नाहीं. अविश्वास याच्या पदरीं आहे, याकरितां संदर्भ घेऊन आज उदियां पाहूं म्हणतात, ऐसा मनसबा जालाची मूस[1] फुटली आहे. निश्चयेरूप वर्तमान वाडियांती(ल) बाहेर निघत नाहीं. दादोबाकडील संदर्भ विशेष दिसतो. नवलगुंददाचा देसाई जायपा सिदगिरीस देवास आला होता त्यास भेटीस बोलाऊन गावांत जागा देऊन ठेऊन घेतले आहे. पांचशे प्यादा व पंनास राऊत आहेत. येऊन आठ दिवस जाले अद्यापि निरोप नाहीं. कोणत्या मतलबास जमाव ठेऊन घेतला आहे की नकळे. देसकानें निरोप मागितल्यानें आज उदिया म्हणोन अटकाविले आहे. तिसरा मजकूर बर्त।सिराळेकर देशमुख देसपांडेचा मतलब आहे कीं सिराळ्याची जागीर एसाजी भोसल्याच्या मुलास चालणार की नाहीं; यास्तव ठाणे श्रीमंतास व्हावे म्हणजे नांदणूक सूखरूप होईल. सांप्रत थोराताचा गरगषा लागला आहे. ठाणे यास जिरणारही नाहीं. श्रीमंताच्या हातरोख्यावर ठाणे श्रीमंतास द्यावें ऐसा मतलब अढळणेंत आला आहे. थोडे

---

१ मूस = बातमी.

बहुत राऊत आज्ञापत्र देशमुख देसपांड्यास आल्याने ठाणे देतील ऐसे त्याच्या निसबतच्या लोकाच्या मुखें ऐकितों. सेवकाचें वर्तमान सेवक येथें बातनीस राहील, या करतां मुख्यास समाधान नाहीं. दर्शनास येतो म्हणून सांगू पाठविल्यानें उद्यां परवां म्हणोन मोघम सांगू पाठवितात. राजश्री केशवरायापासी मुख्यानीं आज्ञा केली की आपणास बातनीचें काम नाहीं ऐसा कितेक उश्रामा[1] सेवकाचा केला. येथे महागाई, खर्चासहि पुरत नाहीं. राजमरा येऊन साडेतीन महिने जाले सेवकास येऊन तेरा महिने जाले. घोडे व माणूस ब्राम्हण रोज रुपया खर्चास लागतो. अज तागाईत दोनसे रुपये कर्ज जाले पुढें कर्जेही मिळत नाहीं. सनगेही नाहींत. घरची बेगमी यंदा कांहीच न जाली. खावंदानी घराऊ म्हणोन मागें रुपये ५० पंनास पाठविले ते येथें कर्जास गेले. जासूदजोड्याहि टिकत नाहीं. त्यासहि रोजमरा होऊन च्यार महिने जाले. पोटास नाही या करितां दोन जोडा आल्या आहेत. मागें दोन जोड्या विनंतीपत्र घेऊन सेवेस गेल्या त्या दोन महिने जाले. अद्याप फिरल्या नाही. सेवकापासीं जासूद नाहीसे जाले. खावंद अन्नदाते मायबाप जाणून एकनिष्ठेनेंचा करितो. जाले वर्तमान सेवकानें आपला अहवाल पायास जाहीर केला आहे. येथें खर्चास कर्जहि मिळत नाहीं. निवेदन जाले पाहिजे. ऐकिले वर्तमान सेवेस लिहिलें आहे. श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Anandrao Giridhar to the Peshwa writing about the affair of Chikodi in which Ghorpade, Paygude and Sambhaji of Kolhapur were concerned and also of the affair of the Deshpandes of Shirale. The writer also speaks of the communication received by Sambhaji from Tarabai requesting him to visit Satara and take over the administration, Ramraja having been imprisoned by her.*

---

*No. 150*] [*14-2-1751*

**श्री**

**राजश्री बालाजीपंत प्रधान**
**गोसांवी यासी**

॥ सकलगुणालकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिले पाहिजे विशेष :—गोसांवी यांनी पत्र पाठविले तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला. पा खंदार येथें घांसदाणियाचा उपसर्ग न द्यावा म्हणोन लिहिले. ऐशियास गोसांवी यांचा निरोप घेऊन येतेसमई समक्ष बोलणे त बोलिलेंच आहो. त्यामध्यें अंतराय जाला नाहीं. जीवनमाफिक जें घेणे तें

१ उश्रामा केला = टोमणा दिला.

घेतलें. गोसांवी यांस विदित व्हावें याजकरितां लिहिलें असे. वरकड अर्थ राजश्री व्यंकटराव मोरेस्वर लिहितील त्यावरून कळों येईल. रा छ २८ माहे रबिलावल सुंज्ञाप्रति विशेस काये लिहिणे. कृपा लोभ आसू दिला पाहिजे हे विनंती.

[ शिक्का रघोजीचा. ]

मोर्तब
सुद.

¶*Raghuji Bhonsle writes to the Peshwa that not much ghasdana was levied on Khandar.*

---

*No. 151*] [*15-2-1751*

## श्रीशंकर

व्यंकोबा

सेवेसी विनती. आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर. कृतानेक सा। नमस्कार विनंती प्रार्थना यैसी जे. येथील क्षेम ता। छ २९ माहे रबिलावल शुक्रवार मुकाम आकोले साहेबांचे कृपेकरून येथास्तित आसो विशष. येथील वर्तमान तर साहेबाची पत्रे साडणीश्वाराबा।र जे राजश्री रघोजीबावा सेनासाहेबसुभा यासी पाठविली व राजश्री लंबोदर धुंडिराजला पत्र लिहिले होते, त्या पत्रावर दाखला टाकला होता. त्यास ते दोन पत्रे राजश्री बावानी वाचून पाहिली. त्याजवरून बहुत संतोश पावले. त्या पत्रांत कितेक मजकूर लिहिला त्याचा बयाज वरचेवर करीत गेले. आईसाहेबांचा मजकूर तों जो साहेबी लिहिला तो याणीहि सांगितला. येथें तमाम सरदार जे आहेत तितकियांसी पत्रे आली आहेत. भिवजी कासवटे यांच्या मारफतीची राजश्री त्रिंबकजी भोसले व राजश्री पिराजीनाईक निंबालकर व आनंदराव वाघ व आणिक कितेक सरदार कराडे वगैरे तमाम फोडाफोडी माडिली आणि पत्र लिहितात की, तुम्ही राजश्री रघोजीबावा येतील त्यांजबा। तुम्ही येणे, आगर त्याजला पेशवियाचे आगत्य आहे ते न आले तर तुम्ही उठोन येणे. तुमचं ऊर्जित केले जाईल. तर तुम्ही सत्वर येणे म्हणून पत्रे आली आहेत. त्याजवरून राजश्री बावानी आनंदराव वाघ यांस कबिले नागपुरास वाटे लावले त्याजसमागमे वावास रवाना केले. व पिराजी नाईक निंबालकर हे रुसून बसले होते कीं, आम्हास आज्ञा देणे. त्यासी त्याची समजाविसी हर तजविजीने करून ठेवले. व राजश्री रघोजी भोसले यांसीहि पत्र आले आहे. त्यासी रघोजीबानी यैसी खबरदारी केली कीं, कोन्ही जुंमस[१] खाऊ सकत नाही. येणेप्रों बंदोबस्त

---

१ भीति.

केला आहे. व साहेबी दाभाडियाकडील उलेख लिहिला. त्यासी आज तागाईत त्याजकडील काही पैगाम या कागदपत्रीहि आले नाही. आणि यांच्या चितांत काही दुसरा आर्थ नाही व याणी परिश्चिन सांगितले की, आपल्या चितांत काही विकल्प आसल तर आपणास राजश्री कैलासवासीचा शपत आसे व श्री ची शपत आसे. मग यामुले श्रीमंताचे बरे ते आमचे बरे, त्यांचे वाईट तेच आमचे वाईट, याप्रो शपतपूर्वक गोष्टी सांगितल्या. त्यासी येथे काही गुंता राहिला नाही. मजल दरमजल साहेबाकड येतात. याजविसी कोन्हे गोष्टीचा द्वइताचा विचार न आणिला पाहिजे. हे साहेबखेरीज तिलतुल्य नाहीत. जे पहिले भा(षण) केले होते तेच आहे. त्याजमध्य आंतर नाही व राजश्री त्रिबकजी भोसले याणी फारसा रुसून गोष्ट सांगितली की, फुकाचे आम्हास पत्रहि लिहिले नाही. त्यासी स्वामीनी त्यासी पत्र लिहित जावे, म्हणजे त्यांचे समाधान होत जाईल. ते साहेबांच्या सेवेत येकनिष्ट आहेत. हे विज्ञापना.

¶*Vyankatrao Moreshwar gives to the Peshwa some idea as to how Tarabai was trying to win over Raghuji and other Sardars to her side. Raghuji however—he further writes—is quite firm in his assurance to the Peshwa to stand by him.*

---

*No. 152*] [*15-2-1751*

छ ३ रमजान.

## श्री भवानी प्रसन्न.

सेवेसी विज्ञापना ताा छ रमजानपावेतों स्वामीचे कृपेकडून वर्तमान येथास्थित असें विशेश. सातारियाकडील दिनचर्येचे वर्तमान तरी बऱ्हानजी मोहिते मध्यस्तीस पडलें आहेत. को * * * पाटणकर, बाबूराव भोसले, येसाजी देवकाते सारें बऱ्हानजी बावाकडे येउन खलबते (करतात). बाबाजी जाधव येकटे मात्र उरले त्या * * * ते मऱ्हाटे देखील इकडेच मिलालें आहेत. परदेसी मात्र दाहा वीस आहेत. आईसाहेबाजवल वीस पंचवीस माणूस इतके मात्र उरले आहे. येक दिवस पाणी बंद केले होतें. मग सांगून पाठविलें जे आम्ही पाण्याविणें मरावे कीं कायें? तेव्हा पाणी सोडिले. दुसरा मजकूर आईसाहेब राजा नव्हे म्हणतांत. याजमुले बऱ्हानजी मोहिते फिरले आहेत. राज्य बुडते. सारें मऱ्हाटे आसतां यैसा प्रसंग होतो म्हणून सर्वास सांगून पाठविलें. त्याजवरून दोन तीनसे मऱ्हाटे जाऊन बऱ्हानजीबावाच्या घरी बसतात. आजी उद्या बऱ्हानजीबावा मोहिते जाऊन आईसाहेबाजवल जाऊन

अतिशये करणार जें आमच्या पोरी तुम्ही दिल्ह्या आणि आता राजा नव्हे म्हणता! तेव्हा आम्हास सारें मन्हाठ्यास मारून टाकणे; नाहीतर पोरी मारून टाकणे, यैसा अतिशये करणार. भोवत्या चौक्या बसल्या आहेत. दाणापाणी बंद जाले आहें. बाकी काही राहिली नाही. बन्हानजीबावा आजी उद्या निकर्स करणार. बाबाजी जाधव न यैके तर त्यास मारावें यैसा विचार जाला आहें म्हणून बातमीचे वर्तमान आले तें स्वामीस विदित व्हावें म्हणून सेविस्तर सेवेसी लिहिले आसें. ऐकिलें वर्तमान लिहिले असें. पुढें होईल वर्तमान ते सेवेसी लिहिले जाईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*A news-letter from Satara to the Peshwa reporting how Barhanji Mohite grew desperate on Tarabai's refusal to give the powers of kingship to Ramraja and how he wanted to decide the issue once for all.*

---

*No. 153*] [*16-2-1751*

छ १४ रालाखर.

श्री

आज्ञाधारक आनंदराव गिरिधर त्रिकाली साष्टांग नमस्कार. विज्ञापना जे. छ ३० रबिलावलपावेतो करवीरी सेवक क्षेमरूप असे विशेष. काल सेवकास दरबारास बोलाऊन रा विसाजीपंताचे पत्रें बहुत सेवकास निकडीने मागितली. यैसियास पत्रें विसाजीपंतास इचलकरंजास रवाना केली म्हणोन बाहना सांगितला. उपरांतिक इचलकरंजास माणूस पाठवित होतें. परिछिन विनंती केली कीं पत्रें फाडून पुरेजे केलें परंतु पत्रें न दिल्ही. बजिनस पत्रें मातुश्री ताराबाईकडें पाठवावी. साा मजकूर अढलला यास्तव दस्तावेज न दिल्हा. अद्यापि मुख्यानी पत्रासाठी निकड लाविली आहे. ताराबाईकडील व दादोबा व अंताजी सिवदेव याजकडोन राजकारण भारी लागले आहे. यासहि माया लागली आहे. यानी रदबदल टाकिली जे रामराजास मारावे म्हणजे आपण येतों. यैसियास मातुश्रीनी करार रामराजास मारावयाचा केला आहे. वर्तमान येतांच येथून आद्रष्यरूपें सतरिसीस जाणार. ताराबाईकडील व दादोबाकडील सिंद्याच्या व भीमराव याजकडोन विशालगडचे राजकारण लागलें आहे. आजकालचा मजकूर विपरीतसा अढलला. इकडील अगदी गड किलें व मनसबा श्रीमंताकडेस लागला म्हणोन हर इलाजें यास फांसी पाडायाचा मजकूर मातुश्री केला आहे. आजउदियाच जाणार असेंहि यैकतों. आठा दिवसाची अवध आहे असेंहि यैकतों. निश्चये कळत नाही. समक्ष सेवकास बोलताहेत की श्रीमंताची ममता

लागल्यावर दुसरें राजकारण करोन काये नफा? तुम्हासहि आढलतें, असें भाषण करितात. श्रीमंत दूर प्रांतास गेले, अस्यामधें यास फासी पाडावें म्हणोन पुरता मनसबा केला आहे. रामराजास मारावयासहि चुकणार नाही. मारावयाचा करार करोन आजी उदिया बोलावणार. या उभयेतासहि ठिकाणी ठेऊन यावत जीवपावतों मातुश्री राज्य करणार. आपणा मागे काही हो सा अर्थ योजिला आहे. श्रीमंताकडे याकर्डाल मनसबा लागलाचें दुख मातुश्रीस जाले आहे. याच्याहि चिताने होर्षा[१] खादला आहे. आठा पंधरा दिवसांत श्रीमंताचे आगमन जाल्यानें अजवर केला मनसबा हातास लागतो. नाही तर मुख्य सतरसीस जाणार जाणार जाणार. आढलेले वर्तमान जिव्हाल्याचें विदित केलें आहे. याचां विश्वास येकंदर नाही. घडीस येक मनसबा करतात. घटके घटकेचे बोलणे विपरीत आढलते. याच्या बुधीस आयुष्य नाही. पत्र बजिनस ताराबाईकडे पाठवणेचा सिधांत केला होता परंतु पत्र त्याच्या हातास न गेलें. सांडश्वार परभारे वाडियांत जाऊन मुख्यास पत्रे दिल्ही. यावर सेवकास बोलाऊन लाखोटा न फोडता स्वाधीन केली. पत्राचे पारायेण करोन सेवकाच्या स्वाधीन केल्यावर मागती हा मनसबा केला. हरयेक पत्रें परभारे मुख्याच्या हस्तगत न व्हावीसी ताकीद जासुदास जाली पाहिजे. याचा प्रसंग बहुत विपर्यास आहे. समक्ष बोलण्यात काहीच अंतर दिसत नाही. कर्तुत्व अलाहिदेंच आहे. सतरसीस जाणेचें सिधांतसे ऐकतों. यावर खावंद अभिज्ञ सागर. येथील विचार आढलला तो सेवेस निवेदन केला आहे. श्रीमंताचे आगमन या प्रांतास त्वरेनें जाल्याने उत्तम. येतद्विषई मुख्यानीहि पत्रे सांडश्वारा बराबर लिहिली आहेत व सेवकाकडोन लिहविले आहे. ममता राखून राजकारण करिताहेत अथवा पांच च्यार हजार फौज याच्या आसपास राहिल्यानें राजकारण टाकतील. रा नारायेणराव व मानाजी पायेगुडे दूर बेलगाव प्रांतास गेले. शाहपुरची पेठ मारली म्हणोन अवाई आहे. हे येथून कोणे वेलेस जाताहेतसें कळणार नाही. येथून गेल्यावर कळेल. याकरिता जासूद जोडी दु:खणें पडली होती तेच जलदीने आज पासोन दाहा रोजाच्या कराराने रवाना केली. करारास पोहचल्याने इनाम पावतील. सांडश्वार पाचवे रोजी येथें दाखल जाले. रोज चालीस कोसाची मजल केली होती. पायेची माणसास दाह रोजास पोहचेणाचा वाईदा आहे. आजउदिया आणखी नाजूक ल्याहावे तर जासूद नाही. पाच जोड्या हजूर आल्या आहेत. येथें उजराहि मिलत नाहीं. येथील अजुरदाराबराबर कागद पाठविता न ये. रोजमरा देऊन च्यार महिने जाले. कर्जहि मिलत नाही. घरचीं मुले माणसें

---

१ अवसान.

उपवासी श्रमी होतात. सेवकास येथें दोनसे रुपये कर्ज जालें. बातनीविषई मुख्य सेवकावर कोपिष्ट आहेत. दुसरें वर्तमान सिरालेंकर देसमुख देसपांडे ठाणें श्रीमंतास द्यावेसा मतलब दिसतों. दोन च्यार हजार फौज वारणेंवर यांची वाट राखून राहिल्यानें ठाणेहि हातास लगेल. रा मुरारराव घोरपडा ताराबाईकडें येणार येसी वदंता आहे. आढलले व यैकिलें वर्तमान सेवेस निवेदन केले आहे. श्रृत होये हे विज्ञाप्त.

¶*Anandrao Giridhar requests the Peshwa to speed up the affairs in the Karnatak and return post haste towards Satara as Sambhaji seemed likely to take advantage of his absence to go to Satara and to capture the throne by doing away with Ramraja.*

---

*No. 154*] [*18-2-1751*

श्री

तीर्थरूप राजश्री नाना वडिलाचे सेवेसी आपले बापूजी बाजीराऊ कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा फाल्गुन शुध ४ मुाा बाहादुरपुरा प्रांा खानदेश सुखरूप असो विशेष. वडिलीं आसिर्वाद पत्र छ २९ रबिलावलेचें पाठविले तेथें आज्ञा की रा बलवंतरायांसमागमें फौज पाठविली आहे ; पावली असेल व फिरगोंजी पोवारहि बिडीहून रा केला आहे, येऊन पोहचल. त्यास रा सोनजी भापकर व रा नाईक सिवरात्रीस येउन पोहचले. तदोतर दुसरे रोजी कूच करून घाटाखाली आलो तो दमाजीने कूच करून बराणपुरचा रोख धरला. त्यास्तव दरकूच मुाा मजकुरास आला तो तोहि अमलनेराजवल तीनि कोस नीट आम्हाकडे आला आहे. तेव्हा काही मागील फौजेची वाट पाहता न ये; यास्तव कूच करून नीट त्यावर चालून जातो. त्याचा आमचा तफावत सात कोसाचा आहे. कवडे व हरिपंतहि सामील याच मुाा जाहले. त्याची आमची फौज तो बराबरच जाहली आहे. परंतु इकडे लोक भारी भारी आहेत, याप्राा काही तिकडे नाहीत. वडिलास कलावे. वडिलाचा पुण्यप्रताप समर्थ आहे. काही चिंता नाही. आम्हीहि सारे नऊदाहा हजार जमा आहो; काही थोडे नाही. याउपरी ईस्वर समर्थ आहे. स्वामीचा प्रताप समर्थ आहे. काही चिंता न करावी. सातारियास तीन हजार फौज ठेविली; उतम आहे. येणेकरून लोकास याप्रांती आधार जाहला. वडिलाप्रति विशेष काय लिहू? लोभ करावा हे विज्ञापना.

¶*News-letter by Bapuji Bajirao Retrekar to the Peshwa, giving details of the movements of Damaji Gaikwad.*

No. 155] [27-2-1751

श्री

पुरवणी श्रीमत राजश्री पंतप्रधान
गोसावी यांसी

दंडवत विनंती. उपर, छ ११ जावली दों प्रहरां रावळांचा निरोप घेऊन स्वार जालों तेथोन गोसावी यांच्या लस्करचा तळ कोस ५ व पुढे आणी कोस ५ येकूण दाहा साईकाळी कोतेपलीस राहिलो. छ १२ रा शुक्रवारीं प्राथकाळीं कूच केले ते नागर करणुलास आठ कोस येक प्रहर ऊन टाळून साईकाली नदी-तिरीं लस्करचा तळ होता त्या तळावर नव कोस म्हणजे सत्रा कोस चाललों. ते दिवसीं नवाबसाहेबाच्या लस्कर(चा) मुकाम कुमूमपेठेवर आम्हापासून सा कोस होता. छ १३ मंदवारी कूच करून लस्करास जात असतां लस्कर कूच होऊन पुढें पांच कोस गेलें. आम्ही नदीतीरीहून कूच करून आकरा कोस पडकलच्या मुकामीं लस्करदाखल जालों हे विनती.

¶*Janoji Nimbalker to the Peshwa giving the places and dates of his halts in his journey.*

---

No. 156] [February 1751

श्रीशंकर

पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे शेवेसी विनंती. सातारियाकडील वर्तमान तर कालच राजश्री नानाची पत्रे आली, त्याणी लिा कीं मावले येवतेश्वरी जमा जाले होते, त्याजवर फौज पा. त्यास खबर कलली म्हणून ते पलत होते. हजार दोन हजार आहेत यैसीं आवाई होतीं. त्यास रा चिमणाजी बापुजीचे लोकांसी गाठ पडली. से दीढशे माणूस जखमी व ठार केले. त्याची गुंज मोडली. दुसरे वर्तमान श्रीमातुश्री आईसाहेबीं करवीरवासी यांसी संदर्भ केला. ते पायउतरा निघोन सातारियास येणार. अंताजी सिवदेव राजश्री दादोबा त्या राजकारणांत आहेत. करवीरवासियाचें मानस कीं, वर आहेत त्यास ठिकाणीं लावणे म्हणजे आपण येतो. याणीं उतर केले कीं तुम्ही आलेत म्हणजे सर्व तुमचें, याप्रा बातमीं बितम. सिदोजी थोराताची दोन तीन पत्रे आली त्याच्या नकलाच आम्हाकडे पा. आम्हींहि सावधता केलीच आहे; तथापि ईश्वरीइच्छा न कले ऐसें लिा. राजश्री नारायेणराव तात्या व मानाजी पायेगुडे हेंहि फौजेसह-वर्तमान कोल्हापुराजवल आहेत. त्यासहिं खबर सिधोजी थोरात याणीं

पोहचाविली ऐसेहि लिा आहे. गुरुवारी गेले सतमीस करवीराहून राजेश्री निघणार यैसे लिा होते परंतु आजपर्यंत बोभाट जाला नाहीं. सत्या मिथ्या न कळे. मातबर साहासाची गोष्ट आहे. घडे न घडे पाहावे. यंदा विचित्र विचित्र ज्या गोष्टीच्या कल्पना नाहीत त्याच गोष्टी घडतात. ईश्वरी चरित्र विचित्र आहे. हशम दीढ हजार पाा म्हणून आम्हास वारंवार सातारियाहून लिा येते. येथे लोकाचा भरणा नाहीं. हडसर घेतली तेथे पांच सातशे माणूस गुंतले. आणिक लोक आणविले आहेत. आले म्हणजे च्यार पाचशे पर्यंत निदानी सातारियास पाा देऊ. पैक्याविसीं वारंवार लिहितात. आम्हास येते समई पनास हजार रुपयाची मात्र आज्ञा होतीं, तो विचार आणिकच होता. आता सारी फौज सातारियासच राहिली, तेव्हां पनास साठ हजार रुपये दरमाहा लागतील म्हणून राजश्री नाना लिहितात. तूर्त तर चालीसपनासपर्यंत पाा. पुढे आज्ञा होईल त्याप्राा वर्तणूक करूं. नवे हशमीं माणूस आणविले आहे. हजार पाचशे ठेऊ. सेनापतीजवळ आरब वगैरे स्वार आहेत. आज्ञा जाली तर तेहि चाकर ठेऊ; परंतु आरबाची बोली भारी पडेल. परंतु बंड मोडेल. सविस्तर मजकुराची पत्रीं आज्ञा करावीं हे विनंती.+

*¶Trimbakrao Pethe, who appears to have been ordered to keep an eye upon the military situation at Satara, warns the Peshwa about the preparations afoot there.*

---

*No. 157*]

## श्री

पुा सेवेसी विज्ञापना. शहरातील वर्तमान तर नित्य शहरात चोऱ्या होत आहेत. तस्कराचा उपद्रव बहुत जाला आहे. शहरचे लोक अवघे रात्र जागत आहेत. काल माहोलीहून ब्राम्हण येक व दोघी बायेका येत होत्या, त्यास पव्हईजवळच्या वोढ्यापासी चोरटियानी लुटून बायेकांच्या वेण्या कापून, ब्राह्मणास तरवारेचे जखम लागोन, त्याची वस्तभाव कुल घेऊन गेले. या प्रकारचे वर्तमान होत आहे. शहरचे लोक डायाडोल[१] जाले आहेत. अंताजी-पंताचे आवाई निमित्य व शहरात कोण्ही खावंद नाहीं याजकरिता, शहर गडबडले

---

+ सवंध हस्ताक्षर त्रिंबकराव पेठे यांचें.

१ डायाडोल, मूळ शब्द डावाडोल = घाबरलेला.

आहे. जे आम्हांकडे पुसावयास येतात त्या(स) आम्ही धीरभरोसा देतच आहों. परंतु सरकारची फौज येथें थोडी आणि अंताजीपंत फार जमावानिसीं समीप आला, या मुळें कांही बेदील घाबरेहि लोक आहेत.

*¶News-letter from Satara to the Peshwa, communicating to him the disturbed condition prevailing at Satara on account of Antaji Shivdev's parties moving about.*

---

*No. 158]* *[1751 March or later*

श्री

सेवेसी विज्ञापना. येथील वर्तमान तागाईत छ २१ * * पावेतों * * स्वामींचे कृपे करून येथास्थित असें विज्ञापना. मातुश्रींनीं बाबाजीस व त्याच्या कारभान्यास नेऊन बहुत फजीत केलें. "मी सागत्ये तें ऐकत नाही. भलतेच मनसबे करितां म्हणोन फजीत पडतां. याउपर पेशव्याचें राजकारण सुरू करा. त्यावाचून परिणाम नाही! याउपर न करा(ल) तर परिछिन होण्यास कारणें जरूर(?)" त्यास बाबाजी बोलिला कीं, येव्हांच आपण बोलणार नाहीं. विचारें विचार बोलेन, म्हणोन जाबसाल केला. त्यावर एकदोन रोजांनीं बाळाजी केशव हणमंतराऊ आम्हाकडे आले. बोली जाहाली. त्यांत सिद्धांत कीं, ज्याप्रमाणें पहिला * * तिघावर स्वामीवर दिल्हा होता त्याप्रमाणें द्यावा राज्यास नि * * मातुश्रीच्या हुकुमाप्रमाणें * * *
बाबूजी नाईक बावाजीचें ण * * *
केशव हणमंतराऊ कृष्णाजी * * *
पानरूप चालवावें. स्वामींनीं * * *
राज्याचा बंदोबस्त करून सर्वांस वर्तवावें. कर्णाटक स्वामींनीं घेतलेंच आहे. याप्रमाणें स्वामींनीं केल्यावर त्याचा गुताच नाहीं. याप्रमाणें मजकूर होतो. त्यास करार जाहला तर आजपासून बाबाजीनें आम्ही बसोन कारभार करावा लागेल. स्वामी येत तोपावेतों लाख दीड लाख रुपये खर्चास लागतील, तें आपणांस देणें लागतील. सालमजकुरीं देवढीकडील वगैरा गाव जप्त केले आहेत, ते सोडावे लागतील. प्रतिनिधि खाजगीच्या गांवास उपसर्ग देतात, तो मना करावा लागेल. सर्वस्व स्वामींच्या हवालीं केल्यावर बंदोबस्त दृष्टीस पडोन अनभवास आले पाहिजे. या प्रमाणें करावयाचें असिलें तर पैक्याची * *

राजश्री त्रिंबकराव यास गाव * * * च्यार रोज वेढून धरावें. लबाड्या करीत * * * पुर्ते फजीत पाडावें असें विचारांत असेल तर, तशीच आज्ञा जाहाल्यास गोड मात्र बोलोन नादीं लावितों; इतक्यांत स्वामीची स्वारी देशास येईल. बाबूजी नाईक आपणांकडे मनसबा करतात, त्याचेच मध्यस्त आम्हाकडे बोलतात. याउपर यामध्यें कांहीं त्राण राहिलें नाहीं. याची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. बाबूजी नाईकाचा हत्ती मकणा प्रतिनिधीनें नेला होता तो तेच रात्रीस गावांत न जातां रानांत कोंडून ठेविला तेथेंच मेला. सेवेसी श्रुत होय, हें विज्ञापना.

¶*This appears to be a letter to the Peshwa from his agent at Satara. When the Peshwa had very nearly established his ascendency all round, Tarabai in this letter is seen making terms with him for a reconciliation and for securing at least the management of Satara affairs.*

---

*No. 159*] [*2-3-1751*

छ २९ रबिलाखर

श्री

राजश्री सदासिवपंत गोसावी

यांसी.

ꣿ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दडवत विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन करीत असिले पाहिजे विशेष. राजश्री पतप्रधान याणी आपणास यावयाविसी दोन तीन पत्रे पाठविली व हाली पत्र पाठविलें त्याचे प्रातिउतर सविस्तर लिहून पाठविले आहे त्यावरून आपाणास सकलार्थ (क)

[सिक्का] लो येईल. त्याचे चितात आपण यावें यैसे असलें तर आपणास व राजश्री मल्हार होलकर यास पाठवावे. त्याचे व आपले पत्र आले म्हणजे आपण सिध आहो. रा छ १४ रबिलाखर. राजेश्री पतप्रधान यास लिहिले आहे त्याजवरून कलू येईल. बहुत ल्याहावे तर आपन सुज्ञ आहेत. या पत्राचा जाब सत्वर पाठविला पाहिजे. त्यासारखी वर्तणूक करू. बहुत काये लिहिणे कृपा लोभ आसू दिला पाहिजे हे विनती.

मोर्तब सुद.

¶*Raghuji Bhonsle requests Sadashivrao to despatch letters to him and to Malharrao Holker. He writes that he will be coming immediately on receipt of the letter.*

No. 160] [5-3-1751

छ ८ रालाखर

श्री

राजश्री पंतप्रधान गोसावी यांसी

-॥ ⑥

श्रीमंत सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरंतरभगवदसंधान सावधान श्री माहांराव जानोजी जसवंत निंबाळकर दंडवत विनती उपर. येथील क्षेम ता। १७ राखर जाणोन निजानंद लेखन कीजे विशेष. आमचे वर्तमान यापूर्वी मुजरद कासदाबराबर विस्तारें पत्र आपणांकडे लेहून पाठविलें आहे. पावलें आसल. सांप्रत लस्करचें नवल विशेष वर्तमान रा। बगाजीपंती लिहिलें आहे. आपणांस नवाब सलाबतजंग बाहादर यानीं खजाना आणायास हैदराबादेस रवाना केलें आसे. आपलें सैन्य कोठे आहे हें कृपा करून लेखन जाल्या, साकल्य आवगत होईल विशेष. कृपा वर्धमान कीजे हे विनंती.

¶*Janoji Nimbalker informs the Peshwa that he has been deputed by Salabatjung to Hyderabad to bring money.*

---

No. 161] [8-3-1751

श्री

श्रीमंत राजश्री......पंत प्रधान साहेबांचे सेवेसी

विनंती. आज्ञाधारक महिपतराऊ कवडे कृतानेक दंडवत विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ १३ रबिलाखर पावेतों मुकाम कसबे सायेगांव परगणे राजदेहर साहेबांचे कृपावलोकनें करून सेवकाचें वृत येथास्थित असे विशेष. साहेबीं आज्ञापत्र सादर केलें; तेथें आज्ञा की, राजश्री बापूजी बाजीराऊ यांसी सामील होऊन त्याचे आज्ञेप्रमाणें वर्तणें म्हणऊन आज्ञापत्रीं सेवकास आज्ञा केली. त्यास मशारनिलेची आमची भेटी छ..........सफरीं बाहादुरपुरा येथील मुकामीं जाहाली. दुसरे दिवसीं गाइकवाडावर चालोन गेले. युध्य जाहालें. ते प्रसंगीचें जाले वर्तमान त्याणी सेवेसी लिहिलें असेल, त्याजवरून सेवेसीं श्रुत होईल. हे विज्ञापना..............................

¶*Mahipatrao Kavde gives the Peshwa news about the battle with Damaji Gaikwad.*

734

No. 162] [12-3-1751

श्री

तीर्तस्वरूप राजश्री······नाना स्वामी वडिलाचे सेवेसी

आपत्ये बापोजी बाजीराऊ कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम तागाइत फाल्गुण वद्य ११ मुकाम खांमगांव[1] प्रगणे पुणे सुखरूप आसों विशेष. वडिलाकडे पांच पत्रे पाठविलीं त्याचें उत्तर येकहि न आले; की, कागदहि पावले नाहीत, हे काही कलत नाहीं. इकडील वर्तमान तर गाइकवाड व सेनापति यैसे वालकीवर आहेत व आज मंगळवारीं कोठे मुकाम करील हे पाहाव. ते आम्ही दो कोसांचे अंतराने राहातो. आमचे वर्तमान तर फौजेने केवळ सत्व सोडले; इलाज नाही. जुंज करावयास्तव जावे आणि सामानें बांधावी तो तडका पळूं लागतात. त्यास कोठपर्यंत धरु ? धरच धरीत नाहीत यैसी गत जाहली आहे. मुलूक आमच्याच लोकानी तडका लुटला. पलून जातात तेच गाइकवाड याचे म्हणून लुटतात. म्या एकट्याने कोठपर्यंत करावें ? सर्वांही मिलोन येक चितेकरून ताकीद करावी ते होत नाही. भरण्याच्या सरदाऱ्या! त्याने कोठे कार्य जाहालें की काय ? या फौजेस गांव मात्र मोडावयास सांगावे! असो. याउपर जे होईल ते लिहून पाठऊन देईन. अद्यापपर्यंत जुने लोक कोणी आले नाहींत. याउपर जमा होतील. बहुत काय लिहूं ? कृपा करावी हे, विज्ञापना.............................

¶*Bapuji Bajirao Retrekar writes to the Peshwa an account of his pursuit of Damaji Gaikwad.*

---

No. 163] [10-3-1751

श्री

सेवेसी जगजीवन धोंडदेव सां नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तरी, काली शनवारीं रात्रौ आम्ही दमाजी गायेकवाड याचे लस्करांत गेलों. तेथें गेलियाउपरी दमाजीचे लोकांनी आपले गोटामध्यें येऊन दाणा वैरण केली व आपणाकडील फौज सडी उभे राहिले होते तेही आपले गोटी जाऊन राहिले. दोन्ही फौजा थंड जाहलियावर आम्ही दमाजीचे रावटीनजीक जाऊन खबर घेतली. चोपदार येऊन भेटिला. त्यासी कितेक प्रकारें विनवणी करून * च्या हाती सांगोन पाठविलें. फिरोन * चोपदार येऊन आम्हास घेऊन गेला. त्याची आमची भेटी जाहली.

---

१ ता. शिरूर.

मातुश्रींचे पत्र दिलें. त्याणी वाचून पाहिलें. कांही प्रतिउतर न दिल्हे. कांहीं बोलिले नाहीं. मग आम्ही दोनच्यार गोष्टी विचाराच्या बोलिलों. उपरांतिक त्यांणी प्रतिउतर दिल्हे कीं हा समय सौरसपणाचा नसे. तुम्ही उठोन जाणे. आम्ही नवरे जाहलों, आंगास हळद लाविली आहे; नवऱ्याही तयार आहेत. परंतु लग्न समय आला नाहीं. ऐशा कितेक गोष्टी उन्मतपणाच्या बोलिला. फिरोन मागती आपणच पुसों लागला जे, मातोश्री तो सिहींगडास पळोन गेली आणि पत्र लिहावयास कारण काय? तुम्ही येथील काजकारभार कैसा आहे व तजवीज काय आहे या बातमी करिता आलेत. तुम्ही सूखरूप बातमी घेऊन जाणे; मातुश्रीस सांगणे जे आम्ही आपले दारीं तोरण बांधिले आहे. तोरणाचा पदर तुमची फौज तोडणार. याजकरितां पत्राचे उतर देत नाहीं. ऐसें पष्ट सांगोन आम्हास सांगितले कीं तुम्ही लस्करांतून निघोन जाणे. त्याजवर आम्ही त्याचे लस्करांत दोन प्रहर रात्रपर्यंत होतो. बातमी विचारे विचार घेतली. राजश्री बापू व कवडे वगैरा लस्कर आपणाकडील आहे. परंतु या फौजेस तो कांही जुमस खात नाही. आपले फौजेस सलाबत बैसली आहे. एकाएकी त्याजवर जावत नाहीं. आपले लोकाचा दम आपण काली पाहिला. दमाजी गायेकवाड याने फौज आपली पांच टोळ्या केल्या विलपसील.

१ खासा दमाजी
१ खंडेराव गायेकवाड
१ जयसिंग गायेकवाड
१ गंगाजी गायकवाड याचा पुत्र
१ जगजीवन पवार.

---

५

एकूण पांच फौजा निराळिया करून जुझावे; वरकड आपले खबरदारीनें बहुत खंबीरानं बंदोबस्तीने आहे. आजी रविवारीं प्रहरा दिवसास कूच करून ढमढेरे याचे तळेगावानजीक सिरगव्हाण गावावर मुकाम जाहला आहे. आपली फौज अद्याप तळावर आहे. आपले फौजेचे मुकामच आहे. उदैक कूच करणार आहेत. दमाजी दरमजल करून सातारियासी जात आहे. पुणियासी दाखला घ्यावा म्हणोन सेनापती व जगजीवन पवार या उभयताचे मानस आहे. परंतु दमाजी बोलिला जे पुण्यास जावयाचा मनसवा मागे राहिला. आता पुण्यामध्ये जाऊन काय करणार? ज्या गोष्टीकरिता जावें ती गोष्टी हातची गेली. ऐसे आपण परस्परे होत आहे. परंतु विश्वास नाहीं. आणि दोन मजला पुढें गेला म्हणजे सर्व अरिष्ट पुण्य क्षेत्रीचे गेले! राजश्री पिलाजी जाधवराव याजकडील सांडस्वार कागद घेऊन दमाजीस

आला. त्या पत्रामध्यें मजकूर काय लिहिला नकळे. परंतु कारकून तोंडजबानीने सेनापतीस विदित करितां आपण ऐकिलें कीं तुम्ही सातारियासी न जाणे. तळेगांवी फिरोन जाणे. मग आम्हास कळेल त्या प्रमाणे पुढें विचार मनास आणूं. तुम्ही सातारियासी गेलेत म्हणजे बहुत श्रमामध्यें पडाल. ही गोष्टी उतम नसे. पंतप्रधान तिकडून येतील. त्याची तुमची खराबी होईल. आम्हास कळेल त्या प्रमाणे तुमचा त्याचा बीद बसऊन देऊं ऐसे सांगितले. त्यावर त्याणी उतर दिल्हे जे, आम्हास तुम्हावाचून दुसरे कोण आहे? परंतु आऊसाहेब शपतपुरस्कर पत्रें पाा त्याजवरून जाण लागते. येमाजी सिवदेव याचा पुत्र लस्करांत आला आहे, तोही पत्र घेऊन आला आहे ऐसे त्यासी सांगोन पाठविले. साडस्वार दीड प्रहर रात्रीस सुभेदाराकडे निघोन गेली. पत्र लिहिलें आहे त्यातील अभिप्राय कळला नाहीं. आपण त्यासमई त्याजसमीप होतो. जाहले वर्तमान सेवसी लि॥ आहे. तुम्ही राऊत पाठविले परंतु ते सारे उठोन गेले. तरी त्यासी ताकीद करून सत्वर रवाना करणे. ताकीद बरी करून पाठवणे. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना. छ २२ रााखर रविवार दोनप्रहर दिवस.

*¶Jagjiwan Dhonddeo informs the Peshwa how he approached Damaji Gaikwar with the letter of Tarabai and about the defiant attitude adopted by the latter. Incidentally the condition and arrangement of Damaji's forces are described by the writer. The army, he says, has five divisions led by five different commanders. Pilaji Jadhao wrote to Damaji dissuading him from going to Satara, but Damaji persisted in going on account of the written pledges that he had received from Tarabai.*

---

*No. 164]* *[12-3-1751*

श्री

**श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी**

विनंती. सेवक बलवंतराव गणपत कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपर. येथील वर्तमान ताा छ २४ रबिलाखरपावेतो मुकाम खांबगाव येथे स्वामीचे कृपेकरून यथास्थित आसे. राजश्री बापूकडे पाा त्यास बापूबरोबर जाऊन बापूचे मर्जीनरूप सेवा करीतच आहे. गायेकवाड दरमजल सातारियास जातो. येक जुज पूर्ती जाले. त्यावर दुसरे जुज करावे येविशई बापूचे व आम्हाकडील सोनजी भा [प] कर, माहादाजी नाईक यांच्या मनात फार आहे. परंतु मातबर सरदार दों दों हजारा फौजेचे धनी आहेत त्याजवळ आठसे राऊत नाहीत! सामाने घालून जुजास उभे राहावे तेव्हा बरोबर देखील येत नाहींत! तेव्हा लोक

माघारे पलतात. ये गोष्टीस इलाज नाहीं. बापूचे कोणी यैकत नाहीं. परंतु त्याजपासून अंतर पडते यास इलाज काय आहे ? सातारियांहून राजश्री नाना तीन हजार फौज घेऊन सिरवलावर आले आहेत. छ मजकुरी तेहि येऊन पोहचतील. उदैक जुज होईल. येवेलेस खामखा गायेकवाडाचा मोड होईल. लोक चांगले बापूकडे येकंदर नाहीत. च्यार पथके आम्हाबरोबर चांगली, त्यात मात्र माणूस चांगले आहे. आणि पहिल्या जुजातहि त्यानीच बाजी राखली, नाहीतर सारेच निघून गेले. बापू बारा रावतानी आम्हाजवल आले, तोपर्यंत आमचे गायेकवाडाचे जुज होतच होते. डावे बाजू निघून गेलियावर आम्ही सांवर बसऊन सावकास आलों. ते दिवसापासून बापू लोकास रागेहि भरतात, पाया पडतो, परंतु ठीक पडत नाही. डोईजड सरदार यामुले इलाज नाही. वरकड वर्तमान बापूनी लिहिले आहे त्यावरून विदित होईल. होईल वर्तमान ते सेवेसी वरचेवर लिहीत जाईन. सेवेसी श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*Balvantrao Ganpat Mehendale to Peshwa: sends news of Gaikwad's movements.*

---

*No. 165*] *[14-3-1751*

......चे लोक मुलूक लुटितात लस्करचा बंद उडाला ; कोण्ही कोण्हास पुसत नाहीं ; सरदाराचा जफ्त फौजेवर नाहीं ; मार्ग देखील चालत नाहीं ; ज्याच्या मनास येईल त्याने लुटावें यैसा प्रसंग आला आहे. फौज देशांत आली. लोक न पुसतां कितेक आपले घरोवर गेले आहेत. बापूबराबर फौज थोडी आहे, परंतु चालून गेले आहेत, म्हणून जासूद सांगत होते. श्रीमंताचे प्रतापें त्यांचा कांही रेच मोडला तर उतम जालें ; नाहींतर स्वामीचें आगमन होये तोंपर्येत मोठी धामधूम होईल; ताराबाईनें मावलेहि सासात हजार मेलविले आहेत. मागती सिव्हगडास उपसर्ग करावा यैसे आहे म्हणून पुण्याहून लिहून आले आहे. पुण्याचें वर्तमान तर [फाटले] सर्वांचें अंतर राजश्री नाना सातारियाहून दोन हजार फौजेनसी चौक्या देखील सर्व उठऊन राजश्री बापूजीच्या फौजेत मिलाले व त्रिंबकराव मामाहि बापूकडे गेले. छ २६ माहे रबिलाखरी जासूद सोडून आले त्या दिवसीं बापू व नानांनी मसलत करून गायेकवाडाच्या गलां पडावें म्हणून गेले. जासूद बानमी घेऊन आम्हांकडें आले. बापू पत्र लिहित नाहीं. त्यांस पत्रलेखनास फावत नाहीं. लस्करचें वर्तमान जासूद जबानीं सांगत होते कीं, दमार्जीचा लस्करचा तल जेथें ज्या गांवावर पडतो तेथें कांही राहात नाहीं.

व जितकें आटोक्यांत गांव येतात तेथील पाटील ताब्रडतोब धरून आणून मारहाण करून खंडणी मनमाने सारखी रातोरात घ्यावी, पुढें चालावें. तसेंच आमचेहि फौजे-

¶*A fragmentary letter giving news of the expeditions of Damaji Gaikwad against Poona in support of Tarabai.*

---

*No. 166]* *[March 1751*

जे जाहले ते उत्तम. सातारियाची फौज बोलाविली आहे. राजश्री नानास पत्रे पाठविलीं आहे. तेहि येऊन पोंहचतील. तदोत्तर काही या फौजेस धीर पुरला तर पाहतों. परंतु घाटतोंडी सारे जमा करून येक जुंज करितों. काय करू ? मागेच जुंज करतो, परंतु विलाज नाहीं. येरवी काही जखमी कोणी जाहलो नाही. सर्व शाबूत आहेत. परंतु जीवच धरीनात. काय विलाज आहे ? बलेंबलें शाह मात्र आजपर्यंत राखून आलो आहो. पुणे तो तमाम राजश्री मामानी उजाड केलें. उपाय नाही. आज आमचे पुणे गाईकवाडामुळे उजाड व्हावे हे आमच्या कपालास आले ! ईश्वरे मृत्य कैसा न दिला ? मी दाहा हजार फौजेच्या भरवसियावर आलो आण हे कपाल फुडे निवटले. काय करू ? स्वामीनी तो करिता[१] म्हणून या प्रांते ठेविले. त्यास हे करतेपण जाहले ! माजा काय उपाय ? फौजेने घालविले. सर्व चित्तापासून झोंबतें तर काय फिकीर होती ? ब्राम्हणी सरियाचें सुभे येत नाही. हा सातारियास जातो. याउपरी कोण सोबती होईल तो हो. नाहीतर आपण काहीं वडिलास शाबूत तोंड दाखवीत नाही. बरे; घडेल ते खरे. रिकामें काय लिहूं ? सातारियाहून नानानीहि बराबर खंडेराव जाधव आणखीहि कितेक लहान थोर जमा करून आले आहेत. आज उदईक येतील. तदोतर होईल ते लिहून पाठवीन. हुजूरची पथके व रा। बलवंतराऊ आले आहेत. ते माज्या आज्ञाशिवाय नाहीत. लोक भारी होत असता स्वामी सेवेवर द्रिष्ट देऊन दुसरे दाखवीत नाहीत. वरकडानी तो तालच सांडला. जोपर्यंत जुंज होय तोपर्यंत सर्व आज्ञाखेरीज नव्हतें. ज्या दिवसापासून जुंज जाहले त्यापासून त्याचेच लोक त्याचे मानीत नाहीत, यैसे जाले आहे. सर्वांची दृष्ट पलायावर आहे. जमा करून तोंडास न्यावें, द्रिष्टीस द्रिष्ट जाहली, म्हणजे मागें तडक पळूं लागतात. यामुले काहीच बनोन येईनासे जाहलें आहे. याउपरी जितके जमा होतील तितकियानिसी व हुजरात व फिरगोजी मिलोन जुंज करितों. जातीस डाग कोठपर्यंत लाऊन घेऊ ? पुडें पोरासदेखील पोट भरावयास जागा नाहीसी करू की काय ? जातीचा तरी

---

१ कर्ता.

येकदा झाडा देऊ मग काय होणार ते होऊ ! नाहीतर तोंड काय दाखऊं ? बारा घरचे बारा बेटीचो * मिलोन माझ्या वंशास डाग लाविला ! आज च्यार पिडियात तो कोणी शब्द लाविला नव्हता. परंतु या समयांत या फौजेमुळे हे गत जाहली आहे. याचे परिहार करणार ईश्वर समर्थ आहे. पत्री काय लिहूं ?

*¶Bapuji Bajirao reports the difficulties of his situation in fighting the Gaikwad.*

---

*No. 167*] [*15th March 1751*

**श्री**

**पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान**
**स्वामीचे सेवेसी**

विज्ञापना. दमाजी गायेकवाड सडी फौज करून घाट चढून विसाविसा कोसाचे मजला करीत सगमनेरास गेले. तेथें दाहाहजाराची उभाउभी खंडणी मात्र करून, जमीदारांचे जिमे लाऊन, तेथूनहि कूच करून, झोली चंदनापूरचे घांटे मजल दरमजल दावडीस गेले. मागें आपली फौजहि आठादाहा कोसाचे आंतरे होती. येथूनहि आठ जोड्या समाचारास गेल्या आहेत. येकहि फिरली नाहीं, परंतु येके ठाई इतके लिहिले आलें आहे कीं, छ २३ माहे मिनहू सोमवारी (*11-3-1751*) भीमरेचे तीरीं निंबगांव म्हणून दावडीचे जवळ आहे, तेथें गायेकवाड आहे. त्यास आमचे फौजेने मोठे काम इतके केले कीं, ज्या दिवसीं दावडीस जाणार त्या दिवसीं व पूर्व दिवसीं मजला मोठमोठाल्या करून पुण्याचे दावडीचे मध्यें आलें. तीं कोसाचे आंतरें राहिले. त्या दिवसींहि गायेकवाडाकडील फौज तयार होऊन यांचे तोडावर आली. परंतु हे आपले ठाई मात्र खबरदार राहिले. हेहि चालून गेले नाहीत. तेव्हां गणेगांवाकडील रोख दाखऊन निंबगांवावर राहिले. पुढें सेनापतीहि तलेगांवाहून त्याचे भेटीस येणार. सेनापति व हे उभयतांहि सातारियास जाणार. जेजुरीवरून जातील येसे पत्र येका गृहस्ताचें आलें; छ २३ रोजींचे काल सविसवीस आले. व सातारियाकडील वर्तमान तर राजश्रीनी डेरे देऊन वर बागांत राहिले आहेत. ताराबाई सखवारबाईच्या वाडियांत राहिले आहेत. दादोबा प्रतिनिधि हवालदाराचे वाडियांत आहेत. ताराबाई दरबार करीत असतात. जे जे सरकारकून त्याचे मुतालीक सर्व जातात. कारभार होतो. खालील वाडा प्रतिनिधीचा तेथें नवे प्रतिनिधि आहेत. त्यांस

---

× पत्र बापूजी बाजीरावाचें ?

किल्यावरून हुकूम आला आहे कीं, वाडा खालीं करून तुम्ही डेरे देऊन राहाणें, वाडा गायेकवाडास राह्यास पाहिजे, यैसें सांगून पाठविले आहे, म्हणून सातारियाहून राजश्री महिपतराव सुमंत यांचे भाऊ, त्यांचे घरी वर्तमान आले आहे. आम्हांकडीलहि वर्तमान येईल म्हणजे लिहून पाठऊं. बखेडा मांडला आहे. ईश्वर आपलें साह्य करील. हें आभ्र राहतेंसें नाहीं. स्वामीचें लांबणें दूर जालें. म्हणून ज्या दिवसीं इकडें रोख होईल त्या दिवसीं यास फार कठीण पडेल. सातारें पुणेची फौज व बापूजी बाजीरायांची फौज सर्व येकत्र जालियावर यांसही त्याचा हिसाब नाहीं. परंतु लडाई देशांत पडली, फितूर देशांत स्वस्थली पडला, हें येवढें मात्र आनुचित जालें आहे. ईश्वर बऱ्यावर आहे, तर सर्व बरेंच आहे. राजश्री मल्हारजी होलकर वजिराकडें गेले, वजीरहि बाहेर निघाले, यैसे वर्तमान आहे. गाजुदीखानाकडील स्तब्ध आहे. कांहीं जलदी नाहीं. त्याहीमध्यें पठाण मारले. पूर्ववत आपले भाऊ कायम जाले म्हणून वर्तमान कललियावर ते इकडे येणारहि नाहीतसें दिसतें. पहावें. सांप्रत वर्तमान इतकें आहे; पुढें होईल तें वरचेवर लेहून पाठऊं. पुण्यांतहि गडबड फार जाली म्हणून येक साहुकार कृष्णदास म्हणून आहे त्यानें मात्र सांगितलें. आणखी कोठें लिहिले नाहीं. आमचे जासूदहि गेले आहेत. आजीउदियात येतील. आधींच बापू सत्वर जबाब देत नाहीत. त्याहीमधें * चलकुची करतां जवाबास फारच विलंब लागतो. असो; आमचा उपाय काय? येईल तेव्हां ल्याहावें. हे विज्ञापना.

¶*News-letter to the Peshwa who was in the Hyderabad Dominions, regarding the movements and doings of Damaji Gaikwad.*

---

*No. 168*] [*17-3-1751*

श्री

श्रीमत राजश्री पंत प्रधान गोसावियांसी

ॐ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्ये श्नो माहाराव जानोजी जसवंत निंबालकर कृतानेक दंडवत विनती उपर. येथील कुशल जाणोन गोसावियाणी स्वकुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. कृपा करून छ १९ रालाखरचे पत्र पाठविले ते छ २५ माहे मिनहूस उतम काली प्रविष्ट होऊन लिहिला अर्थ तपसिले अवगत जाहला. पत्र येत नाहीं. वर्तमान कलत नाही. कोठे आहांत म्हणोंन अज्ञां. तर हजूर यावयाविसी इनायेतनामे अले. याजकरिता छ २२ रालाखर बुधवारी लस्करात येऊन मुलाजमत हसल केली. नवाब कोन्हीकडे गेले हे वारंवार ल्याहावे म्हणोन लिो तर गदवालकर व देवदुर्गवाले न अले म्हणोन त्यास शाह धात्रा

याजकरिता छ २९ रालाखर मगलवारी पाच कोस कुचे करून भीमातीरास मुकामास आले. हेहि स्तलचा निर्वाह जाहल्यावर अदोंनी प्राती जाणार. दुसरी चर्चा की हैदराबादेकडे होणार. अद्याप सिधात नाही. सारौश जसा मनसुबा पडतो तसा विचार करितात. सिधात कोणताहि ठरला नाही. हे सविस्तर वर्तमान वकील व बातमीचे कारकूणहि रावलास लिहीत आसतील, परतु यैकिले वर्तमान कलावे म्हणून आम्ही लिो असे. दरमजल कृष्णातीरास येऊन राजश्री माहादाजीपत बाबासमागमे फौज देऊन रवानगी केली म्हणोंन दया करून लिो अवगत जाहलें. आपण येशस्वी आहेत आपल्या कृपेकरून तेहि येशच संपादून येतील. तिकडील वर्तमान जरूर राजश्री खिजमतरायास वरच्यावर लिहीत असावे म्हणून आज्ञा. तर आपल्या आज्ञेप्रा लिहिजेल. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Janoji Nimbalker to the Peshwa informing him of the movements of the Nizam in the South towards Adoni. The writer wishes success to Mahadaji-pant in his expedition in the South whither he is sent by the Peshwa.*

---

*No. 169*] [*After 17-3-1751*

## श्रीव्यंकटेश.

विनंती उपरी. करवीरवासी यास भोज घेऊन दिल्ही. इतकियांत पुणियाहून राजश्री त्रिंबकरावमामा यांची पत्रें आलीं. राजश्री दमाजी गाईकवाड याचे व आपले फौजेचें झुंज जाले. माघारे सारिले. सडा होऊन सातारियास पुण्यावरून येतो. तुम्हीं रातीचा दिवस करून येऊन पोहचावें. पाठीवर राजश्री बापूजी बाजीराव आहेत. परंतु या फौजेचा वहमा राहिला नाही. सर्वांनी मिलोन त्यास जरब द्यावी, यैसे लिहिले. तसेंच राजश्री नानाही लिहिलें की, मातारा सोडिला, बापूस जाऊन मिलतो, तुम्ही सिताबीनें यावे, यैसें लिहिलें आले. उपरांतिक च्यारच्यार गांवच्या मजली करून राजश्री नानास सामील जालों. कोरेगावास सदाशिवगडच्या मुकामीहून आलों तों गाईकवाडाच्या फौजेचा व याचा मोकावला जाला. स्वामीच्या पुण्येंकरून लुटून पस्त केला. सडा शहरच्या आश्रेस गेला. त्यावर वर्षप्रतिपदेचे दिवसी कूच करून वेण्येवर राहिलों. याउपरी स्वामीच्या पुण्येंकरून त्यास नतीजा पाववितों. साहेबाकामास चुकत नाही. ये विसींचें वृत्त राजश्री नाना आपणास लिहितील त्यावरून श्रवण होईल हे विनंती+.

¶*Narayanrao Ghorpade writes about the battle with Damaji Gaikwad.*

---

+ नारायणराव व्यंकटेश घोरपडे याचें पत्र.

*No. 170]* *[19-3-1751*

**श्रीलक्ष्मीकांत**

**राजश्री बालाजी पंडित प्रधान**
**गोसावी यांसी.**

ꣻ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा दडवत विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष. गोसावी यानी पत्र पाठविलें तें पावले. लिहिले वर्तमान अवगत जाहाले. अविलंबे यावे म्हणोन लिहिले. ऐशियास मजल दरमजल धोबीपेठेवरी येऊन दाखल जालो. सीघ्रवतच येऊन पोहचत आसो. वरकड कितेक वर्तमान राजश्री गंगाजी गोपाल दिवाण व राजश्री लंबोदर धुंडिराज यासमागमे सागोन पाठविले आहेत. हे सांगतील त्यावरून कलेल. रा छ २१ रबिलाखर. सूज्ञाप्रति विशेस काये लिहिणे. कृपा लोभ आसू दिला पाहिजे हे विनती.

[ येथें अस्पष्ट शिक्का.] मोर्तब सुद.

¶*Raghoji Bhonsle informs the Peshwa that he has started as per his instructions and has gone as far as Dhobipeth.*

---

*No. 171]* *[23-3-1751*

**श्रीशंकर.**

**श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे शेवेसी**

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ ६ जावलपर्यंत स्वामीचे कृपेकरून सुखरूप असो विशेष. दोनच्यार पत्रे सेवेसी पा। ती पावलीच असतील. प्रत्योतराची सेवकास ल्याहावयाची आज्ञा जालिया आम्हास प्रविष्ट होऊन संतोष होईल. सविस्तर श्रीमंताचे पत्रीं लि। आहे त्याजवरून विदित होईल. आमचे फौजेने साताऱियास गायेकवाडाचा मोड केला. कलावे बहुत काये लिहिणे, कृपा केली पाहिजे, हे विनंती.

¶*Trimbakrao Pethe to Raghunathrao communicating news of the Gaikwad's defeat near Satara.*

No. 172] [25-3-1751

श्री

श्रीमंत् तीर्थस्वरूप राजमान्ये याविराजित राजश्री
नाना स्वामी वडिलांचे शेवेसी राजश्री भाऊ स्वामी
वडिलांचे शेवेसी

आपलें अंताजी विश्वंभर करद्वयें जोडून चरणांवर मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विनंती. विनवावया प्रार्थना कीं, चैत्र शुद्ध १० दशमीपावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून मुक्काम सतरुषी कुशल आसों. यानंतर शिमगा वद्य पंचमीस राजश्री शेनापति तळेगांवींहून दीड प्रहर रात्रीं स्वार होऊन पाबळावर गेले. गाईकवाड संगमनेरा(स) होता, तो आगोदर पुढें पयेका पाठविला. आकस्मात निघाले. आगोदर तजविजींत होते. खानदेशांत जावें हा मजकूर होता. तो मजकूर राहिला कीं, जोंवर मातुश्रीचा आश्रा नाहीं तोंवर आपण कांहीं बाहेर निघत नाहीं. सर्वांनीं मिळोन तह केला होता कीं येकरूप बाहेर न निघावें. त्याहीवर हें जुंजहि जालें. हा भरवसा जाणून आकस्मात बाहेर निघाले. पाबलावर भेटी जालिया आपलीहि फौज मागून आली, वेढा जाला. मग बाहेरील आंत यास जावयास येवयास प्रयेत्न लागूं लागला. आळेगांवच्या तळावरून पायेउतारा होऊन लस्करांत गेलों. पांच रोज सजगुरें खाऊन राहिलों. सर्व विच्यार ध्यानास आणिला. रेवतजी टोंकेगांवा आले, ते कांहीं राहिले नाहींत. लुटून पस्त केलें. सालपियाचे घांटें लस्कर वरतें आले, ते दिवशीं बुनगे राहावे हा विचार नवता. ईश्वरगतीनें राहिले. आपली फौज ते दिवशीं मागेंच राहिली. दहिगांवावर मुक्काम केला. विसा कोसाची मजल केली. दहीगांवींहून कूच केलें तें वेण्येवर मुक्काम केला. ते दिवशीं आपली फौज कृष्णातीरास आली. स्वारी करून आली होती. हेहि बाहेर निघाले. मुकाबला जाला नाहीं. मागें परतोन आले. फाल्गुन चतुर्दशीस, मागती आपली फौज आली. ते दिवशीं गाईकवाड व शेनापति राजेश्रींच्या दर्शनास जाणार, तों आपलिया लस्करांतून तीन बातनिया पोहचलिया कीं, फौज तयार जाली आहे. तो विचार राहून, स्वारी करून फौजेवर चाळून गेले. आपले फौजेसमोर गाइकवाड व शेनापति, येके बाजूस खंडेराऊ गाइकवाड व येके बाजूस जगजीवन पवार याप्रमाणें होऊन जुंझ जालें. आगोदर आपली फौज मागें परतली. ज्या बाजूस खंडेराऊ होता त्या बाजूनें सत्तावीस राऊत निघाले. सतरुषींतले लोक व नानाहि समुदाये निघाला. मग येक क्षणभर जुंज जालें. पळ निघाला तों करंजियाचे चावडीपावेतों आपले लोक मारीत आले. शेनापतीचे नव उंट व देवपुजाहि व डेरे नेले. गाईकवाडांकडीलहि

दारु जाळली व जामदारखाना होता तो पाघुरनें उंच होतीं ते नेलीं. कांहीं वस्तभाव होती तेहि नेली. खंडेराऊ यांजकडील जामदारखाना राहिला; कांहीं दमाजीचाहि राहिला. आपलीं घोडीं लोकांचीं पंचेवीसपावेतों गाईकवाडांकडे आलीं. बुनगियांतील उंट, व बटकी, व डेरे व राहुटिया व वानियाची वस्तभाव राहिली नाहीं. याप्रमाणें प्रसंगीं वर्तमान जालें. तेंच दिवशीं फौजेसहित गावांत लस्कर राहिलें. दुसरें दिवशीं माहारदरियांत लस्कर राहिलें........

¶*Antaji Vishvambhar gives minute details of Damaji's movements and engagements.*

---

*No. 173*] [*March 1751*

**श्री**

**पुरवणी श्रीमंत राजश्री**
**पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

विज्ञापना राजश्री बापूजी बाजीराव यांजकडील वर्तमान तर पहिली लडाई जाली ते जाली; त्यानंतर अद्याप लडाई तों जाली नाहीं. पहिल्या लडाईतच आम्हांकडील फौजेत लोक जायां फार जाले. कोण्ही तन[1] देत नाहीत. गायेकवाडानें गोंधळीचा तळ टाकून कांसारबारीच्या रोखें आलीकडें पांचसात कोस आला. हेंहि कूच करून माघारें त्याचे आले. त्याजवरून लौकिक यैसा जाला आहे कीं, ताराबाईकडील पत्रें येऊन त्यास पावलीं आहेत. तो सातारियास जातो. आमचे फौजेसी आपणहून भांडत नाहीं. हे जाऊन गळां पडलियास भांडावें. या फौजेत आपणहून त्यांचे गळां पडावें इतकें सामर्थ्य राहिले नाहीं. आम्ही खानास कांहीं मदत फौज पाठवावयाविशीं बहुत प्रकारें सांगितलें; परंतु यास फौज देणें अनुकूल पडत नाहीं. त्याहीमधें लढाईचे वर्तमान आलियावर केवलच उगेच राहिले; न द्यावयाचे पर्याय बोलूं लागले. गळां पडलियानें कोण्ही देतोसें नाहीं. फिरंगोजी पवार यांस राजश्री हणमंतरायानी आमचे फौजेच्या मदतीस दोन हजारानसी रवाना केलें. ते अद्याप औरंगाबादेच्या आसपासच आहेत. शनिश्चरता मांडली आहे. लौकर जाऊन पाऊन पोटतिडकीनें काम करावयाचा विचार दिसत नाहीं. ईश्वर साह्य *· * * प्रताप आहे. तोच सिध्धीस जाईल. * * * होणें आहे. ईश्वर बरेंच करील. सर्व गोष्टी * * लोक नामीं आहेत. सर्वांस स्वामीचे वाक * * वावी यैसेंहि आहे. राजश्री

---

[1] छाती.

बापूजी भीमराव सरदार हा हिमतीचा बराच आहे; परंतु आपले फौजेंत सरदार आसेत, ते मात्र खातरेंत आणित नाहीत, यैसें दिसतें. पुढें विशेष वर्तमान आलियाप्रा लिहून पाठवीन. राजश्री रघूजी भोसलें आद्याप वराडांत आसेत. येद्यपि राजश्री सिदोजी राऊत वगैरे स्वामीनी पाठविले आहित व त्यांचीं पत्रेंहि सेवेसी लौकरच येतों म्हणून येत असतील, परंतु सत्वर निघून मजल दरमजल स्वामीपासीं पावतील तेव्हां खरें. राजश्री मल्हारबाकडील वर्तमान, जयेनगरचा तह पूर्ववतप्रमाणें करून दिलीकडें गेले, यैसेहि वर्तमान आहे. लिा आले नाहीं. बाजारी वर्तमान आहे. सैदमाखान सलाबतजंग तो स्वामीस समीप आसेत. वरचेवर वर्तमान येत असेल. खानाचे पत्राचें उत्तर पाठविलें आहे. बेगमीच्या थैल्या दोन्हीं प्रविष्ट केल्या. उत्तर आले नाहीं येतांच रवाना करितों. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Bapuji Bajirao and Bapuji Bhimrao, two of the Peshwa's officers were facing Damaji Gaikwad on his march on Poona; their movements are reported in this letter.*

---

*No. 174]* *[March 1751*

**श्रीशंकर**

(पुा) श्रीमंत राजश्री नाना व श्रीमंत
राजश्री भाऊ स्वामींचे शेवेसी.

विनंती. इकडील वर्तमान तर सातारियाहून नित्य वर्तमान डांक बसविली आहे त्याब्रा राजश्री नाना व बापू लिहून पाठवीतच आहेत. स्वामीसहि वरचेवर लिहीतच असतील. त्याजवरून विदित होतच असेल. आमची वातमी कुंपिया[१], आमचे लस्करांत व सातारियांत आहे. तेथील लिहून नित्य येतें. अद्यापिपर्यंत गायेकवाडाची कहीं बंद जाली नाहीं. जकातवाडीचे मार्गें हुमोंडीकडे परलीकडे कही जाऊन दाणादुणा वैरणकाडी आणिते. येकदां इतके दिवसांत दोन दिवस तिकडे फौज आपली गेली होती; तेव्हांच दोन पायली दाणा पांच पाचुंदे कडबा जाला. सारें शहर व लष्कर कालवलें होतें. ती फौज तिकडे राहिली नाहीं; त्यामुळें त्यांची कही नित्य येते. दाणादुणाहि तीन सवातीन पाइली आजपर्यंत होता. चाराहि येत होता. आमचेंहि फौजेंत कोणाचा पायपोस कोणाचे पाई नाहीं; ज्याजवर पडेल त्याजवरच पडेल. त्याणें

---

१ अंतस्थ.

संभाळिली तर बरें; फजित जाला, तर तोच जाला, याप्रकारें तर इतके दिवस जाले. स्वामी आल्याची सलाबत व ही ती मिळोन फौजहि मातबर सरकारची जाली. गायेकवाडाजवळ मातुश्री आईसाहेबाची फौज हशम मिळून फौज सात हजार; पैकी गाइकवाडाचे सोबती हजार दोन हजार चांगलें सामानपोश, बाकी भरती हशम दीढ दोन हजार व आरब ५०० येणेप्रमाणें सारी पुंजी आहे. स्वामीची वक्रदृष्टि जालिया पारपत्य तों सहजांत होईल; परंतु लोक सरदार बोलाऊन दिलदिलासा करून खावंदांनीं पाठीवर जोरबजोर उभे राहून निकड येकदां केलिया फारकच मजकूर होईल. गुंता किमपि नाहीं; परंतु पैकेयाचे स्वार्थावर नजर दिल्हिया पैकाहि देऊन सलूख होईल. परंतु रदबदलीविशीं स्वामीकडील कांहीं मातबर मातबर भीड घालतील; आ(प)ला पट होत होत वसईची गत होईल. * * * रागरंग यथाज्ञानें नजरेस येत * * * * त्याजवरून तर्कें करून लिहिलें असें. चिंता( त ठेवावें). सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Trimbakrao Pethe writes to the Peshwa about the plight of Damaji Gaikwad.*

---

*No. 175*] [*30-3-1751*

**श्रीव्यंकटेश**

**सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी-**
**आलंकृत राजमान्य राजश्री**
**पंतप्रधान स्वामी गोंसावी यांसी.**

पोष्य नारायण व्यंकटराव कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ १३ जोवल पावेतो मोकांम सतरुसी जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. स्वामीनी छ २४ राखरचे पत्र पाठविले ते पावले. तेथे आज्ञा जें. राजश्री दमाजी गाईकवाड याचें व राजश्री बापूचे खानदेशात युध्ध जाहाले. तेथे गाईकवाड याणे येश घेतले. त्यामुले शेर होऊन, पुढें सातारियास जाणार. याकरितां तुम्ही व राजश्री मानापा फौज सुधां राजश्री बापूकडें जाणें, म्हणोन तपसिलें लिा. यैसियांसी पेशजीं आम्हासानिध्ध यावया-विसीं येक दोन पत्रें आलीं. त्यावरून इकडील थोडाबहुत गुंता उरकोन येक मजल आपणांकडे आलों. तों राजश्री त्र्यंबकराव याचें पत्र आलें कीं गाईकवाड कासारबारी चढोन सातारियाकडे यावयाविसी दोन च्यार मजली आला, म्हणोन बातमी आली आहे. तरी तुम्ही व राजश्री मानापा फौजसुधां पत्र पावतेंक्षणी निघोन येणें. त्यावरून छ ७ जमादिलावलीं सातारियास दाखल जाहालों. आम्ही

यावयाचे आगोधर येक दिवस राजश्री नाना पुरंधरे याचें व गाईकवाड याचें युध्य वेण्यातीरीं जाहालें. तेथें स्वामीच्या पुण्यें करून गाईकवाड याचा मोड होऊन शहरांत मोडून घातला. बाजारबुणगे आगदीं लुटले. प्रस्तुत गाईकवाड शहरात मोर्चेबंदी करून आहे. येविसीचें वृत्त राजश्री नाना पुरंधरे स्वामीस लिहितील त्यावरून विदित होईल. आम्हांकडील लोकांचे व माहाराजाकडील हुजुरातीचे व गाईकवाड यांकडील लोकाचे सुकुरवार पेठेंत युध्य जाहालें ते दिवसीं, आम्हांकडील लोकांनी बरीसी खस्त केली. याचें वृत्त, राजश्री नाना लिहितील त्यावरून विदित होईल. बहुत काये लिहिणें, लोभ असों दीजे, हे विनंति.

¶*Narayan Vyankatrao Ghorpade reports the fighting with Damaji Gaikwad.*

---

*No. 176*] [*March 1751*

श्री

विज्ञापना, दावडीपासींच सेनापति येऊन भेटले. सेनापति समागमे घेऊनच गणेगाव सिकरापुराहून, तलेगांवावर ढमढेरियाच्या गेला. जेजुरीस जाणार. तेथें येक दोन मुकाम करून, तेथून सातारियास जाणार, यैसे वर्तमान यैकिले. निबगांव म्हणून पत्री लिा आहे, ते तलेगांवापासीं ढमढेरियाच्या भिमरेवर आहे. कलावे, सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

¶*Damaji Gaikwad meets Dabhade.*

---

*No. 177*] [*7-4-1751*

श्री

आज्ञाधारक आनंदराव गिरिधर त्रिकाली सास्टांग नमस्कार विज्ञापना. छ २१ जमादिलोवल मोकाम करवीरीं स्वामीच्या पुण्यप्रतापे सेवक क्षेमरूप असे विशेष इकडील वर्तमान रा। दादोबाचा कबिले व पाच सात हती व पागा तमाम खारखाना, पाचसें स्वार येकायेक छ १६ तेरखेस तीन प्रहर रात्रीं करवीरास येऊन शहरानजीक पद्मालेवर उतरोन सौ बाईसाहेबास सांगू पाठविले की, श्रीमंताचें लस्कर मुरडोन विज्यापूर प्रांतास येतात. आम्ही धरले जाऊं. याकरिता तुमच्या आश्रयास आलों. आम्हांस आपणानजीक आश्रये पनाला वगैरे स्थली देऊन ठेवणें. मुल्यास पूर्वसूचना नव्हती. चिमणाजी बापू, सुभानजी सूर्यवंसी याच्या पारपत्यास दोन हजार फौजेनसी वारणेवर आहेत. याकरितां सेवकास बोलाऊन आज्ञा केली की, दादोबाचा कबिला आला आहे तर तुमची फौजेस बोलाऊन आमची फौजहि सामील होऊन त्यांस लुटावें. यैस आज्ञा केली.

टाकोटाक बोलाऊ सांगितल्यावर चिमणाजी बापू यास चिठी लेहून फौजेस बोलाविलें. राजश्री करवीरवासी स्वामींनी सेवकाहजूर दादोबाच्या कबिल्यास कोंडाजी भोसल्या हातीं सांगू पाठविलें कीं, श्रीमंताचें आमचा लक्ष येक असतां तुम्हास ठेऊन घेणें युक्त नव्हे. तुम्ही कलेल तिकडे सीघ्र जाणें. यैस साफ सांगू पाठविल्यावर त्यांस धीर न पुरतां येथून तत्समई कूच करोन सूर्योदयास कागलास जाऊन राहिले. चिमणाजी बापूस मुख्यानीहि चिठी लिहून पाठविली होती. दादोबाचे कबिले विशालगडास जाणार हेहि अवाई समजोन हजार बारासें राउतानसी चिमणाजी बापू विशा(ल)गडची वाटेने, पनाला डावा घेऊन रानोमाल येणेस विलंब लागला. छ १८ रोजी प्रहरास येऊन सोला कोसाची मजल होऊन करवीरास दाखल जाले. येथें वर्तमान आलें की, कबिले चिकोडीपार होऊन आबदुल मजितखानाच्या मुलकास गेले. चिमणाजी बापूस रा॥ विसाजीपंत व बालाजीपंत सेवकानेहि सागोन पाठलाग करणेस येथून रवाना केले. खर्चास विसाजीपंती दोन हजार रुपयेदेखील कर्ज करोन दिल्हे. थोराताचा गाव येथून आठ कोस कोगनोलीस जाऊन राहिले. समागमे विसाजीपंतहि गेले होते. कबिले मजल दरमजल चिकोडीपलीकडे गेलियावर यानी कोठवर पाठलाग करावा ? म्हणौन फिरोन माघारे करवीरास येऊन पुना: सिराल्याकडे फौज गेली. काबिले इकडे येताना चिकोडीस दोन रोज राहिले होते म्हणे. चिकोडीकराने खबर मुख्यास अथवा विसाजीपंतास न पाठविली यावरून हरकत येमणांने केलीसी जाली. मागारे जातानाहि आपली फौज देऊन सरहदपार केले. दुसरा मजकूर येसवंतराव गाईकवाड सतरसीस पाठविला होता. मागून मुख्या पत्रे लेहून हुजरे रवाना केले होते. ते गोपालरायाच्या लोकास आडळून वसंतगडी हुजरे नेऊन बसवून, चिठ्या हिरोन घेतल्या. मागाऊन येसवंतराव गाईकवाडहि आले. येऊन आठ रोज जाले. मुख्यांस व सौ बाईस वस्त्रे मातुश्रीची आणिलेत म्हणोन यैकतो. शफतपूर्वक बोली होऊन बेलभंडार घेऊन आलेत. हे सविस्तर रा॥ विसोबानी सेवेस लिहिले आहे. सेवेस विदित होईल. याचा मनोगत सतरसीस जाणेचा फारसा आहे. नाही म्हणवत नाही. गडकरी याचाहि भेद अलाहिदा यास शफतपूर्वक बोलाविले आहे. हेहि अतुर आहेत. रा॥ विसोबासी बहुत ममतेकडोन न जाणेचा अर्थ भाषणामधे दर्शवितात. परतु इतबार नाही. हरयेकाचे मुखे जाणेचा निश्चेय यैकिला जातो. वरकड अंतरबाहे रानी लिहिला आहे. सेवकास आढलले व यैकिले वर्तमान सेवेस लिहिले. श्रुत होये हे विज्ञापना.

*Anandrao Giridhar, the Peshwa's agent at Kolhapur, sends news of the attitude of King Sambhaji, his friendship for the Peshwa, and his refusal to shelter the Pratinidhi's wives, who thereupon sought shelter at Savanur.*

No. 178] [31-3-1751

**श्रीनिवास.**

सेवेसी विज्ञापना विनंती. येथील क्षेम चैत्र वदि प्रतिपदा रविवार दोन प्रहर मो। लस्कर नदीतीर नजीक काडलूर संगम येथास्थित आसे. स्वामीनी कृपा करून पत्र पाठविलें ते राजश्री राव वजारतमाहा यांकडील बावाखानासमागमे व सरकारच्या स्वारासमागमें आजी याच समई पाऊन सविस्तर आर्थ अवगत जाहाला. स्वामीचा मुकाम गद्वालापासी आजी होणार, यांस सत्वर घेऊन येणे म्हणून निरोपिलें त्यावरून व त्यांसहि पत्रे होतीं, त्याप्रमाणे स्वामीचे दर्शनाचा योग त्वरेनें व्हावा तर तुम्हीहि येक मजल पुढें उदईक चला; तिकडोन श्रीमंतांचें आगमन होऊन सीघ्र भेटी होतील, यैसें सांगतांच राजश्री राव वजारतमाहा बोलिले कीं, येथें मार्ग पाहण्यापेक्षा आणखी येक मजल उदईक कूच करून पुढें येतों. आम्हांस परम उत्कंठा त्याचे भेटीची यैसे बोलिले. उदईक यांचें कूच आहे. येक मजल येथून नदीतीरेच येऊन मुकाम करितात. तिकडून स्वामीचें आगमन होऊन भेटीचा योग कोणे ठिकाणीं, कोणे दिवसीं, हे निश्चयात्मक आज्ञा करावी. उदईक तो कसा योग घडेल ? परवा व्यतिपात म्हणतात. यांत जेव्हा स्वामीचा यांचा भेटीचा योग तोच सुमुहूर्त. परंतु यांस सुमुहूर्तें दर्शन घेतलें पाहिजे. याउपर जसी स्वामीची आज्ञा. यां कडील बातमी सातारियाची आली, त्याचे वर्तमान दमाजी गायेकवाड सातारियास पावले. मेढ्यावर राहिले होते. राजश्री नाना व बापू बाजीराव समस्त स्वामीकडील सेना वडुथावर आहेत. जुज जालें. दोहीकडील लोक जायां जाले. कायेम होऊन मागती जुजास सिध आहेत. फाल्गुन बहुल चतुर्दसी शुक्रवारीं जुज जालें. फार सरस लोकीं मेहनत केली. प्रताप स्वामीचा. खुद सेनापतीवर जखमा, दमाजीसहि जखमा चिलखतावर, म्हणून सांगत होते. सेवेसी विदित व्हावयास्तव लिहिले असे. तेथें सविस्तर वर्तमान आलेंच असेल. तैसेच सातारियाहून मातुश्रीकडून तो पत्रावर पत्रे व करवीरची पत्रे वरचेवर येतात. सर्व आर्थ दर्शनाअंती विदित होईल. यांचे लक्ष स्वामींच्याच ठाई पूर्ण आहे विज्ञापना.

*The letter describes a skirmish between Damaji Gaikwar and Nana (Purandare) and Bapu Bajirao at Vaduth near Satara.*

---

No. 178A] [1-4-1751

**श्रीगणराज**

सेवेसी सां नमस्कार. कृतानेक विज्ञापना, ता। छ १६ जमादिलावल मोंकाम वेण्यातीर नजीक सातारा, स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान येथास्थित असें

विशेष. इकडील वर्तमान फाल्गुन वद्य चतुर्दसी शुक्रवारी दमाजी गाईकवाडाचे युध्य जालें. स्वामीच्या पुण्येंचकडून दमाजीचा मोड जाला. प्रस्तुत दमाजी म्हारदरियांत आहें. शाहारांतहि जागांजागा चवक्यांची बंदोबस्ती आहें. जेथें राहिला आहे तेथेंहि जाऊन बुडवावयास उसीर नाहीं; परंतु येथील विचार येक प्रकार जाला आहें. येकांत येक नाहीं. येकाचा भरवसा येकास नाही. येवि-सींचा खुलासा सेवेसी राजश्री त्रिंबकराव मामानी लिहिला आहें त्यावरून सेवेसी विदित जालेच असेल. कहीमुलें मुलुखहि खराब जाला आणि येथीलहि गुंता सत्वर विल्हेस लागतां दिसत नाहीं. आपणहि शाहास गुंतले. तिकडील शाहा उरकला असला तरी जलदीनें यावयाचें करून आधीं आपली बंदोबस्ती करून मग जे कर्तव्य ते करावें. आजीतागाईत फारच गडबड जाली असती परंतु स्वामीचेंच पुण्येकडून पराभव जाला. येरवी ते दिवसीं युध्य होऊन दमाजी मोडावा यैसें नव्हते; परंतु पुण्य समर्थ यास्तव होऊ आलें. आतां आपण आल्याखेरीज काम विल्हेंस लागतां दिसत नाहीं. या समयात आपण आलें तरी सारे कर्ज फेडून पुढीलहि बेंजमी होईल. आम्ही सेवक ह्या गोष्टी लेहूं नयेत परंतु आम्ही केवल सेवकच नव्हें. यास्तव सेवेसी विज्ञति लिहिली आहें. या समयांत खामखा यावें. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

¶*The writer (Patwardhan ?) describes to the Peshwa how Damaji Gaikwad was defeated near Satara.*

---

*No. 179*] [*2-4-1751*

छ २६ जमादिलोवल.

श्री

श्रीमंत राजश्री रामचंद्र बावा
स्वामीचे सेवेसी.

सेवक विसाजी नारायेण कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील वर्तमान चैत्र वद्य त्रितीया भोमवासर पर्यंत येथास्थित असे विशेष. अलीकडे पत्र येऊन परामृश होत नाहीं ऐसे न करावें. सदैव पत्रीं परामृश केला पाहिजे. यानंतर इकडील वर्तमान तरी पेशजी श्रीमंतास व आपणास लिहिलेच आहे त्यावरून श्रृत जाहालेच असेल. अलिकडील वृत तरी सतरूसीची राजकारणे येथे उजाड येतातच. कळणेस चुकत नाहीत. आमचे हातून जे होईल ते करीतच आहो.

मुख्य गोस्ट श्रीमंताचे आगमन जाहाल्याने सर्वही विचार उतमच घडोन येईल येविसी सविस्तर श्रीमंतास विनंती लिहिली आहे त्यावरून कलेल. बहुत काये लिहिणे कृपा निरंतर आसो दीजे हे विनती.

¶*Visaji Narayan to Ramchandra Baba, saying that the arrival of the Peshwa would clear up many of the issues at Satara.*

---

No. 180] [4-4-1751

श्री

राजश्री पंतप्रधान गोसांवी यांसी

०॥ॐ

श्रीमंत सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरंतरभगवदनुसंधान सावधान श्रो माहाराव जानोजी जसवंत निबाळकर दंडवत विनंती उपर. येथील क्षेम ताा छ १८ जावल गुरुवार दोन प्रहर मुाा भागानगर जाणोन निजानंद लेखन कीजे विशेष. आपणांपासून निरोप घेऊन दर मजल नवाब-साहेबांपासीं येऊन पोंहचलों. रावळी हातरोखा (रा) ज्या रघुनाथदास यांस लिहिला होता तो मजकूर मुफसल राज्याजीस सांगितला. त्यानी सर्वस्वें साहित्य करावें हे गोष्ट मान्य केली; बोलले कीं श्रीमंतीं आम्हांवर कृपा व लोभ केला तेव्हांच आपलें चित्त फार प्रशस्त जालें. आपण श्रीमंताच्या व आपल्या स्नेहांत श्री सीताराम मध्यस्त दिधला. आतां जें तुम्हीं सांगाल तें साहित्य सर्वस्वें करून. श्रीमंताचा लोभ व कृपा आम्हावर दिवसेंदिवस विशेष होयेसें केलें जाईल, ऐसी गोष्ट आधींच निश्चयात आणिली. आपला हात रोखा दिधला नवता कारण हेंच कीं राजश्री भगवंतराव राम यांची प्रतीक्षा होती, माानिले आल्यावर माानिलेस रुक्यासहित राजश्री गोविंदरावजी वकील यांसमागमें राज्याजीकडे पाठविलें. राज्याजींनी आपलें हस्ताक्षरपत्र पाहून बहुत संतोश पावले. बोलले कीं, लिहिल्याहून चौगुणी कृपं करून साहित्य करितों. श्रीमंताचा बोलबाला पूर्वीच श्री नें केला आहे; आतां श्रीकृपया विशेष होयेसें करितों. तूर्त पांच हजार स्वार व मैतालब मोहिदींखान व हजार बाण व जजायेलबारदार व फौजेच्या खर्चास खजानासहित फलना म्हणजे आमच्या तैनात करून रावळांकडे रवाना करितों व राा हणवंतराव निंबाळकर यांस लिहितों कीं तुम्हीं फलानियापासि जाऊन पोहचणें. तैसेंच सैदलस्करखांजीस लिहितों की बाा फौज आहमद-नगराच्या मार्गें जाणें. येवेंच तुम्ही व सैदलस्करखान व हणवंतराऊ थैसे पुढें जल्द पोहचावें. जर तुमचे मानस आसल तर आपणहि दरकूच सातारियास

येऊन फिरंगियाहातीं सातारा घेऊन, सा. ताराबाईस ठिकाणी लावितों. तेथें गायेकवाडाची कथा काये? आपण यावज्जन्म जुबानी ज्यासीं जें बाललों तें श्रीकृपेने तद्नुरूपच होऊन आले. श्रीमंतांस तों श्रीसीताराम दरमियान दिधला आहे, त्याचे दयेकरून श्रीमंतांचा बोलबाला आहे तो विशेष करून दाखवितों ऐसें निश्चयेपूर्वक बोलले. त्याप्रमाणेंच आवलंबे आमलांत येईल. आजी नवाबसाहेब आम्हास याच कार्यास रुखसत करायास त्रितीये प्रहरीं आमच्या डेरियास येणार. विदित होये हे विनती.

¶*Janoji Nimbalker in his characteristic figurative style informs the Peshwa that the letter addressed to Raje Raghunathdas has been handed over to him and that accordingly he has asked Mohidikhan, Hanmantrao Nimbalker, Sayyad Laskhar Khan and the writer himself to proceed to the Peshwa with their forces. Even the Nizam himself, the writer says, is coming to his camp to give him a send-off. Raghunathdas with the help of the French, hopes to reduce to subjection Satara along with Tarabai and Gaikwad.*

---

*No. 181*] [*15-4-1751*

**श्री.**

विनंति उपर. छ २३ जमादिलावली निरोप जाल्याचें वर्तमान लेहोन पत्रें पाठविलीं पावलीं असतील. छ २८ जमादिलावलीं येथें(र्थे न)गरीहून[१] कुचे केले ते लोकसमूहग्रामीं मुकाम जाहला. छ २९ सोमवारीं रजकपेठवर राहिलो. छ ३० भोमवारीं पटकार पेठवर मुकाम सौम्येवारी भूगर्भनगरीं मुकाम होईल. पुढें दरमजल आपणाकडे येत असों. हळू हळू कां येतां ऐसें म्हणाल तरी अद्याप ताब्रशेना झाडून आली नाहीं. बाणदार व जेजालबारदार समागमीं घेऊन यावयाविसीं संकेत होंताच मुल्यानीं आपल्या श्नेहावरी द्रिष्ट देऊन अधिकोतर सरंजाम फौज समागमे दिधली. फौज बरोबरच आणावी किंवा एखादे स्थळीं कांहीं दिवस ठेवावी ऐसे लिा होते, त्याचे प्रतोत्तर लेख(ना)त आलें नाहीं. ताब्राचे फौजेविशीं काये चितास येईल तें लेखन करावे. पूर्वी सेभर बाणाच्या कैच्याचा मजकूर लिहिल्यांत आला आहे. त्यास सरकारातून उंटाचा सरंजाम होऊन न आला. यास्तव पनास उंट बाण कैच्या व दाहा उंट दारू व दाहा उट सिसे येकून सत्तर ऊट आम्हासमागमी आहेत. हे मुल्कगिरीस पाउनेदोन वरसे जाहली. चिताचा मनोदय की अंती सत्वर गावास जावे. त्यास नवाबसाहेबी रावळाकडे आम्हास रवाणा केले आहे. मार्गाचा विचार मनास आणितां देशाहून वाट आधी गावास जाऊन आपणाकडे यावे किंवा आपणाकडे

---

१ भागानगर?

येऊन मग गावास जावें येविसी जे चितास येईल आणि आम्हास लेहोन पाठवाल त्याप्रमाणें वर्तणुकेंत आणिजेल. रावळीं कासीद पाठविला तो बहुत जलद. साडे ती रोजा येथें येऊन पावला. इनाम जलद पोहोंचला म्हणून दिल्हा पाहिजे.

¶*Janoji Nimbalker to the Peshwa, saying that he is due to arrive shortly. The delay, he says, is due to the Mogal army. He further gives details of ammunition with him.*

---

*No. 182*] [*16-4-1751*

श्री

राजश्री पंतप्रधान गोसावी

यासी

•॥ॐ

श्रीमंत सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरंतरभगवदनुसंधान सावधान श्रो माहाराव जानोजी जसवंत निंबाळकर दंडवत विनंती उपर येथील क्षेम ता छ ३० जावल मंगळवार जाणोन निजानंद लेखन कीजे विशेष. आमचें पत्र पावल्या आगोधरील पत्र १ व पत्रोत्तर येक ऐसी दोन पत्रें पाठविली पावली. गेलियाताा पत्र न पाठविलें म्हणोन लिहीलें. तर आपण लस्करास आल्यावर गोसावी यांच्या जासुदा समागमें पत्रें पाठविली. न पावलीं यास उपाये नाहीं. दुसरे पत्री मजकूर कीं राजश्री राजे रघुनाथदास उमदे आम्हांसी येकवर्ण श्नेह राखतात हे तुमच्या सांगितल्यावरून निश्चयास आलेंच होते. सांप्रत्य त्यांनीं सेनेसहवर्तमान तुम्हास मार्गस्त केलें यावरून फार संतोश जाला व त्याच्या श्नेहाचा दृढभाव कळूं आला ऐसे लेखन. ऐसियासी आपण जें लिहिलें तदनुरूपच श्नेह धरितात. थोडे साहित्य समयास आल्यां फार उतम. साहित्य फारा दिवसां आल्या उपयोगी काये ? ऐसा पत्राशये. तर आपल्या मनोगतानुसार आविलंबेच येऊन पोंहचतों. पांचा लक्षा रुपयाचें वर्तमान तर राजश्री राघोपंतांच्या पदरी घातले. आपणांकडील वरातदारांस पैका पाऊन उरल्या पैकियास भाडियाचे बैल करावे तर भाडें फार मागो लागले व बैलांत शक्तहि नाहीं यास्तव लाखा रुपयांचें वोझें आम्हाकडे आले. 'आंगावर आल्यां गोणी बळी चढे दुणी' या न्यायें घ्यावेंसे जालें. राा भगवंतराव राम यांच्या स्वाधीन पऊण लाख रुा केले. राहिले ते राघोपंतानीं चालवावेसें मान्य केले. सारांश सैनेसहित व धनयुक्त सत्वर येतों. भागानगरच्या रुपयाचे वर्तमान तर आपला वकील खुदावंदखानापासी होता

त्याने परवाने आपल्या जिमे कबूल करून घेऊन भगवंतराव राम यांच्या नावें लिहून दिधलें की पैका घेऊन येतों. आटकाटचा मजकूर राज्याजीनीं सांगितलें कीं शामरायानीं येथें राहावें, पैका आणवितों. रावमानिले बोलले कीं आपणांस पत्रें द्यावीं, आपण तेथेंच जाऊन पैका घेऊ. याप्रमाणे विल्हे लाविले हे विनंती.

¶*Janoji Nimbalker to the Peshwa, saying that he will soon join the addressee with men and money.*

---

*No. 183*] [*18-4-1751*

**श्री**

**राजश्री पंतप्रधान**

**गोसावी यांसी**

०॥ॐ

श्रीमंत सद्गणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरतरभगवदनुसधान सावधान श्रो माहाराव जानोजी जसवंत निंबाळकर दंडवत विनंती उपर. येथील क्षेम ता छ २ जाखर गुरुवार मुा नजीक बेदर जाणोन निजानंद लेखन कीजे विशेष. छ २५ जाखरचीं पत्रें पाठविली ते कुहीरचे मुकामी पावली. जासुदास इनाम रुा १० दाहा द्यावे व जलद यावें म्हणोन लिहिलें. तर जासूद कराराप्रमाणे न पावला. दिरंगे कांहीं येक आला म्हणोन रुा ५ पांच इनाम दिधला. यावयाचा मजकूर तर आम्हांपासीं बाणाच्या कैच्या ५० पनास येऊन पोहचल्या व पांचसे जजायेलआंदाची दस्तक आली तेहि येतील व तालब मोहिदींखान बमै पांच हजार स्वार व वीस तोफा समागमें नेमिले आहेत त्यानीहि शहरीहून कू[च] केले. आपल्या लिहिल्याप्रमाणें येऊन पोहचतों हे विनंती.

¶*Janoji Nimbalker to the Peshwa, informing him that he is proceeding to him by forced marches. The writer further says that Mohidikhan has also started from Aurangabad.*

---

*No. 184*] [*19-4-1751*

**श्री**

**राजश्री पंत प्रधान**

**गोसावी यांसी.**

०॥ॐ

श्रीमंत सद्गणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरंतरभगवदनुसंधान सावधान श्रो माहाराव जानोजी जसवंत निंबाळकर दंडवत विनंती उपर. येथील

क्षेम ता। छ ३ शुक्रवार मु।। नजीक मैलारपूर ऊर्फ पेंबर बेदरापुढें च्यार कोस जाणोंन निजानंद लेखन कीजे विशेष. हस्ताक्षरमंडित आपली पत्रें तीन आली कीं आती सत्वर येणे. हे वर्तमान राजश्री राज्या रघुनाथदास यांस लिहिलें कीं आपणांस श्रीमंती सत्वर बोलाविलें आहे दर मजल जात आसो. तैनाती फौजेचा मजकूर पनास कैच्या बाण व वीस उंट दारू गोळी आम्हांपासीं येऊन पोहचली व पांचसे जजायेलबारदार यांची तैनातीची दस्तक आली तेहि येतील. तालब मोहिदींखान पांच हजार स्वार व वीस तोफासहित शहरीहून निघाले, चालले, येतात, हे वर्तमान काल रावळाकडील च्यार युग्मासमागमे लेखन केले आसे. सारांश श्रीमल्लेखनानुसार येऊन पोंहचतो. कृपा वर्धमान कीजे हे विनंती.

¶*Janoji Nimbalker to the Peshwa, informing him that he himself is proceeding to Satara as per his instructions and that he has written to Raghunathdas also to start with his army.*

---

*No. 185*] [*19-4-1751*

**श्रीगणराज**

सेवेसी गोपाल गोविंद, पुरुषोत्तम कृष्ण साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ३ जमादिलाखर संध्याकाल पावेतों स्वामीचे कृपाकटाक्षें सेवकाचें वर्तमान येथास्थित असें. स्वामीनीं छ २६ जमादिलावलचीं पत्रें राजश्री नानास व साऱ्यां सरदारांस पाठविलीं तीं आजींच प्रातःकालीं पावलीं. कालीं दमाजी गायेकवाड बाहेर आले होते. युद्ध जालें. तें सविस्तर वर्तमान राजश्री नानानी लिहिलें आसेल त्यावरून विदित होईल. चाकरी कोणकोणाची जाली ते स्वामीनी परस्परें आइकिलें असेल; आणि स्वामीचें आगमन येथें जाल्यावर सारें लस्कर व राजश्री नाना निवेदन करितील. कागदांत ठाणेचें संकट लिहावयाची आज्ञा करावी. तीर्थस्वरूप राजश्री रामचंद्रपंत कैलासवासीचें (वंशाचें?) ईश्वर (वाईट?) करणार नाहीं. येक रामचंद्रपंत गेले. आम्ही पांच सात रामचंद्रपंताचें जागां आहों; मरून बरें म्हणऊं, परतु पळून स्वामीस तोंड दाखविणार नाहीं! बाहादुरपुऱ्यावरील झुंजी सारे लोक जमा नव्हते. आठशें होते, परंतु तेथेंहि साहिबचाकरी उत्तमच जाली ईश्वरी कृपेनें. स्वामीहि आले. येथें दमाजीसच पुसावें आणि चाकरी होऊन आली असेल त्याची पाठ थोपटावी हेंच इछितों. त्याणेंच आम्ही मारायामरायाची उमेद धरूं, उमेदीप्रमाणें सेवाहि करूं. मजला तों पत्र लिहिलें नाहीं. सर्वदां स्वामीनी सांभालित असावें. बहुत काय लिहिणें, हें विज्ञापना.........

¶*Gopalrao Patwardhan informs the Peshwa how very eager he is to serve him and how he behaved during the war with the Gaikwad.*

No. 186] [20-4-1751

श्री

श्रीमंत राजश्री नाना व श्रीमंत राजश्री
भाऊ स्वामींचे सेवेसी

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील वर्तमान ता छ ४ जमादिलाखरपर्यंत येथास्थित असें विशेष. स्वामीनी कासी-दासमागमें पत्र पाठविलें ते पावले, लिहिले वर्तमान कललें. हशमी लोंक व दारूगोली व जेजाला बाण गरनाला वगैरे सामान सातारियांस पाटवणें, म्हणोन आज्ञा; त्यावरून मागेंच हशमी लोक कांहीं सातारा रवाना केलें. वरचेवर लोकाची रवानगी करीतच आहो. जेजा * * * रवाना केल्या. आणिख सामानाच्या तर्तुदेत आहो. तयार करून रवानगी करितो. साकल्य वृत साडणीस्वाराबा सेवेसीं लिहिले आहे. त्यावरून सविस्तर विदित होईल. बहुत काये लिहिणे, कृपा केली पाहिजे. हे विनंती.

¶*Trimbakrao Vishwanath writes to the Peshwa that he has sent troops to Satara.*

---

No. 187] [21-4-1751

श्री

राजश्री पंत प्रधान
गोसांवी यासीं

०॥९

श्रीमंत सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरंतरभगवदनुसंधान सावधान श्रो माहाराव जानोजी जसवंत निंबाळकर दंडवत विनंती उपर. येथील क्षेम ता छ १ जाखर मु॥ सांकूळ जवळगें जाणोन निजानद लेखन कीजे विशेष. शुक्रवारी मिसलकुंडियाहून मल्हारीच्या प्रेमपुरी ऊर्फ पेंबरी आलो, हे वर्तमान पूर्वी लिहून पाठविलेंच आसे. काल शनिवारीं पेंबरीहून वांजरातीरीं बारा कोस मजल जाली. आजी कूच करून दाहा कोस सांकूळ जवळगियासी येऊन पोंहचलों. विदित जालें पाहिजे. सारांश आपल्या लेखनानुसार येतों. विशेष लिहिणें लिा. कृपा वर्धमान कीजे हेच विनती.

¶*Janoji Nimbalker gives a list of his halting-places during his march towards the Peshwa.*

No. 188] [21-4-1751 ?

श्री

श्रीमंत राजश्री नाना तथा श्रीमंत राजश्री
भाऊ स्वामीचे सेवेसी.

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा छ ९ जमादिलाखरपावेतों, येथास्थित असे विशेष. स्वामीची पत्रे छ २० जमादिलोवलचे येक, व छ २५ मिनहुचे, व छ २७ जमादिलोवलचे येक, येसी तीन पत्रें रवाना केली तीं छ ४ जमादिलाखरी पावोन सविस्तर वर्तमान कळलें. सातारियाहून राजश्री नाना व बापू लिहीतील त्याप्रो हशम दारू गोल्या होकें[1] गरनाला हें सामान पाटऊन देणें, मजल दरमजल आपणहि येत आहो म्हणोन आज्ञा. आज्ञेप्रों सामान व हशम पाटवावयाचे ते वरिचेवरी रवाना करीतच आहों. तोफा रवाना करावयाची आज्ञा आली म्हणजे रवाना करूं. हशमात शाहाणा माणूस सारेयांस आळ्यांत (आपल्यांत ?) वर्तवी, ऐसा असावा म्हणून राजश्री दिनकरपंतासहि आज उद्या रवाना करितो. बहुत काये लिहिणे, कृपा केली पाहिजे, हे विनंती.

¶*Trimbakrao Viswanath writes that he is sending ammunition to Satara and that Dinkarpant will start within a day or two.*

---

No. 189] [25-4-1751

श्री

राजश्री पंतप्रधान गोसांवी यासी

०॥६

श्रीमंत सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरंतरभगवदनुसंधान सावधान श्रो माहाराव जानोजी जसवंत निंबाळकर दंडवत विनंती उपर. येथील क्षेम ताा छ ९ जाखर मुाा तुळजापुर जाणोन निजानदलेखन कीजे विशेष. आपण पूर्वी लिहीलें होतें कीं आती सत्वर येणे निदान येकलेच तऱ्ही आविलंबें यावें. त्यावरून त्या..................दीड.........पाहून पाहतां दर मजल मुाा मजकुरास येऊन पोंहचलो. खान मानिले दरकूच चालले; येतात. आफवाही वर्तमान यैकतां कीं आपण काही फौज पर्वताकडे मार्गस्त करून आपण भीमातीरें पुणियास जातात. आम्हांस तों लिहिले आहे कीं करमाळियास न जातां यावें.

---

[1] होकें किंवा हुक्के = बंदुकीचा प्रकार.

आपण भीमातीरें जातात यास्तव दुग्घा निर्माण जाली कीं आम्हीं करमाळियास जाऊन यावें कीं न जातां यावें हे लिहावें व आम्ही यणें तर कोणत्या मार्गे यावें व खान मानिलेस कोणत्या मार्गे बोलावावे किंवा कोठें ठेवावें हे विस्तारें लेखन जाल्या, तदनुसार वर्तणूक केली जाईल. विशेष लिहिणें हेच विनती.

¶*Janoji Nimbalker to the Peshwa, saying that he has learnt that the Peshwa is proceeding to Poona by the Bhima river. The writer therefore could not decide whether he should go to Karmala or not. He asks for definite orders.*

---

*No. 190*] [*26-4-1751*

**श्री**

आज्ञाधारक आनंदराव गिरिधर त्रिकाली साष्टांग नमस्कार विज्ञापना. छ १० जमादिलाखर खावंदाचे पुण्यप्रतापें सेवक क्षेमरूप असे विशेष. इकडील वर्तमान मातुश्री ताराबाई व दादोबा व गाइकवाड व गडकरी याकडोन बेलभंडार व इमानप्रमाण वस्त्रें व जवाहिर याच्या मुद्याप्रमाणे करार अगदी होऊन आला आहे. मातुश्रीचा कारकून यास नेणेचे मोहसलेस[१] नेहमीच आहे. राजारामास मारावे, गडचे हवालदाराचा लेक यापासीं गाहण राहवयाखेरीज आणखीं याच्या चितानरूप जे जें असेल तेहि उगवणी करावी म्हणौन आतुरता. मा(तु)श्रीस यांस पाषाणास नेणेची बहुत आहे. यैसियास यानीं विसोबा व शेषोनारायण श्रीमंताकडे रवाना केले आहेत. तो सबब मातुश्री वगैरे संदर्भिकाकडोन आमची निशा चितानुरूप जाली असतां तुम्हास नकलत जावें तरी तुमच्या करारास अंतर पडेल. याकरितां श्रीमंताकडोन त्वरेनें हेच कार्य मनोभिष्टीचें होऊन आले तर उतम. नाहींतर आपण पाषाणास जावें; हा निश्चय करून क्षेपनिक्षेप श्रीमंतासी जाबसाल शेषोपंतानें करावा अथवा प्रसंगानुरूप पाषाणाच्या राजकारणाची निशा आमची असतां हेहि टाकून श्रीमंताचे ममतेस अंतर पडेल म्हणोन येहसान[२] निदर्शनास आणावें. येणे करितां आपणास श्रीमंत सिघ्र राज्य प्राप्त करितील. समरसीचा तह हरगीज[३] होत नाहीं. दमाजी गाइकवाड व दादोबा वगैरे लोकानीं यास लिहिलें कीं मातुश्री समागमें इतकेहि जीवावर उदार होऊन खपून जाऊ. परंतु तह करीत नाहीं. पुराणिकाचा आग्रह फार करून नासाडीवर आहे. दमाजीस कोंडू(न) लस्कर लुटतील अथवा दमाजी धरोन

---

१ मसलतीस. २ कृपा, उपकार. ३ बिल्कूल.

न्यावें, शहरहि लुटावें, गडास मोर्चे लाऊन वरषसामहिने शहराभोवती पनास हजार फौज ठेऊन, श्रीमंत बहुत आग्रह करतील तर निदानी राजारामास मारोन दोनच्यार असाम्यानी जहर घेऊन्न मरावें. परंतु तह न करावा यैसे परिछिन भाषण अपवादाचे जिव्हाल्सुद येथें मातुश्रीनी सांगोन पाठविलें कीं निमित्य यास विश्वास बसून याचें आगमन त्वरेनें पाषाणास व्हावें. याप्रकारें मातुश्रीनी कितेक प्रकारे यास भरी घातले आहे. याचें चित गंतव्यास उद्विग्नहि आहे. मातुश्रीचा इतबारहि नाहींसा शपेपंज[१] जाला आहे. यांच्या करारास येक मात्र मुख्यास घाताचे बाकीस मातुश्रीच्या चितातील भावगर्भ याच्या आगमनास राजारामाचा नाश करावा तर दुही तुटली. श्रीमंतानीं ममता करवीरवासीकडे लाविली. अनायासें त्यास हे गोष्ट इष्टप्रातास येईल आण क्रित्रीम भाव आपल्या पदरी पडेल. यास्तव मातुश्री हे कर्म अवलंबित नाही. गडकऱ्यांच्या मनांत श्रीमंतासी आपण फारच मवासी केलों. आपलें पारपत्य श्रीमंत कालकाला करितील हा निश्चये समजोन मातुश्री व राजाराम आहेतच. करवीरवासीसहि हरइलाजे आणून बंदीत येके ठाइ अवघे राजे ठेवावे म्हणजें श्रीमंतास मनसबा भारी पडेल, याकरिता निर्नासिक व गडकरी व गाईकवाड फंद करोन यास पाषाणास खामखा न्यावें म्हणोन भगीरथ प्रयेत्न करितात. हेहि पुना: येसवंतराव गाईकवाड रवाना करणार याच्या निशेष येईल तो उपाये करावा. परंतु यास उचलोन पाषाणास न्यावे म्हणोन वरच्यावर रोज बरोज पत्रें व कारकून यांचे झट लागलेच आहे. शेपेपंत श्रीमंतासी क्षेपनिक्षेप जाबसाल पुसावा की सीघ्र श्रीमंतास इकडे आणावें. अथवा यास पुण्यास न्यावें. सिका करावा. दोनी राज्यांत याची मुद्रांकित पत्रें प्रेशावीं हाच निश्चये श्रीमंतास पुसावें. सीघ्र हा मजकूर श्रीमंत करितील तर उतम; नाहींतर आपण पाषाणास जातोंसें स्पष्ट बोलावें. स्नेहभावहि यांत निदशर्नास येतो. यणे करितां येहसानहि श्रीमंतावर होते या भयें कडोन आपली श्रीमंत आपली मनोभीष्टहि सिध्दीस नेतील. असे कितेक मनसबे योजून सिरोपाव देऊन पाठविले आहेत. येथें लौकिकामध्यें हा मन(स)बा द्रिष्टीस आला कीं पाषाणाकडील निश्चयात्मक राजकारण टाकून श्रीमंतासी ममता राखून बोलाविले आहे. अगदीं इकडील बंदोबस्तेचा येख्तियार श्रीमंतास देणार. श्रीमंतहि यास राज्य प्राप्त करणेस इकडे आग(म)न श्रीमंताचे होतें यैस आबालवृध असेच भाषण करतात. परंतु याचे चितवृत अगदीं लक्ष मातुश्रीच्या संधर्भावर आहे. अगदी क्रित्रीमभाव. या पासोन कोणती विद्या क्रितृमाची गेली नाही. कदाचित

---

१ संकट.

श्रीमंताचे आगमन इकडे जाल्याने भेटीचे ठाई बहूत सावध होहून भेटावें. मातुश्रीची येतराजी व यांची सरफराजी समानच आहे. यासी लटके धातु-पोषणाचे पत्रे वस्त्रें पाठऊन यांचप्रमाणें दूरदूरच्या ममता राखून गडकिले बाकीस राहिले ते घेऊन आज उदिया मनोभीष्ट सिधी होईल म्हणौन कार्य करावे. यापासी येऊन मुजरा करोन वस्त्रें घेऊन याचे म्हणविल्यानें लुर्तफ[१] नाहीं. याचें बुधीस-आयुष्य नाहीं. घटकेवटकेस मनसबे अलाहिदे. परंतु इतकेहि अनिष्टाचे कदाचित हाहि मनसबा श्रीमंत करितील तर प्रकृती वितरिक्त पुरूष लगामी लागेल यांत संशये नाहीं. प्रस्तुत मातुश्री ताराबाईच्या मतें बाबूजी नाईकहि या राजकारणांत आहेतसें जनवार्ता आहे. येथें याच्या पाषाणास जाणेच्या उत्कंठतेस सौ बाईचा जिव्हाल्याचे भगवंतपंत म्हणौन आहेत त्यांकडोन बाईस सांगऊन पाषाणास जाणे न होय ते करणेस, मनसबा चोरणेस सांगितले आहे. तर श्रीमंताची * * त्याचें नांवें येक पत्र श्रीमंतानी स्वहस्ताक्षरें श्नेहभावममतेचा मजकूर सारांश मुख्यांचे जाणें सतरुसीस जाणें न होय ते करणें. पुढे कितेक श्नेहवादाचा मजकूर बाईस श्रुत करणे म्हणोन लिहिले पाहिजे. तमाम कारकुनापेक्षा भगवतपंत इतबारी आहेत. त्यास सेवकहि सांगतो की तुम्हावर श्रीमंत बहुत कृपावंत आहेत. पुढें कार्यामुळे तुमची सरफराजी होईल. श्रीमंतानी थोडा बहुत उपचारें करोन लिहिलिया त्यांस विस्वास बसेल. मातुश्री राजसबाई दुःखणें येऊन अवस्था फार कठीण जाली आहे. आज उदिया प्रयाण करणार आहेत. मुख्य सौ बाई व उमाबाई रात्रदिवस मातुश्री सनिधच असतात. गोदाने देखील दिली. वर धाप लागली आहे. अंतकाल समीप आला आहे. याकरितां राजे परमश्रमी आहेत. त्याच्याहि शरीरास सावकाश नाहीं. वाडियांत रावता नाहीं. कारबार अगदीं बंद जाला आहे. मातुश्री आजउदिया परलोकास जाणार. घटके दोन घटकेवर अवध जाली आहे. बाजीराव बावडेकर याचे दोनतीन गाव यानी ठाणी घेतली. यास बावड्यामधे हजार बाराशे हशम पाचशे राऊत जमा जाले आहे. आजउदिया करवीरावर स्वारी करोन पेठा जाल्याच्या म्हणतात. यांचेहि दोन च्यार खेडी मारोन अग्नसंस्कार करोन लुटोन पस्त केली. बखेडा करणार फार म्हणोन यैकतों. मुख्यानी सांगो पाठविले कीं मुबादल्यास दोनतीन खेडी देतो. सलुख करोन राहणे. स्वारी न करावी. बावडेकर म्हणताहे की आपली ठाणी दिल्याने सलुख. हेहि इरसेस पडले आहेत. ठाणी देत नाहीत. सिरालेकर पार्वतीबाईकडील देवजी सुभानजी सूर्यवंशीचा भाऊ

---

१ मेहेरबानी.

अद्याप ताराबाईकडील राजकारणांत आहे. हे पार्वतीबाईस ठाऊक नाहीं. सिराळेकरास बुडऊ च्याहतेत, यैकिले व आढलले वर्तमान सेवेंस कचे वर्तमान लिहिले आहे. श्रुत होय हे विज्ञाप्त.

¶*This is an important letter which appears to be addressed to the Peshwa by his informant at Kolhapur. It reveals intrigues within intrigues for setting aside Ramraja and placing Sambhaji on the gadi. There was another intrigue of Tarabai with Sambhaji to remove the Peshwa from power with the help of Damaji Gaikwad and the Pratinidhi. More information is necessary before any definite assertion can be made to clear up the complicated situation. Matushri Rajasbai mentioned in the letter as being on her death bed must be the mother of Sambhaji, wife of Rajaram the 1st. There is no mention of her having died any time before this.*

---

*No. 191*] [*27-4-1751*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे शेवेसी**

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ ११ जाखर पर्यंत स्वामीचे कृपे करून सुखरूप असो विशेष. काल गायेकवाड शरण येऊन भेटलियाचे वर्तमान श्रीमंती लि।. बहुत संतोष जाला. स्वामीचे सेवेसी मागेही पांच सात पत्रे पा। परंतु कृपापूर्वक उतर न आले; तर ऐसें न करावे. सेवकावर कृपा करून सर्वदा पत्रद्वारे सांभाल करावा उचित असे. बहुत काये लिहिणे, कृपा करावी हे विनंती.

¶*Trimbakrao Vishvanath congratulates Raghobadada on the submission of Damaji Gaikwad.*

---

*No. 192*] [*29-4-1751*

**श्री**

**राजश्री पंतप्रधान**

**गोसांवी यांसी**

०॥ॐ

श्रीमन सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरंतरभगवदनुसंधान मावधान श्री माहाराव जानोजी जसवंत निंबाळकर दंडवत विनंती उपर येथील क्षेम ता। छ १२ जमादिलाखर मु॥ लादऊचा डोहो जाणोन निजानंदलेखन कीजे विशेष सांप्रत रा। नागोराव यांच्या पत्रावरून आवगत जालें की रा। दमाजी

गायेकवाड यानीं आपली मुलाजमत घेऊन कृपाश्नेह संपादून घेतला, ऐकून समाधान जालें. आपण श्रीकृपेकरून येशश्वी आहेत. याउपर तालब(?) मोहीदीखान मोगलाई फौजेसहित मार्गे चालले येता यानीं आपणांकडे यावें न यावें येविषई काये तें त्यांस लिहावें व आम्हींहि कोणत्या मार्गे यावें येद्र्थीहि काये तो लेख केला पाहिजे हे विनंती.

¶*Janoji Nimbalker congratulates the Peshwa on his success in the battle with Damaji Gaikwad. He further asks for orders whither he and Mohidikhan should proceed.*

---

*No. 193*] [*1-5-1751*

**श्री**

**राजश्री पंतप्रधान गोसावी यासी.**

०॥ऽ श्रीमंत सद्गणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्टाभिधान निरंतर भगवदनुसंधान सावधान. स्नो माहाराव जानोजी जसवंत निंबाळकर दंडवत विनंती. उपर, येथील क्षेम ता छ १५ जाखर जाणोन निजानंदलेखन कीजे विशेष. पत्र पाठविले पावलें. लिहिले कीं घराऊ कार्यास सायासे थोर थोर मजलीनी यावें विलंब लावणे व बोलावणे घेणे विहित नाहीं. ऐसियासी आपण निकडीने बोलाविल्यास नवाबसाहेबी तातडीनेच रुखसत केले. सेनाकदंबेसह अविलंबे येत असतां रावळाच्या प्रतापासीं व आम्हासी स्पर्धा नसतां तुमच्या प्रतापानें आमच्या परामर्शास न येऊन ईर्शा मनांत आणिली कीं नवाब साहेबाकडील साहित्य जाल्यानें नवाबसो येश विभागी होतील म्हणून कैवाड करून गायेकवाडास आणोन रावळास[1] भेटविलें. हे वर्तमान आम्ही व आमच्या लोकांनी कानी ऐकतांच दो वरसाच्या प्रवासाच्या श्रमांनीं व थोर थोर पेणे[2] करून येणे या सीणांनी सर्वांच्या शरीरसदनी वस्ती केली. बहुवासर आविसर इच्छीत होतो कीं एखाद्या तऱ्ही युध्य प्रसंगीं श्रीमत्संगी आसोन सेनासागराच्या तरंगाचे कवतूक पाहावें. श्रीस हेंच याचीत होतों तो योग घडोन आला तों तुमच्या प्रतापवेशानें आवेशानें आमच्या आशेस विफळ केले. सत्वर येणे म्हणोन आपण स्वमुखें सांगितलें व याहून पहिले तकरार लिहिलें म्हणोन वहिले येत असतां प्रतापानें आम्हांस वंचून आपणच कार्य केलें. पुढे तऱ्ही दुसरियाचे श्रम विफल न करी ऐसी

---

१ रावळ म्हणजे पेशवा व त्याचा प्रताप यांचें रूपक या आलंकारिक पत्रांत आहे, गायकवाड-स्वारीच्या काळचें पत्र. महाराव निंबाळकर निजामाचा सरदार. २ पेणे = मजली.

त्यास ताकीद करावी म्हणोन रावळास लिहावे तर तो रावळाचेहि ऐकतां दिसत नाहीं. जे काम आपण मनावर धरितात ते काम तो आपणच करितो तो ताकीद केल्यास कसा उगा राहील व रावळांची अगर आमची वाट कसा पाहील? यास्तव त्याची नालीश लिहिल्यानेंहि सार्थक नाहीं. सारांश कष्टी होऊन युध्य दृष्टी न पडलें. तुमच्या प्रतापानें आम्हासी अशी प्रतारणा केली, बरें. ईश्वर उत्तरोतर त्याच्या प्रतारणेची बुद्धि व शक्ति वृद्धि करूं हे विनंती.

¶*Janoji Nimbalker to the Peshwa, saying that he was proceeding to him by forced marches as per his orders but he had to cancel his journey owing to the joyful tidings that he received of the Peshwa's success over the Gaikwad. The writer regrets that he lost the opportunity of serving the Peshwa.*

---

*No. 194*] [*5-5-1751*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री नाना व श्रीमंत राजश्री**
**भाऊ स्वामीचे शेवेसी.**

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक सा नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ १९ जाखरपर्यंत स्वामीचे कृपेकरून सुखरूप असों विशेष. सांडीणस्वारावा आज्ञापत्र आले तेथे आज्ञा कीं इंदुरीस व दावडीस हशमी माणसांची चौकी पाटवणे की त्याणी जाऊन आतील वस्तभाव बाहेर जाऊ न द्यावी. मागाहून रा गोपाळरायाकडीलहि पाचशे स्वार पा. त्यास आज्ञेप्रा कालच च्यारशे माणूस हशमी दोहो ठिकाणी रवाना केलें. गणाजीराव बुरूडकर वसईहून आरमारी सें सवासे माणूस घेऊन आले होते त्यावा आणीक शंभर माणू (स) देऊन त्यास दावडीस पा. रा माधवराव पाटणकर यांजवा येथीलच हशमी लोक दोनशें देऊन इंदुरीस पा. त्यास सांगितलें कीं तुम्ही कटकट कजिया सहसा येकंदर न करणे. दरवाजियाचे सुमारे तफावतीने राहून वस्तभावेची चौकसी करणे; मागाहून राऊतही पा. त्यास आज जाऊन पोंहचतील. त्याउपर वर्तमान येईल ते सेवेसी लिहून पा. बारकाईने शोध करावा. आंत खजाना वस्तभाव कांही आहे कीं नाहीं म्हणून आज्ञा, त्यास येक दोघा शाहाण्यास बारकाईनेहि शोध करावयास सांगितला आहे वरचेवर थोडा शोधहि घेतला. त्यास इंदुरीत तर बहुधा काहीं नाहीं. दाभाडियानी वस्तभाव होती ते जवळपास मातबरांचे आसेरयांस लांवविली. दावडीतील लांबली नाही, परंतु किती काये हा शोध पुर्ता लागला नाही. काल आरब रवाना केला तो येथे आला. आज

बहुधा भेटीस येईल. पूर्वी हजार तो देणे खर्चास म्हणून आज्ञा आली आहे, त्याप्रा देऊन तूर्त येथेच आपले जवळच ठेवितो. बहुत काये लिहिणे, कृपा करावी, हे विनंती.

¶*Trimbakrao Vishvanath intimates to the Peshwa that he has sent troops to guard the properties at Induri and Dawadi, belonging to the Dabhade and the Gaikwad respectively.*

---

*No. 195*] [*10-5-1751*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री नाना व श्रीमंत राजश्री**
**भाऊ स्वामीचे शेवेसी**

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साा नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ २४ जााखरपर्यंत स्वामीचे कृपेकरून सुखरूप असों विशेष. साडीणस्वारांबाा पत्र पाा ते पावले. तेथे आज्ञा कीं, राजश्री दमाजी गायेकवाड राा गोपालरायाबाा रवाना केले तर त्यांस जागा राा मल्हारराव होलकर याचे वाडियांत द्यावीं. वाडियाच्या भिती ठेंगण्या आहेत त्या उंच कराव्या म्हणून आज्ञा. त्यास येक पत्र येविसी आगोधर आले कीं, आवजी कवडे याचाच वाडा तयार करणें; त्याजवरून तो जागा ठीक केलाच आहे. दोघा तिघा बंधूस निजावयास जागा व बसावयास व स्वयेपाकास येसी सोयकर आहे. अटकरहि आहे. मागे पुढे चौफेर चौकीचे लोकास छपरे घाळून, नेहमीच जागा ही सिध जाली. विचारे करून पाहाता आटोपसार सर्व प्रकारे उपयोगी हीच आहे. आजच गोपालरायाचे पत्र आले कीं, उदईक आपण येतो. त्यास इतके अवकाशांत मल्हारबाचे हवेलीची जागा तयारहि न होय. इमारत जायाहि फार. प्रज्यन्य कालचे दिवस, आसपास त्याचे माणसास निवारा नाहीं. फक्त येकटे मात्र घर. चवकीचे लोकांस तर आश्राच नाहीं. जागाही आफाट; भिती ठेंगण्या. आश्रा करीन म्हटल्यास सोय नाही आणि अवकाशहि नाहीं; येसे जाणोन आवजी कवडे याचेच हवेलीत जागा देऊ. कलावे म्हणून लिाा. असे. राजश्री सेनापति उमाबाई वगैरे चतुवर्गास राा बाबूजी नाा याची हवेली सिध करितो. ती जागा त्यांचे सोईची आहे. गवताचे गंजातील जागा करावी म्हणून आज्ञा, त्यास चौफेर च्यार दिवाली मात्र आहे. आत घर नाही आणि वैरणीचे तमाम गंज जागा रिकामी नाहीं. यास्तव न केली. सविस्तर विदित व्हावे म्हणून लिाा. असे. बहुत काये लिहिणे. कृपा करावी हे विनंती.

¶*Trimbakrao Vishvanath informs the Peshwa that he is arranging the houses of Awaji Kavde and Babuji Naik respectively for the confinement of Damaji Gaikwad and Yashwantrao Dabhade at Poona.*

No. 196] [9-6-1751

### श्रीशंकर

सेवेसी विज्ञापना. ताा छ २३ जाखरपर्यंत सुखरूप आसो विशेष. सातारियास पुराणिक आदिकरून कितेकास निर्बंध जाला. राजेश्री लौकरीच खाली उतरणार, ऐसीं कितेक वर्तमाने तहकीक लिा येतात. आम्हास तर काहींच कलत नाहीं. विना स्वामींनीं लिा खेरीज आम्हास कलणार कोठून? आणि खरेहि वाटत नाहीं. तर आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विनंती.

¶*Trimbakrao Pethe asks news of the happenings at Satara fort.*

---

No. 197] [1751?

### श्रीशंकर

विनंती जे. यार्णा राजश्री येकोरपूर्वकाविसी[1] बहुत प्रकारें सांगितलें कीं, तुम्हीं लिहिणे कीं, त्या ग्रहस्तास आपले कोणते सुख आहे? यैसें आसोन त्याजला कारभारांत आणावें आणि समागमें फिरवावें हे कांहीं उत्तम नाहीं. आपल्या आस्तन्यामवें आग ठेविली आहे कीं, हा ग्रहस्त आला तों इतकियामधें घरांतच फुट केली. मग पुढें काये होईल हें कळत नाहीं. केवल शकुणीचा लेखा आहे; तर त्या गृहस्थांस बहुत माफजतीने ठेवावे कीं, दुसरियाचा रीघ न होये. व राजश्री दकोरपूर्वक[2] पर्वतावर जे गेलेत, ते कोन्हाच्या विचारें गेले आहेत? त्याच्या मनसुबियाखेरीज कांही गेले नाहींत. यैसें आसोन तुम्ही त्याजला जवल केले आहे तर हें कामाचें नाहीं. आम्हीं जोंपरियेंत आलों नाहीं, तोंपरियेंत त्यांची तजवीज करणें. यैस्या ठिकाणी ठेवावें कीं जेथे दुसरियाचा उपाये नाहीं. सिवाये, दुर्ग हे दुर्गात ठेवले तर त्यांसीच मिलोन जातील आणि फिरोन गोष्टी सांगतील यैसा यांचा प्रादुर्भाव आहे. जें कलले तें कलावें म्हणून सांगितलें. त्यासी सेवेसी विनंती लिहिली आहे. श्रृत होय हे विज्ञति.

¶*Letter to the Peshwa, advising him not to trust Yamaji Shivdeo.*

---

१ यमाजी शिवदेव.

२ दमाजी गायकवाड.

No. 198]

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक मोरो सिवदेव सास्टांग नमस्कार सेवेसी विज्ञापना यैसीजे. श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब यांचे आज्ञापत्र आलें, त्याजवरून समस्तानी त्यांजकडे रवाना केलें, तेणेंप्रा जाऊन दर्शन घेतलें. त्यास श्रीमंत मातुश्री आईसाहेब याणी कितेक आज्ञा करून पत्रें दिल्हीं तीं बजिनस स्वामींचे सेवेसी रवाना केलीं आहेत. तरी पत्रार्थ ध्यानास आणून कर्तव्य विचार करणार स्वामी समर्थ आसेत. सेवेसी श्रुत होये, हे विज्ञापना. .

¶*Moro Shivdeo to the Peshwa, sends letters by order of Tarabai.*

---

No. 199] [1751 ?

श्री

पुा तीर्थरूप राजश्री नाना व ता
राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती. आजी गुरुवारी धनाजी थोरात याची पत्रे वाल्व्याहून आली, तीच बजिनस स्वामीकडे पाठविली आहेत त्यावरून कलेल. आम्हीं बातमीत आहो. स्वामीचे पुण्य समर्थ आहे. काये चिंता आहे ? येथे मजवल लोक म्हणावे तर चालीस पन्नास आहेत. कलले पाहिजे. हे विनंती.

¶*News about Dhanaji Thorat sent to the Peshwa.*

---

No. 200] [6-5-1751

श्री

आज्ञाधारक आनंदराव गिरिधर त्रिकालीं सास्टंग नमस्कार विनंती. छ २० माहे जमादिलाकर खावंदाच्या प्रतापें सेवक क्षेमरूप असे. विशेष, इकडील वर्तमान कालपरवां सतरुसीहून मातुश्रीनीं एक कारकून मुदामी मुल्याकडें पाठविला आहे. पत्रे लिहिली आहेत जे, आजवर तुम्हास बोलावितां बेजार जालो. खातिरजमेप्रमाणें इमान प्रमाणहि पाठविलें. अद्याप आगमन जालें नाहीं. किनिमित्य ? सांप्रतकाली तरी त्वरेनें येणें. सहसा सुस्ती न करावी, यैसी बहुत ममतेची पत्रे पाठविली. त्यास यानी कारकुनासी बोले कीं राजारामास

मारावयाचे जाले म्हणजे येतो. त्याचा जाब कारकून म्हणतो जे त्यास मारल्यावर तुम्ही श्रीमंताकडेंच गेलात म्हणजे काये करावें ? यैसियास तुम्हास द्रिस्टीने पाहिल्याखेरीज तें कार्य उरकत नाहीं, यैसे साफ बोली जाली. मुख्यानी पहिल्या कारकुनाबराबर पत्रें मातुश्रीस लिहून याचप्रमाणें पाठविलीं, व इमान-प्रमाणहि पाठविलें कीं त्यास मारणें म्हणजे आम्ही येतों. दोनच्यार रोजांत येसवंतरावहि पाठवणार म्हणोन यैकतों. तथापि यांच्या गोस्टीवरोन हे काम केलें. तरी श्रीमंत तेथे असतां यांचे गंतव्य होत नाहीं. यांच्या चितांत हरकसे इमानप्रमाण देऊन यास ठिकाणीं लावावे. जाणे चितापासोन नाहीसे यैकतों. दुही मात्र तोडाविसा भाव दिसतो. प्रस्तुत षेषोपंत श्रीमंताकडे पाठविला आहे. त्यांचे पत्र याच्या चितानुरूप येत नाही. बोलून गेल्याप्रमाणें कार्यभाग होऊन यांची निशा होत नाहीं. याकरिता डावाडोलसे असमाधान आहेत. श्रीमंताहीं त्वरेने कोणी येक मातबर पाठऊन यांस बोलाऊन न्यावे, याची मनोभिष्ट सिघ्र सिधीस न्यावी, हेच उत्कंठा फार जाली आहे. सेवकासहि सांगू पाठविलें कीं पेपोपंताकडोन जाब येत नाहीं. मन:पूर्वक श्रीमंतानी शेपोपंतास आज्ञा करोन आपली खातिरजमा होये तो प्रसंग करणेंस तुम्ही लिहिणें म्हणोन सांगू पाठविलें. सांप्रत अंतरबाह्य दिसूं येत कीं श्रीमंताच्या मांडीवर उसें दिले आहे. यैसच दर्शवितात. दमाजी गाइकवाड लुटलाची खबर हरिपंत, रा तात्याचे दिवान, यानी सविस्तरपूर्वक लिहिलियावरोन बहुत संतोष जालें. गुजरातचा कजिया तुटला. बरेंच जालें, म्हणोन फारच संतोष. समरसीचा तह न व्हावा हेच नवस व प्रस्न. हरयेकांसी मनसबाचा डोल कसा दिसतो म्हणोन तजविजा हमेषा करीत असतात. अद्या(प) अपणाकडील मनसब्याचा गोस्टी शेषोपंतासी न बोले. त्याचे उतर काहीच जिव्हाल्याचे न आले. याकरिताच उदास आहेत. अगदीं लक्ष श्रीमंताच्या बोलावण्यावर यानी ठेविला आहे. मातुश्रीकडील संदर्भ तो वरच्येवर लागलाच आहे. यांस हरकसेहि समरसीसी न्यावे, म्हणोन वासना मातुश्रीची आहे. अंगरियाकडील पत्रे आली होती. त्याचा जाब लिहिला कीं, आम्ही श्रीमंताखेरीज मातुश्रीकडील राजकारण करीत नाहीं. येसच साफ लिहोन पाठविले. पुण्यामधें कोणी येक राजपुत्र आणून यांकडील प्रसंगास आणून ठेविला आहे, म्हणोन यांस सांगि(त)ले आहे. त्यास यानी मुदाम माणसें पाठवून त्याचें वर्तमान आणविलें. आवजी कवड्याच्या वाडियांत ठेविला आहे. तो वीस बेवीस वर्षाची उमर आहे म्हणोन द्रिस्टीने पाहून येऊन यास माणसानी विदित केले. त्यास हे यैकून म्हणता इतकी राजाराम ताराबाईनी कैदेत ठेविला याकरिता त्याच राज्यास दुसरा धणी पाहिजे. यासाठी श्रीमतानीच

आणवून ठेविला आहे. तस्मात आम्हासी लटके धातुपोषण बोलतात. नारो-व्यंकटेशांच्या जबानी क्रियापुरस्सर सांगो पाठविले तेहि लटकेच. आपणास राज्य देणेच असतें तर आजवर सुस्ती न करते. दुही न तोडता दोनीं राज्यें राखावी, हाच मनसबा श्रीमंताचा यांत संदेह नाहीं. आम्हासी पत्रार्थी अथवा मध्यस्ता-करवीं दर्शविता तो आषये अगदीं लटका, म्हणोन उदासन पक्षेच बोलत असतात. सारांश श्रीमंतानी त्वरेने बोलावावे, हाच आषये. सिदोजी नाईक व अंतोबा यांची भेट होऊन रुकसत जाली. येकदोन रोजांत तेहि येणार. मियाखानाकडोन काही कार्य न जाले. येथे मियाखानास मुल्यानी निषेद रघोजी भोसल्याच्या राज्यकारणाकरतां फारच केला. त्याचे वजन काहीच नाही. या दरबारी त्याची आसामी लटीकवादाची आहे. जाबाकरितां येकदोन रोज अटकाव जाला आहे. आज उदिया जाब आल्यावर येथून येकदोन रोजात खावंदाकडे येणार आहेत. यैकिले वर्तमान सेवेस निवेदन केले आहे. श्रुत होय हे विज्ञात.

¶*News-letter from Anandrao Giridhar to the Peshwa at Poona, communicating to him the plans and intrigues going on at Kolhapur and the help that Tarabai asked from Sambhaji, the condition on which he offered it, viz., doing away with Ramraja, the implicit faith which Sambhaji had in the Peshwa and the rumour that the Peshwa had secured a boy with the intention of placing him on the Satara throne are some of the important items in the letter.*

---

*No. 201*] [*16-5-1751*

**श्री**

**राजश्री पतप्रधान गोसावी यासि**

*S* श्रीमंत अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्ये श्री माहाराव जसवंत निंबाल्कर कृतानेक दंडवत विनती. उपर, येथील कुशल ता छ १ माहे रजब मुकाम दरजागा कमलालये जाणून गोसावी याणी स्वकीये कुशल लेखन करीत असावे. याउपर कृपा करून कासिदासमागमे छ २४ जालाखरचे पत्र पाठविले ते छ २९ जाखरी प्रविष्ट होऊन लेखनार्थश्रवणे बहुत संतोश जाहला. राजश्री राजे रघुनाथदास याच्या विचारें तीन लक्ष रुपये तुम्ही करारात आणिले असता शामराव यानी कबूल न करून परवाने घेऊन गेले त्यास परतोंन माघारे आणविती रुपयाचा निकाल इकडच करून देवावा म्हणोन पत्रार्थ. यैसीयांसी राजश्री *(रा)ज्याजीचे नावे येक पत्र पाठऊन द्यावे की लोकांचे स(मजा) विसीस खर्चास पैका पाहिजे

---

१ घोरपडे.

म्हणून फलानियास म्हणजे आमचे नाव यास समक्ष सागितले होते की खर्चास यैवजची वोढ आहे सध्या पैका देवावा म्हणजे निकडीस कार्यावर पडल. त्यास शामराव पर(वाना) देऊन पाठविले तिकडील पैका लवकर येणार नाही शामरावास फिरोन आणवितो पैका इकडच दो वाईयास करारप्रा देवावा याप्रमाणे येक पत्र राज्याजीचे नावे व येक पत्र आमचे नावे यैसी दोन पत्रे पाठऊन देणे म्हणजे आम्ही आपले पत्र राज्याजीस दाखवून जाहला मनसुभा महकूफ करून यैवज इकड प्राप्त होये हा विचार निछेयात आणिजेल. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Janoji Nimbalker to the Peshwa requesting him to send a letter to Raje Raghunathdas asking him to arrange for the payment of three lacs of rupees to which he had agreed.*

---

*No. 202*] [*July 1751*

**श्री.**

**राजश्री पंतप्रधान गोसांवी यांसी.**

ॐ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित बऱ्हानजी मोहिते दंडवत विनंती. उपरी : येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन केले पाहिजे विशेष. राजश्री वेंकाजीपंत याजहातीं आपण पत्रें पाठविलीं त्यांत आज्ञा केलीं जें : श्रीमंत मातुश्री आईसाहेब याणी खाली उतरायाचा मजकूर पहिला जाहाला तो सर्व तुम्हास अवगत्य आहे. प्रस्तुतहि सर्व मजकूर सविस्तर यादींत लिहिला आहे व सांगणे तो सांगितला आहे. तरी सातारियास जाऊन सर्व प्रकारें मातुश्रींची व माहाराज स्वामींची निशा करून ज्यात दुसरा विचार चितांत न आणिता खाली उतरून राजभार चाले ते करणे म्हणौन लिहिले. त्यास आम्ही अपले अज्ञप्रमाणे जावें तर येथील विचार मातुश्री आईसाहेब यांचे व माहाराज स्वामी यांचे चितसुद येक दिसोन येत नाहीं. हुजुरे पत्रें घेऊन आलें त्यांत आज्ञा आम्हास येणे. त्याच्या नकला पाठविल्या आहेत. हुजुरे येथें येऊन बैसले आहेत. आपली आज्ञा होईल तेणे प्रमाणे वर्तणूक करू. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ असो दीजे, हे विनंती.

(बऱ्हानजी मोहिते याचा शिका.)

(मोर्तब सुद.)

¶*Burhanji Mohite writes to the Peshwa about the disagreement between Ramraja and Tarabai.*

No. 203] [12-8-1751

छ १२ सवाल

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेस आज्ञाधारक आनंदराव गिरिधर त्रिकाली सास्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ १ शवालपावतो येथास्तित असे विशेष. सप्तरसीकडील राजकारण सिध्द होऊन मातुश्रीचे भेटीस स्वामी येणार हे सिध्दांत याणी यैकोन पूर्ववत द्वंद घडेल. हे यांणी चितामधें आणोन गड किलेचे बंदोबस्ती करणेस पनाला व पावनगडास आली आहेत. पेशव्यांही आम्हांसी शफतपूर्वक बोलोन विस्वास गोऊन मातुश्रीकडेंच परिणामी तन देऊन आम्हास हलकें पाडलें म्हणोन बहुत श्रमीं आहेत. गडचे लोक आहेत त्यांपासोन आणक्रिया घेतात. पनालेस मातुश्रीचा संशये फितवा करतील अथवा ऐक्य जाल्यानंतर पनाला घेऊन देणेस मातुश्री स्वामीस आग्रह करतील, या करितां पूर्वीच बंदोबस्ती करीतात. सौ. उमाबाई मातुश्रींची भाची त्यांचा अगत्यवाद पूर्वीपासोन कैदेंतून उमाबाईस काहडावें हे वासना ताराबाईची आहेच. याउपर ते गोस्ट स्वामीकडोन घडणें आगाध नाहीं. या संशयांत सौ. जिजाबाई फार करोन आहेत. श्रीमंतावर माहाराज फार रुष्ट आहेत. जिजाबाईस म्हणतात जें तुमचे विद्यमानचें पेशव्यांकडील राजकारण परिणामी फलास आलें. तुम्हासी शफतपूर्वक बोलोन विश्वास तुम्ही त्याचे ठाई ठेऊन भेट आम्ही नलगे म्हणत असतां, सिरोलास आम्हास नेऊन पेशव्यांसी भेटून त्याचे हाती आमचा हात देऊन आम्हास भरवसा देऊन मातुश्री ताराबाईकडील संदर्भ घडणार तोहि तुमचे भरवशावर तोडोन ताराबाईसी आम्हांसी कार्यवाहीपण दाखऊन सेवटी सर्व गोस्टीने दोनीकडें हलकें पाडोन भ्रस्ट केले. या उपरी राजकारणास ठाव नाहीसा जाला. दोन खेडी आहेत तेहि राहोन अन्नास संदेह तुम्ही पाडोन वकर[१] गमावला म्हणोन जिजाबाईचे व माहाराजाचें नित्य कलह आरंभला आहे. मध्यस्तांवर माहाराजांची येतरांजी सांगता पुरवेना. राजश्री भगवंतपंत आपल्या घरांत जाऊन बैसले. वारणासीस जाणेचे योजनेंत, हे वर्तमान ऐकिल्या तागाईत सेवकांसी माहाराज नीट बोलत नाहीत. रागामधेच आहेत. सरखेलीकडील राजकारण दोन दिवस मोकूब[२] जाले आहे. या दिवसांत कारकुनाकडोन विश्वास राहिलासा दिसतों. मनसबे अगदी राजनीतीचे. गंगी व नींगू म्हणौन कुणबिणी वर आहेत. खलबत त्यांसी सुखश्रमाचे करितात. दामाजीपंत दामोदरपंत कसब्याचे हवाल्याचे आहेत. त्याजवरी किंचित विश्वास

---

१ वकर = प्रतिष्ठा, आब. २ रहीत.

दिसतो. माहाराजहीं या गोस्टीवरोन राजकारण यैकल्यापासोन शरीरेंकडोन कृश जाले आहेत. चितामधें खेद आला आहे. मुखश्रीवरी वर्चेश्व कांही दिसत नाहीं. अंतर्यामी फार श्रमी आहेत. स्वामीची व मातुश्रीची भेट जाल्यानंतर काये घडेल पाहवें. योजना काये करतील, यास्थली टिकाव होईल न होईल, कळेना. ऐकिले अढळले वर्तमान सेवेस निवेदन केलें आहें. श्रुत होये हे विज्ञास.

¶*Anandrao Giridhar reports to the Peshwa the communications going on between Tarabai and Sambhaji. He further writes that Sambhaji was wroth with Jijabai who tried to secure the co-operation of the Peshwa whose attitude completely belied all hope of securing the Satara gadi.*

---

*No. 204*] [*6-2-1752*

पाा छ ३ रबिलाखर

**श्रीभवानी प्रसन्न**

सेवेसी विज्ञापना. ताा छ १ रविलाखर गुरुवासर स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. यावयाविसी सेवकास आज्ञा नाही. या संकोचेकरून राहणे जाले. फौज जी स्वामीनी स्वाधीन केली आहे ती वरचेवरी रवाना करीत आहो. चिरंजीव गमार्जाचेहि पत्र आले जे, कारकुनाची व राजश्री दाजीपंत याची गाठी घालून देऊन निघोन येतो. येविसी कोणी सेवेमधे चर्चा करील जे, गमार्जाचे येणे होणार नाहीं. तरी स्वामी आमचें जीवन; स्वामीची आज्ञा जाली असतां निमित्य करून राहील हे गोष्टी कल्पांती घडणे नाही. सत्वरीच स्वामी-संनिध येऊन दाखल होईल, येविसी अंतर पडणार नाही. सेवेसी श्रृत होय, हे विज्ञापना.

¶*Yamaji Shivdeo to the Peshwa, offering his willing help.*

---

*No. 205*] [*1-8-1752*

पौ छ २ सवाल.

**श्री.**

यादी किले येणेप्राा हा कालपर्यंत मोगलाकडील घेतले. सुाा सलास खमसैन मया व अलफ.

मल्हारजी होलकर याणी घेतले:

१ किले चांदवड.

१ किले इंद्राई.

१ किले राजदेहर चांदवड परगाणियात आहे.

बालाजी बावाजी केतकर दिमत विठल सिवदेव

१ किले रवला

१ किले जवला

२

१ किले घोडप.
१ किले कनरा.

(फाटले.)

याणी घेतला १.

५

१ किले मार्कंडा.

(फाटले.)

६

किले कांचना निा विठल सिवदेव १.

किले अचला बहिरजी बलकवडे याणी घेतला १.

किले सोनगड निा कृष्णरावमामा १.

किले पेमगिरि नारो आपाजी याणी घेतली १.

१ किले
१ किले देहर

२

दामोदर माहादेव याणी रामसेज किला घेतला १.

किले कर्नाळा रामाजी माहादेव याणी घेतला १.

---

[पत्राच्या मागील बाजूवर.]

तेरीज येकंदर.

| | आज. | उत्तम. | मध्यम. | कनिष्ट. |
|---|---|---|---|---|
| चांदवड | १ | १ | ० | ० |
| इंद्राई | १ | ० | १ | ० |
| राजदेहर | १ | ० | १ | ० |
| घोडप | १ | १ | ० | ० |
| मार्कंडा | १ | ० | ० | १ |
| जवळाखला | २ | ० | ० | २ |
| हणमंत्या | १ | ० | ० | १ |
| हर्ष | १ | १ | ० | ० |
| देहर | १ | ० | १ | ० |
| अचला | १ | ० | ० | १ |
| रामसेज | १ | १ | ० | ० |
| पेमगिरि | १ | ० | १ | ० |

| | आज. | उत्तम. | मध्यम. | कनिष्ठ. |
|---|---|---|---|---|
| कर्नाला | १ | १ | ० | ० |
| सोनगड | १ | ० | ० | १ |
| कांचना | १ | ० | ० | १ |
| | १६ | ५ | ४ | ७ |
| कनरा | १ | ० | ० | १ |
| | १७ | ५ | ४ | ८ |

¶*This useful list mentions which forts in the Deccan were captured from the Nizam upto the year 1752.*

---

*No. 206*] [*15-11-1752 ?*

पौ छ १० मोहरम.

श्री

श्रीमंत राजश्री राऊ[1] स्वामीचे सेवेसी

पोश जिवाजी नानाजी साष्टांग नमस्कार विनंती. उपर, वर्तमान ऐसे जे, श्रीमंत राजेश्री बाबूजी नाईक स्वार होऊन श्रीमंताकडे गेले. सांगाते स्वार हजार आहेत. यावर येथे बाबूजी नाईक होते, तेव्हां राजश्री आबाजी नाईक म्हनो लागले कीं, काही लोक ठवावे आणि काही थोडेबहुत कामकाज करावे. त्यासी बाबूजी नाईकी जाब दिधला की जैसे इतके दिवस जाले तैसे आवदाचेंहि साल पाहावे, आनि मोगलाचे कैसे होते हेहि कलेल; ऐसा विचार करोन मग स्वार जाले. ते नरसीपुरावर दोन मुकाम करोन कार्तिक शुद्ध ९ स कुचे करोन गेले. राजश्री आबाजी नाईकास आईसाहेबांची च्यार पाच पत्रें आली कीं, सत्वर येणें. त्याजवरून आबाजी नाईक कार्तिक शुध ९ स कुचे करोन समरुसीस गेले. सांगाते राऊत पाऊनसेक आहेत. ऐसी हाकिगत आहे. यावर पुढे जे आज्ञा लिहून पाठवाल त्याप्रमाणे केले जाईल. हे विनंती.

¶*Jivaji Nanaji to Vishwasrao—news sent from Satara about Babuji Naik and his brother.*

---

१ विश्वासराव ?

No. 207] [21-11-1752

श्री

सेवेसी विज्ञापना. सेवकाचें वर्तमान छ १४ मोहरमपावेतों स्वामीचे कृपें-करून येथास्थित असें विज्ञापना. बाबूजी नाईक आबाजी नाईक यांचें वर्तमान पूर्वी शेवसीं लिहिलें होतें. त्याअलीकडे आबाजी नाईक बारामतीस जाऊन बाबूजी नाईक यांस स्वामींकडे रवाना केलें असे. बाह्यात्कारें करून आपण ताथोड्या किल्ल्याखालीं आले. मातुश्रींनीं सनद पाठविली कीं, नाईकाचे कबिले ठेवावयास किल्ला देविला आहे. त्यावरून हवलदारानें कबूल केलें. किल्लेकरी लोकांस वस्त्रें देऊन किल्ला आपले लगामीं लाऊन घेतला. इतक्यांत बाबूजी नीरानरसिंपूरपावेतों जाऊन पुढें जातों अशी आवई चालून कूच दरकूच ताथोड्या खालीं आला. एक मुकाम तेथें केला. प्रतिनिधीस सातारा समजावीस करावयास आणिलें होतें. पवईपलीकडे डेरे देऊन राहिले, पंधरा रोज मजकूर घाटत होता. निदानीं यांचा त्यांचा बनाव बसला नाहीं. द्वादशीस रात्रीस प्रतिनिधीस बातमी आली कीं, बाबूजी नाईक किन्हईवर येतो. म्हणोन येमाजी पंतांनी किन्हई-हून लिहून पाठविलें त्यावरून प्रतिनिधि रात्रीचे सावध राहून त्रयोदशी(स) प्रात:काळीं कूच करून मातुश्रीस न पुसतां किन्हईस गेले; तों दोन प्रहरां बाबूजी नाईक तिकडून आले. परस्पर वचक खाऊन दोन घटिका तटोन राहिले. येमाजी-पंत नाईकास म्हणों लागलें कीं, तुम्ही पलीकडून जावें. आमच्या गांवावरून जाऊं देणार नाही. परस्पर बोली फार जाहली. नाईकासंमागमें तीनशें राऊत निवडक होते. प्रतिनिधीजवळ पांचशेंपावेतों आहेत. नाईक आड खाऊन याच वाटेनें जाईन म्हणोन झुंझांस तयार जाहले. मग यांनींच दरम्यान भले लोक घालून परस्पर भेटी जाहल्या. दोन घटिका बसले होते. त्यावर नाईक दोघे भाऊ सातारा आले. मातुश्रीची भेट झाली. कृष्णाजी नाईकाचे बागे-अलीकडे उत्तर भागीं डेरे देऊन राहिले आहेत. समागमें राऊत आले. तीनशें मागाहून, काल च्यारशें आले. एकूण सातशें राऊत अवघे आहेत. मोठ्या धमकेच्या गोष्टी सांगतात. आणखी स्वार व पायीचे लोक चाकर ठेवणार. प्रतिनिधीस येमाजीपंत पेशव्यांकडून आलें, त्यांनीं बिघडून टाकिलें. आपला हुकुमांत वर्तत नाहीं; त्यास उत्तमप्रकारें नाईकांकडून हकदार करावें. निदानीं प्रतिनिधि नाईकास द्यावी. परंतु पेशवे प्रतिनिधि एक जाहले. यांस खामखां मोडावें. येमाजीपंत सांपडले तर अटकेत ठेवावे, हें एक वर्तमान. दुसरें नाईकास सुमंतपद द्यावें. आबाजी नाईक राजाज्ञा देऊन, याचे हातून राज्याचा बंदोबस्त करवावा. तिसरें वर्तमान मुराजी घोरपडे आणविले आहेत. ते

आले तर यांचा त्याचा, एक हात करून दहावीस हजार फौज ठेवून कर्नाटक दोघांस देऊन दक्षणेस रवाना करावें. असे तीन मनसब्याची बातमी बोलतात. नाईक कूच दरकूच स्वामींकडे येतात, अशी आवई घालून जलदीनें सातारां आलें. कबिलास जागा केली. तस्मात कांहीं मोठी दुराशा यांनीं दाखविली. त्यांनीं पाहिली तरच आले आहेत. स्वामींची स्वारी दूर जाऊं दिल्ही. स्वामी शहास गुंतले. महिना दोन महिने लागतील, असा अवकाश पाहोन रिकाम्या राणी उपद्व्याप करावयाचा मनसबा करून आले आहेत. प्रतिनिधीजवळ आठाचहूं रोजांनीं दोन हजार फौज जमा होईल. परंतु त्यांत माणूस चांगलें नाहीं. सरदार उमदे म्हणावे तर खासा आणि येमाजीपंत बेगमीच आहे. आपले फौजेचा उपराळा[१] प्रतिनिधीस पोहोंचतो, तर मग नाईकांनीं उपद्व्याप काय करणें? पुण्यास पत्र पाठविलें आहे कीं, दोन हजार फौज घाटांखालें चारापाणी पाहोन ठेवावी. पांचा हजारांची येथें आवई येईल. मग नाईकांनीं काय करणें ? हें न झालें तर स्वामी मोगलाच्या शाहास गुंतले तों च्यार रोज टेगा माजिवतील. धामधूम करतील. प्रतिनिधीजवळ पैका नाहीं. लोक नाहींत. * * नाईक इतिश्री करतात. फिरोन पहिल्याप्रमाणें खूळ माजतें. बाबूजीस पुसलें तर तो म्हणतो कीं, तुम्हांस जे गोष्टी प्रतिकूल तीं सहसा आचरणार नाहीं. परंतु लबाड. कारभार बुडतां बुडतां कांहींका लोकांस घेऊन बुडावें किंवा च्यार रोज लौकिक करून दाखवावा. असेंच कांहीं कूष्मांड माजलें आहे. मोड आला तो खोडून टाकला म्हणजे गुंताच वारला. शेवेसीं श्रुत होय, हें विज्ञापना.

¶*This letter explains the intrigues of Babuji Naik against Peshwa Balaji Bajirao and purports to be written to the Peshwa from Satara by his agent Purandare. The Peshwa was away settling his affairs with the Nizam, when Babuji Naik started his opposition with the help of Tarabai.*

---

*No. 208*] [*1-12-1752?*

पा। छ २९ मोहरम.

## श्रीभवानी प्रसन्न

सेवेसी विनंती. सेवक अंताजी सिवदेऊ व रामाजी नाईक वाकडे कृतानेक विज्ञापना. ता। छ २४ मोहरम भृगुवासर, मुकाम नजीक किणये लस्कर राजश्री पंतप्रतिनिधि साहेबाचे कृपेकरून, सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. राजश्री

---

१ कुमक.

जगजीवन पंडित प्रतिनिधि यांचा निरोप घेऊन सत्वर हुजूर येणे म्हणून आज्ञा केली; त्यास काली श्रीमंताचे कूच होऊन डेरियासी रात्री दाखल जाले. आजीचा दिवस येथे मुकाम आहे साहेबाचे आज्ञेप्रमाणें राजश्री पंत प्रतिनिधीस विनंती करून उदईक प्रातकाली सेवेसी येतो. विदित जालें पाहिजे; सेवेसी श्रुत होये, हे विज्ञापना.

¶*Antaji Shivdeo, the Pratinidhi's Mutalik, says he is coming the next day in obedience to orders.*

---

*No. 209*] [*December 1752?*

## श्रीआई आदिपुरुष.

**सकलगुणआलंकर्ण अखंडित-**

**लक्ष्मीअलंकृत राजमान्य**

**बालाजी पंडित स्वामी गोसांवी यांसी.**

पोष्ये जगजीवन परशराम कृतानेक नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करविलें पाहिजे विशेष. येथील दिनचर्येचे वर्तमान जे: राजश्री अंताजीपंत याचे पत्र * * (फाटले) रोजचे आलें तेच पत्र बजिनस पाठविलें आहे. त्यावरून सकल अर्थ अवगत होईल. नाईकीं आजी च्यार महिने जे जे विवंचना करावयाची, ते करून आपल्या कतृत्वाची परिक्षा पाहिली; परंतु त्याच्या चित्तानरूप प्रसंग घडोन न ये. याजकरितां हा मन (सबा) योजून, या मनसबियानें राज्य लगामी लाऊन भारीपणा करून महद येश संपादावे ऐसा विचार योजिला आहे. त्यास राजश्रीस मातुश्रीच्या नम(स्कारा)स आणून वस्त्रें देविली म्हणून ते गोष्टी * * * ल्याणांची आहे असे नाही. कर * * * * उपाय योजिला आहे. याही उ * * * * साध्यता नव्हे; तरी पुढें आणि * * काये उपाय या (यो) जतील तो पाहावा. राजश्रीस दर्शणांस आणून वस्त्रें देणे, हाहि उपाय सामान्य नव्हे. कितेकांची राजकारणें सांगितली. कितेक कर्तव्याच्या गोष्टी सांगितल्या. कितेकाच्या पारपत्याचे विचार करून महद येत्नें करून हा विचार योजिला आहे. त्यास पुढेहि आणिखी येत्नातत(च) आहेत. त्यास येविसीचे कितेक अर्थ लिहिणें तें राजश्री दिनकरपंती लिहिलेच असतील अगर लिहितील. राजश्री गणेशपंतीहि संकळीतार्थे लेखन केले आहे त्याजवरूनी हिकडील अर्थ चि * * * * उपरी तिकडील विचार व्होणे * * आगर आपल्या पराक्रमें करून आव

* * * होऊन येईल; परंतु आपण येऊन हिकडील कला * दूर करून प्रजेचे संरक्षण होये तें केलियास उतम आहे. आमचा तरी ज्याप्रमाणें आपण आम्हास पत्री लेखन केले आहे. त्याजप्रमाणें येथा(श)क्त्या वर्तणूक करीत आहो. वाई देश वगैरे * * * कात ऐवज होऊन फौजेचे संरक्षण करावे येवि (सी) प्रतिपत्रीं लेखन होऊन येते, त्यास येविसीचा तपसील लिहितां पुरवत नाहीं. दाहा वीस हाजार रूपये मेलविल्याने फौजेचे संरक्षण होते ऐसे नाही. येविसी सर्व अर्थ आपल्यास न कलेतसे काये आहे ? मुख्य आपल्या लिहिल्याप्रमाणे विचार करून, आपल्या येणियाची प्रतीक्षा करीत आहो. निर्वाह करणे आपल्यासच आहे. प्रस्तुत जाली गोस्टियाचा (अर्थ) जो लिहिणे तो लिहिला पाहिजे. तदन(रूप) घडोन येईल. बहुत काय लिहिणे, लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*The Pratinidhi informs the Peshwa of the intrigues of Babuji Naik with Tarabai at Satara.*

---

*No. 210*] [*1-2-1753 ?*

**श्रीआईआदिपुरूष.**

**सकलगुणअलंकर्ण अखंडित-**
**लक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री बालाजी**
**पंडित स्वामी गोसावियांसी.**

पोष्ये जगजीवन परशराम कृतानेक नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करविलें पाहिजे विशेष. सविस्तर अर्थ पूर्वी लिहिलाच आहे. प्रस्तुत हिकडील वर्तमान तरी, राजेश्री बाबोजीनाईक छ ८ रबिलौवली सातारियास दाखल जाले. लौकिक वार्ता जे, ज्या उदेसे गेले होतें तें कार्ये होऊन, मनोरथ सिधीस गेला नाही. काही द्रव्याची विवंचना करून आले म्हणून बाहेत्कारीं वार्ता आहे. अंतर्यामीचें वर्तमान सविस्तर कलेल. तदनंतर लेहून पाठऊन देऊं. दुसरें वर्तमान ऐकतों जे, नाईक पेठेत आहेत. तेथून कूच करून खेडावरी येऊन पुढें फौलाव करून उपस्वर्ग मुलकावरी करावा, ऐसे हुजुरच्या कारभारियांच्या मनात आहेत. तेणेप्रां नाईकास प्रेरणाहि करीत आहेत. तदनरूप नाईकानीं विचार केलियास येविसींची विवंचना पूर्वी आपण आम्हांस पत्रीं लिहिली आहे, तेणेचप्रमाणें घडोन येईल. आंतर पडणार नाहीं. होईल वर्तमान तें परस्परें अवगत होईल. पुढील कर्तव्यार्थ आगोधर लिहिणें उचित नाही. राजश्री उदाजी चव्हाण यानी राजश्री संभाजी राजे यां(ची) फौज

अनकूल करून घेऊन त्याजपासून वीस हजार शा फौज * * आपले खर्चे घेऊन कार्टेक (?) मेळऊन, मिरज प्रांत मारून, * * * केला. कराड प्रांतात येऊन धामधूम क * वी * * रून सर्देस कराड प्रांताच्या आले होते; * * * * * केडगावी मुकाम करून राहाणें प्रा * * * * स्वामीकडे राजकारण करून निश्चयांत * * * * आहेजे. राजश्री उदाजी चव्हाण यासी * * * वा राजश्रीकडील न्यून जो अर्थ दिसोन * साहित्य आम्हीं करावें ऐसें मान्य करून * * जिला आहे. बहुधा घडोन येईल. * * * होईल अर्थ तो लेहून पाठऊन देऊं; * * * विशालगड[2] हा जागा पुरातन * * * * त राजश्री तुळाजी आगरें यानी खुद * * * जार हशम घेऊन, चौतफी चौकिया गड बसऊन, गड हस्तगत करावा हा मनसबा योजिला आहे. येविसीची मदती करून, कोकणप्रांतें उपस्वर्ग करून, किलाचा वेढा उठवावा म्हणून प्रत्यई पत्रें येतच आहे. त्याचा उपराला न करितां, स्थल हस्तगत आंगारक करितो. स्थल कांहीं सामान्य नव्हें. ऐसे चौकडून संकटे प्राप्त जाली आहेत. पुणियाहून फौज यावी म्हणून वीस पत्रें रोज दररोज पाठवीत आहों; परंतु काये निमित्य फौज पाठवीत नाहींत तें कळेना. बहुधा आपलीच त्यास ऐसी आज्ञा आहे की काये कळेना? येकून तिकडून फौज येत नाहीं हाहि येक आर्थ प्रतिकूल आहे. ऐसी चौकडून संकटे आहेत. पुढें होईल वर्तमान दिन प्रतिदिन लेहून पाठऊन देऊ. विशालगडाविसी राजश्री तुळाजी आगरें यांसी भयप्रदर्शनयुक्त पत्र पाठविलें पाहिजे. सारांश गोष्टी, आपले येणियाची प्रतीक्षा करून मनसबा रक्षून आहे. सत्वर या प्रांती येणे उचित असे. बहुत काय लिहिणे? लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*Activities of Babuji Naik, Udaji Chavan and Tulaji Angre are reported to the Peshwa by the Pratinidhi.*

---

*No. 211]* *[10-2-1753?*

**श्रीआईआदिपुरुष**

**सकलगुणआलंकर्ण अखंडित-**
**लक्ष्मीआलंकृत राजमान्ये राजेश्री**
**बालाजी पंडित स्वामी गोसावी**
**यासी.**

पोष्य जगजीवन परशराम कृतानेक नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणऊन स्वकीयें लेखन करविले पाहिजे विशेष. पूर्वी युध्य राजश्री आबाजी

(१) शा. रो. २३२, १-२-१७५३. (२) २५-१-१७५३, शा. रो. २२९.

नाईक याचे जालें ते वर्तमान पत्री लेखन करून........ ..................
...........च आसेल. प्रस्तुत वर्तमान राजश्री (बाबु)राव सदासीव फौजसुधा समागमे हुजरात राजश्री मानसिंग जाधव याजजवली मागून घोडा बहुमानार्थ घेऊन, त्रिपुटीवरी येऊन मुकाम करून, छ ६ रबिलाखरी चालोंन आले. त्यास आम्ही चव्हाणाच्या शहावरी दीड महिना होतो, तेथून कूच करून छ ७ रोजी चिमणगावास आलो. ते दिवसी पारपत्य करावे, तो राजश्री माहादाजी नाईक लिंबालकर व नबाब विठलराव बकसी व परशराम सिंदे चिमणगावच्या मुका[मा]स येऊन श्रीमंत मातुश्री आईसाहेब याची आज्ञा बहुता प्रकारे सांगोन नाईकाच्या बहुमानाचा आग्रह बहुत केला. त्यास केवल त्याच्या गोष्टी आमान्यच कराव्या तरी, आग्रहसा दिसोन येतो. याजकरिता कुमठे[२] याजवरी नाईकी तिकडून यावे, आम्ही कुमठियापावेतो जावे. नाईकांची भेटीमात्र घ्यावी, तेथून नाईकास निरोप द्यावा, कूच करून नाईकीं सातारियास माघारे जावे, ऐसा करार करून मध्यस्तास निरोप दिला. निरोप देतेसमई त्यांसी करार केला जे, तुमच्या आग्रहाकरिनां आम्ही मान्य केले; आणि नाईकी तुमची गोष्टी आमान्य केलियास पुढे तुमचा विचार काये ? त्यास राजश्री माहादाजी नाईक यानी करार केला जे करारप्रमाणे नाईकी मान्य केलियास उतम जाले आणि मान्य न करीत तरी आम्ही हुजरात देखील निघोन जाऊन तुम्हास.............................
..............शफतपूर्वक करून, निघोन त्रिपुटीस (ये)ऊन, येथील करार नाईकास निवेदन केला. नाईकी त्याचा विचार न ऐकतां च्यार गोष्टी हुजरातीस व नाईकास बोलून, तेच क्षणी छ ७ रबिलाखरी च्यार घटिकां दिवसा कूच करून मौजे चिंचणेर येथे जाऊन, कूल सिवार चारून मुकाम केला. सदरहूप्रा बातमी आम्हास आली. राजश्री माहादाजी नाईक *नीहि साफ लेहून पाठविले जे नाईक केला करार मानीत नाहीत. तुम्हास कलेल ते करणे ; हुजरात आम्ही निघोन जातो. म्हणून उतरे येक दोन जाली; परंतु (रा)त्री आम्ही कूच न केले. येणेप्रा विचार * * * बहुत काय लिहिणें ? लोभ असो दीजे, * * * *

¶*Description of a fight between the Pratinidhi and Babuji Naik.*

१ बिंड व गांव सातार्‍यापासून ७ मैल. २ कोरेगांवापासून २ मैल.

Nc. 212] [13-2-1753 ?

श्रीआईआदिपुरुष.

पुरवणी राजश्री बालाजी पंडीत स्वामी
गोसावी यांसी.

विनंती. उपरी, येथील कुशल * * (जाणू)न स्वकीये लेखन करविलें पाहिजे विशेष. आपल्याकडील फौज घाटा खाले आली आहे. राजश्री दादोपंत वाग याणे व राजश्री म्हालोजी मुठे व राजश्री गोविंद * * ऐसे मिलोन दीड हजार फौज आहे; त्याची आमची भेटीहि दोन चौ दिवसात होणार आहे ; भेटी होईल. श्रीमंतांसनिध फौज राहिलियास श्रीमंत मातुश्रीच्या चितात विक्षेप येईल. नाईकाच्या पारपत्याचा विचार जालाच आहे ; राहिला विचार तोहि होईल ; परंतु फौज सनिध ठेविता न ये. त्यास आपले आगमन होये तो आपल्या आगमनाचा मार्ग लक्षून कालहरण करावे लागेले. त्यास फौजहि आपली बराबरी घेऊन हिंडावी लागली. जवली फौज असोन भारीपणा असला पाहिजे. उरज(कर)ता न ये. त्यास फौजेचे सरदार अनमान करतील की काये कलेना. याजकरिता आपली पत्रे सरदारास आलियास ते राहातील. तरी तिवा सरदारास तीन पत्रे नेहमी राहावयाविसी पाठविली पाहिजेत. फीरोन बल नाईकी केलें तरी * * (माग)ती पारपत्य होईल. राजश्री माहादाजी नाईक येक व * * लोक युद्धातच कराराप्रमाणें निघोन सातारियास * * गेले. त्याचा ठायी आपली उदासता जाली * * (होती) * (ते) दूर करून पूर्ववतप्रमाणे त्यांची स्थापना (होऊन ?) आम्ही लिहिलियाचे सार्थक होये ते केले पाहीजे. या प्रसंगी राजश्री सिदोजी थोरात यानी आपल्यावरी दृष्टि देहून साहासे फौजेनसी, आजी साहा महिने आहेत. राजश्री सिवाजी थोरातहि दोन महिने येथे दोनसे राऊतानसी होते. सेवट आपल्या कडे गेले. त्यांचे. (ऊ)र्जित आपण केलेच असेल. कदाचीत कांही चितात (अर्थ) असेल तरी सर्व प्रकारें दया करून पूर्ववतप्रमाणें * * संरक्षण केलियास ते आम्हा जवली राहिलियाचे * * * (सार्थक) होईल, हे विनंती.

¶*The Pratinidhi warns the Peshwa about the activities of Mahadaji Naik Nimbalkar and of Babuji Naik.*

No. 213] [13-2-1753

श्रीआईआदिपुरुष

पुरवणी राजेश्री बाळाजी पंडित
स्वामी गोसावी यांसी

विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करवणें विशेष. हुजरातीपैकी राजश्री सेखमिराजी तो प्रथम आलेच नव्हते. मोहिते, सिरके हेहि आले नव्हते. पागाहि आली नव्हती. नवे लोक राजश्री मानसिंग जाधव यानी ठेविले होते, ते व पहिले पैकीं कांही पतके आलीं होती. त्यास छ ९ रोजी भोमवारीं प्रातकाली आम्ही फौजेसहवर्तमान नगारा करून निघोन कृष्णातीरास चिंचणेर सनिध[1] गेलो. राजश्री नाईकानी तयार होऊन, गोटास आगी देऊन, उभे राहिले. नदी उतरोन आमच्याहि फौजा गेल्या. नाईकांची फौज मोडली. हाती, निशाण, नगारें, घेतली. राजश्री आबाजी नाईकहि सांपडले. घोडी थोडी बहुत घेतली. राजश्री बाबोजी नाईक यांसी तीन जखमा लागल्या. दोन जखमा दोन हातावरी आहेत. भालियाच्या जखमा आहेत. थोडकिया आहेत. नाईक निघोन सातारियास गेले. आम्ही फौजसुधा मुकामास चिमणगांवास[2] आलो. राजश्री आबाजी नाईकहि बराबरी घेऊन आलो. त्याचीहि श्नानसंध्या जाली. राजश्री बाबुराव जाऊ(न) घरांत सातारियास राहिले. सातारियास जाऊन सातारियाच्या लोकास च्यार अधिकउण्या गोष्टी रागे करून बोलले. गोट गोडोलीवेरी[2] आहे. बुणगेयांत राऊत दोन च्यारसे जमा जाले आहेत. येणेप्रा वर्तमान काली छ ८ रोजी जाले. वरकड हुजरात व राजश्री माहादाजी[3] नाईक करारप्रमाणे युध्यसमई निघोन सातारियास गेले. राजश्री त्रिंबकराव धायगुडे व कृष्णाजी गायकवाड हुजूरचे निसबतीचे वगैरे कांही किरकोल से. पनास राऊत युध्यसमई होते. नाईकाचे फौजेबराबरी त्याचाहि बहुमान जाला. राजश्री त्रिंबकराऊ धायगुडे याचा घरचा पुत्र फौजेत होता तो मृत्य पावला. वरकड जखमी जाले. मेले त्यांची नावनिसी कोठवरी ल्याहावीं. राजश्री उदाजी चव्हाण यांसी पत्रे आपली आली ती पाठविली; परंतु त्यांची दृष्टी आमच्या पारपत्यावरीच आहे. आम्ही त्याचा टिकाव मिरज प्रांती होऊ देतो ना. परंतु करवीरवासी स्वामी याची फौज समागमे होती, त्यांची मर्जी रक्षावी, हा आपला संकेत वारवार पत्रीं येतच गेला; याजकरितां आपला आपमान करून घेऊन, आपल्या लिहिल्यांप्रमाणे चर्चा न केली. प्रस्तुते चव्हाण कोकटनूर तलेसिंग दोन ठाणियांच्या पारपत्यास जात आहेत. पुढे होईल वर्तमान ते लेहून पाठऊन

---

१ किन्हईजवळ? २ सातान्याजवळ पू. २ मैल. ३ निंबाळकर.

देऊन. करवीरवासी स्वामी याची फौज आपल्या स्वस्थलास जावयाची विवचना करून पूर्वी लिहीले होते त्याजप्रा विचार करून फौज लाऊन दिली गेली आगर जाईल. चिकोडकर व राजश्री कालोजी घोरपडे चाकर ठेविले. येकून गूळ फाडून चव्हाण मात्र जातीने उरले आहेत. येविसीचे वर्तमान लिहीले तरी आपल्या चितात येणार नाहीं; परंतु राजश्री संभाजी राजे यास * * * * * यास यावे हा येक मनसबा चव्हाणानी योजला * * त्याचा उपसव्हार जाला, हे विनती.

¶*Jagatjivan Pratinidhi reports to the Peshwa that he has defeated Babuji Naik and taken his brother prisoner.*

---

*No. 214*] [*2-3-1753*

श्री

**अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री**
**दिनकर माहादेव गोसांवी यांसीं**

सेवक विश्वासराऊ बलाळ नमस्कार. सुा सलास खमसैन मयांव अलफ. तुम्ही छ २४ रबिलाखरचीं पत्रें पाठविलीं तीं छ २९ मिनहूस दोन प्रहर दिवसास पावलीं. लिहिलें वृत्त साद्यंत विदित जाहालें. सांप्रत मातुश्रीच्या चित्तांत आलें कीं लहान माणसाचा संग्रह केल्याने परिणाम नाहीं. पेशव्यावर विस्वास टाकल्याने सर्वा सेवकास हुकुमात वर्तऊन, राज्याचा बंदोबस्त करून राज्य नांदिवितील म्हणून मध्यस्थाचें बोलणेयाचे भाव, व खर्चास द्यावयाचा मजकूर कितेक विस्तारे लिहिला तो साद्यंत विदित जाहाला. ऐशीयांस सातारियातील कारभार म्हणजे सर्व अविस्वासी व अविचारी आहे. याजमुळें त्याचा विस्वास कोणास पुरत नाहीं, व कोणाचा विस्वास त्यांस पुरत नाहीं. ते प्रेत्न करावयाचे तितके करितात; शेवटीं सर्व निफळ होतात. कोठे कांही चालेना. सर्व व्यर्थ होते, दुसरा उपाय नाहीसा होतो, तेव्हां ऐशी राजकारणे करुं लागतात. पूर्वी तुम्ही दोन च्यार वेळां याचप्रमाणें राजकारणें करून खर्चास रुपये येथून घेऊन नेऊन दिल्हे, तेव्हां बोलल्याप्रमाणें शेवटास कोठें गेलें? तें आतां कोठे जाणार आहे? खर्चास नाहीसें होतें तेव्हां ऐशीं राजकारणें करून खर्चास रुपये घ्यावें, तदनंतर पुढें जे आहे तेच आहे, ऐसे त्यांचे भाव असतां प्रस्तुत खर्चास रुपये द्यावयास अनकूल कैसें पडतें? प्रस्तुत पैका येथें नाहीं; पैक्याची वोढ आहे तें सर्व वर्तमान तुम्हांस ठावकेंच आहे. याजकरितां पैक्याखेरीज वरकड ममतायुक्त राजकारण राखोन ठेवावें. बाह्यात्कारे उदासभावे करून तुम्ही प्रस्तुत आहा तोच प्रकार

बरा आहे. पुढें तीर्थरूप स्वारीहून अलियावर जे करणे ते करतील. येविशी तीर्थरूपांनी तुम्हास लष्करातून पत्र लेहून पाठविलें तें पाठविलें आहे. त्यावरून सविस्तर कळेल. त्यापत्रांतील अर्थ व भावगर्भ सर्व चित्तामध्ये आणून त्याप्रमाणें वर्तणूक करावी हेच गोष्ट उत्तम आहे. लटके बोलावे, लटके कारकून उभा करून त्याजपासून लटक्याच कल्पना करून करावे, हे रीत कामाची नाहीं. यांत आपलें स्वरूप राहात नाहीं, व आपले मातब्रीस व थोरपणास श्लाघ्यता उत्तम दिसत नाहीं. खऱ्याखुऱ्या गोष्टी असतात त्या परिणामास जात नाहीत, तेव्हा लटक्या गोष्टी परिणामास कोठून जाणार? पुढें मागे त्या गोष्टी कळतील तेव्हा मग कसे होईल? याजकरितां त्या गोष्टीत तुम्ही सर्वथी न पडणे; खरेपणानेंच जे होईल तेंच बरे आहे. तेणें करून परिणाम शुध आहे. इतका मजकुर थोडक्याच दिवसांवर आला आहे. फार दिवस लागतात ऐसें नाहीं. दोन च्यार महिने वाट पाहिलियाने सहजेच चित्तानरूप सर्व होऊन येतील. कांही चिंता आहे ऐसे नाहीं. जाणिजें, छ २६ रबिलाखर माघ वद्य त्रयोदशी शुक्रवार सूर्योदय.

(लेखन सीमा.)

¶*Vishvasrao Ballal to Dinkar Mahadeo, the Peshwa's agent with Tarabai. The lady having found herself completely discomfited, proposed terms of agreement with the Peshwa, to which this letter is a reply.*

---

*No. 215*] [पौ *8-3-1753*

पौ छ २ जाव्हैवल.

## श्रीआईआदिपुरुष.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री विस्वासराव स्वामी गोसावी यांसी. सेवक जगजीवन परशराम नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणऊन स्वकीयें लेखन केलें पाहिजें विशेष. इकडील वर्तमान जें, प्रस्तुत आमचा मुकाम किले वसंतगडानजीक कृष्णातीरी आहे. छ २७ रबिलाखर मंदवासर चतुर्थ प्रहरी राजश्री * * जी मोहिते किलावरून खालें उनगोंन त ल वि डावरी आलें. उपरांतिक आमचे जा(णें) होऊन त्याच्या आमच्या भेटी जाहल्या. आस्तमानी त्यास गोटास घेंऊन आलों. वस्त्रें देंऊन

(१) ३-३-१७५३.

फिरोन किलास गेलें. इंदुवारी प्रतिपदेस जमावसुधा आम्हा संन्निध राहवयासी लस्करात येणार यैसा सिधांत जाहला आहें. आपणास कलावें म्हणऊन लिहिलें आसे. वरकड सातारियाकडील वर्तमान राजश्री दिनकरपंत लिहितच आसतील त्यावरून कलत आसेल. प्रस्तुत वर्तमान ऐकितों जें, राजश्री बाबूजी नाईक प्रतिपदेंस मंगलस्नान करून दरबारास जाऊन पूर्ववतप्रमाणें राजश्री स्वामीस श्रीमंत् मातुश्री आईसाहेब यांच्या दर्शनास घेऊन जाऊन जनात लौकिक करून सर्व सेवकास पत्रें राजश्रीच्या नावची व मातुश्रीच्या नावाची लेहून फौज जमा करून आम्हावरी यावें हाहि उपायें चितांत आणून करणार आहें म्हणऊन वर्तमान आहे. येविसाचा तपसील राजश्री दिनकरपंत याणी लिहिला आसेल आगर लिहितील. बहुधा वर्तमान सत्य आहें. याचाहि परिणाम कोणते रीतीनें होतों पाहवा. सदरहूप्रमाणें विचार घडोन आलिया याचाहि विचार करणे लागेंल. पुढे होईल वर्तमान ते लेंहून पाठऊन देऊ. यानंतर कडेगावचे मुकामीं आसतां राजश्री दादोपंत वाग यांचे सरदार सितोले तिसा स्वारानिसी त्याजकडें जावयासी आलें. त्याची आमची भेटी कडेंगावी जाहली. त्यास राजश्री दादाजीपंत याची रवानगी फौजसहवर्तमान आम्हाकडें आपण करणार ही पत्रे आपला आली होंती. त्याजवरून सितोले यासी आम्ही ठेंऊन घेतलें. दोंन युध्यांत ते होंतें. राजश्री दादोपंतांस यावयासी दिवसगत लागली. हालीं तेहि आलें. येविसी त्यास सांगितले. परंतु आपली आज्ञा आलियाखेरीज ते आंगिकार करीत नाहीत. त्यास दोन हजार रूपये नालबंदी दिल्ही. त्याचा तगादा करीत आहेंत. याजकरितां आपल्यास लिहिलें आसें. तरी सकल आर्थ ध्यानात आणून सितोले याचा आंगिकार करून त्यास तगादा न करीत तें आज्ञा त्यास केली पाहिजें. आपलें पत्र त्यास येविसी पाठविले पाहिजे. बहुत काये लिहिणें, लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*Jagajjivan Pratinidhi to Vishwasrao, son of the Peshwa. Communicates Babuji Naik's activities and intrigues with Tarabai to put down the Pratinidhi and requests that Sardar Sitole should be allowed to stay with and help the Pratinidhi.*

---

*No. 216]* *[March 1753 ?*

## श्रीआईआदिपुरूष.

### पुा राजश्री बालाजी पंडित स्वामी गोसावी यांसी

विनंती. उपरी, आपलीं पत्रें कडेगांवची मुकामी राजश्री घनबा मंत्री यासीं आली तें त्याजकडे प्रविष्ट केलीं. त्यावरून ते स्वस्थलाहून कूच करोन आम्हाकडे

मुकाम मजकुरास आलें. भेटी जाहाली. पंधरा दिवसपर्यंत मुकाम तेथे जाहला. उपरांतिक राजश्री उदाजी चव्हाण याजकडे चिकोडकर व घोरपडें व पाराशर वासी याची फौज होती, तें याचें आमचें विचारें युक्तिप्रयुक्ति करून तेथें त्यामध्यें फूट करून करवीरवासी यांची फौज, त्यांची त्याजकडे गेली. चिकोडकर व घोरपडे तेंहि जात आहेत. इतुका मनसबा करून राजश्री मंत्री व आम्ही कडेगावाहून कूच करोन चिमणगावास येंऊन मुकाम केला. राजश्री मंत्री याणींहि आपणास पत्र लिहिलें आहे त्यावरून कळों येईल. बहुत काय लिहिणें, लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Jagatjiwan Pratinidhi writes to the Peshwa how he and the Mantri managed to break off the following of Udaji Chavan.*

---

*No. 217*] [*March 1753 ?*

**श्रीआईआदिपुरूष.**

**सकलगुणालंकरण अखंडित-**
**लक्ष्मीआलंकृत राजमान्य राजेश्री**
**बालाजी पंडित स्वामी गोसांवी यांसी.**

पोष्य जगजीवन परशराम * * * * * विनंती. उपरी, येथील कुशल (जाणून स्वकी) ये कुशल लेखन करित असिले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहला. राजश्री सिदोजी थोरात यासी अष्टे द्यावे यैसा करार होता. त्यास हे सर्व प्रकारें आमचें पदरीचे याचें सा * * रावें, ते गोष्टी चितापासून क * * * * श्री उधों वासुदेव यासी फौजे * * * ऊन सूर्यवंसी याचे साहित्ये करा * * * ऊन लिहिलें त्यास पूर्वी राजश्री ये * * * * स अष्टे याचे विसी येक * * * * होती जें. आष्टी याचें साहित्य * * * * * लियानंतर दांतेगड तुमचा तुम्हा (स) देविला जाईल म्हणऊन त्याजवरून तदन्वयेच करून आम्ही विचार करून येक राऊत व येक प्यादा पाठविला नाही. श्रीमंत मातुश्री आईसाहेब याणी वीस वेल आज्ञा केली असतां आज्ञा अमान्य करून अष्टे थोरातास यावे हाच उपाये योजिला आहे. उधो वासुदेव खानपुरी आहेत. येवीसीचा शोध करवावा. येक राऊन त्याजकडील गेला नसतां आपण शब्द ठेऊन लिहिलें त्याजवरून दिसोन आले जें. अष्टे थोरात घेतीलच जें. आपली कृपा त्याजवरी आहे त्याजमुले

आम्ही हि साहित्या * * आहों. अष्टे येईल. परंतु * * * * वा लागेल. याजकरितां का * * * * *आमचे ठाई आसलें पाहिजे. त्याज करि * * * * लें यैसे भासतें या मागेहि आपल्या * * रें विचार करित आलों आहों. पुढेहि * * * * विचारास वित्यास घडणें नाहीं * * * न आपण काये विचार चितांत आ * * स इलाज काये बहुत काये लिहिणे, लोभ असो दिजे हे विनंती.

¶*Jagajjivan Pratinidhi to the Peshwa: writes of his having pacified Sidhoji Thorat, and of his being in complete agreement with him.*

---

*No. 218*] [*25-4-1753*

श्री

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य

राजश्री दिनकर माहादेव गोसांवी यांसी.

सेवक विश्वासराऊ बलाळ सुा सलास खंमसैन मयांव अलफ. तुम्ही छ १७ जमादिलाखरचें विनंतीपत्र पाठविलें तें पावलें; लिहिलें वृत्त साद्यंत विदित जाहालें. किले ताथवड्याचा मजकूर लिहिला तो कळला. ऐसियास हा किल्ला घेतलियाने मातुश्री आईसाहेबाचा पेंच पडतो. दुसरी गोष्ट राजश्री पंत प्रतिनिधीचा व तीर्थरूपाचा घरोबा येक विचार जाहाला आहे. तीर्थरूप श्रीरंगपटणास मसलतीस स्वारिस गेले. मागे सातारियाकडील मनसबा सर्व त्याणी संभाळून सर्व कार्यभाग केले. यामुळें आम्हांस येथें कोणे गोष्टीचा गुंता पडला नाहीं. असें असतां त्याचा किला घ्यावा, त्यास श्रमी करावे हे गोष्ट उत्तम नाहीं. त्याचा किला महिपतगड पूर्वी घेतला होता तो तीर्थरूपानी माघारा देविला, असा पदार्थ असता आता त्याचा किला घेतल्यानें तीर्थरूपांचा शब्द लागेल हा अर्थ तुमचे चित्तामध्यें येत नसेल ऐसा अर्थ नाही. सर्व अर्थ तुम्हांस कळतच आहे. याच मजकुराचें पत्र तुम्ही राजश्री बाबूजी नाईक यांजवळ लेहून दिल्हें होतें ते त्याणी हुजूर लाखोटा पाठविला. त्याचा जाबपर्याय लाऊन पत्र लेहून लाखोटा करून त्याजवळ दिल्हा आहे ते तुम्हां जवळ आणून देतील त्यावरून कळेल. जाणिजें छ २० जमादिलाखर.

¶*Vishvasrao Ballal to Dinkar Mahadev, the Peshwa's agent with Tarabai. Mentions how the Peshwa has won over the Pratinidhi and how Tarabai cannot deprive him of his fort Tathoda.*

No. 219] [April-May 1753

श्रीआइआदिपुरुष

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य
राजश्री बालाजी पंडित स्वामी गोसावी यांसी.

पोष्य जगजीवन परशराम कृतानेक नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणऊन स्वकीयें कुशल लेखन करविले पाहिजें विशेष. सांप्रत आपणाकडून पत्रें येऊन वर्तमान कलत नाहीं. तरी यैसे नसावें. सर्वदां पत्र पाठऊन कुशलार्थ लेखन करून स्नेहाची अभिवृधि करावीं (उचित आहे). यानंतर इकडील वर्तमान तरी राजश्री तुलाजी आंगरे सरखेल याणी किले विशालगडास वेढा घातला होता. येदनिमित्य फौजेसहवर्तमान आंबेयाच्या घाटाने शयाद्रीखाले उतरोन वेढा उठविला. सन्मुख युध्य जाले नाही. पाचसाहा हजार मनुष्य होते. दहशतीनेच पलोन गेलें. उपरांतिक राजापुरानजीक जाऊन मुकाम केला. फौजेमुलें काही मुलूक उध्वंस जाला. तदनंतर आंगरे याणी कारकून व मातबर ग्रहस्त बोलीचालीनिमित्य मध्यस्तीस पाठविले. कितेक स्नेहाभावाच्या व ममतेच्या गोष्टी सांगोन पाठविल्या. इकडील लडे होते ते कबूल केलें. पूर्वे-मर्यादिप्रमाणें वर्तावें येसा सिधांत जाहला. उभये पक्षी भेटी व्हाव्या येसा त्याचा मनोदये होता. येदानिमित्य ते राजापुरास आले. आमचेहि जाणे तेथे होऊन ते स्थलीच भेटी जाहल्या. चार पाच रोज मुकाम तेथे होता. परस्पर बहुमान वस्त्रें होऊन संरक्ष्य जाहला. त्यास विजेदुर्गास जावयासी निरोप देऊन आम्ही कूच करोन शयाद्री चढोन मजल दरमजल, सिरालें, आष्टें वालवें, या तिहींच्या मधें कृष्णातीरास येऊन मुकाम केला आहें. आपली येणियाची मार्गप्रतीक्षा करीत आहों. प्रस्तुत आपला मुकाम कोणे स्थली आहे, काये वर्तमान? आपली भेटीची उत्कंठता बहुत लागली आहें. आगमन कोणत्या रोकें होणार, आम्ही कोणत्या रोकें यावें, भेटीचा योग कोणे स्थली घडावा, हे साद्यंत लेखन करून पाठवावें. तदन्वये विचार होऊन येईल. सावंत उभयेता बंधु यामधें ग्रहकलह उत्पन्न जाहला आहे. त्यास राजश्री रामचंद्र सावंत याचे सर्व प्रकारे अवश्यक आहे. रा। जयेराम सावंत आंगरे यांच्या कक्ष्यपी लागोन त्याची मदत घेऊन उत्पात करावयासी प्रारंभ करीत आहेत. त्याच्या पारपत्यास्तव राजश्री दादो माहादेव वाव यासी घाट उतरोन कुडाल प्रांते जावयाविसी लिहिलें. यैसियांसी राजश्री तुलाजी आंगरे सरखेल याची आमची भेटी जाहली. तेसमई येविसी त्याचें आमचें भाषण जाहलें. जयराम सावंत याचा कैपक्ष न करावा यैसा त्याणी आम्हापासी करार केला. हाली आपली पत्रें वाव मारानिले यासी

आलियावरी आंगरे यासी पत्रें पाठविली होती त्याचे प्रत्येतर आले. त्याची तालीक व रा दादोपंत यासी व राजश्री गणेश[1] बलाल यासी पत्रें आंगरे याची आली तेच बजिनस त्याणी आपणाकडे पाठविली आहेत. त्यावरून सविस्तर कळों येईल. आपण लिहिल्यावरून माारनिलें फौजेसमवेत कोकणप्रांतें उतरत होते. त्यास आम्ही आपलेसनिध राहऊन घेतले. यासी कारण तरी प्रज्यन्यकाल समीप आला. पाऊसामुळें फौज सडून हैरान होईल. कोकणातील प्रजन्याचा मजकूर आपणास विदितच आहे. त्याहिमधें आंगरेयाजकडून त्याचे साहित्य न व्हावे येसा करार जाहला. यावरून माारनिलेस खालें उतरों दिल्हे नाही. सावंत यासीहि पत्रें पाठविली आहेत. आणि त्याच्या शहावरी लस्कराचा मुकाम केला आहे. इकडे सावतांवरी शह व इकडे आपल्या भेटीच्या विचारामधें येसे दोन्ही विचार योजून मुकाम केला आहे. त्याच्या पारपत्याविसी अगाध आहे यैसे नाही. भेटी जाहलियानंतर पश्चयांत प्रजन्य काल निवारण जाहलियावरी त्याचा बंदोबस्त येथास्थित कर्तव्य तो करावा. केलाच पाहिजे. प्रस्तुत कांहीं पाईचें हशम लोक रवाना करून दबाव पडोन कलह निवारण होये ते करावे. याचा विचार आपणास कलतच आहे. बहुत काये लिहिणें, लोभ असो दीजे. हे विनंती.

¶*Jagajjiwan Pratinidhi informs the Peshwa how he went to the rescue of Vishalgad which was being invested by Tulaji Angria, how he met the latter and befriended him, and how the dispute between Jayram Sawant and Ramchandra Sawant was being adjusted.*

---

*No. 220*] [*18-5-1753 ?*

**श्रीआईआदिपुरुष**

**सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत**

**राजमान्य राजश्री बाळाजी पंडित स्वामी गोसावी यांसी.**

पोष्य जगजीवन परशराम कृतानेक नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करविले पाहिजे विशेष. सांप्रत आपणाकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी ऐसें न व्हावें. सदैव पत्र पाठवून श्नेहाची अभिवृधी होय ते गोष्टी केली पाहिजे. यानंतर इकडील वर्तमान तरी अगोदर मौजे सरुडसा गाव येथील मुकामीहून पत्रें लिहून पाठविलीं होतीं ते प्रविष्ट होऊन सविस्तर अवगत जाहलेंच असेल. प्रस्तुत सबेआंष्टे[2] येथें सेनेसहवर्तमान श्रीकृष्णातीरानजीक अकलखोप येथें मुकाम आहे. यैसीयासी आपली भेटी व्हावी यैसे मानस बहुत आहे. बहुत दिवस जाहले भेटीची उत्कंठता जाहली आहे. येदं-

---

१ दामले, शा. रो. २३८, २७-२-१७५३.

२ सवाई आष्टें.

निमित्य पुढें कृष्णातीरी * * * आपल्या आगमनाचा मार्ग लक्षित आहों. तरी भेटीचा योग सत्वर घडोन येई ते गोष्टी करावी हें उचित असे. सध्या आपला मुकाम कोणे स्थलीं आहे, काये वर्तमान, पुढें कोणत्या रोके आग * * * आम्ही कोणे ठिकाणी यावे, भेटीचा योग कोणे स्थली घडावा, सकल अर्थ लिहून पाठवावा. तदनुसार विचार कर्तव्य तो केला जाईल. वरकड सविस्तर अर्थ राजश्री गणेश बल्लाळ याणी लिहिला आहे त्यावरून कळों येईल. पूर्वी आपण चिरंजीव राजश्री त्रिंबकराव यासी भेटीचा (सं)केत सांगितला होता, त्यावरून त्याणी आम्हास लिहून पाठविले होतें. त्यास भेटीचा योग (घडो)न येई ते केलियानें उतम असे. भेटी होई(ल तो सु)दिन असे. पर्जन्य काळ * * * * लष्कर पाठविणार सर्व आपण * * * * असोन प्रातास येणे सत्वर * * * ही उत्तम अर्थ जसे पुढेहि * * * * विल्हेस लागणें तर सत्वर स्वदे * * * विचार केला पाहिजे. बहुत काय लिहिणे, लोभ असों दीजे, हे विनंती.

¶*Jagajjiwan Pratinidhi asks the Peshwa where and when he can come for an interview.*

---

*No. 221*] [*18-5-1753 ?*

**श्रीआईआदिपुरुष**

**सकलगुणआलंकर्ण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री बालाजी (पंडित स्वामी गोसावी यांसी)**

पोष्यें जगजीवन परशराम कृतानेक नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीयें लेखन करविलें पाहिजे विशेष. राजश्री यमाजीपंत मसुरीं फौजसुद्धां होते. त्यास आपलें आगमनाचा संनिध विचार ऐकोन त्यास संनिध यावयाची आज्ञा केली. त्याजवरुनी तेथील बेहबुदी करून स्वार प्यादे ठेऊन छ १४ रजवी आकल्खोपचे[1] मुकामी येऊन दाखल जाले. येथील अर्थ वरचेवरी राजश्री येमाजीपंत यांसी आज्ञा करून लेखन केलेच आहे. त्याजवरुनी सर्व अर्थ अवगत जालेच असतील. पुढे नवलविशेष वर्तमान होईल तें आपल्यास लिहिलें जाईल. प्रस्तुत कृष्णातीरी फौजसहवर्तमान आहो. आपल्या लिहिल्याप्रमाणें विचार घडोन येईल. सारांष गोष्टी जे आपण जो विचार करतील त्या विचा * * * आहो. दुसरा अर्थ किमपि नाहीं. वरकड वर्तमान राजश्री कृष्णाजी जिवाजी यानी निवेदन केलेंच असेल. हल्लीं चिरंजीव राजेंश्री त्रिंबकराव यांसी लिहिले

---

१ तासगांवजवळ.

आं ते निवेदन करी * * * ते होईल. बहुत काये लिहिणें, लोभ असो * * * विनंती.

¶*Jagajjiwan Pratinidhi assures the Peshwa that he is in full accord with and ready to follow the lead of the latter.*

---

*No. 222*] [*16-3-1754*

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे
सेवेसी.

विनंती. सेवक रामचंद्र बसवंत कृतानेक सां नमस्कार विज्ञापना येसीजे. स्वामींची आज्ञा जाली कीं, राजश्री दमाजीबावा गायेकवाड समसेरबहादुर याची चाकरी सोडून घरी बसावें. त्याजवरून आपलें गावांस आपण जातों. आपण त्याची चाकरी करणार नाहीं. अंतस्तेंहि त्यांसी कागदपत्र पाठविणार नाहीं. कोणासीं फंदफितवा मिळोन करणार नाहीं. सातारियांस मातुश्री आई-साहेब यांजकड जाणार नाहीं. पुढें कालक्षेप चालणें त्यांस स्वामींच्या पायांपासीं राऊन आज्ञा होईल त्याप्रा वर्तोन कालहरण करूं. अंतर करूं तर सरकारचे गुण्हेगार. हे लिहिलें सही. कृपा केली पाहिजे, हे विज्ञापना. सुरु आर्बा खमसीन मया आलफ छ २१ माहे जमादिलोवल बिा[1] ॐ.

¶*Ramchandra Basavant, Diwan of Damaji Gaikwad, was won over by the Peshwa, to whom he gives this undertaking not to undertake any intrigues with Tarabai or the Gaikwad.*

---

*No. 223*] [*25-6-1760*

मुा ईहींदे सितैन

राजश्री सरकार महाराज
मातुश्री आईसाहेब
माहे जिलकाद ऊर्फ आशाढ मास
सां राजश्री पंतप्रधान मुा
शाहूनगर नजीक किले सातारा.



तेरीख ११ रोज

चिटनिसी व
फडनिसी
गडनिसी

---

[1] बिकलम ॐ

राजश्री त्रिंबकराव विस्वनाथ यासी पत्र जे. माहादाजी गदाधर आमात्य माजी याजकडे सरंजाम हुजरून चालत होता ते मृत्य पावल्यावर त्याची स्त्री उमाबाई यासी त्या सरंजामापैकी निमे सरंजाम हुजरून करार करून दिल्हा त्याप्रो चालला. त्यास वारिल्यावर त्या सरजामाचे आधिकारी दीर राजश्री मल्हारराव नारायण पुतणे अनंदराव जगनाथ हे उभयेता आहित. त्याकडे करार करून द्यावयाचा निश्चय तुम्ही हुजूर आसता करून राजश्री पंतप्रधान यासी आज्ञापत्र सादर केले होते. त्यास ते मुल्कगिरीस जावयाचे गडबडेत होता यामुले प्रसंग तैसाच राहिला. या राज्याचे उभारणीस्तव आरंभी गदाधर पंडित याही श्रमसाहस बहुत केले. प्रस्तुत त्याचे पुतणे व नातू हे उभयेता साहेब कामा योग्य [अपूर्ण]

¶*An incomplete letter from Ramraja to Trimbak Vishvanath Pethe from Shahunagar regarding the Saranjam of Mahadaji Gadadhar.*

---

*No. 224*] [*23-5-1761*

श्री

तीर्थरूप सौभाग्यवती मातुश्री
काकूबाई वडिलांचे शेवेसी.

आपत्ये माधवरायाचे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। वैशाख वद्य ४ मुा टोके वडिलांचे आसीर्वादेंकरून यथास्थित असे. यानंतर आपण पत्र पाठविले तें पावले. वर्तमान विदित जालें. तीर्थरूपांची शरीर-प्रकृत जी आहे तीच आहे. आम्हास आज्ञा जाली, तुम्ही सातारां जाऊन नवा राजा ब(सऊ)न येणे. त्यास येथें राहों न देत. बहूतच आग्रह; याजकरितां रविवारीं पंचमीस स्वार होऊन, तीर्थरूप राजश्री दादासाहेबांकडे जातों. तेथें जसी आज्ञा करितील, त्याप्रमाणे करूं. आपणास विदित व्हावे. आपणाकरितां सौभाग्यवती बाई गंगातीरीं राहातात असा प्रकार आईकतो. आपणास विदित होईल. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*Young Madhavrao writes to Parwatibai that the Peshwa has asked him to proceed to Satara and instal a new King on the Throne.*


RAMRAJA'S STRUGGLE FOR POWER.
----- Damaji Gaikwar's Route
+++++ Janoji Nimbalkar's Route
Scale 1"=63 Miles.
74°
76°
22°
20°
18°
16°
Tapti R.
Nandurbar
Burhanpur
Chopda
Amalner
Dhulia
Chalisgaon
Nasik
Yeola
Kopargaon
Sinnar
Sangamner
Junnar
Bhima R.
Ahmadnagar
Parner
BOMBAY
Khed
Pabal
Sirur
Amalner
Dandi
Kendur
Sonegaon
Shikrapur
Ashti
Talegaon
Shrigonda
Poona
Khed
Rajewadi
Karmala
Purandhar
Jejuri
Jeur
Bhor
Parenda
Pangaon
Wai
Tuljapur
Waduth
Man
Satara
Koregaon
Sholapur
Mhasvad
Pandharpur
Sangola
Karad
Khanapur
Warna R.
Ashta
Tasgaon
Sangli
Miraj
Athni
Kolhapur
Kistna R.
G.P.Z.O. 1930.

## *EARLY ACTIVITIES OF SHAHU AND BALAJI VISHVANATH, 1707-1720*

These letters (41) give us an insight into the administrative activities of Chatrapati Shahu in his early years. The Maratha kingdom which at the time of his death extended from the Cauveri to the Ganges and the Jumna, comprised in the beginning of his reign a very small tract round Satara, threatened by Tarabai, the dowager-queen of Rajaram, on the South, and by the Mugals on the North and East. It was a delicate situation for the young Maratha nation, out of which Shahu steered very skilfully. The king, as is seen from this correspondence, is busy making new appointments, rewarding his adherents, sending out orders for the recovery of dues from the ryots and cautiously directing the movements of his troops. Many of the letters speak of the financial straits of the king, it being difficult at times to obtain supplies for the Royal kitchen (Letter No. 8). The country is still in an unsettled condition and reports of raids and disturbances on the part of Damaji Thorat, Chandrasen Jadhav and other Maratha and Mussalman Sardars daily reach the king. Many of the adherents of Tarabai are placated by grants of Vatans and Inams ; clothes of honour are bought for an interview with the powerful Angria (Letters Nos. 14, 21).

Balaji Vishwanath who, towards the end of 1713, rose to the position of Premier (Peshwa) meets us as the Sar-Subha, Prant Poona, evidently under the regime of Tarabai. Though his motive for the espousal of the cause of Shahu remains a matter for conjecture he seems to be in the King's confidence, along with his brother Janoji from the very beginning, since a letter is discovered which asks Balaji not to fall out with Janoji for a colt, but to restore it to him. Another dispels the myth of the drowning of Janoji by the Sidi of Janjira. He is in Shahu's employment in 1708. The minister Balaji Vishvanath is busy going from place to place to see that order is restored everywhere, and appears to be active in the district of Khargon on his way South from Delhi in 1719. Chauth is also being recovered from the Mogul Subha in the south, that of the Nizam.

Two or three papers in this section are lists of important personages—e.g., Fatesing Bhonsle was married in 1719 and invitations were issued to many persons whose names are recorded, many of them veterans who had rendered valuable service to the Maratha cause in the war of Independence.

That Shahu triumphed over the overwhelming difficulties which confronted him on his return to the Deccan in 1707, almost without resources, appears from these letters to be due to his own tireless energy and unfailing tact. Evidently he was then a very different person from the indolent and eccentric monarch of later years.

No. 1]

[आरंभींचा मजकूर फाटला आहे.]

९३९९ सरसुभा रा बाळाजी विस्वनाथ.

१४१४ सेनापति

६१७ हंबीरराऊ

२७७९१८÷

बाकी रुपये

४२३०२८≡

ता

३९९२७।।= गांवगन्ना

२५४२ सिलक वाडली

४९९ दिा रामाजी हरी व * * जी जगथाप

१८४ कृष्णाजी व कासी हरी

७९८।। मोरो यादव व मलारजी लगडा

१०६० खंडोजी सिंदे.

२५४२

२७९८= फाजील खत खंडोजी शिंदे.

४२३४५८÷

¶*A piece of account in which Balaji Vishvanath is referred to as Sarsubha.*

---

No. 2]

यादी पत्र येणेंप्रमाणें पत्र रा. बाळाजी विश्वनाथ यासीं की राजश्री रुद्राजी विस्वनाथ यांजवळ तुमची घोडी सभर होती. त्यासी घोडी प्रसूत जालियावरी घोडी व सिंगरु तुमचे स्वाधीन केले. त्यासी एक वरीस जाले. हली तुम्ही नसते तुफान केले की हें सिंगरु आमचे घोडीचे नव्हे, ऐसे म्हणोन सिंगरू मारचे घरी पाठऊन त्याचे घोडीचे सिंगरू नेले आहे म्हणून विदित जाले. तरी हे गोष्टी कार्याची नाहीं. हली आज्ञापत्र लिहिले आहे. तरी देखतपत्र याचे सिंगी याचे स्वाधीन करणें. फिरोन ये गो(ष्टी)चा बोभाट आलिया कार्यास येणार नाही ऐसे पत्र देवावे.

¶*This letter proves how intimately Shahu knew Balaji Vishvanath's family.*

No. 3] [2-8-1708

श्री




अजस्वारी राजश्री जानो विस्वनाथ * * मोकदमानी मौजे कोढीत का सासवड प्रा पुणे सुा तिसा मया आलफ. पागेचा गला लोहगडी खा करून ठेविला होता तो भाडे करून आणिला. त्यास भाडेपटी सिस्त मौजे मजकुरास रुपये ३५ पसतीस करार केले. त्यापैकी हाली बराबर मलू माहार मौजे मजकूर, रुपये १७ सतरा पाठविले ते जमा स्वारी मजकुरा असेती. रा छ २६ जमादिलोवल.

लेखन
बार सिमा

*¶Janoji Vishvanath, brother of the first Peshwa, recovers from the village of Kodit the charges of bringing corn from Lohgad. This paper proves that Jano Vishvanath was in Shahu's service and used Balaji's seal. That he was drowned by the Siddi is not correct. It was Balaji's surety at the salt works, one Sambhajipant, that was so drowned.*

---

No. 4] [1709

श्री

हिसेबु प्रा भागानगर सुा असर मया अलफु तह गुा रा. कृष्णाराऊ मलार रुपये ८००००० पैकी वसूल दिा कृष्णराऊ

| | |
|---|---|
| ३०५५५२॥।. | ऐन वसूल रुजू जाबिता हरि कृष्ण |
| ४०००० | दरबार खर्च |
| २०००० | जकायेतीवरी ऐवज |
| १२५००० | रा. मलार अंबाजीस आपल्या कर्जा * * यासी जाब बाकी * * दिल्ही. तो देविला ऐवज |
| ७५००० | कवीलास माहलपैकी |
| ५६५५५२॥।. | |

११६९४० रदबदली कलमें.

४००० मेलगिरी

१३२१९ मकरडी.

७००० रामरडी

८७९० हतीबा.

१२७९ बा घोडे

४००० पवलचनेर

८००० अतीक्रहर

१००० गुडुर

६००० टकमाल

१००० * * *

२७०० * * *

९००० कोटपली

९१०० कोउर

३०० अकलकोटा

१९०० पोटदूर

२१००० कलपदूर.

३००० तुपळाणा

२००० गंजवेल

९००० सूगुर

१६६४० ———

———

११६९४०

———

६८२०९२॥.

बाकी. ११७९०७।.

सदरहू पैकी पनास हजार पावतो साल मजकुरी वसूल घेतला आहे म्हणून * * * * * लक्ष देविले होते. त्या पैकी रुका पाठवला नाहीं. हुजूर लक्ष देविले होते त्यापैकी गोदाजी निंबालकर याचे गुजारतीने दाहवीस हजाराची विले करून दिल्ही. त्या पैकी तीस हजार पावेतो वसूल होऊन आला म्हणून ऐकतो. गोदजी निंबालकराची भेटी होऊन वर्तमान कले(ल) तेहि लिहिले जाईल.

¶*This little account shews the dues which Shahu had to receive from the Bhaganagar District so early as 1709 probably on account of the Chouth.*

No. 5] [29-10-1709

श्री




आज्ञापत्र राजश्री बाळाजी विस्वनाथ ता। खोतू मौजे सोमेस्वर ता। हरचिरी सु।। आशर मया आलफ. मौजे मा।रपैकी रुपये १०० येकसे राजश्री दताजी आंगरे याकडे देविले आहेती. मौजे मा।रपैकी आदा करणे. उजूर न करणे. पावलियाचा जाब घेणे, जाणिजे छ ६ रमजान.




¶*Balaji Vishwanath, not then the Peshwa, orders Rs. 100 to be paid to Dattaji Angre, who appears to be a relation of Kanhoji.*

---

No. 6] [1710 ?

श्री

यादी

रा। बाळाजी विस्वनाथ सैनाकर्ते याकडे वरात रुपये २०००

दोनी हाजाराची देवराव भोसले यास देविली पाहिजे.

देणे

मौजे लोणद ता। नीरथडी पा। पुणे येथील बाबतीचा मुकासा देवराव भोसले याकडे देविले पाहिजे.

---

१ देणे

¶*Shahu's financial arrangements.*

No. 7] [1708—1711

श्री

राजश्रिया विराजित राजमान्ये राजश्री अंताजी
त्रिमल गोसावियासी.

सो गदाधर प्रल्हाद प्रतिनिधि नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करणे विशेश. श्रावण वद्य दसमीस श्राध आहे. त्यास ब्राम्हणास द्यावयासी धोत्रजोडे पाहिजे. तरी तुम्ही धोत्रजोडे सुमार २५ पंचविसि किा रा दीड पावणेदोन सवादोन अडीच यैसा किमतीचे धोत्रजोड खरीदी करून सत्वर पाठवणे ; येक क्षणाचा दिरंग न लावणे. या कामास लखमोजी चवाण व रायाजी पवार अफराद दिा लबे पाठविले आहेत. यासी वेतनात रुपये ४ च्यार रास देविले असे. आदा रुपये तुम्हाकडे यैवज नेमिला आहे त्यापैकी देणे. सदरहू धोत्रजोडविशी खोलंबा होऊ न देणे. जाणिजे राा छ १४ जमादिलाखर बहुत काये लिहिणे

बार

¶*The Pratinidhi orders for Shahu 25 pairs of dothirs for some anniversary. Whose can it be ?*

---

No. 8] [1708—1711

श्री

राजश्रिया विराजित राजमान्ये राजश्री आंताजी त्रिमल गोसावी यासी. सेवक गदाधर प्रल्हाद प्रतिनिध नमस्कार. येथील कुषळ जाणून स्वकुशललेखन करणे विषेश. हुजूर राजश्री स्वामीच्या मुदबखाकडे बकरी खाा गुाा सेटी खाटीक मीाा (?) देणे. पैकी तुम्हाकडे पेशजी रुा १५० दीडसे सादर आहे. त्यापैकी तुम्ही पाऊणसे रुपयेची वरात तोडिली आहे म्हणोन खाटीकमजकूर याणी विदित केले. यैसियासी मुदबखचे काम रोजबरोज नाजुक लागले आहे. पैका न पावता काम बंद होऊन हुजूर बोभाट आला आहे. तरी हाली सेटी खाटीक तुम्हाकडे आला आहे तर याचे पदरी पाऊणसे रुपये आताच घालणे, आणि पाऊणसेची वरात तोडिली आहे त्यास ताकीद करून तेहि पाऊणसे पावणे. अनमान न करणे छ १६ जमादिलाखर. बहुत काये लिहिणे.

लेखन
सीमा.

¶*Gadadhar Pralhad Pratinidhi orders Antaji Trimal to pay Rs. 75 to the butcher who supplies mutton to Shahu's kitchen.*

No. 9] [1708—1711

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री अंताजी त्रिमल गोा यासी सेवक गदाधर प्रल्हाद प्रतिनिधी नमस्कार. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करणे. विशेष. हुजूरपागेकडे पखला पाहिजेत तरी २ बैल पखलासुाा सिताबीने पाठऊन देणे. येके घडीचा उजूर न करणे. जाणिजे. या कामास जोत्याजी कदम व संकराजी कापशा अफराद पाठविले आहेत. यास वेतनात दर रुाा २ याो च्यार रुपये रास आदा करणे. छ १० जमादिलाखर बहुत काये लिहिणे.

लेखन
सीमा.

¶*Gadadhar Pralhad was removed from his office in 1711. He is busy equipping Shahu's army.*

---

No. 10] [23-2-1711

श्री

स्वस्ति श्री राज्याभिशक शके ३७ विकृतिनाम संवछरे माघ सुध पूर्णिमा भौमवासरे क्षेत्रियेकुलावतंश श्रीछत्रपती स्वामीचे सेवेसी सेवक आमरसिंग वलद बाहादूरसिंग बारगीर सेवकं राजमंडळ लिहून दिल्हे जमानपत्र यैसेजे. स्वामी कृपाळु होऊन राजश्री रघुनाथसिंग बिन जयेसिंग रजपूत यांसी सप्तसहश्री सेना सिलेदारीची सेवा सांगोन जमानाविषीं आज्ञा केली त्यासी आपण जमान आसो.

श्री ०
शाहूनरपतिहर्ष-
निधान मोरेश्वर-
सुत भैरव प्रधान.

श्री आई आदिपुरुष
श्री राजा शाहु छत्र-
पती स्वामी कृपा-
निधि तस्य परशराम
त्र्यंबक प्रतिनिधि.

माइल गैरहजीर जाहालियां आपण हजीर करू. हजीर करूं न सको तरी मार-इलेच्या ताल्लुकातीचा जाब करूं. हे जमानपत्र लिहून दिल्हे सही. लेखनालंकार

रुजू

तेरीख १४

जिल्हेज सुा ईहिद

अशर मया व अलफ

सुरुसुद

अस्पष्ट.
शिक्का

¶*A Rajput Raghunathsing, son of Jaysing, was appointed to provide and command seven thousand troops by Shahu. This shews that Rajputs from the north accepted Shahu's service.*

---

*No. 11*] [*23-7-1711*

**श्री**

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री अंताजीपंत गोसावी यास, सेवक गदाधर प्रल्हाद प्रतिनिधी नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून कुशललेखन करणे विशेष. तुम्हाकडे मोधीचा यैवज दरमाहे नेमिला आहे त्या यैवजपैकी बद्दल-देणे वेतनात गोविंद राम खरिदी जिसनीध (?) राजश्री स्वामी रुपये ५० पनास रास देविले असेत. प्रविष्ट करणे. छ १७ जमादिलाखर सुहुर सन इहिदे अशर मया अलफ. बहुत काय लिहिणे.

शिक्का

¶*Gadadhar Pralhad asks Antajipant to make a payment of Rs, 50 for things purchased.*

---

*No. 12*] [*1-10-1711*

**श्री**

माहाराज राजश्री छत्रपती स्वामीचे सेवेसी विनंती. सेवक संताजी जाधवराऊ सेनापति विज्ञापना. ता छ २८ साबान स्वामीचे कृपादृष्टीकरून

वतमान येथास्थित असे विशष. स्वामींनी वेचास मोहरा ३० तीस पाठविल्या त्या पावल्या. सेवेसी विदित होये हे विज्ञाप्ति.

(शिक्का.)

१) ¶*Dhanaji Jadhao's son Santaji was Shahu's Senapati for a short time in 1711-12. He acknowledges receipt of 30 mohors.*

---

*No. 13*] [*11-10-1711*

(शाहू दप्तर रुमाल ५५ पैकीं.)

जाबिता जमा पैदास्त बाबत स्वारी मौजे किंवळ ता उंबरज सुा।सन इसने अशर मया व आलफ. मौजे मजकुरीं हरामखोराकडील व्यासराव यांचा काबिला धरून आणावयाकरितां स्वारी पाठविली होती. त्यांनीं त्याचे निसबतीचे कबिले धरून त्याजवळ घेतले ते आणिले व स्वारीस लोक गेले होते त्यांचा हरवजा झांडा घेऊन किरकोळी चिंदीचोळा सांपडला ते देखील जमा केले छ ९ रमजान. बिा रुपये ९६२।= बाबत जिनस एकून पांचशे सवा बासष्ट चवल रोख येक अस्त्र रोख दागिने सुमार १० दाहा रोख [याखालीं सर्व जिनसांच्या किमतींसह यादी आहे. तसेंच या तारखेच्या जमाखर्चांत आवजी नीळकंठ व महादाजी यमाजी यांचा उल्लेख सभासद म्हणून आहे. आवजी नीळकंठ हा पेशव्यांचा चिटणीस व महादाजी यमाजी हा सखाराम बापू बोकील याचा चुलत आजा. शाहूचे आरंभीं हे गृहस्थ त्याचे दरबारीं होते.]

¶*This paper singularly corroborates the incident of the deer which being pursued by Piraji Raut was sheltered by Vyasrao, a clerk of Chandrasen Jadhao, the Senapati of Shahu. The incident resulted in the desertion of the Maratha cause by Chandrasen.*

---

*No. 14*] [*24-10-1711*

**श्री**

**दरबंदगी माहाराज राजश्री छत्रपति**
**साहेबांचे बंदगीस.**

दाा बेाा रायाजी बिन लखमोजी जाधव मोकदम मौजे भोईज साा निब पाा वाई मुाा इसनेअशर मया अलफ कारणे साहेबाचे बंदगीस लहून दिल्हा कबूल-

कतबा ऐसाजे. साहेबी सेरीकरास हुजूर बोलाऊन तोहमत +लाविली कीं तू थोराताकडे चाकरी करून होतास. थोरात मार हरामखोर जाहले. तूं गुन्हेगारी देणे म्हणून तगादा आपणांस लाविला. मग आपले बाहे देशमुखे[1] देसकुळकर्णी[2] पा मार यानी इलतमस[3] केली कीं पटल मार थोराताचे चाकर होता खरे. परंतु चंद्रसेन व थोरात हरामखोर होऊनु पांडोगडासी जुझत होते ते प्रसंगी आपले गावी पटल मार राहून रयेतगिरीने होता. हली साहेबी गुन्हेगारीचे हुकूम त्यास केला तरी सेरीकर दिवाण नफर आहे त्याचे मवसर पाहून जीवनमाफीक टका सिरी ठेविलियाने उगवणी करून पेस्तर गावी राहून कीर्दीआबादानी दिवाणकिफायत करील म्हणून इलतमस केली. बराये इलतमतस देसमूख व देसकुलकर्णी साहेबी खातरेस आणून सेरीकारावरी कृपाळू होऊन कुल तकसीर माफ करून आपले जीवनमाफीक खंड आपले सिरीं ठेविला तो आपण खुषरजा कबूल केला. त्याची उगवणी करून देऊन. रुपये साहजार यो बेरीज रो ६०००

तेरीख २२

रमजान

निमनागर

साक्ष

सिवजीपा मौजे आरफळ — सभाजी पा मौज तुगी.

सा निब

¶*The letter refers to the rebellion of Damaji Thorat and Chandrasen Jadhav.*

---

*No. 15*] [*1712?*

**श्री.**

यादीदास्त राजश्री संभुसिंग जाधवराव यांचे पत्राचा अशय कलमे पा पाथरी वगैरे माहाली पेशवे यांची फौज जाताना गेली, त्यामुले कमावी(स)दार कोणी करीत नाहीं आणि कर्जवामहि मिलत नाहीं. तर साहेबी काही मदतखर्च देवावा. कलम १; व कलबरगे वगैरे माहाल पाच याच्या ताकिदाही प्राप्त होत नाही त्या आज्ञा करून देवाव्यां. कलम १

¶*Shambhusing Jadhav, son of Dhanaji, was Shahu's active supporter, after his brother Chandrasen's desertion in 1711, and sends his terms to Shahu.*

---

+ येथें उजवे बाजूस शिका. १ बिहुजूर जोत्याजी केसरकर अजहत देसमुख पा वाई.
२ बिकलम. गिरमाजी झुंगो देसकुळकर्णी पा वाई. ३ विनंती.

No. 16] [17-1-1712

श्री

स्वारी राजश्री राज्याभिषकशके ३८ खरनाम संवत्सरे पौष बहुल पंचमी गुरुवासरे क्षत्रियकुलावंतस श्रीराजाशाहू छत्रपति स्वामी याणी राजश्री कृष्णाजी







बलाल देशाधिकारी व लेखक प्रांत सातारा यास आज्ञा केली येसीजे. प्रांत मजकुरी मोगलाकडील पटी करून दिली आहे त्या * * * * बिलाकुसूर वसूल करून त्याकडील कमावि- * * आहेत त्याकडे पावणे लेखनालंकार




¶Shahu orders Krishnaji Ballal to collect dues for the Moguls from the district of Satara.

---

No. 17] [30-9-1712

रा रोजकीर्द

सुा सलास

दिा. मजमू छ ९ रमजान

किा सनद इनाम नीळकंठ बलाल यास; राजश्री आबुराऊ याकडे जमावाचे बेगमीबद्दल तुम्हाकडून रुपये ५००० देविले ते पाविले नाहीत. हली या पैकी हुजरून त्याकडे देन्हे १६०० तो ऐवज हूजूर पाठवणे. या कामास बाळोजी कापसा व गुणाजी सिंदा निा दर्याजी ना पवार यासी मसाला रुपये—

१० बालाजी कापसा

१० गुणाजी सिंदा

२०

¶An order upon Nilo Ballal to pay into Government treasury Rs. 1,600.

No. 18] [30-1-1713 ?

श्री

श्रीमंत राजश्री पंत आमात्य स्वामीचे
सेवेसी

सेवक कोनेर वेंकटेश सा। नमस्कार विनंती उपर. सेद सेखमिरा याच्या निसबत राऊत त्याचा घोडा लाखपुरीवरी पडला म्हणोन आपणासी तगादा केला. त्यार्चा मुनसीबी[1] स्वामीकडे आली. त्याचा करीना मनास आणिता निव्हाडा गोही वरी आला. त्याची गोही रा. कृष्णाजी बलदेव, संताजी जाचक व सिउजी गरुड याजला शपतपूर्वक पत्र स्वामीचे जागे आणि त्यानी आपले बेतालीस स्मरोन गोही लेहून पाठविली कीं सेखजीचे राऊत लाखे(दु)रीच्या दांडगियाबराबर आले होते. त्या जुंझामधे घोडे पडले तरी दावा आपणाकडे नाही. अगर पत्र त्याचे आले कीं राऊत दांडगियाबराबर नवते. हे निराले आले होते. जुंझात नवते. येकायेकीं याचा घोडा मारिला. यैसे आले. तरी घोडीयाचा जाब आपण करून ब मनसुबी वराडात अजम नुरखानी दि॥ साहेबसुभा व रा. दामाजीराव दिवाण याचे विद्यमाने निवडून त्याचे पत्र सेवेसी पाठऊन देऊन. हे तेथे फैसल रुबरु याचे न जाले तरी त्रिवर्गाची पत्रे हूजूर पाठऊन देऊ. मग आखेरसाली स्वामीच्या विद्यमाने जें चुकणे ते चुकऊन ता॥ १४ मोहर सु॥ सलास हे विनंती.

गो

| | |
|---|---|
| त्रिंबकराउ धायगुडे | रामजीपंताजी मजमदार |
| आपाजी गोसावी | बाबती प्रा॥ वराड |

¶*Konher Vyankatesh undertakes to repay the price of a horse that was killed.*

---

No. 19] [19-8-1713

श्री

स्वस्ति श्रीराज्याभिषेकशके ३९ नंदन संवत्सरे भाद्रपद सुध नवमी भृगुवासर क्षत्रियकुलावतंस श्रीराजाशाहु छत्रपति याणी राजश्री माणको बापूजी यांसी आज्ञा केली येसीजे.

---

१ निवाड्याचें प्रकरण.

तुम्ही खासगीचा धंधा करीत असता कारभारासमध्यें राजश्री यादव गोपाल यांचे विद्यमाने स्वामींचे बेहडयाकडील तुम्हाकडे कर्ज रु ४२०० च्यार हजार दोनींसें यावे यापैकी वसूल रु ३००० तीन हजार आले. ते मुजरां तुम्हास राजश्री आनंदराऊ माहादेव यांचे विद्यमाने वजा होऊनु बाकी रु १२०० बारासे उरले, तो येवज कसबे इंदापुरावरी खासगीच्या येवजी बाकी आहे. तो येवज वसूल घ्यावा येविसी आज्ञा केली आहे ते वसूल घेतील. तुमचा कतबा बेहड्याकडे आहे तो देविला आहे. घेणे. याउपरी बेहड्याकडील कर्जाचा तगादा तुम्हास होणार नाही. जाणिजे लेखनालंकार.

¶*Shahu pays Manko Bapuji portion of the debt due to him, on account of his dealings with Yado Gopal and Anandrao Mahadev.*

---

*No. 20]* *[9-7-1714*

**श्री**

**राजश्री** **पंतप्रधान**

**गोसावी यांसी.**

श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये श्नेाा दावलजी सोमवंसी रूस्तुमराऊ समसेरबहादर दंडवत विनंती. येथील क्षेम जाणून स्वकीये वैभवलेखनआज्ञा केली पाहिजे. हुजूरची लग्नपटी आम्हाकडील माहाल बिताा

१ चांदवड
१ दिंडोरी
१ सोनगीर
१ बाबल
१ भडगाव
१ उतरायेण
१ अडावद
—
७

येकून माहाल सात. याजवर एकरार यैवज रुपये ४५०१ साडेच्यार हजार. पैकी निमे यैवज सालमजकुरी जेस्ट मासी रुाा २२५० साडेबाविससे घेऊन निमे राहिले ते पेस्तर साली देऊ. अतर न पडे. विशेस काये लिहिणे? कृपा निरंतर असो दिल्ही पाहिजे. सुाा आर्बा असेर मया व अलफ छ ७ रजब्र. हे विनंती.

¶*Dawalji Somvanshi to the Peshwa : undertakes to pay the amount of the marriage cess from the seven districts in two instalments.*

No. 21] [8-11-1714

श्री

**माहाराज राजश्री छत्रपति स्वामीचे शेवेशी.**

विनंती सेवक आज्ञाधारक बसवंतराऊ कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान तागायेत कार्तिक शुध्र त्रयोदशी भोमवासर पर्येत येथास्थित असे विशेष. स्वामीनी आबाजी बाड याजबराबर आज्ञापत्रे सादर केली की रा। कान्होजी आंगरे याचे भेटीचा प्रसंग आहे तरी सनगे तुरे व पदके येका दो प्रतीची याद पाठविली आहे, त्याप्रमाणे सिध करून पाठवणे. त्यावरून थोडीबहुत माहाली जे वस्ता होत्या त्या व आनिखी खरिदी करून शेवेसी पाठविल्या आहेत. त्याची माहालीची बखैर व सनगाप्रमाणे बजिनस जाबिता पाठविला आहे, त्याप्रमाणे पावलियाचे उतर द्यावया आज्ञा केली पाहिजे. यानंतर दर्शनाचा प्रसंग दिसगतीचा देखिला या करितां सनगे पाठवावयाचा अनमान केला होता, परंतु मागती समागम यैसा नाहीं, या करिता पाठविली असेत. तरी बजिनस स्वामीनी ज्या प्रसंगास आणविला आहे तोच प्रसग संपादिला पाहिजे. याउपरी येसा जिनस माहाली व खरीदीहि समई मिळणार नाही या करितां सेवेशी सूचना मात्र लिहिली असे. स्वामी सर्वज्ञ आहेत आपण शेवक आज्ञाधारक आहो ह विज्ञाप्ति.

¶*Basvantrao Khoja, a trusted servant of Shahu, informs him of his having arranged dresses for presentation to Kanhoji Angre when he comes to visit the King. This is the first visit of Kanhoji Angre to Shahu, after he was conciliated by Peshwa Balaji Vishvanath in his well-known negotiations of 18th February 1714.*

---

No. 22] [8-12-1714

[ आरंभीचा मजकूर फाटला आहे. ]

सिका

व कारकून वर्तमान भावी ता। नाणेमा (वळ) * * * * * विश्वनाथ प्रधान सु॥ खमस अशर (मया) (अ)लफ वे॥ राजश्री बापूभट बिन कृष्णभट मोघे मुद्गल गोत्र सूत्र आश्वलायन वास्तव्य पेठ लोहोगड, हे वेदशास्त्र-संपन्न बहुत थोर ब्राम्हण, स्नानसंध्यादि षट्कर्मे आचरण करून राजश्री स्वामीच्या राज्याचे कल्याण चिंतून आहेत. हे लोहोगडचे प्रसंगात अनुष्ठान करून अभिवृद्धि केली. पुढे राजश्री स्वामीच्या राज्याची अभिवृद्धि चिंतून आहेत. याचे कुटुंब चालविले पाहिजे. याजकरिता यास इनाम.

¶*Balaji Vishvanath confers inam on a Brahmin Bapubhat Moghe.*

No. 23] [1715 ?

श्री

तेरीज सेनापति सन खमस

| | |
|---|---|
| ४३२९० | हूजूरपागा |
| ३४५००० | मोघम संरजाम |
| ७८०० | कारकून |
| २००७० | खासा वेतन |
| ६२५० | फुट सिलेदार |
| ३०५० | सिपाई हुजुरात |
| ९४३०० | सुभा संताजी जाधवराव |
| १८९५० | सुभा चंद्रसेन जाधव |
| १२७२५ | सुभा रामाजी घाटगे |
| ३५९५० | सिवाजी जाधवराव |
| २८२५ | विठोजी खताल |
| १३९०० | भुजबलराव काकाजी |
| ३०७०० | गणूजी कोलेकर |
| ३५०० | जागोजी रुपनवर |
| ४०५० | सेटियाजी व जागोजी रुपनवर व येमाजी माहार्णवर |
| २२८०० | सुभा पदाजी बांडगर |
| १०८०० | पाा रुपनवर माहर्णवार |
| ११०० | सिदोजी रुपनवर |
| १००० | रामोजी बेलदार |
| ५०० | सयाजी जगथाप |
| ५००० | कासोजी मोरोजी जगा |
| ३०५०० | वणगपाळ निंबाळकर |
| ५४०० | साबाजी भोसले |
| ९४०० | पिराजी वागमोडं |
| १८५०० | खानाजी व मुधोजी बांडगर |
| ३९०० | सितोळे मोरवाळके |
| १६००० | सभाजी व खानाजी बांडगर |
| २२००० | मुधोजी बेलदार |

२९०० मित्रजी चव्हाण
९००० रामराव खराडे
३०३०० राणोजी माने
३७०० सताजी पवार
९०० संभाजी नलवडे
१८३७५ सताजी बिन बाजी भोाा
४१९०० तुळाजी घाटगे
७०० सिंदोजी बिन कोडंर्जा
६४४० राणोजी यादव
२९५० सुकमाजी यादव
१३०० दताजी भोसले
२३४०० भिकाजी कोकरे
१०००० फत्तेखान भोसले
२०० सिवाजी साळोखी
३७०० माधवराव कृष्णाजी घाटगे
१२५० जानोजी गिरजोजी भोसले
१४१०० रायाजी मल्हार
४७५० मिताजी सेडगे
४३०० वाघोजी कदम
४९७५ सिवाजी धुलोजी ठेवी
८०० तुळाजी जाधवराव
६३२५ संताजी समसेर
१३३२५ मानाजी दरेकर
४५०० बहिरजी गोडे
१०२०० देवजी सताजी खेडकर
७५० सर्ज्याराव पवार
३५७५ राणोजी सिंदे
६८०० धुकोजी वागमोडे
१२३५० शाहजी सिंदे
५००० मेसजी कोली
११००० हिरोजी सोनवलकर
६९६०० अंबरोजी व बालोजी पांढरे

| | |
|---|---|
| ३९५० | गुणाजी अविचार |
| ५२५ | रामाजी बाजी |
| ४६५५० | त्र्यबंकजी ढमढेरे |
| ४४७०० | अन्रा दाजी सेडगे |
| ३०५० | शंकराजी फर्जंद |
| ११७०० | अपाजी अश्वाजी सोनवलकर |
| ४८४५० | तुलाजी गिरजोजी सोनवलकर |
| १२९८३५० | |

¶ *An abstract account of Rs. 12,98,350 rendered by the Commander-in-chief.*

*If this paper be correctly dated, it gives many important names in Shahu's employ. Their families and descendants can therefrom be conveniently traced.*

---

*No. 24]* *[26-3-1715*

**श्री.**

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ४१ मन्मथ सवत्सरे चैत्र शुध्द त्रितीया मंदवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपति स्वामी यांणीं राजश्री देवजी यादव यासी आज्ञा केली ऐसीजे. •श्रीच्या दर्शनास स्वामी जात आहेत. समागमे जमाव असिला पाहिजे. याकरिता पत्रदर्शनी स्वार होऊन जमावानसी येणे. या कामास बहिर्जी भोसला, रामजी पवार नि॥ कृष्णाजी नाईक * * यासी रुा १ एकून दोनी रास देविले, आदा करणे. जाणिजे बहुत काय लिहिणे.

मर्यादेय विरा

बार सुरुमुद बार.

¶ *Shahu's visit to some celebrated temple (Jejuri ?)*

No. 25] [12-9-1715

श्री

स्वस्ति श्रीराज्याभिषेकशके ४२ मन्मथसंवत्सरे भाद्रपद बहुल येकादसी इंदुवासर क्षत्रियकुलावतंस श्रीराजाशाहु छत्रपति याणी राजश्री जगदेवराव निंबालकर मुद्राधारी व कारकून किले महिमानगड यांसी आज्ञा केली ऐसीजे. हुजूर लोकांचे प्रयोजन आहे याकरितां लोक किले मजकूर पैकी २५ पंचवीस आणविले आहेत. तरी बेरड व मऱ्हाठे मिलोन सदरसरनोबताबराबरी देऊन सिताबीने पाठवणे. या कामास लखमोजी सावत दिमती खुदेचाकर यासी रु १ यक रास देविले असें अदा करणें. जाणिजे लेखनालंकार.

¶*Mahimangad is near Satara. This paper contains an order of Shahu to Jagdev Nimbalkar to send 25 men.*

---

No. 26] [9-8-1716

श्री.

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम सवछरे भाद्रपद शुध त्रितिया गुरुवासरे क्षत्रियेकुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी याणी समस्त राजकार्य धुरधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यांसी अज्ञा केली ऐसीजे. बदल देणे वेतनात राघो रखमांगद सभासद राचा चाकर किले मजकूर

[त्याच कागदाचे पाठीवरचा मजकूर]

श्री

नावनिसी जासूद रा कागद चंद्रसेन जाधवराव देऊन जाब घेऊन देणें जी दर्याजी

६ राणोजी पारख

६ जोत्याजी चव्हाण

---

१२

छ १६ जिल्हेज.

¶*Some notes of Shahu about payments to certain officials.*

No. 27] [1717—1718

श्रीभार्गवराम

माहाराज राजश्री छत्रपती स्वामीचे

शवसी.

विनर्ती शेवक आज्ञाधारक पंताजी सिवदव कृतानक विज्ञापना विनती. माहाराजाचे कृपाद्रुस्टीकरून या प्रांतीचे वर्तमान येथास्थित असे. विज्ञापना. माहाराजाचें आज्ञापत्र सादर जाले तेथे आज्ञा की सरदारखान बागडियाचे दीडसे रुपये पैकी पनास रुपये पावले, सेभर रुपये राहिले ते पाठवून देणे म्हणून आज्ञा. ऐसियास जिल्हे कुल खराब थोराताचे उपसर्गामुळे व शामलाचे उपसर्गकरिता देश मावले उद्वस जाली. दोन रुपयाचा येवज येईना. हुजूरची खासुदगी तो वारणे अगत्य म्हणून चिचवडीहून सावकाराचे कापड आणून बराबर सिदोजी सालखी तिवटे १३ येकूण कि॥ रु॥ ९५ पंच्याणव पेसजी पनास रुपये रसद व पाच रुपये त्याजकडील लोकास खर्चास दिल्हे येकूण दीढसे रुपये सरदारखानाचे पावले. शेवसी स्रत जाल पाहिजे हे विज्ञापना. या खेरीज सावाजी सालखी यास रु॥ ५ पाच मसाला पावला. विदित जाल पाहिजे हे विज्ञापना.

*¶Pantaji Shivdev Soman writes to Shahu of his having paid Rs. 150 to Sardar Khan. Pantaji Shivdeo was appointed Rajadna in 1727 in succession to Naro Ram. The whole letter is in Pantaji's hand and shews how distracted Shahu's situation was in his early career.*

---

No. 28] [1718 ?

श्री शंकराजी मल्हार यासी कितेक राजकारण प्रसंगास पाठविले आहेती. त्यास मुख्य तह ऐसा की, नर्मदेपासून रामेपर्यंत जितुका देश आहे तितुका देश स्वामीचे स्वाधीन करावा, आणि कौल मुलुकास देऊन मामुरी करावी. स्वामीच्या लस्कराचा उपद्रव जो मुलुकास लागतो तो लागो न द्यावा. रयत नादवावी. गडकोट कुल स्वामीचे स्वाधीन करावे.

*¶This paper contains the draft of terms suggested by Shahu to be obtained from the negotiation conducted by Shankraji Malhar with Syed Hussein Ali. The final treaty is given by Mavji and Parasnis.*

No. 29] [9-1-1718

## श्रीनकल

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री सिवाजी
चिंतामणी फडणीस पो सुपे गोसावी यासी

सेवक बालाजी विश्वनाथ प्रधान नमस्कार सुा समान आशर मया आलफ. काा सुपे येथे माहाराज राजश्री स्वामी याणी आम्हास राहावयास आज्ञा केली आहे. त्यास कोटाची मजबुदी व पाणी कसे आहे हे तपसीलवार जानोजी जासूद पाठविला आहे तरी याजबरोबर लेहून पाठवणे. जाणिजे छ १७ सफर आज्ञा प्रमाण मोर्तब असे.

¶*Balaji Vishvanath is allowed by Shahu to make his residence at Supa.*

---

No. 30] [10-11-1718

## श्री




दाा मोो मोकदम व समस्त रयां काा तळेगौ ताा पाबल साा जुनर सुा तिसा आशर मयां आलफ सन ११२८ साहेबाचे सेवसी कतबा लेहोन दिधला यैसाजे. साहेबी हुजूर बोलाऊन आज्ञा केली की सालमाराकारणे काा मारची खंडणी मुशकस[1] करणे म्हणौन आज्ञा. त्यावरून गावाची हकीकत. धामधुमे करितां काही हाल राहिला नाही. रयेतीची नातवानी. पीक कमतर, म्हणौन आर्ज केला तो साहेबी खातिरेसी आणौन रयेतीवरी नजर देऊन जमाबदी जिराइत व बागाइत

---

१ निश्चित.

काली पाढरी कुलबाब कुलकानू साल तमाम खडणी मोकरर केली ते कबूल असो. उगवणी करून.

मा। जमा | रु।

३००१

येकूण तीन हजार येक रुपये रास.

ता।

२५०१ इनाम खंडणी

२००१ यैन

५०० स्वारीखर्च वगैरे

२५०१

४०० सरदेसमुखी

१०० साहोत्रा

३००१

तेरीख २७ माहे जिल्हेज

जिल्हेज

बार सुरुसुद बार

¶*Balaji Vishvanath fixes the revenue of Talegaon (Dhamdhere).*

---

*No. 31*] [*30-12-1718*

श्री

स्वस्ति श्रीराज्याभिषक शके ४५ विलबी संवत्छरे पौष्य बहूल पंचमी भोमवासरे

✓ श्री ०
राजा शाहु छत्रपतिहर्ष-
निधान बाळाजी विश्व-
नाथ प्रधान.

० श्री ✓
श्रीआई आदिपुरुष श्रीराजा
शाहु छत्रपति स्वामि कृपा-
निधि तस्य श्रीनिवास
परशुराम प्रतिनिधि.

क्षत्रिय कुलावतंस माहाराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेसी विनती सेवक निरजन तुबाजी मुतालीक मजमू दि॥ राजश्री हानाजी अनंत सेनाकर्ते सेवेसी विज्ञापना. स्वामीनी कृपाळू होऊन राजश्री विठल

कृष्ण यासी राजश्री भिकाजी काकडे याची मजमू सांगितली त्यास जमानाची आज्ञा केली त्यावरून मानिलेसी आपण जमा [न] आसो. जाये पले तरी हाजीर करून देऊन. हाजीर न करू तर त्याचे तालुकातीचा जाब करून देऊन. हा सेवेसी लिहून दिल्हा जमानकतबा सही. लेखनालंकार रुजूसूरू सुा

निवीस मत्री

तेरीख १८
सफर सुा तिसा.

बार सुद सुरुसुद बार बार

¶*Shahu appoints Vithal Krishna, Majumdar of Honaji Anant.*

---

*No. 32*] [*14-3-1719*

श्री




आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ताा मोकदमानी मौजे केटारे पाा खरगोण(?) सुा तिसा असर मया अलफ. लस्कर या प्रांते आले आहे तर देखत आज्ञापत्र मोकदम भेटीस येणे. मौजे मजकूरचे रखावालीस स्वार दिमत राजश्री बालाजी विस्वनाथ पाठविले आहेत यास रुपये ५० पनास देणे. जाणिजे छ ३ जमादिलवल आज्ञा प्रमाण




¶*Balaji Vishvanath makes an expedition into Khargon.(?)*

*No. 33]* *[9-6-1719*

[स. १७१९ च्या ज्येष्ठात फतेसिंग भोसले अकलकोटकर याचें लग्न झालें त्या वेळची हयात मंडळींची यादी]-

खर्च तशरीफ

लग्न फतेसिंग छ १ साबान

कारकून व बाजे

| | तिवटे | शेले |
|---|---|---|
| माहदाजी गदाधर सुमंत | १ | १ |
| खंडोबा चिटनीस | १ | १ |
| दादोबा | १ | १ |
| मोरो सामराज | १ | १ |
| हरि गणेश | १ | ० |
| मल्हार खंडेराव | १ | ० |
| नानाजी रघुनाथ | १ | ० |
| गणेश रुखमांगद | १ | ० |
| दि॥ चिटनीस | | |
| रावजीसा वाकेनिसी | १ | ० |
| मल्हार तुकदेऊ | १ | ० |
| यादव राऊ | १ | ० |
| लाल भागीरथ | १ | ० |
| बापुजी | १ | ० |
| आऊबा | १ | ० |
| कृष्णाजी कासी | १ | ० |
| विठल पुंडलीक | १ | ० |
| दि॥ न्यायाधीश | १ | ० |
| त्र्यंबकराव दरोगे | १ | १ |
| काळो राम | १ | ० |
| मोरोपंत बाळासी | १ | १ |
| लिहिणार दि॥ बाळासी | ३ | ० |
| लिहिणार तोफखाना | ४ | ० |
| मल्हार खंडराऊ चिटनीस | १ | ० |
| | ३१ | ९ |

| आश्रित | तिवटे | शेले | मदिल |
| --- | --- | --- | --- |
| राघो पाध्ये | १ | ० | |
| दि उपाध्ये | ६ | ० | ० |
| जोसी | ५ | ० | ० |
| साने ठाकूर | १ | १ | ० |
| कवेस्वर भट | १ | १ | १ |
| देवभट | १ | ० | ० |
| जगोबा | १ | ० | ० |
| मुदगलभट पंडितराऊ | १ | १ | ० |
| कासीनाथ बावा | १ | ० | ० |
| जगनाथ बावा | १ | ० | ० |
| शामजी गोसावी | १ | ० | ० |
| अपाजी गोसावी | १ | ० | ० |
| कृपाराम वैद्य | १ | ० | ० |
| चिंतामण वैद्य | १ | ० | ० |
| रामभट वैद्य | १ | ० | ० |
| भालचंद भट वैद्य | १ | ० | ० |
| राजमणि | १ | ० | ० |
| नारायेण वझे | १ | ० | ० |
| ब्राह्मण | १ | ० | ० |
| त्रिलोचन भट | १ | ० | ० |
| शामभट | १ | ० | ० |
| विस्वनाथ पंडित | १ | ० | ० |
| सोनठाकूर याचे पुत्र | ८ | ० | ० |
| बाल जोसी | १ | ० | ० |
| राजमणीचे पुत्र | १ | ० | ० |
| वस्ताद बाबा | १ | ० | ० |
| चिंतामण गुरव | १ | ० | ० |

¶*This list of invitations issued by Shahu for the marriage of Fatesinh Bhonsle of Akalkot will be found helpful in determining many unknown characters existing in 1719.*

No. 34] [8-12-1719

श्री

श्रीराजा शाहु हर्ष-
निधान बाळाजी विस्वन
मुख्य प्रधान

आज्ञापत्र समस्तराजकार्यधुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान ता। मोकदमानी मौजे अडी कर्यात सावगाव सु॥ अशरीन मया अलफ. या प्रांती स्वारी जाली आहे तरी मौजे मारचे पाटील कुलकर्णी हुजूर आणविले ( असतां ) हुजुर येणे. दिरग न लावणे. या कामास स्वार दि। सुभानजी बेकरे व मोघाजी ( सोलकर ) पाठविले असती. यासी मौजे मारपैकी रुा। ९० पनास देविले आहेत. आदा करणे. छ ८ सफर. आज्ञा प्रमाण.

¶*Balaji Vishvanath visits the province of Savgaum.*

---

No. 35] [8-12-1719

श्री

श्री
राजा शाहु नरपती हर्ष-
नीधान बाळाजी वीश्व-
नाथ मुख्य प्रधान.

आज्ञापत्र समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिर्धी राजमान्ये राजश्री बाळाजी पंडित प्रधान ता मोकदम मौजे फुडसिगी ता। रुकडी सुहूर सन आशरीन मयां आलफ. लष्करची श्वारी या प्रांतास जाली आहे. तरी पाटील कुलकर्णी देखत-आज्ञापत्र हजूर खडणीस येणे. या कामास श्वार दि॥ संताजी धायभोर याजकडील पाठविले आसेत. यासी रुपये २० वीस देविले आसेत ते आदा करणे आणि हजूर येणे. छ ७ सफर. आज्ञा प्रमाण.

लेखन
सीमा.

¶*Balaji Vishvanath goes south for collecting Maratha dues.*

No. 36] [8-2-1720

श्री




आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ताा रामजी कदम व नरसोजी जाधव सु|| आशरीन मया अलफ. तुम्हास तारले तर्फेचा यैवज वसूल करून आणावया पाठविले आसेत. तरी जो यैवज आणाल तो चिरंजीव राजश्री बाजीरायाकडे देणे छ १० रबिलाखर. आज्ञा प्रमाण.




¶*Balaji Peshwa orders revenue being paid to his son Bajirao.*

---

No. 37] [16-3-1720

श्री




आज्ञापत्र समस्तराजकार्यधुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री पंतप्रधान ताा मोकदम मौजे डिगरज ताा मलगल सुाा आशैरन मया आलफ. या प्रांते स्वारी जाली आहे तर पाटील कुलकर्णी घासदाणियाचे खंडणीबदल येणे. या

कामास स्वार दिा आनंदराऊ घाटगे पाठविले आसे. यास रु॥ २५ पचवीस आदा करणे. जाणिजे छ १७ जमादिलावेल पा हुजूर.

मोर्तब

¶*Balaji Vishvanath is in the south collecting Maratha dues, two weeks before his death.*

---

*No. 38*]

श्री

माहाराज राजश्री छत्रपति

स्वामीचे सेवेसी.

आज्ञाधारक बालाजी विश्वनाथ कृतानेक विज्ञापना स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्थित आसे विशेष. स्वामींने दया करून यादोजी कनोजे याजबा रुपये ४५० येकूण मोहरा ३० तीस पाठविल्या त्या पावल्या. विदित जाले पाहिजे. सेवेस विज्ञाप्ति.

¶*Balaji Vishvanath acknowledges receipt of Rs. 450 to Shahu.*

---

*No. 39*]

श्री

यादी तहची पत्रे करून द्यावी.

हशम.

सुभा जावलीचे हशमाचे मुकासे गांव आहेत. तेथें खेरीजसरदेसमुखी वसूल घ्यावयाचा तह सुभा व माहाल व हुजरात दर खंडीस तीन ८३ मण करून दिला आहे. येणेप्रमाणे हंगामाचे हंगामी वसूल देणे. जाजती तगादा लागणार नाहीं. म्हणून पत्र देखील रयत व रजपूत मुकासे गावीची. हशमाची पाहाणी करून सनद वर्क करावा.

ठाणेस चाकरी करावी तेव्हा अडीसेरी आपले घरची खावी. दुसरे

सुभाची जमाबंदी करणे ते पाहाणी करून जमाबंदीचा आकार करावा. १

पारचे ठाणियास चाकरी सुभा हजरी लेहून चाकरी करावी. जो सुभा चाकरीस हजर नव्हे त्याचे दुमालेचा वसूल मुदत माफीक घ्यावा.

हशमा खेरीज मुकासी असतील तेथे हशम सेतकरी असतील त्यास खंडीस तीन मण वसूल घ्यावा. जाजती न घ्यावा. रजपूताची नक्तबाब सेतेची दखील दुमाला लेहून तीन मण वसूल

जागा चाकरीस नेऊ तेव्हां अडिशेरी देऊन चाकरी घेऊं.

(हा मजकूर मागाहून खोडला आहे)

घ्यावा. जाजती तगादा न करावा. रयत असेल त्याचा वसूल मुकासी यानें घ्यावा.

येणेप्रमाणे तह करून सनदा दिल्या छ ७ सफर.

¶*This appears to be Shahu's standing order about payment to troops. The paper does not bear the year.*

---

*No 40*] [*1800*

(जमाव रुमाल नंबर १७७३)

श्री.

यादी केसो बापूजी मोकासी विज्ञापना येसीजे. श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नाना कोकणात असता शामलाकडून मिठागराचा हवाला करून आमचे निपणजे संभाजीपंत याची हमी दिल्ही. मीठ पिकले नाही. येवजाचा फडशा न जाला. म्हणोन शामलाने संभाजीपंतास समुद्रात बुडविले. तेव्हा आमचे पणजे कसोपंत लाहान होते. यास घरचे कुणबिणीने सचिवाचे घरास आज्ञुलास घेऊन पलाली. पुडे त्यास शहाणे करून रुद्रगडचे काम सांगितले. बालाजीपंत नाना कोकणातून वरती आल्यावर पेशवाई जाली. त्यानी पूर्व ममता धरून सचिवाकडून केसोपंतास मागून घेतले. आपणाजवल ठेऊन खासगीचे काम सांगितले, व पुढे कैलासवासी बाजीरावसाहेब यानी कसबे पुणे हा गाव इनाम करून घेऊन वसाहातीचे व कमाविसीचे काम सांगितले. पेशजी पुरंधरास येवनाचे लढाईस केसोपंतास जखमा लागल्या. त्याचे पुत्र आनंदराव यास कैलासवासी नानासाहेब यानी कुटुंबातील म्हणून प्रतिपाल केला. येविसी ममतेची पत्रे स्वदस्तुरची आहेत. सातारियाचे मुकामी जेठी आले. त्यासी नानासाहेबी माहाराजासंनिध लढविले. जेठी जिवे मारिला. तेव्हा माहाराज कृपाळू होऊन जमीन इनाम दिल्ही. जेठियानी त्यास जादू केली, नंतर एका वर्षाने मृत्य पावले. त्याचे पुत्र बापू लाहान होते याजकडून याद करऊन कैलासवासी दादासाहेब यानी दिलीचे स्वारीस जाते समई आपले हाते यादीवर मखलासी करून नानासाहेब याचा करार करून देऊन कसब्याचे व सोमवार पेठेचे कमाविसीचे काम व कारकून सिलेदारीची आसामी याची याद करून देऊन

वेतनाची नेमणूक कसब्याचे वसुलात घेत जाणे म्हणोन सनदहि दिल्ही; त्याप्रमाणे सन मयातैनापवतो पावले. प्रतिपाल पुत्रवत पूर्वापार करीत आले. पुढे माझाहि करणे स्वाम समर्थ आहेत.

¶*This paper gives an interesting account of a family who had all along worked as friends of the Peshwas. It appears to be a petition addressed to Bajirao II by the last descendant (No. 5) about the year 1800. One important fact revealed in the paper is the cruel death inflicted by the Siddi upon Sambhaji Pant Mokashi, (No. 1,) the first ancestor of the family, who was sewn into a sack and thrown into the sea, as he failed to pay the contracted amount of dues for the management of the salt monopoly, which the first Peshwa had entrusted to him on his own behalf. The current story relates that the first Peshwa left his habitation in the Konkan when his elder brother Janoji was drowned into the sea by the Siddi. The story is substantially correct. But the victim of the Siddi's cruelty was not Janoji Bhat but Sambhaji Mokashi.*

१ संभाजीपंत मोकासी
|
२ केसोपंत } *Served Bajirao I and Nanasaheb.*
|
३ आनंदराव }
|
४ बापू
|
५ केसो बापूजी

---

*No. 41*] [*19-4-1716*

श्री

श्रीमत क्षत्रिय कुलावतंस माहाराज

राजश्री छत्रपती स्वामीचे शेवेसी.

सेवक आज्ञाधारक त्र्यंबक सिवदेऊ कृतानेक सेवेसी विज्ञापना. स्वामीच्या कृपावलोकनेकरून वैशाख शुा नवमी गुरुवासर पर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीचे आज्ञापत्र चैत्र शुध नवमीचे बराबरी खंडोजी इंगवला व संताजी गायेकवाड जामूद सादर जाले तेथें आज्ञा कीं, राजश्री बाळाजी पंडित प्रधान याकडून गलियाचे खरेदीस ऐवज देविला होता त्यापैकीं ऐवज आला काय, गला खरेदी केला काय, सिहिगर्डी दास्तन जाले आहे काय, तो हिसेब तपसीलवार लेहोन पाठवणे म्हणोन आज्ञा. ऐसियास राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांकडून स्वामींनी दोन हजार होा ऐवज देविला. त्यापैकीं पंडितमाारनिले याणी भिवजी सिदा व रामजी कुटा हुजुरियाबाा होा २५० आडीचसे ऐवज पाठविला, त्याचे पावलियाचे विनंतीपत्र ते समईच त्याबराबरी स्वामीचे सेवेसी पाठविले आहे. त्या अलाकडे त्यांकडील ऐवज आला नाहीं. सांप्रत पंडित माानिले लस्कर-

सहवर्तमान स्वारीस दूर लाबोन गेले आहेत. ऐवज आला असता तरी गलाहि खरेदी जाला असता. अडीचसे रुपये ऐवज आला तो येणेप्रमाणे गडोगडास गलियाचे खरेदीस दिल्हा बिताा रुपये.

| किले राजगड रुा | किले प्रचंडगड | किले सिंहीगड रुा |
|---|---|---|
| १०० | १०० | ५० |

येणेप्रमाणे अडीचसे रुपये ऐवज दिल्हा आहे. स्थळोस्थळाचे नातवानीचा जो अर्थ जाला आहे तो सेवेसी विदितच आहे. बेगमी करावया स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत जाले पाहिजे हे विज्ञापना.

¶*Trimbak Shivdeo reports to the Chhatrapati an account of the amount received from Balaji Pandit Pradhan for purchasing stores for the fort of Sinhgad. The writer Trimbak Shivdeo appears to be the maternal uncle of Sachiv Naro Shankar, his mother Yesubai's brother, who was the regent (Mutalik) of the young Sachiv who had not then come of age. This Trimbak Shivdeo ought not to be confused with a person of the same name, viz., Vithal Shivdeo's brother.*

## Map referring to
## The Early Activities of Shahu.

Scale :- 1" = 63 Miles

Dotted lines ---- Shahu's home returning (1707)




G.P.Z.O. Poona, 1930.

पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद



# शाहू–खाजगी

[ किंमत— ९ आणे किंवा ११ पेन्स ]

गव्हर्न्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई

१९३१

## *SHAHU IN HIS PRIVATE LIFE*

This section of about fifty letters contains interesting information about the private life of King Shahu, now made available for the first time. Plutarch in his " Lives " relates incidents in the daily life of his hero, which very happily hit off his character. To understand the personality of a man we must look not to his exploits in the field or the court but to his daily life. The truth of this statement is amply borne out by these documents.

A study of these letters, revealing King Shahu as he appeared to his contemporaries, helps us to explain the success he attained in the face of terrible difficulties. A Maratha to the core, the idle years spent in the Mughal zenana failed to impair his love of an open-air life. Through all these letters breathes an air of simplicity which he inherited from his illustrious grandfather and which is a national trait of the Marathas. He was a keen *shikari* and devoted to all kinds of sport. Tiger-shooting seems to have been his favourite recreation, and he reprimands the Peshwa for not sending him beaters in good time (Letter No. 31). News of a tiger in the neighbourhood reaches him. The Shimga sports are suspended and the king rides forth in hot haste into the jungle after the quarry. When touring the country, he is careful never to miss a chance of a hunt, and orders are issued to protect the forests (Letter 5). The hunt excites him so much that for days he lingers on in the jungle where the Royal cooks are hard put to it to dress the King's repast. Fishing is another of his fancies and when somebody mentions that good fine fishing-line is available only in Khandesh the King immediately sends letters to the minister to secure some of this line for his rod (Letter No. 26).

Dogs, horses and rare birds he delights in, and insists on getting them whenever and wherever he can (Letters 14-25). His love for horses was the love of a connoisseur. Mark how the horse sent by the Peshwa after careful inquiries failed to please him because of a slight defect in the hind legs (Letter 23). When the Peshwa is in the North intent upon questions of high policy, he is reminded by his prince to keep his eyes open for fine Arab horses, musk deer and yaks! Dancing was another national recreation and he asks for good-looking dancing girls to be sent to his zenana. His collection of birds, yaks, dogs and leopards must indeed have formed an admirable zoo.

He was essentially a family man and had a kind word for everybody in his household. His niece Daryabai is loaded with all kinds of ornaments and dresses when she takes the King's farewell. The sickness of his queen grieves him and he bestows presents for her recovery. The memory of his courageous father and uncle is observed with due respect and solemnity (Letters Nos. 36, 41, 49, 50).

His bearing was cheerful and unaffected, pleasing yet dignified. There was something in him which disarmed his enemies and aptly gained for him the title of " one born without an enemy." In the presence of his counsellors he maintained an easy but dignified familiarity. The expansion of the Maratha kingdom in his time was not due so much to fortuitous circumstances as his happy choice of ministers and his own lovable personality.

No. 1]

# श्रीमलारिजयति

विंनंती[+] उपरी. पाा भडोच देखील देहजबारे व पाा खंबाईत प्रांत गुजरात व पाा घोगे प्राो सोरट हे माहाल हुजूर खासगीकडे ठेविले आहेत. त्याच्या सनदा देखील बाबती व सरदेशमुखी माहाराजानी देवविल्या आहेत. राजश्री नारो विठल याचे स्वाधीन कमावीस केली आहे. तरी याप्रमाणें सनदा लेहून बिंद्राबन चोपदार याचे स्वाधीन केल्या पाहिजेत. सुरतपैकी तीन महाल पेशजीपासून खासगीकडे आहेत. त्याचेही ताकीदपत्रें व साहित्यपत्रें यादी पाठविली आहे. त्याजवरी 'देणे' करून द्यावे हे विनंती.

¶*Jivaji Khanderao Chitnis asks (probably Bajirao) that orders be issued for the specified Mahals being retained for the King's private expenses.*

---

[29-11-1731 ?

No. 2] [28-3-1721 ?

पौ छ १० जाखर

श्री

पुरवणी राजश्री राऊ स्वामीचे
सेवेसी

विनंती उपरी. स्वामीनी हुजूर घराचा मजकूर लेहून पाठविला. त्यावरून कळो आला. त्यांस किले पुरंधर येथील कारकून व लोक सुतार गवंडिये आद्याप येथे आले नाहीत. स्वामीनी लिहिले की, राजश्री तात्याची आमची भेटी जालियावर घराचा विचार करून, तुम्हास लेहून पाठऊन. तरी घराचा पैका खंडून येकंदर घेत नाहीत. मार्गसीर्ष पूर्णमा ताा माघ वद्य आमवाश्या २॥ आडिचा महिनियामध्ये दोन तीन यात्र्या कराव्या. फालगून मासी घरामध्ये येऊन राहावे. यैसा विचार वाडियांतील आहे. सांप्रत वाड्यामध्ये झाडे आहेत. तेथे माडव घाळून, कुल मनुश्ये आहेत. घर तातडीने बाधोन दिल्हे पाहिजे. हाइगई करिता येत नाही. याजकरिता स्वामीस वर्तमान तपसिले लिहीले आहे. तरी घर बाधोन द्यावे. याचीच तरतूद स्वामीनी करून द्यावी. कदांचित स्वामी

+From Shahu R. N. 48.

तीर्थरूप[प] राजश्री तात्यास सांगतील की, पैका देऊन लिगाड वारणे. ते स्वामीचे भिडेने बरे म्हणतील; परतु येथे वारणार नाही. याकरिता स्वामीस लिहिले आसे. सेवेसी श्रृत होये विज्ञापना.

¶*The handwriting shows this letter to be from Malhar Tukadev Purandare to Bajirao asking the latter to build the house for Raja Shahu at Satara with the utmost expedition. The work should not be put off on any account, the writer adds. (Can this house be the one which Shahu constructed for the first time on the ridge below the fort in 1720 ?)*

---

*No. 3*] [*7-10-1730 ?*

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री
पंत आपा स्वामीचे सेवेसी.

सेवक केसो सहदेव साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत छ ७ रविलाखर जाणून स्वामीचे कृपेंकरून येथास्थित असे. विशेष:—राजश्री सरखेलीकडील कापड व पैका व बराबर लोक ३० तीस व येसाजी पवार जासूद रोजगुदस्ता कसबे पुणियास हजीर जाले. यैवजाची रवानगी राजश्री सरखेलीच्या पत्रावरून विदित होईल. राजश्री पंतप्रधान स्वामीचा मुकाम जेजुरीस आहे म्हणून लिहिलें होतें. मागती दुर्गोजी भोईटे आले, त्याणी सांगितलें जे, राजश्री छत्रपती स्वामी व सौभाग्यवती मातुश्री विरूबाई व राजश्री पंतप्रधान स्वामी घाटाखाले उतरले नाहीं. परभारें कूच करून मजल दरमजल तुळजापुरास गेले. व आंगरियाकडील तीस माणूस बरावर आहे. अडिसेरी मागतात. राजश्री सरखेलीनें अडिसेरी पुणियापावेतों दिल्ह्या. आतां कुलाबियापावेतों अडिसेरी पाहिजे यैसे म्हणतात. तरी यैवजाची व अडिसेरीची आज्ञा करावया स्वामी समर्थ आहेत. वरकड वर्तमान जासूद जबानी सांगतां विदित होईल. सेवेसी श्रुत होय हे विनंती.

¶*Keso Sahadev from Poona to Chimaji who was out in Swari, giving news of Shahu, Bajirao and Virubai proceeding to Tuljapur.*

*No. 4*]
पाा छ २४ साबान

श्री
श्रीमंत राजश्री आपा
स्वामीचे सेवेसीं

आज्ञाधारक लक्षुमण विस्वनाथ सां नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा छ २२ साबानपर्यंत येथास्थित असें. विशेष स्वामीचें पत्र सादर जाहालें. तेथें आज्ञा कीं, माहाराज राजश्री स्वामी जेजुरीस येणार; त्यास नाणेंमावलपैकीं सेंभर वेठें व बुरूडकाम पाठवणें म्हणून आज्ञा. त्यास येंदा तिजाई महसूल गला पुणियास आणविला. हाली वेठें आणविले त्यास दाभाडियांचें कसालियानें रयेंत तजावजा जाली आहें व सालमजकुरी गला पुणियास पाठवावा लागतो. इनामदार ब्राम्हणाचें गाव आहेंत त्याचे वेठे येत नाही. आम्हास रोखां करिता येंत नाही. धामधुमीचा प्रसंग, महसूल गला आला पाहिजें. त्यास वेठें जरूर पाठवावें येसे जालें तरी पुणियाचा गला मना करावा. वेठे पाठऊन देऊं. इनामगावास परभारें हुजरून वरातदार पाठऊन न्यावें. सेंभर वेठ्याची भरती होत नाही; जें जमा होतील ते पाठऊन. नाणेंमावलात बुरूड नाहीत, पौड खोरियात लिहिले आहें. दाभाडियाचा नित्य कसाला. गावगना राऊत येऊन गवत दरगावास दाहा हजार पाच हजार याप्राा काढविलें. आणखीहि किरकोळीं कामकाज पडतच आहें. आपणाकडीलहि गडकिल्याचे कामकाज जालें पाहिजे; याकरिता जे आज्ञा करणें ते करावी, त्याप्राा वर्तणूक करून. देंह ८४ पैकी

४ खराब
९ राजमाची
४ मोकासे मातुश्रीबाई
८ मोंकासे राजश्री पंतप्रधान
६ इनाम वतनदार
६ किले लोहगड
१ काा नाणे सौ मातुश्रीबाईसाहेब
८ ब्राम्हण

| | |
|---|---|
| १ करजगाव | १ सोमवडी |
| १ गोंवित्री | १ स्वांडसी |
| १ वाहवली | १ कोंडिवडे |
| १ वडवली | १ भाजे |
| | १ वेहरगाव |

$\frac{१}{४४}$ मौजे वाकसे इनाम जनार्दन बलाल.

त्रेतालिस बाकी ४१ येकतालीस, त्यामध्ये कोणीं गावी च्यार घरें पाच घरें याप्रा आहेत. त्यामध्ये श्वामीचे आज्ञेप्रा वेठें २५ पंचवीस पाठवितों. सकट गावचे वेठे तो येतातसे नाही. सेवेसी श्रुत हांये हे विज्ञाप्त. ये प्रांती तो बुरूड नाहीत. पौऊडखोर येथे बुरूड आहेत; तेथे आपला परभारा रोखा जाला आहे. सरंजाम व वेठे जमा करावयास आठ दिवस पाहिजेत. दाऊदखान जेजालबारदार आला आहे तो जेवीत नाही. पांघुरणे फाडितो. त्यास आम्ही काय करावे? वरातदार तो निकडीचे. ये प्रांतीचा धदा वस्ती जनी आपणास श्रुत आहे. प्रत्यवरसी भात महमूलचे घेत असतो. सालमजकुरी तांदूल करून घ्यावे लागतात. याकरिता चितास येईल तर वेठे मना करावे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्त.

¶*Lakshman Vishvanath to Chimaji Appa explaining the writer's difficulties in supplying a hundred labourers and cooper's work for the King's trip to Jejuri.*

---

*No. 5*] [*31-1-1731*

पा छ ३ साबान

**श्री**

**+पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा**
**स्वामीचे सेवेसी**

विनंती राजश्री स्वामी जेजुरीस देवाचे यात्रेस येतात. त्यास माघ मासी यात्रा आहे. परंतु वाडियातील घर नीट करितात यामुळे सौभाग्यवती मातुश्रीबाई-साहेब सदरेच्या घरात राहिली आहेत. ते घर काही कार्याचे नाही. यास्तव वाडियातील घर नीट होये तोवर बाहेर महिना दोन महिने कर्माविसे आहे. याकरिता पौष मासी वद्य पक्षीच राजश्रीचे येणे ते प्रांती होईल ऐसे आहे. तरी स्वामीनी साहित्याची तातड करावी. राजश्रीच्या वरकडाच्या चितात यैसे की, मुलकात पाऊस गेला तऱ्ही आपण साहित्य करणार समर्थ आहेत यैसे आहे. तरी सर्व साहित्य केले पाहिजे. कोणे वेलेस उठोन तिकडे येतील हे न कले. त्याहिमध्ये खासा स्वामी प्रसंगी आहेत यास्तव सर्व साहित्य करावे. राजश्री त्या प्रांते येतात, यात सवशये नाही. याउपरी राजश्रीनी आज्ञा केली की, जेजुरीपासून पुरंधरपर्यंत डोंगरचे रान कोणी छडू न पावे. का की ससे व हरणे व डुकरे वगैरे सावजे रानात असतील ती माणसाचे वांगीमुले[१] धुडावतील. तर

---

+ पत्र माहादोबा पुरंदऱ्याचें. १ वापरामुळें पळून जातील.

आता माणसे जागा जागा ठेऊन पहिले राजश्री आले होते ते वेलेस असवल धरली होती ते रान देखील चौक्या ठेऊन जतन करणे, यैसे सागितले. तरी स्वामीनी चौक्या ठेऊन रान राखविले पाहिजे सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Purandare to Appa, communicating Shahu's intention to visit Saswad and Jejuri, hunting en route.*

---

*No. 6]* *[31-1-1731*

पा छ २ साबान

**श्री**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा**
**स्वामीचे सेवेसी.**

विनंती. काली बुधवारी त्रितीये प्रहरी राजश्री स्वामीनी बोलाऊन आज्ञा केली की, पहिले तुम्हास सांगितले होते ; पाच हजार रुपये घेऊन उंटे व घोडी आम्हास खरिदी करून देणें. त्यास तुम्ही अद्याप दिल्ही नाहींत. याउपरी जेजुरीस स्वारीस जावे लागते तरी तुम्ही उंटे आम्हास तीन हजाराची खरिदी करून लौकर आणवणे. त्यावर आम्ही विनंती केली की, येंदा आमच्या प्रांतास बरग फार पडले यामुले घोडे अगर गुरू अगर उट कोठे राहिले नाही. त्याहीमधे उटास तो फारच रोग आला. तमाम उट मरतात. येसे जाहाले. यास्तव अवदा काही आम्हास उट कोठे मिलत नाही. त्यावर राजश्री बोलिले की, तुम्हास आम्ही पहिलेपासून उटाविसी सागतो आम्ही (आणि) तुम्ही नाही म्हणता. तर येसे काही कार्यास येणार नाही. तुम्ही राजश्री चिमाजी आपास लेहून निदान फार न मिलेत तर दाहा उट तो खामखा आणवणे. तुम्ही दिवाणाचे यैवजी मजुरा घेणे. यैसे बोलिले. त्यावरून हे पत्र लिहिले असे. तरी स्वामीनी उटाचा तलाश करावा. येविसी माणसे शहरास व नवाबाच्या लस्करांत पाठऊन उट मेलविले पाहिजे. व हैगै येकंदर न करावी. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Purandare to Chimaji Appa, asking the latter to purchase camels and horses for the King.*

*No. 7*] [*15-2-1731*

छ १९ साबान

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ
स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी दरबारीचे वर्तमान तरी, राजश्री स्वामी यानी साताराहून माघ सुध सप्तमी गुरुवारी कूच करून मुा मौजे पलसी पाा वाई येथे मुकाम केला. दुसरे दिवसी तेथून कूच करून तडवले येथे मुकाम केला. तिसरे दिवसी मौजे खेड पाा सिरवल येथे मुकाम केला. तेथून कूच करून दशमीस वाल्हे येथे मुकाम केला. दुसरे दिवसी वाल्हे येथे मुकाम जाला. द्वादसी मगलवारी जेजूरीस मुकाम जाला. वाई मुलकाची आवस्था काही राहिली नाही. गैरमोईनी खर्चाची नीत नाही. स्वामीस वर्तमान कळावे याकरिता लिहीले असे. राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधी सातारा आहेत. समागमे राजश्री दादोबा आले आहेत. येमाजी सिवदे यास त्याचे बंधू वडील यांस सांप्रत बरे वाटत नाही ते महीगांवी[१] आहेत. स्वामीस कळावे याकरितां लिहिले आसे. राजश्री नारबावा मंत्री कऱ्हाडास कोटी होम करायास गेले आहेत. ते आद्याप आले नाहीत. विदित जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति[+].

¶*Nana's letter to Bajirao, communicating Shahu's tour round about Satara.*

---

*No. 8*] [*17-2-1731*

पाा छ २० सावान

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा स्वामी
वडिलांचे सेवेसी.

विनंती. राजश्री स्वामी जेजुरीचे यात्रेस जाणार आहेत. त्यास वाटेच्या मुकामाच्या गोष्टी बोलिले कीं, येथून निघावें ते दहिगावीं मुकाम करावा. तेथून पुढें धायेगुडयाच्या येका गावांवर मुकाम करावा. तेथून पुढें सिरवलास जावें. तेथून निघोन परिंच्यावरी मुकाम होईल. तेथून सिवरीच्या खिंडीने जेजुरीस

---

१ महेगांव माहुलीजवळ. + पत्र नानासाहेबांचें.

जावे, तेथें यात्रा करून सासवडावरी जावे दोनच्यार मुकाम करावे, तेथून सिवा-पुरावर जावे येसे बोलिले आहेत. तरी स्वामीनी गवताफांव्याचे व मडक्याचें सामान काहीं परिंच्यास करवावे व सासवडासहि पाच सात मुकाम जालेच तरी तितक्या मुकामापुरते सामान, राजश्री बापुजीपंतास[१] सांगून गवत लाकूड फांटे व मडकीं वगैर करविलें पाहिजे व बुरूडकाम देखील करवावें. सासवडास पहिले नारो जनार्दन व नारो दादाजी होते, ते माहित होते. याकरितां अवघें साहित्य करून ठेवीत होते. प्रस्तुत तेथें माहित कोणी नाहीं. भिकाजी नारायेणास कांहीं साहित्य होणार नाहीं. तरी स्वामीनी अगोधर येक शाहाणा कारकून पाठऊन पूर्ववत प्रमाणे सर्व साहित्य करवावें. आइतेसमई होणार नाहीं यास्तव लिहीलें आहे. कसबे मजकुरी पहिलें राजश्री स्वामी जितक्या घरांत राहत होते तितकीं घरे रिकामी करून सारऊन निर्मल करून ठेविलीं पाहिजेत. पूर्वीचीच घरें रिकामी करून ठेवांवी. राजश्रीकडील कारखान्यास व लोकांस जीं घरें राहावयास दिल्ही होती तितकीं घरे रिकामी करवावीं. गांवकरी यांस ताकीद करून स्थलें रिकामी करविलीं पाहिजेत. सासवडचें साहित्य राजश्री बापुजीपंताकडेच सोपावें. यासिवाय दुसऱ्यास होणार नाही. त्यांस सागितलें म्हणजे गांवगनाचे कुंभार व बुरूड व गुरव वेटे आणून कारखाना घालून साहित्य करितलि. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Programme of Shahu's tour to Jejuri and preparations required at the different places are mentioned in this letter.*

---

*No. 9]* *[22-2-1731*

पाा छ २९ साबान

श्री

पुाा तीर्थरूप राजश्री आपा स्वामी

वडिलाचे सेवेसी

विनंती राजश्री स्वामी प्रतिपदेस निघावयाची बोली आहे. परंतु पंचमी सप्तमी इतके खामखा जेजुरीस येतात. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना. बहुत करून प्रतिपदेसच निघावयाची बोली आहे. आम्ही राजश्री स्वामीबरोबर

---

[१] बापूजी श्रीपत.

आल्यावर येथे चवकीस माणसे अधिक पाहिजे. याकरिता रामाजी माहादेव यास माणसे वीस लोक पाटवणे म्हणून लिहिले आहे. स्वामीनीहि माणसें सातारियास घरास चौकीस पंचवीस सिपाई पाटवणे म्हणून त्यास पत्र लिहिले पाहिजे. नाही तर स्वामीनी तरी पाटविली पाहिजेत. राजश्री गेलियाउपरांतिक येथे चोरीचा फारसा मामला होतो व आम्हीहि येऊ, माणूस वाडियात नाहीं. तरी सिपाई सत्वर पाटवावयास आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विनंती.

¶*Purandare to Appa about Shahu's visit to Jejuri.*

---

*No. 10*] [*24-2-1731*

पा छ २७ साबान

श्री

पुा तीर्थरूप राजश्री आपा स्वामी
वडिलाचे सेवेसी

विनंती राजश्री स्वामी जेजुरीचे यात्रेस यावयास प्रतिपदेस निघणार. आज्ञेप्रमाणे मोधी व गौळी यास सागितले व पैकाहि देतो. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Shahu's journey to Jejuri.*

---

*No. 11*] [*5-12-1736*

श्री

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य
राजश्री मल्हार गोविंद गोसावी यांसी.

सेवक चिमणाजी नारायेण सचीव नमस्कार. सुा सबा सलासीन मया अलफ. राजश्री स्वामीचा मुकाम कौा फलटणी आहे. त्यास मांडवाचे व किरकोळ साहित्य जिल्हेपैकी आणवणे म्हणोन आज्ञा केली आहे. याजकरितां हे पत्र

सादर केले असे. तरी को बारामतीपैकीं येणे प्रमाणे सामान का मारच्या मुकामास आणविले असे. पत्रदर्शनी रवाना करणे.

| वेठे सुमार | गुरव कामास | कुंभारकाम | सुतारकाम. |
|---|---|---|---|
| १५ ऐनवेठे | गुरव सुमार ५ | कुंभाराबोर पाठवणें. | हराजिनस ठाणव्या |
| १० माहार | | १० राजण | व पोळपाट |
| — | | २५ डेरे | लाटणी कलम १ |
| २५ | | २५ घागरी | |
| एकूण रावताचीं ओझी | | ५० मडकी | |
| पंचवीस पाठवणे. | | | |

*  *  *  *

*  *  *  *

सदरहुचा ऐवज जो तो लेहून पाठवणे. ऐवज मजुरा दिल्हा जाईल. ऐवज हुजुरून रवाना केला नाहीं. या कामास स्वार पाठविले आहेत. यास रुपया एक देविले असत, देणें.

सुरुसूद बार

छ १२ साबान




¶*Arrangements made for Shahu's camp.*

---

*No. 12*]  *[7-1-1740*

पाा छ २८ सवाल

**श्री**

**तीर्थरूप राजश्री राऊ व ताा**

**राजश्री आपा स्वामीचे सेवेसी.**

आपत्ये मल्हार तुकदेव कृतानेक सास्टांग नमस्कार विनंती उपरी. स्वामीच्या आसीर्वादेकरून ताा छ १९ सवाल परियेत कुषल आसो विशेस. दरबारीचे वर्तमान तरी, पूर्वी लेहून पत्रे पाठविली आहेत. त्यावरून वर्तमान विदित जाले असेल. सांप्रत छ १८ सवाली सोमवारी प्राथःकाली मौजे कलघर येथून राजश्री स्वामीनी कूच करून, श्रीच्या दर्शनास प्रतापगडास गेले. तेथे तीन दिवस मुकाम आहे. यात्रा जालियावर तेथून कूच करून चिखली व धोम यावरून वाईस यावे, तेथून सत्वरच स्वार होऊन श्रीचे यात्रेस जेजूरीस जावे. त्यास माघ

सुध द्वितीया आगर त्रि[ती]यसे सालपियाचा घाट उतरावा आगर खांबकिटीच्या घाटे खालते जावे. यामध्ये जो निश्चये होईल तो खरा. विदित जाले पाहिजे स्वामीकडील सांप्रत वर्तमान कलत नाही. तरी सविस्तर लिहिले पाहिजे. राजश्री सुलतानजी निबालकर याजकडील मजकूर काये जाला ते लिहिले पाहिजे. पुढे स्वामी कोणत्या मार्गे जाणार, हे लिहिले पाहिजे. वरच्यावर पत्रे स्वामीनी राजश्री स्वामीस लिहिली म्हणजे राजश्री स्वामी सतोष पावतील. विदित जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना.

¶*Malhar Purandare to Bajirao, describing Shahu's journey to Pratapgad and Jejuri.*

---

*No. 13*] [*1740 ?*

पा छ १६ साबान

श्री

पुरवणी तीर्थरूप राजेश्री आपा
स्वामी वडिलांचे सेवेसी.

विनती. राजश्री स्वामीची स्वारी प्रतापगडाकडे होणार आहे. चाकरमाने पाटील सिकारीस असावे याकरितां ताकीद निकडीने केली आहे. तरी काही पाठऊन द्यावे. समयास न येत म्हणजे स्थित राहावयाची गोष्टी स्वामीस विदितच आहे. सेवसी श्रुत होये हे विनंती.

¶*Nana to Chimaji, communicating Shahu's proposed visit to Pratapgad.*

---

*No. 14*]

श्री

राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी.

श्रीमंत सकलगुणअलंकर्ण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्ये श्मो तान्हांजी धायेभार दंडवत विनंती उपर. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन अज्ञा केली पा. विशेष. काहाराकडे कुतरियाचे पिल २ आहेत ते पाठऊन देणे, म्हणून आज्ञा केली. यैसियांस स्वामीकडील पालखी घेऊन भोई आले व्होते.

त्याजबाार काला कुतरा गेला की आणिक कोन्हीकडे गेला हे न कले. काला कुतरा बारंगल[1] जाला आहे. हरणा कुतरा कालतोंडा महादजीबाार पाठविला आहे. तो सेवेसी पावता व्होईल. विदित जाले पाा काल्या कुतरियाचे वर्तमान माहादजी सांगता विदित व्होईल. बहुत काये लिाा हे विज्ञापती.

¶*Tanhaji Dhaybhor to Bajirao, informing him about the dogs which the latter had asked for.*

---

*No. 15*]

पाा छ २ जिल्हेज.

**श्री.**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ तथा राजश्री आपा स्वामीचे सेवेसीं.**

विनंती उपरी. स्वामीची कुतरी पुण्यांत उत्तम पील जाले आहेत. ते राजश्री स्वामीचे कुत्तेबाजानी पाहिले, ते राजश्री स्वामीपासीं येऊन सांगितले. त्यावरून राजश्री स्वामींनी आज्ञा केली आहे कीं राजश्री चिमाजी आपाचे कुतरीस पील उतम जाहाले आहेत ते आणवणे. त्यावरून स्वामीस लिहिलें आहे. तरी स्वामीचे कुतरीस पील जे जाले असतील ते पाठवून द्यावे. राजश्री स्वामीचे कुतेबाजानी पाहिले तेव्हांच मागावे तरी स्वामी पुण्यांत नव्हते. यास्तव त्यानी आणिले नाहीं. तरी याउपरी पिलांची बहुत प्रकारें ताकीद करून सांगितलें आहे. कदांचित स्वामीची कुतरी नसिली तरी जवळपास दुसरी कोणाची असतील त्याची तहकीकात करून पाठवून द्यावीं. तथापि थाक लागेना तरी राजश्री स्वामीस पत्र लेहून पाठवावें कीं ज्याणे कुत्र्याचे पील पाहिले असतील त्यासच पाठवून द्यावा, तो घेऊन जाईल. आम्हाकडे नाहीं. जेथें असतील त्याणें पाहिले असतील तेथून घेऊन जाईल. म्हणून पत्र पाठवून द्यावें. पां(ढ)रा कुतरा सफेद उतम थोर अगर पील आठां दिवसां, पंधरा दिवसां, महिन्या दोन महिन्यां, जेव्हां मिळेल तेव्हां तलास करून आणून पाठवून द्यावा. राजश्री संताजी धायेभर यांचे पुत्रानी तीन पील कुतऱ्याचे पाठविले होते, त्यापैकीं येक चितास आला तो ठेविला. दोन माघारे फिराविले. विदित जाहाले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विनंती.

¶*Purandare writes to Chimaji Appa to procure good pups and dogs for Shahu who seems to be very fond of these animals.*

---

[1] वेडावलेला.

No. 16]

श्री

+पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ व तथा
राजश्री आपा स्वामीचे सेवेसी.

विनंती. स्वामींनी गजनाचे बीज पाठविले ते येथे आले. राजश्री स्वामीस गुजरानून उतर पाठऊ. कुतरी चालीस हुजरे याजबराबर पाठविली आहेत, म्हणून स्वामींनी लिहीले. यैसियासी कुतरी येथे आली. परंतु राजश्री स्वामीच्या चितास आली नाहीत. यैविसीचे तपसिले वर्तमान पहिले सेवेसी लेहून पाठविले असे. तरी स्वामींनी राजश्री अनंदराऊ पवार याकडे कोणी शाहाणा माणूस पाठऊन, तेथून कुतरी आणवावी. न्हावीकर सितोळे याचे घरी कुतरी आहेत. तीहि आणऊन पाठविली पाहिजेत. मौजे सिकरापूर येथील पाटील पाठविला आहे, म्हणून स्वामींनी लिहिले. यैसियासी पाटील अद्याप येथे आला नाही. आलियावर वर्तमान लेहून पाठऊ. कळले पाहिजे. सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

*¶Purandare informs the Peshwa that not one out of the forty dogs sent by the addressee pleased the King. The Peshwa is asked to make enquiries with Anandrao Powar or the Sitoles of Nhavi who were reported to have a good breed in their possession.*

---

No. 17]

छ ४ जिलकाद

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा
स्वामीचे सेवेसी.

विनंती उपरी. छ २ जिलकादी शुक्रवारी दीड प्रहर रात्रीस राजश्री स्वामींनी आज्ञा केली कीं, सांप्रत कुतरियाची वीण लागली आहे, तरी उत्तम कुतरे पिल आपले जिल्हेतून आणवणे. राजश्री आपास लेहून पाठवणें ऐसी आज्ञा राजश्री स्वामींनी केली. आणि मागती बोलिले कीं, ढमढेरे याची घरी पिल उत्तम असतील, सिकरापुरी धायेभोर याचे घरी पिल उत्तम असतील. त्यावर राजश्री फत्तेसिंग बावा बोलिले कीं, नाहावीकर सितोळे याचे घरी पिल उत्तम असतील. त्यावर राजश्री स्वामींनी आज्ञा केली कीं, उत्तम पिल आणून देणे. मुलकातील जमा करून पाठविले तर, कार्याचे नाहींत. ज्या गावांत

---

+ पत्र माहादाजी अंबाजीचे.

उत्तम कुतरी असेल, तिला पिल चांगले जाले असतील, ते आणवणे. त्यावरून स्वामीस पत्र पाठविले आहे तरी स्वामीनी ये गोष्टीचा बरा प्रयत्न करून पिल मेळऊन आगत्य पाठऊन दिल्हे पाहिजेत. जे गोष्टीचे राजश्री स्वामीस आगत्य, ते गोष्टी केली पाहिजे. पत्राचे उत्तर पुढे पाठऊन द्यावे. मागाहून पिल निगेनसी पाटऊन द्यावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Chimaji is asked to secure choice puppies for the King.*

---

*No. 18*]

पाा छ १७ जमादिलोवल

**श्री**

**तीर्थरूप राजश्री राऊ व तथा राजश्री आपा स्वामीचे सेवेसी.**

अपत्ये माहादाजी अंबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा छ १९ जमादिलावलपरियेत येथास्थित असे. विशेष. स्वामीनी राजश्री स्वामीस कुतरी सुमार १० दाहा पाठविली. ती नेऊन गुजरानली परंतु मनास आली नाहीत. उगीच तीन कुत्री मात्र ठेऊन घेतली. वरकड सात कुतरी माघारी दिल्ही ती पाठविली असेत. स्वामी येथून गेले तेव्हा राजश्री स्वामीपासी कुतरी उत्तम पाठवितो म्हणून मान्य केले आहे व त्याणी निमोनाही कुतरी दाखविली आहेत. तरी उतम कुतरी तलाश करून अगत्य पाठविली पाहिजे. येविसी अनमान न करावा. राजश्रीस कुत्र्याचे अगत्य फार आहे. तरी पाठवावयासी हैगै न करावी. विदित जाले पाहिजे. सेवेसी शृत होये हे विज्ञापना.

¶*Mahadaji Purandare informs the Peshwa that the dogs sent by him were not approved by the King and asks him to secure a better breed.*

---

*No. 19*] [*1738* ?

**श्री**

**तीर्थरूप राजश्री राऊ व तथा राजश्री आपा स्वामीचे सेवेसी.**

अपत्ये माहादाजी अंबाजी कृतानेक सास्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा छ २९ जमादिलवलपरियेत येथास्थित असे. विशेष स्वामीनी कुतरी सुमार १४ चवदा पाटविली, ती राजश्री स्वामीस गुजरानली. परंतु

राजश्री (चे) चितास आली नाहीत. दोन कुत्री मात्र घेतली. वरकड काही म्हातारी, काही कामाची नाहीत, यास्तव माघारी टाकिली. विदित जाहाले पाहिजे. राजश्रींनी माघारी टाकिली त्यापैकी येक तो पिसाळलेसे झाले, ते सोडिले. व येक अघासिंग यानी घेतले व येक चिरंजीव नानाने घेतले व येक दोन जिवबा चिटनीस याणी घेतली. बाकी राहिली ती पाठविली असेत. तरी स्वामींनी आणीक कुतरी उतम पील पाहून राजश्रीकारणे पाटविली पाहिजे. सेवेसी श्रुत होये वे विनंती.

¶*Mahadaji Purandare to Bajirao, asking him to send some well-bred dogs for Shahu.*

---

*No. 20*] [*18-9-1744*
[*or 18-8-1747*
[ *or 3-6-1755*

श्री

तीर्थरूप राजश्री नाना ता। राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसी.

अपत्यें त्रिंबक सदासिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ २२ साबान भोमवासरपर्यंत स्वामीच्या आसीर्वादेंकरून येथास्थित असे विशेष. स्वामींनी राजश्री स्वामीकारणे कुतरीयाचे पील जोडा १ पाठविला तो राजश्री स्वामीच्या खातेरेस न आला. उतम नाहींत यास्तव माघारा परतोन दिल्हा. तो कार्याचा नाहीं मग काये करावायास्तव आम्हींही आणून गावांत सोडून दिल्हा. तर राजश्रीकारणे उतम कुतरेयांचे पील राजश्रीचे मर्जीयोग्य येत्नपुरःसर जे मिळतील ते मेळवून आणून पाठवून द्यावे. वरकड वर्तमान दरबारचे अलाहिदा पुरवणीपत्रीं लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. उतरें पाटवावीं. विदित जालें पाहिजे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Purandare writes to Nana, asking him to supply good dogs for Shahu.*

---

*No. 21*]
पा। छ २६ जमादिलाखर

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ व तथा
राजश्री अपा स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी स्वामींनी राजश्रीकारणे घोडा पाठविला तो छ २१ जमादिलाखरीं सकाळच्या प्रहर दिवसा येथें पावला. राजश्री सिकारास गेले होते. ते

दोन प्रहरीं आले. संध्याकाळच्या चवथे प्रहरीं घोडा नेऊन राजश्रीस गुदरला. राजश्रीनी पाहिला. फेरावयास चाबूकस्वार हाजीर नव्हता म्हणून रिकीबदारांस सांगून फेरून पाहिला. रिकीबदाराने राजश्रीस सांगितलें की जवळच्या टप्यांत घोडा हालविला तरी तोंडचा बहुतसा गोड आहे. दुरच्या टप्यास बहुतसा दाटला तरी थोडासा वोढितो. त्याहीमध्यें त्यास खपाव्या लगाम म्हणून थोडा वोढितो. आडवा लगाम दिल्याने सज येईल येसे सागितले. त्यावरी राजश्री बोलिले कीं पुढीले चौकास जसा आहे तसा मागले चौकास नाही. मागें कमी पडिला आहे. आम्हास जसा पाहिजे तसा नाहीं. परंतु आठ दिवस ठेऊन पाहू. आमचे मरजीस उतरला तर ठेऊं नाहींतर माघारे देऊं. पागेच्या हवालदारास सांगितलें की तूर्त डाग न करणे. बिनदागीच असो देणे. येसे बोलिले. स्वामीस कळावें म्हणून लिहिलें असे. स्वामीनी जरी सरोसर[1] विकत घेऊन देणे म्हणून लिहिले. त्यावरून जरी सरोसर विकत घेऊन दिल्ही. विदित जालें पाहिजे. सेवेसी श्रुत होये. विज्ञापना.

¶*Bajirao and Chimaji are informed that the horse sent to the King has been found defective in some respects.*

---

*No. 22*]

छ २६ साबान
पा. छ ९ रविलाकर.

**श्री**

**पुरवणी श्रीमंत राजश्री पंत**
**प्रधान स्वामीचे सेवेसी**

विनंती एक इराकी घोडा वेगळी कुल फर्मासी जिनसा सवंग महाग तयार करून गड्डे बांधून ठेविली आहे. इराखी घोड्या-साठी माणसे लाहोरास पाठविली आहेत. परंतु या दिवसात काबलेकडून सौदागरी घोडे आले नाहींत. ज्यास पाठविले आहे तो मार्ग पहात बसला आहे. ' सौदागरी घोडे आल्यावर ऐखादा घोडा उत्तमसा.

---

१ घोड्याचा एक दागिना.

खरीद करून आणील. जिन्नस तयार करून ठेविली आहे, ते तो मागाहून उंटे माणसे समागमे देऊन वाटे लावितो. सांप्रत वनगाई व कस्तुऱ्या मृग व हुमे पक्षी जिवंत पाठवावा. हे जिन्नस श्रीनगरच्या राज्यात आहे म्हणून येथे कोणी सांगितले त्याजवरून राजश्रीनी आज्ञा केली तरी तुम्ही छोटेखानी कारकून शाहणा एक श्रीनगरास पाठवून सदरहू तीन जिन्नस प्रेत्नपुरःसर आणवून पाठवून देणे मुजरद कारकून पाठवून तलाश करणे म्हणून पुरवणी पत्री आज्ञा लिहीली. यास श्रीनगरच्या राज्याचे येथें वकील आहेत. पादशहा वजीर इत्यादिक यांस कधीं कधीं तोहफा म्हणून कांहीं जिन्नस पाठवित असतात. आम्हासीहि स्नेह राखतात. तेथले राज्याशीही आमचा दंडक आहे. त्या वकीलास बोलावून विचारिले. त्यांनीं निवेदन केले कीं, हुम पक्षी तो जिवंत मिळत नाहीं. कोणी स्वदृष्टीनें देखिलाच नाहीं. श्रीनगर बंदरी पलीकडे पहाडात दो चौ वर्षांत कधी कधी हे पक्षी उतरतात तेथे पक्ष मात्र टाकून जातात. जिवंत पक्षी कोणी देखिलाच नाहीं. वनगाई व कस्तुरीया मृग मिलतो परंतु हे दिवस नव्हेत. वर्षाकाळास प्रारंभ जाहला असतां येथून माणसे पाठवावी. विजयादशमीच्या दिवसात वनगाई व कस्तुरीया मृग येथे येईल तो हिवाळ्या दिवसांत मातान्यात पुण्यात पोहचूं शकतो. आता उष्ण काळांत तो कदापि चार मजलीहि निभणार नाहीं. या प्रकारचे वर्तमान

आहे. या कार्यानिमित्य एखादा छोटे-
खानी कारकून श्रीनगरास पाठवितो.
नशल्या राज्यास स्वामीच्या तर्फेनें कांहीं
जिन्नसहि पाठवून या दोही वस्तुचा तलाश
करितो. सेवेशी श्रुत होय बहुत काय
लिहिणे. कृपा केली पाहिजे हे विनंती.

¶*Shahu orders the Peshwa to procure several curious animals from the Himalayas.*

---

*No. 23]*

**श्री**

**तीर्थरूप राजश्री राऊ व**
**तथा राजश्री आपा स्वामीचे**
**सेवेसी.**

आपत्ये मल्हार तुकदेव कृतानेक सा(ष्टांग) नमस्कार विनंती. येथील कुशेल ता छ २२ ज(मा) दिलाखर पर्यंत स्वामीच्या आसीर्वादेंकरून येथास्थित असे विशेष. स्वामीनी राजश्रीकारणे घोडा पाठविला होता. त्याचा पहिलें अर्थ लिहून पाठविला होता. त्यावरी आजी प्रात:काली दरबार जाला. तेव्हा पागेतून घोडा पाहावयास (आ)णविला. तेव्हा राजश्री देवजी सिर्के व नागोजी घाटगे व त्रिंबकराव धायेगुडे व आणखी लोक बोलिले कीं, घोडा उतम नाही. परदेसी घोडा मागें कमी पडिला आहे. उमर वरसें सात आठ जालीं आहेत म्हणून बोलिले. त्यावरी राजश्री बोलिले कीं, आम्ही तोंड वासून घोडा मागितला. तसा * * * * हीं आम्हा योग्ये नाहीं. मलीक रिकिबदारास फेरून पाहावयास सांगितला. त्याणे फेरून आणिला. त्याणे सांगितलें की, घोडा वोढक फार * * * * माहाराजांच्या कार्याचा नाही. यैसे बोलिला. (घो)डा राजश्री च्या चितास नये. म्हणून फ * * * * * * व सुभाननाक वगैरे यांजबराबर·····················माहे सरोसर जरी व·················पार देऊन विकत घेतली····················येकून दोनी सरोसरा पाठविल्या आहेत. व पहिला साज समेत पाठविला असे. लाड * * बहिरनाक सुभाननाक वगेरे चौघे करोल यानी खर्चास (मागि)तले; त्यावरून त्यास व घोड्यास दाण्यास रु * * * काडजी व सुभाननाक याचे

हवाला केले आहेत. त्याचा हिसेब स्वामीनी त्या दोघाज(वळून) घ्यावा. घोडा उतम आरबी थोर * ळ * * * पाठविला पाहिजे. येविसी अनमान केला न पाहिजे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना.

¶*Malhar Tukdev Purandare writes to Bajirao about the horse which Bajirao had presented to the King. The horse did not meet with approval.*

---

*No. 24*]

छ १९ जाखर

**श्री**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ व तथा**

**राजश्री आपा स्वामीचे सेवेसी**

विनंती. बुधवारी दरबारी राजश्री स्वामी बोलिले की, ये गोस्टी मोठी बेवकुबीची जाहाली की, राजश्री प्रधानपंतास मागितला; हे उतम न जाहाले. यैसे बोलिले. त्यावर आम्ही उतर दिल्हे की, माहाराजानी घोड्याविसी हुकूम केल्यास काही विसर पडला अगर हैगै केली यैसे नाही. आम्ही येक दोन वेला लिहिले होते. त्याचे उतर आले की, घोड्याच्या तलाशात आहो. माहाराजाच्या मर्जी माफक योजून लौवकरीच पाठवितो. यैसे आले आहे. यैसे आम्ही बोलिलो. त्यावरी राजश्री बोलिले की, याउपर आम्हास त्याचे घोडे घेणे नाही. त्यावर मागती आम्ही उतर दिल्हे की, घोड्याविसी काही हैगै जाहाली नाही; असे असता माहाराजानी असे म्हणावेसे काये आहे? घोडा लौकर येईल यैसे बोलिलो. तरी स्वामीनी हैगै करावीसी नाही. बिशाद फारसी नाही. तर अगत्य घोडा पाठवावा. येविसी अनमान न करावा. कुतऱ्याविसीहि वरचेवर राजश्री आज्ञा करितात. तरी तलाश करून कुतरीहि पाठवावी. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

¶*Mahadaji Purandare to the Peshwa and Chimaji that the King is quite upset over the Peshwa's negligence in the matter of complying with the King's request for a horse. It should therefore be sent with all despatch.*

---

+ पत्र महादाजी अंबाजीचे.

No. 25] [1740 ?

श्री

विनती उपरी. अमरसिंग बुंधले याणी बाज व जुरे व कुतरियाची जोडी राजश्री स्वामीकडे रवाना केली होती. त्याजबराबरी बालकिसण परदेसी होता. याची खर्ची सरली याकरितां याचे सोबती होते त्याणी यास मावारा लाविला. तो राजश्री बहिरजी निंबालकर यांच्या लष्करासमागमे आला. त्यांच्या कारकुनांनीं याचे दोन गलेथे[1] घेतले आहेत. ते देत नाहींत. त्यास बोलाऊन आणून यांचे गलथे यास देविले पाहिजेत. विशेष काय लिहीणे. हे विनती.

¶*Dogs, hawks and other hunting animals of prey are brought for Shahu from North India.*

---

No. 26] [22-8-1740

पाा छ १३ जमादिलाखर

श्री

तीर्थरूप राजश्री आपा व ताा

राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

अपत्ये मल्हार तुकदेऊ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ताा छ १० जमादिलाखर भृगुवासर दीड प्रहर रात्रपर्यंत स्वामीच्या आसीर्वादे-करून येथास्थित असे विशेष. आतापासून दसरादिपवालीपर्यंत माशाचे सिकारीचा हंगाम आहे. यास्तव माशाचे डाव जागजागा राजश्री स्वामीनी घातले आहेत. नित्य जाऊन गल टाकून बसावे, त्यास आजी सायेकाली सिकारीहून आल्यानंतर दरबार जाला. माशाचे व सिकारीची चर्चा निघाली. तेव्हां गलाचे दोरीस बारीक सूत असावे म्हणून बोलिले. त्यावरी कितेक लोक बोलिले की बऱ्हानपुरी खानदेशचें सूत बहुत बारीक मिलते म्हणून चर्चा केल्या. त्याजवरून राजश्री स्वामीनी आम्हास बोलाऊन नेऊन आज्ञा केली की दीडसे रुपयांचे सूत अतिउतम बारीक खानदेसी बरानपुराहून विसावे दिवसीं येथे आणवणे म्हणून आज्ञा करून स्वामीसहि सहीचे पत्र लिहिलें आहे. तर ही पत्रे पावतील तेक्षणी मुजरद जासूदजोडा तयार करावा. त्यांचे पदरीं दीडसें रुपयांचे हुंडीपत्र करून द्यावें. कमावीसदारास सुताविषीं ताकीदपत्रें लेहून देऊन बऱ्हानपुरास रवाना करावें. कमावीसदारास ल्याहावें कीं येक दोघां सावकारांचे घरीं सूत बहुत बारीक आहे त्याचे ठिकाण पाहून अवघ्या सुतापेक्षां

---

1 Loads or bundles.

जे बारीक चांगले मिळेल ते खरिदी करून दीडसे रुपयांचे टाकोटाक पाठऊन देणे म्हणून बरी ताकीद करून ल्याहावें व जासुदासहि मार्गी सत्वर जावें सत्वर यावें यैसी ताकीद करावी. सदरहू सुताचे रुपये १५० दीडसें हरयेक यैवजी मजुरा देऊन म्हणून राजश्री स्वामी बोलिले आहेत. देतील. सिकारीचें अगत्य राजश्रीस बहुत आहे. स्वामीस विदितच आहे. तरी अविलंबे सूत राजश्रीस येऊन पोंहचे तो अर्थ केला पाहिजे. पैक्याची वरात स्वामी तिकडीलच कमाविसदारावर लेहून देऊं म्हणतील तर कमाविसदारापासून पैका आतांच येणार नाहीं आणि दिवसगत लागेल. यास्तव रोख पाठवावा अगर हुंडी पाठवावी आणि सूत खरिदी करून आणवावें. विदित जालें पाहिजे. राजश्री स्वामीस उतर पाठवावें कीं, महाराजांचें पत्र पावतांच सूत आणावया माणसें पाठविलीं म्हणून ल्याहावे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना.

¶*Letter from Purandare to Chimaji Appa, communicating him Shahu's orders to purchase fine twine for the King's fishing rod, as he was fond of fishing.*

---

*No. 27*]

श्री

श्रीमंत क्षत्रिये कुलावंतस माहाराज राजश्री
छत्रपति स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक निळकठ बलाल कृतानेक विज्ञापना विनंती. स्वामीचे कृपादृष्टीकडून सेवकाचे व या प्रांतीचे वर्तमान छ १२ रबिलाखर पावेतों येथास्थित असे विनंति. स्वामीचे आज्ञापत्र सादर (झा.)लें. तेथें आज्ञा कीं रामचंद पायेदामी[1] व माहादजी खापणा लावबाज[2] पाठविले आहेत. यांबराबर माणूस देऊन लावे धरून आणून पाठवणें म्हणौन आज्ञा. आज्ञेप्रमाणें त्याबराबर माणसें व सुताचे चिवट[3] येक देऊन पाठविले. त्याणीं लावे धरून आणिले ते सेवेसी घेऊन आले आहेत. सेवेसी विदित जाले पाहिजे. यांस वेचास[4] रुपये वीस २० +देविले ते आज्ञे प्रमाणें पावविले. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापनां.

¶*Letter addressed to Shahu by Chitnis Nilo Ballal informing him of his having sent birds as ordered.*

---

१ पायेदामी = जाळी टाकून अगर लावून पक्षी पकडणारे.

२ लावबाज—लाव, लावा = पक्षिविशेष, शिकारखान्यांतील लाव्यांकडचे कामगार. जसे, हरणबाज, खबुतरबाज.

३ चिवट—A roll of coarse cotton thread. It is usually ten or twelve cubits long and consists of from one hundred to two hundred winding around the तानवट or two stakes.

४ वेच – खर्च. + वळण निराळें.

*No. 28*]

पौ छ १९ जमादिलाखर

श्री

श्रीमंत राजश्री राऊ स्वामीचे सेवेसी

पोष्ये अंबाजी त्रिंबक कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुषल ताा छ १९ जमादिलाखर जाणून स्वकीये कुषल लेखन करावया आज्ञा केली पाहिजे विशेष. राजश्री स्वामीनी बाजजुरे याचे खरिदीबदल स्वामीकडून पाच हजार रुपये विद्यमान राजश्री अनंदराऊ सुमंत देणे ताा मल्हार प्रभु देविले. त्यास आम्ही स्वामीपासी होतो. याकरिता राजश्री स्वामींची पत्रे घेऊन राा मल्हार प्रभु स्वार होऊन जेजुरीस गेले. आम्ही सातारियांस आलो. त्यावरून मार-निलेनी आम्हाकडे राजपत्र पाठविले. त्यावरून आम्ही आजी छ मारी राजश्री कृष्णराऊ व राजश्री जिवबा चिटनवीस याच्या विद्यमाने वाघोजी कामथे हवालदार व राघो माहादेव कारकून यांचे पदरी रु ५००० पांच हजार घालून कबज घेऊन दप्तरी ठेविले. स्वामीस वर्तमान कळावे याकरिता लिहिले असे. राजश्री मल्हार प्रभु स्वामीची भेटी घेतली राजपत्र स्वामीस देतील. पैका मागतील तर त्यास काही न देणे. विदित जाले पाहिजे. कृपा केली पाहिजे हे विनती.

¶*The writer informs Bajirao that five thousand rupees have been paid out to purchase two hawks for His Highness.*

---

*No. 29*]

श्री

पुाा सेवेसी विज्ञापना राजश्री बोलले कीं, वाग पाठऊन द्यावासा करार केला होता. त्यास अद्यापि वाग आला नाही. कदाचित वाग दुखवला असेल. तरी वाघीण तऱ्ही पाठऊन द्यावी. तरी स्वामीनी वाघ रवाना केला असिला तरी उतमच. नाही तरी वाघिणीची आज्ञा करून पाठवावी. सेवसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Shahu orders a tiger and a tigress.*

No. 30]

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा स्वामीचे सेवेसी विनंती उपरी. सिमघीयाचा खेल संपूर्ण जाला नाही. दशमी पावेतो आहे. त्यास छ २० सवाली रविवारी दोप्रहरा वाघाची हवी आली. याकरितां राजश्री स्वामी सिकारीस गेले. पाटिलाचे स्मरण केले. याउपरी सिकारीस जातील. पाटील सत्वर स्वामीनी पाटविले म्हणजे येथे आमचा आब राहील. नाही तर राहत नाही. क्रोधास येतील. ते समई समस्ता देखता काये बोलतील ते कलेना. विदित जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना.

¶*Apa is informed that the King, having learnt that tigers are abroad, has gone out hunting and expects huntsmen to be sent to him immediately.*

---

No. 31] [1737

पा छ ३ साबान

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा
स्वामीचे सेवेसी

विनंती चाकरमाने पाटलाचे त्वर्पे[1] राजश्री स्वामीनी लाविले आहे. नित्य आम्हास पुसतात पाटील आले कीं नाहीं, तुमच्या चितांत आणावयाचे नसेल तरी तसेंच आम्हास सांगणे. आम्ही हुजरे मसाले पाठऊन आणितो. यैसे वहुत प्रकारें बोलतात. तरी तूर्त काही थोडेवहुत पाठऊन द्यावे. सत्वर पाठविले पाहिजेत. येथें दुमल(?) बहुतच केली आहे. विदित जाहाले पाहिजे हें विज्ञापना.

¶*Shahu enquires why the Patils in employ for his Shikar have not been sent.*

---

१ तगादा त्वष्ट.

No. 32]

पाा छ ४ जिाद

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. सांप्रत राजश्री स्वामी चौघटिका रात्रीस सिकारीस जातात. संध्याकाली येतात. दोनतीन घटिका राज्यकारभार करावयाचा तो होतो. मग आवघियास निरोप होतो. याप्रमाणे पांचसात रोज जाले. पुढे किती दिवस चालेल ते पाहावे. तीनचारसे माणसाचा स्वयपाक सिध करून रानात न्यावा. भोजने तेथेच करावी. बहुत संतोषरूप आहेत. जे समई राजश्री संभाजी राजे याचे पत्र येते ते समई मात्र आम्हावर कोप होतो. तो समये गेल्यावर मग काहीच नाही. अद्याप स्वामीचे राऊत पुणियास आले नाहीत. मागती पत्रे लेहून आणिले पाहिजेत. सेवेसी विज्ञापना.

*¶King Shahu is reported to be spending the major part of his time in hunting and has his repast served in the forest.*

---

No. 33]

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक खंडोजी माणकर मुाा किले तलागड साष्टांग (दंडवत) विज्ञापना ताा छ २७ माहे शौवालपर्यंत स्वामीचे कृपावलोकनेकडून शेवकाचे व प्रांतमजकुरींचे वर्तमान येथास्थित असे विशेश. आज्ञापत्र छ ४ सवाल पैवस्ता छ १४ मिनहूं, तेथे अज्ञा कीं "बटकीच्या पोरी दोन बहुत चांगल्या दाहा अकरा वर्षांच्या निरोगी, नाचावयासी लायेक लाविलीयानी उपयोगी पडत यैशा आणवणेविसीं राजश्री स्वामीची येकांतीची फर्मास आहे. तरी प्रैत्नपूर्वक मेलऊन येथे पसंद पडत वाईट न म्हणत यैशा पाहून पाठवणे" म्हणौन आज्ञा. यैसियासी इकडील माणूस आहे हे स्वामीस विदीतच आहे. कुणबी माणूस काले[1] रीस, देखणें नव्हे. पाहाता वीट येतो. यैसेही असोन शोध मनास आणिला, परंतु स्वामीनी लिहिल्याप्रमाणें वस्त मिलत नाही, व बदसुरत कुंगार[2] असिल्या तरी

---

१ 'काले रीस देखणे नव्हे'—या वाक्याचे दोन अर्थ संभवतात. इकडचीं माणसें काळीं रिसासारखीं म्ह. अस्वलासारखीं असा एक अर्थ होईल. किंवा रीस देखणा (रीझ देखणा—रिझविण्यासारखा सुंदर) असा शब्द स्वीकारून इकडील माणसें रीझ देखणीं म्ह. सुंदर नाहींत असाहि अर्थ होईल. कोकणांत रीस ही एक माकडाचीहि जात आहे.

२ भिकार.

घरिच्या पोरग्या द्यावयासी कोण्ही रजावंद होत नाहीं. अतिशये करावा, तरी मुल्क दुतर्फा, यास्तव कार्यास नये. तैशामध्यें लिहिल्याप्रमाणे प्रयोजनिक वस्त असिलियासी हरयेक प्रेत्न केला जाता. परंतु स्वामींनी लिहिल्याप्रमाणे या प्रांती वस्त मिलत नाही. सेवक आज्ञाप्रमाणे तलासामध्यें आहों. तलासें मिलालियावर अंतर होणार नाही. सेवेसी विदित होये हे विज्ञाप्ति.

¶*Shahu ordered from the Konkan two young girls as maid servants. Khandoji Mankar replies to the Peshwa that good-looking girls of the type required were not available in the Konkan.*

---

*No. 34*]

## श्रीभार्गवराम.

सेवेसी विनंती उपरी राजश्री प्रधान पंताकडे धिंगराज भाट यास रुपये २०० दोनसे देविले पाहिजे हे विनंती.

¶*Shahu's gift of Rs. 200 to a bard.*

---

*No. 35*] [*12-7-1749*

राजमंडल माा पोते रोजकीर्दी
माहे शाबान सुरु खमसैन
तेरीख ७ रोज सौम्यवासरे श्रावण शुद्ध नवमी मुाा गोडोली.
पैकी नोंद

बंद ८ वा यैवज दरमाहा आशाढ मास व सिलक ताा जेष्ट मास पैकीं खर्च

नटवे वगैरे. हिरामण
१९ १४८÷ यैन
|||≥ कसूर
———
१९
४० दुर्गादास
२९ खासा
१९ देविदास
———
४०

३२ सेटी बिन रघुनाथ ता। गंगाराम
२२ खासा
१० मानराव
———
३२

३६।।। राणोजी गुंजकर
२०।।। खासा
१६ नागोजी
———
३६।।।

२१।।। तुकोजी पडतुरकर
१५ गोविंदा बीरभान
२० फकिरा वगैरे
१५ नरसिंगराव
१५ खिरसागर
१५ राहुजी
१६ भगवती हणवंतराव
७।। आपाजी बिन सिवाजी
२० नसू बिन बसवाजी
३० तुळजी राव वगैरे
१५ येलगडप
५ खासा
५ भवानी
५ बसवाजी
२० लालमण दि। आमीना ता। सुक॰ मादाई
१५ संगीतराव
३० शंकर जोगी वगैरे
९ खासा
६ येसू
६ गोविंदा
६ जयेराम
३ कसूर

२५ गणोजी जोगी वगैरे
१० खासा
५ आनंदराव
५ भवानी
५ मानाजी

२० गंगाराम वाा भगवान
१० खासा
१० हैबतराव वाा येशवंतराव

७५ धोंडी जोगी वगैरे आसामी
१ खासा बिन जनार्दन जोगी
१ गंगाजी बिन त्रिंबकजी जोगी
१ आपाजी बि॥ त्रिंबकजी गुरव
१ रामाजी बिन गणोजी जोगी
१ गोविंदा बिन सकोजी गुरव
१ मुरारजी बिन त्रिंबकजी जोगी
१ सिवाजी बिन त्रिंबकजी गुरव
१ भागोजी बिन त्रिंबकजी जोगी
१ चिमाजी बिन सुभानजी जोगी
१ संताजी बिन सुभानजी रुजू जनार्दन जोगी

---

१४५॥. गुरव लोक
२० रघूजी बिन रखमाजी
४८ भवानीदास वगैरे
२५ खासा
२० तुळाराम
१ बोहण
२ बसफोड
१५ संभू बिन माहादजी ताा मावजी
२५ सदाशिव

५ खंडोजी ठोसर
७॥ आवजी बिन दमाजी
१० राणोजी आंबडकर
१५ बापूजी गुरव

¶*This is a list of the Court-players of Shahu with their monthly salaries.*

---

*No. 36*]
पौ छ २९ मोहरम

श्री

+पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा स्वामीचे सेवेसी.

विनंती उपरी. राजश्री शिवाजी यांची कन्या राजश्री स्वामीनी येथें ठेविली होती. तिची रवानगी राजश्री संभाजी राजे यांजबराबरच करीत आहोत. दहा सहस्राचे अलंकार घडून आंगावर घातले. सात पोषाक द्यावयास केले. हस्ती द्यावयास केला आहे. स्वामीस कळावें याकरितां लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय हें विज्ञापना.

¶*Purandare communicates to Chimaji Appa the news that Shahu has taken care of Daryabai Nimbalkar and sent her home with a gift of ornaments.*

---

*No. 37*]
पा छ २० साबान

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा स्वामी
वडिलाचे सेवेसी.

विनंती उपरी. गोपाळ आरडया व गोविंद बिडवई व सिवजी गोलकर लोहगांवकर येथें आले आहेत. त्यानीं राजश्री बसापा[१]ची भेट घेऊन सौभाग्यादिसंपन्न मातुश्रीबाई साहेबांस दाखल होऊन सांगितले कीं, कसबे मजकूर पहिले

---

+ पत्र मल्हार तुकदेव पुरंदरे यांचें. शिवाजीराजांची कन्या दर्याबाई निंबालकर.

१ बसवंत खोजा.

मातुश्री जिजाऊ साहेबांकडे दरोबस्त गांव होता. तेव्हां पेठ बाजार भरून गावची लावणी होऊन उत्तम प्रकारें नांदविला होता. आतां खराब पडिला आहे तरी साहेबी दरोबस्त आपलेकडे करून घ्यावा. सात साला कौल द्यावा म्हणजे पूर्ववत प्रमाणें पांढर नांदऊन पेठ बाजार भरून. ऐसा कितेक प्रकारें भर भरून सांगितले आहे. सौ मातुश्रीबाई यांचेहि चितास आले आहे. पुढें गांव दरोबस्त करून घ्यावयाचा मजकूर करतील तरी स्वामींनी ये गोष्टीचा धरबंध अगोदरच केला पाहिजे. येथें जे त्रिवर्ग आले आहेत त्यांचे कसबे मजकुरी कोणी असतील त्याची तहकिकात करून आपल्याजवळ बोलाऊन नेऊन विचारें समाधानें त्यांस सांगून यांस घेऊन जात तो अर्थ करावा. केवळ जबरदस्तीच करावयाचे काम नाहीं. तेथें जबरदस्ती जाली म्हणजे हे येथें अर्धांकच लावालावी करितील. यास्तव युक्तींनेंच यास येथून नेले पाहिजे. महादशेट सेव्यास यावयास दिसगत लागली. या कारितां रा स्वामींनीं राजश्री राघो राम यास सांगितलें आहे की, जेजालबारदार पाठऊन मसाला घेऊन सेव्या व पांढर घेऊन येणे म्हणून त्यास आज्ञा केली आहे. स्वामींस कळावे या करितां लिहिले आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ पत्र नानासाहेबाचें असावें].

¶*This appears to be a letter by Nanasaheb to Chimaji, reporting that Sagunabai Rani and Basappa are concocting plans as regards the village of Lohagaon.*

---

*No. 38*] [*April 1747 ?*

श्री

राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यांसी प्रती सौभाग्यादिसंपन्न बाईसाहेब याणी आज्ञा केली ऐसी जे, तुम्ही निरोपास आला ते समयीं आम्हापासी बोलला की, मौजे वडुनास श्री कृष्णाश्नानास जातो, च्यार रोज तेथे राहीन. पुनरोक्त येथे येऊन साहेबाकडील लाहान मोठी कामे असतील तितकी विल्हे [illegible]. यैसा करार करून आज्ञा घेऊन गेला. आणि आजी ऐकितो की, तेथून [illegible] करून पुढे गेला हे कोण गोष्ट ? काये निमित्य आज्ञा न घेता रुसवा [illegible] पुढे जाता हा अर्थ काहीच कलत नाही. हा मलमास[1]. आपणास [illegible] जरूर जाहले तरी वडुतच्या मुकामास माघारे येणे. मलमास क्रमल्या

१ अधिक मास.

नंतर येथील जाधवाकडील व बाब्याकडील कागदापत्राचा गुता वगैरे कामे उरकून महाराज राजश्री स्वामीची आज्ञा घेऊन जाणे. यामध्ये लौकीक उत्तम आहे. नाही तरी आज्ञा न घेता जाणे हे उचित नाही. पत्रदर्शनी तेथून वडुतास येणे. ये गोस्टीस अनमान कराल तर तुम्हास महाराजाच्या पायाची शफत असे व आमचे पायाचा शफत असे. जातेसमयी तुम्ही बोलला की, साहेबाकडील कामे विल्हे लाऊन आज्ञा घेऊन जाईन. यैसे बोलोन आमच्या पायाची आण वाहून गेला. यैसे असता आजी परस्परे स्वार होऊन गेला. यैसे चितात तुमच्या होते तरी आम्हासी आण वाहून काये निमित्य न पुसत जाता हे न कले. यैसे न करणें. उचित नाही. बहुत काये लिहिणे सूज्ञ असा.

¶*Sakwarbai to Peshwa Nanasaheb: beckons him to her presence and requests him not to depart in an angry mood.*

---

*No. 39*]

**श्री**

पु॥ सेवेसी विज्ञापना श्रीमंत सौभाग्यादिसंपन्य मातुश्री बाईसाहेब वाडा दुसरा यास स्वामीनी पत्र पाठविले. ते पत्र सेवकाने राजश्री माहादजी सालोखी याजपासी देऊन वाडियात धणी(णी)स गुजरलिले, त्यास स्वामीचे पत्र लाखोटा फोडून अक्षरशाहा धणीने वाचून पाहिले. परंतु निबगावचे कजियामुले धणीन माहादजी सालोखी यास म्हणो लागली की, आपणास पत्र लागत नाही. त्याचे पत्र त्याचे कारकुनाचे हवाला करणे. त्यावरून आपणासी पत्र रा महादजी सालोखी व चिटनिविस माघारे देत होते. परंतु आपण घेतले नाही. निबगावामुले धणीन बहुत नाखुश आहे. निबगावचा मजकूर धणीने सेवकास रुबरु पडद्याआड बोलाऊन आज्ञा केली. ते सविस्तर रा नानास लिहिले आहे. त्यावरून स्वामीस विदित जाले असल. स्वामीचे कागदाचा जाबहि न दिल्हा नाही. परंतु धणीन येका दोघा पासी बोलली की राजश्री पंतप्रधान याचा व माझा भाऊपण्याचा स्नेह लौकिकात फार आहे. येसे असून माझीच माणसे मारून पिटऊन घालितात. म्हणून मला त्याचा फार राग येतो. विदित जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Letter addressed to Peshwa Balaji Bajirao at Poona by some one of his party at Satara. It explains why the second Rani Sagunabai was offended with the Peshwa.*

No. 40] [पौ 23-9-1743 ?

पौ छ १९ साबान.

श्रीशंकर

पु॥ तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेसी.

विनंती. सांप्रत रघोजी बावावर धाकटे बाईची कृपा फारशी आहे. हमेश भोजनास बोलावावे. आपण खासा त्याच्या घरास जावें. प्रत्यह खलबतहि दोन च्यार घटका होत असते. फारशी ममता धरली आहे. आम्ही जातो तेव्हां स्वभाविक गोष्टी काढून रघोजी बावाचा स्तव फारसा करितात. कितेक जिनसाचे पोशाख व हरजिनस, हार, माला, फुले, नाना प्रा यांस आपले स्वहस्तें तयार करून पाठवावें; पकवानें करून पाठवावीं. ऐसी बहुतसी माया आहे. कळले पाहिजे हे विज्ञापना.

¶*Purandare to Peshwa, reporting Rāni Ṣagunabai's attentions to Raghuji Bhosle.*

---

No. 41] [10-11-1735

पा छ ११ रजब

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री
राऊ व तथा राजश्री आपा
स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेबांस आरोग्येता व्हावी म्हणून राजश्री स्वामींनी छ ९ रजबीं इंदुवारीं प्राथःकाली गजदान व उष्ट्रदान व दोन अस्वदाने म्हैसीची दानें दोन व पांच सात गोदाने व कृष्णाजनदान व किरकोल दश दानें ब्राह्मणास दिल्हीं; अद्यापि वेथेस चढ उतार कांही नाही. राजश्री परम क्लेसी आहेत. विदित जाहालें पाहिजे. स्वामीस वर्तमान कलावे याकरिता लिहिले आसे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना.

¶*Shahu distributes alms for the recovery of his queen, whose illness distressed him much.*

*No. 42*]

पौ छ १८ साबान

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

विनंती बावानीं बाईस निरोप पाठविला. नानाचे ठाई कृपा पूर्ण असो द्यावी, दुसरा विचार किमपि न धरावा. त्याचीहि निष्ठा तुमचे ज़ागा आहे म्हणून सांगितले. तुम्हीहि बोलला होता त्यास आता ऐकितो कीं, नानावर अभक्त जाहाला आहे. तरी हेच आमचे ठाई निष्ठेचे भाषण बोलला त्याचे फल हे. तरी ही गोष्ट तुम्हा प्रभू लोकास उत्तम नाहीं. नानासारखा सेवक तुम्हास मिळणें नाहीं. तुम्ही लोकाचें इतरांचे बाष्कल वर्तमान ऐकून थोरले बाई सारखे करिता, तरी हे गोष्ट उत्तमांत नाहीं. नाना आमचे लेकरूं त्याजविसी आम्ही तुम्हांस सांगितले त्याचे फल तुम्ही हे आणले तरी याचे उत्तर यथार्थ चांगले पाठवा व लटका रोष टाकून देऊन नानाचे समाधान करून त्यास पत्र पाठवावे. नाहींतर तुमचा आमचा (स्ने) श्नेह कशास पाहिजे ? आम्हा लोकास तुमचा स्नेह काय उपयोगीं आहे ? येसे सांगून पाठविले आहे. उत्तर लौकर आणा म्हणून सांगितले आहे. उदेक उत्तर आणा म्हणोन नारोबास सांगितले आहे. बाबानीं आम्हास आणिक बोलाविले आहे. बाईचे उत्तर काय होते ते लिहून पाठवितो. सारांष बावाची कृपा निपूण स्वामीचे ठाई आहे. कांहीं चिंता नाहीं. सर्व उत्तम होईल. कलले पाहिजे हे विज्ञापना+

---

*No. 43*]

पा

छ १८ साबान




श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना
स्वामीचे सेवेसी.

विनंती. स्वामीच्या आज्ञेप्रमाणे येवतेश्वरास आठा चो दिवसा जात असतो. बावास वर्तमान दरबारचे थोक थोक व उभयता बाईची मर्जीचे व राजश्रीचे

+ पत्र नाना पुरंदरे याचे हातचे.

सांगत असतो. नारायेण[1] स्वामीनीहीं मजला आज्ञा केली आहे कीं दो चौ दिवसा येथें येऊन वर्तमान दरबारचे व नानाचे ठायीं प्रीत आप्रीत राजश्रीची व दोघी बायकांची कसकशी आहे, दिवसेंदिवस कसकशी होती, ते सांगत जावे म्हणून आज्ञा केली आहे. त्याजप्रमाणे व स्वामीच्या आज्ञेप्रमाणे जाऊन सांगत असतो. बावाहि सविस्तर पुसतात. एकांती सांगतों. नारायेण स्वामीची आमचे ठायीं बहुत कृपा आहे. सदैव आपल्या शरीराचे वर्तमान पुसत असतात. सांगत असतो. तूर्त धाकटीबाई क्षुद्र गोष्टीस्तव रागे भरून रुक्षता वाढवितात. लोकांचे आइकतात म्हणूनहि नारायेण स्वामीस श्रृत केले. तूर्त धाकटी बाई नारायेण स्वामीस फारसी भजत असतात. हमेशा फुले पाठवावी. नारोबा उपाद्ध्ये बावाकडे पाठवीत असतात. हेहि वर्तमान नारायेण बावानीं आम्हास सांगितले. बाई नारायेण बावाचे दर्शनास गेली होती. तेव्हां बाईनीं बावास म्हटले कीं, मी लेकरूं आपले आहें. ज्याप्रमाणे नानावर कृपा आपण करितात त्या प्रमाणे मलाहि लेखून कृपा करीत जावी. म्हणून बहुतसी नम्रता भाषण केले. बावानीं उत्तर केले कीं बरें असो. तुम्ही सत्वगुणी आहां. कृपाच आहे. परंतु नानाचे ठायीं कृपा तुम्ही करीत अहाच परंतु अधिकोत्तर करीत जावी म्हणून सांगितले. ते वेळेस बाईनीं बावास उत्तर केले की, असे म्हणावेसे काय आहे? नानाचीहि माया आमचे ठाई आहे. आमची कृपा त्याजवर आहे. हेहि वर्तमान बावानींच मजवळ सांगितले. पहिले धाकटे बाईची कृपा स्वामीचे ठाई निपूण आहे म्हणून बावाजवल सांगत होतो व आपणहि येथें असतां बाईची कृपा फार आहे म्हणून बावाजवल सांगितले होते. त्यास तूर्त धाकटे बाईनीं क्षुद्र गोष्टींस्तव क्रोध केला आहे म्हणून आम्ही बावास सांगितले. बावानीं उत्तर केले कीं, नाना बहुत सजन आहे, त्याची वासना चित्त उत्तम आहे, कांहीं चिंता नाहीं, ईश्वर सर्व गोष्टी उत्तम करील. आम्हीहि ईश्वराजवल हेच चिंतन करितो. कांकीं नानाची माया हेतु आमचे ठायी आहे. म्हणून नाना आमचा हेच जाणून आहो. वरकड कित्येक प्रभू आहेत, आम्हास काय त्याचे प्रयोजन आहे? नानाचे आगत्य माया ही आम्हा लोकास कशास पाहिजे? परंतु वरकडा प्रभू सारखा नाना नव्हे. बहुत सजन थोर आहे. आमचे ठायीं बहुत माया धरितो. येणे करून आम्ही त्याचेच होऊन राहिलो आहो. नानाची चिंता आम्हास आहे. कांहीं चिंता नाहीं ऐसे उत्तर दिल्हे व बाईस धाकटे नारोबा उपाध्या हस्ते बावानीं

---

१ नारायण भट पाटणकर. (?)

सांगून पाठविले कीं तुम्ही आमचे ठाई हेतु धरता कित्येक निष्ठेच्या गोष्टी बोलत होता आम्ही ही तुम्ही सत्वगुणी म्हणून तुम्हासी बोललो होतो ते स्मरण आहे कीं नाहीं? दुसरी पुरवणी वाचावी.

¶*These two letters are from Nana Purandare to the Peshwa. They relate how the Peshwa tried through Narayan Dikshit Patankar and persons of that type to capture the good will of the two Ranis of Shahu and others. Brahmendra Swami and Narayan Dikshit appear to be tools employed by the Peshwa to carry out his schemes.*

---

*No. 44*] [*1740?*

छ ९ मोहरम

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ
व तथा राजश्री आपा स्वामी
वडिलांचे सेवेसी.

विनंती राजश्री केदारजी केसरकर यांची कन्या वाडियांतील लिंगाई यांचे पुत्रास राजश्री स्वामीनी नेमस्त करून लग्ननिस्चये केला आहे. आपण खासा त्यांचे घरास जाऊन मुलीस हरिद्रालेपन करून आले. ये गोष्टीमुळे बहुत अतिशये जाला. कितेक विपर्यासी भाषणे दोही पक्षीं जालीं. परंतु राजश्री स्वामीच्या चि(तात) गोष्ट होती तेच राजश्रींनी अत्याग्रहे करून केली. कोणाचा काही उपाये चालिला नाहीं. स्वामीस कळावें म्हणून लिहिलें असे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

¶*Shahu performs a marriage forcibly and attends the ceremony personally.*

---

*No. 45*]

पौ छ १९ मोहरम

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ व तथा राजश्री
आपा स्वामीचे सेवेसी.

विनंती राजश्री केदारजी केशरकर याची कन्या वाडियांतील लिगुबाईच्या लेकास राजश्री स्वामीनी अत्याग्रहें मागून देविले हे वर्तमान तपासिले पहिले लिहिले

होते. प्रस्तुत गुरुवारी लग्न जाहलें. राजश्री स्वामी व समस्त सरकारकून अश्व गजसहित मोठ्या समारंभ लग्नास गेले होते. त्यावर काली भृगुवारीं सौ मातुश्रीबाईसाहेबहि गेली होती व राजश्री स्वामीनी भोजनास गेले होते. भोजन केले. विदित व्हावें यास्तव लिहिले असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Shahu performs the marriage of Kedarji Kesarkar's daughter with Lingubai's son.*

---

*No. 46*]

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ व तथा
राजश्री स्वामींचे सेवेसी

विनंती उपरी. राजश्री कुसाजी व येसाजी भोसलें यांचे पंचवीस खडी मिठाचा कागद स्वामींस लेहून त्यांजकडे दिल्हा आहे. तो त्यांचा कोणी स्वामीकडे घेऊन येईल, तरी स्वामींच्या चितास आलें तरी द्यावें. नाहींतरी न द्यावे. येथून भिडेस्तव कागद लेहून द्यावा लागतो. विदित जाहालें पाहिजे. हे विज्ञापना.

¶*Purandare to Bajirao, informing him of the supply of salt to Kusaji and Yesaji Bhosle, sons of Shahu.*

---

*No. 47*] [*3-5-1747?*

छ ६ जालाकर.

श्री

पुा तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामींचे सेवेशीं

विनंति. येसाजी भोसले यास आणावयास लखमोजी व लिंगोजी हवालदार राजश्रींनी पाठविले होते. दादा येत नव्हतेच. हमेश तीन्ही भव्या सडक चुवत असतात (?) तथापि यांनी बहुत प्रयत्ने करून आणले. दादाचा व प्रतिनिधीचा कल्हे आहेच. याजकरितां येसूदादानी से पन्नास राऊत शभंर प्यादा हतीवर निशाण याप्रकारे प्रतिनिधीच्या घरावरून वाकडी वाट दाटून करून सदरेस आले. राजश्रींचे दर्शना जाहले. येसूदादाचा तमासा सदरेस बहुत होत असतो. कांहीं ताळ नाहीं. इतकेंही राजश्री सोसतात. काय आहे भगवान जाणे. असों उगेच वर्तमान हेहि सेवेसी लिहिले आहे हे विज्ञापना.

¶*Purandare writes to the Peshwa news of Yesaji Bhosle's unruly conduct. Yesaji and Kusaji were two illegitimate sons of the King.*

No. 48] [31-1-1741

नकल

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेसी

सेवक रघोजी भोसले सेनासाहेब सुभा कृतानेक विज्ञापना ताा छ २४ माहे जिलकाद मुकाम त्रिचनापली येथे स्वामीचे कृपाकटाक्षे सेनसह सेवकाचे वृत येथास्थित असे विज्ञति. स्वामीचे आज्ञापत्र सादर जाहाले ते छ २० माहे जिल्कादी मुकाम मारी येऊन पोहचले. पौश बहुल त्रितिया बुधवारी सौवती मातुश्रीबाईसाहेब यास येकायेकी देवआज्ञा जाहाली. ईश्वरे मोठीसी आनुचित गोष्ट केली. परम खेद चितास जाहला तो पत्री कोठपर्यंत विस्तार ल्याहावा? सेवकाचे चित परम शोकार्णवी पडिले आहे. तैसेच स्वामीची आज्ञा की, राजश्री फतेसिगबाबा भोसले याचे समाधान करणे. त्याजवरून बहुताप्रकारे शांतवन केले. परतु अतिशय खेद करून परम शोक केला. समाधान करीता चिताचा खेद न टाकीत तेव्हा स्वामीचे हस्ताक्षर दाखविले. स्वामीनी आपले पायाची शफत घालून लिहीले, ते अवलोकन करीता व सेवकाचे सागितलेवरून किचित शोक टाकिला आहे. केवल मनःपूर्वक शोक सोडितील ऐसे नाही. स्वामीस दखलच आहे. स्वामीचे चरणारविंदाचा निजध्यास बहुतच करितात. याउपरी लवकरच स्वामीचे सेवेसी येतील. स्वामीचे चरणाचें अवलोकन जाहालियावाचून शोक टाकितातसे नाहीं. बहुत बहुत विचारे समाधान करीत आहो. लोकोपचारी किंचित समाधान दाखवून अतर्यामी बहुतच दुख करितात. आहिर्निसी स्वामीच्या पायाखेरीज दुसरे निजध्यासच नाही. स्वामीवाचून शोक दूर अणकाच्याने होणे नाही. वरचेवरी प्रतिदिनी जाऊन समाधान करावयास अंतर करीत नाही. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Raghoji Bhonsle writes from Trichinopoli to the king how he tried his utmost to console Fatesing in his bereavement consequent upon the loss of his mother.*

---

No. 49]

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक जिवाजी गणेश साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ १६ साखर पर्येत स्वामींचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असें विशेष. कैलासवासी

राजाराम स्वामीची समाधि किले सिंहीगड येथे आहे. त्यास तेथें प्रतिवर्षी समाराधना होत असते. प्रस्तुत हुजरून हुजरे सामानास्तव आले आहेत त्यानी गडास जाऊन गडीहून कर्यात मावलात सामानाचे रोखे आणिले आहेत. त्यास येविसी स्वामीची आज्ञा नाही याजकरितां रोखे आम्ही माघारे फिरविले. हुजूर बोभाट येईल याजकरितां सेवेसी विनंती लिहिली आहे. स्वामीची आज्ञा येईल त्याप्रो वर्तणूक करून. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Jiwaji Ganesh Khasgiwale to the Peshwa, requesting orders to provide for the anniversary of Rajaram at Sinhgad.*

---

*No. 50*]

श्री

राजमान्य राजश्री चिमणाजी पंडित यांप्रती आज्ञा केली ऐसीजे किले सिहगडी कैलासवासी माहाराजाचे वृंदावन बाधावयास काम चालीस लाविले आहे. त्याच्या साहित्याविसी तुम्हाकडे हरजी ढमढेरे पाठविले आहे. तरी अनकूल पडेल ते साहित्य करून वृदावन तयार होये येसे करणे. जाणिजे छ ६ सवाल बहुत काय लिहिणे.




¶*Sambhaji of Kolhapur to Chimnaji Pandit, ordering a tomb being built at Sinhgad for Rajaram Chhatrapati.*

---

*No. 51*] *[13-4-1723*

रा छ २८ रजब

श्री

श्रीमंत महाराज राजश्री छत्र-
पति स्वामीचे सेवेसी.

सेवक कान्होजी आंगरे सरखेल कृतानेक विज्ञापना येथील कुशल चैत्र बहुल चतुर्थी मंदवासरपर्यंत स्वामीचे कृपादृष्टीकडून सेवकाचें व या प्रांतीचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीनी आज्ञापत्र सादर केले ते प्रविष्ट जाहाले. आज्ञा

केली कीं चिरंजीव राजसबाईच्या लग्नास मोंबतियांचें प्रयोजन आहे. तरी येक हजार मोमबत्या पाठऊन देणें म्हणोन आज्ञा. त्या वरून मोबत्या व गुलाब सिसे पाठविले आहेत

मोमबत्या

| | वोझी सुमार | येकुण वजन खरेवजन | येकुण सुमारी दागिने |
|---|---|---|---|
| प्रा वोझें | १ | ८१॥ | ८१ |
| मोठ्या २४ | | | |
| लाहान ५८ | | | |
| ८१ | | | |
| प्रा वोझें | १ | ८१॥ | १५० |
| प्रा वोझें | १ | ८१॥ | १६४ |
| प्रा वोझें | १ | ८१॥ | १८४ |
| प्रा वोझें | १ | ८१।५ | १७० |
| | ५ | ।=।५ | ७५० |

गुलाब सिसे वोझी चार येकूण सुमार २०

येकूण मोमबत्या सुमार साडेसातसे येकूण वजन खरे सवासातमण पाचसेर व गुलाब सिसे सुमार २० वीस या प्रमाणे रवाना केले असें. सेवेसीं श्रुत जाहलें पाहिजे हे विज्ञाप्ति.




¶*Raja Shahu constantly ordered candles and other foreign articles from the Angres who probably procured them from the British.*

---

*No. 52*] [*3-8-1715?*

शाहुदप्तर स. नं. ५१

[शाहू छत्रपतीने कान्होजी आंगऱ्यामार्फत इंग्रजाकडून मागविलेलें सामान.]

यादी श्रावण वा १ बुधवार छ १४ साबान.

२ इंगरेजी तरवारा उत्तम कोडी.[१]

२ सुऱ्या उत्तम इंगरेजी व हरजिनसी कोडी.

१ कोडी म्ह.-२०.

०|० दांत[1] पका मण निकोपी
१ सुरी[2]
१ सुरी वजा पातळें
२ खाशा लायख
१ शाला
१ पशमी जामेवारी.
—
२
१०० गुलाब सिसे
४०० मोंबती.
८१ अगर[3] उत्तम पका
१ सुऱ्याच्या मुठी मोहऱ्याच्या व तऱ्हतऱ्हावार
०|० तबाखू सुरती
८२ तबाखू बगदादी
१०० कस्तुरीचे नाफे[4] सुमार
१ दारू खासा खेळायास पका खंडी

येणेप्रमाणे पाठवणे म्हणोन कान्होजी आंगरे यास पत्र लिहिणे. मसाल्यास सावटी कर्णे×

¶*Shahu orders foreign articles from Angre—elephant tusk, knives, cloths, rose-water, candles, tobacco, musk, gun-powder, etc.*

---

*No. 53*]

छ १९ रमजान

**श्री**

माहाराज राजश्री छत्रपती स्वामींचे सेवेसी विनंती सेवक नारो गंगाधर कृतानेक विज्ञापना विनंती ता। छ ९ रमजान पावेतो स्वामीचे कृपे करून सेवकाचें वर्तमान येथास्थित आसे विज्ञापना. राजश्री पंत अमात्य स्वामीनी रा। निळकंठ बलाळ याजकडे पाच हजार रुपयेचे यैवजावर पा। त्यास सदरहू पाचा हजाराची विल्हे करून दिल्ही. राजश्री पत आमात्य यानी कोण कोणास रुपये देविले ते त्याचे पदरी घातले. उरला यैवज आपण घेऊन रा। आमात्य पताकडे जाऊन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Naro Gangadhar Mujumdar explains some payments to Shahu.*

---

१ हस्तिदंत. २ कपडा रेघांचा. ३ अगरू.

४ नाफे = नेफे = नाभी, Naval × कान्होजी आंगऱ्याचे हयातींत श्रावण व॥ १ बुधवार = ३-८-१७१५ अर्थात् शाहू महाराजांनीं सामान मागविलें.

No. 54]

श्री

पुरवणी माहराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेसी विज्ञापना राजश्री माहदाजी पंताबराबर रेशीम पाटविलप्रमाणे येथे पोहचलें रंगवयास दिल्हे आहे. ते रंगावयास दिवसगत आहे. याकारणे पटवेकरी यापासून रंगीत रेशीम वजन सेर पके.

८८१ किरमिजी
८८२ वलीव पंचरंगी
८८५ कचे पंचरंगी मोठे.
८८३।९ कचें पंचरंगी बारीक.

८।११९

येकूण अकरा सेर दीड पाव पाटविले असें. येकूण वजन बतीस टक्याचे सेर प्रमाणे पाटविले आहे. सेवेसी पावलियाचे जाब सादर करावया स्वामी समर्थ आहेत. रेशीम रंगावयास टाकिले आहे ते आलियावर अकरा सेर दीड पाव पंटवकरी यास देऊन बाकी रेशीम माहाराजाचे सेवेस रवाना करून. सेवेसी विदित जाहले पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The paper mentions some silk clothes of Shahu being dyed in various colours.*

---

No. 55]

श्री

पुरवणी श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामीचे शेवेसी विनती उपरी. स्वामीचे सेवेसी शालू च्यार देशी गतवर्षी स्वामीनी आज्ञा केली होती. त्याप्रतीचे २५ पंचवीस व येलची दोडा वजन शेर ८८१ येकूण रा। भिकाजी साटम पाटविले आहे. सेवेसी प्रविष्ट होईल. श्रुत जाले पाहिजे हे विज्ञापना.




¶*Kanhoji Angre's letter to Shahu supplying shawls and cardamom.*

No. 56] [19-11-1711

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य
राजश्री अंताजीपंत स्वामी गो.

पोष्य यादव गोपाल नमस्कार विनंती. उपरी: येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करणे विशेष. राजश्री स्वामीनी हरभरेचे आंबीच्या घागरी २ दोन व आंबकापड हात २० वीस आणविले असे. तरी ज्या गावी हरभरा असेल तेथे ताकीद करून आंबीच्या घागरी दोन भरून व कापड आंबीचे वीस हात करऊन पाठऊन देणे. या कामास मानाजी कदम व सुभानजी बागुल जासुद जथे राणोजी जाधव जासूद पा. यास वेतनात दर रूपये २॥ अडीच प्रा रूा ५ पंच आदा करणे. बहुत काये लिहिणे, लोभ असो देणे हे विनंती. छ १९ सवाल सुहुर सन इहिदे अशर मया अलफ.

¶*Yado Gopal asks Antaji Shivdeo to send two potfuls of sour juice for Shahu.*

---

No. 57]

श्री

श्रीमंत माहाराज राजेश्री छत्रपति स्वामीचे सेवेसी

सेवेसी खेलोजी कालभोर विज्ञापना येथील क्षेम ता छ ११ मोहरम परियेत स्वामीचे कृपादृष्टी करून येथास्थित असे. रा सुभानजी अटोले याजबराबर घोडी कुमाईत व सिंगरु येक येसे आपले हवाल केली जे. लस्करात ज्याची त्यास पाऊन देणे. तरी आज्ञेप्रमाणे घोडी पावती करून देऊन. मारुफाती बुध चोपदार. घोडी आपणाजवली पावली, पावती करून. हे विज्ञापना.

¶*A mare and its colt are carefully handed over to their owner by Raja Shahu.*

---

No. 58]

श्री

सेवेसी विज्ञापना. कसबे सासवड येथील देशमुख पाटलास सुध व्हावयाचे पत्र आज्ञा करून देविले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*This bit of paper is in the handwriting of Chimaji Appa. It solicits orders to readmit into caste the Patil of Saswad.*

No. 59]
पाा छ १६ जमादिलाखर

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ
व तथा राजश्री आपा स्वामीचे सेवेसी

विनंती. केरोजी आटोले यांस श्रीहनुमंताची निष्टा फार आहे; भक्ति बहुत करितांत. देवहि त्यांस संकटास पावती, ऐसे कितेक विस्तारें करून पहिलें कोणी राजश्री स्वामीस सांगितलें होते; त्यास छ ११ जमादिलाखरी रात्रीं राजश्री त्रिंबकराव सोमवंसी सरलस्कर यांसमागमे राजश्री संताजी आटोलें व बजाजी आटोले व भिकाजी कांकडे व निराजी पवार वगैरे भले लोक राजश्रीच्या दर्शनास गेले. दर्शन जालें. सदरेस बसले तेव्हां चर्चेवरून चर्चा निघाल्या ते समई केरोजी आटोले यांची चर्चा राजश्री स्वामीनी आटोल्यांस विचारिली तें सत्यच आहे; त्यावरून राजश्री स्वामी बोलिले कीं केरोजी आटोल्यांस दर्शनास आणवणे म्हणून राजश्री संताजी आटोले व बजाजी आटोलें यांस व आम्हास आज्ञा केली कीं केरोजी आटोल्यांस दर्शनास आणवणे त्यांवरून स्वामीस लिहिलें आहे. तरी केरोजीं आटोल्यांस जातीनसीं राजश्रीच्या दर्शनास पाठविले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*King Shahu being much impressed with the devotion of Keroji Atole, asks that he should be brought to see him.*

---

No. 60] [15-7-1749
छ ११ साबान

श्री

पुा तीर्थरूप राजश्री नाना व ता राजश्री
भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी राजश्रीच्या वृषणा सुजले. नारू किंवा वायु विकार. प्रथम दिवसी मुसलमान तबीबानी लेप लाविला होता. सोकित बसले असतां राजश्रीस मूर्छना आली. बापुजीबावा पलंगावर चढोन धरले. तोंड उघडून तोंडांत

पाणी घेतले. आर्ध घटिकेने किंचित पीत पडले.' त्याउपरी चौका घटिकानी सावध जाहले. वैद व पंचाक्षरी आवघे जमा केले होते. दर्याबाईहि जवल आली होती. हे वर्तमान मागेच ल्याहावे ते लिहिले नाही. यास्तव हाली लिहिले आसे. आजी तीन रोज जाहाले आद्यापिवर सूज तसीच आहे. उपाय होत आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

'Shahu's health in his last days.*

---

*No. 61*]

श्री

श्रीमंत परमहंस श्री स्वामी
याही

चिरंजीव जगनाथ यासी आज्ञा. आम्ही निघालो ते छ १० रोजी श्रीस्थळी पावलो. बरोबर सूत्र काथ्या वजन ८२ दोन मण असोन नारळ सुमारी ९ पाठविले आहे. काथ्या सूत्र निगेनिसी ठेवणे व नारळ पाठविले आहेत याजपैकीं चिरंजीव शाहूस दोन देणे व चिरंजीव सौ सगुणाबाईस दोन देणे व तुम्ही येक घेणे; येणप्रमाणे कर्णे. चिरंजीव चिमाजीआपा याजकडे श्रीचे जामदार-खान्यापैकीं ऐवज येणे आहे त्याचा हिशेब त्याणी करून पाठविला होता तो पाहून त्याजकडे दोन माणसे बरी हुशार पाहून पाठवणे. रुपये आणोन ठेवणे. राजश्री येशवंतराव पवार याजकडोन भिक्षेबदल दुसाला तीन हजार रुपये येणे; त्याजकडे केसोबास रवाना कर्णे. आनेवाडी येथील झाडाची नीट रखवाली कर्णे, म्हणोन अंतोबास सांगणे. आम्ही तरी येवढे तुम्हाकरितां श्रम करितो. चिमणाजीचे पुत्रवत पालग्रहण केले तो तर आम्हास टाकून गेला. हा मृत्य लोक. आमचा भरवसा आहे असे नाहीं. काय ते आमचे पुत्र व सिष्य तूच आहे. मेळविले गावर्सोव पैका पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने खाणे. तुम्हास कोणी उपद्रव देणार नाहीं. मजमागे तुमचे शाहू चालवील. कोणते गोष्टीचे चिंता न कर्णे. जो उपद्रव होईल त्याचा निरवंप होईल हे समजणे. आम्ही वैशाख मासी येऊ. चिरंजीव शाहूस पत्र पाठविले आहे. तुम्ही जाऊन देणे व नारळ देणे; जाणिजे. इंदापुरचे तळयाचा बंदोबस्त ठेवणे म्हणोन मुलतानभाईस लिहिणे. वाड्यातील चौकी पाहरा नीट बंदोबस्ताने ठेवणे. जाणिजे हे आज्ञा.

864

No. 62]

श्री

तीर्थरूप परमहंस श्री स्वामी वडिलाचे

शेवेसी

आपत्ये • शाहूने त्रिकाल चरणी मस्तक ठेऊन सिरसाष्टांग दंडवत विज्ञापना. जेष्ट बहुल १३ पावेतो आर्सीर्वादे करून यथास्थित'आहे. विशेष आज्ञापत्र आले त्यांत कितेक प्रकार लिहिले ते कळले. आंगरे याजविसीचा मजकूर लिहिला त्यांस त्याजकडे मुदाम जासूद पाठऊन आणवितो. राजश्री रघोजीराव भोसले याजकडोन व होळकर याजकडोन पुज्या वगैरे आले म्हणोन लिहिले ते नीटच जाहले. हा मृत्य लोक, मानवाचा भरवसा आहे असे नाहीं. ; म्हणोन. वगैरे उदासिने लिहिले. त्यास आपण ईश्वर, जे करतील ते होईल. गावसीव पैकां मेळविला यास धनी कोण आहे? बहुत प्रकारे लिहून आले. त्यास असे लिहावयाचे कारण काय? मुळीच जगनाथपंत याचे पुत्रवत रक्षण केले तेव्हां तो धनी व आम्हा सर्वास गुरू याप्रमाणे आज्ञा जाहाली आहे. त्याप्रमाणे जगनाथ-पंत यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरे आम्ही व आमचे वंषांत जे होतील ते चालवितील यांत अंतर होणार नाहीं हे कळले पाहिजे. शालजोडी १ व मोहरा १०० येणेप्रमाणे पाठविले आहे. कृपा करून घेतले पाहिजे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

*¶Chatrapati Shahu very humbly supplicates the favour of Brahmendra Swami and agrees to continue in perpetuity the inam lands to the heirs and disciples of the Swami.*

---

No. 63] [23-6-1748

श्रीनिवास.

श्रीमंत राजश्री नाना स्वामी यांचे सेवेसी

विनंती पौष्ये केशवराव रघुनाथ कृतानेक साां नमस्कार विनंती येथील कुशल ताा आषाढ शुध अष्टमी मोा सातारा स्वामीच्या कृपेस्तव येथास्थित जाणून स्वकीय कुशलादि लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. आलीकडे बहुत दिवस जाले स्वामीकडून सस्मरणपत्र येउन परामृश न जाला. यास्तव चित सोत्कंठित. आहे. तर सदैव कृपा करून पत्रप्रेशणीं आज्ञा करावी. राजश्री स्वामी मेढियाची स्वारी संपादून आणखी उर्वरित स्वारी दिनचतुष्टयांत पूर्ण करून परावृत व्हावें तों रामोजी सिरके यांस वेथेनें बहुत दाटिलें. यास्तव श्रीमत सौ बाईसाहेबांचे येणे नित्य त्यांच्या अवलोकनास्तव सातारियास यावे लागलें.

---

१ सकवारबाईचा बाप.

म्हणून लस्करसहित जुन्या कळंब्यावर आले. तेथें दाहापधरा मुकाम जाले. त्याचे मुकामावर स्वामीकडून राजश्री गोविंदरावजी आले. भेटी जाली. वर्तमान त्यांच्या सांगितल्यावरून कळलें. सर्वही समयावर महकुफ आहे. आम्हांस न्युन्यांच्या[1] तलावरीच शरीरी ज्वराची पीडा होउन आम्हीं घरास आलो. आजी पंचेवीस रोज जाले. नित्य-ज्वर येतो. उपाय होतच आहे. स्वामीचे कृपेनें आरोग्य होईल. रावजीहि ज्वरानें श्रमी आहेत. त्यानंतर पर्जन्यानें आपला उद्योग अत्यंत आरंभिला. यांचे नित्य जाणे येणे न बने; श्रेष्ट तो मागेंच ग्रामप्रवेश केला समागमें आम्हींहि ते दिवसीं होतो. बहुतसा विराग दाखविला. परंतु राजग्रहप्रवेशभोजनादिक संपादून मागती रामोजीबावांस पाहून लस्करास गेले. त्यानंतर दोनच्यार आवर्ती जाल्यानंतर नदीस पाणीं येऊं लागेलें. उभयतांचा वियोगहि येक दिवस जाला. तदोतर निश्चय होऊन गोडोलीवास नेमिला. तेथें अंत:पुरास ग्रह निर्मिलें. आपल्यास तृणग्रहच योजिलें आहे. सर्वांनीहि येथांशे ग्रहे दाक्षिण्यास्तव घातलीं आहेत. नेहमी राहतां राजश्री देवरावजी मात्र आहेत. त्यास हे ने सारखेंच आहे. आणि मनोगतहि श्रेष्टांचे त्यांतच आहे. राजश्री त्र्यंबकरावनाना आले तेहि नित्य दरबारास जात येत असतात. त्यांस दोन रोज बाधले आहे म्हणून यैकतो. शरीर आहे. येवं प्रकारे रामोजीबावाच्या योगें करून समीप आगमन जाले. जर कोरेगांवी असते तर येक नदी व दोन वोहल. नदीहून अधीक, यांत बहुतांचा सेवट होता. श्रीस चिंता येथें आहे. निदानीं उपाय करिता करितां रामोजीबावाहि शष्टीच रात्रीं पंच (त्वाप्रत) पावले. येथास्थित माहुलीस नेले. वरकड होणे ते होतच आहे. चातुर्मास्य गोडोलीवरी होतो. तदोतर ईश्वरेछया. जें होणे ते विवाहादिक व्हावयासे आहे. पाहावे. आतां छपरे घालण्यांचाच शुगुल आहे. सिकार तो सहज स्वभावच. धर्णाण दाहा रोज घरींच वाडियांत आहेत. त्यांचीच अवृत्ती द्विवार होत असते. वरकड राजकीदेवकी चर्चा आहे, स्वामीस विदितच आहे. नवाब नासरजंग मावारें फिरलें म्हणून हुजूरची बातमी आहे. श्री जाणे. तेथें सर्व वृत असेलच. राजश्री जानोजी निंबालकरच आले आहेत. सर्वहि स्वामीपासीं आहे. कर्नाटकात नरु करून नवाबास द्यावा हें मानस राजपुत्रांचे. त्या अनुसंधनांची पत्रे मदेत्र यांची त्यांस जातात. त्यांचीं उत्तरेंहि येतात जे, करून देतों. हुजूर लिहिले आहे त्यांचीं उतरें येतात. करून देतो. विठलराव कोरेगांवावर आले असतां करार करून गेले आहेत, त्यावरी यांणी आधेण[2] ठेविलें आहे. कर्नाटकास हे उभयता त्यांपैकी राजश्री रघोजीबावा तिकडेच गुंतलें. आतां

१ नुन गांव आहे.

२ आधान = आधार.

यावरच देणे घेणें. तहाच्या भरोसीयावर आहेत. त्यापैकी आरकाडचे दोन लाख रुपये आले. वरकड येतील असें आहे. नाईक साप्रत कोरेगावांपासून वाडियांत पैगाम करून त्यांचे वच दोन माहिनियांत तुझे बरे करीतां येसें घेउन येक मास लोटिला. उरला लोटोन कार्य जालियां उतम. नांहीतर पूर्व रंग करूं म्हणतात. तें तैसेंच आहे श्रेष्ठाच्या मते आपण जे देऊं केले, मागें दिल्हे, लाखा रुपयांचे माहाल त्यांत वेचले, ते देवविती आगर मुद्दल देवविती. मग यांचे बिगाड आम्हांकडे नाहीं. वाडा जाणेत त जाणेत. हें आसें आहें. अंत:कर्ण पुत्रांचच ठायीं कर्नाटकविशयीं दिसतें. होता होईल तें खरें. सेवेसी विदित व्हावे म्हणून नवें जुनें वृत लिहून आम्ही आपल्या सेवेचा मात्र मजरा करून घेतला. स्वामीस सर्व विदित आहेच. बहुत काये लिहावे कृपा पूर्ण आसावी हे विज्ञापना.

*Keshaorao Raghunath to Nana (Peshwa) from Satara. The letter in a very humorous style gives many important details of Shahu's life, who enjoyed living in a hut thatched with hay in the height of the rainy season of Satara. Further details are given regarding the intentions of Shahu and Fatesing Bhosle (Prince) regarding the division of Karnatak, the covetous eye of Raghuji Bhosle and Babuji Naik in the same region and the intrigues of Shahu's Rani Sakwarbai whose father Ramoji Shirke is reported in the letter to have died on 21st June 1748. Forrest mentions how Gordon of the British embassy had to meet Shahu in a tent with knee-deep of water during the rains. The letter is interesting in various ways. The reference to Babuji Naik repeating his attempt at suicide, supplies a clue to the date of the paper. That attempt took place in June 1748 (vide* पु. द. भा. १ ला—१६९).

---

*No. 64*] [*End of June 1748*

## श्रीनिवास

पुर्वणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीं

विनंती उपरी वरकड अर्थ मुख्य पत्रावरून विदित होईल. पेशजीप्रमाणे सावणूर बिदरूर सोंधें हें तिनी संस्थाने त्या राजश्री स्वामीकडून (आपणा) * * * कडें जालीं हें वृत तिकडोन आम्हांस बहुतांनीं लिहिलें कीं हें कसें काय (आहे) * * आम्ही स्वामीचा प्रतापलेख आपल्या मतेच केला आहे कीं हे तीनी संस्थानेसीं काय आहेत, आगदी दक्षणचा व हिंदुस्थानचा बंदोबस्त सर्व श्रीमंतावरच आहे तेथें हें काय आहे ? सर्वहि रुजु होणे यांतच खैर आहें आसें सहजस्थितीनें लिहितां. सांप्रत राजश्री मुरारजी हिंदुराव घोरपडे यांणी स्वामीस पत्रे लिहून मुजरद कारकून व जासूदजोडे पाठविलें आम्हांसहि हाच भाव

स्वामींची ममता आपल्या ठायीं आसावी हा अर्थ लिहिला आहे. सांप्रत ते व नवाब हिदायेत मोहिदीनखान मिळोन दाहा बारा हजार स्वार आहेत. चित्रदूर्गकर कस्तुरीरंगपा नाईक आहेत. संतेहोंनूर बिदरुरकरांचे, त्यास वेढा घालून बिदरुरकरांस पैका मागतात. तेथें पांच च्यार लाख रुपये घेऊन उठतील. चित्रदुर्गकरानी तीनी लाख रुपये दिल्हे. याप्रकारे हिदायेत मोहीदीनखानांचे चितीं नातूपंणांचा (?) आहंभाव होता घोरपडे, व सेसआपा तो मिळोन आहेत. गुदरान आहे. मनसबा कळतच आहे. त्यांस काय ते आज्ञा स्वामी लिहितीलच. आम्हांसहि आज्ञा करावी. त्याप्रमाणे आम्हीहि त्यांस लिहूं. श्रीकृपेनें जें स्वामी मनावर धरितील ते घडेल असाच पुण्योदये स्वामीचा आहे. तेथें राजश्री जानबा आले आहेत त्यांचा स्वामीचा इतर भाव नाहीं. या समयीं कर्नाटकचा बंदोबस्त स्वामींचे हाते होये असें जालियां उतम. स्वामी जे गोष्टी विचारास उपयोगी ते करीतीलच. सैन्यांत स्वामीस त्या समारंभे करून पाहवे असा हेतू होता तो पूर्ण स्वामींनीं मुजरद केला. दुसरा हे(तु) पुण्यांत स्वामी असतां तें सर्व व नूतन सदरा बाग पाहावयाचा हेतू आहें. पूर्ण करणार स्वामी समर्थ आहेत. आहिणींसीं चित्तवृत्तियोगें समीपच आहों. कदाचित दैवगतीनें स्वामीनीं कृपा करून दर्शनांचा योग घडविल्या सांप्रत सहजवृत्तींत राजश्री माहाराव जानोजी निंबालकरहि तेथें आहेत त्यांच्या दर्शनाचा लाभ जाला तर होऊं ये. हें सर्वही स्वामी कृपा करून ळळा चालवितात म्हणून भलतेंच मनोगत सेवेसीं लिहितो. सारांश येक स्वामीची कृपा असतां आम्हीं कोठें असिलों तरीं शोभिवंत आहो. राजश्री स्वामींनींहि हस्ताक्षर पत्र स्वामीस पाठविलें आहे. म्ह(ण)णें कीं कांहीं सांगणें पुसणें आहे तर राजश्री बाबासच * * * ते पत्रे पावली असतीलच. आम्ही तो ते समयीं दरबारीं नव्हतो, परंतु * * त्यांणी आभिप्राय सांगीतला कीं पर्णश्रामीहून[1] कांहीं वार्तासंभुतीश्रवणे साशंक होऊन, ते तों वृत निराकरणसें करून क्षणेकावर हें पत्रें स्वामीस पाठविलीं आहेत म्हणून येकीलें ते हि सुचविलें असे. बहुत काये लिहावें कृपा पूर्ण असावी हे विज्ञापना. पानगावांस पत्रे पाठविली त्यांणी लिहिलें कीं काय आहे तो शोध मनास आणणे. त्यावरून कासीरायाचे पुत्र खंडेराव न्यायाधिस तात्काळ करून मातबरी देऊन पाठविलें आहेत याउपरी काय होते पाहावे हे विज्ञापना.

*Keshaorao Raghunath to the Peshwa, giving him news of Shahu's Court, particularly as regards the affair of Karnatak to which several persons were making their claims. The last lines mention an inquiry of (Ramraja residing at) Pangaum and the dispatch there of Khanderao Nyayadhish by Shahu. This warrants the date of the paper to be about 1748.*

---

१ पानगांव.

